# अर्वाचीन मराठी साहित्य

( सन १८७४ ते १९३४ )



किंमत पांच रुपये

प्रकाशक,
विष्णु पांडुरंग नेने, बी.ए.,
खारीवाव रस्ता, बडोदें.



मुद्रक,
सदाशिव रामचंद्र सरदेसाई, बी.ए., एलएल.बी.
नवीन समर्थ विद्यालयाचा 'समर्थ भारत' छापखाना,
१४७ सदाशिव पेठ, पुणें २.



श्री. सरकार सयाजीराव महाराज गायकवाड, सेनाखासखेल, समशेर-बहाद्दर,
जी.सी.एस्.आय्., जी.सी.आय्. ई., एल्एल्.डी.

॥ श्री ॥

पतितपावन श्रीमंत सरकार

# सर सयाजीराव महाराज गायकवाड,

संस्थान बडोदें,

सेनाखासखेल, समशेर बहादूर,

जी. सी. एस्. आय्., जी. सी. आय्. ई., एल्एल्.डी.,

यांस

त्यांची प्रजाहितदक्षता, सर्वव्यापी विद्वत्ता, गुणग्रहण-
तत्परता, कर्णासारखी दानशूरता, अखिल समाजा-
बद्दलची सहानुभूति, साहित्यिकांचा स्वयंस्फूर्त
व अयाचित सत्कार, देशी भाषांचा सक्रिय
पुरस्कार, इत्यादि सद्गुणसमुच्चयावर
व महनीय कृतींवर लुब्ध होऊन
आम्हीं संपादिलेला हा

## हीरक-ग्रंथ

त्यांचे हीरक-महोत्सवानिमित्त
सादर समर्पण.

—संपादक

साहित्य नूतन असें निवडोनि आम्हीं
यत्नेंच हें बनविलें मधुरान्न नामी,
तें आज हीरकमहोत्सव-सुप्रसंगीं
ठेवोनि भाव भरतासम अंतरंगीं,
केलें समर्पण तुम्हांस जनाभिरामा !
कर्तव्य पूर्ण करितां सुख होय आम्हां;
स्वीकारुनी चव पहा, शमवा भुकेला.
राजर्षिला उचित हा मधुपर्क केला.

—राजकवि चंद्रशेखर

× × ×

हें सारस्वताचें गोड । तुम्हींचि लाविलें जी झाड ॥
तरि अवधानामृतें वाड । सिंपौनी कीजो ॥
मग हें रसभावफुलीं फुलैल । नाना फलभारें भरैल ॥
तुमचेनि प्रसादें होईल । उपयोगु जगा ॥

— ज्ञानेश्वरी ११-१९-

# प्रस्तावना

बलिप्रतिपदेच्या सुमुहूर्तावर अर्वाचीन मराठी साहित्याचें हें समालोचन वाचकांच्या हातीं देण्यास आम्हांस आनंद वाटतो.

२. प्रस्तुत ग्रंथाचा संकल्प केल्यापासून त्याच्या योजकावर अनेक संकटें आलीं व त्यांतच शारीरिक व मानसिक आधिव्याधींची भर पडून अंगीकृत कार्य सिद्धीस जातें किंवा नाहीं याविषयीं मनास फार काळजी वाटूं लागली होती. पण परम कृपाळू परमेश्वरानें ती दूर करून आजचा हा आनंदाचा दिवस दाखविला, याबद्दल आमच्याप्रमाणेंच आमचे वाचकहि त्याचे आभार मानतील अशी आमची खात्री आहे.

३. कै. विनायकराव भावे, कै. बाळकृष्णपंत भिडे, ह. भ. प. लक्ष्मणराव पांगारकर यांनीं प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिला आहे. रा. आजगांवकर यांनीं संतकवींचीं चरित्रें प्रसिद्ध केलीं आहेत. 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' या पुस्तकांत प्रो. दत्तो वामन पोतदार यांनीं सन १८७४ पर्यंतच्या अर्वाचीन गद्यवाङ्मयाशीं आपली ओळख करून दिली आहे. कै. रामभाऊ जोशीकृत 'मराठी भाषेची घटना' यासारख्या पुस्तकांत व विविधज्ञान-विस्तारादि प्रमुख मासिकांत अर्वाचीन मराठी वाङ्मयाची थोडीबहुत माहिती सांपडते.
पण सर्व अर्वाचीन वाङ्मयाचें विस्तृत समालोचन आजवर कोणींच प्रसिद्ध केलें नव्हतें. मराठी वाङ्मयांत ही मोठीच उणीव होती. ती भरून काढण्याच्या हेतूनें हा ग्रंथ रचिला असून त्यांत सन १८७५ ते १९३५ पर्यंतच्या काळांतील मराठी साहित्याचा आढावा घेतल्याचें वाचकांस आढळून येईल. अशा साहित्येतिहासाचा, भाषेची प्रगति कशी व किती झाली, अद्याप किती पल्ला गांठावयाचा आहे हें साहित्यिकांना कळण्यास फार उपयोग होतो. पाश्चात्य साहित्यांत तर अशा इतिहासाला फार महत्त्व देण्यांत येतें. एम्. ए.च्या विद्यार्थ्यांना या ग्रंथाची आवश्यकता लागलीच पटेल.

४. वरील काळाचें दोन दृष्टींनीं वैशिष्ट्य आहे. सन १८७४ सालीं कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं आपली सुप्रसिद्ध 'निबंधमाला' काढून अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा पाया घातला. याच सालीं बडोद्याचें राजकारण रंगून पुढें कांहीं दिवसांनीं सध्याचे विद्याप्रिय नृपति व मराठी वाङ्मयाचे प्रमुख पुरस्कर्ते श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड गादीवर आले. या दोन्ही घटना आपआपल्यापरी

क्रांतिकारक ठरल्या आहेत. निबंधमालेनें मराठी भाषेविषयींची अनास्था दूर करून लोकसमाजांत स्वभाषेबद्दल आदर व प्रेम निर्माण केलें आणि नूतन ग्रंथनिर्मितीस जोराची चालना दिली. श्रीमंत सयाजीराव महाराजसाहेबांनीं बडोद्याच्या राज्यकारभाराचा नूर बदलून आपल्या धार्मिक, सामाजिक व शैक्षणिक सुधारणांमुळें आजवर एकाहि हिंदी राजानें न मिळविलेलें अपूर्व यश संपादन केलें. या आधुनिक भोजराजानें अनेक विद्वानांचा, साहित्यिकांचा व गुणीजनांचा गौरव करून 'विद्वानेवहि जानाति विद्वज्जनपरिश्रमम्' हें सुभाषित सार्थ केलें आहे. प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें ज्याच्या हातावर त्यांचें दानोदक पडलें नाहीं, असा अर्वाचीन साहित्यिक विरळा, असें म्हटल्यास मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. निबंधमालेच्या म्हणजे पर्यायानें अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या सुरुवातीस व श्रीमंत सयाजीराव महाराजसाहेबांच्या राज्यारोहणास आज साठ वर्षें होऊन गेलीं आहेत. वयास साठ वर्षें झालीं म्हणजे आपण पूर्वी षष्ट्यब्दिपूर्ति करीत असूं. अलीकडे पाश्चात्य लोकांच्या अनुकरणानें आपण हीरकमहोत्सव करण्यास सुरुवात केली आहे. या नवीन चालीस अनुसरून वरील दोन्ही प्रसंगांचा हीरकमहोत्सव या ग्रंथरूपानें आम्हीं आज साजरा करीत आहोंत, असेंहि म्हटल्यास चालेल.

५. वरील दोन्ही घटनांचें म्हणजे आधुनिक मराठी वाङ्मयाचा ओघ व महाराजांची कारकीर्द यांचें समकालीनत्व हा एक अपूर्व योग होय. नवीन वळणांतून वाहणारी वाङ्मयसरिता व महाराजांची राजवट या समांतर रेषेंत न राहतां दोन ध्वनिलहरींप्रमाणें परस्पर छेदक अशा रेषेप्रमाणें चालू राहिल्या. महाराजांच्या आश्रितांपैकीं अनेक जुन्या-नव्या स्त्रीपुरुषांनीं मराठी वाङ्मयाची सेवा करून पहिल्या लेखकांत नांव कमाविलें आहे, तर बाहेरच्या अनेक लेखक-प्रकाशकांस सढळ हातानें उत्तेजन देऊन महाराजांनीं अंशतः तरी त्यांना आपले आश्रित बनविलें आहे. उलट वाङ्मयसेवकांनीं महाराजांच्या सुखदुःखप्रसंगीं काव्यादिकांच्या रूपानें सहानुभावना व्यक्त केल्याचें इतिहास सांगतो. १९३२ सालीं तर कोल्हापुरच्या साहित्यसंमेलनांत महाराजांस अध्यक्षपद देऊन लेखकवर्गानें त्यांचा गौरव केला. मराठी ग्रंथांच्या अर्पणपत्रिका मोजल्या तर शेंकडा ५० महाराजांस व बाकीच्या ५० इतर सर्वांस, असें प्रमाण काढतां येतें.

६. ग्रंथप्रयोजनाचा येथवर विचार झाला, आतां त्यांतील विषयाकडे वळतों.

७. ग्रंथाच्या नांवावरून त्यांतील विषयाचा वाचकांस बोध होण्यासारखा आहे. त्यांतील 'साहित्य' हा शब्द थोड्या व्यापक अर्थानें आम्हीं उपयोजिला आहे. विंचेस्टरच्या मताप्रमाणें साहित्यांत निरनिराळीं शास्त्रें, धर्म, तत्त्वज्ञान वगैरे विषयांवरील पुस्तकांचा समावेश होऊं शकत नाहीं. आम्हीं तो येथें केला आहे. धर्म, निबंध व राजकारणविषयक पुस्तकें यांचें समालोचन करण्याचा आमचा विचार होता, पण त्यांवरील लेख वेळेवर हातीं न आल्यानें व ते लिहावयास आम्हांस पुरेसा अवधि न राहिल्यानें हे दोन्ही विषय आम्हीं वगळले आहेत. या ग्रंथाची पुनरावृत्ति काढण्याचा योग आल्यास राहिलेले विषय तींत घालण्यांत येतील.

८. या पुस्तकांत एकंदर १८ लेख किंवा प्रकरणें आलीं असून तीं निरनिराळ्या लेखकांनीं सजविलीं आहेत. यांपैकीं सर्वच लेख एका तोडीचे नाहींत. कांहीं मार्मिक समालोचनपर असून कांहीं जंत्रीवजा आहेत. प्रत्येक लेख निरनिराळ्या लेखकानें लिहिला असल्यानें एकसूत्रतेस साहजिकच धक्का बसला आहे; कांहींत थोडीबहुत पुनरुक्ति झाली आहे. चारपांच लेखांशिवाय इतर सर्व लेख छपाईस सुरवात झाल्यानंतर हातीं आल्यानें त्यांच्यावर आम्हांस संपादनसंस्कार करतां आले नाहींत व त्यामुळें वरील दोष तसेच राहिले आहेत, ही गोष्ट येथें नमूद करावीशी वाटते.

९. पहिला लेख श्रीयुत ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं लिहिला असून त्यांत त्यांनी गेल्या साठ वर्षांतील मराठी काव्यांतील अंतःप्रवाहांचें समालोचन केलें आहे. सन १९३४ च्या अखेरीस त्यांनीं आपला लेख लिहून तयार केल्यानें त्यांत चालू सालीं प्रसिद्ध झालेल्या कवितेचा अर्थातच त्यांना विचार करतां आला नाहीं. तसेंच काव्यवाङ्मयाचें समालोचन करतांना विस्तारभयास्तव ते तपशिलांत शिरले नाहींत. या विषयावर त्यांनीं 'आधुनिक मराठी कविता' या नांवानें एक स्वतंत्र पुस्तक लिहिलें असून तें लवकरच प्रसिद्ध होईल. जिज्ञासूंनीं तें जरूर पाहावें.

१०. श्रीयुत दौंडकर यांनीं लघुकथा-वाङ्मयाचें परीक्षण केलें आहे. लघुकथेच्या तंत्राचा त्यांनीं खोल अभ्यास केला असून ते स्वतः एक नाणावलेले लघुकथालेखक आहेत. त्यांच्या कथा 'मोत्यांची कुडी' या नांवानें प्रसिद्ध झाल्या असून त्यांच्यांत प्रसंग व स्वभाववैचित्र्य, सूचकता, विषयाला कलाटणी देण्याचें कौशल्य इत्यादि लघुकथालेखकास आवश्यक गुण भरपूर प्रमाणांत सांपडतात.

११. श्री. विठ्ठल हरि कुलकर्णी हे एक नवोदित टीकाकार व वाङ्मयाभ्यासी असून गेल्या साठ वर्षांत प्रसिद्ध झालेल्या ठळक कादंबऱ्यांचें त्यांनीं आपल्या लेखांत मार्मिक समलोचन केलें आहे. मराठी वाङ्मयाची ही शाखा सर्वांत अधिक संपन्न असून तीवर एक स्वतंत्र ग्रंथ लिहितां येईल. स्थलकाल-मर्यादेची सीमा पाळून रा. कुलकर्णी यांनीं शक्य तों सर्व प्रमुख कादंबऱ्यांचा आपल्या लेखांत परामर्ष घेतला आहे. त्यांत एखाद्या चांगल्या कादंबरीचा किंवा तिच्या लेखकाचा उल्लेख केला गेला नसण्याचा संभव आहे, पण तो केवळ विस्मरणामुळें होय. रा. कुलकर्णी यांचा लेख छापून झाल्यावर प्रो. फडके यांची 'उद्धार', रा. गुर्जर यांची 'संगम' ( बंगालींचें भाषांतर ), रा. वा. वि. जोशी यांची 'पराधीन' वगैरे कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत.

१२. सुप्रसिद्ध लघुकथालेखक व कांदबरीकार रा. वि. स. खांडेकर यांनीं नाट्यवाङ्मयाचें समीक्षण केलें आहे. गेल्या साठ वर्षांचे, दहा दहा वर्षांचा एक याप्रमाणें सहा भाग करून या प्रत्येक कालखंडांत होऊन गेलेल्या प्रमुख नाटककाराच्या नाट्यकृतींचा त्यांनीं परामर्ष घेतला आहे. इतर नाटककारांच्या कृतींचा पण त्यांनीं थोडासा विचार केला आहे.

१३. यापुढील लेख रत्नाकराचे एक वेळचे संपादक रा. हर्षे यांनीं लिहिला असून त्यांत त्यांनीं विनोदी वाङ्मयाचा आढावा घेतला आहे. अलीकडे या शाखेची द्रुतगतीनें वाढ होत असून निरनिराळ्या नियतकालिकांतून विनोद या सदराखालीं घालतां येईल असें वाङ्मय प्रसिद्ध होत आहे. हें सर्व लिखाण एके ठिकाणीं मिळणें अशक्य असल्यानें त्याचा या आढाव्यांत समावेश करतां आला नाहीं.

१४. सहाव्या लेखांत रा. गोपीनाथपंत तळवलकर यांनीं बालवाङ्मयाशीं परिचय करून दिला असून चरित्रवाङ्मयाचें प्रो. बनहट्टी यांनीं फार मार्मिक व सुंदर समालोचन केलें आहे. त्यांत रा. पाध्येकृत हेमाद्रि, बाबा पदमनजींचें ख्रिस्तचरित्र, रा. तळवलकर यांचा ख्रिस्तावरील चरित्रात्मक निबंध वगैरेंचा केवळ अनवधानामुळें उल्लेख केलेला नाहीं. त्याबद्दल वाचक गैरसमजुत करून घेणार नाहींत अशी आशा आहे.

१५. आपल्या पाठीमागील अनेक व्याप संभाळून प्रो. पोतदार यांनीं इतिहासाचें दालन सजविलें आहे. अधिक फुरसद मिळती तर आपला लेख त्यांना अधिक व्यवस्थित रूपांत मांडतां येऊन गेल्या साठ वर्षांत झालेले ऐतिहासिक वाद

आणि त्यामुळें इतिहासांत झालेला बदल यांचेंहि विवेचन करतां आलें असतें. पण वेळेच्या अभावीं तसें होऊं शकलें नाहीं.

१६. यानंतर भाषाशास्त्र, साहित्य-समीक्षण व कोशवाङ्मय हे विषय आले असून त्यांचा परामर्श अनुक्रमें रा. कुळकर्णी, प्रो. जोग व रा. चिं. ग. कर्वे यांनीं घेतला आहे.

१७. यापुढील लेखांत डॉ. लांढे यांनीं तत्त्वज्ञानवाङ्मयाचा व प्रो. ओतुरकर यांनीं अर्थशास्त्रीय वाङ्मयाचा आढावा घेतला आहे. अनवधानामुळें डॉ. लांढे यांच्या लेखांत के. भाऊशास्त्री लेले यांनीं प्रसिद्ध केलेल्या तत्त्वज्ञानविषयक वाङ्मयाचा व महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर व प्रो. चांदोरकर यांनीं बडोदें सरकार-साठीं केलेल्या शांकरभाष्याच्या भाषांतराचा उल्लेख आलेला नाहीं. प्रो. ओतुर-करांनीं अर्थशास्त्रीय वाङ्मयाबरोबर महाराष्ट्रांतील अर्थशास्त्रीय विचारांचेंहि विवे-चन केलें आहे. पुढचें प्रकरण शास्त्रीय वाङ्मयाविषयीं असून तें प्रो. ज. नी. कर्वे यांनीं सजविलें आहे.

१८. हिंदी, बंगाली व गुजराथी भाषेंतील कांहीं उत्तमोत्तम ग्रंथांचीं मराठींत नवीन भाषांतरें किंवा रूपांतरें झालीं आहेत. त्यांत बंगाली भाषेंतून मराठींत भाषांतर झालेल्या पुस्तकांची संख्याच अधिक आहे. सन १९१२ सालीं 'केसरी' पत्रांत या विषयावर बराच पत्रव्यवहार आला असून, त्याच्यावरून बंगाली पुस्तकांचीं मराठींत दोन दोन तीन तीन भाषांतरें कशीं प्रसिद्ध झालीं आहेत, हें कळून येतें. 'बंगालीची मराठीस देणगी' या सदराखालीं रा. गिर्जे यांनीं या भाषांतरित वाङ्मयाचा परामर्श घेतला आहे. त्यांत रवींद्रनाथांच्या गीतांजली व जीवन-स्मृति यांचा व अशाच दुसऱ्या पुस्तकांचाहि उल्लेख करणें राहिलें असल्यास वाच-कास आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

१९. सर रमणभाई नीलकंठ, गोवर्धनराम त्रिपाठी, कन्हैय्यालाल मुनशी, रमणलाल देसाई, महात्मा गांधी वगैरे गुजराथी साहित्यिकांच्या कृतींचीं मराठींत रूपांतरें झालीं आहेत. पण बंगालीच्या मानानें त्यांची संख्या अगदीं अल्प आहे. लो. टिळक, न. चिं. केळकर, ह. ना. आपटे, गो. स. सरदेसाई वगैरे लेखकांच्या ग्रंथांचा गुजराथी भाषेंत अनुवाद झाला असून त्यांची संख्या गुजराथींतून मराठींत आलेल्या पुस्तकांपेक्षां खात्रीनें अधिक भरेल. हिंदी पुस्तकांविषयीं पण साधारणतः असेंच विधान करता येईल.

२०. साहित्य संमेलनांनीं मराठी वाङ्मयाभिवृद्धीस चालना दिली काय, य प्रश्नाचें रा. सा. चापेकर यांनीं आपल्या लेखांत उत्तर दिलें असून तें वाचकांस पटेल अशी आशा आहे.

२१. मराठी भाषेंत आजवर अनेक वर्तमानपत्रें व मासिकें निघालीं. त्यांची त्रोटक हकीकत रा. कानडे यांच्या लेखांत वाचकांस वाचावयास मिळेल. या विषयावर रा. कानडे यांनीं बरीच सामग्री जमविली असून एक स्वतंत्र पुस्तक काढण्याचा त्यांचा विचार आहे. विस्तारभयास्तव त्यांच्या लेखांत आम्हीं बरीच छाटाछाट केली आहे. त्याबद्दल ते रागावणार नाहींत असा आम्हांस भरंवसा वाटतो.

२२. यानंतर 'उपसंहार' हें प्रकरण आलें असून तें साहित्यसम्राट श्री. न. चिं. केळकर यांच्या लेखणींतून उतरलें आहे. दोन महिन्यांपूर्वी आम्हीं श्री. तात्यासाहेबांस उपसंहार लिहिण्याविषयीं विनंति केली. ती त्यांनीं ताबडतोब मान्य करून ठरीव मुदतीच्या आंत आपला लेख लिहून दिला, याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच होतील. आपल्या लेखांत त्यांनीं प्रचलित वाङ्मयविषयक प्रश्नांचा परामर्ष घेतला असून तो सर्वांस उद्‌बोधक व मार्गदर्शक वाटेल यांत शंका नाहीं.

२३. उपसंहारानंतर लेखक-परिचय दिला आहे. गेल्या साठ वर्षांत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांपैकीं दरेक शाखेंतील निवडक वाचनीय पुस्तकांची यादी देण्याचा आमचा विचार होता, पण विस्तारभयास्तव तो बदलावा लागला. याच कारणामुळें ग्रंथसूचीहि दिली नाहीं. पण तीऐवजीं अनुक्रमणिका विस्तृत केली आहे.

२४. प्रस्तुत ग्रंथ वाचून गेल्या साठ वर्षांतील मराठी वाङ्मयाची वाचकांस सम्यक् कल्पना येईल व त्यांत काय उणीवा व गरजा आहेत, हेंहि त्यांस कळेल. हें वाङ्मय टाकाऊ आहे, त्यास जागतिक वाङ्मयांत स्थान नाहीं अशी ओरड अलीकडे कांहीं जणांनीं सुरू केली आहे, पण तींत विशेष तथ्य आहे असें आम्हांस वाटत नाहीं. आमच्या समजुतीप्रमाणें डॉ. केतकर (!) यांनीं हा आक्षेप प्रथम घेतला व आज त्याची री कित्येक नवमतवादी स्त्री-लेखक ओढीत आहेत! तुकारामाचे अभंग आणि टिळकांची कविता यांनीं जागतिक वाङ्मयांत स्थान मिळविलें आहे, ही गोष्ट या आक्षेपकांनीं दृष्टीआड केलेली दिसते. महाराष्ट्रीय विद्वानांनीं इंग्रजींत लिहिल्यामुळें 'महाराष्ट्रीय' लिखाणानें परद्वीपस्थ पंडितांतकीर्ति मिळविली असली तरी ती मराठी वाङ्मयाच्या वांट्यास न यावी हा दुर्दैवी योगायोग होय! लो. टिळक,

भांडारकरद्वय, रा. ब. रानडे वगैरे महाराष्ट्रीय पंडितांच्या इंग्रजी कृति जर जगद्वंद्य होतात तर शुद्ध मराठींत लिहिणारांच्या कां होऊं नयेत ? अर्थात् महाराष्ट्रीय बुद्धि कनिष्ठ म्हणून नव्हे तर आमची अति बाह्य अशा पुढें मांडण्याच्या कामीं आमच्या हातून होणारी अक्षम्य हेळसांड हेंच असल्या आक्षेपांचें मूळ होय. दारिद्र्य व संघशक्तीचा अभाव हीं देखील या आमच्या हीनतेचीं कारणें म्हणून म्हणतां येतील. रवींद्रनाथ ठाकूर यांना सज्जनता एखाद्या केळकर, फडके, किंवा खांडेकरांजवळ असती तर मराठी वाङ्मयानें केव्हांच जगाच्या बाजारांत स्थान मिळविलें असतें. इतर प्रांतीयांप्रमाणें संघ-शक्ति तरी आमच्याजवळ कोठें आहे ? एकमेकांचा पुरस्कार करण्याऐवजीं आमचा लेखकवर्ग विनाकारण एकमेकांवर वाङ्मयचौर्यादिकांचे आरोप करून पाय खेचण्यास मात्र प्रवृत्त होत असतो. अशा स्थितींत मराठी वाङ्मयास जागतिक स्थान मिळत नाहीं, तें केवळ गुणाभावामुळें नव्हे, तर बाह्य पुरस्कारांच्या अभावामुळें. साहित्य-सेवकांनी एखाद्या मध्यवर्ती संस्थेतर्फे निवडक मराठी ग्रंथांचीं भाषांतरें निष्णात परभाषापंडितांकडून करवून प्रसिद्ध करविल्यास मराठी साहित्याची खरी किंमत दुनियेस कळेल.

२५. आतां राहिलें एक गोड काम, आणि तें म्हणजे आभारप्रदर्शनाचें. प्रथम ज्या लेखकवर्गाच्या साहाय्यानें आम्ही हा ग्रंथ प्रकाशित करूं शकलों त्याचे आभार मानले पाहिजेत. लेखासाठीं तगादा करतांना आमचे हातून एखादा अधिक उणा शब्द न कळत बोलला, लिहिला गेला असेल त्याबद्दल आमचे सर्व लेखक आम्हांस क्षमा करितील अशी आशा आहे.

२६. ग्रंथाची योजना जाहीर केल्यापासून तो छापून प्रसिद्ध होईपर्यंत आम्हांस श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, श्री. चिं. ग. कर्वे, श्री. य. रा. दाते व श्री. रा. चिं. भावे यांची बहुमोल मदत झाली आहे, हें आम्ही आनंदानें कबूल करतों. यांपैकीं श्री. माडखोलकर यांनीं ओळख नसतांहि आम्हांस हरतऱ्हेची मदत केली, हें विशेष होय. लेखक व छापखाना यांची निवड करण्याच्या कामींहि त्यांचा सल्ला आम्हांस उपयोगी पडला आहे. रा. कर्वे यांच्या मदतीचें स्वरूपहि असेंच असून, लेख व मुद्रितें यांमधील शुद्धाशुद्ध तपासण्याचें कामहि त्यांनीच केलें आहे. रात्रीचा दिवस करून व आपलीं घरगुतीं कामें बाजूस ठेवून त्यांनीं आम्हांस मदत केली नसती तर हा ग्रंथ इतक्या लवकर बाहेर पडला नसता. पत्रव्यवहाराच्या व इतर कामींहि सुरुवातीपासून रा. भावे यांची आम्हांस मदत झाली असून त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत.

२७. याशिवाय केसरी-ग्रंथालयाचे श्री. दि. वि. काळे व श्री. वि. ग. ताम्हनकर यांनीं आम्हांस जरूर तीं पुस्तकें संदर्भासाठीं दिलीं त्याबद्दल त्यांचे व सुप्रसिद्ध लघुकथालेखक श्री. य. गो. जोशी यांनीं पुस्तकाचें सुंदर वेष्टण तयार करून दिल्याबद्दल त्यांचे आम्ही आभारी आहोंत.

२८. समर्थ भारत प्रेसचे व्यवस्थापक श्री. स. रा. सरदेसाई यांनीं आपुलकीच्या भावनेनें ग्रंथछपाईचें काम सुबक रीतीनें केल्याबद्दल त्यांचे आम्ही ऋणी आहोंत.

२९. ग्रंथांत अशुद्धें राहूं नयेत याबद्दल विशेष काळजी ठेविली असतांहि कांहीं अशुद्धें राहून गेलीं आहेत, याबद्दल वाईट वाटतें. वाचकांच्या तीं सहज लक्षांत येण्यासारखीं असल्यामुळें त्यांचें निराळें शुद्धिपत्र जोडलें नाहीं. ४६४ पानांतील शेवटच्या दोन ओळी ४६५ पानाच्या सुरुवातीस चुकून छापल्या गेल्या आहेत, या गोष्टीकडे वाचकांचें आम्ही लक्ष वेधूं इच्छितों.

३०. आमचा हा प्रयत्न वाचकांना पसंत पडल्यास दर तीन किंवा पांच वर्षांनीं यापुढें प्रसिद्ध होणाऱ्या वाङ्मयाचीं समालोचनें प्रसिद्ध करण्याचा आमचा विचार आहे. याशिवाय सटीक महाराष्ट्रवाङ्मयसूचि, मुलांचा ज्ञानकोश व इंग्लिश मेन् ऑफ लेटर्सच्या सारखी एक ग्रंथमाला प्रसिद्ध करण्याचा आमचा विचार असून, भरपूर लोकाश्रय मिळाल्यासच त्यास मूर्त स्वरूप येऊं शकेल.

३०. न्यून तें पुरतें। अधिक तें सरतें। करुनि घ्यावें,......अशी वाचकांस विनंति करून श्रीज्ञानेश्वरांच्याच प्रासादिक शब्दांत ही प्रस्तावना पुरी करतों:—

आतां विश्वात्मकें देवें ।
येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें ।
पसायदान ॥

वडोदें,
बलिप्रतिपदा,
शके १८५७.

रामचंद्रराव शामराव मानेपाटील
चिंतामण विनायक जोशी
विष्णु पाडुरंग नेने

# विषयानुक्रमणिका

---

१

# गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता

## ( कांहीं अंतःप्रवाहांचें समालोचन )

[ लेखक—श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर ]

वाङ्मयांतील कालगणनेला केव्हां कवीचा तर केव्हां राजाचा प्रभाव कारण होत असतो. इंग्रजी वाङ्मयामध्यें शेक्सपियर आणि टेनिसन या कवींप्रमाणेंच एलिझाबेथ आणि व्हिक्टोरिया या राण्यांचींहि नांवें विशिष्ट युगांचीं निदर्शक म्हणून प्रसिद्ध आहेत. विशेषतः, राजा हा ज्या वेळीं स्वतः विद्वान् आणि रसिक व म्हणून साहित्याचा पोशिंदा असतो, त्या वेळीं त्याचें नांव हें त्याच्या आश्रित कवीइतकेंच वाङ्मयाच्या इतिहासांत संस्मरणीय होऊन बसतें. कालिदास आणि विक्रमादित्य, बाण आणि श्रीहर्ष, किंवा शेक्सपियर आणि एलिझाबेथ या सजोड नांवांनीं जे वाङ्मयांतील कांहीं कालखंड विभूषित झालेले दृष्टीस पडतात, ते याच कारणामुळें. राजाश्रय हा जसा कवीला लाभदायक होतो, तसें कवीचें आश्रितत्व हें राजाला शोभादायक होत असतें. राजैश्वर्याची शोभा वाढविणाऱ्या इतर वस्तु या कालांतरानें विकृति किंवा विनाश पावतात. परंतु कवींना आश्रय दिल्यामुळें राजांना लाभणारें यशोवैभव मात्र अविनाशी असतें. मराठी वाङ्मयांत राजाचें कर्तृत्व हें वाङ्मयांतील शकगणनेला कारण झाल्याचें उदाहरण एकहि सांपडत नाहीं. याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं, मराठशाहींतील झाडून सारे राजपुरुष हे अरसिक होते.

ज्यांच्या आयुष्यांतला बहुतेक काळ घोड्याच्या पाठीवर बसून मुलूख मारण्यांत जावयाचा, त्यांना कवितेचा आस्वाद घेण्याइतका निवांतपणा कसा मिळावा ? घटकेपूर्वी आपल्या खांद्याला खांदा भिडवून लढतां लढतां धारातीर्थी पडलेल्या एकाद्या झुंझाराचा पोवाडा कौतुकानें ऐकण्यापुरता त्यांचा कवितेशीं काय संबंध आला असेल तेवढाच. पण, कारण कोणतेंहि असो, त्यांच्या हातून कवींन्चा परामर्श आणि साहित्याचा पुरस्कार हा म्हणण्यासारखा घडला नाहीं, एवढें मात्र खरें. परंतु, मराठी कवितेला जें प्रोत्साहन स्वराज्यांत देखील मिळूं शकलें नाहीं, तें या पारतंत्र्याच्या काळांत श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्याकडून मिळत असून, मराठी भाषेच्या गेल्या साठ वर्षांतील अभिवृद्धीला त्यांचें दातृत्व बरेंच कारण झालेलें आहे. त्या दृष्टीनें 'शारदा-प्रिय-भक्त हा जणुं भोजराजच आजचा,' हे राजकवि चंद्रशेखर यांचे त्यांच्याविषयींचे उद्गार अगदीं यथार्थ वाटतात.

श्री. सयाजीराव महाराज गादीवर आल्यापासून गेल्या साठ वर्षांत मराठी वाङ्मयामध्यें इतकें विलक्षण परिवर्तन घडून आलें आहे कीं, लोकहितवादी किंवा बजाबा रामचंद्र प्रधान यांच्यासारखे अव्वल इंग्रजी अमदानींतील अग्रेसर लेखक जर कांहीं दैवी चमत्कारानें आज कालनिद्रेंतून जागे झाले, तर दंडकारण्यांतील स्थित्यंतर पाहून चकित झालेल्या रामचंद्राप्रमाणें, त्यांच्याहि तोंडून ही नवीन सृष्टि बघितल्यावर खाचित आश्चर्योद्गार निघतील. वाङ्मयांतील या क्रांतीचें मूलगामी वैचित्र्य जर विशेष तीव्रतेनें कोठें जाणवत असेल, तर तें कवितेच्या क्षेत्रांत. मराठी गद्याला जुनी परंपरा मानली तर आहे, नाहीं तर नाहीं. महानुभावांचें अलीकडे उघडकीला आलेलें गद्य लिखाण, बखरी, किंवा पंचतंत्रादि त्रुटित प्रबंध हे सारे लक्षांत घेऊनहि असें म्हणावयाला शंका वाटत नाहीं कीं, मराठी भाषेच्या स्वरूपावर किंवा समाजाच्या विचारांवर परिणाम करण्याइतकें हें प्राचीन गद्य प्रभावी नव्हतें. महानुभावांचे गद्य ग्रंथ हे आजवर लुप्त किंवा गुप्त स्थितींत पडून राहावेत याचा अर्थच हा कीं, त्या पंथाबाहेरील सुशिक्षित वर्गांत त्यांचा प्रसार नव्हता; व बखरी वगैरे ऐतिहासिक गद्य वाङ्मय हें गेल्या दोन तीनशें वर्षांतलें असून, तें लिहिण्याचा उद्देश माहितीची नोंद करणें हाच केवळ असल्यामुळें, तेंहि लोकांच्या वाचनांत फारसें येत नसे. उलट, मराठी कवितेला सात शतकांची उज्ज्वल परंपरा असून तिनें महाराष्ट्राच्या अंतःकरणावर अनन्य प्रभुत्व गाजविलें आहे. किंबहुना, मराठी भाषा आणि मराठी कविता या सहजात आहेत, असेंहि म्हटलें तरी शोभेल. काव्य हें

जरी भाषेचें अपत्य मानलें जात असलें, तरी तें आपल्या जन्मदात्रीबरोबरच बहुधा जन्माला येत असतें. पृथ्वीच्या पाठीवरील शहरें केव्हां स्थापन झालीं हें सांगतां येईल; पण नद्या केव्हां उगम पावल्या हें सांगणें मात्र कठीण. तसेंच गद्य आणि पद्य यांचेंहि आहे. नद्या या जशा पृथ्वीबरोबरच अस्तित्वांत आल्या, तसें पद्य हें भाषेबरोबरच जन्माला आलेलें आढळतें. उलट, शहरें हीं जशीं मानवी संस्कृतीच्या उत्कर्षाबरोबर वसत गेलीं, तसें गद्य हें मानवी विचारांच्या प्रगतीबरोबर विकसत गेलें. या दृष्टीनें कविता ही नदीप्रमाणें मानवी संस्कृतीची जननी आणि धारिणी आहे असें म्हणतां येईल. त्यामुळें राष्ट्राच्या वैचारिक परंपरेचें वैशिष्ट्य आणि सातत्य हें जितकें त्याच्या कवितेंत प्रकट झालेलें असतें आणि प्रत्ययाला येतें, तितकें तें गद्यांत दिसून येत नाहीं.

अर्थात् कवितेच्या स्वरूपांत घडून येणारी क्रांति ही एकंदर समाजाच्या विचारक्रांतीची प्रातिनिधिक असते. प्राचीन मराठी कविता बव्हंशीं धार्मिक होती. भागवत धर्मानें तिला प्रेरणा व पराक्रमाचें वेदक्षेत्रहि मिळवून दिलें. उलट तिनेंहि त्याच्या प्रसारार्थ आपलें शक्तिसर्वस्व वेंचून त्याच्या या ऋणाची पुरेपूर फेड केली. जुन्या मराठी कवितेला जे परभृत म्हणून नांवें ठेवतात, त्यांच्या ही गोष्ट लक्षांत येत नाहीं कीं, जेथें महाराष्ट्राची भाषा, संस्कृति आणि विचारपरंपरा हींच मुळीं परभृत म्हणजे संस्कृतोद्भव होतीं, तिथें त्याच्या कवितेंत निराळेपणा कोठून आढळणार ? मूळ वृक्षाचे गुणधर्म त्याच्या कलमांत दिसून यावे, हें स्वाभाविकच नव्हे काय ? बहुजनसमाजाच्या गरजेप्रमाणें संस्कृत भाषेचें रूप हळुहळू पालटत जाऊन नवी मराठी भाषा अस्तित्वांत आली. पण विचारांचें वळण मात्र जुनें होतें तेंच बहुतेक कायम राहिलें. अशा स्थितींत जुन्या मराठी कवितेला परभृत म्हणणें, म्हणजे तिला मातृस्थानीं असलेली संस्कृत भाषा आणि तिच्यांतील वाङ्मय यांनाच पर्यायानें परकें लेखल्यासारखें होत नाहीं काय ? मुसलमानी अमदानींत अगदीं विजातीय अशा वाङ्मयाशीं महाराष्ट्राचा प्रथमच संबंध आला. पण, संस्कृत वाङ्मयापेक्षां तें वाङ्मय श्रेष्ठ नसल्यामुळेंच मुख्यतः, त्याला जुलमी राजसत्तेचा पाठिंबा असून सुद्धां, महाराष्ट्राच्या विचारांवर त्याचा पगडा बसला नाहीं; व मराठी कवितेचें स्वरूप बहुतेक अविकृतच राहिलें. परंतु, मुसलमानांच्या तीनशें वर्षांच्या सुलतानी कारकीर्दींतहि जें परिवर्तन मराठी कवितेंत घडून येऊं शकलें नाहीं, तें ब्रिटिशांचा शांतताप्रधान अंमल सुरू झाल्यावर मात्र अवघ्या पन्नास वर्षांत

घडून आलें. कारण, पाश्चात्यांच्या भौतिक संस्कृतीच्या प्रभावानें सुशिक्षित वर्ग आरंभीं तरी इतका दिपून गेला कीं, त्याला इंग्रजांचें निव्वळ अनुकरण करण्याशिवाय उन्नतीचा दुसरा मार्ग दिसला नाहीं. या अनुकरणाच्या भावनेंतूनच आधुनिक कवितेचा उदय झाला. जुनी मराठी कविता ही परभृत म्हणजे निव्वळ अनुवादात्मक आहे असें मानलें, तरी तींत परकेपणाची छटा मात्र यत्किंचितहि नव्हती. उलट इंग्रजीपासून स्फूर्ति घेऊन निर्माण झालेली ही आधुनिक कविता मात्र आमूलाग्र परभृत म्हणजे अंतर्बाह्य परकीय होती. इंग्रजी शिक्षणानें ज्याप्रमाणें बहुजनसमाजापासून अगदीं भिन्न असा सुशिक्षितांचा वर्ग उत्पन्न केला, त्याप्रमाणें त्यानें बहुजनसमाजाच्या परंपरागत वाङ्मयापासून अगदीं विसदृश अशी नवीन कविता निर्माण केली. विलायतेहून लग्न करून स्वदेशीं आलेल्या फडर्या बॅरिस्टराची गौरकाय वधू मराठी वेषभूषेंत जशी दिसावी, तसा आरंभीं या नव्या कवितेचा थाट निव्वळ मराठी वाचकांना भासला असावा. कै. महादेवशास्त्री कोल्हटकर यांचीं फुटकळ इंग्रजी चुटक्यांचीं रूपांतरें किंवा कै. रा. ब. माधवराव कुंटे यांचा 'राजा शिवाजी' या काव्यांचा जो उपहास त्या काळीं झाला, तो बव्हंशीं याच कारणामुळें.

या क्रांतीमुळें अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत मराठी कवितेमध्यें दोन अगदीं परस्परभिन्न अशीं वळणें उत्पन्न झालीं. एक कविवर्ग असा निर्माण झाला कीं, ज्यानें स्वसंस्कृतीवरील श्रद्धेमुळें प्राचीन संस्कृत कवितेचे गुणविशेष आत्मसात् करून तदनुसार आपल्या कवितेची घडण बनविली. उलट स्वसंस्कृतीच्या थोरवीविषयीं साशंक असलेल्या दुसऱ्या वर्गानें, मराठी कवितेच्या पूर्व परंपरेकडे अजिबात दुर्लक्ष करून, इंग्रजी पद्धतीवर आपला संसार थाटला. कवितेचीं हीं दोन निरनिराळीं वळणें, विचारांचे हे दोन परस्परभिन्न प्रवाह आजहि मराठी वाङ्मयांत समांतर वाहतांना दृष्टीस पडतात. सुशिक्षितांना प्रिय असलेल्या कोणत्याहि आधुनिक कवीची कविता पाहा. ती प्रणयप्रधान, आत्मपर आणि त्रुटित अशी आढळेल. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास किंवा श्रीधर यांची कविता ज्याप्रमाणें समाजाच्या अग्रभागीं उभ्या असलेल्या ब्राह्मणापासून तों त्याच्या पायदळीं तुडविल्या जाणाऱ्या अंत्यजापर्यंत साऱ्यांच्या काळजाला हात घालते, सर्व उच्चनीच वर्गाच्या हांकेला ओ देते, तें सामर्थ्य, ती भावनांची आणि विचारांची विशालता आधुनिक कवितेंत नाहीं. तिची हांक फक्त इंग्रजी शिकलेल्या पांढरपेशा सुशिक्षितांपुरतीच मर्यादित आहे. किंबहुना,

त्या वर्गांतल्याहि शेलेप्रभृतींच्या कवितेंत रंगलेल्या आणि प्रणयकेलींच्या कल्पनांत गुंगलेल्या फक्त तरुण–स्वप्नाळु जीवांनाच तिची ती प्रीतीची भाषा उमजते, आवडते. कचेरींत खर्डे घांसणाऱ्या कारकुनाच्या, गिरणींत काम करणाऱ्या मजुराच्या, शेतांत नांगर धरणाऱ्या कुळवाड्याच्या, पाण्यांत जाळें फेंकणाऱ्या कोळ्याच्या किंवा बाजारांत पाट्या वाहणाऱ्या हमालाच्या कष्टमय जीवनांत तुकारामाला स्थान आहे, केशवसुतांना नाहीं, सगनभाऊची गूज आहे, गोविंदाग्रजांची नाहीं. वस्तुतः, भक्ति आणि शृंगार हे दोन रस असे आहेत कीं, ज्यांचें आस्वादन अवघ्या मानवजातीच्या मनाला आजहि मोठ्या उत्कटतेनें होतें. पण, आधुनिक कवींनीं आळवलेले हे रस मात्र, आज ग्रामोफोनसारख्या सर्वगामी प्रसारकाची मदत त्यांना मिळालेली असतांना देखील, बहुजनसमाजाच्या हृदयांत भावनांचीं कारंजीं उडवूं शकत नाहींत. याचें कारण असें दिसतें कीं, आधुनिक कवींच्या कवितांतील भावना या जरी व्यक्तिशः त्यांच्यापुरत्या कदाचित् हृदयस्फूर्त आणि प्रामाणिक असल्या, तरी बहुजनसमाजाला त्या ओळखीच्या वाटत नाहींत, विजातीय वाटतात. एरवीं डफावर पडलेली थाप कानांवर येतांच ज्यांचें चित्त पोवाडा किंवा लावणी ऐकावयाला आतुर होतें, त्यांनीं ग्रामोफोनमधून येणारे भावगीतांचे सुरेल आलाप केवळ संगीताच्या अपेक्षेनें ऐकावे, याचा अर्थ काय? आधुनिक कवितेतील सर्वांत मोठी उणीव किंबहुना वैगुण्य जर कोणतें असेल, तर तें हें आहे कीं, तिच्यांत देश्य असें वातावरण अगदीं कमी आहे; तिच्यांतून व्यक्त होणाऱ्या कल्पना आणि कामना, विचार आणि विकार, संकेत आणि संप्रदाय हीं परभृत असतात, कुठल्या तरी अगदीं परकीय वातावरणांतून उचलून आणलेलीं असतात. कल्पना करा कीं, इंग्लंडांतला एखादा कवि जर संस्कृत किंवा फारशी कवितेपासून स्फूर्ति घेऊन तत्सदृश रचना करूं लागला, तर त्याच्या त्या मुत्सद्दगिरीचें कौतुक जरी त्याच्या कोटींतल्या मूठभर रसिकांनीं केलें, तरी तेथील बहुजनसमाजाला त्यांतलीं तीं कमळें आणि ते गुलाब किंवा ते चकोर आणि ते बुलबुल काय रिझविणार? तोच प्रकार आधुनिक मराठी कवितेच्या बाबतींतहि झालेला आहे. आधुनिक कवि समाजसुधारक आहेत आणि देशाभिमानीहि आहेत. पण ज्या समाजाच्या सुधारणेची ते चिंता वाहतात त्याच्या राहणीची त्यांना जाणीव नाहीं आणि ज्या देशाच्या ऊर्जिताचा ते अभिमान वाहतात तोहि त्यांच्या डोळ्यांपुढें नसतो.

गेल्या पाऊणशें वर्षांत पैदा झालेल्या मराठी कवितेचें समालोचन केलें, तर हें तिचें वैशिष्ट्य म्हणा किंवा वैगुण्य म्हणा मोठ्या जोरकसपणानें मनावर ठसतें. प्रत्येक राष्ट्राच्या आयुष्यांत केव्हां ना केव्हां तरी असा एक काळ येत असतो कीं, ज्या वेळीं त्यांतील तत्त्वज्ञ आणि मुत्सद्दी व कवि आणि संशोधक हे भोंवतालच्या प्रगत राष्ट्रांकडून नवीन कल्पनांची स्फूर्ति घेऊन त्याला आलेलें जाड्य आणि जीर्णत्व नष्ट करितात. मानवी आत्म्याप्रमाणें राष्ट्राचा आत्माहि कालांतरानें नवीन शरीर धारण करीत असतो. त्यानें जर अशा रीतीनें शरीरांतर न केलें, तर त्याच्या चैतन्य-हीन अंगावर रूढीचीं वारुळें वाढून त्याचा आत्मा गुदमरून जातो व त्याच्या शक्ति गंजून जातात. संस्कृतीची देवघेव, विचारांचा विनिमय हें राष्ट्राच्या प्रगतीचें सर्वांत श्रेष्ठ साधन होय; व हा विनिमय नेहमीं त्यांतील बुद्धिप्रधान वर्गाकडून होत असतो. ऋतुमानानुसार थारेपालट करणारे पक्षी हे ज्याप्रमाणें वनस्पतींच्या बीजक्षेपणाला कारण होतात, त्याप्रमाणें कालमानानुसार तत्त्वशोधन करणारे प्रतिभाशाली ग्रंथकार हे अभिनव कल्पनांच्या प्रसाराला कारण होतात. मात्र हा विनिमय स्वयंस्फूर्त असला, तरच त्यामुळें निरामय अशी प्रगति घडून येते. जेत्यांनीं जितांवर लादलेलें आपल्या भाषेचें आणि वाङ्मयाचें शिक्षण म्हणजे मात्र विनिमय नव्हे; तर तो त्यांचें स्वत्व दडपून टाकून आपलें बौद्धिक वर्चस्व त्यांच्यावर स्थापन करण्याचाच जेत्यांचा एक प्रयत्न होय. इंग्रजी व मराठी भाषा यांचा जो संबंध एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत आला, तो जेता आणि जिता म्हणून; विनिमय करण्याच्या इच्छेनें नव्हे, तर वर्चस्व गाजविण्याच्या इच्छेनें. त्याचा परिणाम असा झाला कीं, मराठी भाषेनें केलेल्या इंग्रजीच्या अनुकरणाला उसनवारीचें स्वरूप आलें व शिष्यत्वाला गुलामगिरीची अवकळा आली. हें बौद्धिक दास्य मराठी गद्याला फार काळ जाणवलें नाहीं. कदाचित् असें असेल कीं, गद्य हें स्वभावतःच ओजस्वी म्हणजे पौरुषसंपन्न असल्यामुळें त्याला पारतंत्र्याच्या शृंखला लवकर झुगारून देणें शक्य झालें. परंतु ललितमृदुल अशी कविताकामिनी मात्र अजूनहि त्या दास्यांतून पुरती मुक्त झालेली दिसत नाहीं. मराठी भाषेचे शिवाजी म्हणून गाजलेले कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचीं मतें आज कोणाला मान्य होतील न होतील. पण, त्यांनीं आपल्या लेखणीच्या सामर्थ्यानें मराठी भाषेला स्वातंत्र्योन्मुख केली, यांत मात्र शंका नाहीं. त्यांच्यामागून गेल्या अर्ध शतकांत जे लेखक उदयाला आले, त्यांनीं मराठी भाषेचें केवळ वैभवच वाढविलें असें नव्हे, तर महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या आकांक्षाहि उद्दीपित

केल्या. परंतु गद्याकडून कवितेकडे वळलें, तर काय दृष्टीस पडतें ? चिपळूणकरांची निबंधमाला निघाल्यानंतर दहा वर्षांनीं आधुनिक कवींचे कुलगुरु म्हणून गणल्या गेलेल्या केशवसुतांनीं काव्यलेखनाला प्रारंभ केला. परंतु, निबंधमालेंत जें आवेशें प्रखरत्व, जी विचारांची स्वतंत्रता आणि जें देशाभिमानाचें ओज दिसून येतें, त्याचा आढळ केशवसुतांच्या कवितेंत होतो काय ? चिपळूणकरांकडून केशवसुतांकडे वळणें म्हणजे सामर्थ्याकडून क्षीणतेकडे आणि विजिगीषेकडून विषण्णतेकडे वळणें होय. चिपळूणकरांच्या प्रत्येक अक्षराअक्षरांतून प्रखुबाणी आकांक्षा उसळतांना दृष्टीस पडते, तर केशवसुतांच्या प्रत्येक ओळीओळींतून विषादाचा सूर केंकटतांना कानांवर येतो. चिपळूणकरांनीं ज्या वयांत 'संस्कृत कविपंचक' लिहून आपल्या प्राचीन वाङ्मयाची श्रेष्ठता लोकांच्या निदर्शनाला आणून दिली, त्या वयांत केशवसुत प्रियेचें ध्यान आळवीत होते; त्यांनीं ज्या वयांत निबंधमाला काढून मिशनऱ्यांच्या दुर्मतदलनाला प्रारंभ केला, त्या वयांत यांचा धर्मांतर करण्याचा विचार चालला होता; व त्यांनीं ज्या वयांत 'केसरी' सुरू करून लोकजागृतीचें कार्य शिरावर घेतलें, त्या वयांत हे हरपलें श्रेय हुडकण्यांत गर्क झाले होते. ज्याच्या उत्तुंग शाखा अनेक पक्षिकुलांचें आश्रयस्थान होऊन बसल्या आहेत व ज्याच्या असंख्य पारंब्यांतून अनेक नवे तरु उद्भूत झाले आहेत, असा प्रचंड वटवृक्ष आणि कुंडींत वाढलेला खुरटा गुलाबाचा वेल यांत जो फरक, तोच चिपळूणकर आणि केशवसुत यांच्यामध्यें.

केशवसुतांच्यासंबंधील उणेपणा दाखविण्यासाठीं ही तुलना केलेली नाहीं; तर जे दोन पुरुष मराठी वाङ्मयांतील नव्या युगाचे प्रवर्तक म्हणून गणले जातात, त्यांच्या मनोवृत्तींतील फरक तेवढाच येथें स्पष्ट केला आहे. कोणी कदाचित् असें म्हणेल कीं, इंग्रजी कवि ग्रे याच्या उक्तीप्रमाणें, दारिद्र्यामुळें केशवसुतांची प्रतिभाशक्ति कोळपल्यासारखी झाली. पण तें पटण्यासारखें नाहीं. केशवसुतांना ज्यांच्यापासून सामाजिक कल्पनांची स्फूर्ति झाली असल्याचें उघड उघड दिसतें, त्या आगरकरांनींहि सारें आयुष्य भयंकर दारिद्र्यांत गेलें होतें. तेव्हां हा फरक मनोवृत्तींतील आहे, परिस्थितिजन्य नव्हे. वस्तुतः चिपळूणकर, आगरकर व टिळक यांच्या स्वार्थत्यागाचें आणि देशसेवेचें उदाहरण ज्या पिढीपुढें होतें, व ज्या पिढींतून कर्वे, गोखले, आपटे, राजवाडे, परांजपे यांच्यासारखे कर्तबगार आणि त्यागी पुरुष उदयाला आले, त्या पिढींपैकीच केशवसुत हेहि एक होते. पण आपल्या या समकालीनांच्या

मानानें केशवसुतांनीं प्रकट केलेली मनाची संस्कारक्षमता किंवा बुद्धीची आक्रमशक्ति एकंदरींत सामान्य वाटते. कवितांच्या संख्येवरून कवीची योग्यता ठरविणें हें केव्हांहि न्याय्य होणार नाहीं, ही गोष्ट खरी. पण, संख्येच्या बाबीकडे जरी दुर्लक्ष केलें, तरी विचारांच्या मर्यादा वाढविणाऱ्या कल्पनेच्या भराऱ्या आणि वाङ्मयाचें सौंदर्य वाढविणारें भाषेचें सौष्ठव हे गुण तरी विशेष प्रमाणांत कवितेंत असले पाहिजेत कीं नाहीं ? ग्रे याची काव्यरचना इतर इंग्रजी कवींच्या मानानें खरोखरी अत्यल्पच ठरेल. पण पांडित्य, प्रतिभा आणि प्रसाधन हे गुण तींत इतक्या समरसतेनें व्यक्त झालेले आहेत कीं, त्याची गणना इंग्लंडांतील श्रेष्ठ कवींच्या प्रणालिकेंत केली जाते. तसें केशवसुतांविषयीं खचित म्हणतां येणार नाहीं. त्यांच्या ठिकाणीं पांडित्याचा लवलेशहि नव्हता. 'गोल्डन ट्रेझरी'तील कवितांतल्या कल्पना त्यांच्या बऱ्याच गीतांतून आणि सुनीतांतून प्रतिध्वनित झालेल्या आहेत; व त्यावरून असें दिसतें कीं, त्या पुस्तकापलीकडे त्यांच्या इंग्रजी कवितेच्या व्यासंगाची मजल फारशी गेलेली नव्हती. त्यांच्या साऱ्या कवितांचें बारकाईनें पृथक्करण केलें असतां, कवित्वाच्या अहंपणामुळें स्वतःविषयीं भलत्याच अचाट समजुती करून घेऊन फशीं पडलेला, बुद्धीच्या कोतेपणामुळें नवीन कल्पनांचें आकलन नीटपणें करूं न शकलेला, मनाच्या हळवेपणामुळें संसाराचा उबग येऊन जगावर कातावलेला व व्यासंगाच्या अभावामुळें आपल्या हृदयांतील खळबळ कशी तरी बोलून टाकण्यासाठीं धडपडत असलेला असा एक सुधारणावादी पण प्रणयपीडित आणि गलितोत्साह कवि डोळ्यांपुढें उभा राहतो. अशा या कृशप्रतिभ कवीच्या हातून युगप्रवर्तनाचें महत्कार्य घडून यावें, याचा कोणाला अचंबा वाटणार नाहीं ? या चमत्काराचें मुख्य कारण हें कीं, इंग्रजी शिक्षणामुळें नवीन पिढींत उत्पन्न झालेल्या तारुण्यसहज वासना आणि भावना, शेक्सपियरचीं सुनीतें व शेलेचीं भावगीतें यांच्यापासून आविष्काराची प्रेरणा घेऊन, केशवसुतांच्या कवितेंत प्रथम आविर्भूत झाल्या. बजाबा रामचंद्र प्रधान यांच्यापासून तों विष्णु मोरेश्वर महाजनी यांच्यापर्यंत अव्वल इंग्रजी अमदानींतील अनेक सुशिक्षित कवींनीं इंग्रजी काव्यांतील प्रणयरम्यता (romance) मराठींत आणण्याचा प्रयत्न केला. पण तो बव्हंशीं भाषांतराच्या रूपानें. केशवसुतांचा विशेष हा कीं, त्यांनीं स्वतःच्या यौवनसुलभ भावनांचा मेळ आपल्या वाचनांत आलेल्या इंग्रजी प्रणयगीतांतील भावनांशीं, समजला व साधला तसा घालून, वस्तुतः परभृतच पण उत्कट आत्मपरतेमुळें स्वतंत्र भासेल

अशी प्रणयकविता निर्माण केली. आणखीहि एका कारणामुळें त्यांच्या कवितेला हृदयस्पर्शी असें नावीन्य आलें. तें असें कीं, आगरकर-आपटे यांच्या वाङ्मयांतून विशेषतः स्त्रीजातीच्या समानतेचा आणि स्वातंत्र्याचा जो डिंडिम सारखा दुमदुमत होता, त्याचे प्रोत्साहक पडसाद त्यांनीं आपल्या ' तुतारी 'तून उमटविले. त्यामुळें, त्यांच्या कवितेला प्रणयाची आणि समतावादाची अशी दुहेरी नवलाई लाभून, इंग्रजी कवितेंत रमणाऱ्या व तत्सदृश असें कांहीं आपल्या काव्यांत आहे कीं नाहीं हें पाहण्यासाठीं आसुसलेल्या त्या वेळच्या युवकांना ती मोठी अपूर्व आणि स्फूर्तिदायक वाटली.

अर्थात् केशवसुतांच्या कवितेनें जें नवीन युग महाराष्ट्रांत प्रवर्तित केलें, तें प्रणयप्रधान म्हणजे स्त्रैण होतें. प्रणय हा विकार मनुष्यमात्राला अत्यंत स्वाभाविक असून, कांहीं एका मर्यादेपर्यंत त्याची उत्कटता खचित दूषणीय नाहीं. पण, मानवी जीवनांत प्रणयाला जेव्हां वाजवीपेक्षां फाजील महत्त्व दिलें जातें, किंबहुना तो विकार हा मनुष्याच्या जेव्हां सर्व चेष्टितांचा प्रेरक आणि स्थायीभाव होऊन बसतो, तेव्हां त्याचें पर्यवसान एक प्रकारच्या मनोविकृतींत म्हणजे स्त्रैणत्वांत होतें. केशवसुतांच्या कवितेंतील प्रणयोद्रेकाचें स्वरूप या जातीचें आहे. लालित्याचा अभाव आणि स्वातंत्र्याचा अभिनिवेश हे त्यांच्या कवितेचे दोन विशेष लक्षांत घेतले असतां त्यांच्या युगकर्तृत्वावर केलेला स्त्रैणपणाचा हा आरोप विसंगत वाटेल. पण त्यांच्या कवितेच्या गुणधर्मांचें पृथक्करण केल्यावर असें स्पष्ट दिसून येतें कीं, अंशतः पौरुषयुक्त आणि प्रोत्साहक भासणाऱ्या त्यांच्या कवितेनें निर्माण केलेलें युग मात्र मानसिक दौर्बल्याच्या आणि विकृतीच्या परिपोषाला कारण झालें. स्त्री, निसर्ग आणि स्वदेश हे तीन विषय त्यांच्या कवितेंत प्रामुख्यानें आलेले आहेत. त्यांपैकीं त्यांच्या स्त्रीविषयक कवितांत दोन प्रकार आढळतात: त्यांतील कांहीं कविता दयितेला तर कांहीं कवितेला उद्देशून लिहिलेल्या आहेत. जगांतील बहुतेक कवींना रमणीच्या चिंतनापासून रमणीयतेच्या नवनवीन उन्मेषांची प्रतीति होऊन काव्यरचनेची स्फूर्ति मिळाल्याचें अनुभवाला येतें; व म्हणूनच जगन्नाथ पंडितांनीहि आपल्या करुणविलासांत ' चेतोहरा सुकविता भविता कथं नः। ' असे उद्गार काढलेले दृष्टीस पडतात. खुद्द केशवसुतांनीहि आपल्या आरंभींच्या एका कवितेंत वल्लभेला ' अपरकवितादेवत.' म्हटलेलें आहे. पण तारुण्याचा पहिला बहर ओसरल्यावर तें दैवत मागें पडून त्यांच्या अंतःकरणांतली वनितेची जागा कवितेनें बळकावली; व एकाद्या प्रणयी

युवकानें आपल्या किंचित् निर्दय मनाच्या लहरी दयितेवर करुणपूर्ण प्रेमगीतें लिहावीं तशा तऱ्हेनें केशवसुतांनीं नंतर कवितेला आळविलें-आर्जविलें आहे. कवितेवर चेतनागुणाचा आरोप करून एकाद्या कामार्तप्रमाणें तिचें प्रणयाराधन करीत सुटणें, हा तरी एक मानसिक विकलतेचा किंवा विकृतीचा प्रकारच म्हणावा लागेल. संसारांतील सुखाविषयीं उपरति उत्पन्न झाल्यामुळेंच केशवसुतांना ही कवितारति आठवली असावी. ज्या प्रेमाचा वर्षाव पुरुषानें स्त्रीवर करावयाचा असतो, तें प्रेम त्यानें कवितेवर करीत सुटावें, याचा अर्थच हा कीं, त्याच्या वैवाहिक जीवनांत कांहीं तरी न्यूनता उत्पन्न झालेली असून, ती तो अशा रीतीनें भरून काढीत आहे. कवितेवर त्यांनीं केलेलीं निरनिराळीं रूपकें पाहून आणखी अशीहि एक शंका मनांत डोकावून जाते कीं, शेलेनें वर्णिलेल्या बौद्धिक सौंदर्याच्या अधिदेवतेलाच काव्याची स्फूर्तिदात्री आणि मांगल्याचें निधान मानून त्यांनीं आपल्या मनाच्या देव्हाऱ्यांत तिची स्थापना केली असावी; व तिचा साक्षात्कार वारंवार न घडल्यामुळें त्यांना जीवितांतलें श्रेय हरपल्यासारखें होऊन ते भ्रांतचित्त झाले असावे. वर्डस्वर्थ आणि शेले यांच्या दिव्यत्वाविषयींच्या आसक्तीचा आणि उत्कंठेचा संकर त्यांच्या तात्त्विक आणि प्रणयविषयक कवितांतून झालेला आहे. जगांतील इतर सर्व लाभांना आपल्या स्वभाववैचित्र्यामुळें पारख्या झालेल्या या कवीनें कविता हेंच आपलें जीवनसर्वस्व मानल्या कारणानें, प्रेमी तरुणाला आपल्या प्रियतमेविषयीं वाटणाऱ्या एकांतिक गाढ अनुरागांत ज्या प्रकारची उत्कटता असते, ती त्यांच्या या अमूर्त ध्येयमूर्तीला उद्देशून लिहिलेल्या कवितांतून पाहावयाला मिळते. प्रेमाचा किंवा ध्येयाचा विषय हा जर अशरीरी असेल, तर त्याच्या चिंतनामुळें कल्पनाशक्तीला अमर्याद चालना मिळून, माणसाच्या त्याच्याबद्दलच्या विचारांना आणि भावनांना एक प्रकारची चमत्कृतिजनक विशालता आपोआपच येते. केशवसुतांच्या प्रणयपर गीतांना आणि सुनीतांना जी इतकी उदात्तता आणि आकर्षकता आली आहे, ती याच कारणामुळें. पण, त्या आकर्षकतेचें बीज मनाच्या विकलतेंत—दुबळेपणांत आहे, हें विसरून चालणार नाहीं. या स्त्रीविषयक ध्येयीभूत प्रेमाला त्यांच्या कवितेंत सर्वंकष महत्त्व प्राप्त झालेलें असून, केव्हां त्याच्या प्रभावामुळें भावनांना येणारा बहर तर केव्हां त्याच्या अभावामुळें मनाची होणारी तगमग त्यांनीं मोठ्या उत्कटतेनें व्यक्त केली आहे. "प्रीती आणिक तूं-शिवाय न सुचे कांहीं मना माझिया" हे त्यांचे उद्गार त्यांच्या या मनःस्थितीचे निदर्शक आहेत. स्त्रीप्रेमाच्या अप्राप्तीनें जेव्हां जेव्हां त्यांचें मन रंजीस येई,

तेव्हां तेव्हां त्यांना वैराग्याचे झटके येतात व तत्त्वचिंतनाची स्फूर्ति होते. विरहामुळें होणारा मनस्ताप चुकविण्यासाठीं ते निसर्गाकडे धांव घेतात; सुखी, संयतचित्त वर्ड्स्वर्थप्रमाणें जगदात्म्याचा साक्षात्कार निसर्गाच्या भव्य रूपादर्शांत पाहण्यासाठीं नव्हे. " पुष्पपतंगस्थिति ही कोठुनि आम्हांला मिळणें ? " हा त्यांनीं फुलपांखरूं वागाडांना पाहून केलेला प्रश्न अत्यंत सूचक आहे. " धिक्कार या जगीं इच्छित न मिळे कांहीं " अशी त्यांची जगाविषयीं भावना झालेली होती. या भावनेच्या, या निराशेच्या पोटीं त्यांचें हरपल्या श्रेयाचें तत्त्वज्ञान जन्मलेलें आहे. 'तुतारी'-सारखी ओजोगुणानें रसरसलेली कविता त्यांनीं एखादीच रचली; व ती अर्थातच मनाच्या अपवादात्मक स्थितींत. ते देशाभिमानी होते, यांत शंका नाहीं. पण दुरंत, प्रमाथी प्रणयविकारानें त्यांचें जीवित आणि काव्य इतकें ग्रासून टाकलेलें होतें कीं, खग्रास ग्रहणाच्या वेळीं चंद्राच्या सुंदर बिंबाच्या ठिकाणीं जसें त्याचें रक्तकश्मल वर्तुळ तेवढें दिसावें, तशी त्यांच्या देशाभिमानाची अवस्था झाली आहे. स्वातंत्र्य आणि समता यांना पुरस्कार त्यांनीं केला आहे खरा; परंतु तो बव्हंशीं स्त्री-विशिष्ट आहे. 'पण लक्षांत कोण घेतो !' च्या कर्त्याचा गौरव करतांना " मूर्तिमंत आद्य देवत " असा त्यांनीं स्त्रीजातीचा जो उल्लेख केला आहे, तो कांहीं केवळ औपचारिक दाक्षिण्याचा द्योतक नसून, त्यांच्या स्वतःच्या मनाची स्त्रीपरतन्त्रता त्यांत प्रतिध्वनित झालेली आहे. शेक्सपियरपासून स्विनबर्नपर्यंत इंग्लंडांत होऊन गेलेल्या थोर कवींच्या काव्यांतून स्वकीयांच्या आणि परकीयांच्याहि राजकीय स्वातंत्र्याबद्दल जी तळमळ आविर्भूत झाली आहे, तिचा अस्पष्टसुद्धां पडसाद इंग्रजी काव्यांत रमलेल्या केशवसुतांच्या कवितांतून ऐकूं येत नाहीं. वस्तुतः, त्यांनीं ज्या वेळीं काव्यलेखनाला प्रारंभ केला, तो काळ राष्ट्रीय पुनरुज्जीवनाचा असून, राजकारणाच्या काळवंडलेल्या क्षितिजावर प्रक्षोभक ध्येयांची उषःप्रभा नुकतीच पसरूं लागली होती. पण त्यांच्या 'तुतारी'तून सुद्धां तिची ललकारी झडलेली नाहीं. उलट मंगळ्याच्या मुखडाचे धूत्कारच त्यांच्या कवितेंतून जास्त कानांवर येतात.

त्यांच्या या मनोविकल्पाचा ठसा त्यांनीं प्रवर्तिलेल्या युगावर स्पष्ट उमटला आहे. त्यांच्या समकालीन कवींवर त्यांच्या नावीन्याची छाप पडली असली, तरी ती एकंदरीत फार थोडी. त्यांच्या भोंवतालच्या कवींत विचारांच्या दृष्टीनें ज्यांना अंशतः तरी त्यांचे सवर्गीय म्हणतां येईल, असे कवि टिळक, विनायक आणि दत्त हे तिघेच दिसतात. त्यांच्यापैकीं टिळक आणि विनायक यांचें केशवसुतांशीं

कांहीं बाबतींत साधर्म्य असलें, तरी ते दोघे परस्परांपासून मात्र सर्वथैव भिन्न होते. टिळक धर्मांतर करून चुकले होते, तर विनायकांना स्वधर्माचा प्रखर अभिमान होता. टिळकांच्या कवितेंत पूर्वेतिहासाचा उल्लेख चुकूनहि केलेला आढळणार नाहीं, तर 'पूर्वदिव्य ज्यांचें त्यांना रम्य भावि काळ' ही भावना उद्दीपित करण्यांत विनायकांनीं आपलें प्रतिभासर्वस्व वेंचलें. टिळकांनीं ब्रिटॅनियेचा जयजयकार मोठ्या भक्तिभावानें केला, तर महाराष्ट्रलक्ष्मीला पारतंत्र्यामुळें आलेलें दैन्य पाहून विनायकांनीं दुःखाश्रु ढाळले. टिळकांची प्रतिभा सृष्टि आणि संसार यांच्या स्वरसंगमांत रमलेली होती, तर विनायकांनीं बव्हंशीं स्वदेशाच्या इतिहासापासून स्फूर्ति घेतलेली आहे. टिळकांनीं स्त्रीला महारथि म्हणून गौरवून "नरनारी जगिं बरोबरी हीं चढती, कोसळती" हें टेनिसनचें तत्त्व प्रतिपादिलें आहे, तर विनायकांनीं वीररमणींचे पोवाडे जरी हिरीरीनें गाइलेले असले तरी स्त्री ही भोग्य वस्तु आहे ही कल्पना त्यांच्या मनांत बद्धमूल झालेली होती. परंतु अशा रीतीनें परस्परांना असमशील अशा या दोन कवींपैकीं टिळक हे केशवसुतांना निसर्गप्रेमाच्या बाबतींत व विनायक हे स्वदेशप्रेमाच्या बाबतींत जवळ होते. केशवसुतांच्या वाणींतील ओज आणि आवेश हे गुण जर त्यांच्या समकालीनांतील अन्य कोणत्या कवीच्या वाणींत प्रत्ययाला येत असतील, तर ते फक्त विनायकांच्या. स्वदेशाची आणि स्वजनांची अवनति पाहून होणारी मनाची तळमळ हा या दोघां कवींचा समान धर्म होय. पण या तळमळीचें स्वरूप व ती व्यक्त करण्याची पद्धति यांत मात्र कोणत्याच प्रकारचें सादृश्य नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. केशवसुत देशाभिमानी असले, तरी त्यांच्या त्या अभिमानाला उज्ज्वल पूर्वेतिहासापासून प्रेरणा मिळाली होती, असें वाटत नाहीं. किंबहुना, त्यांच्या कवितेची एकंदर अंतर्बाह्य घडण ध्यानांत घेतली असतां, त्यांची प्रतिभा हा इंग्रजी काव्याचा प्रसव आहे, असेंच म्हणावें लागेल. त्यांनीं 'दोन बाजी' म्हणून जी ऐतिहासिक म्हणतां येईल अशी एकुलती एक कविता लिहिली आहे, तिचें मूळ फ्रेंच कादंबरीकार व्हिक्टर ह्यूगो याच्या दोन नेपोलियनांवरील कवितेंत सांपडतें. उलट 'यापुढें', 'महाराष्ट्रलक्ष्मी', 'हतभागिनी', 'शिवराजदर्शन' वगैरे विनायकांच्या कविता दुःखदग्ध अंतःकरणांतून जणुं कांहीं जळतच बाहेर पडलेल्या आहेत. स्वधर्म किंवा स्वदेश यांच्याविषयीं त्यांनीं एकहि उणा शब्द काढलेला दाखवितां येणार नाहीं. उलट "भुललों पूर्ण विसरलों सारें। अंगीं भरलें नूतन वारें। मूर्खत्वाचे तुटती तारे"

अशा भोंवतालीं चाललेल्या परिवर्तनाविपर्यीची त्यांची भावना होती. परंतु केशवसुतांच्या 'तुतारी'चा सारा भर "जुनें जाउं द्या मरणालागुनि" या कल्पनेवर आहे. विनायकांची स्वदेशभक्ति इतकी जाज्वल्य होती कीं, त्यांचें सारें आयुष्य जरी बाह्यतः इंग्रजांच्या रंगढंगांत जात होतें, तरी आपल्या हतभाग्य मातृभूमीचें दैन्य त्यांच्या डोळ्यांपुढून कधींच हललें नाहीं; व समुद्राच्या अंतरंगांतून वहाणाऱ्या उष्ण प्रवाहांनीं जसें त्याचें पाणी हिंवाळ्यांतहि गोठूं देऊं नये, त्याप्रमाणें मनाच्या अत्यंत विकल स्थितींतहि त्यांच्या त्या देशभक्तीची तीव्रता अविचलित राहिली. उलट, तारुण्यांतील उसळत्या रक्ताच्या काळांत "आम्हां डोळे नसति बघण्या पारतंत्र्यामुळें हो" असे उद्गार जरी केशवसुतांनीं वेलींना व फुलांना उद्देशून काढलेले असले, तरी ही भावना कालांतरानें ओसरत जाऊन, शेवटच्या बारा वर्षांत "वेडा पीरच जाहलों अिवलगे आहें वियोगामुळें" या स्थितीला ते येऊन पोंचले. अर्थात् केशवसुत आणि विनायक हे समकालीन असले, तरी विनायकांच्या स्फूर्तीची ज्योत ही इतिहासप्रदीपावर पेटलेली होती, केशवसुतांच्या टिणगीवर नव्हे. विनायकांप्रमाणेंच दत्तांचीहि कविता स्वतंत्र स्फूर्तीची दिसते. नाहीं म्हणावयाला, कवितेला प्रणयिनी कल्पून तिचें आराधन करण्याच्या केशवसुतांच्या विशिष्ट मनोविकृतीची छटा त्यांच्या "बघसी अंत किती राजसे" या गीतांत काय आढळते, तेवढीच. त्या मानानें टिळक हे केशवसुतांपेक्षां चार वर्षांनी वडील व अतिशय व्युत्पन्न असतांना सुद्धां त्यांच्यावर केशवसुतांची छाप बरीच पडलेली आहे. दोघेहि सुधारणावादी आणि निसर्गोपासक. टिळकांच्या सुधारणावादाचें पर्यवसान धर्मांतरांत झालें; व केशवसुत स्वधर्मांत राहिले, पण त्यांना कल निरीश्वरतेकडे झुकला. टिळकांचें 'रणशिंग' हा केशवसुतांच्या 'तुतारी'चा उघड उघड अनुध्वनि होय. टिळकांची निसर्गाकडे पाहण्याची दृष्टि केशवसुतांच्या इतकी सूक्ष्म नसली, तरी त्यांची निसर्गोपासना अधिक प्रांजळ आणि प्रेमळ वाटते; व तत्त्वोपदेशाच्या हव्यासामुळें तिला थोडी कृत्रिमता आली असली, तरी केशवसुतांच्या नैराश्याची छटा तींत यत्किंचितहि उमटलेली नसून तिचें स्वरूप आनंदनिर्भर आहे. परंतु, टिळकांच्या कवितेला जरी कोणत्याहि प्रकारच्या विकृतीचा डाग लागलेला नसला, तरी केशवसुतांप्रमाणें त्यांच्याहि प्रतिभेवर इंग्रजीचा पगडा जास्त पडलेला आहे.

टिळक हे केशवसुतांप्रमाणें क्रांतीचे प्रवर्तक नाहींत, तर संधिकालाचे प्रतिनिधि आहेत. त्यांचें धर्मांतर हें सुद्धां या संधिकालाचें द्योतक आहे असें म्हटलें तरी चालेल. व्युत्पत्ति आणि नावीन्यप्रियता या दोहोंचा मोठा विचित्र संगम त्यांच्या कवितेंत झालेला असून, ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्यावरहि ज्याप्रमाणें त्यांनीं धर्मेतर सर्व बाबतींत आपलें हिंदुत्व कायम ठेविलें, त्याप्रमाणें केशवसुतांशीं समरस होऊनहि त्यांनीं काव्यरचनेची जुनीच प्रथा बव्हंशीं अनुसरिली. 'अभंगांजलि' किंवा 'ख्रिस्तायन' तर राहोच, पण त्यांची प्रेमकविता वाचतांना देखील आपल्याला शेलेच्या वैणिकांची कोठें चुकूनसुद्धां आठवण होत नाहीं. म्हणूनच त्यांना संधिकालाचे प्रतिनिधि म्हणावयाचे. केशवसुत ज्या वेळीं सुनीतें आणि भावगीतें लिहून नव्या युगाची ललकारणी करीत होते, त्या काळांतहि पंत-पंडितांच्या रचनेवर आपल्या विदग्धतेनें कांहीं बाबतींत तरी मात करणारी अभिजात कविता उदंड निर्माण होत होती. चिपळूणकर, लेले, पारखी, कानिटकर, आगाशे, कुरुंदवाडकर, ओक, चिंतामणि-पेठकर किंवा खरे प्रभृति केशवसुतांच्या पूर्वीच्या पिढींतील पंडित कवि सोडले, तरी मोगरे, लेंभे, भिडे प्रभृति त्यांचे समकालीन म्हणतां येतील असे अथवा चंद्रशेखर, आनंदीरमण, मुजुमदार, माधवानुज प्रभृति त्यांच्या थोडे नंतरच्या काळांतील कवि पंडितवर्गांत मोडणारे असून, त्यांच्या रचनेवर इंग्रजीपेक्षां संस्कृत कवितेचीच छाप विशेष आहे. या कवींचा इंग्रजी वाङ्मयाचा व्यासंग केशवसुतांपेक्षां कमी होता, असें नाहीं. उलट, यांपैकीं बहुतेक कवि बहुश्रुत आणि इंग्रजी काव्याचे मर्मज्ञ असून, त्यांच्या या विद्वत्तेची प्रतीति त्यांच्या कवितेंत पुष्कळ येते. किंबहुना, त्यांची कविता ही स्फूर्तीच्या क्षणिक आवेगांतून उत्स्फूर्त झालेली नसून, विद्वत्ता आणि परिश्रम यांच्या पोटीं जन्मलेली आहे. केशवसुतांनीं ज्या वेळीं काव्यप्रदेशांत बंडाची धामधूम उडवून दिली होती, त्या वेळीं या कवींचें अभिजात काव्यलेखन संथपणानें चाललें होतें. केशवसुत आणि हे त्यांचे समकालीन कवि यांच्या कवितेंत अशा तऱ्हेचा विलक्षण फरक पडावा, याला काय कारण सांगतां येईल? इंग्रजी वाङ्मयाच्या व्यासंगाचा आणि समाजांत चाललेल्या घडामोडींचा परिणाम या इतर कवींच्या मनावर न झाल्यामुळें त्यांनीं अशा प्रकारची कविता लिहिली असें म्हटलें, तर तें न्यायाचें होणार नाहीं. कारण, त्यांच्यापैकीं कांहींच्या कवितेचें बहिरंग जरी जुनें असलें, तरी विचारांचें नावीन्य, सुधारणावादित्व आणि देशाभिमान हे गुण तिच्यांत विपुल आढळतात. किंबहुना,

मनोवृत्ती प्रक्षोभक चळवळींचें वादळ घोंघावत असतां केशवसुत हे मात्र, पानिपतावरील संहाराबद्दल डोळ्यांतून एक टिपूसहि न काढतां आर्याभारत रचणाऱ्या मोरोपंतांप्रमाणें, 'म्हातारी'वर क्लिष्ट कल्पना लढविण्यांत दंग झाले होते. मग त्यांच्या व इतर समकालीन कवींच्या कृतींत हा फरक कां पडला? याचें कारण असें दिसतें कीं, ते कवि स्थितप्रज्ञ तर केशवसुत हे भ्रांतचित्त होते. केशवसुतांनीं आपल्या डोक्याच्या भ्रमणाचा जो उल्लेख केला आहे, तो वाच्यार्थानें घेतला तरीहि तें संयुक्तिक होईल. विशिष्ट प्रकारच्या मादक वाङ्मयाच्या सतत सेवनानें त्यांच्या बुद्धीला तरलता आणि मनाला विकलता येऊन त्यांच्या कवितेला लोकविलक्षण असें स्वरूप प्राप्त झालें. त्या स्वरूपांत निरामयतेचा भाग थोडा, विकृतीचाच जास्त आहे. बायरन, शेले, कीट्स प्रभृतींची प्रणयमदिर कविता वाचून तत्कालीन तरुण पिढींत ज्या भावना आणि वासना निर्माण झाल्या, त्यांच्या विचारांत आणि वृत्तींत जी उत्कटता आणि अधीरता उत्पन्न झाली, तिला केशवसुतांच्या कवितेच्या रूपानें वाचा फुटली. त्यांनी घडवून आणलेल्या क्रांतीचें नावीन्य या गोष्टींत आहे; व त्या दृष्टीनें त्यांना तत्कालीन तरुण पिढीचे प्रतिनिधि, त्या काळाचे उद्गाते म्हणतां येईल. त्यांचें मात्र दैव कीं, त्या वेळच्या प्रतिष्ठित कवींनीं किंवा रसिकांनीं जरी त्यांच्या कवित्वाची बूज फारशी केली नाहीं, तरी त्यांच्यापेक्षां सात आठ वर्षांनीं लहान असलेल्या तांबे, रहाळकर, देवधर प्रभृति उदयोन्मुख तरुण कवींना मात्र त्यांच्या नावीन्यानें मोहित केलें. हें नावीन्य टिळकांच्या कवितेंत असलें, तरी तेथें केशवसुतांच्या कवितेंतील नावीन्याइतका उच्छृंखलपणा—उत्तेजकता नाहीं. उलट टिळकांच्या कवितेचें वळण प्रायः जुनेंच राहिल्यामुळें धर्मांतर करूनहि त्यांना लोकप्रियता मिळाली आणि टिकाऊताहि आली. आधुनिक कवितेंतील जुन्या नव्या प्रवाहांच्या मीलनबिंदूवर ते उभे आहेत. मराठी काव्यवाङ्मयांत ही जी दोन भिन्न वळणें, दोन प्रवाह समांतर वाहतांना दृष्टीस पडतात, त्याचें कारण काय? पाश्चात्य संस्कृतीच्या संसर्गानें समाजांतील मूठभर सुशिक्षितांच्या विचारांत केवढेंहि परिवर्तन घडून आलेलें असलें, तरी बहुजनसमाज हा मात्र अजूनहि धार्मिक आणि वेदांतप्रवण राहिलेला आहे. रोमच्या दारूला आऊन मिळणाऱ्या वलयमाच्या नागासारख्या नास्तिकांचा कितीही साम्यवाद बहुजनसमाजाच्या गळीं निबिड मनोभूमीत खोलवर रुजून तिची कायापालट जेव्हां केव्हां करील तेव्हां करो. आज तरी जुनाट धार्मिक कल्पना आणि रूढी तीव्र दृढमूल होऊन बसलेल्या आहेत. भारतीय मनावरील हें आध्यात्मिक

कल्पनांचें अधिराज्य इतकें विलक्षण आहे कीं, भौतिक पाश्चात्य शिक्षणाचे संस्कार गेलीं शंभर वर्षें त्याच्यावर सतत होत असतांना देखील वेदांताच्या पकडींतून तें सुटूं शकलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर हा अध्यात्मवाद आज बदललेल्या काळाला शोभेल असें नवें आकर्षक रूप धारण करून कवितेवर पुन्हा वर्चस्व गाजवायला पाहत आहे. आधुनिक मराठी कवितेंत हे जे दोन प्रवाह आरंभापासून उत्पन्न झाले, ते या अध्यात्मवादाच्या प्राबल्यामुळें, स्वसंस्कृतीच्या श्रेष्ठतेवरील श्रद्धेमुळें. केशवसुतांना अध्यात्माची सारी परिभाषा परिचित होती, ही गोष्ट खरी. पण त्यांच्या मनाचा कल अज्ञेयाकडे झुकल्यामुळें तज्जन्य गूढगुंजनाच्या विरळ छटां-शिवाय त्यांच्या कवितेंत विचारांचें जुनें वळण असें कोणतेंच शिल्लक उरलें नाहीं; व ईश्वराची जागा दयिता आणि सृष्टि यांना मिळून भक्तीची जागा प्रणयानें बळकावली. त्यामुळें त्यांची कविता जुन्या व नव्या इतर साऱ्या मराठी कवितेहून निराळी वाटते. परंतु, त्यांचे समकालीन अन्य कवि हे जरी त्यांच्यापेक्षा व्यासंगी आणि बहुश्रुत होते, तरी त्यांच्या मनावर जुन्या आध्यात्मिक आणि सांस्कृतिक कल्पनांचा पगडा कायमच होता. त्यामुळें प्राचीन भारतीय संस्कृतीचे केवळ प्रवक्ते अशा चंद्रशेखरांपासून तों स्वधर्माचा त्याग केलेल्या टिळकांपर्यंत त्यांच्या साऱ्या समकालीनांची कविता ही थोड्या फार प्रमाणांत जुन्या वळणाची झाली.

किंबहुना, केशवसुतांच्या ‘ तुतारी ’चे साद झेलून जे त्यांचे अनुयायी म्हणून त्यांच्या मागून पुढें सरसावले, त्यांना सुद्धां हें आध्यात्मिक कल्पनांचें वर्चस्व झुगा-रून देतां आलें नाहीं; व एका परीनें आधुनिक कवितेंत त्यांनीं प्रतिक्रांति घडवून आणली. केशवसुतांचे सच्चे चेले गोविंदाग्रज यांना जर या प्रतिक्रांतीचे प्रवर्तक म्हटलें, तर तें खचित गैर होणार नाहीं. केशवसुतांनीं जें जें म्हणून मराठी कवितेंत नवीन आणलें, त्याचा विपर्यय गोविंदाग्रजांच्या हातून कळत वा न कळत घडला. केशवसुत मुक्तात्म, तर हे परंपराप्रिय; केशवसुत अज्ञेयवादी, तर हे पराकोटीचे भाविक; केशवसुतांना वेदांताचें वावडें, तर हे त्याच्या तहानेनें तळमळणारे; व केशवसुतांची वाणी खडबडीत, तर यांची शृंगारलेली. धार्मिक क्रांतीच्या इतिहासांत आपण पुष्कळदां असा चमत्कार पाहतों कीं, त्या क्रांतीचा प्रवर्तक जुन्या धर्मांतील कर्मकांड आणि परंपरा झुगारून देऊन साध्या भावगर्भ नवधर्माची संस्थापना करितो; तर त्याच्या मागून त्याच्या पीठावर आरूढ होणारा त्याचा शिष्यवर हा साऱ्या जुन्या विधिविधा-नांच्या अवडंबराचा साज, परिस्थित्यनुरूप त्यांत थोडाबहुत फरक करून, पुन्हा त्या

नवधर्माच्या उघड्यावाघड्या अंगावर चढवितो. त्यामुळें, त्या नवधर्माला लोकप्रियतेचें अधिष्ठान मिळवून दिल्याचें श्रेय जरी या शिष्यवराला लाभलें, तरी त्या धर्माचें वैशिष्ट्य मात्र बव्हंशीं नष्ट होतें, यांत शंका नाहीं. केशवसुत आणि गोविंदाग्रज यांच्या बाबतींत असाच प्रकार झाला. कारण गोविंदाग्रज हे कलोपासक होते, केशवसुतांप्रमाणें निसर्गोपासक नव्हे. कल्पकता, तज्जन्य अतिरंजन आणि तद्भूत कृत्रिमता हे त्यांच्या कवितेचे विशेष म्हणून सांगतां येतील. या विशेषांमुळें त्यांच्या कवितेला जशी उज्ज्वलता तशीच अस्वाभाविकताहि आलेली आहे. त्यांच्या मनाला वास्तवापेक्षां अद्भुताचें आणि औचित्यापेक्षां वैचित्र्याचें आकर्षण अधिक होतें; व त्यामुळें बुद्धीचा कल सुधारणेच्या तत्त्वांकडे झुकलेला असूनसुद्धां ते मनानें मात्र भाविक, दैववादी आणि दुबळेच राहिले. "श्रुतिस्मृतींना आतां विसरा" हे त्यांचे उद्गार, त्यांच्या दृश्यश्राव्य काव्यांतून प्रकट झालेले विचार लक्षांत घेतां, केवळ अनुवादात्मक व म्हणून निरर्थक वाटतात. केशवसुतांनंतर गोविंदाग्रजांइतकी प्रेमकविता प्रायः दुसऱ्या कोणत्याच कवीनें लिहिली नाहीं. किंबहुना, कल्पनासृष्टींतल्या प्रियेच्या विरहानें झुरून नकली वेणिकें लिहिण्याचा केशवसुतांनी सुरू केलेला स्त्रैण संप्रदाय गोविंदाग्रजांनीं आपल्या कल्पनारम्य प्रेमगीतांमुळें अतिरेकाला नेला, असें म्हटलें तरी शोभेल. त्यांच्या प्रेमकवितेंत बुद्धिविलास असला, तरी दर्द फारसें नाहीं. हीच कृत्रिमता त्यांच्या 'फुटकी तोटी', 'प्रेमाचा प्रळयकाळ', 'कलयीनें गाणें' वगैरे आध्यात्मिक स्वप्नांच्या नादीं गुंगणार कवितांतहि दिसून येते. त्यांची कल्पकता केशवसुतांपेक्षां अधिक प्रभावी, त्यांच्या भावनांचा खळाळ अधिक प्रबळ व भाषेवरहि त्यांचें प्रभुत्व अधिक. त्यामुळें त्यांच्या कवितेनीं मोहनी लोकांच्या मनावर लवकर पडून कालांतरानें हा लोकप्रियतेचा ओघ एकंदर आधुनिक कवितेकडे वळला. त्यांच्या कवितेपेक्षां बालकवींची कविता अधिक प्रसन्न आणि भावनिर्भर आहे. केशवसुत-टिळकांनीं जरी मनःशांतीसाठीं निसर्गाकडे धांव घेतली असली, तरी त्यांनीं सृष्टीचें सगुण रूप मात्र कधींच आपल्या डोळ्यांत सांठवून ठेवलें नाहीं. बालकवींची भूमिका या बाबतींत त्यांच्यापेक्षां अगदीं निराळी होती. ते निसर्गाचे उपासक नव्हते; तर त्याच्याशीं समरस होणारे त्याचे सहचर, सृष्टीचे दोशावांतले सवंगडी होते. तारका, निर्झर, किंवा फुलराणी फुलपांखरूं यांचें वर्णन करितांना ते जे इतके हळुवार आणि लडिवाळ होतात, ते याच कारणामुळें. त्यांचा 'धर्मवीर' हा 'तुतारी' इतकाच ओजस्वी

वाटतो. परंतु, केशवसुतांप्रमाणें त्यांनाहि पुढें हरपल्या श्रेयाचा ध्यास लागल्यासारखा होऊन, त्यांच्या कवितेवर मनोवैकल्याची छाया पडली आहे. मात्र कवितेला आपली वल्लभा कल्पून तिच्यावर प्रेमगीतें लिहिण्याची केशवसुतांची जी विशिष्ट विकृति आहे, तिचा आढळ गोविंदाग्रज आणि बालकवि या दोघांच्याहि कवितेंत होत नाहीं. परंतु, रेंदाळकरांनीं केशवसुतांचें स्त्रीदाक्षिण्य जसें अक्षरशः उचललें, तशीच त्यांची ही विकृतीहि आत्मसात् केली होती. 'प्रेमासाठीं', 'विरही' वगैरे रेंदाळ-करांचीं गीतें म्हणजे केशवसुतांच्या थकलेल्या भटकणाऱ्याच्या गाण्याचा केवळ अनुवाद आहेत. 'कोकिळास' वगैरे गीतांतून त्यांनीं केलेला निसर्गोपासनेचा प्रयत्नहि स्वाभाविक वाटत नाहीं. त्यांच्या कवितेचें अकृत्रिम सौष्ठव त्यांनीं आपल्या आयुष्याच्या अखेरच्या दिवसांत लिहिलेल्या कांहीं आत्मपर गीतांतून प्रतीत होतें. रेंदाळकरांचे स्नेही नागेश यांची कविता जरी संस्कृतप्रचुर असली, तरी तिच्यांतहि केशवसुतांच्या युगाचे हे विशेष व्यक्त झालेले आहेत. या दोघां कविमित्रांनीं केशवसुतांच्या हातून न झालेली आणखीहि एक नवीन सुधारणा करून त्यांनीं घडवून आणलेल्या क्रांतीची एका परीनें पूर्तता केली. ही सुधारणा म्हणजे निर्यमक कवितेचा पुरस्कार. रेंदाळकर आणि नागेश हे दोघेहि व्युत्पन्न आणि आलंकारिक असल्यामुळें त्यांची निर्यमक रचनाहि मोठी डौलदार आणि श्रुतिसुभग असे; व प्रतिकूल टीकेची दरकार न करितां एक प्रकारच्या चिकाटीनें त्यांनीं या सुधारणेचा पुरस्कार केल्यामुळें, यमकांची परिहार्यता रसिकांना पटून, ती सुधारणा लवकरच प्रचलित झाली. केशवसुतांच्या या चार प्रमुख अनुगामी कवींच्या मागून जे कवि उदयाला आले, त्यांत सोनाळकर, काव्यविहारी, केशवकुमार, अरविंद, विरकूड, आनंद, सरस्वतीकुमार, कमलासुत, अज्ञातवासी, कुमुदबांधव, अधिकारी प्रभृतींची गणना होते. या कवींच्या रचनेवर आरंभीं तरी गोविंदाग्रजांची छाप अतिशयच होती. गोविंदा-ग्रजांचें माहात्म्य कमी झाल्यावर यांपैकीं कोणी तत्त्वचिंतनाच्या गुहेंत शिरले, कोणीं शाहिरी डफावर थाप मारली, कोणी विडंबनाच्या जोरावर प्रतिष्ठा पावले, कोणीं नाविक गीतांची नवलाई दाखविली, कोणीं तांबे यांच्या सुरावर आपला सूर छेडला व कोणीं 'रविकिरणां'पासून रचनेची शैली उचलली.

केशवसुतांच्या या युगांत चंद्रशेखर, गुर्ते (Bee), तांबे आणि माधव हे चार कवि मात्र आपल्या वैशिष्ट्यामुळें निराळे वाटतात. त्यामुळेंच बहुधा गोविंदा-ग्रजांच्या संप्रदायाची सद्दी संपेपर्यंत या कवींच्या गुणांची बूज महाराष्ट्रांत होऊं

शकली नाहीं. वस्तुतः चंद्रशेखर, गुर्ते आणि तांबे हे तिघेहि केशवसुतांचे समकालीन; व त्यांपैकीं गुर्ते आणि तांबे या दोघांच्या कवितेवर केशवसुतांच्या युगाचा प्रभाव, अत्यल्प कां होईना, झालेला दाखवितां येईल. पण चंद्रशेखर व या तिघांच्याहि मानानें तरुण असलेले माधव यांचें स्थान मात्र अगदीं स्वतंत्र आहे. चंद्रशेखरांची गणना रचनेच्या दृष्टीनें खरोखरी लेंभे, मोगरे प्रभृति पंडित-कवींतच व्हावयाची. परंतु, त्यांच्या प्रतिभेचा विशेष हा कीं, पांडित्याचे उत्कृष्ट संस्कार तिच्यावर घडलेले असून सुद्धां, अंगावरील विद्वत्तेचें महावस्त्र घटकाभर बाजूला ठेवून, ती ग्रामीणांच्या संसारांत सुखेनैव रमूं शकली. इंग्रजी महाकवि मिल्टन यानें आपल्या मित्राच्या मृत्यूवर ‘ लिसिडस ’ ही विलापिका गोपकाव्य ( Pastoral Poem ) म्हणून लिहिली. परंतु, तापसवेष घेतलेल्या शकुंतलेचें क्षात्रतेज जसें लपूं शकलें नाहीं, तसें मिल्टनच्या अभिजात प्रतिभेचें ऐश्वर्य त्या काव्याच्या पांडित्यपूर्ण रूपकांतून स्पष्ट दिसून येतें. पण, ज्यांनीं ‘ कवितारति ’ रचिली, त्याच चंद्रशेखरांनीं ‘ उगाड गुपित ’ लिहिलें आहे, असें कोण म्हणूं धजेल ? त्यांच्या ‘ काय हो चमत्कार ’ या प्रणयरम्य जानपद खंडकाव्यानें त्यांना जितकी लोकप्रियता मिळवून दिली आहे, तितकी दुसऱ्या कोणत्याहि अर्वाचीन खंडकाव्यानें त्याच्या निर्मात्याला मिळवून दिली नसेल. या काव्यांत प्रकट झालेले चंद्रशेखर हे शब्द-ब्रह्माच्या उन्मनींत विलीन होणारे उपासक नाहींत; तर नेणत्यांच्या भावना त्यांच्या अंतरंगांत शिरून बोलत्या करणारे शब्दसृष्टींतील जादुगार आहेत. त्यांच्या पूर्वीच्या किंवा बरोबरच्या इतर पंडित कवींना आपल्या अभिजातपणाचें अवडंबर चुकूनहि कधीं अंगावरून उतरतां न आल्याकारणानें ते आज केवळ स्मृतिशेष होऊन बसले आहेत. उलट, चंद्रशेखरांच्या ‘ काय हो चमत्कार ’ व ‘ उगाड गुपित ’ या खंडकाव्यांनीं महाराष्ट्राच्या जानपद काव्याचा पाया घातला असून, आधुनिकांतील इतर कोणत्याहि कवीला न लाभलेली अशी वैशिष्ट्यपूर्ण कीर्ति त्यांना मिळवून दिली आहे. जुन्या धर्तीची प्रौढ रचना करून आधुनिक कवि हे पंत-पंडितांपेक्षां वैदग्ध्याच्या बाबतींत सरस असूं शकतात हें जसें त्यांनीं सिद्ध करून दाखविलें, त्याचप्रमाणें सुसंस्कृत मनुष्यहि गांवढ्यांच्या जीवनाचें चित्र कुणबाऊ भाषेंत जिव्हाळ्यानें रेखाटूं शकतो, ही गोष्टहि त्यांनीं प्रत्ययाला आणून दिली. तांबे यांच्या यशाची अनन्यता त्यांनीं निर्मिलेल्या विविध गीतसंभारांत आहे. त्यांच्या गीतांतून काव्य, संगीत आणि चित्र या तिन्ही कलांतील लालित्याचा संगम झालेला आढळतो.

शेले, टेनिसन प्रभृतींपासून स्फूर्ति घेऊन केशवसुत–टिळकांनीं भावगीतें आणि सुनीतें लिहावयाला सुरुवात केली, हें खरें. पण, त्यांच्या त्या भावगीतांना वैणिकें म्हणणें, म्हणजे वीणेच्या गुणरणनाचें विलोल माधुर्य आपण कधीं अनुभवलें नाहीं, असें सांगण्यासारखेंच आहे. त्यांच्या वैणिकांतून भावाविष्कार असला, तरी गेयता मात्र नाहीं. वीणेच्या तारांतून उठणाऱ्या निरनिराळ्या नादांच्या लकेरी आणि रसांच्या लहरी यांचीं मृदुसूक्ष्म आंदोलनें जर कोणाच्या गीतांत पाहावयाला मिळत असतील, तर तीं तांबे यांच्या. "कविता म्हणजे भाषेंतलें संगीत" (Poetry is the music of language) ही कवितेची व्याख्या त्यांच्या भावगीतांना यथार्थतेनें लागू पडते. मनाला सृष्टींतील सौंदर्याचे साक्षात्कार व्हावे, त्या साक्षात्कारांच्या चिंतनांत बुद्धि रंगून जावी व त्या उन्मनी स्थितींत प्रतिभेला गीतांचा फुलोरा फुटावा, या गोष्टी घडावयाला जी सूक्ष्मग्राही, सौंदर्यप्रवण पण शुचि मनोवृत्ति असावी लागते, ती तांबे यांच्या ठिकाणीं असल्यामुळेंच त्यांच्या हातून इतकीं रससुंदर भावगीतें निर्माण झालीं. गुप्ते यांच्या कवितेचें स्वरूप भावात्मक (lyrical) नाहीं, तर चिंतनात्मक (reflective) आहे. त्यांच्या कवितेचा जन्म भावनांच्या उद्रेकांतून झालेला नसून, विचारांच्या समाधींतून झालेला असतो. चंद्रशेखरांप्रमाणें त्यांची प्रतिभाहि अभिजात असून, उदात्त विचार आणि भव्य कल्पना यांचा संगम त्यांच्या कवितेंत झालेला आहे. अर्थात् त्यांच्या कवितेची पैदास गवतासारखी उदंड नाहीं; तर त्या हिरव्या गवताच्या पार्श्वभूमीवर ताऱ्याप्रमाणें चमकणाऱ्या विरळ फुलासारखी ती आहे. गुप्ते यांच्याप्रमाणें माधवांची कविताहि मोजकीच आहे म्हटलें तरी शोभेल; व त्यांनीं निरनिराळ्या प्रकारची स्फुट कविता जरी बरीच लिहिली असली, तरी ऐतिहासिक प्रतिभेचे कवि म्हणूनच त्यांचें नांव मराठी वाङ्मयांत चिरंतन होऊन राहील. इतिहासाचें सूक्ष्म ज्ञान, त्या ज्ञानाचा मार्मिक उपयोग व त्या उपयोगाला ओजस्वितेची जोड या गुणांमुळें त्यांची ऐतिहासिक कविता केवळ अद्वितीय होऊन बसली आहे. एकाद्या भग्न किल्ल्याच्या तटावर आदळून फुटलेली समुद्राची प्रचंड लाट जशी भयानक दिसावी, तसा त्यांच्या कवितेंतील पुष्कळदां विषादांत पर्यवसित झालेला त्वेष रुद्रगंभीर वाटतो. रणदिवे, अनंततनय, साधुदास, उपाध्ये, तिवारी प्रभृति या काळांतील इतरहि कांहीं कवींवर केशवसुतांच्या युगाचा परिणाम फारसा झाला नाहीं; व त्यांची कविता एकंदरींत जुन्या वळणाची आहे.

# गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता

युरोपांतील महायुद्धामुळें जगाच्या आध्यात्मिक आणि राजकीय विचारांत जी क्रांति घडून आली, तिच्या आकर्षणांतून समोंवतालच्या घडामोडींविषयीं सामान्यतः उदासीन असलेले आधुनिक कवीहि सुटले नाहींत. या क्रांतीचें स्वरूप दुहेरी होतें. शास्त्रीय ज्ञानाचा उपयोग मानवी जीवित अधिक सुखावह करण्यापेक्षां त्याच्या संहारासाठींच जास्त होण्याचा संभव आहे, ही जाणीव या युद्धामुळें, एक प्रकारच्या दारुणतेनें, लोकांच्या मनाला प्रथमच झाली. त्यामुळें, शास्त्रीय ज्ञानाच्या प्राप्तीवर उभारलेलीं मानवजातीच्या ऊर्जिताविषयींचीं सारीं मनोराज्यें ढांसळून पडून, जगांतील बुद्धिप्रधान वर्ग सर्वच ज्ञानाच्या इष्टतेविषयीं, प्रगतीच्या प्रचलित कल्पनांविषयीं उमर खय्यामप्रमाणें, साशंक, संशयात्म झाले; व त्यांना प्रत्यक्षापलीकडे पाहण्याची-चिरशांतीचा लाभ करून देणाऱ्या मार्गाची गरज भासूं लागली. टागोरांच्या 'गीतांजली'तील आध्यात्मिक गूढगुंजनाचें जें जगभर इतकें कौतुक झालें, तें मुख्यतः याच प्रतिक्रियेमुळें. गोंधळलेल्या, गुदमरलेल्या मानवी बुद्धीला कांहीं तरी विरंगुळा, विमोहन हवें होतें. तें गूढगुंजनानें अंशतः पुरविलें. या बाबतींत रवींद्रांना मिळालेल्या जागतिक कीर्तीचा परिणाम मराठी कवितेवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. कोल्हापूरचे सुमंत यांनीं 'गीतांजली'ला सदृश अशीं अनेक गीतें लिहिलीं; व शांतिनिकेतनापर्यंत दौरा काढून रवींद्रांच्या कानावर आपले हे भावनिनाद घातले. वस्तुतः, जुन्या मराठी कवितेंत गूढगुंजन अजिबात नाहीं, असें नव्हे. किंबहुना, अतर्क्य असा ईश्वर आणि तर्कातीत मार्गांनीं त्याची उपासना करणारा मनुष्य ही दुकल जगाच्या बाल्यावस्थेपासूनच अस्तित्वांत आलेली असल्यामुळें, तज्जन्य गूढगुंजन सर्वच राष्ट्रांच्या वाङ्मयांत थोड्याबहुत प्रमाणांत दिसून येतें. संस्कार, अभिरुचि आणि मनोरचना यांनीं त्याच्या स्वरूपांत जो काय फरक पडला असेल, तेवढाच. कोठें सृष्टि हें ईश्वराचें गोचर रूप कल्पून तिच्याशीं समरस होण्याच्या प्रयत्नांतून गुंजन उत्पन्न झालेलें असेल; कुठें ईश्वराच्या प्रतीकाविषयींच्या अनिवार आसक्तीमुळें भावना उल्लोलित होऊन गुंजनाला चालना मिळाली असेल; तर कुठें ईश्वर हा सौंदर्यनिधान आहे या कल्पनेनें गुंगलेल्या मनांत नाना प्रकारचे तरंग उद्भूत होऊन गुंजनाची स्फूर्ति झाली असेल. प्रेमविषय अगोचर किंवा दुष्प्राप्य असला, म्हणजे त्याच्याविषयीं नाना प्रकारच्या कल्पना लढवून त्यांच्या कैफांत गुंगत पडण्याचें व्यसन मनाला जडतें; व मनाच्या या निष्क्रिय, आत्मसंमूढ अवस्थेंत त्याला गुंजनाचा चाळा लागतो. ईश्वराचा ध्यास घेतलेले भक्त, प्रियजनाची आशा

सुटलेले प्रेमिक आणि संशयावर्तांत भ्रमत असलेले तत्त्वज्ञ यांच्या ठिकाणीं जी गुंजनाची प्रवृत्ति दिसून येते, ती याच कारणामुळें. उमर खय्याम सारख्या तत्त्वज्ञापासून तों टागोरांसारख्या कवींपर्यंत जगांतील अनेक मेधावींचीं मनें या चाळ्यांत रमल्याचें दिसून येतें. परंतु, गुंजनाच्या प्रकारांत कितीहि भिन्नता असली, तरी थोडीबहुत गूढता मात्र सर्वांनाच सामान्य असते. ही गूढता केव्हां प्रतीकामुळें तर केव्हां रूपकामुळें उत्पन्न होते. तुकारामादि संत कवींच्या विराण्या हे जुन्या मराठी वाङ्मयांतील रूपकात्मक गूढगुंजनाचे हृदयंगम नमुने म्हणून दाखवितां येतील. ‘ हरपलें श्रेय ’ ही केशवसुतांची रूपकात्मक कविता निर्व्याज गूढगुंजनाचा व ‘ फुटकी तपेली ’ ही गोविंदाग्रजांची कविता कृत्रिम गूढगुंजनाचा उत्कृष्ट मासला आहे. परंतु गूढतेचे रमणीय आलोक किंवा आभास निर्माण व्हावयाला रूपकापेक्षां प्रतीकाचा उपयोगच अधिक होतो. रूपकांत क्लिष्टता जास्त, सूचकता थोडी असते. उलट, व्यंजन हा प्रतीकाचा आत्मा असल्यामुळें तदुद्भूत गूढगुंजनांत ध्वन्यर्थांच्या अनेक सूक्ष्मतरल छटा उमटून, कवितेभोंवतीं एक प्रकारचें मदिर वातावरण उत्पन्न होतें. रवींद्रांच्या ‘ गीतांजली’ला जें इतकें लोभनीय सौंदर्य आलें आहे, तें मुख्यतः तिच्यांतील प्रतीकांच्या विविधतेमुळें. अतर्क्य आणि अतींद्रिय अशा विषयांसंबंधीं स्पष्ट न बोलतां लक्षणेनें बोलावयाचें, हा मुळीं मनुष्यस्वभावच आहे. मानवी ज्ञानाच्या इतर कोणत्याहि क्षेत्रापेक्षां आध्यात्मिक वाङ्मयांत जो प्रतीकाचा उपयोग इतक्या प्राचुर्यानें केलेला दृष्टीस पडतो, त्याचेंहि मर्म झालें तरी हेंच होय. धर्म आणि भक्ति हे विषय आधुनिक कवींनीं सामान्यतः वर्ज्य मानल्यामुळें त्यांच्या कृतींत गूढगुंजनाला वाव मिळण्याची शक्यता नव्हती. पाळंदे किंवा कीर्तिकर यांच्यासारखे भक्त कवि अव्वल इंग्रजी अमदानींतहि होऊन गेले, नाहीं असें नाहीं; व महाजनी, कानिटकर, भिडे यांच्यासारख्या पंडित कवींनीं तर केकावलीच्या धर्तीवर ईश्वरस्तुतिपर खंडकाव्येंहि अनेक रचलीं आहेत. पण, आधुनिक कवितेचा आवडता विषय सामान्यत: प्रणय हाच असून, भक्तीचें तिला एकंदरींत वावडें होतें, हेंच खरें. किंबहुना कानिटकरांच्या ‘ संमोहलहरी’पासून तों केशवसुतांच्या ‘ हरपल्या श्रेया’पर्यंतची आधुनिक कविता ही बव्हंशीं अज्ञेयवादीच होती. परंतु, दैवयोग असा विचित्र कीं, केशवसुतांनीं अज्ञेयाला उद्देशून लिहिलेल्या कवितांतूनच आधुनिक काळांतील गूढगुंजन प्रकट झालें; व त्यांच्यामागून ष्टिळक, तांबे, गुप्ते, भालचंद्र, गोविंदाग्रज, सोनाळकर, बालकवि प्रभृति कवींनीं प्रणयपर आणि

भक्तिपर अशी दोन्ही प्रकारची गूढगुंजनात्मक कविता लिहिली. 'गीतांजली'च्या जगभर झालेल्या गौरवामुळें व उमरच्या बौद्धिक बेछूटपणाच्या मोहनामुळें या गुंजनाच्या प्रवृत्तीला जोर चढला असून, गेल्या पंधरा वर्षांत तशा स्वरूपाच्या कवितेची भर मराठींत फार पडली आहे. सुमंत, साधुदास, खापर्डे, कुवलयानंद, विरागी आणि बा. भा. पाठक यांनीं अशा प्रकारची भक्तिपर कविता बरीच लिहिली असून, श्री. रा. बोबडे, गु. ह. देशपांडे, आ. रा. देशपांडे, पु. य. देशपांडे, वा. ना. देशपांडे प्रभृति वैदर्भीय कवींचा तर गूढगुंजन हा एक विशेष म्हणून सांगतां येईल. अलीकडील कवींचा गूढगुंजनाकडे असलेला हा वाढता ओढा लक्षांत घेतला असतां पाऊणशें वर्षांनंतर मराठी कविता पुन्हा आपल्या जुन्या पात्रांतून—आध्यात्मिक विचारांच्या चाकोरींतून जाऊं लागणार, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. या प्रतिक्रांतीचें श्रेय टागोरांच्या 'गीतांजली'इतकेंच गोविंदाग्रजांच्या कल्पनारम्य 'मुरली'लाहि देणें अवश्य आहे. हंसराजांपासून तों दासगणूंपर्यंत गेल्या शंभर वर्षांत अनेक कवींनीं अस्सल जुन्या थाटाची भक्तिपर कविता प्रचंड पैदा करून ठेवली आहे. परंतु, हे कवि नव्या काळांत जन्मलेले असले, तरी मानसिक दृष्टीनें त्यांची गणना सतराव्या शतकांतच केली पाहिजे; व म्हणून त्यांच्या कृतीला आधुनिक कवितेंत आणि जीवनांतहि स्थान नाहीं. पण गोविंदाग्रजप्रभृति या नवीन कवींचें गूढगुंजन म्हणजे अध्यात्मविचारांच्या मध्यंतरीं कांहीं काळ वठलेल्या वृक्षाला पुन्हा फुटलेले नाजूक कोंबच होत.

युरोपांतील महायुद्धानें जरी जगांतील प्राय: कोणत्याच राष्ट्राला दास्यमुक्त केलें नाहीं, तरी परतंत्र आणि दलित राष्ट्रांतील लोकांचें मानसिक दास्य मात्र बव्हंशीं नष्ट केलें. या महायुद्धांतून उद्भूत झालेल्या स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा डिंडिम जगभर वाजूं लागतांच सर्व परतंत्र राष्ट्रांच्या सुप्त स्वातंत्र्याकांक्षा जागृत झाल्या; व तेथील मुत्सद्दी, लेखक आणि कवि यांचीं मनें स्वातंत्र्यप्राप्तीच्या धोरणानें हलूं बोलूं लागलीं. क्षितिजाच्या कडांकडांनीं फांकलेली अरुणाची उष:प्रभा ही ज्याप्रमाणें प्रथम पक्ष्यांना दिसून तिचें स्वागतहि त्यांच्याकडून हर्षनिर्भर होतें, त्याप्रमाणें महायुद्धाच्या काळांत महाराष्ट्रामध्यें उद्भूत झालेल्या या स्वातंत्र्यकांक्षेचेंहि उद्गान प्रथम कवींच्या प्रतिभेकडून झालें. याचा अर्थ असा नव्हे कीं, महायुद्धापूर्वी राष्ट्रीय भावनेची कविता महाराष्ट्रांत निर्माण झाली नव्हती. मोगरे यांचीं बहुतेक वैलापिक आणि इतरहि काव्यें राष्ट्रीय भावनांचीं द्योतक असून, टिळक, केशवसुत, चंद्रशेखर, गुप्ते, गोविंदा-

अज प्रभृतींनींहि आपआपल्या परीनें राष्ट्रीय कविता लिहिली आहे. परंतु या साऱ्या कवितेंत स्वातंत्र्याकांक्षेची तळमळच काय, पण तिचा पुसट असाहि पडसाद कोठें दिसणार नाहीं. उलट यांपैकीं बहुतेकांनीं पर्यायानें पारतंत्र्याचा बडिवार गाइलेला आढळेल. पण त्याबद्दल त्यांना दोष देणें मात्र अर्थातच योग्य होणार नाहीं. जेथें बहुजनसमाज हा परकीय राज्यकर्त्यांना मायबाप समजत होता व पुढारी हे पारतंत्र्याला ईश्वरी वरदान मानीत होते, तेथें कवींनीं ब्रिटॅनियेचा जयजयकार करावा, यांत त्यांचा तरी काय दोष ? पण, या मानसिक गुलामगिरीच्या काळांतहि ज्यांनीं गतवैभवाविषयींचें आपलें तीव्र दुःख आणि हृदयांत धगधगत असलेली स्वातंत्र्य-प्रेमाची दीप्ति धडाडीनें व्यक्त केली, त्यांच्या धाडसी प्रतिभेची धन्य होय. अशा विरळ कवींत केशवसुत, विनायक, गोविंद आणि विशेषतः विनायकराव सावरकर हीं नांवें संस्मरणीय आहेत. केशवसुतांच्या नंतरच्या कवितांतून जरी स्वातंत्र्यासक्तीचा उच्चार जवळ जवळ लुप्तच झालेला असला, तरी एका ‘ भारतीयाचे उद्गार ’ व ‘गांवीं गेलेल्या मित्राची खोली लागलेली पाहून’ या कवितांतून व्यक्त झालेली त्यांची स्वातंत्र्यप्राप्तीविषयींची उत्कंठा मात्र अत्यंत हृदयस्पर्शी आहे. विनायकांच्या कवितेंत स्वातंत्र्याच्या आकांक्षेपेक्षां पारतंत्र्याविषयींचा उद्वेगच अधिक उत्कटतेनें आविर्भूत झालेला दृष्टीस पडतो. गोविंद यांनीं मात्र, स्वराज्य हा शब्द उच्चारणेंहि ज्या काळांत अनर्थावह होतें, त्या काळांत, सावरकर बंधूंपासून स्फूर्ति घेऊन का होईना, स्वातंत्र्याचीं उषःसूक्तें मोठ्या निर्भयपणानें गाइलीं; व त्याचे दुर्धर परिणामहि धैर्यानें सोसले. विनायकराव सावरकर यांची कविता म्हणजे स्वातंत्र्यस्फूर्तीचें निधानच होय. मात्र त्यांच्या या कवितेचे युद्धपूर्व आणि युद्धकालीन असे दोन भाग पडतात. त्यांचीं युद्धपूर्व कवनें ऊर्जस्वल स्वातंत्र्य-स्फूर्तीनें रसरसलेलीं असून, “ रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें ? ” हा मनाला हादरून सोडणारा रोकडा सवाल तिच्या ओळीओळींतून दुमदुमत आहे. महायुद्धांतील घडामोडींनीं त्यांच्या मनःस्थितींत जसें परिवर्तन घडवून आणलें, तशीच राष्ट्रोद्धाराच्या ध्येयाविषयींची त्यांची कल्पनाहि बदलून टाकली. अंदमानाच्या नृशंसक गुहेंत डांबले गेलेले सावरकर हे विशुद्ध स्वातंत्र्याचे उपासक होते. तेथून सुटून आलेल्या स्थानबद्ध सावरकरांनीं आज हिंदु जातीच्या उत्थानाच्या ध्येयावर आपली दृष्टि केंद्रित केली आहे. ‘ गोमांतक ’ आणि ‘ कमला ’ या त्यांच्या दोन प्रदीर्घ काव्यांत त्यांच्या मनोवृत्तींत झालेल्या या फरकाचें स्पष्ट प्रतिबिंब पडलेलें दिसतें.

तथापि, सावरकरांच्या युद्धोत्तर कवितेचें स्वरूप कितीहि बदललेलें असलें, तरी त्या सुमारास जी इतर राष्ट्रीय स्वरूपाची कविता पैदा झाली, तिच्याहून मात्र तें सर्वथैव भिन्न आहे, असें म्हणावयाला हरकत नाहीं. सावरकरांची स्वातंत्र्यस्फूर्ति ही अंशत: महाराष्ट्राच्या इतिहासापासून व अंशतः मॅझिनी प्रभृति क्रांतिकारकांच्या तत्त्वज्ञानापासून घेतलेली होती. उलट, महायुद्धाच्या काळांत जे कवि खड्या सुरांत राष्ट्रीय कवनें गात पुढें सरसावले, त्यांच्या स्फूर्तीचा उगम लोकमान्य टिळक यांच्या स्वराज्याच्या चळवळींत होता. अर्थात् ही कविता तत्कालीन चळवळीचा एका परीनें काव्यमय प्रतिध्वनीच असून, तिच्यांत पूर्ववैभवाची स्मृति, प्रचलित राजकीय कल्पना आणि त्या चळवळीच्या प्रवर्तकाविषयींचा आदर यांच्या छटांची सरमिसळ झालेली आहे. महायुद्धाच्या काळांत उदयास आलेल्या या राष्ट्रीय कवींच्या प्रणालिकेंत आनंदराव टेकाडे यांना जर अग्रपूजेचा मान दिला, तर तें खचित गैर होणार नाहीं. शाहिरी थाटाची जोरकस रचना, काळजाला भिडणारा सुरेल पहाडी आवाज व त्या त्या क्षणाला जनमनांत हेलावत असलेल्या भावना बोलत्या करण्याचें चातुर्य या विशेषांमुळें टेकाडे यांची कविता त्या काळांत अतिशय लोकप्रिय झाली; व स्वराज्याच्या चळवळीच्या उठावाला राजकारणी पुरुषांच्या वक्तृत्वाप्रमाणेंच, निदान मध्यप्रांत-वऱ्हाडांत तरी, त्यांच्या कवित्वाचा उपयोग झाला. टेकाडे यांच्याबरोबरच तिवारी, बेहेरे, निफाडकर, अज्ञातवासी, विरकूड, सरोजसुहृद, यशोद प्रभृति कवींचाहि उल्लेख केला पाहिजे. विशेषतः तिवारी, बेहेरे व निफाडकर यांची कविता मोठी जोरकस असून, त्यांनीं निरनिराळ्या प्रकारची विपुल कविता लिहून वाङ्मयांत भरहि पुष्कळच घातली आहे. ही क्रांति शाहिरी वाङ्मयाच्याहि पुनरुज्जीवनाला प्रोत्साहक झाली. भालचंद्र, गोविंदाग्रज, आनंद, अज्ञातवासी, मनोहर, य. न. केळकर, सोपानदेव चौधरी, ग. ह. पाटील प्रभृति कवींनीं शाहिरी थाटाची संमिश्र कविता बरीच लिहिली आहे. त्याचप्रमाणें, खाडिलकर प्रभृति पदवीधर शाहिरांनीं पोवाडे रचण्याच्या व म्हणण्याच्याहि पद्धतीची पुनर्घटना केली असून, मराठींतील लुप्त होत चाललेला हा जुना सरस काव्यप्रकार पुन्हा लोकप्रिय होणार, असें दिसतें.

महायुद्धानंतरच्या काळांतील अत्यंत महत्त्वाची घटना म्हणजे 'रविकिरण-मंडळा'ची स्थापना. या मंडळांतील गिरीश, माधव जूलियन आणि यशवंत या तीन कवींनीं आपल्या प्रभावी लेखनानें आधुनिक कवितेंत परिवर्तन घडवून आणलें,

असें म्हटलें तर ती खचित अतिशयोक्ति होणार नाहीं. मात्र हें परिवर्तन फक्त बहिरंगापुरतेंच मर्यादित आहे, ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. केशवसुतांच्या काळापासून मराठी कवितेला लागलेलें प्रणयविशिष्ट विकृत वळण या मंडळांतील कवि बदलूं शकले नाहींत; आधुनिक कवींचा जीविताकडे पाहण्याचा संकुचित दृष्टिकोन त्यांना व्यापक करतां आला नाहीं; किंवा आपल्या ध्येयदर्शित्वानें राष्ट्रघटनेच्या कार्याला हातभार लावण्याचीहि क्षमता त्यांनीं प्रकट केली नाहीं. या मंडळांतील तीन कवींपैकीं गिरीशांच्या कवितेवर तांबे, गोविंदाग्रज, बालकवि प्रभृति पूर्वकवींच्या कृतीची छाप पडलेली असून, त्यांच्या व माधव जूलियन यांच्याहि कवितांतून आध्यात्मिक गूढगुंजनाच्या छटा मधून मधून आढळतात. गिरीशांची मनोवृत्ति मृदु, सात्त्विक व दिसावयाला सुधारक पण वस्तुतः जुन्या मतांकडे झुकणारी अशी आहे. ‘अभागी कमल’ आणि ‘आंबराई’ या खंडकाव्यांत त्यांच्या वृत्तीचे हे विशेष स्पष्ट दिसून येतात. या दोन्ही काव्यांत ज्या भावनाप्रधान पद्धतीनें सामाजिक प्रश्नांचा परामर्श घेतलेला आहे, ती पद्धत समंजस वाटत नाहीं. मात्र गिरीशांची रचना इतकी नाजूक असते कीं, तशा प्रकारचें मार्दव अलीकडील इतर कोणत्याहि कवीच्या रचनेंत सांपडणें कठीण जाईल. माधव जूलियन यांच्या लोकप्रियतेला आरंभीं तरी त्यांचा फारशी वृत्तें आणि शब्द यांचा बेसुमार वापर कारण झाला; व बेहेस्तांतील परीसारख्या त्यांच्या कवितांतील फारशी शब्दसमुच्चयावर बेहोष होऊन तत्सदृश नकली वैणिकें लिहिणाऱ्या कवींचें मध्यंतरीं अगदीं पेंव फुटलें होतें. कोल्हटकर प्रभृति नाटककारांनीं जरी फारशी चालींना मराठी पेहराव चढवून त्या रंगभूमीवर रूढ केल्या, व तत्पूर्वीं मोरोपंतांसारख्या जुन्या कवीनेंहि जरी क्वचित् एकाद दुसरा गजल लिहिला असला, तरी इराणी आखातांतील हीं मोत्यें सगळींच्या सगळींच मराठी बाजारपेठेंत मोहक रीतीनें मांडण्याचा मान मात्र माधव जूलियन यांनाच दिला पाहिजे. अलीकडे फारशीच्या बाबतींतील आपल्या अतिरेकाचें अनौचित्य ध्यानांत आल्यामुळेंच बहुधा, त्यांनीं, परिष्करणाच्या निमितानें, जुन्या कवितांतील फारशी शब्द काढून टाकून त्यांच्या जागीं संस्कृत शब्दांची योजना केलेली आढळते. प्रणय आणि पांडित्य हे त्यांच्या कवितेचे विशेष असून, पांडित्यामुळें जशी तिला दुर्गमता तशी प्रणयामुळें मादकता आली आहे. तरुण, स्वप्नाळू मनांत उद्भवणाऱ्या दुर्दम प्रणयाच्या प्रमाथी, अतृप्त भावना त्यांनीं मोठ्या समरसतेनें आपल्या कवितांतून

रेखाटलेल्या आहेत. मात्र त्यांच्या कवितांतून व्यक्त झालेला प्रणयविकार निरामय वाटत नाहीं; व 'स्त्रीप्रेमाविण जन्म नीरस उणा काडीवजा भूवर' या कल्पनेच्या आहारीं जाऊन त्यांत माजविण्यांत आलेलें स्त्री आणि स्त्रीप्रेम यांचें स्तोमहि विकृत वाटतें. 'सुधारक' व त्याहिपेक्षां 'विरहतरंग' या त्यांच्या काव्यांतील वातावरण स्त्रैण असून, त्यांचे नायक केवळ स्वप्नसृष्टींत रमणारे, पौरुषशून्य असे आहेत. तांबे यांच्या नाट्यगीतांतून आणि भावगीतांतून प्रकट झालेल्या प्रणयाच्या विविध छटा जशा अनघ आणि आल्हाददायक वाटतात, त्यांच्या वाचनानें जसें मन केव्हां उदात्ततेनें तर केव्हां माधुर्यानें उचंबळून येतें, तशा प्रकारची अनुभूति माधव ज्यूलियन यांची प्रेमकविता वाचतांना येत नाहीं. मात्र त्यांचें निरीक्षण अतिशय बारीक असून, कल्पकतेचें देणें जरी त्यांना मुळींच नसलें, तरी आपल्या चित्रणाच्या सूक्ष्मतेनें ते प्रणयचित्रांत रंग आणि रस चांगला उत्पन्न करितात. त्यांच्या 'सुधारक' काव्यांतील उपरोध मार्मिक असून, सामाजिक विडंबनाची एक नवीन इष्ट प्रथा त्यांनीं त्या काव्याच्या रूपानें पाडली आहे. फारशी आणि इंग्रजी कवितेंतील वैचित्र्य आणि प्रणयाविष्काराची पद्धति आत्मसात् करून व तिला स्वानुभूतीच्या जिव्हाळ्याची जोड देऊन माधव ज्यूलियन यांनीं आपली कविता निर्माण केलेली असल्याकारणानें, पांडित्यामुळें जरी तिला एक प्रकारची क्लिष्टता आलेली असली, तरीहि ती रम्य आणि हृद्य वाटते; व म्हणूनच तिचें अनुकरण आरंभीं तरी बरेंच झालें. यशवंतांची भूमिका त्यांच्या या दोघाहि सहकारी कवींपेक्षां अगदीं भिन्न आहे. ते उपदेशक नाहींत किंवा पंडितहि नाहींत; तर नुसते कवि, भावकवि ( lyrical poet ) आहेत. ओज आणि कल्पकता हे त्यांच्या प्रतिभेचे विशेष असून, त्यांच्या रचनेंत सौष्ठव तितकें नसलें तरी सहजता मात्र अधिक असते. गोविंदाग्रजांच्या नंतर इतका कल्पक कवि महाराष्ट्रांत दुसरा झालाच नाहीं म्हटलें तरी शोभेल. माधव ज्यूलियन यांच्याप्रमाणें त्यांच्या कवितेंतील वातावरण जरी स्त्रैण नसलें, तरी त्यांच्या भावगीतांतून आणि सुनीतांतून व्यक्त झालेल्या प्रणयभावना मात्र निरामय आणि प्रसन्न वाटत नाहींत. फुलोऱ्यावर हींव पडून तो जसा कोळपून जावा, तशा त्यांच्या कवितेंतील प्रेमाच्या भावना नैराश्यानें काळवंडून गेलेल्या आहेत; व त्यांची प्रतिभा इतकी आत्मनिष्ठ आहे कीं, निराशेचे तेच ते सूर आळवितांना आपल्या हातून मनोदौर्बल्याचें प्रदर्शन होत आहे, याचें भान कांहीं तिला राहत नाहीं. 'बंदिशाळा' आणि 'जयमंगला'

या काव्यांतील त्यांचा प्रदीर्घ रचनेचा प्रयत्न जरी म्हणण्यासारखा यशस्वी झालेला नसला, तरी त्यांच्या विविधरम्य भावगीतांनीं त्यांना मिळवून दिलेलें यश निःसंशय लोकोत्तर आहे. रविकिरणमंडळाला वाङ्मयांत मिळालेलें महत्त्व पाहून महाराष्ट्रां-तील कविवर्गाला कळप करून राहण्याच्या फायद्यांची जाणीव झाली; व गांवगन्ना लहान मोठीं मंडळें स्थापन होऊन ' कविता गवताऐसी उदंड वाढली असे ' असें म्हणण्याचा प्रसंग आज वाचकवर्गावर आला आहे. रविकिरणमंडळाच्या बरोबर व मागाहून उदयाला आलेल्या प्रमुख कवींत मायदेव, निशिगंध, य. न. केळकर, काणेकर, मोरे, काळे, हिंगणेकर, सरंजामे, तळवलकर, पाटील, मनाढकर, किशोर, पद्माकर, या. मु. पाठक, वा. भा. पाठक, पंडित, कुसुमाग्रज, अशोक, कारखानीस, काळेले, कोलते, गोरे, कोरेकल, वकील, कारे, बोरकर, शशांक, देशपांडे, मनोरमाबाई नावलेकर, संजीवनी मराठे, दीक्षित, माधव मनोहर, वढे, शास्त्री प्रभृतींचा उल्लेख केला पाहिजे.

प्रस्तुत लेख हा आधुनिक कवितेचा इतिहास नव्हे, तर तिच्यांतील प्रमुख अंतःप्रवाहांचें समालोचन आहे. या प्रवाहांचा ठाव घेतल्यानंतर मनाला असें वाटतें कीं, गेल्या साठ वर्षांत निर्माण झालेली ही कविता राष्ट्राच्या सुखदुःखांची प्राति-निधिक नसून, बहुजनसमाजाच्या जीवनाशीं तर तिचा यत्किंचितहि संबंध नाहीं. तिच्या भोंवतालचें वातावरण कृत्रिम असून स्त्रैणपणा हें तिचें वैशिष्ट्य आहे. कल्पना करा कीं, उद्यां हिमप्रलय होऊन जर सारें मराठी वाङ्मय त्यांत लुप्त झालें व केशवसुत, गोविंदाग्रज, माधव जूलियन, यशवंत प्रभृति कांहीं प्रमुख अर्वाचीन कवींचीं फक्त भावगीतेंच तेवढीं त्या आपातांतून बचावलीं, तर भावी इतिहास-कारांना या काळांत महाराष्ट्रामध्यें होऊन गेलेल्या स्वदेशीच्या, स्वराज्याच्या किंवा कायदेभंगाच्या प्रक्षोभक चळवळींचा पत्ताहि न लागतां, महा-राष्ट्रांतील सारी जनता ही प्रणयपिपासेनें आसुसत आणि उसासत होती एवढीच महत्त्वाची गोष्ट या भावगीतांवरून कळून येईल. बहुजनसमाज तर राहोच, पण ज्या सुशिक्षित वर्गांतून हे कवि उदयाला आले, त्याच्याहि आकांक्षांचें किंवा उद्योगांचें प्रतिबिंब त्यांच्या कवितेंत पडलेलें नाहीं. जुन्या मराठी संतकवींच्या भक्तिपर काव्यांतून ज्याप्रमाणें तत्कालीन घडामोडींचे उल्लेख परिश्रमपूर्वक धुंडाळून शोधून काढावे लागतात, त्याप्रमाणें या आधुनिक कवींच्या प्रेमपर कवितेंतूनहि, या अभागी देशाच्या उन्नतीसाठीं अनेक लहानथोर व्यक्तींनीं जीं नानाविध साहसें केलीं आणि

संकटें भोगलीं, त्यांचे निर्देश हुडकून काढावे लागतील. गेल्या अर्धशतकांत एवढीं प्रचंड आंदोलनें या कवींच्या डोळ्यांसमोर घडून आलीं, पण तीं जणुं कांहीं आपल्या गांवींहि नाहींत अशा रीतीनें त्यांचें प्रणयप्रलपन चाललें होतें ! दु:खदग्ध विधवा, प्रणयपिपासु तरुणी आणि भग्नहृदय प्रेमिक यांच्या मनोव्यथांपरतें दुसरें सांकडेंच मुळीं महाराष्ट्रांत त्यांना आढळलें नाहीं. आधुनिक कवींच्या या रमण्यांतून, लोकांत शिक्षणाची एवढी लयलूट झालेली असतांना सुद्धां, तमाम जनतेच्या हृदयाला आपल्या प्रभावी वाणीनें हलवून सोडील, असा एकहि महाकवि आज पुढें कां येऊं नये ? याचें कारण हेंच कीं, या कवींची प्रतिभा परप्रत्ययनेय आणि पंगु आहे; त्यांच्या ठिकाणीं स्वसंस्कृतीचें परिज्ञान नाहीं, आत्मप्रत्ययाचें ओज नाहीं, व्यापक सहानुभूति नाहीं व भूतभविष्यांचा मेळ घालून लोकांना आत्मोन्नतीचा नवा मंत्र द्यावयाला अवश्य असलेलें ध्येयदर्शित्व नाहीं. त्यामुळें एका बाजूला पोटासाठीं आणि स्वातंत्र्यासाठीं झगडत असलेला दीन बहुजनसमाज आणि दुसऱ्या बाजूला प्रेमासाठीं आणि प्रसिद्धीसाठीं धडपडत असलेले उल्लू कवि असा विचित्र देखावा आज महाराष्ट्रांत दृष्टीस पडत आहे. चिपळूणकर, आगरकर, टिळक किंवा परांजपे यांच्या लेखांनीं ज्या भावना आणि आकांक्षा महाराष्ट्रांत उद्दीपित केल्या, सुशिक्षितांच्या अंतःकरणांतलीं जीं सुप्त सामर्थ्यें जागृत करून त्यांनीं समाज आणि सत्ताधारी वर्ग यांच्या जुलमाविरुद्ध झुंज द्यावयाला उभीं केलीं, तशा प्रकारचा पराक्रम आधुनिकांतील अगदीं अग्रगण्य मानलेल्याहि कवींच्या वाणीनें कां करून दाखवूं नये ? पण तो पराक्रम करून दाखवावयाला जें अकुतोभय वृत्तीचें पौरुष, जें सहृदयतेनें युक्त असें पांडित्य आणि जी उदात्त ध्येयांचें आकलन करणारी प्रतिभा अवश्य असते, ती या प्रणयपीडित आणि गलितोत्साह कवींजवळ कोठें आहे ? जर्मन महाकवि गटे यानें असें म्हटलें आहे कीं, "आजचें वाङ्मय जें कल्पनारम्य वाटतें, तें नावीन्यपूर्ण असल्यामुळें नव्हे, तर तें दुबळें, रडवें अगर रोगट आहे म्हणून! (The works of the day are romantic not because they are new, but because they are weak, ailing or sickly.)" आधुनिक कवितेच्या नावीन्याचें आणि रम्यतेचें वर्णन करावयाला यापेक्षां समर्पक शब्द दुसरे क्वचितच सांपडतील. डॅनिश टीकाकार जॉर्ज ब्रॅंडिस यानें ब्रिटिश कवींविषयीं असे उद्गार काढले आहेत कीं, इंग्लंडांतील कवि हा प्रथम स्वदेशाभिमानी आणि स्वातंत्र्यवादी व नंतर कवि असतो. उलट महाराष्ट्रांतील आमचे

कवि हे इतके प्रणयलोलुप आहेत कीं, त्यांच्या त्या व्याकुळ जविनांतून स्वदेशाच्या स्मृतीचे क्षण हे वाळूतील सुवर्णकणांप्रमाणें, प्रयत्नपूर्वक शोधूनच काढावे लागतील.

मानसिक वैकल्याच्या आणि विकृतीच्या या तमोयुगांत विनायकराव सावरकर यांची कविता मात्र, पहांटेचें कभिन्न क्षितिज उजळणाऱ्या शुक्राच्या चांदणीप्रमाणें, आपल्या ओजस्वितेनें मनाला उत्साहित करिते. त्यांच्यापूर्वी विनायक आणि गोविंद यांनीं स्वदेशाच्या दैन्याविषयीं हृदयाला पीळ पाडणारी थोडी कविता लिहिली होती; व स्वराज्याच्या चळवळीपासून तर राष्ट्रीय कवनांची पैदास पुष्कळच वाढली आहे. पण, यांपैकीं बहुतेक कवनें हीं प्रतिध्वनीच्या स्वरूपाचीं असल्यामुळें, त्यांच्यांत मौलिक असे टिकाऊ गुण जवळ जवळ नाहींतच म्हटलें तरी चालेल. विनायक आणि गोविंद यांची राष्ट्रीय कविता जरी प्रतिभागुणानें मंडित असली, तरी ती अगदींच त्रुटित आहे; तिच्यांत विशालता किंवा ध्येयदर्शित्व नाहीं. अंधाऱ्या निबिड अटवींतून जात असतां अस्मानांत तळपत असलेल्या सूर्याच्या अस्तित्वाची आठवण करून देणारा एखाद दुसरा उन्हाचा कवडसा मधून मधून दृष्टीस पडावा, तशी स्थिति सध्याच्या प्रणयप्रलपनाच्या हुल्लडींत स्वत्वाची जाणीव जिवंत ठेवणाऱ्या या कवितांची आहे. परंतु सावरकरांची कविता म्हणजे राष्ट्रीय संस्कृति आणि स्फूर्ति यांचें केवळ निधानच होय. प्रतिभा, पांडित्य आणि पौरुष यांचा ऊर्जस्वल संगम त्यांच्या काव्यांत झालेला असून, त्यांची वाणी जरी कदाचित् ओबडधोबड असली, तरी तींत दिल्लीचें तक्त फोडणाऱ्या मराठ्यांच्या भाल्याची चमक आणि भूलोकीं वैकुंठ निर्मिणाऱ्या त्यांच्या भावनांची चारुता एकवटलेली आहे. ‘ गोमंतक ’, ‘ कमला ’, ‘ विरहोच्छ्वास ’, ‘ सप्तर्षि ’, ‘ जगन्नाथाचा रथोत्सव ’ इत्यादि त्यांचीं लहान मोठीं काव्यें कल्पकता आणि ओज यांनीं इतकीं संपन्न आहेत कीं, महाकाव्य रचावयाला अवश्य असलेली विशाल, ध्येयदर्शी आणि अभिजात प्रतिभा त्यांच्या ठिकाणीं वसत आहे, असें म्हणावयाला शंका वाटत नाहीं. किंबहुना, परतंत्र हिंदु राष्ट्राच्या गतकालीन विक्रमवैभवाचे भव्य चित्रपट लोकांच्या डोळ्यांपुढें उभे करून त्यांचा अभिमान आणि स्वातंत्र्याकांक्षा उद्दीपित करण्याचा बुद्धिपुरःसर प्रयत्न जर गेल्या साठ वर्षांत कोणीं केला असेल, तर तो एवढ्याच एका कवीनें ! पण त्यांच्या प्रतिभेची अवस्था आज पंख जळल्यामुळें लोळागोळा होऊन पडलेल्या संपातीसारखी झाली आहे. त्यामुळें महाराष्ट्रांत कवींचें पीक एवढें उमाप आलेलें असतांनासुद्धां त्यानें आरंभिलेल्या स्वातंत्र्यसंगरांत त्याला दिलासा देणारा आपल्या

प्रतिभातेजानें त्याच्या ध्येयसिद्धीचा मार्ग उज्ज्वल करणारा कवि एकहि दिसत नाहीं. मुत्सद्याचें चातुर्य आणि योद्ध्याचा पराक्रम यांच्याइतकीच द्रष्टेपणाचीहि आवश्यकता राष्ट्राच्या उन्नतीला असते; व कवींनीं जर बदलत्या कालानुसार राष्ट्राला नव्या ध्येयाचा मंत्र दिला नाहीं, तर मॅझिनीनें म्हटल्याप्रमाणें, बहुजनसमाज निराशेनें दिङ्मूढ होऊन जातो. महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या बुद्धीची आणि मनाची धांव पावलोंपावलीं कुंठित करणारे सामाजिक आणि राजकीय पाश तोडून टाकणारा व आपल्या प्रतिभाबळानें भूतभविष्यांचा मेळ घालून त्याला अभिनव ध्येयांचा साक्षात्कार घडवून देणारा प्रभावशाली कवि आज हवा आहे. तरच त्याच्या दडपलेल्या आकांक्षांना वाचा फुटून तो दिवसानुदिवस उग्रतर होत चाललेल्या जीवितसंगरांत भाग घ्यावयाला समर्थ होईल. असा स्वातंत्र्याचा उद्गाता आणि दलितांचा उद्धर्ता कवि, अभागी महाराष्ट्रा, तुला केव्हां लाभेल?

नागपूर,
ता. १ जानेवारी १९३५

---

२

# मराठी लघुकथा

[ लेखक—श्री. खंडेराव सावळाराम दौंडकर, एम्.ए., एल्एल्.बी. ]

नदीचें मूळ आणि ऋषींचें कुळ शोधणें कठिण असलें तरी गोष्टीचें खूळ कां पैदा झालें हें सांगणें फारसें कठिण नाहीं. गोष्टी ऐकण्याची इच्छा असल्याबर त्या सांगणारे निघावयाचेच. मागणी-पुरवठ्याच्या या सिद्धान्ताची व्याप्ति अर्थशास्त्रापुरतीच संकुचित नसून तिचा उगम एकंदर मानवी स्वभावाच्या रचनेंतच आहे. शैशवापासून वार्धक्यापर्यंत माणसाच्या आयुष्यांत नाना तऱ्हांनीं गोष्टीची हौस पुरी होत असते. आजीबाईनीं तिखटमीठ लावून गोष्टी सांगावयाच्या आणि नातवंडांनीं कान देऊन त्या ऐकावयाच्या हा क्रम कांहीं आजकालचा अगर एका विशिष्ट देशाचा किंवा लोकांचा नाहीं. सांगणाराच्या कुवतीवर आणि ऐकणाऱ्याच्या संस्कृतीवर पुरातन कालापासून कथनकलेचें स्वरूप अवलंबून राहिलें आहे. त्याचमुळें कथासुंदरीनें होमर-व्हर्जिलसारख्यांच्या इलियड-ओडिसीमधून अगर व्यास-वाल्मीकींच्या महाभारत-रामायणांतून आपलें पद्य स्वरूप; बायबलाच्या जुन्यानव्या करारांतून गद्य स्वरूप; पंचतंत्र, हितोपदेश, इसापनीति वगैरेंतून बोधस्वरूप; सिंहासनबत्तिशी, शुकबहात्तरी वगैरेंतून अद्भुत स्वरूप; ठकसेन राजपुत्राच्या व बिरबल आणि बादशहाच्या गोष्टींतून चतुर-स्वरूप; लावण्या-पोवाडे, छकडे, क्रॉनिकल्स, बॅलड्स वगैरेंतून आपलें रंगेल मर्दानी स्वरूप वेळोवेळीं निरनिराळ्या समाजस्थितीला हरतऱ्हेनें आतांपर्यंत पटवून दिलें आहे.

आपलें वैभव वाढविण्याकरितां, भुताखेतांचा, काऊचिऊचा, शेणामेणाचा, नरनारींचा, सुरासुरांचा, भूस्वर्गांचा—मिळेल त्याचा उपयोग करून घेण्यास तिनें केव्हांहि कसूर केलें नाहीं; म्हणूनच कल्पनेला काय, भावनेला काय, अगर रचनेला काय जें जें गम्य आहे, तें तें सारें कथाप्रांतांत आढळून यावयास हरकत नाहीं.

हजारों वर्षांपूर्वींच्या इजिप्शियन आणि चिनी, व होमरच्या वेळच्या ग्रीक, आणि सीझरच्या काळांतील रोमन, या लोकांपासून आजकालच्या लोकांचें रंजन करणाऱ्या, नाना वस्त्राभरणांनीं नटलेल्या, कथासुंदरीची रम्य गति स्थलकालाची पर्वा न करितां आपल्या देशांतहि उपनिषदांच्या, ब्राह्मणांच्या आणि आरण्यकांच्या वेळेपासून अद्यापपर्यंत अविरत चालूच आहे. ऐतिहासिक घडामोडीमुळें या गतीला वेळोवेळीं निरनिराळीं वळणें मिळत गेल्यानें मधून मधून तिचा वेग कमीअधिक झाला तरी ती कायम मंदावण्याची कधींच भीति नको! पेशवाईसारख्या स्वकीयांच्या कारभारांत ती हातपाय हालवीत होतीच; पण मोंगलाईसारख्या परकीयांच्या अमलांतहि तिला खुराक मिळत गेला; आणि आंग्लाईसारख्या परद्वीपस्थांच्या छायेंत तर ती जोमानें धष्टपुष्ट होऊं लागली हेंच खरें नवल. रामायण, भारत, भागवत, पुराणें, संतचरित्रें यांच्यापासून पेशवाई अखेरपर्यंत मराठी कथेनें धार्मिक आणि पद्यात्मक, व गुलस-नोवर, फसाना अजायब, बहारदानीष वगैरे मुसलमानी ग्रंथांवरून स्त्रीचरित्रात्मक रूप धारण केलें. अव्वल आंग्लाईंत तर नुसत्या इंग्रजीच नव्हे तर फ्रेंच, रशियन, अमेरिकन, जर्मन वगैरे अनेक संपन्न भाषांतून आपणास हवा असलेला मलिदा मिळविण्याची तिनें सारखी खटपट चालविली. मराठी कथेचा जरी असा इतिहास आहे तरी जेथें एकंदर जगांतील लघुकथेला कलात्मक पेहराव चढवून जेमतेम शेंदीडशें वर्षें झालीं तेथें मराठी लघुकथा नुकती कोठें कलेच्या मार्गावर येऊं लागल्यास नवल तें कसलें?

इंग्रजीचा सहवास नसता तर लघुकथा हा स्वतंत्र प्रकार मराठींत आणखी कित्येक दिवस रूढ झाला असता किंवा काय याची वानवाच आहे. मराठींत कथात्मक गद्यरचनेला सुरुवात झाली ती इंग्रजीच्या सहवासानंतरच. उन्हापेक्षां वाळू अधिक तापावी त्याप्रमाणें पूर्वींच्या स्वतंत्र पौराणिक आणि धार्मिक पद्यमय मराठी कथेपेक्षां या वेळची भाषांतरित गद्यकथाच चांगली चटकदार निघाली आहे. सधन घरच्या मुलीच्या गृहप्रवेशाबरोबर हुंडापांडा, डागदागिने सासरीं यावेत तद्वत् संपन्न इंग्रजीच्या मराठींतील शिरकावाबरोबर फ्रेंच ग्रंथकार बर्किन सारख्यांच्या

साहित्यांतून सदाशिव काशीनाथ छत्र्यांचा ' बाळमित्र ' मराठीच्या कडेखांद्यावर खेळूं लागला. छत्र्यांच्या साध्या, सरळ आणि सुबोध ' बाळमित्रा'कडे पाहिल्यावर त्याचा जन्म परदेशांत झाला असेल अशी शंकाहि येणें कठिण! येथील वातावरणांत तर तो अगदीं वस्तुती तऱ्हेनें वागतांना दिसतो. ' बाळमित्रा'प्रमाणेंच परदेशांतून आणलेली ' इसापनीति'हि छत्र्यांनीं इकडल्या हवापाण्याचा नीट विचार करूनच योग्य तऱ्हेनें वाढीस लाविली. लहान मुलांना गोष्टीरूपानें बोध देण्यासाठीं छत्र्यांचीं अपत्यें जन्माला आलीं. रंजकता आणि आटोपशीरपणा या गुणांनीं त्यांनीं साहजिकच वाचकांवर आपली छाप बसविली. छत्र्यांच्या ' बाळमित्रा'च्या कथांतून तत्त्वबोधाची मध्यवर्ती कल्पना आढळते. कल्पनांची गर्दी आणि पात्रांची गुंतागुंत नसल्यानें छत्र्यांचा ' बाळमित्र ' त्यांच्या नंतर झालेल्या बऱ्याच कथालेखकांच्या गोष्टींपेक्षां आधुनिक लघुकथेला जवळचा वाटेल. आणि त्यांच्या ' इसापनीतीं'त तर लघुकथेला आवश्यक असणारी परिणामाची पराकाष्ठा शेवटच्या तात्पर्यांत ठळकपणें मुद्रित केलेली पाहून छत्र्यांच्या लेखनांत लघुकथांचें बीज हुडकणें कठीण नाहीं.

इंग्रजीच्या साहाय्यानें छत्र्यांनीं ' बाळमित्र ' तयार केला खरा, पण त्यापूर्वींच इ. स. १८३१त कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं 'अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी ' इतक्या लोकप्रिय करून दाखविल्या कीं, त्यांच्या मागोमाग चिनी, तुर्की, पर्शियन, जर्मन वगैरे भाषांतीलहि सुरस व चमत्कारिक गोष्टी भराभर बाहेर पडल्या. या सुरस आणि चमत्कारिक गोष्टींप्रमाणेंच पंचतंत्र, हितोपदेश, कोकिळापस्तिशी, लटकचाळिशी, बोधकथा, नीतिकथा वगैरे कथाग्रंथ म्हणजे लहान मोठे कथासंग्रहच होत. या आणि ' अद्भुत ठकबाजी ', ' सवाई विक्रमचरित्र ' असल्या मुसलमानी ग्रंथांच्या धर्तीवरच लिहिलेल्या पुस्तकांनीं मराठी कथालेखनाला मीठमसाला पुरवला तरी तिला खरी गोडी आणण्याचें कार्य हरिभाऊ आपट्यांच्या ' करमणुकी 'नेंच व्हावयाचें होतें. कथा आणि कादंबरी यांना स्पृहणीय स्वरूप प्राप्त करून देण्यांत रशियन वाङ्मयांत गोगॉल यानें जें कार्य केलें तेंच मराठींत हरिभाऊंनीं केलें.

आजच्या लघुकथारचनेची कल्पना हरिभाऊंच्या वेळीं रूढ नसल्यानें त्यांच्या गोष्टी म्हणजे लहान लहान कादंबऱ्याच झाल्या आहेत. अन्तर्बाह्य स्वरूपभिन्नतेपेक्षां स्फुट गोष्ट आणि कादंबरी यांच्यांत फक्त लांबीरुंदीचाच काय तो फरक, अशीच त्या वेळची कल्पना दिसते. हरिभाऊंच्या स्फुट गोष्टींतून पात्रांच्या, वर्णनांच्या, प्रसंगांच्या विविधतेनें कथेची एकरूपता मेलेली, आणि एकमेव भावनेचा विकास

जागजागीं अडलेला आढळतो. डिकन्स, स्कॉट, यांसारख्या तेव्हां लोकप्रिय असलेल्या इंग्रजी लेखकांची हरिभाऊंच्या कादंबरीवजा कथांवर छाप पडलेली आढळली, तरी त्यांच्या ' पुरी हौस फिटली ! ', ' पहिलें भांडण ' वगैरे कथांना मोपासाँ, ऑस्कर वाइल्डसारख्या लेखकांच्या वाचनानें स्फूर्ति मिळाली असणें अशक्य नाहीं. हरिभाऊंच्या प्रसिद्ध झालेल्या वीस बावीस कथांच्या संग्रहांत कादंबरीवजा गोष्टीच विशेष. पण त्यांच्यांतहि ' पहिलें भांडण', ' डिस्पेप्शिया ' सारख्या लघुकथेच्या बाजूस झुकणाऱ्या कांहीं गोष्टी निघतातच. रचनेच्या दृष्टीनें जरी त्या लघुकथेच्या कक्षेंत येऊं शकल्या तरी फिक्का व थोडा फार परिणामघातक शेवट केल्यानें लघुकथा म्हणून त्यांची किंमत कमीच राहणार! भावनेची उत्कटता अगर रचनेची कुशलता, परिणामकारक कथानकाची अगर प्रसंगाची निवड, वगैरे लघुकथेची सामग्री हरिभाऊंच्या गोष्टींतून फारशी दिसत नाहीं. मात्र त्यांच्या कथा सामाजिक स्वरूपाच्या असल्यानें साध्या घरगुती भाषेमुळें व वास्तविक स्वभावचित्रणामुळें ' दुर्गाताईची ओवाळणी ' सारख्या ठिकाणीं अनिष्ट चालीरीतींवर कोरडे ओढतांना त्या चांगल्या परिणामकारक झाल्या आहेत. व्यवहारांत नित्य आढळणाऱ्या साध्यासुध्या विषयांची आणि दुर्गी, वारी, विष्णुपंत वगैरेसारख्या गरीब व मध्यम स्थितींत आपल्या आजूबाजूला वावरणाऱ्या पात्रांची निवड केल्यामुळें हरिभाऊंच्या गोष्टी वास्तविक (realistic) वाटण्यास बिलकूल अडचण पडत नाहीं. शिवाय उत्तम लेखकाला अवश्य असणारा जिव्हाळा त्यांच्या ठिकाणीं भरपूर असल्यामुळें करुणरस रंगविण्यांत ते चांगलेच तरबेज होते, हें ' काळ तर मोठा कठीण आला ' सारख्या त्यांच्या गोष्टीवरून स्पष्ट दिसतें. पण त्यांचा एकंदर दृष्टिकोन (attitude) उपदेशप्रधान असल्यामुळें कलाविलासाला तो बाधक झाला आहे.

हरिभाऊंप्रमाणें समाजसुधारणेचा आणि * उपदेशप्रधान दृष्टिकोन ठेवून कथालेखन करणारे दुसरे खंदे लेखक म्हणजे ' सहकारी कृष्ण ' हे होत. सामाजिक अन्यायांविरुद्ध वाटत असलेला सात्त्विक संताप व्यक्त करण्याकरितां सहकारी कृष्णानीं बहुजनसमाजाला रुचाव्यात व पचाव्यात अशा हेतूनें ' कुटुंबशिक्षणमालें ' तून लिहिलेल्या गोष्टी निबंधवजा निपजणें अपरिहार्य होतें. शिवाय हरिभाऊंच्या वेळची सुधारणेची आवश्यकता सहकारी कृष्णांच्या वेळीं तितक्या उत्कटतेनें भासत नसल्यानें समाजसुधारणेचें ध्येय ठेवून केलेलें त्यांचें कथालेखन, पूर ओसरल्यावर नदींत भोपळे सोडण्यासारखें झालें आहे. गरीब जांवयाचे श्रीमंत सासुरवाडीस

होणारे हाल, अल्पशिक्षणाच्या अर्ध्या हळकुंडानें पिवळ्या झालेल्या तरुणाची मनोरचना, मर्यादित प्राप्तींत अब्रूनें दिवस काढणारे काटकसरी संसारी लोक, हुंड्यापांड्यासाठीं विहिणीचे बाभाडे काढणारी कजाग सासू वगैरेसारख्या सहकारी कृष्णाच्या गोष्टींतून आढळणाऱ्या विषयांचें नाविन्य आणि उत्कटता हीं हरिभाऊंच्या कथाकाळीं विशेष वाटत होतीं. सामाजिक व राजकीय ध्येयाबद्दल त्यांच्या 'संसार कीं नरकवास' वगैरे गोष्टींतून माहिती मिळत नाहीं, असें नव्हे; पण ती सूचक नसल्यानें पुष्कळदां अशी पाल्हाळिक बनते कीं, त्यांच्या गोष्टी कथांऐवजीं व्याख्यानें वाटूं लागतात. या व्याख्यानबाजीमुळें त्यांच्या कथेंतील पात्रें चालतीं बोलतीं माणसें न वाटतां लेखकाचे विचार अडकविण्याकरितां बसवलेल्या खुंट्यांप्रमाणें तीं भासतात. जी गोष्ट संवादांची, तीच वर्णनांची. लघुकथेला मारक असलेला पाल्हाळ आणि अनावश्यक बारीकसारीक वस्तुनिर्देश यांमुळें कुटुंबशिक्षणमालेंतील गोष्टी कलेच्या दृष्टीनें हिणकस उतरल्या आहेत.

येन केन प्रकारेण कथेचा शेवट सुखान्त करण्याचा व दुष्ट माणसांचें भल्याबुऱ्या योजनेनें सुष्ट माणसांत रूपांतर करण्याचा हरिभाऊंच्या वेळेपासून सुरू झालेला गोष्टींचा कारखाना का. र. मित्रांच्या 'मनोरंजना'च्या वेळीं फारच भरभराटीला आला. दुष्ट चालीरीती आणि अनिष्ट रूढी यांच्या विरुद्ध हरिभाऊंनीं आपल्या 'करमणुकीं'तून शस्त्र उपसलें होतें; तर 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः।' या मन्त्राधारें महाराष्ट्रांत घरोघर देवता दिसाव्या म्हणून का. र. मित्रांनीं आपल्या मनोरंजनांतून स्त्रियांचा उदो उदो करण्यास सुरुवात केली. स्त्रीदाक्षिण्याच्या ध्येयाप्रमाणें आपल्या मासिकाचें अन्तरंगहि नाजूक करण्यासाठीं वंगसाहित्याची उसनवारी करण्यास मित्र विसरले नाहींत. प्रभातकुमार मुकर्जी, मुनशी प्रेमचंद, चारुचंद्र बानर्जी, रविंद्रनाथ टागोर, स्वर्णकुमारी देवी वगैरे बंग लेखक-लेखिकांच्या कृतींना वि. सी. गुर्जर, वा. गो. आपटे, ह. बा. अत्रे, द. मा. कुलकर्णी, ना. कृ. आगाशे, इत्यादि कथालेखकांनीं बेमालुम मराठी पेहराव चढविला. ढवळ्या बंगालीच्या उपसर्गानें कल्पनारम्यत्वाचा वाण आणि काव्यमय वातावरणाचा गुण पोवळ्या मराठीला लागला तर नवल नाहीं!

शेंकड्यांनीं मोजतां येण्याजोग्या परप्रांतीय कथांचीं भाषांतरें करणें कांहीं सोपें काम नाहीं. पण तेंहि अवघड काम वि. सी. गुर्जरांसारख्या 'मनोरंजना'च्या खंद्या लेखकानें करून दाखविलें. नर्म विनोद, साधी भाषा, सुशिक्षित समाजांतील

स्त्रीपुरुषांचें स्वाभाविक चित्रण आणि घरगुती वातावरण वगैरे गुणांनीं त्यांच्या कथा बऱ्याच लोकप्रिय झाल्या असल्या तरी कथेला पोषक नसणाऱ्या सुंदर सामग्रीवर बहिष्कार टाकण्याचा मोह गुर्जरांना न आवरल्यामुळें कथासूत्राच्या आणि स्वभावदर्शनाच्या एकरूपतेला त्यांच्या गोष्टींतून नेहमींच इतका बाध येतो कीं गुर्जरांनीं कितीहि लहान गोष्ट लिहावयाची म्हटलें तरी ती आधुनिक लघु-कथेच्या चौकटींत बसणें कठिण! कथानकाला आवश्यक असणारा विरोध, अगर विस्मय ( surprise ) त्यांच्या गोष्टींत प्रकर्षानें दिसत नसल्यानें आणि कोठें थोडासा गैरसमज अगर गोड कपट किंवा सुटसुटीत रहस्य यांच्यावर कथा-नकाची उभारणी केल्यानें उत्कृष्ट कथांच्या पंक्तीला गुर्जरांच्या गोष्टी बसूं शकल्या नाहींत, तरी लहानशाच गोष्टी आपल्या विशिष्ट शैलीनें मनोरंजक करण्यांत श्री. गुर्जरांचा हातखंडा आहे. बंगाली साहित्याच्या जीवावर मराठी कथेला समृद्ध करणारांत वि. सी. गुर्जरांना अग्रेसरत्व दिलें तर इंग्रजी भाषेच्या बळावर रूपांतरित मराठी कथेला लोकप्रियता आणि दर्जा प्राप्त करून देणारांत कृ. के. गोखले यांचा मान फार वरचा आहे. त्यांचीं रूपांतरें इतकीं सरस उतरलीं कीं त्यांच्या गोष्टींपैकीं स्वतंत्र किती आणि भाषांतरित किती हें सांगणें कठिण आहे. सुंदर रूपांतराप्रमाणें निव्वळ सुशिक्षित, गरीब व मध्यम वर्गांतील पांढरपेशा वर्गांत गुरफटलेल्या मराठी कथेस सरदारदरकदार, राजेरजवाडे, जहागीरदार, इनामदार वगैरेंच्या सुखदुःखांची ओळख करून देणें हें एक त्यांच्या कथालेख-नाचें वैशिष्ट्य आहे. पण पाश्चात्यांच्या अनुकरणाचा गोखल्यांच्या लिखाणावर एवढा परिणाम झाला कीं, आपल्याकडे अपरिचित असलेल्या चालीरीतींचा त्यांच्या गोष्टींतून सहजगत्या आलेला उल्लेख अस्वाभाविक आणि कृत्रिम वाटल्याखेरीज राहत नाहीं. कथानकाच्या मनोरंजकतेवर समकालीन कथालेखकांप्रमाणें त्यांनींहि भर दिला होता तरी अमुक एक तत्त्वबोध गोष्टींत बिंबविण्याचा त्यांचा अट्टाहास नसल्यानें त्यांच्या वेळीं प्रचलित असलेली कथेची उपदेशप्रियता गोखल्यांच्या गोष्टींत तितकीशी आढळत नाहीं. लहानशा प्रसंगावर साध्या सुबोध भाषेंत गुंफलेल्या गोखल्यांच्या गोष्टी, विस्ताराचा आटोपशीरपणा आणि कथानकाचा एक-सूत्रीपणा यांच्या अभावीं आधुनिक लघुकथा म्हणतां आल्या नाहींत तरी सम-कालीन लेखकांच्या गोष्टींप्रमाणें त्या कादंबरीवजाहि नाहींत. त्यांतल्यात्यांत 'मैनाबाईचा राघू', 'मंतरलेलें पाणी' वगैरे गोष्टी म्हणजे गोखल्यांच्या लेखन-चातुर्याचे सुंदर नमुनेच होत.

हरिभाऊंच्या ' करमणुकी ' नें सुरू झालेली अर्वाचीन मराठी कथा का. र. मित्रांच्या ' मनोरंजना 'नें जोमांत आणली. ' करमणूक ' आणि ' मनोरंजन ' या दोन्ही वेळच्या कथांतून ' सामाजिक सुधारणा ', हा कथालेखनाचा मुख्य हेतु उघडउघड दिसून येतो. आकर्षक व गुंतागुंतीचें कथानक, स्वभावचित्रणाकडे दुर्लक्ष, प्रसंग आणि पात्रें यांचा विस्तार, समाजसुधारणेचा आणि तिजकरितां तत्त्वबोधाचा अट्टाहास, स्त्रीदाक्षिण्याचें वाढलेलें फाजील स्तोम, अद्भुतता आणि कल्पनारम्यता यांचा मनमुराद उपयोग, वास्तवतेकडे जाणूनबुजून फिरविलेली पाठ, आणि येन केन प्रकारेण सुखान्त गोष्टी लिहिण्याची धडपड, ही 'मनोरंजना'नें पाडलेली प्रथा पुष्कळ दिवस मराठी कथाप्रांतांत जीव धरून होती. गुर्जर-गोखल्यांनंतर या प्रथेचा पुरस्कार करणारांत ना. ह. आपटे, 'सरस्वतीकुमार', वाग्भट नारायण देशपांडे इत्यादिकांचा प्रामुख्यानें उल्लेख करतां येईल.

आपल्या कादंबऱ्यांतून ना. ह. आपट्यांचा ओढा उपदेशामृत पाजण्याकडे दिसत असला तरी कथांतून कलेचा बोज राखण्याकडे त्यांची प्रवृत्ति बरीच दिसून येते. पाण्यांत राहून माशाशीं वैर करणें बरें नसल्यामुळेंच कीं काय ' मनोरंजन ' काळीं बोकाळलेला, चांगल्याचें फळ चांगलें आणि वाईटाचें वाईट, हा तत्त्वसिद्धांत त्यांच्या कथांतून बेसुमारपणें वावरतांना आढळतो. परिणामकारी लघुकथा लिहावयास अवश्य असणारी विचारप्रवर्तकता, अथवा भावनोत्कटता यांच्या अभावामुळें आपट्यांच्या कथा संस्मरणीय झाल्या नाहींत, तरीपण ' सुमति ', ' नांव नसलेली गोष्ट ', ' चपला वन्संची दंडनीति ' वगैरे अलीकडील गोष्टींत कथालेखन ही एक कला आहे, याची जाणीव ठेवून त्यांनीं लेखन केलेलें दिसतें. परंतु ती जाणीव 'सरस्वतीकुमारां'ना अद्यापहि झालेली दिसत नाहीं. रहस्यावर आधारलेलीं कथानकें, सामाजिक अन्यायांवर उठविलेली झोड, अनुप्रासमय कल्पनाप्रचुर गडकरी धाटणीच्या भाषेची आवड, वगैरे गुणविशेष ' सिंहस्थ ', ' स्वार्थसंन्यास ', ' हरपली पाच ', ' ताजमहाल ' वगैरे त्यांच्या कथांत केव्हांहि आढळणें कठिण नाहीं. उपहासाचें अस्त्रहि त्यांना चांगलें हातीं धरतां येतें, हें त्यांनीं ' ब्रह्मविद्येचा अभ्यास ' वगैरे गोष्टींतून दाखवून दिलें आहे. निरनिराळ्या मनोविकारांचें दिग्दर्शन करणारीं पात्रें निर्माण करण्यांत 'सरस्वती-कुमारां'नीं चांगलें यश मिळविलें आहे. पात्रांच्या स्वभावांची प्रस्तावना करण्याची त्यांची पद्धत आणि ' हरपली पाच ', ' भाऊबीज ' वगैरे कथांतून दैवाचा निर्घृण खेळ दाखविण्याचें कौशल्य हीं वाखाणण्याजोगीं आहेत.

परंतु संयमाच्या अभावीं त्यांच्या गोष्टींना लघुकथा म्हणतां यावयाचें नाहीं. 'सरस्वतीकुमारां'चें रचनाकौशल्य अंगीं नसल्यानें वाग्भट देशपांड्यांच्या कथा परिणामकारक वठल्या नाहींत. त्यांचीं 'सुखस्वप्नें' मथळ्याच्या दृष्टीनें समर्थनीय ठरतात, म्हणूनच अस्वाभाविक आणि ओढूनताणून लिहिलेलीं दिसतात. अवास्तवता आणि अतिशयोक्ति यांच्या अजीर्णानें पोट फुगून देशपांड्यांना पडलेलीं 'स्वप्नें' सत्यसृष्टींत भेसूर आणि विकृत भासल्यास नवल नाहीं. 'स्वप्नां'प्रमाणें त्यांच्या 'दीपावली' खालीं सत्यदर्शनाच्या अगर वास्तवतेच्या बाबतींत सर्वत्र अंधारच दिसतो. 'सहकारी कृष्णां'प्रमाणें व्याख्यानबाजी आणि रोगट ध्येयनिष्ठा यांना बिलगल्यामुळें कधीं कधीं नाट्यसुलभ प्रसंग योजूनहि देशपांड्यांना एकहि आधुनिक धर्तीची लघुकथा लिहितां आली नाहीं.

दोस्तावस्कीमागून तत्त्वबोधाकरितां लांबलचक गोष्टी लिहिणाऱ्या रशियन कथालेखकांप्रमाणें हरिभाऊंनंतर समाजसुधारणेसाठीं अगर तत्त्वबोधासाठीं कथालेखन करणारेच पुष्कळ लेखक निघाले. त्यांत शेवटीं येणारे म्हणजे प्र. श्री. कोल्हटकर व का. के. जोशी होत. कोल्हटकरांच्या गोष्टींची रचना लघुकादंबरीसारखी नाहीं किंवा आधुनिक लघुकथेप्रमाणेंहि नाहीं. पण रंजकता, जिव्हाळा वगैरे गुणांमुळें 'निष्प्रेम आयुष्य', 'कैद्याचीं मुलें' या त्यांच्या गोष्टी वाचनीय वाटतील. 'मनोरंजन' काळच्या, चांगल्याचें फळ चांगलें मिळविण्याची आशा करणाऱ्या, लेखकांच्या पंक्तींत बसणारे का. के. जोशी हे लेखक होत. त्यांच्याहि गोष्टी 'सरस्वतीकुमारां'च्या गोष्टींप्रमाणें मनोवेधक, गुंतागुंतीच्या अशा असतात. पण अन्यायांबद्दल त्यांना येत असलेली चीड पुष्कळदां कलाविघातक होते हें त्यांच्या 'मोत्यांचा चारा खाणारे हंस'सारख्या अलीकडील गोष्टींवरूनहि उघड दिसतें. पण अनुरूप पात्रें, व सुंदर भाषाशैली वगैरे गुणांमुळें त्यांच्याहि गोष्टी वाचनीय ठरल्या आहेत.

लेखकांप्रमाणें लेखिकांनींहि मराठी कथेच्या वाढीस पहिल्यापासून मदत केली आहे. नीति आणि धर्म यांचीं तत्त्वें वाचकांच्या मनावर बिंबविण्याच्या हेतूनें काशीताई कानिटकरांनीं केलेलें कथालेखन त्या काळाला साजेसेंच आहे. त्यांच्या गोष्टींवर जुन्या कहाण्यांची त्यामुळें छाप पडणें स्वाभाविक होतें. देवावर विश्वास आणि दैवावर हवाला ठेवून लिहिलेल्या त्यांच्या कथांतील पात्रांच्या ठराविक सांच्यामुळें आणि रचनेच्या अज्ञानामुळें त्यांच्या 'शिळोप्याच्या गोष्टी' आणि

' चांदण्यांतील गप्पा ' यांना लघुकथा म्हणतां यावयाचें नाहीं. त्यांची कथनपद्धत, एकत्र जमलेल्या मंडळींतून एकामागून दुसऱ्यानें गोष्ट सांगण्याच्या चॉसरच्या पद्धती-सारखी आहे. काशीताई कानिटकरांनंतर हरिभाऊ आपट्यांच्या वळणावर कथा-लेखन करणाऱ्या लेखिका म्हणजे सौ. गिरिजाबाई केळकर, सौ. आनंदीबाई शिर्के वगैरे होत. पाश्चात्य सुधारणेचे आपल्या समाजावर घडलेले दुष्परिणाम दाखविण्या-साठीं सौ. गिरिजाबाई केळकरांनीं ' समाज-चित्रें ', ' केवळ विश्रांतीसाठीं ' असे कथासंग्रह प्रसिद्ध केले. ठराविक सांच्याचीं पात्रें, कलाशून्य तत्त्वबोधाची हौस, रचनेचा अभाव इत्यादि दोषांमुळें आधुनिक लघुकथेच्या कसोटीला त्यांच्या रसहानि-कारक गोष्टी उतरणें कठिण ! पण सोपी, सुटसुटीत, घरगुती भाषा लिहून ' प्रेमाचें रूपांतर 'सारख्या मनोरंजक गोष्टी लिहिण्यांत त्यांनीं आपलें कौशल्य दाखवून दिलेंच आहे. सौ. गिरिजाबाई केळकरांप्रमाणें जणूं नैतिक पाठ देण्यासाठीं सौ. आनंदीबाई शिर्के यांनीं कथालेखन केलेलें दिसतें. त्यांचें कौशल्य ' बेगम दिलआरा 'सारखीं चटकदार रहस्यमय कथानकें लिहिण्यांत चांगलें प्रत्ययास आलें आहे. पण आकस्मिक, अस्वाभाविक प्रसंगांवर भिस्त ठेवल्यामुळें आणि निबंधां-ऐवजीं कथाप्रकाराची त्यांनीं निवड केल्यामुळें त्यांच्या गोष्टींची किंमत आधुनिक लघुकथेची कसोटी लावून करणें चुकीचें होईल.

लेखिकांनीं सुद्धां मराठी कथेला पहिल्यापासून हातभार लावल्यावर वाङ्मयाच्या इतर शाखांत प्रभुत्व मिळविलेल्या सव्यसाची साहित्यसेवकांनीं मराठी कथेची आपापल्या कुवतीप्रमाणें पूजा बांधल्यास नवल नाहीं. अशा साहित्यभक्तांत शिवरामपंत परांजपे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, न. चिं. केळकर, वा. म. जोशी वगैरेंची पूजा विशेष महत्त्वाची झाली. तत्कालीन इतर लेखकांप्रमाणें शि. म. परांजप्यांनींहि धार्मिक, सामाजिक दोषदर्शनासाठीं कथेचें शस्त्र हातीं घेतलें, पण त्यांचें खरें वैशिष्ट राजकीय सुधारणेसाठीं लिहिलेल्या गोष्टींतूनच प्रगट झालें. स्वाभिमानाची आवड, स्वातंत्र्याची तळमळ, फंदफितुरीबद्दल त्वेष, पारतंत्र्याची लाज, वगैरे विषय उपहास, वक्रोक्ति, उपरोध, व्याजोक्ति इत्यादींच्या साहाय्यानें त्यांनीं आपल्या गोष्टींतून वर्णिले आहेत. कधीं कधीं एखादा नैतिक अगर तात्त्विक मुद्दा पटविण्यासाठीं दूरच्या अज्ञात देशाच्या पार्श्वभूमीवर G. F. Marmontel नें Lydia सारख्या गोष्टींतून रेखाटलेल्या चित्रांप्रमाणें राजकीय मूर्खपणाची टर उडविण्यासाठीं त्यांनीं स्वर्गासारख्या अदृष्ट प्रांताचा ' प्रार्थना ' वगैरे गोष्टींतून

परिणामकारक रीतीनें उपयोग केलेला आढळतो. दांडगी कल्पनाशक्ति व विपुल भाषावैभव यांच्या बळावर निसर्गांत आढळणाऱ्या नाना दृश्यांमध्यें आपल्या आशा-आकांक्षांचें त्यांना प्रतिबिंब सहज दिसूं शके. निव्वळ आकर्षक कथानकापेक्षां एखादाच प्रसंग निवडून त्याच्याभोंवतीं कल्पनेचा विलास करणाऱ्या शिवरामपंतांच्या पद्धतीमुळें एका दृष्टीनें त्यांच्या गोष्टींना लघुकथा म्हणावयास हरकत नाहीं. 'आम्रवृक्ष', 'एका यात्रेकरूचा प्रवास', '१६२७ पूर्वी ५ वर्षें', 'एक कारखाना' वगैरे त्यांच्या कथांतून हेंच दिसून येतें. शिवाय लघुकथेला पोषक असणारे रसैक्यता आणि सूचकता हे दोन्ही गुण परांजप्यांच्या गोष्टींत भरपूर आहेत. पण त्यांच्या प्रभावी वर्णनशैलीमुळें त्यांच्या गोष्टींना लघुकथा म्हणण्यापेक्षां सजीव शब्दचित्रेंच म्हणणें अधिक योग्य होईल. Memnon सारख्या जालीम उपहासकथा लिहिणाऱ्या व्हॉल्टेअरची त्यांच्या शिवाय दुसरा मराठी लेखक बरोबरी करूं शकेलसें वाटत नाहीं. पण एका बाबतींत मात्र परांजप्यांच्या गोष्टी सदोष दिसतात. ध्येयप्रधान दृष्टीनें लिहिलेल्या कथांत स्वाभाविक असणारा पात्रांच्या विविधतेचा अभाव त्यांच्या गोष्टींतून प्रकर्षानें आढळत असल्यानें त्यांचीं पात्रें जिवंत, हालतींबोलतीं माणसें न वाटतां कृत्रिम, कळसूत्री बाहुलीं दिसतात. शिवरामपंतांच्या गोष्टींत असा एखादा दोष दाखवितां येईल, पण साहित्यसम्राट् श्री. कृ. कोल्हटकरांच्या गोष्टींत लघुकथेला मारक असे अस्वाभाविकता, स्वभावपरिपोषाचा अभाव, कल्पनाविलासाची अगर अलंकारांची हौस वगैरे पुष्कळ दोष आढळतात. 'गाणारें यंत्र' यांत अद्भुतरम्य कल्पनेला न साजणारें वातावरण, 'संपादिका' यांत कृत्रिम व अतिरिक्त स्वभावपरिपोष, 'गरीब बिचारें पाडस' यांत प्रसंगांची विविधता, वगैरे दोषांमुळें त्या त्या गोष्टींना लघुकथा म्हणणें कठिण आहे; पण वर्डस्वर्थबद्दल जेफ्रेनें म्हटल्याप्रमाणें "The case of Mr. Wordsworth......is now manifestly hopeless" असें कोल्हटकरांबद्दल मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. अखेरी अखेरीस लिहिलेल्या 'बबीची तयारी' सारख्या त्यांच्या गोष्टींतून वात्सल्य, भावनोत्कटता, संयम व रसैक्यता वगैरे लघुकथेला अवश्य असणाऱ्या गुणांचा त्यांनीं सुंदर तऱ्हेनें परिपोष केलेला दिसून येतो. कोल्हटकरांच्या मानानें केळकरांच्या गोष्टी एकंदरींत सरस आहेत. स्वाभाविक संभाषणें, वास्तविक प्रसंग, जिवंत पात्रें आणि 'माझी गाडी कशी चुकली', 'कपड्यांची अदलाबदल' वगैरे कथांतून प्रसंगनिष्ठ विनोद, व 'सामाजिक चालीरीतींचा फरक', 'शृगालसंमेलन' वगैरे कथांतून

कल्पनाविलास दाखवून कथालेखकांतील आपलें स्थान त्यांनीं कायम केलें आहे. संयम राखण्याची कला त्यांना साधली म्हणजे सुंदर लघुकथा लिहिण्याचें त्यांना सहज श्रेय मिळेल ! केळकरांप्रमाणें वा. म. जोशांनाहि कथालेखनांत संयमाचें वावडें असल्यानें त्यांच्याहि गोष्टी जुन्या वळणाच्या शिथिल रचनेवर गेल्या आहेत. तरीसुद्धां रसैक्यता व मध्यवर्ती कल्पनेला पोषक वातावरण निर्माण करण्याची कसोटी हीं लावल्यास त्यांच्या आश्रमहरिणीस लघुकथा म्हणतां येईल. वामनरावजींचें वैशिष्टय म्हणजे महाराष्ट्राबाहेरील समाजांकडे, पात्रांच्या स्वाभाविक चित्रणाकडे आणि अनुकूल संवादांकडे लक्ष पुरविणें हें होय. पण जुन्या तऱ्हेच्या विस्तारानें आणि विनोदी तऱ्हेनें गोष्टी लिहिणारे लेखक म्हणजे चिं. वि. जोशी होत. शाब्दिक कोट्यांवर अगर निव्वळ श्लेषांवर त्यांच्या विनोदाची भिस्त नसल्यानें चिंतामणराव जोशांच्या गोष्टींतून स्वभावचित्रांचें विनोदी दर्शन सुंदर तऱ्हेनें घडत असतें. प्रसंगनिष्ठ विनोद निर्माण करण्यांत चिंतामणरावांचा मोठा हातखंडा आहे. 'त्यानें लग्न कां केलें नाहीं ?', 'पहारा', 'माझे दत्तक वडील' वगैरे त्यांच्या गोष्टी चांगल्या उतरल्या असल्या तरी रचनेकडे ते करीत असलेल्या दुर्लक्षामुळें त्यांच्या गोष्टी विनोदी लेख भासूं लागतात.

कथालेखकांच्या पहिल्या पिढींत पडलेला हा रचनेचा दुष्काळ प्रो. फडक्यांच्या गोष्टींपासून थोडथोडा नाहींसा होऊं लागला. पण हा फरक खुद्द फडक्यांच्या बाबतींतहि कालांतरानेंच घडून आला. आरंभींच्या त्यांच्या गोष्टी जुन्या वळणावरच गेलेल्या आहेत. कोषांतून क्रमाक्रमानें फुलपांखरू निघावें त्याप्रमाणें त्यांच्या गोष्टींतून रचनेची प्रगति हळूहळू प्रगट होऊं लागली. सूक्ष्म निरीक्षण, ओघवती भाषा, मध्यवर्ती प्रसंग अगर पात्र यांजवर ठेवलेली निश्चल नजर, बांधेसूद मांडणी इत्यादि गुणांमुळें त्यांच्या अलीकडील कथा उठावदार झाल्या आहेत. आणि 'तुरुंगांतून सुटका', 'न्याय', 'दोन गोष्टींची गोष्ट' वगैरे कथांतून लघुकथेला अवश्य असणारी सूचकताहि स्पष्ट दिसत असल्यामुळें कलावंत म्हणून फडक्यांना मान मिळणें अवश्य आहे. पण पात्रांशीं असलेला त्यांचा परकेपणाचा संबंध व निव्वळ मुंबईपुण्याकडल्या सुशिक्षित लोकांच्या सुखाचेंच तेवढें ते करीत असलेलें चित्रण, तसेंच सामाजिक अगर मानसिक गुंतागुंतीच्या विशिष्ट दृष्टिकोनाचा त्यांच्या लेखनांत आढळणारा अभाव, पात्रांचा आणि प्रसंगांचा दिसणारा ठराविक सांचा, कित्येकदां गोष्टींना मिळालेलें निबंधाचें पांघरूण, आणि थिऑफिल् गॉटिअरप्रमाणें कांहीं ठिकाणीं येणारा उन्मादकतेचा वास इत्यादि दोषांमुळें फडक्यांची कला

भरीव आणि टिकाऊ होऊं शकली नाहीं. मात्र भाषेच्या लालित्यांत आणि रचनेच्या सुभगतेंत इतर रशियन कथालेखकांना मागें टाकणाऱ्या टर्जिनेव्हप्रमाणें लालित्यपूर्ण भाषाशैलीनें आणि सुभग रचनाकौशल्यानें फडक्यांनीं आपल्या समकालीन कथालेखकांपुढें आघाडी मारली म्हटल्यास वावगें नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हरिभाऊ आपट्यांच्या वेळीं सुरु झालेल्या स्फुट गोष्टींचा आणि सौ. क्षमाबाई रावांनीं रूढ केलेल्या आधुनिक लघुकथेचा प्रो. फडक्यांनीं दुवा जोडला असें म्हणावयास हरकत नाहीं.

प्रो. फडक्यांपेक्षांहि पुढें पुढें कलेचा झपाट्यानें विकास करणारे पण रसात्मकतेला बाध आणणाऱ्या उपमा, कोट्या, श्लेष, उत्प्रेक्षा इत्यादींचा अतिरेक करणाऱ्या कल्पनाप्रचुर कोल्हटकरी संप्रदायानें कथालेखनाला सुरुवात करणारे लेखक म्हणजे शिरोड्याचे वि. स. खांडेकर हे होत. त्यांच्या 'नवमल्लिका', 'दत्तक व इतर गोष्टी', 'ऊन पाऊस' वगैरे संग्रहांतील बऱ्याच गोष्टींत जुन्या वळणाचा पाल्हाळ, अतिरंजनाची हौस आणि रचनेची शिथिलता हीं स्पष्ट दिसून आलीं तरी पहिल्यापासून ध्येयात्मकता व जिव्हाळा यांच्यावर त्यांनीं विशेष नजर ठेवलेली आढळून येते. खेड्यांतील शाळेंत मास्तरकी करून बल्गेरिअन शेतकरी व गांवढे लोक यांच्याबद्दल आस्थेनें कथा लिहिणाऱ्या Dimitr Ivanov या कथालेखकाशीं दलितवर्गावर होणाऱ्या अन्यायानें कळवळून आत्मीयतेनें लघुकथालेखन करणाऱ्या खांडेकरांची तुलना होण्यासारखी आहे. पण कथा, कादंबऱ्या, निबंध, चरित्र वगैरे सर्व बाजूंनीं बाहेर पडणारें त्यांचें लेखन पाहिलें म्हणजे चौफेर लिखाण करणाऱ्या Svatopluk Cech या झेकोस्लोव्हेकियन साहित्यिकाची आठवण झाल्याबांचून राहत नाहीं. धंदा अगर लेखनाचा वेग या दृष्टींनीं वरील कथा-लेखकांशीं खांडेकरांची तुलना करतां आली तरी त्यांच्या लघुकथांचा विचार करतांना बाल्झॅक आणि मोपासाँ हे कथालेखकच प्रामुख्यानें नजरेसमोर येतात. आपल्या Human Comedy मध्यें पहिल्या दर्जाच्या कथांचा संग्रह करून बाल्झॅकनें फ्रेंच लघुकथेला ज्याप्रमाणें जुन्यापुराण्या बंधनांतून मुक्त केलें, त्याप्रमाणें 'जीवन-कले'नंतर कलापूर्ण कथालेखनाकडे लक्ष पुरवून मराठी लघुकथेला उच्च दर्जा प्राप्त करून देण्याचा खांडेकरांनीं प्रयत्न चालविला आहे. प्रत्येक गोष्टींत रचनेचा नवा नमुना निर्माण करणाऱ्या मोपासाँची मराठींत खांडेकरांशिवाय दुसरा लघुकथालेखक बरोबरी करूं शकणें कठिण! टांचेवर धांवून पळण्याच्या ऑलिम्पिक शर्यतींत जगाचा रेकार्ड

मोडणाऱ्या नूर्मीप्रमाणें ध्येयनिष्ठ दृष्टि आणि अभ्यस्त रचना या दोन पायांवर धांवणाऱ्या खांडेकरांच्या लघुकथेला मागें टाकणारी कथा लिहिणारे जातिवंत कलावंत मराठींत फारसे दिसत नाहींत. आपल्या पहिल्या गोष्टींतून आढळणारे कोटीबाज संवाद, अप्रस्तुत प्रसंग, कृत्रिम स्वभावपरिपोष, अलंकारिक भाषा इत्यादि दोष खांडेकरांनीं इतक्या सफाईनें आणि कसोशीनें सुधारण्याची तयारी केली आणि लघुकथेच्या मूलभूत तंत्राचा त्यांनीं असा बारकाईनें अभ्यास केला कीं, एका पानाप्रमाणें पंधरावीस पानांतूनहि ते सारख्याच प्रभुत्वानें लघुकथा लिहूं शकतात. निव्वळ लांबीरुंदीवर लघुकथेची मोजदाद करणाऱ्या टीकाकारांना खांडे-करांची 'पतंग' ही लांबलचक गोष्ट लघुकथा कां म्हणावयाची हें इटालियन लघुकथालेखिका Matilde Serao हिच्या Lulu's Triumph सारख्या लांबलचक लघुकथा वाचल्यावरच कळेल. पण नुसत्या तंत्रज्ञानामुळेंच मात्र खांडेकरांची योग्यता मोठी होत नाहीं. शिमोझाकी टोसोन या जपानी लघुकथालेखकाप्रमाणें जीवन आणि निसर्ग या दोहोंशीं समरस होण्यांत ते जें कौशल्य प्रगट करीत आहेत त्यावरून त्यांच्या प्रागतिक कथालेखनाबद्दल दिवसानुदिवस नवनवीन आशा करण्यास हरकत नाहीं. आणि 'कथासुवर्णा'त प्रसिद्ध झालेल्या 'चंद्रकोर' गोष्टींत त्यांनीं उपयोगांत आणलेल्या impressionistic method वरून तरी हेंच सिद्ध होत नाहीं का ?

फडके आणि खांडेकर दोघेहि अध्यापक असल्यामुळें शाळा कॉलेजांतून वाढलेल्या इंग्रजी वाङ्मयाच्या प्रसारामुळें लघुकथेचें जागतिक स्वरूप त्यांना नीट समजावून घेतां आलें. म्हणूनच, जुन्या पद्धतीनें कथालेखन सुरू करूनहि आधुनिक लघुकथा लिहिण्यास ते समर्थ ठरले. पण अध्यापकांची भूमिका एवढें एकच कारण या फरकाच्या मुळाशीं आहे, असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. एकंदर जगाच्या घडामोडींत आमूलाग्र स्थित्यंतर घडविणारें महायुद्धच याला जबाबदार आहे. आमच्या देशांत आलेल्या इंग्रजांच्या सत्तेबरोबर मराठी लेखनाला चालना मिळण्यास पहिल्या कथाकाळांत छापखान्यांची मुख्य मदत झाली. त्यानंतर 'मनोरंजन' काळीं कथेची वाढ होण्यास मासिकांनीं साहाय्य केलें. मनोरंजन, नवयुग, उद्यान, अरविंद वगैरे मासिकांनीं मराठी वाचकांना गोष्टींची खरी गोडी लावली हें विसरून चालणार नाहीं. आणि गेल्या महायुद्धामुळें तर एकंदर जगाचा सर्व कारभारच धांदलीचा होऊन ज्ञानाच्या सखोलतेपेक्षां व्यापकतेचा चहूंकडे प्रसार झाल यामुळें

वाङ्मयांतसुद्धां विशेष वेळ न जातां रसग्रहण करतां येण्याजोगे प्रकार रूढ होऊं लागले. त्याचमुळें युद्धोत्तर काळांत लघुनिबंध, लघुकथा, कादंबरिका, एकांकी नाटिका, वगैरे प्रकारांना ऊत येऊं लागला. सर्वसाधारण वाचकांच्या उड्या त्यांतल्यात्यांत कथावाङ्मयावर ( fiction ) विशेष पडत असल्यानें महायुद्धानंतर लघुकथेचा भाव साहित्याच्या बाजारपेठेंत भरमसाट वाढल्यास आश्चर्य नाहीं. महायुद्धामुळें जगाच्या अन्तर्बाह्य स्वरूपांत झालेल्या फरकाप्रमाणें जनस्थानपरत्वें लघुकथेच्या रचनेंत, विषयांत, आणि प्रतिपादनांत क्रांति घडून आली. जगांतील बहुतेक देशांना महायुद्धानें एकत्र आणल्यामुळें आणि गेल्या पंधरा वीस वर्षांत इंग्रजी शिक्षणाची आमच्या इकडे विशेष वाढ झाल्यामुळें इंग्रजीच्या साहाय्यानें जागतिक लघुकथेचे पडसाद मराठींतहि ऐकूं येऊं लागले. लघुकथा या प्रकाराची आवड उत्पन्न झाल्यावर तो संपन्न करणाऱ्या, इंग्रजी, फ्रेंच, रशियन, अमेरिकन, स्वीडिश, इटॅलियन, यिडीश, जर्मन, हंगेरिअन वगैरे वगैरे लघुकथांचीं कधीं भाषांतरें तर कधीं रूपांतरें, कधीं कल्पना तर कधीं भावना, कधीं रचना तर कधीं सूचना मराठींतून साहजिकच हळूहळू दिसूं लागल्या.

मराठी कथेवर झालेल्या महायुद्धाच्या परिणामाचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे कॅ. लिमये हे होत. लढाईवर जाऊन आल्यानंतर मोरी ओग्वाय् या जपानी आर्मी सर्जन-जनरलप्रमाणें कॅ. लिमयांनीं लेखन केलें; पण लिमयांचें लिखाण अनुभवावर आधारलेलें आणि ओगवाय्चें पाश्चात्यांच्या कृतीवर अधिष्ठित केलेलें, हा मुख्य फरक विसरून चालणार नाहीं. स्वानुभवाचा जिव्हाळा हा लिमयांच्या गोष्टींच्या मुळाशीं असला तरी स्टीफन क्रेन अगर ॲंब्रोज बियर्स यांच्या युद्धकथांतून प्रगट होणारें निर्दोष वातावरण त्यांच्या गोष्टींत दिसत नाहीं. कॅ. लिमयांचें खरें कौशल्य गोष्टीची उत्सुकता शेवटपर्यंत टिकविण्यांत आहे. घाटांतील वळणें घेऊन थंडगार, आल्हाददायक डोंगरमाथ्यावर गाडी यावी त्याप्रमाणें उलट सुलट कोलांट्या घेत त्यांचें कथानक पल्ला गांठीत असतें. याचें प्रत्यंतर ' शकूचा भाऊ ' आणि ' तिच्याकरितां ' या दोन्ही संग्रहांतील त्यांच्या गोष्टींतून भरपूर मिळतें. इतर वेळीं आपल्या विनोदानें वाचकांना हंसविणाऱ्या लिमयांच्या गोष्टींतून डोळ्यांत आसू उभे करणारीं कथानकें उभीं राहावींत हीसुद्धां गमतीची घटना नाहीं का ?

महायुद्धाचा प्रत्यक्ष परिणाम म्हणून कॅ. लिमयांच्या गोष्टींचा निर्देश करतां आला तरी युद्धोत्तर जागतिक लघुकथेच्या झालेल्या वाढीचा खरा प्रतिध्वनि मराठींत

अंधुकपणें ‘ एक विद्यार्थी ’ यांच्या ‘ कथाकलापां ’त ऐकूं आला. रचना, स्वभाव-परिपोष, विषयप्रतिपादन इत्यादि लघुकथेच्या तंत्रांकडे लक्ष पुरवावयास पाहिजे याची आतां कोठें लेखकांना जाणीव होऊं लागली. पण भावनेची उत्कटता अगर भाषेची पकड या गुणांच्या अभावामुळें हा संग्रह मागें पडणें साहजिक होतें. उलट या दोन गुणांच्या जोरावर थोड्याच गोष्टी लिहून लघुकथालेखकांत मानाची जागा मिळविणारे पहिले लेखक ‘ दिवाकर कृष्ण ’ हे होत. प्रभावी अशी अभ्यस्त साधी भाषा, एकच एक भावना फुलविण्यासाठीं निर्माण केलेलें अनुरूप वातावरण, मोजकीं पात्रें, सूचक व समर्पक मथळा इत्यादि अंगोपांगांकडे लक्ष पुरवून केलेलें ‘ दिवाकर कृष्णां’चें कथालेखन परिणामकारक झाल्यास नवल नाहीं. त्यांच्या यशाचें दुसरें कारण म्हणजे हार्डीप्रमाणें कथानकाला दैवाच्या खेळामुळें होणारी दुःखपर्यवसायी घटना योजण्याचें त्यांचें कौशल्य होय. पण त्यांच्या गोष्टींतून नेहमींच शोकाचा—तोहि अतिरंजित, विकृत आणि पुष्कळदां रोगट शोकाचा—सूर ऐकूं येत असल्यानें त्यांचें लेखन एकांगी आणि दुबळें झालें आहे. ‘दिवाकर कृष्णां’ प्रमाणें एकाच प्रसंगावर कथा केंद्रित करणारे दुसरे त्या वेळचे लेखक म्हणजे ‘ श्री. अशोक’. बोजड भाषा, कृत्रिम संवाद, सामान्य कथानक आणि अनुकूल प्रारंभ-शेवट यांचा अभाव, वगैरे दोषांमुळें त्यांच्या ‘ सासुरवासिनी ’ व ‘ प्रेम-निराशा ’ या कथा चिरपरिणामी होऊं शकल्या नाहींत. पण पाण्याचा प्रवाह एकदां वाहूं लागला म्हणजे सपाट जागेपेक्षां खोलगट ठिकाणीं तो वळूं लागतो त्याप्रमाणें जागतिक लघुकथेची गोडी लागल्यावर मराठी लेखकांपैकीं ज्यांचें वाचन विस्तृत, अभ्यास खोल, मनन दांडगें अशा लेखकांकडेच हा नवीन वाङ्मयप्रकार वळल्यास आश्चर्य नाहीं. धर्माची महती पटल्याचें प्रत्यन्तर धर्मांतरांत आढळावें त्याप्रमाणें पाश्चात्य लघुकथेचें महत्त्व पटल्याचा दाखला त्यांच्या मराठी भाषांतर-रूपांतराच्या योगानें मराठी वाचकांना पटवून दिला. या नव्या जमान्यांत मॅक्झिम गॉर्कीच्या Her Lover; लिओनिड आंद्रयेच्या Silence; गॉल्सवर्दीच्या Once More; मोपासॉंच्या The Man Who Was Drowned, मातिल्द सरावच्या Lulu's triumph; मेरी कॉरेलीची A Breach of Post Office Discipline; ओ'हेनरीच्या The Last Leaf; एच्. जी. वेल्सच्या The Slide Under the Microscope, Stolen Bacillus वगैरे कथांची कृ. ल. बापट, कारखाननीस, श्री. शं. भागवत, चिं. दं. आंबेकर, गं. ल. देवपुजारी, सौ. ताराबाई कुळकर्णी, ना. धों. ताम्हणकर, ज. वा. पाटणकर वगैरे

लेखकांनीं रूपांतरें केलीं. त्याचप्रमाणें अनंत जनार्दन करंदीकर यांनी फ्रेंच, जर्मन, रशियन वगैरे भाषांतील गोष्टींचीं जीं रूपांतरें केलीं, त्यांत ॲनातोल फ्रान्सच्या गोष्टीवरून लिहिलेली 'म्यूत्रा' ही गोष्ट चांगली साधली आहे. टॉलस्टॉय, पुश्किन, चेकॉव्ह, वगैरे रशियन लेखकांच्या कथा वा. ना. देशपांडे, 'कृष्णाबाई' इत्यादि लेखकलेखिकांनींहि मराठींत आणल्या. श्री. गोगटे यांनीं वेल्सच्या गोष्टींवरून लिहिलेलें 'ज्ञानसिंधु आणि इतर लघुकथा' हें पुस्तक याच प्रवृत्तीचें द्योतक होय. बहुतेक नामवंत पाश्चात्य लेखकांच्या कृतींकडे आमच्या लेखकांचे डोळे वळले. या वेळीं जीं सुंदर रूपांतरें झालीं त्यांत ई. व्ही. ल्युकसच्या The Face on the Wall या कथेचें कु. वसुमती दिघे यांनीं केलेलें 'भिंतीवरील चेहरा' हें रूपांतर फारच उत्कृष्ट साधलें आहे. आणि सुंदर रचना बिघडवून मूळ कथानक विकृत करणारी कृति म्हणजे एच्. जी. वेल्सच्या The Slide Under the Microscope या कथेचें सौ. ताराबाई कुळकर्णी यांनीं केलेलें 'चुकीचें प्रायश्चित्त' हें रूपांतर होय. हीं बिघडलेलीं रूपांतरेंहि एका दृष्टीनें लघुकथा-लेखनाचा वाढता व्यापच दर्शवूं लागलीं. एवढा वेळ गालबोट म्हणून ज्या मराठी मासिकांतून क्वचित् गोष्टी आढळावयाच्या, त्यांची मदार हळूहळू गोष्टींवरच येऊन पडली आणि पुढेंपुढें तर नुसत्या गोष्टींसाठींच 'यशवंत' 'स्फूर्ति' वगैरे मासिकेंहि निघालीं. गोष्टी लिहिण्याची आणि वाचण्याची आवड इतकी वाढूं लागली कीं मासिकांपुरतें तिचें क्षेत्र मर्यादित न राहतां वर्तमान-पत्रांपर्यंतहि तें पसरत गेलें. एवढा वेळ गोष्टींच्या बाबतींत मूकस्तंभ असणारीं वर्तमान-पत्रें, साप्ताहिकें, दैनिकें, आपले स्तंभ आतां गोष्टींनीं भरून काढूं लागलीं. गेल्या दहा वर्षांत गोष्टींना महाराष्ट्रांत जेवढा पूर आला तेवढा ललित वाङ्मयाच्या इतर कोण-त्याच प्रकाराला आला नाहीं. पण या पुरांत काड्याकुड्यांचा आणि पानपाचोळ्यांचाच भरणा विशेष ! या पुराच्या पाण्यावर कांहीं कथासंग्रहांचे बागबगिचे आणि मळे फुलले, 'ज्योत्स्ना', 'ओंजळ', 'कथासुवर्ण'सारखीं कांहीं हंगामी पिकेंहि आलीं, 'सरला'-सारखे मुसलमानी, गुजराथी वगैरे संस्कृतींच्या क्षेत्रांतहि मराठी पानमळे उभे राहिले, व थोडे फार स्फुट गोष्टींचे प्रवाहसुद्धां दूरवर पसरले. या प्रवाहांत पुष्कळ नव्या जुन्या, कच्च्यापक्क्या लेखकांनीं बुड्या मारून कोणीं रम्यकथा, कोणीं बालकथा, कोणीं अद्भुत कथा, कोणीं लोककथा, कोणीं नवलकथा, कोणीं सत्यकथा, तर कोणीं शोक-कथा अशीं नाना रत्नें बाहेर काढलीं, आणि कोणीं कोणीं तर शब्दचित्रें, व्यंगचित्रें अशा

निरनिराळ्या चित्रांचेंहि प्रदर्शन केलें. आणि अलीकडे अलीकडे तर साप्ताहिकांतून कांहीं 'नवलिका', 'मरीचिका'हि विहार करूं लागल्या आहेत.

पण या सगळ्या दुराच्या पराक्रमांपैकीं हिरवेगार टवटवीत फुलणारे बगीचेच लोकांच्या विशेष आणि कायम ध्यानांत राहणार. लघुकथेच्या स्वरूपाचें आकलन झाल्यास हे मळे आणि बागबगीचे फुलविणाऱ्यांची किंमत करणें कठिण नाहीं. आणि किंमत करावयाची म्हटल्यावर कांहीं तरी परिमाण लागणारच. ते परिमाण म्हणजेच तंत्र होय. लघुकथेच्या तंत्रांत साधारणत: विषय व कथानक, रचना, मथळा (title), पात्रें व स्वभावपरिपोष, भाषा व संवाद, वातावरण, कल्पना अथवा भावनादिग्दर्शन, परिणामाची एकमेवता, लेखकाचा दृष्टिकोन ( attitude ) इत्यादि अंगोपांगांचा समावेश करतां येईल. या बहुतेक अंगोपांगांचा अन्तर्भाव होणाऱ्या किस्फाल्लुदी या हंगेरियन लेखकाच्या The Invisible Wound या गोष्टीसारख्या उत्कृष्ट लघु-कथा जगाच्या वाङ्मयांतहि हाताच्या बोटांवर मोजतां येण्याजोग्या मिळणार, मग नुकत्याच उमलूं लागलेल्या मराठी लघुकथेच्या पाकळ्या तूर्त अशा विशेष फुललेल्या न दिसल्यास काय नवल ? तरी पण लघुकथेच्या तंत्राच्या एकेका घटकाचा स्वतंत्र विचार केल्यावर मराठींतहि लघुकथा कलेच्याच मार्गानें चालूं लागलेली पाहून कोणालाहि आनंदच वाटेल.

कथानकावांचून कथा म्हणजे मूर्तीशिवाय देऊळ. मराठींत हरघडीं प्रसिद्ध होणाऱ्या वर्तमानपत्री गोष्टींत अशीं रिकामीं देवळेंच विशेष दिसतात. त्यांतल्या-त्यांत ज्या कांहीं मूर्ति मराठी कथामंदिरांत कोंबल्या आहेत त्यांतसुद्धां भंगलेल्या, तडकलेल्या, आणि पोकळ अशाच फार ! गुंतागुंतीपेक्षां साधें कथानकच लघुकथेला अधिक परिणामकारक होतें याची कल्पना बऱ्याच मराठी लघुकथालेखकांना नाहीं. एखादा प्रसंग, घटना ( situation ), स्वभावाची, कल्पनेची अगर भावनेची छटा कल्पून तिचा उत्तरोत्तर परिपोष करण्यांत लघुकथा-लेखकाला खरी कला दाखवावी लागते. कथासूत्रांत एकरूपता राखणाऱ्या मोपासाँ, ओ'हेन्री, चेकॉव्ह्, गाल्सवर्दी वगैरे पाश्चात्य लेखकांप्रमाणें आपल्याइकडेहि प्रो. फडके, वरेरकर, खांडेकर, काणेकर, सौ. क्षमाबाई राव, सौ. कमलाबाई टिळक, मांजरेकर, आंबेकर, प्रो. वि. पां. दांडेकर इत्यादि लेखक-लेखिका आहेत. निव्वळ लांबीरुंदीवर लघुकथेची योग्यता ठरत नसून परिणामाच्या एकरूपतेवर ती ठरते, म्हणूनच 'कल्हईवाली', 'दग्ध कलिका 'सारख्या 'भावकथा ' संग्रहांतील गोष्टींना लघुकथाच म्हणतां येईल.

या एकरूपता-साधनाला सोप्या आणि साध्या कथानकानें जी मदत होते, ती अद्भुत आणि चतुर किंवा कल्पनाप्रचुर कथानकांनीं साहजिकच होऊं शकत नाहीं. याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे अशा वर्तीचीं कथानकें रचणाऱ्या आमच्या 'सरस्वतीकुमार', ना. ह. आपटे, गुर्जर वगैरे कथालेखकांना अद्यापहि लघुकथा या प्रकारांत अप्रतिम यश मिळवितां येऊं नये, हेंच होय. स्फुट गोष्ट म्हणून त्यांच्या कथा कितीहि मनोरंजक आणि खुबीदार असल्या तरी लघुकथेचा त्यांना मान मिळणें कठिण. अशा लेखकांची तुलना करावयाची झाल्यास ती कॉनन डॉइल-सारख्या पाश्चात्यांशींच करावी लागणार. चांगलें कथानक निवडणें हें अनुरूप वधू मिळविण्याइतकेंच कठिण काम आहे. तें मिळवून त्याचा योग्य तो परिपोष करणें म्हणजे मनाजोगी बायको मिळविल्यावर तिच्याबरोबर सुखानें संसार करण्यासारखेंच आहे. स्वकष्टार्जित संपत्तीचा सदुपयोग करणारांचीच बाजारांत खरी किंमत. पण आमच्याइकडे वडिलार्जित दौलतीचा धुव्वा उडविणारांचीच संख्या अधिक, हें वेल्सच्या The Slide Under the Microscope सारख्या गोष्टीचीं मराठींत झालेलीं रूपांतरें पाहून म्हणावें लागतें. पण स्वसंपादित दौलतीचें वैभव दाखविणारे आमच्या-कडे लेखक नाहींत असें मात्र नव्हे. 'ईश्वराची लघुकथा', 'शेवग्याच्या शेंगा', 'वहिनींच्या बांगड्या' वगैरेंतून य. गो. जोशांनीं; 'अश्रुफुलां'तील 'शैशवां'तून वकीलांनीं; 'पत्ता हरवला', 'मनु पालटला' वगैरेंतून 'श्री. कृष्णाबाई'नीं; 'दोन टोंकें', 'पतंग', 'प्रेमाचें नांव' वगैरेंतून श्री. खांडेकरांनीं; 'नजर', 'बाहुल्या' वगैरेंतून सौ. कमळाबाई टिळकांनीं; 'दैव-घटना', 'आनुवंशिक संस्कार' वगैरेंतून सौ. क्षमाबाई रावांनीं; 'पितृवात्सल्य' वगैरेंतून वि. बा. आंबे-कर इत्यादींनीं चांगलीं कथानकें निवडल्याचें दिसून येईल. पण एकंदर मराठी लघुकथेचा विचार केल्यावर कथानकांचा दुष्काळच दिसतो. उलट, त्याच त्याच गोष्टीचें रवंथ करणाऱ्या बैलोबांचीच संख्या मराठींत ज्यास्त. सुखान्त गोष्टींचा 'मनो-रंजन' काळीं सुळसुळाट झाला त्याची प्रतिक्रिया म्हणून कीं काय नवीन लघुकथेला मराठींत सुरुवात झाली तेव्हां येन केन प्रकारेण दुःखान्त गोष्टी लिहिण्याची एक टूमच निघाली. या दुःखान्त गोष्टी लिहिणाऱ्या लेखकांचे सेनापति म्हणजे श्री. 'दिवाकर कृष्ण'. पण संप्रदाय स्थापणाची अनुयायांत शतांशानें ताकद नसल्यामुळें या पलटणी बाजारबुणग्यांच्या कथांत नुसतीं प्रेमाचीं, आषुकमाषुकाचीं कथानकें उतूं जाऊं लागलीं. प्रेमांतहि वत्सल, गंभीर स्वरूप असूं शकतें याची कुणाला दाद-

फिर्यादहि दिसेना! प्रेमाप्रमाणें विधवाहि बरेच दिवस लघुकथेंत ठाण देऊन बसली. विधवेबरोबर पुष्कळ लेखकांनीं आपलें कपाळ फोडून लघुकथांतून रड आणि ओरड केली. याउलट, हळुवार उकललेलें नाजूक पण किंमती कथानक घेणारी लघुकथा-लेखक मंडळी म्हणजे, 'कृष्णाबाई,' सौ. क्षमाबाई राव वगैरे होत. कथाविषयाच्या दृष्टीनें जीवनाप्रमाणें गोष्टींतूनहि विषयवैचित्र्याला आणि विविधतेला महत्त्व आहे, असें दाखविणारे लेखक म्हणजे श्री. खांडेकर, य. गो. जोशी, कु. रघुवीर, के. मु. नाडकर्णी, वरेरकर, सौ. क्षमाबाई राव इत्यादि होत. बाकी लघुकथालेखकांपैकीं कोणी गोंव्याला चिकटलेला, कोणी कॉलेजांतल्या प्रणयांत गुरफटलेला, कोणी बाफोराच्या नाहीं तर वेश्येच्या मागें लागलेला, कोणी लढाईंत गुंतलेला, कोणी मिरच्याकोथिंबिरी चिरीत असलेला, तर कोणी असतील नसतील त्या खऱ्या-खोट्या अन्यायांची हाकाटी करून शिमगा साजरा करीत बसलेला, असेच बहुतेक दिसतात. मोपासॉंच्या A Coward, किप्लिंगच्या Bimi, हॅमलिन् गार्लंड्च्या A Branch Road वगैरे कथांतून दिसणारा एखादा महत्त्वाचा विषय ( problem ) घेऊन वाचकांना विचार करावयास लावणाऱ्या पद्धतीनें त्याची मांडणी करणारे लेखक मराठींत फारसे नाहींत. उलट, विचारार्ह प्रश्न म्हणजे प्रचार समजून कथालेखनाला प्रचारपत्रिकेचें स्वरूप दिल्यानें 'स्वैरसंचारां'तून वरेरकर व 'लपलेल्या खडकां'तून पु. ग. सहस्रबुद्धे यांच्या लघुकथा पुष्कळदां कलाहीन झाल्या आहेत. अलीकडच्या कथांतून गरिबांबद्दल अनुकंपा, आणि श्रीमंतांबद्दल निष्कारण अढी असा एक बूट निघाला आहे. पण एकंदरींत लेखकांनीं स्वतःच डोळे उघडे ठेवावयाचें ठरविल्यास विषयाच्या दृष्टीनें विविधता आणखीहि नजरेस यावयास हरकत नाहीं. शास्त्रें, कारखाने, कचेऱ्या, उद्योगधंदे,—कितीतरी क्षेत्र लघुकथेला मोकळें आहे. डोळस माणसांना त्याचा उपयोग. बाकीच्यांना त्याचें काय ?

अशिक्षित लोक मुलाबाळांच्या संगोपनाची जी काळजी घेतात तीच मराठी लेखक लघुकथेच्या रचनेची घेतात. निसर्गनियमानें पहिल्यांच्या मुलाबाळांची आणि यदृच्छेनें दुसऱ्यांच्या गोष्टींची वाढ होत असते. रचनेच्या दृष्टीनें कथेच्या प्रारंभाला महत्त्व आहे, हें कितीशा लेखकांना पटलेलें दिसतें ? उलट, चुकून साधलेला चांगला प्रारंभ कथासंग्रह छापते वेळीं काढून टाकणारे लेखक मराठींत दृष्टीस पडतात. 'यशवंत' मासिकाच्या लघुकथा-चढाओढींत बक्षिस मिळालेल्या 'शेवग्याच्या

शेंगा ' या गोष्टीचा प्रतीकात्मक प्रारंभ ' पुनर्भेटी'त गडप झालाच कीं नाहीं? किपलिंगच्या Story of the Gadsbys, अँटनी होपच्या Dolly Dialogues किंवा पोच्या The Pit and the Pendulum अगर The Black Cat सारख्या उत्कृष्ट प्रारंभ असणाऱ्या लघुकथा मराठींत फार नसल्या तरी गोष्टीचा आरंभ अनुकूल करणारे ' दिवाकर कृष्ण ', 'श्री. कृष्णाबाई', सौ. कमळाबाई टिळक, ( अलीकडील कथांतून ) खांडेकर वगैरे मराठी लेखक आहेत. सूचक प्रारंभ करणाऱ्या लेखकांत नाट्यछटाकार ' दिवाकर ', कचित् ग. रा. वाळ वगैरेंची गणना करतां येईल. ' दिवाकर कृष्णां 'च्या ' अंगणांतील पोपट ' व विशेषतः ' समाधि '; खांडेकरांच्या ' प्रेमाचें नांव ', ' विकास '; वा. ल. कुलकर्ण्यांची ' पेंटर '; सौ. टिळकांची ' पिवळा गुलाब ' वगैरे पुष्कळ कथा सुंदर प्रारंभांचीं उदाहरणें म्हणून दाखवितां येतील. कथेबद्दल कुतूहल उत्पन्न करण्याजोग्या प्रारंभा-प्रमाणें कॉपेच्या The Substitute, अगर मोपासाँच्या Une Vendetta वगैरे कथांतून आढळतो तसा परिणामकारक शेवट करणारे लेखक मात्र मराठींत फारसे नाहींत. सुरुवातीसच हुकूम संपवून भरमसाट पानें टाकणाऱ्या निष्काळजी खेळाडूप्रमाणें प्रारंभींच कथेची मुख्य कल्पना ( theme ) सांगून निरर्थक पाल्हाळ लावणारेच लेखक मराठींत पुष्कळ; म्हणून तत्त्वबोधाचा कडवट घोट अथवा वर्णनाचें रान गोष्टीच्या शेवटीं वाचकांच्या वांट्यास बहुतेक कथांतून येत असतें. ' मनांतलीं भुतें ' या खांडेकरांच्या गोष्टीप्रमाणें सुंदर शेवट असलेल्या गोष्टी मराठींत एकंदरींत थोड्याच. कथेचा शेवट प्रभावी होण्यासाठीं तिची सुरुवात आकर्षक करून हवा असलेला परिणाम साधेपर्यंत वाचकाची उत्कण्ठा कायम ठेवण्यासाठीं उत्कृष्ट लघुकथालेखकांनीं आपल्या गोष्टींतून विरोध (conflict), विस्मय ( surprise ), उपरोध ( irony ), इत्यादि प्रकारांचें अवलंबन केलेलें आढळतें. पाश्चात्य लेखकांत उत्कण्ठा राखण्याचें एडगर ॲलन पोचें कौशल्य अतुल आहे. आपल्याकडील उदाहरणांत सौ. क्षमाबाई राव यांची 'सुखासाठीं टाहो,' गांगल यांची ' रत्नप्रभा ' वगैरे सारख्या उत्कण्ठा टिकविणाऱ्या आणि शेवट परिणामकारक करणाऱ्या कांहीं लघुकथा आहेतच. पण त्या थोड्या असण्याचें मुख्य कारण म्हणजे विरोध, विस्मय, उपरोध इत्यादि प्रकारांचा योग्य उपयोग करतांना लागणाऱ्या संयम, सूचकता वगैरे गुणांचा आमच्या लेखकांच्या अंगीं असलेला अभाव होय. परिणामाच्या एकरूपतेला अनावश्यक पाल्हाळानें बाध येतो

याची जाणीव नसल्यामुळें पुष्कळ मराठी कथालेखकांना चेकॉव्हसारख्या पद्धतीच्या कलावंताचा संयम आणि काटकसर अनुकरणीय वाटत नाहींत. सर्वसाधारण माणसांपैकीं सुशिक्षित मंडळीचें संततिनियमनाकडे जसें लक्ष लागलें तसें अभ्यासू लेखकांपैकीं 'फुलांचे विभ्रम' वगैरे लघुकथांतून अत्र्यांनीं, 'पिवळा गुलाब' वगैरेंतून कमलाबाई टिळकांनीं, 'मनांतलीं भुतें' वगैरेंतून खांडेकरांनीं, 'आलें कुठून...गेलें कुठें' वगैरेंतून 'दिवाकरां'नीं, 'कारकून' मधून श्री. वि. द. घाट्यांनीं—अशा बऱ्याच लेखकांनीं संयमाचा सदुपयोग करून त्या त्या कृतींत कलेच्या दृष्टीनें स्पृहणीय यश मिळविलें आहे. विरोधाचा सुंदर उपयोग पाहावयाचा झाल्यास 'श्री. कृष्णाबाई'च्या 'मनु पालटला' गोष्टीकडे बोट दाखवितां येईल; त्याप्रमाणें विस्मय अगर कलाटणीवर भर देऊन उत्कृष्ट गोष्टी लिहिण्यांत सौ. क्षमाबाई राव यांची सर थोड्याच जणांना येईल, असें म्हणणें धाडसाचें नाहीं. त्यांच्या 'सुखस्वप्नें', 'आनुवंशिक संस्कार' वगैरे कथांतून ओ'हेन्री, ब्रेट हार्ट वगैरेंची विस्मयपद्धत सुंदरपणें अनुकारिलेली दिसते! पण रचनेच्या दृष्टीनें सुटसुटीत, प्रमाणशीर आणि ठराविक शिल्पाचा बुद्धिपुरस्सर उपयोग करणारे लेखक मराठींत सौ. कमलाबाई टिळक, खांडेकर ('जीवनकला', 'दंवबिंदू') यांच्याशिवाय फारसे नाहींत. त्यांतल्या त्यांत कथालेखनाचे निरनिराळे नमुने दाखविणारे खांडेकर हे एकटेच मराठी लघुकथालेखक आहेत, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. इमारतीप्रमाणें लघुकथेच्या रचनेला भूमितीची जरूरी असल्यामुळें ज्यांना ज्यांना तींत डोकें चालविणें शक्य आहे तेच निरनिराळे नमुने तयार करूं शकणार. अशा तऱ्हेच्या नमुन्यांपैकीं 'मुगटा आणि फॅन्सी पातळ' यांत समांतर पद्धतीचा, 'आकाश पाताळ' यांत पत्रलेखनपद्धतीचा, 'पतंगां'त नागमोड पद्धतीचा, 'मयसभे'त दैनंदिनीपद्धतीचा, 'प्रेमाचें नांवां'त परावर्तनपद्धतीचा वगैरे नाना नमुने तयार करून श्री. खांडेकरांनीं अभ्यासू लेखकांना कथालेखनाचें सुंदर उदाहरण घालून दिलें आहे.

नुसत्या रचनेपुरतेंच खांडेकरांचें कौतुक करून भागत नाहीं. गोष्टींना अनुरूप नांवें देण्यांतहि त्यांनीं चांगलें कौशल्य प्रगट केलें आहे. 'विकास', 'दोन टोकें', 'न रुतलेले कांटे' वगैरे मथळे अन्वर्थक नाहींत असें कोण म्हणेल? दुसऱ्यांच्या गोष्टींना नांवें ठेवणें सोपें असलें तरी स्वतःच्या गोष्टींना नांवें देतांना काय यातना होतात हें मराठींतल्या पुष्कळ लेखकांच्या गोष्टींवरून चांगलेंच ध्यानांत येतें. कथेची मुख्य कल्पना, पात्र, प्रसंग अगर वातावरण यांना अनुलक्षून गोष्टीला

नांव द्यावयाचा उत्कृष्ट लेखकांचा रिवाज आहे. मथळा वाचतांक्षणीं वाचकांच्या मनांत कथेबद्दल जिज्ञासा तर उत्पन्न व्हावी इतका अर्थपूर्ण आणि उत्कण्ठावर्धक तो असावयास हवा. नाहीं तर ' जगणें हा सुद्धां गुन्हा आहे ', ' निकामी घोड्याचें काय करतात ? ' असल्या रिकाम्या मालगाडीवजा मथळ्यांतून काय निष्कर्ष काढावयाचा? थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे बॅरेट यांनीं म्हटल्याप्रमाणें लघुकथेचा मथळा समर्पक, आकर्षक, अचूक, अभिनव आणि आटोपशीर असावा ( 'A good title is apt, specific, attractive, new and short'—Barrett ). अशा तऱ्हेचे मथळे देणाऱ्या मॉरिस मॅटरलिंक, किस्फालुदी, ई. व्ही. ल्यूकस, गाल्सवर्दी, किप्लिंग, श्नीझ्लर, मोल्नार वगैरे पाश्चात्य लेखकांप्रमाणें अत्रे, खांडेकर, ग. रा. बाळ, ' दिवाकर कृष्ण ', के. मु. नाडकर्णी, कु. रघुवीर, गांगल, सौ. कमळाबाई टिळक वगैरे लेखकलेखिकांचें कौशल्य वाखाणण्याजोगें आहे. ' ठोकळ्याचें चित्र ', ' वादळ ', 'दाण्यावरील नांव', ' काळे गुलाब ', ' मनांतलीं भुतें', ' चितेचें चुंबन ', ' वाऱ्याची मोट', ' हिरवें घर ', ' मालकी हक्क ', ' अंगणांतला पोपट ', ' डोळ्यांचें पाप ', ' अघोरी नाद ' वगैरे नांवें आकर्षक नाहींत का ?

कथानक, पात्र अगर वातावरण यांपैकीं एकावर विशेष भर देऊन लघुकथा लिहतां येते या ग्रॅहम बाल्फरच्या म्हणण्याची साक्ष दहा गोष्टी वाचतांच कोणालाहि पटेल. पण या तिन्ही प्रकारांत अवघड प्रकार पात्रांवर भर देण्याचाच आहे. फेरवालीं आणि नाफेरवालीं असे पात्रांचे दोन वर्ग केल्यास फेरवाल्या पात्रांचें संपूर्ण स्वभावरेखन हा कादंबरीचा आणि त्यांच्या एखाद्या सूक्ष्म अथवा उत्कट स्वभावछटेचें दिग्दर्शन हा लघुकथेचा विषय होऊं शकतो. उत्तम स्वभावरेखन साधण्यासाठीं थोडींच पात्रें, सूचक वर्णनें, आणि प्रभावी प्रसंग योजून चांगलें यश मिळविणाऱ्या, अॅम्ब्रोज बिअर्स या अमेरिकन, मेर अॅरॉन् गोल्डस्मिड् या डॅनिश, स्ट्रिंडबर्ग या स्विडीश, टॉमस हार्डी या इंग्लिश, शिमोझाकी टोसॉन् या जपानी लघुकथालेखकांनीं वर्णन, संवाद, मनोविश्लेषण इत्यादि साधनांचा केलेला उपयोग अत्यंत अनुकरणीय आहे. कथेंतून समर्पक स्वभावपरिपोष करणारे आपले लेखक म्हणजे ' सरस्वतीकुमार ', अत्रे, बोकील, य. गो. जोशी, ' कृष्णाबाई ', चिं. वि. जोशी, मांजरेकर वगैरे होत. ' हृदयाची तेढ ', ' सौख्य ' या मांजरेकरांच्या; ' प्रसाद ' ही सौ. क्षमाबाई रावांची; ' पत्ता हरवला ', ' यमाचे दूत ' या श्री. कृष्णाबाईच्या; 'वत्सलतेचा स्पर्श', ' टपालांतून कळलेलें रहस्य ' या

ना. ह. आपट्यांच्या; ' शांता ', ' दुहेरी गुण 'या प्रो. फडक्यांच्या; 'तिचा भाऊ ' या के. ना. काळ्यांच्या वगैरे कथांतून प्रगट झालेलीं स्वभावचित्रणें सरस उतरलीं आहेत. स्वभावरेखनासाठीं आमच्या लेखकांची वर्णनावर जोंपर्यंत भिस्त असते तोंपर्यंत पाण्यांत वावरणाऱ्या माशांप्रमाणें त्यांचा विहार स्वैर आणि संथपणें चालतो. पण संवादाच्या भोंवऱ्यांत सांपडल्यावर त्यांच्यापैकीं पुष्कळजण गटंगळ्याच खाऊं लागतात. बहुतेक मराठी कथांतून वाचावयास मिळणारा संवाद प्रत्यक्ष व्यवहारांत एखाद्या तरी दक्षिणी संस्कृतीच्या मराठी मायभाषा बोलणाऱ्या घरांत आढळेल किंवा काय याची शंकाच आहे. साधा, सुटसुटीत, घरगुती संवाद टिकाऊ परिणाम करूं शकतो याची कल्पना वि. वि. बोकील, चिं. वि. जोशी, वि. मा. दी. पटवर्धन, बेंडे, रा. स. दवळे, य. गो. जोशी वगैरे लेखकांशिवाय इतरांना आलेली दिसत नाहीं. लघुकथेंतून सुंदर संवाद लिहिणाऱ्या शोलेम् ॲश् या यिडीश लघु-कथालेखकाशीं आपल्या संवादलेखकांपैकीं तुलना करावयाची झाल्यास ती वि. वि. बोकिलांची करतां येईल. वर उल्लेखिलेल्या लेखकांव्यतिरिक्त इतरांपैकीं पुष्कळांना संवाद कशाशीं खातात, हेंहि समजत नसल्याचें दिसतें. संवादाप्रमाणें भाषेच्या बाबतींतहि बऱ्याच मराठी कथालेखकांनीं गैरसमज करून घेतला आहे. घरांत असतील नसतील तेवढे खोटेनाटे ओबडधोबड दागदागिने अंगावर चढवून सणासुदीच्या दिवशीं मिरवणाऱ्या असंस्कृत स्त्रियांप्रमाणें पुष्कळ मराठी कथा-लेखकांची भाषा बोजड अलंकारांच्या भारानें वांकलेली असते. म्हणूनच सूचक, अर्थगर्भ आणि मार्मिक शब्दयोजना करून परिणामकारक कथा लिहिणारे मराठींत थोडे लेखक आढळतात. साधी, रसाळ, लवचिक, ओघवती आणि समर्पक भाषा लिहिणाऱ्या मराठी लेखकांत गुर्जर, वरेरकर, फडके, काणेकर, अत्रे, य. गो. जोशी, बोकील, 'दिवाकर', सौ. कमलाबाई टिळक, वगैरे लेखक प्रमुख होत. वेंचक शब्दांत भरपूर अर्थगौरव साधणाऱ्या, ' दिवाकर कृष्ण ', कुमार रघुवीर, नंद तेलंग, वकील वगैरे शब्दश्रीमंतांप्रमाणेंच जागोजाग व्याकरणाला धाब्यावर बसविणाऱ्या दरिद्री लेखकांची संख्याहि मराठींत थोडी नाहीं. डोव्हिड् पिन्स्की या यिडीश किंवा मेअर ॲरॉन गोल्डस्मिड् या डॅनिश लेखकांची साध्या पण मनोवेधक भाषाशैलीमध्यें बरोबरी करणारे आपले लेखक म्हणजे ' दिवाकर कृष्ण ' होत. भाषेवरील प्रभुत्वाची त्यांना स्वभावरेखनांत सुंदर मदत झाल्यानें त्यांचीं पात्रें अतिरंजित असूनहि आकर्षक झालीं आहेत. नाहींतर निव्वळ विश्लेषणाच्या दृष्टीनें त्यांच्यापेक्षां सरस

चित्रणें करणारे लेखक कांहीं थोडे नाहींत. मराठींत अशा विश्लेषक लेखकांपैकीं ज्यांची साधी पण सकस भाषा आहे त्यांनीं वाचकांचीं मनें जिंकलींच. मनोविश्लेषणाची कसोटी लावून कसाला उतरणाऱ्या गोष्टींत कृष्णाबाई खरे यांची 'प्रार्थना,' सौ. क्षमाबाई राव यांची 'प्रसाद', कु. पिरोजबाई आनंदकर यांची 'याला जबाबदार कोण?' या चांगल्या गोष्टी आहेत. मृत्युशय्येवर पडलेल्या मातेच्या विवंचनेनें लहान मुलाचें मन कसकसें विचाराचीं आंदोलनें घेऊं लागतें याचें एका रात्रीपुरतेंच कृष्णाबाई खऱ्यांनीं केलेलें 'प्रार्थना' गोष्टींतील विश्लेषण बहारीचें आहे.

भाषावैभवापेक्षां भाषाप्रभुत्वाचीच लघुकथालेखनाला आवश्यकता असते. याचें विशेष प्रत्यन्तर वातावरणाचा विचार करतांना येऊं लागतें. थिऑफिल् गॉटियर या फ्रेंच कथालेखकाच्या Mummy's Foot किंवा मॉरिस मॅटरलिंक या बेल्जियन लेखकाच्या The Massacre of the Innocents या कथांतून प्रगट झालेलें अनुपम वातावरण, सूचक, अर्थगर्भ, वेंचक शब्दयोजनेवांचून निर्माण करतां आलें का? कथानकाला अनुकूल वातावरण निर्माण करणाऱ्या मराठी कथालेखकांत 'दिवाकर कृष्ण,' प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई, वि. स. सुखटणकर, कुमार रघुवीर, वा. ल. कुळकर्णी, नंद तेलंग वगैरे लेखक प्रमुख होत. पण आमच्या लेखकांचा या बाबतींत डोळ्यांत भरण्याजोगा दोष म्हणजे विविधतेचा अभाव. तींच तीं चित्रें आलटून पालटून उभीं करण्याकडेच बहुतेकांची प्रवृत्ति दिसून येते. प्रो. सरदेसाई यांच्या बाबतींत तर हा दोष विशेष तीव्रतेनें दृष्टीस पडतो. वेळोवेळीं नवनवीं शब्दचित्रें निर्माण करण्याचें पाश्चात्य लेखकांपैकीं हार्डी, हॅम्लिन गार्लंड, ब्रेट हार्ट, हॉथॉर्न, पो, किलर कूच, हॉफमन्, वगैरेंचें कसब आमच्या लेखकांनीं अनुकरण्याजोगें आहे. वातावरणाच्या दृष्टीनें यशस्वी उतरलेल्या मराठी लघुकथांपैकीं 'दिवाकर कृष्णां'च्या 'मृणालिनीचें लावण्य', 'समाधि', 'देवाच्या घरीं' या कथा; खांडेकरांची 'विकास'; मूळांतल्या इंग्रजी नमुन्यावरून रचलेली रं. कृ. चिंचलीकर यांची 'चित्रकार'; वा. ल. कुलकर्ण्यांची 'पेन्टर'; कुमार रघुवीरांची 'मुंग्याच्या जगांत'; दुसऱ्या खेपेला सुधारून लिहिलेली मांजरेकरांची 'वादळ'; 'प्रवासी' यांची 'कावळा' इत्यादि कथा उल्लेखनीय आहेत. स्थळ, काळ अगर पात्र हीं वाचकांसमोर प्रामुख्यानें उभीं करण्याकरितां वातावरणाचा उपयोग होतो. वर्णनानें स्थळ-काळाचें आणि वर्णन अगर संवाद यांनीं पात्रांचें वातावरण निर्माण होऊं शकतें. सजीव चित्रें उभीं करण्याइतकी प्रभावी वर्णनशैली आणि

जिवंत माणसें समोर नाचविण्याइतकी वास्तविक ( realistic ) संवादशक्ति लेखकाच्या अंगीं असल्यावर अनुकूल वातावरण निर्माण व्हावयास वेळ लागत नसतो. पात्रानुरूप संवादासाठीं बोली ( dialects ) लिहिण्याचें कौशल्य लेखकाला साधलें असेल तर त्याच्या गोष्टी किप्लिंग अगर ओ'हेनरी यांच्या लघुकथांसारख्या चटकदार आणि वास्तविक उतरण्यास कधींच अडचण भासत नाहीं. पण प्रचलित मराठी भाषा लिहितांना आमच्या लेखकांना जेथें उमासे येतात तेथें निरनिराळ्या बोली त्यांनीं वास्तविक रीतीनें लिहिण्याची बोलीच नको. प्रांताप्रांतानें, जिल्ह्याजिल्ह्यानें बोली बदलते हें जेव्हां आमच्या लेखकांना कळेल तेव्हांच 'कुणबाऊ' म्हणून ते वापरीत असलेल्या बोलीसारख्या धेडगुजरी भाषा यापुढें कथावाङ्मयांतून बोकाळतांना आढळणार नाहींत.

वर्णन, संवाद, वातावरण इत्यादींचा उपयोग कलाकृतीला वास्तवतेचें स्वरूप देण्याचा असल्यामुळें त्यांच्या साहाय्यानें लेखकाला जेवढा अधिक सत्याभास ( illusion of truth ) निर्माण करतां येणार तेवढी त्याची कला अधिक परिणामी ठरणार. ललितकृति ही जीवनाची केवळ निर्जीव छाया नसल्यानें मानवी अगर दैवी घडामोडीचें लघुकथेंतून निव्वळ तंतोतंत छायाचित्र दिसणें अशक्य. कलाकृतीच्या नसानसांतून वाहणारा जिवंतपणा हा भावना अगर कल्पना यांनीं व्यक्त होत असल्यामुळें ज्या मानानें ती भावना अगर कल्पना शाश्वत मनुष्यस्वभाव किंवा सृष्टिनियम यांवर आधारलेली असणार त्या मानानें तिची वास्तवता सदोष अगर निर्दोष राहणार. भावनेपेक्षां वस्तुतः कल्पनेची निर्दोषता राखणें कठिण म्हणून तिचें क्षेत्र विस्तृत असूनसुद्धां त्यांत मोकळेपणानें आणि यशस्वी रीतीनें विहार करणारे लघुकथालेखक जगांत थोडेच निघाले आहेत. पाश्चात्य वाङ्मयांत हॉफमन ( जर्मन ), व्हिलिअर्स डिलाइल् ॲडम् ( फ्रेंच ), गस्टॅव्हो ॲडॉल्फो बेकर (स्पॅनिश), हॅन्स क्रिस्टन ॲंडरसन् ( डॅनिश ), पो ( अमेरिकन ), वेल्स ( ब्रिटिश ) वगैरे शेलक्या लेखकांनींच अद्भुत, रहस्यमय किंवा शास्त्रीय कथानकें रंगविण्यांत अप्रतिम यश मिळविलें आहे. मग बाल्यावस्थेंतील आमची मराठी लघुकथा या प्रांतांत अद्याप अनभिज्ञ राहिल्यास नवल नाहीं. मराठींतून कांहीं गोष्टी रम्यकथा, अद्भुतकथा, नवलकथा वगैरे वर्गांत नियतकालिकांतून ढकललेल्या दिसतात; पण तर्कशुद्धता आणि सत्याश्रय यांच्या अभावीं त्या कधींच परिणामी झाल्या नाहींत. नाहीं म्हणावयास 'नवीसृष्टी' सारख्या खांडेकरांच्या लघुकथा ह्यास अपवाद होत. भावनेपेक्षां कल्पनेला चालना

हें अधिक कठिण असल्यानें कल्पनादिग्दर्शक कथांपेक्षां भावनादिग्दर्शक कथा लिहिणारांची संख्या जास्त आणि हर्षापेक्षां शोकानें अन्तःकरण लौकर उचंबळत असल्यामुळें आनंदपर्यवसायी विनोदी गोष्टींपेक्षां शोकपर्यवसायी करुणकथांची निपज भरमसाट होणें अपरिहार्य आहे. मराठींतसुद्धां त्यांची संख्या थोडी नाहीं. भावनाविष्करणाचा गुण प्रकर्षानें अंगीं असूनहि कृत्रिम हळवेपणानें गोष्टी लिहून रोगट शोकाचें प्रदर्शन करणारे मराठी लेखक फार आहेत. 'दिवाकर कृष्ण', मांजरेकर, प्रो. सरदेसाई, गांगल, वकील वगैरे लेखकांनाहि कृत्रिम शोकाचा मोह आवरत नाहीं, मग नवशिक्या होतकरू लेखकांची गोष्टच नको. उदाहरणेंच पहावयाचीं झाल्यास अ. तु. बाळक्यांच्या 'संवेदनें'त, 'स. हृदयां'च्या 'सरलें'त, वकीलांच्या 'अश्रुफुलां'त, तीं सहज सांपडूं शकतील. एकेका गोष्टीचा स्वतंत्र निर्देश करावयाचा झाल्यास मांजरेकरांची 'जीवंत लेखणी', गांगल यांची 'माझा दादा' वगैरे कथाहि दाखविणें कठिण नाहीं. अकारण मृत्यु, वेड, अगर आत्महत्या यांच्या जिवावर करुणरसनिष्पत्ति करण्याचा आमच्या लेखकांचा प्रयत्न अक्षरशः शोचनीय होतो. कथेंतील शोकपर्यवसायी घटना निर्माण करण्यासाठीं जिव्हाळ्याप्रमाणें तर्कशुद्धतेची आवश्यकता आहे, ही गोष्ट आमच्या लेखकांपैकीं पुष्कळांच्या खिजगणतींतच नसते. त्यामुळें हार्डीच्या गोष्टीप्रमाणें करुण पण सत्याश्रित गोष्टी मराठींत फारशा नजरेस पडत नाहींत. शोकाप्रमाणें विनोदानें भावनाविष्करण होत असल्यामुळें विनोदी लेखकांचाहि विचार करणें अवश्य आहे. नुसत्या शाब्दिक विनोदापेक्षां स्वभावपरिपोषक आणि प्रसंगनिष्ठ विनोद उच्च असल्यानें तो निर्माण करणाऱ्या लेखकांचें महत्त्व जास्तच. अशा तऱ्हेचा उच्च दर्जाचा विनोद निर्माण करणारे मराठी कथालेखक म्हणजे चिं. वि. जोशी, वि. वि. बोकील, प्र. के. अत्रे, 'सरस्वतीकुमार' वगैरे होत. करुण आणि हास्यरस यांशिवाय भावनादिग्दर्शनाचा संबंध यावयाचा तो प्रेमदर्शनाच्या प्रसंगीं. एकंदर जगाच्या वाङ्मयांतच उत्कृष्ट लघुकथांमध्यें निव्वळ प्रेमकथा अशा क्वचितच सांपडावयाच्या तेथें मराठीसारख्या भाषेंत त्या विपुल मिळणें महाकठिण! एवढ्याचसाठीं, कथालेखकानें सहसा प्रेमाच्या वाटेस जाऊं नये, असा ब्रँडर मॅथ्यूस आणि मॅन्झोनीसारख्या साहित्यसेवकांनीं इशारा देऊन ठेवला आहे. असें असलें तरी एकंदर प्रेमकथांच्या गळाठ्यांत जमा न होणारा मराठींतला माल म्हणजे प्रो. फडके, वि. सी. गुर्जर, बोकील, खांडेकर, मं. प. नाबर, के. मु. नाडकर्णी वगैरे लेखकांच्या गोष्टी होत.

वरील अंगोपांगांचा लघुकथालेखकाला जेवढा विचार करणें अवश्य आहे त्याहून अधिक परिणामाच्या एकमेवते( unity of impression )चा करावयास हवा. किंबहुना परिणामाच्या एकमेवतेवरच लघुकथा या स्वतंत्र प्रकाराची परीक्षा होते. ही एकमेवता साधण्याचें मुख्य साधन म्हणजे साध्या सोप्या कथानकाची निवड करणें हें होय. पात्रें, प्रसंग वगैरेंची गुंतागुंत नसल्यावर इष्ट परिणाम वाचकांच्या मनावर ठसविण्यास अडचण पडत नाहीं. गोष्टीला सुरुवात होतांच वाहूं लागणाऱ्या रसौघास शेवट साधते वेळीं भरती आणावयाची असल्यास रसैक्यता टिकविणें अवश्य आहे. संयम व सूचकता यांच्या बळावर कथेच्या शेवटाचीं बीजें तिच्या प्रारंभांतच पेरलेलीं जॅन नेरुडा या झेकोस्लोवेकियन लेखकाच्या The Vampire, किस्फालुदी या हंगेरियन लेखकाच्या The Invisible Wound, गस्टॅव्हो बेकर या स्पॅनिश लेखकाच्या Maese Perez वगैरे विख्यात कथांतून स्पष्टपणें आढळतात. रसैक्याला बाध येणारीं विघ्नें उपस्थित केलीं म्हणजे गोष्टीच्या लघुकथारूपाला धक्के बसूं लागतात. विनोद अगर विस्मय यांची उभारणी विरोध वगैरेंवर होत असल्यानें चुणूक दाखविण्यासाठीं कथेच्या सुरुवातीस विनोदी गोष्टींत मुख्य रसाहून भिन्न रस दाखवितां आला तरी शोकपर्यवसायी गोष्टींत रसभिन्नता बाधक होत असल्यामुळें तेथें मात्र रसैक्यतेचें व्रत फार कसोशीनें पाळावयास हवें. योग्य अशा सुरुवातीनें रसाचा उत्तरोत्तर परिपोष करून परिणामाची एकमेवता साधणारे मराठी लेखक म्हणजे, अत्रे (बालकथा), खांडेकर, कमलाबाई टिळक, श्री. 'कृष्णाबाई,' सौ. क्षमाबाई राव, 'दिवाकर कृष्ण,' पु. ग. सहस्रबुद्धे, वरेरकर, प्रो. सरदसाई, काणेकर वगैरे होत. 'सुमना लाभ काय उमलून'—वगैरे शब्दांनीं प्रारंभ केलेली खांडेकरांची 'विकास' किंवा 'भटजी मंत्र म्हणत असतांनाच श्रीनिवासानें आपल्या खांद्यावरची खापराची घागर मागें फेंकून दिली. घागरीच्या ठिकऱ्या झाल्या. आंतील पाणी वाहून गेलें.' या वाक्यांनीं प्रारंभ केलेली य. गो. जोश्यांची 'शेवग्याच्या शेंगा' यांत सूचित केलेला रस उत्तरोत्तर वाढत गेला नाहीं का ? फूल हुंगावें त्याप्रमाणें निव्वळ भोग्य वस्तु म्हणून स्त्रीकडे पाहण्याच्या रीतीचा पहिल्या कथेंतील, आणि एकत्र हिंदु-कुटुंबांतील कर्त्या माणसाचें छत्र नाहींसें होतांच घरांत पसरणाऱ्या अंदाधुंदीचा आणि वायां जाणाऱ्या जिव्हाळ्याचा दुसऱ्या कथेंतील मार्मिक उल्लेख रसैक्याला अत्यंत परिपोषक ठरत नाहीं का ? आणि अशा तऱ्हेनें रसाची वाढ करीत लेखन केल्यावर परिणामाची एकरूपता साधून सुंदर कथा निर्माण होण्यास काय वेळ लागणार ?

वर दिलेल्या लघुकथेच्या घटकांचा अभ्यास करून लघुकथालेखन करणें कठिण नाहीं; पण लघुकथालेखक म्हणून वाङ्मयांत नांव मिळविण्यासाठीं मुख्य गुण निराळाच लागतो. किंबहुना कसल्याहि प्रकारच्या वाङ्मयांत नांव मिळविण्यास त्या गुणाचीच जरूरी असते. हा गुण म्हणजे लेखकाचा विशिष्ट दृष्टिकोन ( attitude ) होय. सृष्टींतील घडामोडींकडे, मानवी व्यवहारांकडे, एकंदर जगाकडे आणि जीवनाकडे स्वतंत्र व विशिष्ट दृष्टीनें पाहण्याची लेखकाची तयारी नसेल तर वाचकांवर त्याच्या लिहिण्याचा सुतराम् परिणाम होणें कठिण. लेखकाचा असा विशिष्ट दृष्टिकोन तयार होण्यास त्याची मनोरचना, अभ्यास, परिस्थिति, बुद्धि, अनुभव इत्यादींची त्याला कळत न कळत मदत होत असते. म्हणूनच, आपापल्या मगदुराप्रमाणें कोणी अर्थप्राप्तीसाठीं, कोणी कीर्तिसंपादनासाठीं, कोणी उपदेशासाठीं, कोणी सौंदर्यप्रसाधनासाठीं, कोणी मत-प्रचारासाठीं, तर कोणी ध्येयदर्शनासाठीं, अशा निरनिराळ्या उद्देशांनीं साहित्यसेवक सरस्वतीच्या मंदिरांत शिरतांना दिसत असतात. निव्वळ अर्थप्राप्तीसाठीं केलेली सेवा निरर्थक व्हावी हा विरोधाभास असला तरी मराठीपुरती ती वस्तुस्थितिच आहे. म्हणूनच वर्तमानपत्रें आणि मासिकें यांतून पैसे घेऊन प्रसिद्ध होणाऱ्या गोष्टींपैकीं बहुतेक दूध पिऊन गरळ ओकणाऱ्याच निघतात. अर्थाप्रमाणेंच कीर्तीसाठीं छापवून घेतलेल्या गोष्टी अक्षरशः ‘ फुकट ’ छापल्या जातात. असें नसतें तर दरसाल शेंकडों गोष्टी बाहेर पडून त्यांतल्या दहापांचच लोकांच्या डोळ्यांसमोर न राहत्या. याशिवाय, सौंदर्यप्रसाधनेसाठींच केलेलें लिखाण म्हणजे कागदी फुलांनीं फुलविलेलें दुकान. डोळ्यांना तेथें तात्पुरता आल्हाद होईल पण नैसर्गिक हवा-पाण्यावर टवटवणाऱ्या सुवासी, रंगीत, खऱ्या फुलांच्या जिवंतपणाची सर त्यांना कोठून येणार ? अशा कागदी फुलांचीं दुकानें उभीं करणारे आमचे लेखक म्हणजे प्रो. फडके हे होत. एकमेकांशीं वागतांना दिसणाऱ्या जुन्या काळांतील बाप-लेकांच्या परकेपणाप्रमाणें प्रो. फडक्यांचें आपल्या पात्रांशीं परकेपणाचें नातें असतें. नाटकागणिक वेष पालटून तोच तो अभिनय आणि तीच ती भाषणाची लकब दाखविणाऱ्या नवख्या नटनटींप्रमाणें त्यांच्या गोष्टींतून तोच तो नायक व तीच ती नायिका नुसतें नांव बदलून मिरवीत असल्यासारखीं वाटतात. मनुष्यस्वभावाच्या विविध व अढळ छटा रंगविण्याइतकी फडक्यांची कला खोल आणि चौफेर नसल्यामुळें आणि थिऑफिल् गॉटिअर प्रमाणें सौंदर्यप्रसाधनेला मधून मधून

वातावरणाची किंवा उत्कृष्ट कथानकाची जोड देऊन आत्मीयतेनें त्यांनीं गोष्टी लिहिलेल्या नसल्यामुळें फडक्यांच्या गोष्टी फारशा परिणामकारक उतरलेल्या नाहींत.

निव्वळ सौंदर्यप्रसाधनाप्रमाणें उपदेशासाठीं किंवा मतप्रचारासाठीं केलेलें ललितलेखनहि सहसा कलात्मक उतरणें मुष्कील! Art lies in concealing art या न्यायानें उपदेश, बोध, मतप्रतिपादन सूचक रीतीनें प्रगट करण्यांतच खरें कौशल्य लागतें. रसाळ द्राक्षाच्या 'काचमें कुपी, कुपीमें दाना' या वर्णनाप्रमाणेंच बोध अगर तत्त्व कलात्मक रीतीनें प्रतिपादणाऱ्या गोष्टींबद्दल बोलतां येईल. द्राक्षाच्या वर रसाचें आणि नाजूक सालीचें वेष्टन नसेल तर नुसती बी कोणीच चाखणार नाहीं. त्याप्रमाणें नुसता उघडाबोडका बोध वाचायला सर्वसाधारण वाचक तयार नसणार. बींबियाणें, खतें, रसायनें यांची विक्री करणारांना निव्वळ बियांबद्दल जी आपुलकी वाटते ती आपुलकी बोध, उपदेश, मतप्रचार, यांच्या बाबतींत निबंधलेखकांस वाटणें साहजिक आहे. द्राक्षांचे मळे उभे करणारांना कृषिविद्येच्या, आणि बोध, उपदेश यांच्या आधारावर कथा लिहिणारांना लघुकथा-लेखनकलेच्या, ज्ञानाची आवश्यकता आहेच. लेखकाचें हें ज्ञान जितकें खोल आणि व्यासंग जितका दांडगा तितकी त्याची कलाकृति बोधपर असून सुंदर निघूं शकते. याचें उत्कृष्ट प्रत्यंतर खांडेकरांच्या गोष्टींतून चांगलें मिळतें. लहान-सहान प्रसंगाला, प्रश्नाला, अगर घटनेलासुद्धां विशिष्ट तऱ्हेचें नैतिक स्वरूप देण्याची त्यांची तत्त्वबोधाची हौस कथनकलेवरील त्यांच्या प्रभुत्वानें कलेला बाधक न होतां पोषकच झालेली दिसून येईल. उलट, निव्वळ मतप्रचारा( propaganda )वरच भर दिल्यानें कलेचा प्राण गुदमरून टाकल्याचीं उदाहरणें वरेरकरांच्या, 'क्रांति-किरण'कार शिखऱ्यांच्या आणि पु. ग. सहस्रबुद्ध्यांच्या गोष्टींतून भरपूर सांपडतात. मतप्रचाराचा संपर्क नसलेल्या 'अघोरी नादा'सारख्या वरेरकरांच्या गोष्टींत कला जसा स्वैरसंचार करूं शकते तसा 'विडीवाली'सारख्या प्रचारक गोष्टींत तिला बिलकुल करतां येत नाहीं. देशी उद्योगधंदे तगविण्यासाठीं परदेशी सिगरेटऐवजीं फरमास् विडी ओढण्यास उत्तेजन देणाऱ्या कथेच्या सुराची उभारणी कोणत्या शाश्वत तत्त्वावर झालेली दिसणार? आगरकरांच्या वेळीं अवश्य असलेल्या मत-प्रचाराचे पडसाद पु. ग. सहस्रबुद्ध्यांच्या 'लपलेल्या खडकां'तून ऐकूं येऊं लागतात तेव्हां कलेच्या मार्गांत जुजबी, तात्पुरत्या प्रश्नांचे खडे पसरल्यानें वाचकांना ठेंचा लागणें अपरिहार्य आहे. आणि 'पक्ष्यांची संस्कृती'सारख्या गोष्टींतून आपली

प्रचाराची हौस पुरी करण्याचा य. गो. जोशांनीं विडा उचललेला असतां तेव्हां त्यांच्याहि लघुकथा कलेचा राजरस्ता सोडून निबंधाच्या आडरानांत शिरल्यास आश्चर्य नाहीं. जगाकडे आणि जनाकडे पाहण्याची लेखकाची विशिष्ट दृष्टि प्रसंगाची आणि स्वभावांची छाननी करते वेळीं उघड होते. कितीहि वस्तुनिष्ठ ( objective ) लेखक असला तरी त्याची ही दृष्टि वाचकांच्या नजरेंतून सुटणें कठिण! ही दृष्टि ठरवितांना त्यानें कथेकरितां निवडलेल्या विषयांकडे न पाहतां कथेंत केलेल्या प्रतिपादनावरच भर द्यावयास हवा. आणि अशा प्रतिपादनाची किंमत ठरवितांना प्रचलित नीतिकल्पनेपेक्षां शाश्वत मनुष्यस्वभावाची आणि स्थल-कालातीत सृष्टिनियमांची कसोटी लावूनच कलादृष्ट्या त्या प्रतिपादनाचें महत्त्व अजमावयाचें असतें. पतीशिवाय परक्या पुरुषाकडून लग्नाआधीं गर्भधारणा झालेली स्त्री प्रचलित नीतिकल्पनेप्रमाणें अनीतिमान् ठरेल. पण तिचा गळा कापून तिला तोंडघशीं पाडणाऱ्या माणसाबद्दल आलेली चीड तिच्यावर सूड उगवून भागविण्या-पेक्षां त्या निरपराध वंचित जीवाची अब्रू झांकण्यासाठीं तिचें मूल तें आपलें मूल असें राजरोस म्हणणाऱ्या माणसाच्या उदार अंतःकरणांतील कोमल भावनांचे सूक्ष्म धागेदोरे उकलणारी 'सरस्वतीकुमार' यांच्या कथेसारखी कथा, शाश्वत मनुष्य-स्वभावावर आधारली असल्यामुळें कथानकाच्या आणि प्रतिपादनाच्या दृष्टीनें पहिल्या प्रतीची ठरणार. याच दृष्टीनें, सर्वसाधारण माणसाच्या रूढ नीतिकल्पनेला धक्के देणारे 'विभावरी शिरूरकर' यांचे 'कळ्यांचे निःश्वास' सुशिक्षित प्रौढ कुमारिकांच्या मनोभावना हळुवार व सूक्ष्म रीतीनें व्यक्त करीत असल्यामुळें उच्च दर्जाचे म्हणतां येतील. विषययोजना आणि प्रतिपादन या दृष्टींनीं 'कळ्यांचे निःश्वास' कलाहीन नसले तरी रचनेच्या दृष्टीनें त्यांत पूर्ण दुर्लक्ष केलें असल्यामुळें त्यांना कितपत लघुकथा म्हणतां येईल हा एक प्रश्नच आहे. सुशिक्षित कुमारिकांच्या कुचंबणेविरुद्ध 'कळ्यांच्या निःश्वासां'तून बाहेर पडणारा त्वेष प्रचारस्वरूपाचा असल्यामुळें एका अर्थी 'कळ्यांचे निःश्वास' हे मनोविश्लेषणपद्धतीनें लिहिलेले लहान लहान निबंधच म्हणतां येतील. उलट, रचना वगैरे लघुकथेच्या अंगोपांगां-कडे लक्ष पुरविल्यामुळें अत्रे, 'दिवाकर कृष्ण', 'श्री. कृष्णाबाई', मांजरेकर, कुमार रघुवीर, य. गो. जोशी, सौ. कमळाबाई टिळक, रा. भि. जोशी, गांगल, बाळ, सौ. क्षमाबाई राव इत्यादि लेखकलेखिकांच्या 'बाळूची बायको', 'पत्ता हरवला', 'गरिबाची अधेली', 'दाण्यावरील नांव', 'अनाथांचा वाली',

' देशभक्ति आणि मॅग्नेशिया ', ' नशीब पालटलें ', ' सौख्य ', ' प्रसाद ' इत्यादि गोष्टींतून विनोद, उपहास, करुणा, विरोध, विकृति, उपरोध, विडंबन वगैरेंच्या साहाय्यानें त्या त्या लेखकानें आपापला दृष्टिकोन व्यक्त केलेला आहे. मानवी मनाच्या व व्यवहाराच्या नानाविध घडामोडींवर दैवाच्या खेळाचा होणारा परिणाम कलात्मकतेनें दाखविण्याची आमच्या लेखकांची जों जों तयारी होत जाईल तों तों टॉमस हार्डी किंवा लिऑनिड् ॲन्ड्रीव्ह् वगैरे लघुकथालेखकांच्या गोष्टींप्रमाणें तर्कशुद्ध, स्थलकालाबाधित, भरीव आणि शाश्वत स्वरूपाच्या कथा मराठी वाङ्मयांतहि आढळणें कठिण नाहीं. या दृष्टीनें आमच्या लेखकांपैकीं खांडेकर, सौ. क्षमाबाई राव वगैरेंच्या निवडक गोष्टींकडे पाहिल्यावर मराठी लघुकथेला उज्ज्वल भविष्यकाल आहे, अशी आशा करणें फोल ठरेल का ?

---

२

# मराठी कादंबऱ्या

[ लेखक—श्री. विठ्ठल हरि कुळकर्णी, एम्.ए. ]

पृथ्वीचा तीन चतुर्थांश भाग समुद्रानें आक्रमून टाकिला आहे; त्याचप्रमाणें जगांतील सर्व साहित्याचा निम्याहून अधिक भाग कथात्मक वाङ्मयानें व्यापून टाकिला आहे, असें आढळून येईल. कथात्मक वाङ्मयाचें सागराशीं कल्पिलेलें हें साम्य केवळ दोहोंच्या विस्तारापुरतेंच मर्यादित झालेलें नाहीं. समुद्राप्रमाणेंच कथात्मक वाङ्मयाचाहि मानवी जीवनाशीं फार जिव्हाळ्याचा संबंध आहे. मानवी जीवनाचें प्रतिबिंब कथा-वाङ्मयांत जितक्या विविधतेनें, स्पष्टपणें व पूर्णत्वानें पडलेलें दिसून येतें तितकें साहित्याच्या इतर कोणत्याहि विभागांत पडलेलें आढळून येणार नाहीं. काव्य, नाटक व कादंबरी या ललित वाङ्मयाच्या त्रिविध साधनांनीं आपल्याला त्या त्रिगुणात्मक मानवी संसाराचें जितकें यथार्थ ज्ञान होईल तितकें शेंकडों इतिहास-ग्रंथांच्या अध्ययनानेंहि होईल कीं नाहीं याची शंकाच आहे. आणि ललित वाङ्मयांत सुद्धां मानवी जीवनाचें हें प्रतिबिंब कथा-वाङ्मयांत जितक्या विविधतेनें, वैचित्र्यानें, विस्तारानें व म्हणून पूर्णत्वानें दृग्गोचर होतें तितकें तें काव्यनाटकादि तत्सदृश प्रकारांत सुद्धां होत नाहीं. आणि असें होणें अगदीं स्वाभाविक आहे. कथावाङ्मयाशीं तुलना केली असतां काव्य व नाटक यांचें क्षेत्र फार मर्यादित असल्याचें आढळून येईल. काव्य व नाटक हीं कथावाङ्मयाइतकीं उपाधि-रहित

नाहींत. वर्ण्यविषयाच्या औचित्याचा जरी विचार केला नाहीं तरी काव्याला गण-मात्रा-वृत्तांच्या व नाटकाला स्थलकालाच्या मर्यादा कमीअधिक प्रमाणांत कां होईना पण पाळाव्या लागतात. त्यांतूनहि काव्य हें प्राधान्येंकरून आत्मपर म्हणजे व्यक्ति-निष्ठ असल्यामुळें व नाटक वस्तुनिष्ठ असलें तरी मुख्यत्वेंकरून कृतिपर असल्यामुळें त्यांत परिस्थितीचें प्रतिबिंब मर्यादित स्वरूपांतच पडणें अपरिहार्य असतें. परंतु कादंबरीची स्थिति मारुतीच्या शेंपटाप्रमाणें असल्यामुळें प्रसंगविशेषीं ती काव्य व नाटक या दोहोंसहि आपल्या शक्तीनें व विस्तारानें गुंडाळून ठेवते. वाईट कविता लिहिण्यासहि थोडीबहुत कवित्वशक्ति लागतेच; व नाटक लिहितांना तर अनेक तंत्रें सांभाळावीं लागतात! परंतु ज्याला लिहितां येतें अशा कोणत्याहि मनुष्याला बरीवाईट व वेडीवांकडी कादंबरी लिहितां येणें शक्य आहे. यामुळेंच काव्यनाटकांपेक्षां कादंबऱ्यांची पैदास अधिक होते; व कादंबऱ्यांची ही पैदास इतर वाङ्मयापेक्षां अधिक होत असल्या-मुळेंच समाजाच्या चांगल्या वाईट बहुतेक अंगांचें त्यांत कांहीं अंशीं भडक कां होईना पण चित्र पाहावयास सांपडतें. काव्यनाटकांपेक्षां कादंबरी वाचण्यास अधिक सुलभ. शिवाय कादंबऱ्यांची निर्मिति विपुल व विविध असल्यामुळें प्रत्येकाला आपल्या बुद्धीस व रुचीस पचेल व रुचेल अशा कादंबऱ्यांची निवड करणें सुलभ जातें. मागणीप्रमाणें पुरवठाहि होत असतो. यामुळेंच उत्कृष्ट कादंबऱ्यांप्रमाणें निकृष्ट कादंबऱ्यांची पैदास सर्रहा होत असते. लेखाच्या सुरुवातीला कथावाङ्मयाला समुद्राची जी उपमा दिली आहे ती ह्या दृष्टीनें विचार केल्यास एकापेक्षां अधिक अर्थांनीं लागू पडण्या-सारखी आहे. कथावाङ्मयमहोदधीचें मंथन केल्यास त्यांतून अमृतानें भरलेल्या सुवर्णकलशाप्रमाणेंच अनेक विषकुंभहि हातीं लागणार नाहींत असें नाहीं. एखाद्या कौस्तुभ मण्याबरोबर शंखांच्या गळ्यांत घालण्याला योग्य असे असंख्य शिंपलेहि त्यांतून बाहेर पडतील. सत्यसृष्टींत सहसा न आढळणाऱ्या अनेक रंभा ह्या कल्पना-सृष्टींत इतस्ततः वावरत असलेल्या आढळून येतील. मराठींत सुरुवातीला ज्या कादं-बऱ्या लिहिल्या गेल्या त्यांत असल्या लावण्यलतिकांची गर्दीच झालेली दिसून येते. ऐरावतासारखे अद्‌भुत प्राणी, कळयंत्री घोडे यांचा वावर कादंबऱ्यांतूनच पाहावयास मिळतो. कित्येक कादंबऱ्यांतून दारूचा मादकपणाहि अनुभवास येतो. गोल्डस्मिथ हा स्वतः वरच्या दर्जाचा कादंबरीकार असूनहि त्यानें कोंवळ्या वयाच्या तरुण तरुणींच्या हातांत कादंबऱ्या देऊं नयेत, असा आपला अभिप्राय एके ठिकाणीं व्यक्त केला आहे! 'कादंबरी ही तरुणाला आभासात्मक सुखाच्या मार्गे लावून त्याला

दुःखाचे निश्वास सोडावयास लावते,' असें तो म्हणतो. कदाचित् आपला स्वतःचा अनुभवच त्यानें ह्या मतप्रदर्शनांत व्यक्त केला असावा! परंतु कादंबरीवाचनानें मनावर होणाऱ्या बऱ्यावाईट परिणामाला कादंबरीइतकीच वाचकाची मनोवृत्तीहि कारणीभूत असते, हें विसरून चालणार नाहीं. शिवाय समाजाच्या आकांक्षा व्यक्त करून प्रसंगीं त्याला इष्ट तें वळण लावण्याचें कार्य अनेक कादंबऱ्यांनीं केलें आहे. व असें वळण लावण्याचें सामर्थ्य कादंबऱ्यांच्या ठिकाणींच विशेषेंकरून वसत असतें हें विसरून कसें चालेल? सारांश, कादंबरीच्या ठिकाणीं असलेलें सामर्थ्य एकदां मान्य केलें म्हणजे ललित वाङ्मयांतील कादंबरीचें स्थान व महत्त्व किती मोठें आहे याची पर्यायानें कबुली दिल्यासारखीच होते. कांहींना कथावाङ्मयमहोदधीचें पाणी खारट वाटत असलें तर कांहींना कथावाङ्मय क्षीरसमुद्राप्रमाणें वाटतें व ते त्यांत विष्णूप्रमाणें सदैव लोळावयास तयार असतात. कित्येकांना एखाद्या पर्वणीच्या दिवशींच त्यांत स्नान करण्याची इच्छा होते, तर कांहींना त्यांत दररोज डुंबावें असें वाटतें. कांहीं त्याच्या पृष्ठभागावरच तरंगत राहतात, तर कांहीं त्याच्या तळाशीं बुड्या मारून तेथें मोत्यांचे शिंपले व इतर चमत्कारिक वस्तु हातीं लागतात काय, हें पाहत असतात. कित्येकांना त्यावर नौकाविहार करावासा वाटतो, तर कित्येक व्यापार करण्याकरितांच त्यांत आपलीं गलबतें घालतात. कांहींना ती केवळ युद्धभूमीच वाटते, तर कांहींना त्यावर दर्यावर्दीपणा करावा व अचाट साहसाचीं कृत्यें करून अज्ञात प्रदेशांचे शोध लावावे, अशी स्फूर्ति होते. त्यांत प्रसंगीं वादळें होत असलीं व कालमानाप्रमाणें भरतीओहोटीहि लागत असली तरी विस्तार, वैभव व वैचित्र्य यांचा विलक्षण मिलाफ समुद्राप्रमाणें कथात्मक वाङ्मयांतच पाहावयास मिळतो, असें म्हणावयास हरकत नाहीं.

## मराठी कादंबऱ्यांची सुरुवात

गेल्या साठ वर्षांतील मराठी कादंबऱ्यांचा इतिहास लिहावयाचा म्हणजे जवळजवळ मराठी कादंबऱ्यांच्या सुरुवातीपासूनचाच इतिहास लिहावयाचा असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण हळबे यांची 'मुक्तामाला' जरी १८६१ त प्रसिद्ध झाली असली तरी रिसबुडांची 'मंजुघोषा' व गुंजीकरांची 'मोचनगड' इत्यादि मराठींतील स्वतंत्र कादंबऱ्यांची परंपरा १८७० च्या आसपासच सुरू झालेली आढळते. वस्तुतः मराठींतील पहिली स्वतंत्र कादंबरी लिहिण्याचा मान आधीं हिंदु असून नंतर ख्रिस्ती झालेले बाबा पदमनजी ह्या खटपट्या लेखकाकडे जातो. त्यांनीं

'यमुना-पर्यटन' ही स्वकपोलकल्पित कादंबरी १८५७ सालीं प्रसिद्ध केली. ह्या कादंबरीच्या जन्माचा इतिहास त्यांतील कथानकाइतकाच अद्भुतरम्य आहे. बाबा पदमनजी जेव्हां खिस्ती झाले तेव्हां त्यांची बायको हिंदूच राहिली; ती खिस्ती होईना. तेव्हां त्यांनीं एका किरिस्तांव बाईशीं लग्न केलें. त्याबरोबर पहिली बायकोहि त्यांजजवळ राहावयास तयार झाली! पण खिश्चनधर्म एरव्हीं उदार असला तरी तो दोन बायका करण्याची परवानगी देत नाहीं! त्यामुळें बाबांना पहिलीचा स्वीकार करतां येईना. बाबा खिस्ती झाले तेव्हां आपल्या बायकोनेंहि खिस्ती झालें पाहिजे, या मुद्यावर नवराबायकोचें भांडण हायकोर्टापर्यंत गेलें व शेवटीं बायको हिंदूच राहिली. ह्या खटल्याच्या पायीं बाबांना जो शेंदोनशें रुपये खर्च आला तो त्यांनीं 'यमुना-पर्यटण' ही कादंबरी लिहून भागविला! डॉक्टर जॉन्सन यानेंहि आपल्या आईच्या दफनविधीपायीं झालेलें कर्ज फेडण्यासाठीं 'रासेलस' ही कादंबरी लिहिल्याची हकीगत सुप्रसिद्धच आहे. दोन्ही प्रसंगांत अर्थातच महदंतर आहे. पण नवलाची गोष्ट एवढीच कीं, बाबांच्या 'यमुना-पर्यटण' कादंबरीचें प्रकरण उद्भवण्यापूर्वीच तीनचार वर्षें आधीं कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचें 'रासेलस'चें भाषांतर प्रसिद्ध झालें होतें! असो. प्रस्तुत 'यमुना-पर्यटण' ह्या कादंबरींत हिंदु विधवांच्या अनुकंपनीय स्थितीचें वर्णन करण्यांत आलें होतें हें जरी खरें, तथापि ही कादंबरी लिहिण्यांत बाबा पदमनजी यांचा मुख्य हेतु हिंदुधर्माची वाईट व खिस्ती धर्माची चांगली तेवढी बाजू रंगवून खिश्चन धर्माची तरफदारी करण्याचा होता. कादंबरीची नायिका यमुना ही मिशनऱ्यांच्या शाळेंत शिकलेली असून तिची श्रद्धा सुरुवातीपासूनच येशूखिस्तावर जडलेली असते. तिचा पहिला नवरा अपघातांत सांपडून मरण पावला तेव्हां ती त्यास खिस्ती शांति देते व पुढें तिचा पुनर्विवाह झाल्यानंतर नवराबायको एका पाद्र्याच्या आश्रयास राहून खिस्तसेवक बनतात; असें ह्या कादंबरींत दाखविलें आहे. ही मराठींतील पहिली कादंबरीच अशी बाटगी निपजल्यामुळें तिला लोकप्रियता लाभली नाहीं व लगेंच पुढल्या वर्षी सत्तावनसालाच्या बंडाच्या धामधुमीमुळें लोकांचें लक्षहि कांहीं काळपर्यंत तरी वाङ्मयावरून उडून राजकीय घडामोडीवर खिळल्यामुळें ह्या कादंबरीची पुढें आठवणहि बुजून गेली.

मराठींत स्वतंत्र कादंबऱ्यांच्या पद्धतशीर रचनेला सुरुवात जरी १८७० च्या सुमारास झाली तरी कथावाङ्मयाचा पाया ह्यापूर्वीच घालण्यांत आला होता. पेशवाईचा शेवट होण्यापूर्वी मराठी भाषेंत जें कथात्मक वाङ्मय होतें तें प्रायः धार्मिक स्वरूपाचें

असून पद्यमय होतें, गद्य लिहिणें अजून शिष्टसंमत मानलें जात नव्हतें. छापखान्याची कला अद्याप इकडे आली नव्हती. शिवाय मराठी राज्याच्या ऱ्हासाचा काळ असून धामधुमीचा बनला, राजकीय स्थित्यंतरें फार झपाट्यानें होत होतीं. वाङ्मय निर्माण होण्यास आवश्यक अशी स्वस्थता तर नव्हतीच पण वाङ्मयनिष्पत्तीस लागणारा मनाचा निश्चिंतपणाहि उरला नव्हता. लोकांपुढें ध्येय असें कोणतेंच उरलें नव्हतें. समाज किंकर्तव्यतामूढ बनला होता. आधींच आपल्याकडे मानवी आयुष्य क्षुद्र मानण्याकडे प्रवृत्ति प्रथमपासून चालत आलेली; त्यामुळें मानवी जीविताबर कांहीं रचना करणें म्हणजे आधींच क्षणभंगुर असलेल्या आयुष्याचा दुरुपयोग करण्यासारखेंच मानिलें जात होतें. परमेश्वराचें गुणानुवादन हेंच वाङ्मयाचें ध्येय मानिलें जात असे. 'अजित नाम वदो भलत्या मिषें । सकळ पातक भस्म करीतसे ।' ही वृत्ति अद्यापि पालटली नव्हती. कवींची वाणी कितीहि सरस असली तरी ती हरिनामाङ्किता नसल्यास मौक्तिकहीन शिंपल्याप्रमाणेंच मानली जात होती. त्यामुळें तेहतीस कोटी देवांच्या लीला निरनिराळ्या वृत्तांत व निरनिराळ्या शब्दांत रचण्यांतच त्या वेळचे कवी धन्यता मानीत. रामायण, महाभारत व भागवतादि पुराणें पुढें ठेविलीं म्हणजे काव्यरचनेला विषयांची वाण कधींच पडण्याचा संभव नव्हता. देवांचीं चरित्रें लिहिण्याचा कंटाळा आला तर देवांच्यापेक्षांहि अद्भुत अशा संतांचीं चरित्रें पुराणांच्या धर्तीवर लिहिण्यांत येत. त्यामुळें ग्रंथरचनेंत स्वतंत्र कल्पनेस व रचनेस फारच थोडा अवसर असे. परंतु पेशवाईचा अस्त होऊन कंपनीसरकारचा अंमल सुरू झाल्यावर देशांत जी स्थिरता व स्वस्थता आली त्यामुळें समाजांतील सुशिक्षित लोकांचें लक्ष इंग्रजी वाङ्मयाकडे वेधलें गेलें व लवकरच इंग्रजींतील नाटकें व कादंबऱ्या यांचे मराठींत तर्जुमे होऊं लागले.

## सुरुवातीचा भाषांतरांचा काळ

मराठी वाङ्मयांतील हा काळ म्हणजे भाषांतरांचा अथवा रूपांतरांचा काळ असें म्हणावयास हरकत नाहीं. हीं भाषांतरें निव्वळ इंग्रजी ग्रंथांचींच होत असत असें नाहीं. संस्कृत, फारशी, उर्दू इत्यादि ज्या ज्या भाषा विद्वानांस अवगत होत्या त्या त्या भाषांतून हीं भाषांतरें होऊं लागलीं. मेकॉलेसाहेबांच्या शिफारशीमुळें जरी देशांत इंग्रजी विद्येचा पुरस्कार करण्याचें ठरलें तरी देशी भाषांचा तिरस्कार किंवा अधिक्षेप करण्यांकडे अधिकारी लोकांची प्रवृत्ति झाली नव्हती. एवढेंच नव्हे, तर संस्कृतादि प्राच्य भाषांना उत्तेजनहि मिळत होतें व धर्मप्रसाराच्या हेतूनें कां होईना

पण सरकारच्या मिशनरी मंडळीच्या सहाय्यानें देशी भाषांचे कोशहि तयार होऊं लागले होते. पाठशाळांतून संस्कृत भाषेचें शास्त्रीय पद्धतीनें रूढ असलेलें अध्ययन चालूच होतें. ह्या एकंदर परिस्थितीमुळें मराठींतील आरंभीचें कथात्मक वाङ्मय आंग्लविद्याविभूषित पण गीर्वाणभाषेविषयीं विशिष्ट बुद्धि असलेल्या शास्त्रीमंडळी-कडून निर्माण केलें जावें, हें स्वाभाविक होतें.

याचा परिणाम म्हणजे संस्कृतबरोबरच इंग्रजीचे तर्जुमेहि मराठींत होऊं लागले. पंचतंत्र, इसापनीति, वेताळपंचविशी, सिंहासनबत्तिशी, शुकबहात्तरी इत्यादि लहान लहान गोष्टींचे संग्रह सुरुवातीला प्रसिद्ध झाले. यांतील कांहीं हिंदी भाषेंतून मराठींत आले असून कांहींवर मुसलमानी कथांची छाया पडलेली आहे. सदाशिव काशिनाथ ऊर्फ बापू छत्रे यांचीं 'बाळमित्र', 'इसापनीति कथा' हीं पुस्तकें त्या वेळीं शुद्ध, रसाळ व सुबोध मराठी गद्याचे आदर्श गणलीं गेलीं होतीं. छत्रे यांस मराठी 'गद्यात्मक ग्रंथांचे जनक' म्हणण्यांत येतें तें यामुळेंच. छत्रे यांज-प्रमाणेंच पाठारे ज्ञातींतील हरि केशवजी यांचीहि सरस भाषांतरकार म्हणून ख्याति होती. त्यांनीं बनियनच्या 'पिल्ग्रिम्स् प्रोग्रेस'चें 'यात्रिक क्रमण' हें सुरस भाषां-तर मिशनरी लोकांच्या सूचनेवरून केलें व ट्रॅक्ट सोसायटीनें तें छापलें. सदरहू पुस्तक ख्रिस्ती धर्माविषयीं असल्यामुळें व मिशनरी लोकांनीं छापल्यामुळें तें सर्व-साधारण मराठी वाचकवर्गांत लोकप्रिय झालें नाहीं. हरि केशवजींचें 'चेंबर्स मॉरल क्लास बुक'चें भाषांतरहि प्रसिद्ध आहे. मोरोबा कान्होबा विजयकर यांचें 'घाशीराम कोतवाल' ह्या भाषांतरांच्या काळांतील एक स्वतंत्र कथात्मक पुस्तक म्हणून विशेष उल्लेखनीय आहे. सदरहू पुस्तकाला कादंबरी म्हणून संबोधण्यांत येतें, तरी वस्तुतः ही कादंबरी नाहीं. यांत ग्रंथकर्त्यानें लोकांच्या मनोरंजनार्थ उपदेशगर्भ अशा अठ्ठावीस गोष्टी लिहिल्या आहेत. ह्या गोष्टी म्हणजे एक गारोड्याची पोतडीच आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण ह्यांत राजापुरची गंगा, सेंट पॉलचें मंदिर, आळंदीची यात्रा, दुर्बिणीचा इतिहास, गारोड्याच्या गोष्टी इत्यादि अनेक विषय आले आहेत. ऐतिहासिक दृष्ट्या ह्या पुस्तकांत आक्षेपार्ह भाग बराच असला तरी चटकदारपणा हा गुण त्यांत विशेष असल्यामुळें मराठी कथात्मक वाङ्मयांतील एक टप्पा या दृष्टीनें हा ग्रंथ उल्लेखनीय आहे, यांत शंका नाहीं. तथापि भाषांतरित कां होईना मराठी कथात्मक वाङ्मय जर कोणीं विशेषेंकरून लोकप्रिय केलें असेल तर तें कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं होय. छत्रे यांस मराठी

गद्याचे जनक मानिल्यास कृष्णशास्त्री चिपळूणकर यांस मराठी कथात्मक वाङ्मयाचे पहिले कलमबहादूर जादुगार म्हणून संबोधण्यास हरकत नाहीं. त्यांच्या 'अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टींनीं मराठी वाचकांस वाङ्मयाची खरी गोडी लाविली. हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्याला आज पाऊण शतक होऊन गेलें तरी मराठी गद्याचा अत्यंत सरस व चटकदार नमुना म्हणून आजहि तो आवडीनें वाचावासा वाटतो. एवढेंच नव्हे तर तो वाचतांना आपण गेल्या शतकांतील भाषा वाचीत आहोंत असा भास देखील होत नाहीं. अरबी भाषेंतील गोष्टींप्रमाणेंच कृष्णशास्त्र्यांचा 'रासेलस'हि भाषांतराचा उत्कृष्ट नमुना म्हणून आदर्शवत् धरण्यासारखा आहे. अरबी गोष्टींचे पुढील भाग हरिभाऊ दामले व विष्णुशास्त्री यांनीं पुरे केले. 'रासेलस'चें भाषांतर करतांना कृष्णशास्त्री यांस आपल्या चिरंजिवांचीहि थोडीबहुत मदत झाली असण्याचा संभव आहे. मराठी कथात्मक वाङ्मय-इतिहासांत कृष्णशास्त्र्यांच्या अरबी भाषेंतील गोष्टींचें महत्त्व दुहेरी आहे. एक तर वर सांगितल्याप्रमाणें त्यांनीं मराठी वाचकांस कथात्मक वाङ्मयाचें वेड लाविलें व दुसरें म्हणजे त्यांनीं मराठींतील स्वतंत्र, अद्‌भुत कादंबऱ्यांना मार्ग दाखवून देऊन त्यांचें कार्य सुकर केलें, हें होय.

## अद्‌भुत कादंबऱ्या

मराठींतील अद्‌भुत कादंबऱ्यांना हा काल अनुकूल कसा होता, याचें दिग्दर्शन पूर्वी केलेंच आहे. रामायण, महाभारत, पुराणें, संतचरित्रें, कहाण्या, इत्यादि ग्रंथ म्हणजे अद्‌भुत कथांच्या खाणी असून, आज हजारों वर्षें हिंदूंचा पिंड ह्या अद्‌भुत कथांवरच पोसला गेला आहे. त्यामुळें अद्‌भुत गोष्टी वाचण्याची चटक आपल्या लोकांना नव्यानें लावण्याची आवश्यकता होती अशांतला बिलकुल प्रकार नव्हता. फरक एवढाच कीं, रामायण महाभारतादि ग्रंथ पद्यमय असून त्यांतील व्यक्ति अतिमानुष होत्या तर ह्या कादंबऱ्या गद्यांत लिहिलेल्या असून त्यांतील पात्रें सर्वगुणसंपन्नच पण मानव आहेत. ऐतिहासिक दृष्ट्याहि हा काल अशा तऱ्हेच्या कथावाङ्मयाला पोषकच होता. स्वराज्य नष्ट झाल्यामुळें पराक्रमाला अवकाश उरला नव्हता. पराक्रमाला अवसर नसल्यामुळें आयुष्यांतील अद्‌भुतपणाहि नाहींसा झाला होता. त्यामुळें कंपनीसरकारचा अंमल सुरू होऊन सर्वत्र शांतता प्रस्थापित झाल्यामुळें त्या काळांतील सुखवस्तु लोकांना संसारांत नाहींसा झालेला अद्‌भुतपण कादंबऱ्यांत तरी अनुभवावा, असें वाटूं लागलें होतें. कृति करण्यास अवसर नसला म्हणजे कल्पनेस प्राधान्य मिळून तीस साहजिकपणेंच पंख फुटूं लागतात, हा मनो-

विश्लेषणशास्त्राचा सिद्धांतच आहे. शिवाय दुसऱ्या बाजीरावानें मराठ्यांच्या पडत्या काळांत त्यांच्यामध्यें जें थोडेंबहुत शौर्य उरलें होतें तें देखील नाहींसें करून टाकून लोकांस अगदीं नादान व विषयलंपट करून सोडलें होतें. दादोबांच्याच भाषेंत सांगावयाचें म्हणजे " त्या काळीं रावबाजीच्या उत्तेजनानें पुणें शहरांत व त्या शहराच्या बारा लागून जेथें तेथें शिमग्याचें चांदणें वाढत चाललें होतें. दिवसास ब्राह्मण-भोजनाचा थाट आणि रात्रीं दिव्यांत वात पडली नाहीं तों मंदिरांत चवघडे, सणया यांचा मंजुळ घोष; श्रीमंतांच्या व सरदार लोकांच्या वाड्यांत सरकारी ताफ्यांचे मुजरे; रात्रीं रस्त्यांत आणि बोळांत फिरणाऱ्या विलासी लोकांचीं मनें आपणाकडे ओढून घेणारे, चिमणी, साळू, मैना यांच्या मंजूळ कंठांत होनाजी बाळानें नुकतेच घातलेले खडे सूर; आणि फौजेकडील शिलेदार, बारगीर, शिपाई, आणि शहरांतील सुखवस्तु शिंपी, माळी, सराफ, दुकानदार यांस रिझवण्याकरितां बहिरु, मल्हारी, धोंडू, बापू, सगनभाऊ आणि रामा गोंधळी यांनीं सजविलेले डफतुणतुण्यांचे तमाशे आणि कलगीतुऱ्यांचीं भांडणें; हे सर्व थाट रावबाजीच्या उल्हसित मनोवृत्तीच्या प्रेरणेनें पुणें शहरांत जेथें तेथें गाजून राहिले होते. मग 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायानें त्या प्रेरणेचा अंमल सर्व पेशवाईंत पसरला नसेल असें संभवत नाहीं. त्या काळीं सर्व गुणीजनांचे आशेनें भरलेले डोळे पुणें शहराकडे लागून, त्या शहरानें जो कित्ता घातला होता, त्याची नक्कल जेथें तेथें होऊन कित्येक ठिकाणीं त्या नकलेवर ताण करणारे उमेदवारहि निपजूं लागले होते." अद्‌भुत कादंबऱ्यांच्या सुरुवातीच्या काळांत जरी पेशवाई नामशेष झाली होती तरी तिचें थोडेंबहुत वैभव व रावबाजीच्या वेळची लोकांची मनोवृत्ति हीं मात्र शिल्लक उरलीं होतीं हें विसरून चालणार नाहीं. त्या विशिष्ट मनोरचनेला खुसखुशीत खाद्य 'मुक्तामाला', 'मंजु-घोषा' इत्यादि कादंबऱ्यांनीं चांगलें पुरविलें. त्या वेळचे मराठे संस्थानिक, जहागिरदार, इनामदार व सावकार यांजकडूनच अशा तऱ्हेच्या कादंबऱ्यांना मागणी असे; व मागणीप्रमाणें पुरवठाहि होत असे. 'मुक्तामाला', 'रत्नप्रभा' इत्यादि नवलपूर्ण कादंबऱ्यांचे कर्ते वाईचे लक्ष्मणशास्त्री हळबे यांस ह्या कादंबऱ्यांबद्दल खंडेराव गायकवाड ह्यांजकडून वर्षासन चालू होतें ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्या-सारखी आहे!

हळबेशास्त्री यांची 'मुक्तामाल,' ही मराठींतील पहिली स्वतंत्र कादंबरी, असें सर्वसाधारणपणें मानण्यांत येतें. ही समजूत तितकीशी खरी नाहीं, हें कथात्मक

वाङ्मयाच्या वर सांगितलेल्या इतिहासावरून कळून येईलच. तथापि ह्या कादंबरीनें फार लोकप्रियता संपादन करून ( हिच्या दहा आवृत्त्या निघाल्या आहेत म्हणे ! ) अद्भुतरम्य कादंबऱ्यांची प्रथा पाडली व त्यांची परंपरा निर्माण केली, ह्या गोष्टी लक्ष्यांत आणिल्या म्हणजे कथात्मक वाङ्मयांतील तिचें स्थान अढळ आणि अद्वितीय आहे हें कबूल करावें लागतें. मुक्तामाला ही शांतवर्मा नामक एका जहागिरदाराची कन्या असते. तिला धनशंकर नांवाच्या एका प्रधानाला देण्यांत येतें. ह्या धनशंकराला शुक्राक्ष या नांवाचा एक प्रतिस्पर्धी असतो. तो त्याजवर राजद्रोहाचा आळ आणून त्यास कैद करवून एका डोहांत बुडविण्याची तजवीज करतो. मुक्तामाला आपल्या नवऱ्याला सोडविण्याचा प्रयत्न करते पण ती स्वतःच तुरुंगांत पडते व सुटते. तिजवर पुढें अनेक संकटें येतात व तिला एका बेटांत कैदी म्हणून ठेवण्यांत येतें. तिच्या वडिलांच्या आश्रयास असलेला सोमदत्त हा वादळांत सांपडून त्या बेटाला लागतो व मग तीं दोघें तेथून आपली सुटका करून घेतात. शेवटीं विलक्षण योगायोगामुळें सर्वांच्या एकत्र गांठी पडतात. व खलपुरुषाला योग्य तें शासन होऊन नायकनायिका सुखी होतात; असें ह्या कादंबरीचें थोडक्यांत संविधानक आहे. हें संविधानक देण्यांत हेतु एवढाच कीं, ह्या धर्तीच्या कादंबऱ्यांचा पुढें जो सुळसुळाट झाला त्यांच्या स्वरूपाची यावरून सर्वसाधारणपणें कल्पना करतां यावी. हळबेशास्त्री यांची भाषा शुद्ध, सरळ, सुंदर, साधी पण भारदस्त अशी असून त्यांची वर्णनशैली बहारीची आहे. वादळांत सांपडलेल्या सोमदत्ताचें वर्णन पाठशाळांतील क्रमिक पुस्तकांतून ज्यांच्या वाचनांत आलें असेल त्यांना त्याचा थोडासा मासला पाहावयास मिळालेला असेलच. मुक्तामाला लोकप्रिय झालेली पाहून, त्याच धर्तीच्या ‘ रत्नप्रभा ’ ( १८६६ ), ‘ मंजुघोषा ’ ( १८६८ ), ‘ वसंतमाला ’ ( १८६८ ), ‘ विश्वासराव ’ ( १८७० ), ‘ विचित्रपुरी ’ ( १८७० ), ‘ पुष्पमाला ’ ( १८७२ ), ‘ विदग्धस्त्रीचरित्र ’ ( १८७२ ), ‘मधुसूदन व रूपसुंदरी’ ( १८७२ ), ‘ वसंतकोकिला ’ ( १८७६ ), ‘ कस्तूरिका व दीपसेन ’ (१८७६), ‘ मित्रचंद्र’ ( १८८० ? ), व ‘ विचित्रपुरी ’, ‘ किरात ’, ‘ विलासिनी ’, ‘ प्रभव-मालिनी आणि कलावती,’ ‘ चंद्रकला ’, ‘ चंपकमाला ’, ‘ हिरालाल ’, ‘ अवलिया ’, ‘ मंदाकिनी ’, ‘ रत्नमाला आणि प्रतापचंद्र ’, ‘ चंद्रसेन आणि लीलावती ’, इत्यादि याच धर्तीच्या अनेक कादंबऱ्या रिसबूड, जोरवेकर, पारखी आदिकरून मंडळींनीं लिहिल्या. या कालांतील असल्या कादंबऱ्यांचें हें पीक

पाहिलें म्हणजे "आतांशी नावलांची कीड फार झाली आहे. लहान मुलेंवाळे देखील नावलें लिहून पैसे मिळवूं लागलीं आहेत" हे १८७२ सालीं रा. ब. मराठे यांनीं काढलेले उद्गार यथार्थ वाटूं लागतात.

रिसबुडांच्या ' मंजुघोषे 'वर ' मुक्तामाले 'चा फार परिणाम झालेला दिसतो. संविधानकांत तर पुष्कळच सादृश्य आहे. ' मुक्तामाले'प्रमाणेंच 'मंजुघोषे'त संकट-परंपरा, अरण्यें, वादळें, बेटें इत्यादि प्रकारांची रेलचेल आहे. मात्र ' मंजुघोषे 'त विमानामुळें अद्भुतपणांत भर पडली आहे. ' मंजुघोषे'तील कथानकाच्या कालाची मर्यादा मात्र कालत्रयींहि लावतां येण्यासारखी नाहीं. कारण त्यांतील विमान आधुनिक विमानाप्रमाणें आकाशामध्येंच विहार करणारें असलें तरी इतर बाबतींत त्यांच्यामध्यें जमीन-अस्मानाइतकें अंतर आहे. आजचें विमान हें विज्ञानशास्त्राचें अपत्य आहे, तर ' मंजुघोषे'तील वायुयंत्र हें रामायणकालीन पुष्पक विमानाचें वारसदार आहे! नवलाची गोष्ट एवढीच कीं, आजच्या विमानाप्रमाणें ' मंजुघोषे'तील विमानाला एकदम भडकण्याची व्यथा होती! मात्र या भडकण्याला यंत्रांतील नादुरुस्तीपेक्षां संविधानकांतील दुवेच अधिक कारणीभूत असतात, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. विमानाप्रमाणेंच ' मंजुघोषे'त फोटोग्रॅफिक स्टूडिओ आहेत, वॉलशिंट आहेत, वर्तमानपत्रेंहि आहेत. राजेरजवाड्यांचा थाट मात्र प्राचीन काळचा असतो. ' मुक्तामाला', ' मंजुघोषा ' इत्यादि कादंबऱ्यांचा संप्रदाय ज्या कादंबऱ्यांनीं चालविला त्यांतील कित्येक गोष्टी व वर्णनें हीं ठराविक पद्धतींचीं असत. या कादंबऱ्यांतील नायक-नायिका म्हणजे मदन आणि रति यांचे पुतळे असून शिवाय ते सर्वगुणसंपन्न असावयाचे, आणि प्रतिनायक-नायिका ह्या सर्व दुर्गणांच्या खाणीच असावयाच्या. त्यांचीं नांवेंहि खाडिलकरांच्या ' मानपमान ' नाटकांतल्याप्रमाणें विशिष्टगुणवाचक किंवा गुणसूचक असावयाचीं. कथानकाची उभारणी कनक, कांता आणि राज्य यांच्या प्राप्तीस्तव होत असलेल्या प्रयत्नांवर झालेली असावयाची. कथानकाचा शेवट बहुतांशीं गोड व्हावयाचा ( ' राजा मदन ' ही कादंबरी मात्र या नियमाला अपवादात्मक आहे ); ताटातूट झालेल्या नायकनायिकांचा शेवटीं संयोग होऊन त्यांना त्यांचें राज्य परत मिळावयाचें; अगोदरच पुत्ररत्नाचा लाभ झालेला नसल्यास तो शेवटीं व्हावयाचाच. कथानकांतील घटनांत दैवाचा अगर योगायोगाचाच खेळ अधिक. स्वामिनिष्ठा, आज्ञाधारकपणा, सोशिकपणा, पातिव्रत्य, इत्यादि गुणांचें महत्त्व वर्णन करण्यांत यावयाचें. स्त्रीपुरुषांनीं वेष बदलून वावरणें हा प्रकार शेक्सपिअरच्या

नाटकांतल्या प्रकाराइतकाच रूढ होता. विरही किंवा संकटग्रस्त नायकावर मुळमुळवें-करून शोक करण्याचीच कामगिरी असल्यामुळें त्याला खुशी करण्याची जबाबदारी त्याच्या मित्रमंडळीवरच पडत असे. निरनिराळ्या ऋतूंचीं, स्त्रियांच्या सौंदर्याचीं, शृंगाराचीं, अरण्याचीं किंवा उपवनांचीं वर्णनें करण्याची पद्धति बाणाच्या कादंबरींतील एतद्विषयक वर्णनांच्या धर्तीवर असे; नायकनायिकांचे विवाह चोरून गांधर्वपद्धतीनें करण्याची ह्या वेळच्या कादंबऱ्यांत प्रामुख्यानें आढळून येणारी चालहि संस्कृत ग्रंथांवरूनच उचललेली दिसते. बहुपत्नीत्वाचा प्रकारहि कांहीं कादंबऱ्यांतून आढळून येतो. याला संस्कृत ग्रंथांप्रमाणें मुसलमानी ग्रंथहि कारणीभूत झाले असावेत. केव्हां केव्हां शृंगारकरुणादि रसांचा परिपोष करण्याकरितां दिंड्या, कटाव, पदें यांचाहि अवलंब करण्यांत येई. मधून मधून गद्यांतहि अनुप्रासांची योजना करण्यांत येत असे. केव्हां केव्हां ह्या अनुप्रासांचा अतिरेक आणि ताहि भलत्याच वेळीं केल्यामुळें ते हास्यास्पद व रसहानिकारक होत असत. " माझ्या इष्ट कन्येनें नृपश्रेष्ठ कुमारास शिष्टजनहीं संतुष्ट होऊन ज्यास मान तुकावतील अशा अष्ट विवाहांतील वरिष्ठ गांधर्व विवाहेंकरून ती यथेष्ट सुखोपभोगानुभव घेणार, तों या दुष्टमति भ्रष्ट स्त्रीनें...तिजवर महा अरिष्ट आणावें " हे ' मंजुघोषे'तील नायिकेच्या बापाचे कोपनिदर्शक उद्गार, या हास्यास्पद प्रकाराचें एक उत्कृष्ट उदाहरण म्हणून देतां येण्यासारखें आहेत. " सांप्रत जीं नावलें विकत आहेत त्यांत जेवढे पुरुष तेवढे मदनाचे पुतळे, जेवढ्या स्त्रिया तेवढ्या तिलोत्तमा; प्रत्येक शोकस्थलीं मरणासारखा शोक व आनंदस्थलीं स्वर्गासारखा आनंद, दुसरी उपमाच नाहीं. नवराबायकोचें भाषण म्हणजे प्रेमाचा लोट ! त्यांत अभिप्राय, गूढ किंवा गांभीर्य हीं बिलकुल नाहींत. " पूर्वोक्त रा. ब. मराठे यांनीं ही समकालीन कादंबऱ्यांवर केलेली टीका अगदीं यथार्थ आहे असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं.

ह्या वेळच्या बहुतेक सर्व कादंबऱ्या बोलून चालून अद्भुतरम्य असल्यामुळें त्या विशिष्टकालनिदर्शक असणें शक्य नव्हतें, हें जरी खरें तरी त्या वेळीं जे सामाजिक प्रश्न विशेष रंगास आले होते त्यांचा परिणाम त्यांपैकीं कांहींवर दिसून येतो. स्त्रीशिक्षण, विधवापुनर्विवाह इत्यादि सामाजिक प्रश्नांना या काळांत तोंड लागलें होतें व उद्धारक आणि सुधारक असे समाजांत दोन तटहि पडले होते. सामाजिक प्रश्नांवर वादविवाद होत असत त्यांचे प्रतिध्वनि या वेळच्या नाटक कादंबऱ्यांतून ऐकावयास

मिळतात. 'वसंतकोकिळें'त जरठतरुणीविवाहाचें खंडन केलें असून, 'रत्नप्रभें'-तील नायक तर प्रत्यक्ष पुनर्विवाह लावतो. 'विचित्रपुरींतील राजपुत्र' हे कलकत्ता युनिव्हर्सिटीचे पदवीधर दाखविले आहेत!

ह्या सुरुवातीच्या स्वतंत्र कथात्मक वाङ्मयाच्या काळांतील कादंबऱ्यांत आजच्या दृष्टीला कितीहि दोष आढळून आले तरी त्यांनीं केलेली मराठी भाषेची सेवा बहुमोल आहे, हें विसरून चालणार नाहीं. ह्या काळांतील कादंबऱ्यांनींच लोकांस वाचनाभिरुचि लावून कथात्मक वाङ्मय लोकप्रिय केलें.

वर ज्या कादंबऱ्यांचा त्रोटक इतिहास सांगितला आहे, त्यांतील बहुतेक कादंबऱ्या १८६५ ते १८७५ ह्या दरम्यानच्या दहाबारा वर्षांतील आहेत. ह्या कालांतील कादंबरीकारांनीं जी वाङ्मय-तपस्या केली तिचा पुढील कथात्मक वाङ्मयावर काय परिणाम झाला, हें आतां पाहिलें पाहिजे. परंतु तत्पूर्वी ह्या सुमारास ज्या शैक्षणिक, सामाजिक, धार्मिक व राजकीय घडामोडी झाल्या त्यांचा थोडक्यांत परिचय करून घेतल्याशिवाय १८७५ ते १८९० पर्यंतच्या कालखंडांत निर्माण झालेल्या कादंबऱ्यांची नीटशी संगति लावतां येणार नाहीं. हा काळ म्हणजे 'निबंधमाले'चा काळ असें म्हटलें असतां चालण्यासारखें आहे. इंग्रजी राज्य येथें सुरू झाल्यानंतर महाराष्ट्रांत ज्या अनेक संस्थांचा व चळवळींचा पाया घालण्यांत आला होता त्या संस्था व चळवळी ह्या काळांत नांवरूपास येऊन त्यांनीं समाजांत मोठी खळबळ उडवून दिली. लोकांच्या धार्मिक, सामाजिक व राष्ट्रीय विचारांस चालना मिळून अनेक महत्त्वाच्या प्रश्नांवर वादविवाद होऊं लागले होते. स्वराज्य गेल्यानंतर एकोणिसाव्या शतकाच्या मध्यकालांत समाजाला जी मृतावस्था प्राप्त झाली होती ती ह्या काळांत नाहींशी होऊन त्याला जिवंतपणा आला होता; व जिवंतपणाचीं निदर्शक अशीं अनेक सांस्कृतिक भांडणें व स्थित्यंतरें या काळच्या समाजांत होऊं लागलीं होतीं. इंग्रजी शिक्षणाचा प्रसार वाढून विश्वविद्यालयांतून अनेक पदवीधर बाहेर पडूं लागले होते. 'मुंबई-विवाहोत्तेजक-मंडळ' (१८६५), 'मुंबई प्रार्थना-समाज' (१८६७), 'मुंबई वक्तृत्वोत्तेजक सभा' (१८६७), 'डेक्कन कॉलेज' (१८६८), 'वक्तृत्वोत्तेजक सभा—पुणें' (१८७१), 'सत्यशोधक समाज' (१८७३), 'सार्वजनिक सभा—पुणें' (१८७३), 'निबंधमाला' (१८७४), 'थिऑसॉफिकल सोसायटी—मुंबई' (१८७५), 'वसंत व्याख्यानमाला-पुणें' (१८७५), 'अनाथबालकाश्रम-पंढरपूर' (१८७५), 'आर्यसमाज-मुंबई' (१८७५),

' मराठी साहित्य-संमेलन, पुणें' ( १८७८ ), इत्यादि संस्थांपैकीं बऱ्याच संस्थांना या सुमारास आठदहा वर्षें होऊन गेल्यामुळें त्या कार्यक्षम होऊं लागल्या होत्या व समाजांत त्यांना प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. छापखाने सुरू झाल्यामुळें वर्तमानपत्रें व मासिकें यांचा प्रसार वाढत्या प्रमाणावर होऊं लागला होता. ' निबंधमाला ' ( १८७४ ), ' कथाकल्पतरू ' ( १८७५ ), ' अबलामित्र '-अलीबाग (१८७६), ' वेदार्थ-यत्न ' ( १८७६ ), ' दीनबंधु ' पुणें ( १८७७ ), ' काव्येतिहाससंग्रह ' (१८७८), ' केसरी–मराठा '(१८८१), ' निबंध-चंद्रिका ' रत्नागिरी (१८८२), ' कादंबरी-कलाप-मासिक ' पुणें ( १८८४ ), ' केरळकोकिळ ' ( १८८७ ), ' सुबारक ' ( १८८८ ) इत्यादि नियतकालिकें या कालांत सुरु होऊन त्यांनीं चांगलीच लोकप्रियता संपादन केली होती. ' ज्ञानप्रकाश ' (१८४०), 'इंदुप्रकाश' ( १८६२ ) ह्यांनीं तर वडीलकीचा मान केव्हांच संपादन केला होता. १८७८ सालीं वर्तमानपत्रांच्या मुस्कटदाबीचा कायदा पास करण्याची सरकारला आवश्यकता भासली. यावरून समाजांत त्यांचें वजन किती वाढलें होतें याची कल्पना करतां येण्यासारखी आहे. समाजांत अशा रीतीनें विचारक्रान्ति होऊं लागल्यामुळें कथा-वाङ्मयाच्या स्वरूपांत परिस्थित्यनुरूप इष्ट तो बदल होणें स्वाभाविक होतें. कादं-बरीच्या वाचकवर्गांतहि फरक पडला होता. श्रीमंत, सुखवस्तु, आळशी व खुशालचंद अशा वाचकवर्गाचा तट फोडून कादंबरीच्या वाचकवर्गाचें क्षेत्र अधिक विस्तृत होऊं लागलें, व तिचा ओघ मध्यमवर्गांतील सुशिक्षित व सुसंस्कृत अशा लोकांकडे वळला. याचा परिणाम असा झाला कीं, कादंबरीचा अद्भुताकडील ओढा कमी होऊं लागून तिचा कल वास्तविकाकडे झुकूं लागला. तथापि वाचकांचा अद्भुता-कडील ओढा एकाएकीं कमी होणें शक्य नव्हतें. अद्भुताला व वास्तविकाला सांधणारा एक दुवा आवश्यक होता. त्यामुळें अद्भुताला नवीन प्रांत शोधून काढणें आवश्यक होऊन बसलें. ऐतिहासिक कादंबरीचा उगम ह्याच परिस्थितींतून पाहा-वयास सांपडतो. इंग्रजी शिक्षणाचा अधिकाधिक फैलाव होऊं लागल्यामुळें सुशि-क्षितांच्या वाचनांत इंग्रजी कादंबऱ्या येऊं लागल्या. रेनॉल्डस काय किंवा स्कॉट काय, त्यांच्या कादंबऱ्यांत ऐतिहासिक व अद्भुत प्रसंगांचें मिश्रण फार उत्कृष्ट साधलें आहे. ऐतिहासिक पार्श्वभूमीवर अद्भुत कथानकाची मांडणी केली म्हणजे अद्भुताबरोबरच वास्तविकाचाहि अवलंब केल्याचें श्रेय मिळणार होतें. सुदैवानें मराठ्यांच्या शिवकालीन इतिहासांत अद्भुत प्रसंगांची वाण नव्हती. तेव्हां

अशा परिस्थितींत मराठी कथात्मक वाङ्मयांत ऐतिहासिक कादंबरीचा जन्म होणें ही गोष्ट क्रमप्राप्तच होती. गुंजीकरांची 'मोचनगड' (१८७१) ही मराठींतील पहिली स्वतंत्र ऐतिहासिक कादंबरी ह्या परिस्थितींतूनच निर्माण झाली आहे. या कादंबरीचा काळ अर्थातच शिवशाहीचा घेतला असून तिची रचना वॉल्टर स्कॉटच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या धर्तीवर केली आहे. ऐतिहासिक कालावर उभारणी केली आहे अशी ही पहिलीच कादंबरी एकाएकीं उत्तम उतरणें शक्य नव्हतें. शिवाय मराठींत ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिणारांची अडचणहि लक्ष्यांत घेतली पाहिजे. आपल्याकडे ऐतिहासिक कागदपत्र आतांसे कोठें उपलब्ध होऊं लागले आहेत. गुंजीकरांच्या वेळीं हीं ऐतिहासिक साधनें किती तुटपुंजीं असलीं पाहिजेत याची कल्पनाच करणें बरें. या दृष्टीनें विचार केल्यास 'मोचनगड' ही कादंबरी पुष्कळ चांगली उतरली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. गुंजीकरांची वर्णनशैली चांगली असून, कथानकाची मांडणीहि चित्तवेधक आणि कुतूहल उत्पन्न करणारी आहे.

कीर्तने, रानडे प्रभृति स्वदेशेतिहासाभिमानी विद्वानांनीं ऐतिहासिक लेख व ग्रंथ लिहून लोकांत आपल्या इतिहासाविषयीं आदरयुक्त आवड उत्पन्न केली. लोकहितवादी, ओक इत्यादि मंडळींनीं आपल्या इतिहासविषयक लेखांत व पुस्तकांत इंग्रजांची स्तुति व स्वकीयांचें दोषाविष्करणच अधिक केलें असलें तरी त्यामुळें लोकांत स्वेतिहासाविषयीं जिज्ञासाबुद्धि जागृत होऊन कांहींच्या मनांत प्रतिक्रियारूपानें स्वकीयांविषयी तीव्र अभिमानहि उत्पन्न झाला. 'निबंधमाला'कारांनीं स्वदेशाभिमानाला पोषक असा दृष्टिकोन लावून ऐतिहासिक लेख व स्फुटें लिहावयास सुरुवात केली. १८७८ त 'काव्येतिहाससंग्रह' हें मासिक सुरू झालें. ऐतिहासिक पुरुषांचीं चरित्रेंहि प्रसिद्ध होऊं लागलीं. नागेश विनायक बापट यांनीं इतिहासाविषयीं लोकांच्या मनांत उत्पन्न झालेली आवड लक्ष्यांत घेऊन 'पहिले बाजीराव साहेब' (१८७९), 'संभाजी', 'चितुरगडचा वेढा' व 'पानिपतची मोहीम' ह्या ऐतिहासिक कादंबऱ्या लिहून प्रसिद्ध केल्या. पहिलींत चरित्र व कादंबरी यांचें चमत्कारिक मिश्रण असून दुसरीचें कथानक अनेक इंग्रजी मराठी पुस्तकांतील माहिती गोळा करून सजविलें आहे. 'पानिपतच्या मोहिमे'तील कथानक 'लालन बैरागीण' या कादंबरीवरून घेतलें असावें अशी तात्यासाहेब कोल्हटकर यांनीं शंका प्रदर्शित केली आहे. या एकंदर प्रकारांवरून बापटांच्या उपर्युक्त कादंबऱ्या सर्वस्वीं

स्वतंत्र आहेत असें जरी म्हणतां येत नाहीं तरी त्यांतील इतर गुणांमुळें त्यांचें महत्त्व कमी होत नाहीं. बापटांची भाषासरणी विषयप्रतिपादनाला अनुकूल असून तींत माधुर्य व ओज हे गुण प्रामुख्यानें आढळून येतात. विष्णु जनार्दन पटवर्धन यांची 'हंबीरराव व पुतळाबाई' ही ऐतिहासिक कादंबरी स्वतंत्र असून तिच्यांतील कथानकाची उभारणी सत्तावनसालच्या बंडाच्या काळावर केली आहे. पंडित यांची 'सुशील यमुना' ( १८८७ ) ही ऐतिहासिक कादंबरी देखील स्वतंत्र असून तींत वासुदेव बळवंत फडके यांच्या बंडाच्या काळांतील हकीगत आली आहे. 'मोचनगडा-' प्रमाणेंच चिंतामण मोरेश्वर आपटे यांची 'पुतळाबाई' ही कादंबरीहि शिवाजीच्या काळासंबंधींची असून स्वतंत्र आहे. पहिल्या बाजीरावासंबंधीं बापटांच्या चरित्र-मिश्रित कादंबरीचा उल्लेख वर आलाच आहे. त्याव्यतिरिक्त बाजीरावाच्या वेळची आणखी एक स्वतंत्र कादंबरी म्हणजे 'जुनावाडा' ( १८८९ ) ही होय. ही कादंबरी 'हंबीरराव व पुतळाबाई' च्याच कर्त्यानें लिहिली आहे.

ऐतिहासिक स्वतंत्र कादंबऱ्यांप्रमाणें ऐतिहासिक कादंबऱ्यांचीं भाषांतरेंहि या कालखंडांत बरींच झालीं आहेत. वझे यांची 'लालन बैरागीण', बर्वे यांची 'ठगाची जबानी', गोडबोले यांची 'अनाथ पांडुरंग' या सर्व कादंबऱ्या भाषांतरित असल्या तरी त्यांतील गुणांमुळें उल्लेखनीय आहेत व त्यांतील कथानकें एतद्देशीय आहेत. परंतु या कालांत 'इव्हॅनो' सारख्या परदेशविषयक ऐतिहासिक कादंबऱ्यांचीं भाषांतरेंहि पुष्कळ झालीं आहेत. ह्यांतील बऱ्याच इंग्रजी कादंबऱ्या शाळा-कॉलेजांतून लावलेल्या असत. निव्वळ नाटककादंबऱ्यांना वाहिलेलीं अशीं मासिकें या काळांत बरींच निघालीं होतीं. 'ऐतिहासिक नाटकमाला' (१८८०), 'ऐतिहासिक नाट्यकथावली' (१८८४), 'कादंबरीकलाप' ( १८८४ ) वगैरे मासिकें कथात्मक वाङ्मय प्रसिद्ध करण्याचे कारखानेच होते, असें म्हणावयास हरकत नाहीं. अ. ना. भागवत यांच्या उपरिनिर्दिष्ट 'ऐतिहासिक नाट्यकथावलीं'त कितीतरी बऱ्यावाईट ऐतिहासिक कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत.

अद्‌भुत कादंबऱ्यांतूनच मराठींतील ऐतिहासिक कादंबऱ्यांची परंपरा कशी निर्माण झाली याचें विवेचन वर आलेंच आहे. आतां ऐतिहासिक कादंबऱ्यांतून वास्तविक (realistic) कादंबऱ्यांचा उदय कसकसा होत गेला हें पाहिलें पाहिजे. वस्तुस्थिति-निदर्शक कादंबऱ्या निर्माण होण्याला इंग्रजी वाङ्मयाचें वाढतें अध्ययनच मुख्यत्वें करून कारणीभूत झालें, असें म्हणावें लागतें. शिक्षणाच्या प्रसारामुळें वाचकवर्गाचें

क्षेत्रहि बरेंच विस्तीर्ण झालें होतें व समाजहि झोंपेंतून खडबडून जागा होऊन आत्मनिरीक्षण करावयास लागला होता. अशा वेळीं काल्पनिक कालांत वावरण्याचा लोकांस कंटाळा येणें स्वाभाविक होतें. त्यामुळें समाजांत प्रत्यहीं आढळणाऱ्या घटना ज्यांत वर्णिल्या आहेत अशा कादंबऱ्या वाचण्याकडे व लिहिण्याकडे लेखकांची वृत्ति झाल्यास नवल नाहीं. वस्तुस्थितिनिदर्शक कादंबऱ्यांची पूर्वपीठिकाच शोधावयाची म्हटल्यास थेट छत्रे यांच्या 'बाळमित्रा'कडे धांव घ्यावी लागते. मराठींतील कथावाङ्मयाच्या अगदीं सुरुवातीपासूनच अद्‌भुताबरोबर वास्तविकाचाहि एक सूक्ष्म प्रवाह सुरू झाला होता. परंतु तो वाढीला लागण्यास अनुकूल अशी परिस्थिति मात्र अद्याप निर्माण झाली नव्हती, ती आतां झाली. 'बाळमित्रां'तील गोष्टी प्रत्यहीं घडणाऱ्या असून प्रसंगहि अगदीं दररोजच्या व्यवहारांतले आहेत. इंग्रजी शिक्षणाचा फैलाव होतांच इंग्रजींतील सामाजिक कादंबऱ्यांच्या भाषांतराला सुरुवात झाली. 'जग हें असें आहे', 'वाईकर भटजी', 'पुरी हौस फिटली', 'मथुरा', 'नाहींचना ऐकायचें', 'शिलादित्य' इत्यादि वास्तविककथानकात्मक कादंबऱ्या इंग्रजी व फ्रेंच कादंबऱ्यांचीं रूपांतरें आहेत. 'सुशील यमुना' व 'प्रेमबंधन' ह्या कादंबऱ्या अद्भुत आणि वास्तविक यांच्या सीमारेषेवर आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. अद्‌भुताची टर करणाऱ्या कादंबऱ्यांचीहि मध्यंतरीं निपज झाली. 'विचित्रपुरी' (१८७०) ही कादंबरी मूळ अद्‌भुत कोटींतील असूनहि तींत अनेक अद्‌भुत गोष्टींची सहेतुक टर केली आहे. तिच्यांतील नायक व त्याचे मित्र यांचा भुतांखेतांवर व पिशाच्चराक्षसादिकांवर बिलकूल विश्वास नसतो असें दाखविलें आहे. चिंतामणराव आपटे यांचें 'शामभट व त्याचा शिष्य बटो यांचा वृत्तान्त' हें पुस्तक 'डॉन क्विक्झोट' या जगप्रसिद्ध स्पॅनिश ग्रंथाच्या धर्तीवर पण स्वतंत्रपणें लिहिलेलें असून त्यांत फलज्योतिषाची थट्टा केली आहे. 'विचित्रपुरी'प्रमाणें यांतहि अद्‌भुत आणि वास्तविक यांचें मिश्रण आढळून येतें. रहाळकर यांच्या 'नारायणराव आणि गोदावरी' (१८७९) या कादंबरींत मात्र संसाराचें खरेंखुरें चित्र रेखाटण्याचा प्रयत्न करण्यांत आला असून तो चांगलाच साधला आहे. यांतील कथानकावर जरी एका इंग्रजी ग्रंथाची छाया पडलेली दिसून येते तरी मराठींतील पहिली स्वतंत्र सामाजिक कादंबरी म्हणून हिला संबोधण्यास हरकत नाहीं. विनायक कोंडदेव ओक यांची 'शिरस्तेदार' (१८८१) ही वस्तुस्थितिनिदर्शक स्वतंत्र कादंबरी आकारानें लहान असली तरी गुणांनीं वरच्या दर्जाची आहे. या कादंबरींत लांच खाण्यापासून होणाऱ्या दुष्परिणामांचें वर्णन केलें आहे.

यांतील भाषा कथावस्तूला अनुरूप अशी साधी व सरळ आहे. या कादंबरीसंबंधीं लिहितांना इतिहासाचार्य राजवाडे म्हणतात--"हींत मोठा दोष म्हटला म्हणजे ही फार सूक्ष्म प्रमाणावर धरलेली आहे. हिचें रूपुस्त जर वाढविलें असतें व त्या रूपुस्तांत अघटित चमत्कारांचें वर्णन केलें असतें, म्हणजे शिरस्तेदाराचा, मामलतदार, दप्तरदार, कौन्सिलरहि यद्यपि झाला तथापि त्याचा कारकुनी बाणा सुटावयाचा नाहीं अशा तऱ्हेची जर ह्या ग्रंथाची सांगोपांग उठावणी झाली असती, तर हिंदुस्थानांतील पांच रुपड्यांपासून पांच हजारांपर्यंतच्या कारकुनी पेशाचें हुबेहूब चित्र निघालें असतें." 'त्रिवेणीप्रमाथ' या कादंबरींत बाहेरख्याली लोकांच्या आयुष्याचें चित्र रंगविण्यांत आलें आहे. 'यशवंतराव-आत्मचरित्र', 'वेणू', 'रंगराव' ह्या कादंबऱ्याहि वस्तुस्थितिनिदर्शक आहेत. त्यांत वास्तविकपणाशिवाय दुसरा विशेष असा कोणताच गुण आढळून येत नाहीं. 'धनुर्धारी' (टिकेकर) यांची 'वाईकर भटजी' ही कादंबरी जरी गोल्डस्मिथच्या 'व्हिकार ऑफ वेकफील्ड' वरून लिहिलेली असल्यामुळें शंभर टक्के स्वतंत्र मानतां आली नाहीं तरी वस्तुस्थितिनिदर्शक अशा इतर अनेक स्वतंत्र कादंबऱ्यांपेक्षां हिची योग्यता फार मोठी आहे. टिकेकरांची वर्णनशैली वाखाणण्यासारखी असून त्यांची भाषा अत्यंत रसानुकूल आहे. ह्या काळांत ज्या कांहीं वस्तुस्थितिनिदर्शक सामाजिक कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या त्यांच्या कर्त्यांसमोर इंग्रजींतील रेनॉल्ड्स्, मिसेस हेन्री वुड, मिसेस ब्रॅडन, यांच्या कादंबऱ्यांसारख्या सामान्य कृतीच असल्यामुळें त्यांच्या प्रतिकृतीहि सामान्य अशाच उतरल्या. डिकन्स, थॅकरे, ईलियट इत्यादि श्रेष्ठ ग्रंथकारांच्या कादंबऱ्यांचीं रूपांतरें करणें ह्या वेळच्या आंग्लभाषेशीं बेताचाच परिचय असलेल्या अर्धशिक्षित लेखकांच्या आवांक्याबाहेरचेंच होतें.

परंतु याच सुमारास मराठी कादंबरीच्या इतिहासांत क्रान्ति घडवून आणून कादंबरीक्षेत्रावर सतत तीस वर्षें अप्रतिहतपणें सत्ता गाजविणारे कादंबरीकार हरि नारायण आपटे, मराठी वाङ्मयक्षितिजावर नुकतेच चमकूं लागले होते. हरिभाऊंची पहिली कादंबरी १८८५ सालीं प्रसिद्ध झाली. तेव्हांपासून १९१७ पर्यंत त्यांनीं कादंबरीलेखन अव्याहत चालू ठेविलें. म्हणून या कालखंडास 'हरिभाऊंचें युग' असें संबोधण्यास बिलकूल हरकत नाहीं.

## हरिभाऊंचें युग (१८८५-१९१५)

हरिभाऊंच्या 'उषःकाल' या कादंबरींत शिवाजीमहाराजांचें नांव त्यांनीं वाचकांस फार उशिरां कळविलें आहे. हरिभाऊंनीं खुद्द आपलें नांवहि त्यांच्या

कादंबऱ्या लोकप्रिय होऊन त्यांच्या कर्त्याबद्दलची वाचकांची जिज्ञासा अगदीं उतास गेल्यानंतर बऱ्याच उशिरां अधिकृतरीत्या प्रसिद्ध केलें. फार काय, खुद्द हरिभाऊंच्या घरांतील मंडळींना 'मधली स्थिति' ही कादंबरी हरीनें लिहिली आहे हें बरेच दिवस माहीत नव्हतें. हरिभाऊंना महाराष्ट्राचे वॉल्टर स्कॉट म्हणण्यांत येतें, तें एरव्हीं जरी तितकेंसें यथार्थ नसलें तरी लेखकाच्या नांवासंबंधीं वाचकवर्गांत कुतूहल उत्पन्न झाल्यानंतर त्याचें नांव प्रसिद्ध होण्याच्या बाबतींत मात्र अगदीं यथार्थ आहे यांत शंका नाहीं.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांसंबंधीं लिहिण्यापूर्वी हरिभाऊंच्या कादंबऱ्या कोणत्या परिस्थितींतून निर्माण झाल्या, तें पाहणें आवश्यक आहे. हरिभाऊंचा जन्म खान-देशांत झाला होता तरी वयाच्या चवदाव्या वर्षापासूनचें त्यांचें पुढचें सर्व आयुष्य पुण्यासच गेलें. त्या काळचें पुणें हें वाङ्मयिक, सामाजिक व राजकीय अशा अनेक चळवळींचें केंद्र बनून राहिलें होतें. एकीकडे पेशवाईच्या गतवैभवाची आठवण करून देणारे कांहीं अवशेष दृष्टीस पडत होते, तर दुसरीकडे रावबाजीच्या वेळेस फैलावलेलीं कित्येक व्यसनेंहि कांहीं ठिकाणीं राजरोसपणें पाहावयास मिळत होतीं. त्यांत आणखी अट्टल व कट्टर सुधारक हे नवीन विलायती व्यसनांची भर घालीत होते. मिशनरी मंडळीच्या उपद्व्यापामुळें आधींच बिथरलेला सनातनी हिंदुसमाज सुधारकवर्गांतील कांहीं मंडळींच्या बेछूट वरळण्यामुळें व वाह्यात वागणुकीमुळें खवळून गेला होता. सार्वजनिक सभा, वक्तृत्वोत्तेजक सभा इत्यादि संस्थांतून वाद-विवादांबरोबर वितंडवादाच्याहि चकमकी झडूं लागल्या होत्या. नव्याजुन्याच्या वादांतून वादळें व वादळांतून ग्रामण्यें होऊं लागलीं होतीं. पाश्चात्य आणि प्राच्य संस्कृतींमधील या लढ्यांत त्या वेळच्या सर्व विद्वान् मंडळींनीं भाग घेतला होता. लोकहितवादी, रावसाहेब रानडे, गुरुवर्य भांडारकर, कुंटे, प्रो. जिन्सीवाले, टिळक, आगरकर यांजसारख्या बड्याबड्या धेंडांनीं त्या वेळचें पुण्याचें वातावरण प्रक्षुब्ध करून सोडलें होतें. शास्त्रीबोवांनीं वाङ्मयप्रतोद हातांत घेऊन 'निबंधमाले'च्या द्वारें संस्कृतिभ्रष्ट होऊं लागलेल्या समाजावर कोरडे ओढण्याचें व्रत चालूच ठेविलें होतें. अशा मोठ्या आणीबाणीच्या व चुरशीच्या काळांत हरिभाऊ पुण्यास राहा-वयास आले. हरिभाऊंना कादंबऱ्या लिहिण्याची स्फूर्ति जरी विलायती वाङ्मया-वरून झाली तरी त्यांच्या मनावर झालेले संस्कार सुधारणेचा सुवर्णमध्य साधण्याचा यशस्वी यत्न करणाऱ्या शास्त्रीबोवांच्या 'निबंधमाले'नेंच वाढीस लाविले होते.

शास्त्रीबोवांच्या अकालिक निधनानंतर दहाव्या दिवशींच हरिभाऊंनीं जो 'शिष्य-जनविलाप' प्रसिद्ध केला, त्यांत शास्त्रीबोवांचें व्रत पुढें चालू ठेवण्याची त्यांनीं प्रतिज्ञा केली होती. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांसंबंधीं लिहिण्यापूर्वी आणखी एक गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे ती ही कीं, त्या वेळीं हिंदुसमाजांत व हिंदुकुटुंबपद्धतींत जें द्वैत उत्पन्न झालें होतें, त्याचा बराबाईट अनुभव हरिभाऊंना खुद्द त्यांच्या घरांतच पाहावयास व अनुभवावयास मिळत होता. हरिभाऊंचे वडील जुन्या मताचे तर चुलते महादेव चिमणाजी कट्टे सुधारक. अविभक्तकुटुंबपद्धतींत होत असलेली व्यक्तित्वाची कुचंबणा हरिभाऊंच्या चांगल्या परिचयाची झाली होती. नात्याच्या निमित्तावर निराश्रित लोकांचा भरणा त्यांच्या कुटुंबांत वाढत्या प्रमाणांत झाल्या-मुळें समाईक कुटुंबांत फूट पडून हरिभाऊंच्या वडिलांनीं वेगळें बिऱ्हाड केलें होतें. हरिभाऊंना सावत्र आई देखील मिळाली होती. खुद्द त्यांचें लग्न पंधराव्या वर्षीच उरकून घेण्यांत आल्यामुळें बालविवाहाचे सोहाळे हरिभाऊंस स्वतःसच अनुभवा-वयास मिळाले होते. हरिभाऊंचें मित्रमंडळहि फार मोठें. पुण्यांतील हरतऱ्हेच्या बातम्यांचें हें मंडळ म्हणजे एक अड्डाच होता. नात्यागोत्याच्या व शेजारपाजारांच्या वाड्यांतूनहि अनेक मासलेवाईक दृश्यें हरिभाऊंस पाहावयास सांपडत असत. ही एकंदर परिस्थिति लक्ष्यांत घेतली म्हणजे हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतून त्या वेळच्या हिंदुसमाजाचें जें हुबेहूब चित्र पाहावयास सांपडतें, त्याची कारणपरंपरा समजून येते. विद्यार्थिदशेपासूनच हरिभाऊंस वाचनाची व लेखनाची मनस्वी हौस. त्यांच्या पहिल्या कादंबरीनेंच त्यांस मिळवून दिलेलें अभूतपूर्व यश व कॉलेजांतील परीक्षांत त्यांस वारंवार येऊं लागलेलें अपयश, ह्या परस्परविरुद्ध घटनांमुळें शेवटीं लेखन-व्यवसायासच स्वतःस वाहून घेण्याचें हरिभाऊंनीं ठरविलें. सारांश, हरिभाऊंची विशाल बुद्धि, मृदु अंतःकरण, संस्कारक्षम मन व भोंवतालच्या उच्च वातावरणा-मुळें त्याचा झालेला विकास, दांडगा व्यासंग, डोळ्यांसमोर ध्येयवादी व कर्तृत्वशाली अशा थोर व्यक्तींचा आदर्श व समाजसुधारणेच्या प्रश्नांना त्या वेळीं आलेलें महत्त्व हीं सर्व एकसमयावच्छेदें लक्ष्यांत आणिलीं म्हणजे उत्कृष्ट कादंबरीकार होण्यास आवश्यक असलेली मनोभूमिका हरिभाऊंच्या बाबतींत कशी उत्तम रीतीनें तयार झाली होती ह्याची कल्पना करतां येते.

हरिभाऊंनीं कादंबरीलेखनास जी प्रथम सुरुवात केली ती रेनॉल्ड्सच्या एका कादंबरीच्या भाषांतरानें. परंतु भाषांतर करीत बसण्याचा त्यांस लवकरच कंटाळा

येऊं लागल्यामुळें सुरुवातीचीं पात्रें त्यांनीं तशींच कायम ठेविलीं व कथानकांत बदल करून पुढील भाग स्वतंत्रपणें लिहून काढिला. प्रस्तुत कादंबरींत पुणेरी वाचकांस आपणास परिचित अशा कितीतरी व्यक्ति पाहावयास मिळाल्यामुळें ह्या कादंबरीनें पुण्यांत त्या वेळीं एकच खळबळ उडवून दिली. ह्या कादंबरींत सुधारणेची तरफदारी केली असूनहि ती ' पुणें वैभवा'सारख्या पुराणमताभिमानी पत्रांत क्रमशः प्रसिद्ध केली जात होती, यावरून तिच्या लोकप्रियतेची कल्पना करितां येईल.

हरिभाऊंनीं उण्यापुऱ्या अशा एकंदर एकवीस कादंबऱ्या लिहिल्या; यांखेरीज नाटकें, गोष्टी, चरित्रें, निबंध व कविता इत्यादि विविध प्रकारचें वाङ्मय निर्माण केलें तें निराळेंच. " इतर महत्त्वाचीं कामें संभाळून इतकी प्रचंड ग्रंथसृष्टि निर्माण करणारे हेच पहिले ग्रंथकार होत " हे हरिभाऊंविषयीं तात्यासाहेब कोल्हटकर यांनीं जे उद्गार काढिले आहेत ते यथार्थ आहेत.

## सामाजिक कादंबऱ्या

हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांपैकीं सात संपूर्ण असून बाकीच्या तीन अपुऱ्याच राहिल्या आहेत. मराठी कथात्मक वाङ्मयांत हरिभाऊंच्या पूर्वी वस्तुस्थिति-निदर्शक कादंबऱ्या ज्यांनीं ज्यांनीं लिहिल्या आहेत त्यांचा नामनिर्देश वर केलाच आहे. त्यांपैकीं कांहींच्या कादंबऱ्या भाषांतरित अगर रूपांतरित असून ज्या एक दोघांनीं स्वतंत्र कादंबऱ्या लिहिल्या आहेत त्यांचें स्वरूप फारच मर्यादित असल्यामुळें मराठींत वस्तुस्थितिनिदर्शक कादंबऱ्यांना खरी सुरुवात हरिभाऊंच्या 'आजकालच्या गोष्टीं'पासूनच झाली, असें म्हणावयास हरकत नाहीं. हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्या म्हणजे त्यांच्या स्वतःच्या जन्मापासून महायुद्धापर्यंतच्या हिंदुसमाजाचा पन्नास वर्षांचा कलात्मक पद्धतीनें लिहिलेला इतिहासच आहे. विलायती वाघिणीच्या दुधानें पुष्ट होऊन बाळसें घेतलेल्या सुशिक्षितांच्या बालिश चाळ्यांचें वर्णन हरिभाऊंनीं ' मधल्या स्थितीं'त ( १८८५ ) केलें. पाश्चात्य व्यसनें म्हणजे खरी पाश्चात्य संस्कृति असें ज्या पहिल्या पिढींतील सुधारकांस वाटत होतें त्याचें सुंदर चित्र प्रस्तुत कादंबरींत पाहावयास मिळतें. व्यसनाधीन लोकांच्या हातून आपल्या समाजांतील दुबळ्या स्त्रियांना कसें अमानुषपणें छळण्यांत येतें तें हृदयद्रावक रीतीनें दाखवून हरिभाऊंनीं हिंदु स्त्रियांविषयीं वाचकांच्या मनांत अनुकंपा उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला आहे. हरिभाऊंचा कानिटकर-पतिपत्नींसारख्या सुबुद्ध सुधारकांशीं परिचय झाल्यानंतर त्यांच्या संगतींत त्यांनीं मिल व हर्बर्ट स्पेन्सर यांच्या ग्रंथांचें

परिशीलन केलें होतें. ( कानिटकरांचा 'स्त्रियांची परवशता' हा भाषांतरित ग्रंथ तर प्रसिद्धच आहे. ) ह्या वाचनाचें दृश्य फल म्हणजे त्यांची 'गणपतराव' ( १८८७–८८ ) ही कादंबरी होय. पाश्चात्य वाङ्मयाचा ज्यांच्यावर सुपरिणाम झाला अशा कॉलेज तरुणांच्या आकांक्षेचें चित्र प्रस्तुत कादंबरींत पाहावयास मिळतें. सुखाच्या संसाराला सुशिक्षित पतिपत्नींची आवश्यकता, या कादंबरींत प्रतिपादिली आहे. स्त्रीशिक्षणाबरोबरच प्रौढविवाह, पुनर्विवाह यांची तरफदारीहि कादंबरींत केलेली आढळते. हिंदु समाजांतील रूढीच्या राक्षसी जुलमाचें एक अत्यंत भेसूर दृश्य म्हणजे असहाय बालविधवांचा केशवपनाचा प्रसंग. हरिभाऊंना असला एक दुर्धर प्रसंग प्रत्यक्षच पाहावयास मिळाला होता. या प्रसंगांतूनच 'पण लक्षांत कोण घेतो' ( १८९०-९३ ) या मराठींतील एक उत्कृष्ट कादंबरीचा जन्म झाला. एका स्त्रीनें आपल्या सरळ साध्या भाषेंत लिहिलेलें हें आत्मचरित्र कोणाच्याहि अंतःकरणाला चटका लावील असें सरस उतरलें आहे. हरिभाऊंनीं भाषेवर केवढें प्रभुत्व मिळविलें होतें याचें प्रत्यंतर प्रस्तुत कादंबरींत पाहावयास मिळतें. 'शंकर मामंजी' हें पात्र तर हिंदुसमाजांतील एक प्रतीकच होऊन बसलें आहे. अविभक्त हिंदुकुटुंबपद्धतीचें खरेंखुरें चित्र या कादंबरींत उत्तम रीतीनें रेखाटलें आहे. 'यशवंतराव खरे' ( १८९२-९५ ) या कादंबरींत हरिभाऊ राजकीय विषयाकडे वळले आहेत. सामाजिक सुधारणेविषयीं बेफिकीर व स्त्रियांसंबंधीं अनुदारपणाचे उद्गार काढणारा यशवंतराव हा, निर्भेळ राजकीय सुधारणा करणें हें ज्याचें ध्येय होतें अशा त्या वेळीं नुकत्याच अस्तित्वांत आलेल्या जहाल पक्षाचा एक ध्येयवादी शिपाईगडीच दिसतो. यशवंतरावाचें पात्र हरिभाऊंना टिळकांवरून सुचलें असावें असें वाटतें. 'यशवंतराव खरे' या कादंबरींत राजकीय सुधारणेच्या विचारांचें प्राथमिक स्वरूप दाखविलें आहे. त्या विचारांची परिणति 'मी' ( १८९३-९५ ) या कादंबरींत पाहावयास मिळत असल्यामुळें मराठी कादंबऱ्यांत हिची योग्यता फार मोठी आहे. देशाची उन्नति करावयाची असल्यास त्याकरितां सर्वस्वावर पाणी सोडण्यास कसें तयार झालें पाहिजे याचें स्फूर्तिदायक चित्र 'भावानंदां'त पाहावयास मिळतें. हरिभाऊंनीं ह्या कादंबरींत ज्या राजकीय ध्येयवादाचा पुरस्कार केला आहे त्याच स्वार्थत्यागी ध्येयवादावर पुढें महात्मा गांधी यांचें राजकीय तत्त्वज्ञान अधिष्ठित झालें ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. हरिभाऊंच्या यापुढील कादंबऱ्या म्हणजे 'जग हें असें आहे' ( १८९७–९९ ), 'भयंकर दिव्य' ( १९०१–०३ ),

'आजच' (१९०४–०६), 'मायेचा बाजार' (१९१०--१२) व 'कर्मयोग' (१९१३–१७) या होत. यांतील बहुतेकांत सामाजिक विषयांचीच चर्चा आली आहे. शेवटच्या 'आजच' व 'कर्मयोग' ह्या तर अपुऱ्याच आहेत. तथापि 'आजच' या कादंबरींत राजकीय, सामाजिक, औद्योगिक इत्यादि चळवळींबरोबर अराजकांच्या पंथासंबंधीं चर्चा करण्याचा हरिभाऊंचा विचार होता, असें दिसतें; कारण या कादंबरींत त्यांनीं अराजकांच्या पंथास जाऊन मिळणारें एक पात्र घातलें आहे. 'कर्मयोगां'त चंद्रशेखराच्या धार्मिक विचारांत झालेली क्रांति व उत्क्रांति दाखविण्याचा हरिभाऊंचा उद्देश असावा. सामाजिक कादंबऱ्यांतील यमुना, शंकरमामंजी, यशवंतराव, सत्यभामाबाई, श्रीधरपंत, भावानंद, शिवरामपंत, बसंतराव, नारायणराव, कृष्णबापू, चंद्रशेखर, बुलीस्नीक इत्यादि पात्रें कोणाच्याहि लक्ष्यांत कायमचीं ठसण्यासारखीं असून त्यांवरून हरिभाऊंच्या स्वभावरेखनाची हातोटी चांगलीच प्रत्ययास येते.

## ऐतिहासिक कादंबऱ्या

मराठींतील ऐतिहासिक कादंबरीची पहांट जरी गुंजीकरांच्या 'मोचनगडा-' बरोबर झाली होती, तरी त्याचा उदय हरिभाऊंच्या 'उषःकाला' बरोबरच (१८९६-९७) झाला असें म्हटलें पाहिजे. १८९५च्या सुमारास स्वदेशाभिमानानें प्रेरित होऊन महाराष्ट्रांतील अनेक विद्वानांनीं मराठ्यांच्या इतिहासाचें संशोधन करण्यास जी जोरानें सुरुवात केली तिजमुळेंच हरिभाऊंना शिवकालीन व इतर ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिण्याची स्फूर्ति झाली असावी. प्राचीन काळासंबंधीं हरिभाऊंनीं 'चंद्रगुप्त' (१९०२–१९०४) ही एकच कादंबरी लिहिली. यांतील चंद्रगुप्त, विष्णुगुप्त (चाणक्य), राक्षस, पर्वतेश व मुरादेवी हीं पात्रें ऐतिहासिक आहेत. या कादंबरीकरितां हरिभाऊंनीं मुद्राराक्षस, पद्मपुराण इत्यादि ग्रंथांचा फार सूक्ष्म अभ्यास केला होता. त्यांच्या सर्व ऐतिहासिक कादंबऱ्यांत ही उत्कृष्ट वठली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. ऐतिहासिक साधनें फारशीं उपलब्ध नसूनहि चंद्रगुप्ताच्या काळचें हुबेहूब वातावरण त्यांनीं केवळ कल्पनेनें निर्माण केलेलें पाहून एखाद्या इतिहाससंशोधकानेंहि आश्चर्यचकित व्हावें इतकें तें सरस उतरलें आहे. 'कालकूट' (अपूर्ण, १९०९–११) व 'वज्राघात' (१९१३–१५) या दोन कादंबऱ्या मध्ययुगीन कालांतील असून त्यांत अनुक्रमें पृथ्वीराज चव्हाण व जयचंद यांच्या वैमनस्याचा व तालिकोटच्या लढाईनंतर झालेल्या विजयानगरच्या साम्राज्याच्या

विनाशकालाचा इतिहास आला आहे. ‘ वज्राघात ’ या कादंबरीकरितां सेवेलच्या ‘ स्मृतिनष्ट साम्राज्य ’ व सूर्यनारायणरावांच्या ‘ अविस्मरणीय साम्राज्य ’ या दोन इंग्रजी ग्रंथांचा हरिभाऊंनीं फार चांगला उपयोग करून घेतला. शिवकालीन कादंबऱ्यांत ‘ उषःकाल ’, ‘सूर्योदय’ ( १९०५–०८ ), ‘ गड आला पण सिंह गेला ’ ( १९०३ ), ‘ सूर्यग्रहण ’ ( अपूर्ण, १९०८–०९ ), ‘ केवळ स्वराज्यासाठीं ’ ( १८९८–९९ ) व ‘ रूपनगरची राजकन्या ’ ( १९००–०२ ) या उण्यापुऱ्या सहा कादंबऱ्यांचा अंतर्भाव होतो. शिवकालीन कागदपत्र त्या वेळीं फारसे उपलब्ध नव्हते. त्यामुळें या कादंबऱ्या लिहितांना हरिभाऊंना सर्व भिस्त मराठी बखरी व पर्शियन बखरींचीं भाषांतरें, काव्येतिहाससंग्रह, पोवाडे, ऐतिहासिक गोष्टी आणि दंतकथा यांवरच ठेवावी लागली. याचा परिणाम असा झाला कीं, कादंबऱ्यांत भुयारादि साधनांचा अतिरेक होऊन त्यांत वाजवीपेक्षां फाजील अद्भुतपणा आला. शिवकालीन कादंबऱ्यांत शिवाजीमहाराजांनीं स्वराज्यस्थापनेस सुरुवात केल्यापासून तों संभाजीच्या अंतापर्यंतचा काळ रंगविला आहे. ‘ म्हैसूरचा वाघ ’ ( १८९०–९१ ) व ‘ मध्यान्ह ’ ( अपूर्ण, १९०६–०८) या दोन्ही कादंबऱ्या पेशव्यांच्या काळासंबंधींच्या आहेत.

हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांपेक्षां त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांचें स्वरूप फार वेगळें आहे. सामाजिक कादंबऱ्यांचीं कथानकें अगदीं साधीं असून त्यांत अद्भुतपणाचा लवलेशहि नाहीं; उलटपक्षीं त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांचीं कथानकें फार गुंतागुंतीचीं असून त्यांत अद्भुत प्रसंग ठिकठिकाणीं घातले आहेत. मुख्य कथानकाबरोबर उपकथानकांचीहि गुंफण करण्यांत आली आहे. त्या वेळीं उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक ग्रंथांचा व कागदपत्रांचा विचार करतां हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्या आजच्या इतिहाससंशोधकास निर्दोष वाटतील असें म्हणवत नाहीं.

या कादंबऱ्यांत ऐतिहासिक चालीरीती व स्थलें यांचीं पुष्कळ वर्णनें असूनहि त्यांत त्या मानानें फारशा चुका झालेल्या नाहींत. नाहीं म्हणावयाला ‘ रूपनगरची राजकन्या ’ या कादंबरींत मात्र ऐतिहासिक स्थल-काल-व्यक्तींच्या बाबतींत बराच गडबडगुंडा झालेला दिसतो. हरिभाऊंच्या बहुतेक सर्व ऐतिहासिक कादंबऱ्यांतून जी कल्पकता व कलात्मकता सुरुवातीला आढळून येते ती पुढें पुढें दिसून येत नाहीं. ‘ वज्राघात ’ या कादंबरींतील सुरुवातीचा भाग कल्पकतेच्या व कलात्मकतेच्या

दृष्टीनें उत्कृष्ट साधला आहे. तथापि प्रस्तुत कादंबरीचा पुढचा भाग मात्र तितकाच कलाहीन व कंटाळवाणा झाला आहे, असें म्हणावें लागतें. हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांत ' गड आला पण सिंह गेला ' ही कादंबरी आकारानें जितकी छोटी तितकीच गुणांनीं मोठी आहे असें कबूल करावें लागेल. ही कादंबरी अत्यंत बांधेसूद व रेखीव असून हरिभाऊंच्या इतर कादंबऱ्यांत आढळणारे पाल्हाळिकपणा, सैलपणा किंवा निष्काळजीपणा इत्यादि दोषांपासून पूर्णपणें अलिप्त आहे. कलापूर्ण ऐतिहासिक कादंबरी कशी लिहावी त्याचा ही कादंबरी म्हणजे आदर्शच आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. स्कॉटच्या पद्धतीप्रमाणें प्रस्तुत कादंबरींत पोवाडा घातला आहे, हा त्याचा आणखी एक विशेष आहे.

ऐतिहासिक कादंबऱ्या लिहितांना हरिभाऊंनीं स्कॉट व हॅगर्ड हेच ग्रंथकार आपल्या नजरेसमोर प्रामुख्यानें ठेविले होते व त्यामुळेंच हरिभाऊंना महाराष्ट्राचे वॉल्टर स्कॉट म्हणण्याची प्रथा पडली. तथापि स्कॉटचे सर्व गुण हरिभाऊंना आत्मसात् करतां आले नाहींत. कथानकांतील प्रमाणबद्धता, जानपद गीतें व पोवाडे यांचा उपयोग, पात्रांच्या स्वभावाचा परिपोष व निरनिराळ्या रसांचा उत्कर्ष हे स्कॉटचे गुण हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतून आढळून येत नाहींत. परंतु त्यामुळें मराठी ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या इतिहासांतील त्यांचें स्थान व योग्यता यांना बाध येत नाहीं. त्यांना मराठींतील ऐतिहासिक कादंबरीचे जनक म्हणून जरी म्हणतां आलें नाहीं, तरी मराठींत खऱ्याखुऱ्या ऐतिहासिक कादंबऱ्यांची परंपरा त्यांनींच निर्माण केली, असें म्हणावें लागतें. ' नाथमाधव ' व हडप यांनीं पुढें जी ऐतिहासिक कादंबऱ्यांची लांबलचक माला गुंफण्यास सुरुवात केली, तिचा मार्ग प्रथम हरिभाऊंनीं दाखवून दिला, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. ह्या दृष्टीनें हरिभाऊंस मराठी ऐतिहासिक कादंबऱ्यांचे आद्य संस्थापक म्हणावयास हरकत नाहीं.

ऐतिहासिक कादंबऱ्यांप्रमाणें हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांतहि बरेच दोष आढळून येतात. परंतु हरिभाऊंनीं आपल्या कादंबऱ्या ज्या परिस्थितींत व मन:स्थितींत लिहून काढल्या त्यांचा विचार केला म्हणजे त्यांच्या कादंबऱ्यांतून आढळून येणारे दोष अपरिहार्य होते, हें कबूल करावें लागेल. त्यांच्या बऱ्याच कादंबऱ्या ' करमणूक ' पत्रांत हप्त्याहप्त्यांनीं प्रसिद्ध होत असल्यामुळें त्यांत विस्कळितपणा फार आला आहे. किरकोळ गोष्टींचीं पाल्हाळिक वर्णनें केल्यामुळें पुष्कळ भाग कंटाळवाणा झाला आहे. क्षुद्र वस्तूंच्या याद्या दिल्या व बारिकसारिक

गोष्टींचीं लांबलचक वर्णनें केलीं म्हणजे वस्तुस्थितिनिदर्शक कादंबरी निर्माण होते, हा समज चुकीचा आहे. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतून पुनरुक्तीचा दोषहि बऱ्याच प्रमाणांत आढळतो. एकाच वेळीं बऱ्याच कादंबऱ्या लिहावयास हातीं घेतल्यामुळें तारतम्याचें अवधान त्यांस ठेवतां आलें नाहीं; त्यामुळें कांहीं ठिकाणीं पात्रांच्या नांवांतहि घोटाळा झाला आहे. भावनांचें वैचित्र्य व भाषेचा जोरकसपणा यांचा त्यांच्या कादंबऱ्यांत प्राय: अभावच आढळतो.

परंतु इतके दोष असूनहि हरिभाऊंच्या सामाजिक व ऐतिहासिक कादंबऱ्यांचा साकल्यानें विचार केला म्हणजे त्यांच्या ग्रंथवैभवाप्रमाणेंच त्यांचें बुद्धिवैभवहि चांगलेंच प्रत्ययास येतें. ग्रंथविस्ताराच्या आणि गुणविस्ताराच्या दृष्टीनें मराठी कादंबरीच्या इतिहासांतील त्यांचें स्थान केवळ अद्वितीय आहे. तत्कालीन पांढरपेशा समाजाच्या पलीकडे त्यांची दृष्टि गेली नाहीं हें जरी खरें, तरी मर्यादित समाजापुरतें कां होईना पण त्याचें यथार्थ चित्र त्यांच्या कादंबऱ्यांइतकें दुसऱ्या कोणाच्याहि कादंबऱ्यांत पाहावयास सांपडत नाहीं. समाजांत जीं निरनिराळ्या प्रकृतींचीं आणि विकृतींचीं माणसें त्यांना पाहावयास मिळालीं तींच त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांत घातल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्या आज जुन्या काळच्या वाटल्या तरी निर्जीव वाटत नाहींत. पांढरपेशा वर्गाच्या सामाजिक प्रश्नांच्या ज्या अनेक बाजू आहेत, त्या सर्वांचा त्यांनीं सहानुभूतिपूर्वक विचार केला असल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्यांत कोणत्याहि पक्षाला अन्याय झालेला दिसून येणार नाहीं. समाजाच्या वाईट बाजूचेंहि चित्र त्यांनीं रेखाटलें आहे; परंतु तें रेखाटतांना त्यांनीं सदभिरुचीचा कोठेंहि त्याग केलेला नाहीं, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. विदग्ध वाङ्मयाचा उद्देश केवळ आनंद उत्पन्न करणें हा त्यांनीं मानिला नाहीं. "आनंदोत्पादन, मनोरंजन, करमणूक हा एवढाच हेतु धरून कोणत्याहि महाकवीनें, किंवा नीतिबोधकारानें आपलीं काव्यें किंवा गोष्टी हीं रचिलीं नाहींत," असे उद्गार हरिभाऊंनीं एके ठिकाणीं काढिले आहेत, व त्याच अनुरोधानें त्यांनीं आपल्या सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. समाजांत अज्ञानी आणि अर्धशिक्षित लोकांचा जो मोठा वर्ग असतो, त्यांना राजमार्गानें सत्य व सत् यांचें ज्ञान नको असतें म्हणून रंजनाच्या मार्गानें तें त्यांस देण्यासाठीं हरिभाऊंनीं कादंबरीलेखनास सुरुवात केली व ती कामगिरी त्यांनीं उत्तम रीतीनें पार पाडली, हें कोणालाहि कबूल करावें लागेल. आगरकर यांस आपल्या 'सुधारकां'तील जोरदार भाषेंत लिहिलेल्या निबंधांनीं जी

सामाजिक सुधारणा करितां आली नाहीं ती हरिभाऊ आपल्या साध्या, सरस, मृदु व मोहक भाषेनें करूं शकले, हा त्यांच्या कलेचा विजयच म्हटला पाहिजे. हरिभाऊंची तुलना नेहमीं स्कॉट, डिकन्स व थॅकरे यांच्याशीं करण्यांत येते. स्कॉटपासून त्यांना ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिण्याची स्फूर्ति झाली हें खरें; तथापि इतर बाबतींत त्यांच्यामध्यें साम्य फार थोडें आहे. डिकन्सच्या कथानकांतील विस्कळितपणा हरिभाऊंच्या कादंबऱ्यांत सर्वत्र आढळतो; परंतु डिकन्सचा दणकटपणा, विनोद व व्यंगचित्रें काढण्यांतील त्याचा हातखंडा हे विशेष हरिभाऊंत दिसून येत नाहींत. ज्या अर्थानें थॅकरे यास समाजाचा टीकाकार संबोधण्यांत येतें त्या अर्थानें हरिभाऊ यांस सामाजिक टीकाकार म्हणतां येईल कीं काय याची शंकाच वाटते. नुकत्याच दिवंगत झालेल्या जॉन गाल्सवर्दीशीं मात्र त्यांची तुलना करतां येण्यासारखी आहे. हरिभाऊ समाजाचे टीकाकार नव्हते तर सामाजिक सुधारक होते. सुधारणेकरितां जेवढें दोषदिग्दर्शन करणें आवश्यक होतें तेवढेंच त्यांनीं केलें; त्यांच्या कादंबऱ्यांचा सर्व भर स्त्रीदास्यविमोचनावर होता; त्यांचा मानसपुत्र 'गणपतराव' याजप्रमाणें त्यांनीं स्वतःदेखील मिलच्या 'स्त्रियांची परवशता' या ग्रंथावर हात ठेवून, स्त्रीवर्गाच्या उन्नतीसाठीं आपली प्रतिभा खर्च करण्याची प्रतिज्ञा केली होती! कला व जीवन यांचा सुंदर मिलाफ त्यांच्या कादंबऱ्यांत आढळून येतो.

ग्रंथसंख्येच्या दृष्टीनें विचार करूं लागलों म्हणजे हरिभाऊंनंतर श्री. वि. सि. गुर्जर व 'नाथमाधव' यांची आठवण होते. श्री. गुर्जर यांच्या बहुतेक कादंबऱ्या भाषांतरित अगर रूपांतरित असल्यामुळें त्यांजविषयीं विस्तारपूर्वक लिहितां येत नाहीं. अनेक बंगाली कादंबऱ्यांची ओळख त्यांनीं मराठी वाचकांस उत्तम रीतीनें करून दिली आहे. त्यांच्या 'जीवनसंध्या', 'संसार असार', 'देवता', 'शशांक' इत्यादि कादंबऱ्या विशेष प्रसिद्ध आहेत. गुर्जरांची भाषा सुंदर व ओघवती असून कथाविषयाला पोषक अशी आहे. 'जीवनसंध्या' या कादंबरींतील भाषा विषयानुरूपच कां होईना पण बरीचशी संस्कृतप्रचुर व काव्यमय असली तरी गुर्जरांस घरगुती भाषा फार चांगली साधते, यांत शंका नाहीं. त्यांचे संवाद चटकदार असतात. संसारी माणसांचा विनोदहि त्यांच्या इतका इतरांना क्वचितच साधतो. 'मासिक मनोरंजन' ज्या वेळीं लोकप्रिय होतें, त्या काळांत श्री. गुर्जर यांच्या कादंबऱ्यांनीं मराठी वाचकांचें चांगलेंच मनोरंजन केलें. सुप्रसिद्ध वंग कादंबरीकार प्रभातकुमार मुकर्जी ह्यांची मराठी वाचकांस उत्तम ओळख श्री. गुर्जर यांनींच प्रथम करून दिली.

श्री. द्वारकानाथ पितळे उर्फ 'नाथमाधव' हे वस्तुतः शिपाईगडी व्हावयाचे; पण योगायोग असा कीं, तरवारीऐवजीं त्यांना हातांत लेखणी घ्यावी लागली. पण अंगांत चिकाटी असली म्हणजे तरवारबहाद्दराचा कलमबहाद्दर कसा बनूं शकतो, हें नाथमाधवांच्या आयुष्यावरून चांगलें दिसून येतें. स्वराज्यविषयक 'श्रीगणेशा' दि कादंबऱ्या सोडल्या तर त्यांच्या इतर कादंबऱ्यांत पुष्कळच वैचित्र्य आढळून येतें. त्यांनीं भाषांतरेंहि अनेक केलीं आहेत. तथापि परकीय ग्रंथांवरून सुचलेल्या व स्वतंत्र अशाहि त्यांनीं पुष्कळच कादंबऱ्या लिहिल्या आहेत, हें विसरून चालणार नाहीं. १९०५ सालापासून त्यांच्या 'प्रेम आणि सूड', 'जग हें असेंच', 'ग्रहदशेचा फेरा', 'रायक्लब अथवा सोनेरी टोळी', 'विहंगवृंद', 'वीरधवल', 'सांवळ्या तांडेल', 'हेमचंद्र रोहिणी', 'दैवाचे खेळ', 'देशमुखवाडी', 'विमलेची ग्रहदशा', 'सुहासिनी', 'सापत्नभाव', 'डॉक्टर कादंबरी', 'श्री-निवास', 'नटसम्राट्', 'स्वयंसेवक' इत्यादि कितीतरी कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. 'स्वराज्याचा श्रीगणेशा', 'स्वराज्याचा कारभार', 'स्वराज्यावरील संकट', 'स्वराज्याची स्थापना', 'स्वराज्याचें परिवर्तन' या कादंबऱ्यांतून शिवाजीनें तोरणा किल्ला घेऊन स्वराज्याचें तोरण कसें बांधलें, कल्याणच्या सुभेदाराच्या सुनेला मातेप्रमाणें मानून तिला महाराजांनीं कशी परत पाठविली, मुसलमान झालेल्या बजाजी निंबाळकराला पुन्हा हिंदुधर्मांत घेऊन शिवाजीराजे यांनीं आपली धार्मिकता, दूरदृष्टी व प्रगमनशीलता कशी व्यक्त केली, अवरंगजेबाच्या नजरकैदेंतून मोठ्या शिताफीनें त्यांनीं आपली कशी सुटका करून घेतली, महाराजांनीं आंखून दिलेल्या राजकीय धोरणांत ढिलाई होतांच मराठेशाहीची घडी कशी विस्कटली, पुढें संभाजीच्या व राजारामाच्या कारकीर्दींत अनेक हृदयद्रावक व रोमहर्षण प्रसंग कसे घडले, याचें वर्णन आलें आहे. मात्र ऐतिहासिक घटनांत त्यांनीं प्रणयप्रधान कथानकांची वाटेल तशी गुंफण केल्यामुळें त्यांतील ऐतिहासिक सत्यास बराच बाध आला आहे. 'श्रीनिवास' या कादंबरींत शास्त्रीय विषयाला मनोरंजक स्वरूप दिलेलें आढळतें. मराठींतील आरमारविषयक पहिली कादंबरी या दृष्टीनें 'सांवळ्या तांडेल' या कादंबरीचें महत्त्व विशेष आहे. 'विहंगवृंद' या सामाजिक कादंबरींत बसू-बिलाच्या चळवळीचें प्रतिबिंब पडलें असून, स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, विधवाविवाह हे विषय आले आहेत. 'विमलेची ग्रहदशा' या कादंबरींत पतितपरावर्तनाचा पुरस्कार केला असून, 'ग्रहदशेचा फेरा' यांत

देशी डॉक्टर व परिचारिका यांच्याशीं तुलना करतां विलायती डॉक्टर व परिचारिका कशा श्रेष्ठ आहेत हें एका प्रत्यक्ष घडलेल्या प्रसंगावरून दाखविलें आहे. नाथमाधवांची 'राजक्रांत अथवा सोनेरी टोळी' ही अगदीं नवीन धर्तीची कादंबरी त्या वेळीं फारच लोकप्रिय झाली होती. 'स्वयंसेवकां' त संघ स्थापून समाजसेवा कशी करतां येईल याचें विवेचन आलें आहे. नाथमाधव यांचें शिक्षण व आरंभींचा व्यवसाय यांचा विचार करतां त्यांनीं निर्माण केलेलें कथात्मक वाङ्मय पाहून आश्चर्ययुक्त कौतुक वाटतें.

हरिभाऊंच्या संप्रदायांतच श्री. बाळकृष्ण संतुराम गडकरी यांची गणना केली पाहिजे. त्यांच्या 'पुष्पमाला' व विशेषत: 'सुधारणेचा मध्यकाल' या कादंबऱ्यांतून त्यांचें कल्पकता, मनुष्यस्वभावाचें मार्मिक निरीक्षण व भाषासरणी इत्यादि गुण प्रामुख्यानें दिसून येतात.

श्री. सी. के. दामले यांच्या 'जग हें त्रिविध आहे' या कादंबरींत त्रिगुणात्मक सृष्टींत विविध प्रकार कसे पाहावयास मिळतात याचें वर्णन केलें असून, 'न्याय कीं अन्याय' ही कादंबरी बँकांचे व्यवहार कसे चालतात, लबाड लोक पापभीरु माणसांना फसवून व लुबाडून उजळ माथ्यानें समाजांत कसे वावरूं शकतात, या विषयांवर रचिली आहे. त्या वेळीं बँकांच्या दिवाळखोरीला ऊत आला होता ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. प्रो. ना. के. बेहेरे यांच्या 'जीवनरहस्य' या कादंबरींतहि बँकांचा घोंटाळा आला आहे.

श्री. वासुदेव गोविंद आपटे यांच्या 'दु:खाअंतीं सुख', 'माणिक बाग' व 'विलक्षण भोळेपणा' या रूपांतरित कादंबऱ्या लोकप्रिय असून पहिलींत मध्यम स्थितींतील पांढरपेशा वर्गांतील स्त्री आपत्कालांत अन्नें दिवस काढून कुटुंबरक्षणाची व आपल्या शिक्षणाची जबाबदारी कशी उत्तम रीतीनें पार पाडते याचें सुंदर चित्र काढलें आहे. त्यांतहि मधुकरी मागून विद्यार्जन करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या आयुष्याचें वर्णन केलें असल्यामुळें आपटे यांच्या इतर पुस्तकांप्रमाणें या कादंबरींतहि बालवाङ्मयाविषयींचा आपला लौकिक त्यांनीं कायम राखिला आहे. बंकिमचंद्रांच्या सर्व कादंबऱ्यांचीं त्यांनीं मराठींत रूपांतरें केलीं असून त्यावरून त्यांचें बंगाली व मराठी भाषांवरील प्रभुत्व चांगलें दिसून येतें. श्री. गुर्जर व आपटे यांच्याप्रमाणेंच रा. मित्र, 'शारदाश्रमवासी', रणदिवे व भसे यांनीं बंगाली कादंबऱ्यांचीं भाषांतरें केलीं आहेत. श्री. कृ. के. गोखले यांचीं 'आजपासून पन्नास वर्षांनीं', 'स्वर्गीय प्रेम', 'तिलोत्तमा'

इंग्रजी कादंबऱ्यांचीं रूपांतरें असून तीं फारशीं सरस उतरलेलीं नाहींत. श्री. भसे यांची 'भारतगौरवग्रंथमाला' (ही हल्लीं मंगेशराव कुलकर्णी हे चालवितात), श्री. कोठारी यांची 'सुरसग्रंथमाला' व श्री. पांगळ यांची 'सरसवाङ्मयरत्नमाला' या मालांतून भाषांतरित, रूपांतरित व स्वतंत्र अशा अनेक वऱ्याबाईट कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. 'रजनी', 'प्रेमळ सवत', 'गुर्जर वीर अनहिल', 'अस्तनींतील निखारा', श्री. जानकीबाई देसाई यांच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या 'ताजमहाल' व 'मूकनायिका', शहा यांच्या 'सम्राट् अशोक' व 'छत्रसाल' आणि प्रो. फडके यांची Temporal Power वरून लिहिलेली 'अल्लाहो अकबर' इत्यादि कादंबऱ्या या मालांमुळेंच लोकांच्या वाचनांत आल्या. श्री. दातार यांनीं रेनॉल्ड्सच्या अनेक कादंबऱ्यांचीं भाषांतरें केलीं आहेत. 'उद्यान'चे संपादक म्हणून प्रसिद्ध असलेले श्री. ग. वि. कुलकर्णी यांनींहि 'कर्मसंन्यास', 'जन्मठेप', 'चंद्रचूड' वगैरे स्वतंत्र कादंबऱ्या लिहिल्या असून त्यांत बेवारशी अनाथ संतति, हिंदु विवाहपद्धतींतील दोष, व औद्योगिक चळवळ इत्यादि विषय आले आहेत. प्रो. वेहेरे यांच्या एका कादंबरीचा उल्लेख वर केलाच आहे. त्याखेरीज त्यांनीं 'सीतावनवास', अहिल्योद्धार' ह्या पौराणिक, 'युद्ध संसार' ही सामाजिक व अगदीं अलीकडे वेल्सच्या 'कालयंत्र' या पुस्तकावरून सुचलेली 'ध्येयाकडे' ही अद्भुत, अशा निरनिराळ्या स्वरूपाच्या कादंबऱ्या प्रसिद्ध केल्या आहेत. त्यांच्या 'हिंदु कोण' या कादंबरींत शिवकालीन महाराष्ट्रसमाज पतितपरावर्तनास कसा अनुकूल होता हें दाखविलें आहे. श्री. वेहेरे यांच्या कादंबऱ्यांचें त्यांच्याच शब्दांत वर्णन करावयाचें म्हणजे त्यांतील विषय किंवा कथानक हीं कोणत्याहि स्वरूपाचीं असलीं तरी त्यांवर "ध्येयात्मक भविष्यकालाची सफेती" मारलेली असते.

श्री. कृष्णाजी अनंत एकबोटे ऊर्फ 'सहकारी कृष्ण' यांनीं १९१३ पासून १९१६ पर्यंत 'ही प्रेमाची मूस कीं पुरुषार्थाची कूस ?', 'माझी कहाणी', 'हा संसार कीं नरकवास', 'आत्मोद्धार', 'देहस्वभाव', 'संक्रांत', 'शिकली पण चीज केलें', 'आधुनिक स्वयंवर', 'मानापमान', 'अपमानाचा मान', 'संकट कीं सौभाग्य', 'खुनाचा आरोप', 'चैत्राचा महिना', 'वर्षारंभ,' 'अखेरचा स्वार्थत्यागी देशस्थ', वगैरे लहानसहान कादंबऱ्या लिहिल्या असून त्यांत त्यांना स्वतःच्या खडतर आयुष्यांत आलेल्या अनेक दुःखद प्रसंगांमुळें सुचलेले कौटुंबिक व सामाजिक विषय आले आहेत. त्यांच्या 'शापित महाराष्ट्र' व 'राजकुवर' या

ऐतिहासिक कादंबऱ्या विशेष प्रसिद्ध असून त्यांत संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दीतील पडत्या काळांतहि मराठ्यांनीं आपलें शौर्य कसें प्रकट केलें याचें चित्र रेखाटलें आहे. ऐतिहासिक कादंबरी या नात्यानें 'शापित महाराष्ट्रा'ची योग्यता मोठी असून तिजमुळेंच 'सहकारी कृष्णां'चें नांव विशेषेंकरून लक्षांत ठेविलें जाईल. मात्र बड्या माशानें छोट्या माशाला गिळंकृत करावें त्याप्रमाणें 'राजकुवर'ला 'शापित महाराष्ट्रा'नें आपल्यांत समाविष्ट करून घेतल्याचा भास होतो. 'सहकारी कृष्णां'ची भाषा संस्कृतप्रचुर आहे.

शिवरामपंत परांजपे यांची 'गोविंदाची गोष्ट' ही लहानशी कादंबरीच झाली असून तींत शिवरामपंतांच्या पद्धतीप्रमाणें लांबलचक काव्यमय वर्णनें, वक्तृत्वपूर्ण स्वगत भाषणें व अद्भुत प्रसंग यांची रेलचेल आहे. 'विंध्याचल' या नवलपूर्ण कादंबरींतहि कमीअधिक प्रमाणांत हाच प्रकार आढळतो. चिंतामणराव वैद्य यांची 'दुर्दैवी रंगू' ही ऐतिहासिक कादंबरी पानिपतच्या लढाईविषयींची असून त्यांत ऐतिहासिक माहितीबरोबर एका बालविधवेची करुण कहाणी सांगितली आहे. प्रस्तुत कादंबरीच्या पूर्वभागांत सामाजिक विषयाला प्राधान्य मिळालें असून कादंबरीचा उत्तर भाग मात्र प्रायः ऐतिहासिक घटनांचें वर्णन करण्यांत खर्च झाला आहे. कित्येक ठिकाणीं तर बखरींतील वाक्यें व तळटीपा पाहून आपण ऐतिहासिक कादंबरी वाचीत आहोंत कीं ऐतिहासिक निबंध वाचीत आहोंत, याची भ्रांत पडते. तथापि या कादंबरींत ऐतिहासिक सत्याबरोबर पेशवाईंतील पुण्यांतील रंगपंचमी, नवरात्र, सती, दत्तविधान, मंत्रविद्या, ज्योतिष, रमल इत्यादि अनेक बऱ्यावाईट धार्मिक सामाजिक चालीरीतींचीहि माहिती दिली असल्यामुळें तिचें महत्त्व विशेष आहे. बालविधवांच्या करुणास्पद स्थितीबद्दल सहानुभूति उत्पन्न करणें हा देखील या कादंबरींतील एक हेतु असल्यामुळें श्री० वैद्य यांनीं एका दगडानें दोन पक्षी मारल्याचें श्रेय संपादन केलें आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. श्री. वैद्य यांची इतिहासकार या नात्यानें असलेली थोर योग्यता लक्षांत घेऊनच कीं काय रियासतकार सरदेसायांनीं आपल्या रियासतींतील पानिपत प्रकरणांत वैद्यांच्या कादंबरींतील कांहीं उतारे ऐतिहासिक पुरावे म्हणून सादर केले आहेत!

हरि नारायण आपटे यांच्याशीं असलेल्या नामसादृश्यामुळें चटकन् लक्षांत येणारे श्री. नारायण हरि आपटे हे ग्रंथसंख्येच्या बाबतींतहि हरिभाऊंच्या तोडीचे आहेत हें कबूल करावें लागेल. आपटे यांचा कादंबरीलेखनाचा हव्यास अजूनहि चालूच आहे.

त्यांची 'अजिंक्य तारा' ही कादंबरी १९०५ सालीं प्रसिद्ध झाली; व तेव्हांपासून 'आनंद-मंदिर', 'कपटजाल', 'कर्मगति', 'कल्पनाचित्र', 'भुरळ', 'पिशाच्च-साधन', 'लाञ्छित चन्द्रमा', 'रजपुतांचा भीष्म', 'दुरंगी दुनिया', 'समर्थ-शिष्य', 'सुखाचा मूलमंत्र', 'वैभवाच्या कोंदणांत', 'हृदयाची श्रीमंती', 'पहांटेपूर्वीचा काळोख', 'संधिकाल', 'न पटणारी गोष्ट ऊर्फ चित्तशुद्धि', 'मानवी आशा विरुद्ध देवाची इच्छा', 'ऐरणीवरील हिरा', 'रत्नगुंफा', 'याला कारण शिक्षण' इत्यादि लहानमोठ्या कितीतरी त्यांनीं कादंबऱ्या लिहिल्या आहेत.

राजाराम महाराजांच्या निधनानंतर त्यांच्या इच्छेनुसार नवी राजधानी स्थापन करण्याकरितां मराठ्यांनीं साताऱ्याचा 'अजिंक्यतारा' जिंकला, या प्रसंगावर नाना-साहेब आपटे यांनीं लिहिलेल्या 'अजिंक्य तारा' या कादंबरीनें त्यांस सुरुवातीसच चांगली लोकप्रियता मिळवून दिली. 'रजपुतांचा भीष्म' ही ऐतिहासिक कादंबरी उदेपूर व मारवाड यांजमधील वैमनस्यावर उभारलेली असून तींत आपल्या सावत्र भावाच्या सुखासाठीं एका स्वार्थत्यागी रजपुत राजपुत्रानें राज्यावरील आपल्या हक्का-वर पाणी कसें सोडलें, याची हकीकत आली आहे.

गुजराथच्या बहादुरशहानें चितोडला वेढा दिला तेव्हां तेथील रजपूत कुमा-रींनीं आपलें कौमार्य व धर्म यांजवर गदा येऊं नये म्हणून चितेंत आपल्या प्राणांची आहुति कशी दिली याचें वर्णन 'मानवी आशा विरुद्ध देवाची इच्छा' या कादंबरींत केलें आहे. दुर्व्यसनी नवऱ्याच्या पायीं कोसळलेलीं अनेक संकटें व दुःखें यांस त्याच्या पतिव्रता स्त्रीनें धीरानें कसें तोंड दिलें याचा वृत्तांत 'भुरळ' या कादं-बरींत वाचावयास सांपडतो. 'शरीरमाद्यं खलु सौख्यसाधनम्' हें तत्त्व 'सुखाचा मूलमंत्र' हींत विशद करून सांगितलें असून तींत शरीर निरोगी, मजबूत व कार्य-क्षम ठेवण्याकरितां व्यायाम घेणें कसें आवश्यक आहे हें सोदाहरण सांगितलें आहे. 'न पटणारी गोष्ट ऊर्फ चित्तशुद्धि' या कादंबरींत एका बाणेदार मुलीनें आपल्या म्हाताऱ्या व म्हातारचळ लागलेल्या नवऱ्याशीं पत्नी या नात्यानें वागण्यास तयार न होतां आपलें पातिव्रत्य कसें अभंग राखलें, याचें चित्र पाहावयास मिळतें. सुरुवातीच्या सामाजिक कादंबऱ्यांतून नानासाहेब आपटे यांचीं मतें फारशीं सुधारलेलीं दिसून येत नाहींत; परंतु 'पहांटेपूर्वीच्या काळोखांत' मात्र त्यांनीं प्रेमविवाहाला मान्यता दिली आहे. 'याला कारण शिक्षण' ही कादंबरी १९२७ सालीं प्रसिद्ध झाली असली तरी ती मूळ १९१३ सालीं लिहिली असून तींत चांगल्या शिक्षणामुळे

समाजाचें शील कसें वाटतें तें दाखविलें आहे. अर्धवट लिहून पडलेली 'रत्नगुंफा' ही कादंबरीहि त्यांनीं पुढें चौदा वर्षांनंतर पुरी करून अलीकडे प्रसिद्ध केली आहे. ही कादंबरी ' सुखाचा मूलमंत्र ' या कादंबरीप्रमाणें विद्यार्थ्यांकरितांच लिहिलेली असून तींत उद्योग, धाडस, चिकाटी इत्यादि गुणांचा पुरस्कार केलेला आढळतो. प्रस्तुत कादंबरीचें कथानक मात्र 'इंद्रभुवन गुहा', 'मंजुघोषा' इत्यादि अद्भुत कादंबऱ्यांच्या काळाला शोभेल अशा तऱ्हेचें आहे. कादंबरींत नशीब कीं उद्योग हा प्रश्न उपस्थित करून त्याचें उत्तर दोन्ही पाहिजेत, असें दिलें आहे. उंदराच्या लेंड्या देखील नीट जतन करून ठेविल्या असतां दैव अनुकूल होतांच त्यांची वैद्याला गरज पडून पैसे कसे मिळतात हें या कादंबरींत एके ठिकाणीं दाखविलें असल्यामुळें दैव आणि उद्योग यांचें साहचर्य कशा प्रकारचें असूं शकतें याची कल्पना करतां येते. दैववादी आळशी मनुष्य कल्पक असतो, हें तत्त्वहि या कादंबरींत ग्रथित केलें असल्यामुळें आळशी लोकांनाहि रा. आपटे यांनीं एक समाधानाची जागा उत्पन्न करून ठेविली आहे. ' ऐरणीवरील हिरा ' ही लघु कादंबरीहि विद्यार्थ्यांकरितांच असून तींत विनायक या नांवाच्या अनाथ व चोरीबद्दल शिक्षा झालेल्या एका मुलाचें चरित्र रंगाविलें असून तद्वारें सद्वर्तनाची महती पटविली आहे.

रा. नारायणराव आपटे यांनीं अगदीं सुरुवातीपासूनच " कोणतीहि कादंबरी लिहितांना सदभिरुचीचें उल्लंघन करावयाचें नाहीं व समाजाच्या नीतीचा व शीलाचा दर्जा वाढेल अशाच गोष्टींचें वर्णन करावयाचें," असा निश्चय केला असल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्या बोधप्रधान झाल्या आहेत. कलेपेक्षां कथानकाकडे व कथानकापेक्षां उपदेशाकडे त्यांचा ओढा अधिक असल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्यांत एका विशिष्ट पद्धतीचा अवलंब केलेला आढळतो. सद्गुण अगर दुर्गुण यांची मीमांसा करीत न बसतां अगर त्यांच्या मिश्रणामुळें आलेल्या मानवी स्वभावाच्या वैचित्र्याचें चित्रण न करतां दुर्गुणांचा निषेध व सद्गुणांचा पुरस्कार करणें, हेंच रा. आपटे यांनीं आपलें ध्येय ठरविल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्या नीतिपाठमेवा म्हणून किंवा मुलांस उत्तम बक्षीस म्हणून विद्यार्थिवर्गास बिनधोकपणें द्यावयास हरकत नाहीं, अशा स्वरूपाच्या व दर्जाच्या झाल्या आहेत. विशुद्ध व सोंवळें वातावरण, उपदेशप्रधान कथानक व सरळ साधी भाषा हे त्यांच्या कादंबऱ्यांचे विशेष म्हणून सांगावयास हरकत नाहीं. पातिव्रत्य, सहनशीलता, सद्वर्तन, साहस, प्रामाणिकपणा, उद्योग, व्यायाम, ब्रह्मचर्य, चिकाटी, प्रवास, मातृप्रेम, भ्रातृप्रेम, महत्त्वाकांक्षा, धंदेशिक्षण, इत्यादि

गुणांची त्यांच्या कादंबऱ्यांत महती गायिली असल्यामुळें त्यांचीं कथानकेंहि त्याच अनुरोधानें सजविलीं आहेत. मात्र उपर्युक्त गुणांची मशागत करण्याकरितां त्यांच्या कादंबऱ्या जितक्या वस्तुस्थितिनिदर्शक व्हावयास पाहिजेत. तितक्या झालेल्या दिसून येत नाहींत. कादंबऱ्यांत अद्भुतपणा व अवास्तवपणा पुष्कळच आढळून येतो. कांहीं कादंबऱ्यांचीं कथानकें परकीय ग्रंथांवरून सुचलीं असावींत अशी शंका येते.

## १९१५ पासून पुढें

## विचार-विलास

प्रो. वामन मल्हार जोशी यांच्या 'रागिणी'नें मराठी कादंबरी वाङ्मयांत एक नवीन प्रकार आणून तो लोकप्रिय करून दाखविला. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतील घरगुती गोष्टींचा वाचकांस आतां कंटाळा येऊं लागला होता, व हरिभाऊंच्या समकालीन इतर कादंबरीकारांनींहि मनोरंजन हेंच ध्येय डोळ्यांसमोर ठेवल्यामुळें सुशिक्षित समाजाची बौद्धिक भूक अतृप्तच राहिली. सुशिक्षित व सुसंस्कृत वाचकवर्गाची ही भूक वामनरावांच्या 'रागिणी'नें उत्तम रीतीनें पुरविल्यामुळें तिला एकदम लोकप्रियता मिळाली. मात्र ज्या 'रागिणी'नें वाचकवर्गावर पहिल्या भेटीबरोबरच एकदम एवढी मोठी मोहिनी घातली तिला आपण होऊन मागणी घालणें तर दूरच, परंतु दोन तीन स्थळीं ती आपण होऊन सांगून गेली असतांहि तिला गडकऱ्यांच्या ठकीप्रमाणें या जन्मीं कर्तव्य नाहीं अशा अर्थाचीं उत्तरें मिळावीं याचें राहून राहून सखेदाश्चर्य वाटतें व प्रकाशकांविरुद्ध मन कलुषित झाल्यावांचून राहत नाहीं. कारण कादंबरीची योग्यता ओळखणें तर दूरच परंतु स्वतःच्या धंद्याच्या दृष्टीनें कोणता माल किफायतशीर होईल याचीहि पारख करण्यास ते असमर्थ आहेत असें या प्रकारावरून म्हणण्याची पाळी येते. असो. हरिभाऊंनीं आपल्या सामाजिक कादंबऱ्यांतून स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, इत्यादि प्राथमिक सुधारणांची तरफदारी केली होती. तरी सुशिक्षित व प्रौढ अशा स्त्रियांचीं चित्रें किंवा चरित्रें रंगविण्याचा काळ त्या वेळीं आला नव्हता; त्यामुळें जे इंग्रजी शिक्षणामुळें सुविनीत किंवा दुर्विनीत झाले अशा तरुणांचींच पात्रें हरिभाऊंनीं आपल्या कादंबऱ्यांत घालून नवीन विद्येचे त्या वेळच्या पुरुषवर्गावर काय परिणाम झाले ते दाखविले. परंतु हळुहळू शहरांतून स्त्रीशिक्षणाचेंहि पाऊल पुढें पडत होतेंच. त्याचा परिणाम असा झाला कीं, हें पुढें पडत असलेलें पाऊल वांकडें पडत आहे किंवा वांकडें पडण्याचा संभव आहे अशा तऱ्हेची टीका पुराणमताभिमानी लोकांकडून होऊं लागली. फार काय कित्येकांनीं

स्त्रीशिक्षण हा थट्टेचा विषय करून तत्संबंधीं विडंबनात्मक कादंबऱ्या, नाटकें, नाटिका व फार्सहि लिहिले. इंग्रजी शिक्षणाच्या अर्ध्या हळकुंडानें पिंवळ्या होऊं पाहणाऱ्या तरुणी गर्विष्ठ, फाजील, वडिलांचा मान न ठेवणाऱ्या, उर्मट व थिल्लर होतात, अशी समजूत सर्वसाधारणपणें सर्वत्र रूढ झाली होती. त्या वेळच्या या प्रचलित समजुतीला वामनरावांच्या रागिणीनें व उत्तरेनें आळा घालून समाजास स्त्रीशिक्षणाची महती उत्तम रीतीनें पटवून दिली. 'सुशिक्षित मुली वाईट नसतात, एवढेंच नव्हे तर त्या अत्यंत प्रेमार्ह व आदरणीय असूं शकतात' हें वामनरावांनीं रागिणी व उत्तरा या पात्रांच्या द्वारें सिद्ध करून दाखविलें. एवढेंच नव्हे, तर वामनरावांनीं ही कामगिरी कादंबरींत शिक्षणामुळें बहकलेल्या तरुणीचें एकहि पात्र न घालूनहि कलात्मक दृष्टीनें उत्कृष्ट रीतीनें पार पाडली. रागिणी व उत्तरा यांच्या चांगुलपणास चांगला उठाव मिळावा म्हणून वाईट चालीच्या शिक्षित मुलीचें पात्र घालण्याचा मोह कोणाहि कादंबरीकारास होणें स्वाभाविक होतें. परंतु हा मोह दूर सारून वामनरावांनीं रागिणी व उत्तरा यांच्या मनोरचनेंतच असें वैचित्र्य उत्पन्न केलें आहे कीं, त्यामुळें त्या दोघींच्याहि स्वभावाला उठाव मिळतो, एवढेंच नव्हे तर त्यांचें व्यक्तिविशिष्टत्व शेवट-पर्यंत कायम राहूनहि त्या एकमेकींना पूरक होतात. अनुरागशील रागिणी भावनाप्रधान, विनयवती, गोड स्वभावाची, पड खाणारी व भांडणें मिटवून आयुष्य सुखमय करणारी अशी दाखविली असल्यामुळें तिजविषयीं जिव्हाळा वाटूं लागतो व सरळ, निष्कपटी, स्पष्टवक्ती, वादविवादांत आपली बाजू न सोडणारी, वैयक्तिक हक्कांचा पुरस्कार करणारी व आपल्या बुद्धिमत्तेनें प्रतिपक्ष्यास निरुत्तर करणारी सफ्रेजेट उत्तरा आपल्याविषयीं वाचकांचे मनांत आदर उत्पन्न करते. अशा रीतीनें दोन्हीहि तरुणी सुशिक्षित, सुशील, सद्भावनायुक्त व ध्येयवादी असूनहि त्यांचें स्त्रीत्व व व्यक्तिमत्त्व शेवटपर्यंत कायम टिकविण्यांत वामनरावांचें कलाकौशल्य चांगलेंच प्रकट झालें आहे, हें कबूल करावें लागतें. या दोन परस्पर-भिन्न स्वभावांच्या तरुणींच्या अनुषंगानें वामनरावांनीं प्रस्तुत कादंबरींत काव्यशास्त्र-विनोदाची पखरण सढळ हातानें इतस्ततः केली आहे. 'रागिणी'ला 'काव्यशास्त्र-विनोद' हें वैकल्पिक नांव वामनरावांनीं देऊन ठेविलें आहे म्हणून बरें, नाहींतर प्रस्तुत कादंबरींतील, धर्म खरा कीं भौतिक शास्त्रें खरीं, ब्रह्म निर्गुण कीं सगुण, बुद्धीपासून फायदे व तोटे, नीतीचा उगम, अंतःस्फूर्त ज्ञान विरुद्ध तर्क, ईश्वराचें अस्तित्व, सृष्टीचा नियम स्वार्थ आहे कीं स्वार्थत्याग आहे, जग आनंदमय व प्रेममय आहे कीं दुःख-

मय व कलहमय आहे, दुःख उत्पन्न करण्यांत ईश्वराचा हेतु कोणता असावा, इत्यादि अनेक तात्त्विक विषयांची चर्चा एरव्हीं कितीहि सरस व उद्बोधक असली तरी क्वचित् स्वभावदिग्दर्शनाव्यतिरिक्त कादंबरीच्या मूळ कथानकाला त्यांची काय आवश्यकता आहे व असल्यास ती किती प्रमाणांत आहे या प्रश्नाचें उत्तर वामनरावांस समाधानकारक देतां आलें असतें काय, याची शंका वाटते. एक भय्यासाहेब सोडले तर परमार्थाची तळमळ विजयगांवकर मंडळीपैकीं इतर कोणास होती असें वाटत नाहीं, व त्यामुळें या वादविवादांचा त्यांच्या दररोजच्या वागणुकीवरहि कांहीं परिणाम झालेला दिसून येत नाहीं. स्वतः वामनरावांसच असल्या चर्चांची मनस्वी हौस असल्यामुळें त्यांनीं खाऊन पिऊन सुखी असलेल्या विजयगांवकर मंडळीच्या माथीं हे वादविवाद मारून आपलें समाधान करून घेतलें आहे, असें म्हणावें लागतें. तथापि प्रस्तुत कादंबरींतील तात्त्विक चर्चांच्या फत्तरांसभोंवतीं मानवी अंतःकरणांत उगम पावणाऱ्या भावनांचे अनेक प्रवाह इतस्ततः वाहत असल्यामुळें या कादंबरीला एक प्रकारचें नैसर्गिक सौंदर्य प्राप्त झालें असून त्यांतील काव्यशास्त्रविनोदाच्या मधुर संगमानें या सौंदर्याला उदात्तपणाची व पवित्र आनंदाची जोड करून दिली आहे, हें कबूल केल्यावांचून राहवत नाहीं.

'रागिणी'ला सोडून 'आश्रमहरिणी'कडे वळलें म्हणजे निसर्गसुंदर उपवनांतून एकदम निसर्गगंभीर तपोवनांत उतरल्याचा भास होतो. परंतु तेथें सहल करून आलें म्हणजे या तपोवनांतील ऋषी आपल्या आश्रमांत विधवापुनर्विवाहसंस्था स्थापन करणारे आधुनिक काळांतील कट्टे सुधारकच आहेत याची खात्री पटते. पुस्तकांतील स्थल, काल, व्यक्ति, वातावरण व त्यांतील प्रतिपाद्य विषय लक्षांत घेतला म्हणजे मुगट्यांत गुपचुपपणें बांधलेलीं अंडीं घरीं जाऊन भक्षण करणाऱ्या एखाद्या धर्ममार्तंडाला पाहून जी मौज वाटेल ती वाटल्याशिवाय राहत नाहीं. ही कादंबरी लिहीत असतांना टेनिसनच्या 'एनॉक् आर्डन' या खंडकाव्याचा अस्पष्ट संस्कार वामनरावांच्या मनावर अभावितपणें झाला असावा, अशी शंका येते. तथापि सदरहू कादंबरिका लिहितांना वामनरावांचा मूळ उद्देश, सुलोचना ही शेवटीं धौम्य आणि गभस्तिगति या दोघांशींहि पत्नी या नात्यानें राहते, हें दाखविण्याचा होता; व अलीकडील आवृत्तींत कथानकाचा शेवट या मूळ कल्पनानुसारच केला आहे. 'आश्रमहरिणी' लिहिण्यांतील हा सुरुवातीचा उद्देश लक्षांत घेतला म्हणजे वामनरावांनीं सामाजिक व धार्मिक रूढींचें आणि बंधनांचें 'सीमोल्लंघन' मनानें वीस

वर्षांपूर्वीच केलें होतें, हें दिसून येईल. परंतु हें सीमोल्लंघन करण्याचें धैर्य त्या वेळीं आपणास झालें नाहीं, असें कबूल करण्याचें धैर्य त्यांनीं अलीकडे दाखविलें आहे. सर्वसाधारणपणें एका पत्नीनें दोघां पतींशीं सारख्याच प्रेमळपणानें व निष्ठेनें राहणें अशक्य आहे तरी तिन्ही माणसें सुसंस्कृत बुद्धीचीं, उच्च विचारसरणीचीं, निरनिराळ्या गुणांचीं व विशिष्ट मनोरचनेचीं असल्यास ही त्रिकोणी किंवा तिरंगी घटना अशक्य कोटींतील नाहीं हेंच वामनरावांस दाखवावयाचें होतें, अशी कल्पना करण्यास हरकत नाहीं. तामसी वृत्तीचा लवलेशहि नसलेल्या सुलोचनेच्या राजस वृत्तीचें समाधान धौम्याच्या संगतींत, व सात्त्विक भावनांची पूर्ति गभस्तिगतीच्या सहवासांत होणार असल्यामुळें व धौम्य आणि गभस्तिगति या स्वार्थत्यागी पुरुषश्रेष्ठांना परस्परांची व सुलोचनेची संगति सारखीच प्रिय असल्यामुळें हा विवाह तिघांनाहि सुखावह झाला असता, असें आधुनिक लैंगिक शास्त्राच्या आधारानें सिद्ध करून दाखवितां येण्यासारखें आहे.

रागिणींत सुशिक्षित व सद्भावनाशील तरुणतरुणींचें, आश्रमहरिणींत लैंगिक व मानसिक चमत्कारांतील एका घटनेचें चित्र काढल्यानंतर 'नलिनी' या कादंबरींत वामनराव अराजकांच्या राजकारणांत शिरले आहेत. वामनरावांचीं एका काळचीं राजकीय जहाल मतें लक्षांत घेतलीं म्हणजे 'नलिनी'तील राजकीय वातावरणांत ते शिरल्याबद्दल जरी आश्चर्य वाटलें नाहीं तरी प्रस्तुत कादंबरीच्या द्वारें त्यांनीं राजकारणांत जें पदार्पण केलें आहे तें भीतभीतच व दोलायमान वृत्तीनें केलें आहे, असें म्हणावें लागतें. १९०८ सालच्या सुमारास कांहीं भावनावश तरुणांच्या उत्कट स्वदेशभक्तीला जे निरनिराळे फांटे फुटूं लागले होते त्यांचें अस्पष्ट, अपूर्ण व असमाधानकारक प्रतिबिंब प्रस्तुत कादंबरींत पाहावयास सांपडतें. पूर्वोक्त दोन कादंबऱ्यांप्रमाणें ही कादंबरी तात्त्विक स्वरूपाची नसून रहस्यमय व कथानकप्रधान आहे. वामनरावांची मनोरचना अशा तऱ्हेची कादंबरी लिहिण्याला अनुकूल नाहीं. त्यांतूनहि प्रस्तुत कादंबरींत त्यांना जें कांहीं सांगावयाचें होतें तें स्पष्टपणें सांगतां न आल्यामुळें रागिणीची ही छोटी बहीण नकटी ठरणें क्रमप्राप्तच होतें, असें म्हटलें पाहिजे.

'रागिणी' लिहिल्यानंतर दरम्यानच्या काळांत वामनरावांच्या ज्ञानपिपासु व तत्त्वजिज्ञासु मनांत धार्मिक विषयांबाबत जी क्रांति घडून आली तिचें खरें स्वरूप 'सुशीलेच्या देवा'नें जगास प्रकट करून दाखविलें आहे. लहानपणीं देवबाप्पाचें नांव

निघतांच यंत्राप्रमाणें हात जोडणारी, पुढें कुस्त्या खेळणाऱ्या व परीक्षेत नापास करणाऱ्या देवाला मनांतून घाबरणारी, त्यानंतर दगडांत देव मानून त्याला नवसांचा लांच देणारी, पुढें विवाहोत्तर पतीसच देव मानणारी—पण त्याच्या सहवासांत नास्तिकवादाकडे झुकूं लागलेली सुशीला—शेवटीं ध्येय म्हणजेच देव, असें मानण्यास कशी प्रवृत्त झाली हेंच जरी वामनरावांना प्रामुख्यानें सांगावयाचें आहे तरी प्रस्तुत कादंबरीचें एकंदर स्वरूप यापेक्षांहि अधिक व्यापक आहे, हें विसरून चालणार नाहीं. कारण या कादंबरींत तत्त्वज्ञान व मानवी जीवन यांची संगति लावून त्यांत एकवाक्यता घडवून आणण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. रागिणींतील तत्त्वज्ञानाचा कथानकाशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं; उलट 'सुशीलेच्या देवां'तील तत्त्वज्ञानांत होत गेलेल्या फरकांप्रमाणें कादंबरीच्या कथानकांतहि बदल होत गेला आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. देवाविषयींच्या सुशीलेच्या कल्पना जसजशा बदलत गेल्या तसतसें तिचें व तिच्या संगतींतील माणसांचें आयुष्यहि बदलत गेलें आहे. सुशीला शेवटीं वसुधैवकुटुंबक-वृत्तीची म्हणजे समाजसत्तावादाची पुरस्कर्ती बनते. परंतु हा समाजसत्तावाद भांडवलशाहींतून निर्माण झालेला नसून वैयक्तिक ध्येयवादांतून निर्माण झाला आहे, हें विसरून चालणार नाहीं. अर्थात् या ध्येयवादाला कारखानदारांनीं अप्रत्यक्षपणें मदत केली आहे, ही गोष्ट वेगळी. वैवाहिक नीतिविषयींहि प्रस्तुत कादंबरींत क्रान्तिकारक विचार प्रदर्शित करण्यांत आले आहेत. वधूवरें एकमेकांना अनुरूप नसतील तर त्यांचा प्रथम विवाह देखील व्यभिचारच आहे, असें सुशीला म्हणते; पुनर्विवाह ती आपद्धर्म मानीत नाहीं. तो आदरयुक्त प्रेमामुळें झाला असला म्हणजे प्रथमविवाहाइतकाच पवित्र आहे, असें सुशीला म्हणते. धर्मसंस्था व देशाभिमान यांच्या नांवाखालीं होत असलेल्या पापांचीहि तिला चांगली जाणीव झाली आहे. 'आश्रमहरिणी' व 'सुशीलेचा देव' या कादंबऱ्यांतून वामनरावांनीं जे सामाजिक व धार्मिक विचार प्रदर्शित केले आहेत ते आजच्या टोपी न घालणाऱ्या एखाद्या तरुणानें वामनरावांच्यापेक्षां निराळ्या पद्धतीनें मांडले असते, तर आमच्या समाजांतील लब्धप्रतिष्ठित लोकांनीं त्याची अनीतीचा पुरस्कार करणाऱ्या नवमतवाद्यांत गणना केली असती. परंतु वामनरावांच्या वैयक्तिक आचरणामुळें व लोकप्रियतेमुळें व त्यांच्या प्रतिपादनशैलींतील सात्त्विक आणि तात्त्विक प्रवृत्तीमुळें हें कांहीं अंशीं नवमतवादी असलेलें तत्त्वज्ञान पुराणमताभिमानी लोकहि मुकाट्यानें स्वीकारून त्याबद्दल वामनरावांची पाठ थोपटीत आहेत! सुशीलेचें,

ध्येय म्हणजेच देव हें तत्त्वज्ञान म्हणजे निराळ्या अर्थानें नास्तिकवादच आहे असेंच कोणालाहि वाटेल; परंतु तो नास्तिकवाद नाहीं हें सांगणें आवश्यक आहे. नास्तिकवाद म्हणजे देव नाहीं असें म्हणणें; त्याचें अस्तित्वच नाकबूल करणें. परंतु सुशीला देव नाहीं असें म्हणत नाहीं, व देव आहे, असेंहि म्हणत नाहीं. देवाविषयीं ती बेफिकीर आहे. तिच्या विश्वकुटुंबकत्वाच्या ध्येयांत देवानें पाहिजे तर यावें, नाहीं तर येऊं नये अशी तिची देवाविषयीं विचारसरणी आहे.

सुशीलेनें ध्येय म्हणजे देव असें म्हटलें खरें; परंतु हें ध्येय कोणीं व कसें ठरवावयाचें हे प्रश्न शिल्लक राहतातच. या प्रश्नांचा विचार वामनरावांनीं ‘ इंदु काळे व सरला भोळे ’ या कादंबरींत केला आहे. कादंबरीचा काळ गांधींच्या असहकारितेचा आहे. ध्येयवादी विनायकराव भोळे हे गांधींचे कट्टे अनुयायी म्हणजे कर्मठ असतात; इतिहास-संशोधक नारायणराव पाठक ज्ञानमार्गी आहेत; इंदु काळे हीं आपल्या आत्म्याची कलाविषयक भूक शमविण्याकरितां धडपड करते; तिचे पति बिचारे भाऊसाहेब काळे मात्र केवळ व्यवहारवादी आहेत. अशा या चार दिशांना चार तोंडें फिरवून बसलेल्या चतुष्टयाला अनुभव काय येतो ? तर ध्येयें म्हणजे दुःखें, म्हणजे ‘ सुशिलेच्या देवां’त वामनरावांनीं ज्या ध्येयवादाचा पुरस्कार केला तो कागदावर कितीहि चांगला व मोहक दिसला तरी प्रत्यक्ष व्यवहारांत कोणतींहि निर्भेळ ध्येयें सुखावह न होतां दुःखासच कारणीभूत होतात, असा कबुलीजबाबच पर्यायानें त्यांनीं दिला आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. मात्र नाहीं म्हणावयाला ध्येयें म्हणजे दुःखें हें जरी खरें, तथापि “ या दुःखांतच सात्त्विक आनंद भरलेला आहे; हें मार्मिकांना समजतें. ” असें भाऊ काळे यांच्या तोंडांत वाक्य घालून या ध्येयवादाच्या विरुद्ध आक्षेप घेणारांच्या त्यांनीं हळूच तोंडांत मारिली आहे. शिवाय निव्वळ व्यवहारवादानेंहि मनुष्याला आयुष्यांत सुख लागत नाहीं, हें भाऊसाहेबांच्या पात्रावरून दर्शविलें आहेच. पण सामान्य माणसांच्या दृष्टीनें विचार करतां कोणतींहि उच्च ध्येयें हीं आयुष्यांत सुखावह होणें कठीण आहे, हाच या कादंबरीचा निष्कर्ष समजावयास हरकत नाहीं. सारांश, ‘सुशीलेच्या देवां’त वामनरावांनीं पुरस्कार केलेल्या बुद्धिवादाचें व ध्येयवादाचें पर्यवसान शेवटीं निराशावादांतच झालें आहे, असें म्हणावें लागतें. इंदु काळे या पात्राच्याच द्वारें वामनरावांनीं कला व नीति हा अलीकडे पिसाळलेला वाद वाचकांसमोर मांडून “ कलेची तहान भागविण्याकरितां नीतीच्या रक्ताचा घोट घेणें बरोबर नाहीं ” असा निर्णय दिला आहे, तो

प्रचलित समाजपद्धतींत न्याय्य असला तरी वादाचा शेवटचा निकाल या दृष्टीनें बरोबर नाहीं; कारण समाजाबरोबर त्याची नीतीहि बदलणारी आहे; ती स्थिर व समाजनिरपेक्ष नाहीं.

वामनराव यांची जगाकडे पाहण्याची दृष्टि अंतर्मुख असल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्यांतून पात्रांचे पोषाख, त्यांचें स्वरूपवर्णन, दिवाणखान्याचें वर्णन, पात्रांचें संभाषण चाललें असतांना त्यांचे होणारे हावभाव, सृष्टिवर्णनें इत्यादि गोष्टी पाहावयास मिळत नाहींत. असल्या बाह्य गोष्टींविषयीं त्यांचें अज्ञान किंवा उदासीनत्व इतकें मोठें आहे कीं, 'रागिणीं'तील उत्तरार्धात हिमालयाचें वर्णन करतांना त्यांनीं तेथील हवामानाचा विचार न करतां आंब्या-केळींच्या झाडांची लागवड मोठ्या प्रमाणांत केली आहे, हरिणांना इतस्ततः बागडावयास लाविलें आहे, निष्काळजीपणानें कां होईना पण एका ठिकाणीं त्यांनीं चंद्राला भलत्याच वेळीं उगवण्याची आज्ञा केली आहे! असल्या बाह्य गोष्टींकडे दुर्लक्ष असल्यामुळें वामनराव पात्रांचें वर्णन बहुधा स्वभावानुरोधानें करीत असतात. प्रो. फडके यांच्याप्रमाणें बारिकसारिक गोष्टींच्या वर्णनानें ते कथानकाला व पात्रांच्या संभाषणाला सत्याभासाचा उठाव देत नाहींत. तथापि ही उणीव ते पात्रांच्या विशिष्ट लकबींच्या उल्लेखानें व त्यांच्या स्वभावांतील फरकानें भरून काढण्याचा यत्न करितात. पुरुषपात्रांपेक्षां स्त्रीपात्रें वामनरावांना चांगलीं रंगवितां येतात, असें दिसून येतें. मनाच्या सूक्ष्म छटा रंगविण्यांत ते वाकबगार आहेत. बुद्धिगम्य विनोद त्यांच्या कादंबऱ्यांत सर्वत्र आढळून येतो. त्यांची चिकित्सक बुद्धि, तर्कपद्धति, तत्त्वजिज्ञासा, सत्याविषयींची तळमळ व विचारविलास यांमुळें त्यांच्या कादंबऱ्यांनीं मराठी वाङ्मयांत स्वतंत्र स्थान मिळविलें आहे. सॉक्रेटिसनें स्वर्गातून भूतलावर आणलेलें तत्त्वज्ञान ॲडिसननें आपल्या निबंधाच्या द्वारें इंग्लंडांत घरोघर प्रसृत केलें, असें म्हणण्यांत येतें; त्याचप्रमाणें वामनरावांनीं पाश्चात्य व प्राच्य तत्त्वज्ञान आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारें मराठी वाचकवर्गाला तरी सुलभ करून दिलें आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. सत्य हें सुलभ, सोपें व सरळ आहे, अशी बहुतेकांची समजूत असल्यामुळें सामान्य माणसांना प्रत्येक प्रश्नाचें एकच निर्णायक उत्तर निस्संदिग्ध भाषेंत मिळावें, अशी अपेक्षा असते. परंतु सत्याइतकें गुंतागुंतीचें असें या जगांत दुसरें कांहींहि नसल्यामुळें वामनरावांसारख्या तत्त्वजिज्ञासु मनुष्याला कोणत्याहि गहन प्रश्नाचें निर्णायक उत्तर देतां न आल्यास तें त्यांच्या प्रामाणिकपणाचें द्योतक आहे, असें मानणेंच शहाणपणाचें होईल.

रचना व तंत्र यांच्या दृष्टीनेंहि वामनरावांनीं कादंबरीवाङ्मयांत मोठ्या महत्त्वाची भर घातली आहे. 'आश्रमहरिणीं'त इतिहास-संशोधनाच्या पद्धतीचा, 'सुशीलेच्या देवां'त चरित्र व आत्मचरित्र या मिश्र पद्धतीचा व 'इंदु काळे व सरला भोळे' यांत पत्रलेखनपद्धतीचा अवलंब करून वामनरावांनीं तीन निरनिराळे प्रकार कथावाङ्मयांत सुरू केले व आपलें वैशिष्ट्य कादंबरीच्या विषयांतच नव्हे तर तिच्या तंत्रपद्धतींतहि कायम ठेविलें.

## निर्हेतुक कला-विलास अर्थात् कलेकरितां कला

प्रो. वामनराव जोशी यांच्या रागिणी व तिच्या भावंडांतील विचारविलासानंतर कादंबरीक्षेत्रांत प्रो. फडके यांच्या कलाविलासाचा उदय झाला. प्रो. आप्पासाहेब फडके यांच्या कादंबऱ्यांचें स्वरूप समजावून घेण्यापूर्वीं त्यांचें कलेविषयींचें धोरण लक्ष्यांत घेणें जरूर आहे. वामनरावांची प्रवृत्ति कला व जीवन यांची तात्त्विक सांगड घालण्याकडे आहे, तर प्रो. फडके यांची वृत्ति जीवनाशीं कलेची फारकत करून तिच्या मदतीनें जीवनाच्या जंजाळांतून निसटण्याकडे आहे. प्रो. जोशी यांच्या मताप्रमाणें सरस्वतीनें जीवनाच्या व्यासपीठावर बसणें चांगलें; तर आप्पासाहेब म्हणतात कीं, "प्रमत्तमयूरपिच्छांच्या सुबक सिंहासनावर" बसण्यांतच तिचें खरें सौंदर्य प्रकट होणार आहे. त्यांच्या मताप्रमाणें सौंदर्य हें तत्त्वतः नीति-अनीतीच्या अतीत–पलीकडचें आहे. तें पाहत असतां वासनांची बरीवाईट हालचाल झाली तर तो त्या कलावस्तूचा गुण नसून तो प्रेक्षकाच्या विकृत दृष्टीचा परिणाम आहे, लेखकावर त्याची जबाबदारी नाहीं. शिवाय मानवी इच्छा, आकांक्षा व वासना तृप्त होत नाहींत म्हणून तर मनुष्याला ललितवाङ्मयाचें व्यसन लागतें व तो ज्या ज्या स्त्रीपुरुषांच्या आकांक्षा प्रयत्नांतीं सफल झाल्या आहेत, त्यांजविषयींच्या कल्पित कथा वाचून व त्यांच्याशीं तेवढ्यापुरतें तादात्म्य पावून कांहींएका नवीनच आनंदाचा उपभोग घेत राहतो. प्रो. फडके यांचें कलेच्या कार्याविषयींचें हें धोरण लक्षांत घेतलें म्हणजे त्यांच्या कादंबऱ्यांतील विलासमय वातावरणांचा उलगडा होईल, व प्रो. फडके हे तत्कालीन तरुण पिढीचे आवडते कादंबरीकार कां होऊं शकले, याचें उत्तर मिळेल. १९२० ते १९३० या दरम्यानची परिस्थितीहि अशा तऱ्हेच्या कादंबऱ्यांना अनुकूल अशीच होती. 'रागिणी'च्या वेळची सुशिक्षित तरुणींकडे उपहासबुद्धीनें पाहण्याची समाजाची दृष्टि स्त्रीशिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार होऊं लागल्यामुळें पुढें हळूहळू मावळत चालली,

मुलींनीं उच्च शिक्षण घेणें यांत कांहीं विशेष आहे, असें कोणास वाटेनासें झालें; किंबहुना तिच्या भवितव्याच्या दृष्टीनें शिक्षण घेणें ही आयुष्यांतील एक आवश्यक बाबच होऊन बसली. स्त्रीशिक्षणाच्या प्रसाराबरोबर मुलींच्या लग्नाची वयोमर्यादाहि वाढत चालली. समाजांत सुशिक्षित तरुणतरुणींच्या भेटीगांठी होऊं लागल्या व त्याबरोबर त्यांचा एकमेकांशीं परिचयहि वाढत चालला. तरुण विद्यार्थिवर्गाला कॉलेजावर बहिष्कार घालण्याव्यतिरिक्त राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेण्याइतकें महात्मा गांधींनीं आपल्या चळवळीचें क्षेत्र विस्तृत केलें नव्हतें. त्यामुळें प्रियाराधनाखेरीज वेळ घालवायला सुखवस्तु तरुणांना दुसरें कांहींएक साधनच उरलें नाहीं. अशा वेळीं प्रो. फडके यांच्या प्रणयकथांनीं तरुण पिढीला मोहित केलें, यांत आश्चर्य तें काय? अर्थात् या तरुण पिढीचीं मनें आकर्षून घेण्यांत परिस्थितीइतकेंच प्रो. फडके यांची सौंदर्यदृष्टि, त्यांची निरीक्षणशक्ति, त्यांचा व्यवसाय, त्यांचें लेखन-पाटव, त्यांची कलाभिज्ञता व रसिकता इत्यादि गुणहि कारणीभूत झाले, हें कबूल केलें पाहिजे.

पूर्वीं उल्लेखिलेल्या 'अल्ला हो अकबर' या पहिल्या रूपांतरित कादंबरी-नंतर प्रो. फडके यांनीं लिहिलेल्या कादंबऱ्या म्हणजे 'कुलाब्याची दांडी', 'जादूगार', 'अटकेपार', 'दौलत', 'निरंजन' व 'कलंकशोभा' या होत. कथानकाचा बांधेसूदपणा, निवेदनपद्धतींत कौशल्य, संवादांतील चटकदारपणा, वर्णनांतील मार्मिकता व भाषेंतील लालित्य इत्यादि गुण प्रोफेसरसाहेबांच्या बहुतेक सर्व कादंबऱ्यांतून प्रामुख्यानें आढळून येतात. कादंबऱ्यांचीं कथानकें प्रणयप्रधान असून त्यांतील बहुतेक सर्व प्रमुख पात्रें सुखवस्तु अशा वरिष्ठ वर्गांतील आहेत; मध्यम वर्गांतील पात्रांचा उपयोग केवळ या मुख्य पात्रांना उठाव देण्याकरितांच केला आहे. तरुणतरुणींच्या अंतः-करणांत थैमान घालणाऱ्या विविध भावना हळुवारपणें व्यक्त करून दाखविण्यांत त्यांचें कौशल्य चांगलेंच प्रत्ययास येतें; प्रणयीजनांच्या अंतरंगांतील अगदीं सूक्ष्म छटा देखील ते फार सुंदर रीतीनें चित्रित करतात. परंतु प्रो. फडके यांच्या कादंबऱ्यांतील सर्वांत मोठा दोष म्हणजे त्यांतील विषयवैचित्र्याचा अभाव व स्वभावचित्रांतील एकसारखेपणा हा होय. जगदीश, आनंदराव, अविनाश, सुधीर, निरंजन इत्यादि नायक काय किंवा माणिक, इंदुमती, निर्मला, मीनाक्षी, रजनी इत्यादि नायिका काय त्या सर्व एकाच सृष्टींत एकाच विशिष्ट पद्धतीनें वावरणाऱ्या व्यक्ति आहेत असें वाटूं लागतें. कांहीं चित्रकार असे असतात कीं, त्यांनीं काढलेल्या निरनिराळ्या

स्त्रीपुरुषांचे बाह्य पोषाख जरी वेगळे दिसले तरी त्यांच्या तोंडवळयांत किंवा चेहरेपट्टींत इतकें साम्य असतें कीं, त्यामुळें त्या सर्व व्यक्ति एकाच कुलांतील अगदीं जवळच्या नातेवाईक आहेत असें वाटतें व कांहीं ठिकाणीं तर एकच व्यक्ति निरनिराळ्या पोषाखांत व वेगवेगळया थाटांत बसली आहे कीं काय अशी शंका येते. 'कुलाब्याची दांडी', 'जादूगार', 'दौलत' व 'अटकेपार' या कादंबऱ्यांत पात्रें व प्रसंग यांची पुनरुक्ति झाली आहे, त्याला प्रोफेसर साहेबांची विशिष्ट मनोवृत्ति व त्यांची तंत्रासक्ति हींच कारणभूत झालीं असावीं. प्रो. फडके यांच्या तरुण नायकांत कोणत्याहि प्रकारचीं उज्ज्वल ध्येयें किंवा महत्त्वाकांक्षा आढळून येत नाहींत. मीनाक्षी अबला म्हणून सोडून दिली तरी अटकेपार होण्याला मनाचा जो कणखरपणा लागतो तो सुधीरचंद्राच्या ठिकाणीं आहे असें वाटत नाहीं. गांधीजींनीं सुरू केलेल्या कायदेभंगाच्या चळवळींत धडाडीनें भाग घेऊन केवळ लेखणीच्या जोरावर तुरुंगांतील 'अ' वर्ग मिळविणारा निरंजन देखील सुरुवातीचा मनोनिग्रह पुढें न दाखवितां शेवटीं प्रणयाच्या मोहाला बळी पडतो. नाहीं म्हणावयाला केवळ आपल्या मित्राकरितां स्वतःवर दुश्चारित्र्याचा आरोप ओढवून घेणारा शशिकान्त आपल्या ध्येयाशीं एकनिष्ठ राहिलेला आहे. तथापि प्रो. फडके यांच्या नायकनायिकांना सुखदुःखांचे केवळ निश्वास सोडण्याला प्रणयाचें वातावरण जितकें मानवतें तितकें अन्य कोणतेंहि मानवत नाहीं, हाच निष्कर्ष काढावा लागतो.

## समाज-निरीक्षण व विचार-वैचित्र्य

प्रो. फडके यांच्या कथानकाच्या दृष्टीनें बांधेसूद, रेखीव, तंत्रदृष्ट्या निर्दोष व भाषेच्या दृष्टीनें सफाईदार अशा कादंबऱ्या वाचून नंतर डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्यांकडे वळलें म्हणजे त्यांना आधीं कादंबऱ्याच म्हणावें कीं नाहीं हा प्रश्न उभा राहतो. विस्कळित कथानक, स्वभावपरिपोषाचा अभाव, निरर्थक पात्रें, नीरस व लांबलचक संवाद आणि ओबडधोबड व खडबडीत भाषा, यांमुळें डॉक्टरसाहेबांच्या कादंबऱ्या म्हणजे संसार-चोपड्याच झाल्या आहेत. परंतु केतकरांच्या कादंबरींतील हा संसार केवळ एखाद्या विशिष्ट प्रान्ताचा व वर्गाचा नसून जवळजवळ अखिल-भारतीय समाजाचा आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. डॉक्टरसाहेब आपल्या आयुष्यांत ज्या ज्या प्रान्तांत व खंडांत फिरले व राहिले तेथील समाजस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करून त्यांनीं जे सामाजिक सिद्धान्त काढले, त्यांचीं या कादंबऱ्या म्हणजे

टिप्पणेंच आहेत. मराठी कादंबरीकारांचा मर्यादित अनुभव, संकुचित दृष्टिकोन, आपण ज्या वर्गांतून आलों त्यापलीकडे कधींहि न पाहण्याची वृत्ति, समाजशास्त्र व अर्थशास्त्र या विषयांचें गाढ अज्ञान व परंपरागत समजुतींना चिकटून राहण्याची प्रवृत्ति इत्यादि दोष लक्षांत घेतले म्हणजे केतकरांच्या कादंबऱ्या राष्ट्रांतरीय स्वरूपाच्या झाल्या आहेत, असेंच म्हटलें पाहिजे. डॉक्टरसाहेबांच्या आतांपर्यंत 'गोंडवनांतील प्रियवंदा', 'परागंदा', 'आशावादी', 'गांवसासू' व 'ब्राह्मणकन्या' या पांच कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांतील देश, काल, परिस्थिति, पात्रें, व विषय यांचें वैचित्र्य पाहिलें म्हणजे मराठी कादंबरीच्या इतिहासांत केतकरांचें स्थान किती स्वतंत्र आणि उच्च आहे याची कल्पना येईल. डॉक्टरसाहेबांच्या कादंबऱ्यांतील चटकन् नजरेंत भरणारा विशेष म्हणजे त्यांतील विचारवैचित्र्य किंवा विचार-वैलक्षण्य हा होय. धर्म, राजकारण, समाजशास्त्र, वैवाहिक नीति, वेश्याव्यवसाय, वाङ्मय इत्यादि विषयांवरील डॉ. केतकर यांचीं मतें कांहींशीं जगावेगळींच असल्यामुळें तीं सामान्य वाचकांना विक्षिप्तपणाचीं वाटल्यास नवल नाहीं. आपल्या ग्रंथरचनेचें श्रेय ते छापखान्यांतील कंपाझिटरांच्या संघास देतात; कादंबऱ्यांत स्थलवर्णन करणें, म्हणजे वाचकांचा वेळ विनाकरण खाणें, असें त्यांचें मत आहे (हें मत मात्र पुष्कळ वाचकांस पटण्यासारखें आहे). चांगली भाषा लिहिणें म्हणजे आपलें विचार-दारिद्र्य प्रकट करणें, अशी डॉक्टरसाहेबांनीं आपली सोईस्कर समजूत करून घेतली आहे. इंग्रजी भाषा अनित्य असल्यामुळें देशी भाषेंतून ग्रंथ लिहिल्यास ते अधिक कालपर्यंत टिकतील असें ते एका ठिकाणीं म्हणतात. त्यांच्या मताप्रमाणें जगांत साधु व दुष्ट असें कोणीच नसल्यामुळें आपल्या कादंबऱ्यांतून गुणांनीं भूषित असे नायक किंवा दुर्गुणांनीं दूषित असे खलपुरुष यांना ह्यांनीं अजिबात फांटा दिला आहे. "अधिक दूर दृष्टीचा स्वार्थ तो सद्गुण आणि अल्प दृष्टीचा स्वार्थ तो दुर्गुण" असें केतकरांचें नीतिशास्त्र आहे. परंतु ही यादी वाढविण्यांत अर्थ नाहीं. 'आशावादीं'त भगवद्गीतेला त्यांनीं 'सैतानी' हें विशेषण बहाल केलें आहे, यावरून त्यांच्या विक्षिप्तपणाची, विचारस्वातंत्र्याची व स्पष्टवक्तेपणाची मजल कोठपर्यंत जाऊं शकते. याची कल्पना करितां येईल. अमूक एक विषय त्यांच्या निरीक्षणांतून सुटला आहे असें नाहीं, व अमुक एक विषयावर त्यांचें स्वतःचें असें स्वतंत्र मत नाहीं असेंहि आढळून येणार नाहीं. यामुळें डॉक्टरसाहेबांच्या कादंबऱ्या म्हणजे एक कथात्मक व संवादात्मक

ज्ञानकोशच आहे असें म्हटलें असतां चालण्यासारखें आहे. 'परागंदें'त अमेरिकेंतील भारतीयांच्या परिस्थितीचें वर्णन आलें असून तेथें कायम झालेला व कायम होऊं पाहणारा जो सुशिक्षित भारतीयांचा वर्ग आहे त्याच्या विचारांचें दिग्दर्शन केलें आहे. 'गांवसासू' मध्यें विलायतेंत आय्. सी. एस्. होण्याकरितां किंवा शिकण्याकरितां गेलेल्या हिंदी विद्यार्थिवर्गाची राहणी कशी असते व तेथील गौरकाय किंवा निमगोऱ्या तरुणींच्या सहवासाचा त्यांच्या पुढील आयुष्यावर काय परिणाम होतो, याचें चित्र पाहावयास सांपडतें. 'आशावादी'त तर १९०३ पासून १९२८ सालापर्यंतचा महाराष्ट्रांतील विविध चळवळींचा सर्व इतिहासच आला आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. 'ब्राह्मणकन्ये'त बेने-इस्रायल या जातीविषयीं जी अश्रुतपूर्व माहिती आली आहे तिजमुळें त्या समाजांत व इतरत्रहि जी खळबळ उडाली होती तिची पुष्कळांस आठवण असेलच. सारांश, डॉक्टरसाहेबांच्या कादंबऱ्या वाचणें म्हणजे अनेक प्रसिद्ध व्यक्ति, अनेक जाति अनेक देश, तेथील चालीरीति यांची अनायासें माहिती मिळविण्यासारखें आहे. शिवाय मानवजातीशीं ज्या ज्या शास्त्रांचा साक्षात् किंवा परंपरेनें संबंध येतो त्यांविषयींची थोडीशी एकांतिक पण उद्बोधक चर्चाहि त्यांच्या कादंबऱ्यांत वाचावयास मिळते. प्रत्येक व्यक्तीच्या मताचें व कृतीचें सर्वांगीण परीक्षण करून त्या व्यक्तीचें अंतरंग उकलून दाखविण्यांत डॉक्टरसाहेब फार वाकबगार आहेत, यांत शंका नाहीं. परंतु स्वतः ध्येयवादी असूनहि इतरांच्या ध्येयवादांत स्वार्थाचे सूक्ष्म धागेदोरे काढून त्याकडे खंवचटपणानें व उपहासबुद्धीनें पाहण्याची त्यांची वृत्ति पाहिली म्हणजे फारच मौज वाटते. वामनराव जोशी यांच्या कादंबऱ्यांना 'विचार-विलास' हा मथळा दिला तर डॉक्टरसाहेबांच्या कादंबऱ्यांना 'विचार-वैचित्र्य' हा मथळा द्यावयास हरकत नाहीं.

## कलेंतील व्यक्तिवाद व प्रतीकवाद

डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्यांचें वाचन संपवून अलीकडे कॉंग्रेस सोशियालिस्ट म्हणून राजकारणाच्या आखाड्यांत उतरलेले श्री. पु. य. देशपांडे यांच्या कादंबऱ्यांच्या वाचनास सुरुवात केली, म्हणजे घनदाट व कंटकमय जंगलांतून रक्तबंबाळ शरीरानें जिवानिशीं बाहेर पडल्यानंतर आंखलेल्या पायवाटांच्या दोन्ही बाजूंला निरनिराळ्या फुलझाडांची लागवड पद्धतशीर रीतीनें केली आहे, अशा उपवनांत आल्यासारखें वाटतें. तेथें वाहणाऱ्या वायूच्या मंद लहरींनीं अंतःकरण उल्हसित होतें व विविध

वर्णांच्या पुष्पांत दृग्गोचर होणाऱ्या रंगसंगतीनें मन प्रसन्न होऊन या उपवनांतील मालाकाराच्या कलाचातुरीची साक्ष पटते. पण या उपवनांतील प्रवेशद्वारांत मात्र बागेंतील सौंदर्य प्रतीत होत नाहीं. कारण या प्रवेशद्वारांत शिरल्याबरोबर तेथील वेलींवरील फुलांचा मंद सुवास येण्याऐवजीं देवडीवरील पहारेकऱ्यानें उच्चारलेल्या कर्कश शब्दांनीं कर्णरंध्रें भरून जाऊन मन क्षणभर स्तिमित होतें. पण श्री. देशपांडे यांनीं आपल्या कादंबऱ्यांत रूढ केलेली ही प्रतीकात्मक भाषा काव्यमय कादंबरींत शोभली असती तरी परीक्षणांत रसहानि उत्पन्न करणारी असल्यामुळें हें प्रवेशद्वार म्हणजेच देशपांडे यांची ' बंधनाच्या पलीकडे ' ही कादंबरी, असें येथें स्पष्टपणेंच सांगितलेलें बरें.

प्रो. फडके यांच्या कादंबऱ्यांतील विलासमय वातावरणांत वावरणारे तरुण पुढें मागें ' स्त्रीरत्नं दुष्कुलादपि ' या सुभाषिताच्या आधारावर हळुहळू वेश्यांचा उद्धार करण्याकरितां कंबर कसणार हें भाकीत कोणासहि करतां आलें असतें. समाजशास्त्राच्या दृष्टीनें विचार केला म्हणजे असें आढळून येईल कीं, कोणत्याहि देशांतील उच्च दर्जाच्या कलावंतिणींचा संबंध समाजांतील सधन व वरिष्ठ वर्गाशींच अधिक येतो; व त्यामुळें समाजांतील अगदीं वरचा व अगदीं खालचा म्हणून गणलेला वेश्यांचा वर्ग यांजमध्यें एक प्रकारचें सांस्कृतिक साधर्म्य उत्पन्न होतें. आपल्याकडेहि पांढरपेशा वर्गांतील माणसें तेल्यातांबोळ्यांची उन्नति करण्यापूर्वीं एकदम वेश्यांचा उद्धार करण्याच्या गोष्टी बोलतात, तें यामुळेंच. वरिष्ठ वर्गांतील तरुणांचें शिक्षण व वेश्यावर्गांतील मुलींचें कलात्मक सौंदर्य हीं एकमेकांकडे आकर्षिलीं जावीं, हें नैसर्गिक आहे. स्त्रीशिक्षणाचा फैलाव होतांच पांढरपेशा वर्गांतील तरुणींप्रमाणेंच वेश्यांनींहि दूरदर्शिपणानें आपल्या मुलींना उच्च शिक्षण देण्यास सुरुवात केली; तेव्हां प्रतिष्ठित कुळांत जन्म पावलेल्या पांढरपेशा वर्गांतील तरुणींना रूढीच्या मर्यादांचें उल्लंघन एकदम करतां येणें शक्य नसल्यामुळें तरुणांना आपल्या मोहजालांत पकडण्याच्या बाबतींत त्यांना वेश्यांच्या तरुण मुलींपुढें हार खावी लागली, यांत नवल नाहीं. अलीकडे नाटक-सिनेमासारख्या धंद्यांत तर समाजाचीं हीं दोन टोकें एकत्र आल्यामुळें वेश्याव्यवसायविषयक किंवा ज्यांत वेश्यांचा संबंध आला आहे, अशा कादंबऱ्यांची पैदास अधिक होत जाणार, हें उघड आहे.

' बंधनाच्या पलीकडे ' या कादंबरींत श्री. देशपांडे यांनीं प्रेमविवाहाचा जोरदार पुरस्कार केला आहे. कादंबरीचा नायक प्रभाकर वडिलांच्या इच्छेविरुद्ध,

जिचा कौमार्यभंग बलात्कारानें झाला आहे, अशा एका रखेलीच्या मुलीशीं लग्न करतो. देहाच्या पावित्र्याहून निराळें असें मनाचें पावित्र्य आपल्या समाजाला माहीत नाहीं, अशी त्याची समाजाविरुद्ध तक्रार असते. कलेच्या दृष्टीनें प्रस्तुत कादंबरींत पुष्कळच दोष आहेत. कथानकांत कृतीपेक्षां व्याख्यानबाजीच फार. पात्रांचा स्वभाव स्वयंसिद्ध आहे, यांत कथानकानुरोधानें विकास किंवा फरक झालेला आढळून येत नाहीं. परंतु इतके दोष असूनहि त्यांतील बंडखोर वृत्तीमुळें व भावनांच्या खळबळाटामुळें या कादंबरीनें तत्कालीन तरुणांचें मन अगदीं भारून टाकिलें होतें. प्रेमविवाहाच्या आड येणारीं बंधनें तोडून टाकिलीं पाहिजेत, हा संदेश तरुण पिढीला मोहिनी घालील असाच आहे. अशा रीतीनें समाजाचे नवमतवादी टीकाकार म्हणून ते एकदम प्रसिद्धीस आले. ' बंधनाच्या पलीकडे ' गेल्यानंतर श्री० देशपांडे यांनीं ' सुकलेलें फूल ' व ' सदाफुली ' अशा दोन कादंबऱ्या लिहिल्या. या तिन्ही कादंबऱ्यांचा विषय जरी प्रेमाचा प्रभाव हाच आहे तरी त्याची मांडणी, जुळणी आणि प्रतिपादनशैली प्रत्येकींत अगदीं भिन्न आहे.

' बंधनाच्या पलीकडे ' या कादंबरींत प्रेमविवाहाचा पुरस्कार करणारें तत्त्वप्रतिपादन, 'सुकलेल्या फुलां'त मनोविश्लेषणपद्धतीनें केलेलें भावना-चित्रण व 'सदाफुलीं'त प्रतीकद्वारां केलेलें स्वभाव-रेखन असे या तिन्ही कादंबऱ्यांचे तीन निरनिराळे विशेष म्हणून सांगतां येतील. ' सुकलेल्या फुलां'तील बाह्यसृष्टि जरी फार मर्यादित असली तरी अंतःसृष्टींत होत असलेल्या भावनांच्या आन्दोलनांचें क्षेत्र फार विस्तृत आहे. केशव, कृष्णा, दिवाकर व शकुन्तला या चार दुर्दैवी व्यक्ति कृतज्ञता, प्रेम, कर्तव्य आणि हक्क या चतुष्कोणी आखाड्यांत शेवटपर्यंत अयशस्वीपणें झगडत असलेल्या पाहून कोणाला हळहळ वाटणार नाहीं ? वैयक्तिक नीतिमत्तेचा प्रश्न प्रेमाच्या कसोटीनें सोडविण्याचा श्री. देशपांडे यांनीं या कादंबरींत प्रयत्न केला आहे. सूचकता हें देशपांड्यांच्या ' सुकलेलें फूल ' व ' सदाफुली ' या दोन कादंबऱ्यांचें वैशिष्ट्य होऊन बसलें आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. 'सदाफुलीं'त तर या सूचकतेचा अतिरेक होऊन त्याला गूढ गुंजनाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. केवळ कथानकाच्या दृष्टीनें विचार केला तर ' सदाफुलीं'तील पहिल्या भागांत तें सुरू देखील झालेलें नाहीं असें म्हणावें लागतें. पण स्वभावरेखनाच्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे हीं पहिलीं एकसष्ट पृष्ठें कादंबरीकारानें विनाकारण खर्च केलेलीं नाहींत, याची जाणीव होते. तिमेचें स्वभावचित्र श्री. देशपांडे यांनीं मोठ्या आत्मीयतेनें,

सहृदयतेनें पण किंचित् उपहासात्मक बुद्धीनें काढल्याचा भास होतो. कादंबरीच्या शेवटीं तिमा व अशोक यांचा विवाह होऊन कादंबरीचा शेवट गोड होतो असें जरी दाखविण्यांत आलें आहे तरी त्यामुळें तिमावर निस्वार्थीपणानें उत्कट प्रेम करणाऱ्या शंतनूच्या भावनांचीं झालेल्या कोंडमारा पाहून या 'आदर्श-विवाहा'वर विषण्णतेची गडद छाया पडलेली दिसते, व अशोकाच्या दृष्टीला स्वर्गीय देवता वाटणारी तिमा शंतनूला राक्षसीण तर वाटत नसेलना? अशी शंका आल्यावांचून राहत नाहीं. भाषेच्या दृष्टीनें श्री. देशपांडे यांच्या कादंबऱ्या सरस उतरल्या आहेत. श्री. देशपांडे यांची भाषा पहिल्या कादंबरींत प्रौढ व आवेशयुक्त, दुसरींत मृदु व मोहक आणि तिसऱ्या कादंबरींत सूचक, सफाईदार व रेखींव पण थोडीशी कृत्रिम झाली आहे. श्री. देशपांडे हे समाजसत्तावादी म्हणून आज लोकांसमोर आले आहेत. श्रीमंतांचा आपमतलबीपणा, समाजांत सुधारक म्हणून प्रतिष्ठितपणें मिरविणाऱ्या पण आपल्या सज्ञान व प्रौढ मुलांमुलींवरहि मालकी हक्क सांगणाऱ्या लोकांचा ढोंगीपणा, भांडवलशाहींतील मूठभर लोकांना खूष ठेवण्याकरितांच कलेचा उपयोग करण्यांत येत असल्यामुळें तिची होत असलेली पायमल्ली वगैरे विषयांसंबंधीं लिहितांना श्री. देशपांडे यांचीं समाजसत्तावादाकडे झुकत असलेलीं मतें 'सदाफुलीं'त मधून मधून व्यक्त झालीं आहेत. परंतु समाजसत्तावादाचा पुरस्कार करणारे श्री. देशपांडे आपल्या तीनहि कादंबऱ्यांतून व्यक्तिस्वातंत्र्याकरितांच लढत असलेले पाहून आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं. समाजसत्तावादांत विवाहस्वातंत्र्य आहे, पण प्रेम ही एक पवित्र चीज असून तिची प्राप्ति ही एक ईश्वरी देणगी आहे असें मानलें जात नाहीं. त्याचप्रमाणें केवळ प्रेमामुळें एखाद्या व्यक्तीच्या आयुष्याला चांगलें अगर वाईट वळण लागणें, ही विचारसरणीहि समाजसत्तावादाच्या तत्त्वज्ञानाशीं अगदीं विसंगत आहे. व्यक्तीची सर्वांगीण उन्नति होण्याला आयुष्यांत प्रेमाव्यतिरिक्त अनेक गोष्टींची आवश्यकता असते व भांडवलशाहींत श्रमजीवी वर्गाला त्या उभ्या आयुष्यांतहि मिळत नाहींत, हें दाखविल्याशिवाय समाजसत्तावादाचा पुरस्कार नीट केला असें होत नाहीं.

## कला व मतप्रसार

नाटककार म्हणून प्रसिद्धीस आलेले श्री. भा. वि. वरेरकर यांच्या 'चिमणी', 'विधवा कुमारी', 'धांवता-धोटा', 'गोदू गोखले', 'कुलदैवत' व 'परतभेट' या सहा कादंबऱ्या वाचल्या म्हणजे मराठींतील नाट्यवाङ्मयाप्रमाणें कथात्मक वाङ्मयांतहि

त्यांचें स्थान बरेंच वरचें लागतें हें कबूल करावें लागेल. त्यांच्या 'चिमणी'नें वाचकांचें लक्ष आपल्याकडे फारसें वेधून घेतलें नाहीं, पण त्याचा वचपा त्यांच्या 'विधवा कुमारी'नें चांगल्या रीतीनें भरून काढला. या कादंबरीनें त्या वेळीं जी खळबळ उडवून दिली तिला कादंबरींतील विषयप्रतिपादनाइतकाच मामांनीं घेतलेला 'एका गतभर्तृके'चा बुरखाहि कारणीभूत झाला, हें विसरतां कामा नये. प्रस्तुत कादंबरी हरिभाऊंच्या 'पण लक्षांत कोण घेतो'च्या धर्तीवर लिहिलेली असून तींत एका बालविधवेची करुणाजनक आत्मकहाणी वाचावयास मिळते. सरळ संविधानक, साधी पण प्रसंगोपात्त कठोर झालेली भाषा, हृदयभेदक प्रसंग, भावनांचा हृदयस्पर्शी आविष्कार, 'विधवेचें कुंकू' यांसारख्या प्रश्नांची मार्मिक चर्चा इत्यादि गुणसमुच्चयामुळें ही कादंबरी मनाला चटका लावते, यांत शंका नाहीं. 'विधवा कुमारीं'त मथूच्या आयुष्याचा विलायतेला जाण्यापर्यंतचाच भाग आला आहे. तिच्या आयुष्याचा उत्तरार्ध 'परत भेट' या कादंबरींत वाचावयास मिळतो. परंतु तींत चंदू व सरूबाई यांच्या विषम संसारानेंच इतकी जागा व्यापिली आहे कीं, त्यामुळें मथूला दुय्यम स्थान प्राप्त होतें. मथूची सावत्र मुलगी ताई हिचें या दोन्ही कादंबऱ्यांत आलेलें चरित्र एका दृष्टीनें मथूपेक्षांहि अधिक करुणाजनक आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. स्त्रीजातीच्या उन्नतीसाठीं हजारों महाराष्ट्रीय स्त्रियांना बरोबर घेऊन चळवळी करण्याची मथूची महत्त्वाकांक्षा तिच्या आजारपणामुळें तिला पुरी करतां आली नाहीं तरी "अपुऱ्या राहिलेल्या इच्छा पूर्ण होण्यासाठीं पुनर्जन्म येणार तो महाराष्ट्रांतच येवो" अशी तिनें परमेश्वराजवळ प्रार्थना केली आहे. 'विधवा कुमारीं'त मथूच्या निम्मे अधिक तरी आयुष्याची हकीकत आली आहे; परंतु 'गोदू गोखले' या कादंबरींत तर गोदूचें आठ ते चौदा वर्षांपर्यंतचेंच चरित्र ग्रथित केलें गेलें आहे. अर्थात् गोदूच्या प्रत्यक्ष जीवनक्रमापेक्षां ज्या व्यक्ति गोदूच्या बालमनावर परिणाम घडवून आणतात त्यांनींच प्रस्तुत कादंबरीचा बराचसा भाग अडविलेला आढळतो. या व्यक्तींत गोदूच्या आईला फार महत्त्वाचें स्थान द्यावें लागेल. तिची सक्तीनें दाबून टाकण्यांत आलेली चौकस वृत्ति तिच्या मुलींत—गोदूंत उतरलेली आहे; एवढेंच नव्हे, तर गोदूच्या प्रत्येक प्रश्नाला सरळ उत्तर देऊन तिनें गोदूचा चौकसपणा वाढीसहि लाविला आहे. गोदूची ही लहानपणची हुषारी व चौकस वृत्ति पाहिली म्हणजे ती पुढेंमागें मामांची एक बंडखोर मानसकन्या होणार, असें भविष्य वर्तवावेंसें वाटतें. प्रस्तुत कादंबरींतील पात्रांच्या पार्श्वभूमीवर पसरलेलें

कोंकणचें वातावरण हा देखील या कादंबरीचा एक विशेष आहे. 'धांवता धोटा' या कादंबरीच्या कथानकावरच वरेरकरांचें 'सोन्याचा कळस' हें नाटक रचलेलें असल्यामुळें त्यांत गिरणीकामगारांचें आयुष्य, त्यांजपुढील प्रश्न, त्यांच्या चळवळी, त्यांचे संप, त्यांचे पुढारी इत्यादि विषय आले आहेत, हें न सांगतांच कळण्यासारखें आहे. नाटक व कादंबरी यांच्या घटनेंतील भेदानुसार प्रस्तुत कादंबरीची मांडणी व शेवट हीं नाटकापेक्षां निराळीं झालीं आहेत. कादंबरींतील मोटाभाईला श्रीमंतांनीं दूर केल्यामुळें व गरिबांचा त्याजवरील विश्वास निष्कारण उडाल्यामुळें तो शेवटीं मजूरमालकांच्या चळवळीचा अभ्यास करण्यासाठीं परदेशीं जातो, व आपल्या तेजस्वीपणानें सर्वांचे डोळे दिपविणारी घांटीण—नव्हे—कोंकणी बिजली 'बाँ व्हॉयेज' म्हणून त्याला निरोप देते! 'कुलदैवतां'त वेश्या व त्यांचें जीवन यांचें उद्बोधक चित्र पाहावयास मिळतें.

श्री. वरेरकर हे कलेचा स्वमतप्रसाराचें एक साधन या दृष्टीनें उपयोग करितात. त्यामुळें त्यांचें लिखाण मतप्रचारकाच्या विशिष्ट मनोवृत्तींत दिसून येणाऱ्या गुणदोषांनीं व्याप्त झालें आहे. मामांचा प्रान्ताभिमान व पुण्यावरील त्यांचा घुस्सा हा आतां सर्वांच्या परिचयाचा झाला आहे. आपला पुण्यावरील राग मामा वेळीं अवेळीं व्यक्त करीत असतात. 'विधवा कुमारीं'तील नानासाहेब हें पात्र पुणेंकरांवरील आपला राग व्यक्त करण्याचें एक साधन म्हणूनच घातलें आहे काय, असेंच कोणालाहि वाटेल. मामांचा कोंकणचा व त्यांतूनहि विशेषतः मालवणचा अभिमान त्यांच्या कादंबऱ्यांतून ठिकठिकाणीं व्यक्त झाला आहे. "व्याकरणाच्या दृष्टीनें पाहिलें, तर कोंकणची भाषा अगदीं व्याकरणशुद्ध आहे——पण, ह्या पुण्याच्या नजरेनें पाहूं लागलें तर मात्र, ती बावळट ठरते" या 'विधवा कुमारीं'तील ताईच्या विधानावरून मामांच्या प्रान्ताभिमानाला वेळीं दुरभिमानाचें स्वरूप कसें प्राप्त होतें, याची कल्पना येते. 'धांवत्या धोटयां'तील बिजली तर कोंकण व घांट यांतील 'जमीन अस्मानचें अंतर' हंसाला ऐतिहासिक पद्धतीचा अवलंब करून समजावून देते, व म्हणते कीं "मला घाटण म्हणूं नका. मला पेजखाऊ म्हटलेलं पत्करेल—महार म्हटलेलं पत्करेल-पण मला घांटण म्हटलें तर मला शिवी दिल्यासारखी वाटते." स्त्रीपुरुषांमधील हक्कांच्या झगड्यांत, स्त्रियांना समान हक्क मिळवून देण्याकरितां वरेरकरांनीं उघडपणें स्त्रियांचें वकीलपत्रच घेतलें असल्यामुळें त्यांनीं स्त्रियांमध्यें असलेल्या गुणांची तरफदारी करून नाटकांप्रमाणें आपल्या कादंबऱ्यांतहि पुरुषवर्गाचा द्वेष करणाऱ्या व त्यामुळें

आजन्म अविवाहित राहणाऱ्या स्त्रियांचीं पात्रें घातलीं आहेत. मामा सामाजिक बंडखोर व नवमतवादी लेखक म्हणून लोकांसमोर आले असले तरी त्यांच्या मनांत नव्याजुन्यांचें विलक्षण मिश्रण आढळून येतें. शिवाय त्यांनीं पुरस्कारिलेल्या मतांत शास्त्रीय दृष्टि क्वचितच दिसून येते; मतप्रचारकाचा आवेशच त्यांत अधिक प्रमाणांत आढळतो.

## कल्पकतापूर्ण कलाविकास

कवि, टीकाकार, लघुकथालेखक, नाटककार, चरित्रकार, लघुनिबंधकार, विनोदी वक्ते व लेखक अशा विविध अंगांनीं लोकांसमोर आलेले श्री. वि. स. खांडेकर यापुढें कादंबरीकार म्हणून मराठी वाङ्मयांत प्रामुख्यानें तळपणार, असें त्यांच्या अलीकडील 'दोन ध्रुव' व 'उल्का' या कादंबऱ्यांवरून भाकीत करावेंसें वाटतें. अर्थात् कादंबरीलेखनामुळें त्यांच्या लघुकथांच्या निर्मितींत व्यत्यय येणार आहे, अशांतला बिलकुल प्रकार नाहीं. लघुकथा लिहिणें हा तर त्यांचा नित्याचा व्यवसायच होऊन बसला आहे. मोठमोठालीं नकशीदार टेबलें व कपाटें करणाराला सुंदर अशीं लहान सहान खेळणीं तयार करावयाला निराळे परिश्रम थोडेच घ्यावे लागतात ? श्री. खांडेकर यांच्या 'हृदयाची हांक', 'कांचनमृग', 'दोन ध्रुव' व 'उल्का' या चार कादंबऱ्या आतांपर्यंत प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांतील पहिल्या दोन व शेवटच्या दोन यांमध्यें कालाप्रमाणें गुणांचेंहि अंतर पडलेलें दिसून येतें. पहिल्या दोहींत कादंबरीकारांची दृष्टि केवळ व्यक्तींपुरती मर्यादित झालेली असून दुसऱ्या दोहींत ती अधिक व्यापक व चिकित्सक बनून समाजाचें परीक्षण करण्याइतकी कार्यक्षम झाली आहे. 'हृदयाची हांक' या कादंबरींत खांडेकरांनीं प्रत्येकानें आपल्या हृदयाच्या प्रेरणानुसार वागलें पाहिजे; श्रीमंतीच्या हांकेला ओ देऊन, अधिकाराची हांक निमूटपणें मान्य करून अगर विद्वत्तेच्या हांकेपुढें मान वांकवून मुलीनें जन्माचा जोडीदार मुळींच निवडूं नये—फक्त हृदयाच्या हांकेलाच तिनें ओ द्यावी, हें तत्त्व प्रतिपादन केलें आहे व तत्त्वानुसार कमळ, कुसुम, कुमुद व प्रभाकर यांपैकीं कोण वागले व कोणाला वागण्याचें धैर्य झालें नाहीं, याचें चित्र रेखाटलें आहे. 'खेडीं सुधारतील तेव्हांच देश सुधारेल' या विचारानें प्रेरित होऊन सांगलींतील प्रोफेसरची जागा सोडून कोकणांतील एका खेडेगांवांत शिक्षकाची जागा पत्करणारा व तेथें समाजाच्या खालच्या थरांतील दुर्दैवी व्यक्तींना परोपरीनें सहाय्य करून शेवटीं वैधव्यांत पोळत असलेल्या सुधेशीं पुनर्विवाह करणारा सुधाकर हा एक

ध्येयवादी व स्वार्थत्यागी असा कर्ता सुधारक कसा असतो, हें ' कांचनमृगां 'त पाहावयास मिळतें. या पहिल्या दोन कादंबऱ्या लिहितांना खांडेकरांची दृष्टि जीवनांतलें काव्य शोधून काढण्यांतच गर्क झाल्यामुळें जीवनांतल्या तत्त्वाकडे त्यांचें दुर्लक्ष्य झालेलें दिसतें. ही उणीव त्यांनीं ' दोन ध्रुव ' व ' उल्का ' या दोन कादंबऱ्यांत चांगली भरून काढिली आहे. जीवनाकडे दुर्लक्ष्य करून कलेकरितां कला या तत्त्वाच्या आधारावर निर्माण होणाऱ्या ललित वाङ्मयाला प्रतिकार करण्याच्या बुद्धीनें ' दोन ध्रुवा'चा जन्म झाला असावा, असें वाटतें. कारण उभें आयुष्य कष्टांत काढणारा श्रमजीवी वर्ग व त्याच्या श्रमांवर स्वतःच्या कलासक्तीचें कोड पुरविणारा दुसरा भांडवलशाहीचा वर्ग, या दोन ध्रुवांमधील वैषम्य दाखविणें, हाच या कादंबरीचा मुख्य उद्देश आहे. आपल्या ललितलेखनानें महाराष्ट्रांत लोकप्रिय झालेला रमाकांत ' कलेसाठीं कला ' या तत्त्वाचा उपासक असतो. पण त्यानें उपेक्षिलेल्या त्याच्या पत्नीला कामापूरच्या काजूच्या कारखान्यांत नोकरी करून आपल्या अब्रूचें रक्षण करावें लागतें. वस्तुतः कला व जीवन यांचें नातें पतिपत्नीप्रमाणें प्रेममूलक कलहाचें पण परस्परावलंबित्वाचें असावयास पाहिजे. तें तसें असतें तर वत्सला व रमाकान्त यांचा संसार सुखाचा झाला असता. परंतु शरीरानें राबणाऱ्या अरसिक, कलाहीन आणि मंदबुद्धि लोकांची एक व रसिक, कलासंपन्न आणि प्रतिभाशाली अशा बुद्धिजीवी लोकांची एक अशा समाजांतील दोन जातींमधील झगडा जोंपर्यंत चालू आहे तोंपर्यंत वत्सला व रमाकान्त यांजमध्यें दोन ध्रुवांचेंच अंतर राहणार, हेंच कटु सत्य प्रस्तुत कादंबरींत चित्रित केलें आहे. हे दोन ध्रुव एकत्र यावयास पाहिजे असतील तर सामाजिक विषमता काढून टाकून स्वार्थत्याग, सहानुभूति व सहकारित्व या उदार तत्त्वांवर समाजाची पुनर्घटना झाली पाहिजे, असें कादंबरीकाराचें म्हणणें दिसतें. देशाकरितां फकिरी पत्करणारे बाप्पा व स्वार्थत्यागाला कर्तृत्वाची जोड देण्याकरितां शास्त्रीय शोधांत आपलें चित्त व वित्त अर्पण करणारे विद्याधर समाजांत निर्माण झाले तर समाजांतील अनेक दुःखांचा परिहार होईल, असा श्री. खांडेकर यांचा विश्वास दिसतो.

' उल्का ' ही कादंबरी वस्तुतः खांडेकरांनीं ' दोन ध्रुवां 'च्या पूर्वींच लिहिलेली असली तरी ' दोन ध्रुवां 'मागून प्रसिद्ध झाली. लेखकाच्या दृष्टीला हा जरी व्युत्क्रम वाटला तरी कलाविकासाच्या दृष्टीनें ' दोन ध्रुवां ' मागून ' उल्का ' प्रसिद्ध होणें हा क्रम अधिक इष्ट व आवश्यक होता, असें म्हणावें लागतें. कारण

कलेच्या दृष्टीनें विचार करितां ‘ दोन ध्रुवां ’ पेक्षां ‘ उल्का ’ ही अधिक सुंदर, सुसंगत व स्वाभाविक वाटते. ‘ दोन ध्रुवां ’ प्रमाणें या कादंबरींतहि प्रचलित सामाजिक विषमतेबद्दल नापसंती व दीन आणि दलित वर्गांबद्दल सहानुभूति दिसून आली तरी पूर्वोक्त कादंबरीपेक्षां प्रस्तुत कादंबरींतील घटना अधिक स्वाभाविक व विषयप्रतिपादन अधिक परिणामकारक वाटतें. ‘ दोन ध्रुवां ’त कथानकाला अधिक प्राधान्य दिलें आहे तर ‘ उल्कें ’त मनोविश्लेषणावर कादंबरीकारानें अधिक भर दिला आहे, त्याचाच हा परिणाम असावा. माडखोलकरांच्या ‘ भंगलेल्या देवळा ’ प्रमाणेंच ‘ उल्का ’ ही आत्मवृत्तपर कादंबरी असल्यामुळें वाचकाला उल्केच्या भावनांशीं व सुखदुःखांशीं अधिक सुलभतेनें समरस होतां येतें व तिच्या चारित्र्याचा ठसा त्याच्या मनावर अधिक खोल उमटतो. उल्केला तिच्या लहानपणींच राम गणेश गडकरी यांनीं ‘ नांवासारखें कांहींतरी कर ’ असा आशीर्वादात्मक संदेश दिला होता, व एका दृष्टीनें विचार करतां तो खरोखरच फलद्रूप झाला, असें म्हणावें लागतें. कारण उल्केच्या आयुष्याला अंतराळांत फिरणाऱ्या ग्रहगोलांप्रमाणें स्वतःचें तेज व गति अशी फारशी नाहींच. वातावरणाच्या तडाख्यांत सांपडून व त्याच्याशीं होणाऱ्या घर्षणानें थोडा वेळ विजेच्या झोताप्रमाणें चमकून दगड होऊन पडणाऱ्या खऱ्याखुऱ्या उल्कापाताप्रमाणेंच कादंबरीची नायिका उल्का हिचें चरित्र रेखाटलें गेलें आहे. कायदेभंग करून कारागृहांत जाण्याचा काळ हाच काय तो तिच्या आयुष्यांतील स्वयंप्रकाशित असा कालखंड होय. स्वार्थत्यागी पण दुःखमय जीवनाचा व भंगलेल्या आशांचा हा वारसा तिनें खुद्द आपल्या वडिलांपासूनच मिळविला होता हें, उच्च ध्येय समोर ठेवून आपलें सर्व आयुष्य मास्तरकी करण्यांत ह्मणजे पर्यायानें दारिद्र्यांत व परिस्थितीशीं झगडण्यांत घालविणाऱ्या भाऊसाहेबांच्या चरित्रावरून व स्वभावावरून दिसून येतें. कादंबरीचा नायक चंद्रकांत हा उल्केपेक्षां अधिक कर्तृत्ववान् व कणखर मनाचा आहे हें खरें; परंतु खुद्द कादंबरीकारानें ह्मटल्याप्रमाणें खरोखर तो एक ‘ धूमकेतू ’च आहे, यांत शंका नाहीं. एरव्हीं असहकारिता, मुळशी सत्याग्रह, शांतिनिकेतन व शेवटीं क्रांतिकारकांचा कट या परस्परांशीं अत्यंत भिन्न अशा अवस्थांतून फार झपाट्यानें होत गेलेल्या त्याच्या परिवर्तनाचा कार्यकारणभाव नीटसा लावतां येणार नाहीं. चंद्रकांताचा स्वभाव लक्षांत घेतां तो क्रांतिकारक बनतो, असें ह्मणण्यापेक्षां तो क्रांतिकारकांच्या कटांत जाऊन पडतो, असें ह्मणणेंच सत्यास अधिक धरून होईल.

शेंडे नक्षत्राप्रमाणेंच त्याच्या आयुष्याला देखील नियमबद्धता अगर सुसंबद्धता नाहीं, परंतु असें असून सुद्धां त्याचें चरित्र फार उदात्त व आकर्षक झालें आहे. केव्हां केव्हां तर उल्केपेक्षां त्याजबद्दलच जिव्हाळा व सहानुभाव अधिक वाटूं लागतो. असो. पहिल्या दोन कादंबऱ्यांपेक्षां पुढील दोन कादंबऱ्यांत श्री० खांडेकर यांनीं कलाविकासाच्या दृष्टीनें एकदम मोठी उडी मारली, यांत शंका नाहीं. पुढील कादंबऱ्यांत अद्‌भुतपणाचा भाग जरी फारसा कमी झालेला नाहीं तरी त्यांतील सृष्टि अधिक वैचित्र्यपूर्ण व दृष्टि अधिक व्यापक झालेली आढळून येते. सामाजिक विषमतेकडे बुद्धीप्रमाणेंच भावनेनें देखील कसें पाहतां येणें शक्य आहे, हें त्यांच्या शेवटच्या दोन कादंबऱ्यांत उत्तम रीतीनें पाहावयास मिळतें.

## कादंबरी व राजकारण

श्री. माडखोलकर हे आजपर्यंत मार्मिक व मर्मभेदक टीकाकार या नात्यानेंच साहित्यक्षेत्रांत ओळखिले जात असत. परंतु 'मुक्तात्मा' व 'भंगलेलें देऊळ' या दोन कादंबऱ्या लिहून त्यांनीं ललितवाङ्मयांतहि एकदम मोठ्या मानाचें अभिमानास्पद स्थान मिळविलें आहे हें, त्यांच्या दोन्ही कादंबऱ्यांनीं समाजांत जी एकदम मोठी खळबळ उडवून दिली, तिजवरून दिसून येतें. अर्थात् तुलनात्मक दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास 'भंगलेल्या देवळा'पेक्षां 'मुक्तात्म्यां'तून निर्माण झालेल्या वादळाचें क्षेत्र अधिक विस्तृत व स्वरूप अधिक उग्र होतें हें अगदीं उघड आहे. त्याला कारण म्हणजे 'मुक्तात्म्यां'त वाङ्मय आणि राजकारण यांच्या मर्यादा परस्परांत घुसल्या आहेत हेंच देतां येईल. मराठी कथात्मक वाङ्मयाचा इतिहास पाहिला म्हणजे निव्वळ राजकीय विषयाला वाहिलेली अशी 'मुक्तात्मा' ही मराठींतील अगदीं पहिली कादंबरी आहे, हें कबूल करावें लागेल. प्रस्तुत कादंबरींत कानपूर कटाच्या पूर्वार्धाचा वृत्तान्त आला असून हिंदुस्थानांत साम्यवादाचा उदय व उत्कर्ष होण्याला कोणती राजकीय परिस्थिति कारणीभूत झाली याची चिकित्सा केली आहे. साम्यवादाच्या तत्त्वज्ञानाचें सदरहू कादंबरींत प्रतिपादन केलेलें नाहीं व तो तिचा उद्देशहि नाहीं; पण साम्यवादाच्या तत्त्वज्ञानाचा हिंदुस्थानांत प्रवेश व फैलाव होण्याला कोणत्या राजकीय व सामाजिक घटना कारणीभूत झाल्या, त्याचें चित्रण या कादंबरींत केलें आहे. कादंबरीचा नायक चंद्रशेखर हिंदुस्थानांतील सर्व राजकीय पुढाऱ्यांविषयीं निराश होऊन अखेर त्या वेळीं जर्मनींत असलेल्या वीरेंद्र चक्रवर्तीलाच आपला मार्गदर्शक कां मानतो, हें दाखविणें हाच प्रस्तुत कादंबरीचा प्रधान हेतु आहे

असें वाटतें. मुख्य कथासूत्राच्या अनुषंगानें कादंबरीकारानें कांहीं लब्धप्रतिष्ठित अशा समाजकंटकांचें खरें स्वरूप उघड करून दाखविलें असून ललिता या पात्राच्या द्वारें एक लहानशी व अपूर्ण अशी प्रणयकथाहि रंगविली आहे. भगवंतराव, त्यांची भावजय, केशव, ललिता व चंद्रशेखर या व्यक्तींत प्रेमभावनांचें जें विविध स्वरूप पाहावयास मिळतें तें जितकें उत्कट तितकेंच उद्बोधकहि आहे. प्रस्तुत कादंबरींतील गुणांप्रमाणेंच त्यांत दोषहि भरपूर आहेत. कथानकाचा विस्कळितपणा व भाषेचा क्लिष्टपणा हे दोन प्रमुख दोष म्हणून दाखवितां येतील. कादंबरीचा खरा नायक चंद्रशेखरच आहे, याविषयीं जरी शेवटीं शंका उरत नाहीं तरी सुरुवातीला कादंबरीचें नायकत्व केशवनें पत्करिलें आहे किंवा काय, असा भास होतो; हें देखील कलेच्या दृष्टीनें एक वैगुण्यच आहे. परंतु हे सर्व दोष पत्करूनहि 'मुक्तात्मा' ही मराठींतील एक ओजस्वी व अपूर्व कादंबरी आहे, असें म्हणावें लागतें. 'भंगलेलें देऊळ' ही कादंबरी सामाजिक विषयाला वाहिलेली असून तींत आपल्या पांढरपेशा समाजांतील स्त्रियांना घटस्फोटाचा हक्क मिळवून देणें किती आवश्यक आहे तें दाखविलें आहे. वस्तुत: कादंबरीची नायिका अनसूया (हें नांव कादंबरीकारानें विधिघटनेचा अद्भुतपणा दाखविण्याकरितां मुद्दाम तर योजिलें नसेल ?) ही शेवटीं नवऱ्यापासून वेगळी राहूं लागली तरी घटस्फोट घेत नाहीं. ज्या पुरुषाशीं स्त्रीचा प्रथम संबंध येतो त्याच्या व्यक्तिमत्तेचा ठसा तिच्या हृदयावर कायमचा उमटलेला असल्यामुळें पतीच्या व्यसनाधीनतेच्या व बदफैलीपणाच्या पायीं तिच्या वैयक्तिक हक्काची पायमल्ली होत असतांहि ती त्याच्याशीं मनानें एकनिष्ठ राहते, त्याजपासून घटस्फोट घेण्याची इच्छा धरीत नाहीं, या मानसशास्त्राच्या एका सिद्धांताचा कादंबरीकाराला पुरस्कार करावयाचा आहे किंवा काय तें समजत नाहीं. परंतु तिनें घटस्फोट घेतला असता तर तें रास्त व इष्टहि झालें असतें, हाच निष्कर्ष कादंबरीवरून काढतां येत असल्यामुळेंच प्रस्तुत कादंबरी घटस्फोटाच्या प्रश्नावर लिहिलेली आहे, असें म्हणावें लागतें. ही कादंबरी आत्मचरित्राच्या पद्धतीनें लिहिलेली असल्यामुळें तींत सूत्रबद्धता व सुसंगतता स्वाभाविकपणें आली असून विषयाची निवड स्वभावरेखनाला व मनोविश्लेषणाला फार अनुकूल अशी झाली आहे. लेखकाचें खरें कौशल्य कथानकाची गुंफण करण्यांत नसून साध्या व सरळ कथानकाला भाषा, भावना व भारदस्तपणा यांच्या सहाय्यानें महत्त्व व रसत्व कसें आणतां येतें तें दाखविण्यांत आहे. कथानकाचा शेवट अगदीं

सुरुवातीला सांगून सुद्धां वाचकाला कथावस्तूशीं समरस व्हावयास लावणें हें कार्य अत्यंत कठीण असूनहि माडखोलकरांनीं तें मोठ्या शिताफीनें पार पाडलें आहे, हें पाहिलें म्हणजे त्यांच्या लेखणीच्या सामर्थ्याची कल्पना करतां येते. अरुणाचें चित्र म्हणजे मानसशास्त्रांतलें व लैंगिक शास्त्रांतलें एक कोडेंच आहे! कवि व तत्त्वज्ञ म्हणून कीर्तिशिखरावर तो आरूढ झाल्यामुळेंच बहुधा त्याला दुःखाच्या गर्तेत कोसळलेली अनू अजिवात दिसत नाहीं! नाहींतर प्रस्तुत कादंबरींत अनूच्या भंगलेल्या देवळावर त्यानें लिहिलेलें एखादें सुनीत तरी कादंबरीकारानें वाचकांस वाचावयास देणें आवश्यक होतें! कादंबरींतील शेवटचें व्याख्यान म्हणजे अनूच्या अव्याजमनोहर सौंदर्यावरील एक मोठें गालबोटच होय. अनूच्या अश्रुप्रवाहांत तें धुवून निघालें असतें तर बरें झालें असतें. प्रस्तुत कादंबरींतील भाषा सरस, सफाईदार व सहजसुंदर आहे. तिच्यांतील प्रौढपणा व सोज्ज्वलपणा अनूच्या विद्वत्तेला व चारित्र्याला जसा अनुरूप आहे तसाच कथानकाच्या गंभीरपणालाहि तो शोभून दिसतो. श्री. माडखोलकर यांनीं आतांपर्यंत फक्त दोनच कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यामुळें कादंबरीकार या नात्यानें त्यांचा दर्जा आजच ठरविणें अन्यायाचें होईल. परंतु या दोन कादंबऱ्यांवरूनच कथावाङ्मयांत ते बऱ्याच वरच्या दर्जाचें स्थान मिळवितील असें अनुमान काढावयास हरकत नाहीं.

## कथाकुशल श्री. हडप

श्री. वि. वा. हडप हे मराठी वाङ्मयांतील एक खंदे व फर्डे लेखक असून कोणत्याहि बऱ्या वाईट चर्चेचा विषय होऊन बसलेल्या सामाजिक गोष्टीवर किंवा प्रश्नावर तत्परतेनें कादंबरी रचून प्रसिद्ध करणारे शीघ्र लेखक म्हणून महाराष्ट्रांत त्यांची फार ख्याति आहे. बंगाली कादंबऱ्यांचीं रूपांतरें करून प्रथम कादंबरीक्षेत्रांत त्यांनीं प्रवेश केला असला तरी पुढें त्यांनीं अनेक स्वतंत्र कादंबऱ्या लिहून आपलें नांव सर्वतोमुखीं केलें. 'झांकली मूठ' ही त्यांची पहिली स्वतंत्र कादंबरी. ती उघडल्यानंतरहि सव्वा लाखाची ठरली हें पुढें त्यांनीं जें कादंबऱ्यांचें सत्र सुरू केलें, त्यांच्या पृष्ठसंख्येवरून कोणालाहि कबूल करावें लागेल. 'निरभ्र-चंद्र, 'माझा सम्राट्', 'दिव्य लावण्य', 'बहकलेली तरुणी', 'निवळलेली तरुणी', 'वांकडें पाऊल', 'इष्काचा प्याला', 'सौन्दर्याची फुलबाग', 'बाईल वेडा', 'मास्तरीण काकू', 'भविष्य—काळ', 'गौरीशंकर', 'रूढीच्या बणव्यांत', 'ब्रह्मलिखित', 'जादूगारीण', 'राणी कीं रखेली', 'दुलारी', 'विभावरी,

व नुकतीच प्रसिद्ध झालेली ' जाळ्यांतील मास्या ', अशा बऱ्याच कादंबऱ्या त्यांच्या बहुप्रसू व सुलभप्रसू लेखणींतून उतरल्या आहेत. त्यांखेरीज ' पेशवाईचें पुण्याहवाचन ', ' पे. प्राणप्रतिष्ठा ', ' पे. ध्रुवदर्शन ', ' पे. ध्रुव ढळला ', ' पे. पुनर्जन्म ', ' पे. पुनर्वैभव ', ' पे. दरारा ', ' पेशवाईतील दुर्जन ', ' पे. पश्चिम दिग्विजय ', ' पे. धर्मसंग्राम ', ' पे. उत्तर दिग्विजय ', पेशवाईवरील गण्डान्तर', ' पेशवाईचें मन्वंतर ' ह्या पेशवाईवरील तेरा कादंबऱ्या लिहून ' नाथमाधवां'च्यां स्वराज्यविषयक ' श्रीगणेशा'दि ऐतिहासिक कादंबऱ्यांची सांखळी पेशवाईच्या दुव्यांत अडकवून मराठी राज्याची जवळ जवळ इतिश्री केली असें म्हणावयास हरकत नाहीं. ' बाईलवेडा ' व ' सौंदर्याचा फुलबाग ' ह्या कादंबऱ्यांत समाजांतील कांहीं प्रतिष्ठित लोकांचीं दुष्कृत्यें दाखविलीं असून, ' मास्तरीण काकू ' या कादंबरीच्या द्वारें शाळाखात्यांतील अधिकाऱ्यांच्या अरेरावी व दुर्व्यसनी वर्तनामुळें असहाय स्त्रीशिक्षकांवर कसा जुलूम होतो व त्यापायीं स्त्रीशिक्षणाचें पाऊल कसें मागें पडतें हें दाखविलें आहे. वर्तमानपत्रें व मासिकें यांतून बराच गाजावाजा झालेल्या त्यांच्या ' दुलारी ' ह्या कादंबरींत सहवासोत्तर विवाहाचा पुरस्कार केला असून विषयानुरोधानें त्यांत ' कलेसाठीं कला ' या तत्त्वाच्या बुरख्याखालीं नीतिहीन वाङ्मय निर्माण करणारे प्रसिद्ध लेखक, स्वतःस सनातनी म्हणविणारे ढोंगी लोक, नाटकमंडळ्यांतील नटी, व आजच्या सुशिक्षित तरुण वर्गाची कामुक वृत्ति इत्यादिकांवर कडक व भडक भाषेंत टीका केली आहे. स्वातंत्र्याच्या सुधारकी वातावरणांत वाढलेली दुलारी ही कादंबरीची नायिका असून कुंवारपणींच गर्भवती होते व शेवटीं तिचें पावित्र्य मनास पटत असतांहि तिच्याशीं विवाह करण्यास कांकू करणारा सुधाकर शेवटीं विधिपूर्वक तिचें करग्रहण करतो, असें कादंबरींत दाखविलें आहे. ' विभावरी ' ही आपल्या वडील वाङ्मयीन बहिणीपेक्षां फार निराळ्या स्वभावाची असून वृत्तीनें फार सालस आहे. हिच्यांत वाढत्या स्त्रीशिक्षणानें संसार सुखाचे होण्याऐवजीं ते दुःखासच कारणीभूत कां होतात, या प्रश्नाची चर्चा केली असून जुन्या आचारविचारांच्या माणसांशीं सुशिक्षित सुधारकांचा संबंध असल्यामुळें जी मानसिक विषमता उत्पन्न होते ती या दुःखाच्या मुळाशीं असते, असा निष्कर्ष काढला आहे. तथापि विभावरीप्रमाणें व्यवहारचातुर्य दाखविल्यास कुटुंबांतील जुन्या चालीच्या माणसांचाहि लोभ व प्रेम संपादन करतां येऊन संसार सुखाचा करतां येणें शक्य आहे, हें देखील लेखकानें चांगल्या रीतीनें दाखविलें आहे. ' जाळ्यांतील माशा '

या कादंबरींत अलीकडे टीकाविषय झालेल्या बुवाबाजीचें हिडिस स्वरूप चित्रित केलें आहे. श्री. हडप यांची भाषा ओघवती असून अत्यंत ठसकेदार आहे. त्यांच्या बऱ्याच कादंबऱ्यांतून समाजाची काळी बाजूच अतिशयोक्तीनें दाखविण्यांत आली असल्यामुळें त्यांत थोर लेखकाला आवश्यक असलेली तारतम्यबुद्धि व संयम यांचा प्रायः अभावच आढळतो. श्री. हडप यांनीं आपल्या कांहीं कादंबऱ्यांतून वर्णन केलेलीं भेसूर चित्रें आपल्या समाजांत दिसतच नाहींत, असें कोणीहि म्हणणार नाहीं, पण श्रेष्ठ दर्जाचा लेखक समाजांत त्याला आढळून आलेल्या बऱ्याबाईट गोष्टींचें नुसतें चित्रणच करून थांबत नाहीं तर तो त्यांची संगति लावतो व त्यांचा कार्यकारणभाव शोधून काढतो. लेखनांत ही दृष्टि बाळगणाऱ्या लेखकानें समाजाची कोणतीहि बाजू रंगविली तरी ती त्यामुळें समर्थनीय ठरते. श्री. हडप हे समाजांतील बरींबाईट दृश्यें केवळ मॅग्निफाइंग ग्लासमधून पाहून तीं निरनिराळ्या रंगांत चित्रित करणारे लेखक आहेत; डॉ. केतकरांच्या ठिकाणीं असलेली चिकित्सक संशोधकाची दृष्टि त्यांच्या ठिकाणीं नाहीं. ह्या विशिष्ट दृष्टीचा अभाव असल्यामुळें इतर अनेक वाङ्मयीन गुणांनीं युक्त असलेल्या त्यांच्या वाङ्मयाला बूड नाहीं, अशी स्थिति झाली आहे.

## कल्पकता व सुधारणावाद

श्री. तात्यासाहेब कोल्हटकर यांनीं काव्य, नाटक, विनोद इत्यादि वाङ्मयक्षेत्रांत महनीय कामगिरी करून उतार वयांतहि आपलें बुद्धिचापल्य कमी झालेलें नाहीं हें दाखविण्याकरितांच कीं काय 'दुटप्पी कीं दुहेरी' व 'श्यामसुंदर' ह्या दोन छोटया पण सुंदर कादंबऱ्या लिहिल्या आहेत. कलाविलास व ध्येयवाद यांचा मधुर संगम हें कोल्हटकरांच्या वाङ्मयाचें वैशिष्ट्य असून त्यांच्या इतर वाङ्मयाप्रमाणें ह्या दोन कादंबऱ्यांतहि अनुक्रमें राजकीय व सामाजिक ध्येयवादाचा पुरस्कार केलेला आढळतो. 'दुटप्पी कीं दुहेरी' ह्या कादंबरींत ध्येयवादापेक्षां कल्पकतेलाच अधिक प्राधान्य दिलें गेलें असलें तरी त्याची भरपाई त्यांनीं 'श्यामसुंदर' ह्या नितान्त सुंदर कादंबरीनें भरून काढिली आहे. अस्पृश्यता व निरक्षरता ह्या हिंदुसमाजांतील दोन मोठ्या दोषांच्या दुष्परिणामांचें हृदयस्पर्शी चित्र काढणारी 'श्यामसुंदर' ही मराठींतील हरिजनांच्या प्रश्नावरील पहिलीच कादंबरी आहे, हें लक्ष्यांत घेतलें म्हणजे कोल्हटकरांच्या सुधारणावादाच्या व्यापकपणाची कल्पकना येते

'दुटप्पी कीं दुहेरी' या कादंबरीच्या कथानकाचा विस्तार कादंबरीचे नायक

हरिहररावयांच्या वरकरणी दुटप्पीपणामुळें होतो तर त्याचा गोड शेवट हरिहररावांची भूमिका दुहेरी असल्याचें कळल्यावर होतो. कादंबरीला कथानक असें फारसें नसून पात्रेंहि पांचसहांपेक्षां जास्त नाहींत. स्वभावरेखन हा प्रस्तुत कादंबरीचा प्राण असून मनोविश्लेषण हा तिचा आत्मा आहे; त्यामुळें लेखकानें कृतीपेक्षां विचारांवर व संभाषणांवर अधिक भर देऊन विषयानुरोधानें काव्य, वाङ्मय, टोपणनांवाची इष्टानिष्टता, जहाल, मवाळ इत्यादि अनेक गोष्टींवर मोठी उद्बोधक चर्चा केली आहे. कादंबरीची भाषा घोटीव व प्रौढ असल्यामुळें सर्वसाधारण वाचकाच्या दृष्टीनें थोडी बोजड व क्लिष्ट झाली आहे. हरिहररावांच्या जहाल व नेमस्त अशा दुहेरी भूमिकेमुळें कादंबरींत राजकीय व सामाजिक विषयांचें तात्त्विक विवेचन पुष्कळच आलें आहे. 'श्यामसुंदर' या अस्पृश्योद्धारावर लिहिलेल्या कादंबरींत सुशिक्षित तरुणांनीं गांवोगांवीं हिंडून दलितवर्गाची उन्नति करण्याचें ठरविल्यास त्यांनीं कोणत्या मार्गांचा व साधनांचा अवलंब करावा याचें श्यामच्या द्वारें दिग्दर्शन केलें आहे. कादंबरीचा नायक मंदबुद्धि असूनहि आपल्या गुणांच्या जोरावर चिमणपूर ह्या गांवांत क्रमाक्रमानें जी सुधारणा घडवून आणतो ती खरोखरच फार उत्साहजनक आहे, यांत शंका नाहीं. 'दुटप्पी कीं दुहेरीं'त बुद्धीचा विलास अधिक तर 'श्यामसुंदर'मध्यें भावनेचा जिव्हाळा अधिक आहे. पहिलींत कल्पकता तर दुसरींत रसोत्कटता, हे गुण प्रामुख्यानें आढळून येतात. संविधानक, रचना, भाषा व विषयाची अभिनवता आणि महत्त्व हीं सर्व लक्षांत घेतां कथात्मक वाङ्मयांत श्यामसुंदरचें स्थान स्वतंत्र आणि फार वरचें लागेल.

## आत्मवृत्तपर कादंबरी

प्रि. गो. चि. भाटे यांनीं 'प्रेम कीं लौकिक' ही आत्मवृत्तपर कादंबरी लिहून मराठी कथात्मक वाङ्मयांत एका दृष्टीनें अपूर्व भर घातली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण कादंबरींत आपलें स्वतःचें चरित्र थोड्याअधिक प्रमाणांत गुंफणारे लेखक अनेक असले तरी कादंबरीची सर्व उभारणीच स्वतःच्या चरित्रावर करून तसें कादंबरीच्या मुखपृष्ठावर स्पष्टपणें सांगणें हा प्रकार मात्र या प्रस्तुत कादंबरीच्या बाबतींतच आढळून येतो. याचा परिणाम असा झाला आहे कीं, सदरहू पुस्तकाला धड कादंबरीहि म्हणतां येत नाहीं व धड आत्मवृत्तहि म्हणतां येत नाहीं. वाचकाच्या होणाऱ्या द्विधावृत्तीमुळें ग्रंथाच्या वाङ्मयात्मक रसग्रहणांत व्यत्यय आल्याशिवाय राहत नाहीं. 'प्रेम कीं लौकिक' या प्रश्नाचा निकाल लेखकानें

प्रेमाच्या बाजूनें दिला आहे. परंतु हें प्रेम केवळ शारीरिक किंवा वैषयिक स्वरूपाचें नाहीं. प्रेमांतील राजसपणाबरोबर इतर सात्विक मनोवृत्तींचा व भावनांचाहि त्यांत अंतर्भाव झाला आहे. भाऊसाहेब, भास्करभट व इंदुमती यांचीं चित्रें फारच सुंदर रेखाटलीं आहेत. मनोविश्लेषण, स्वभावरेखन, कांहीं तात्त्विक प्रश्नांचें विवेचन व भाषा या गुणसमुच्चयामुळें कादंबरी चित्ताकर्षक व उद्बोधक झाली आहे.

## रामायणाचें महाभारत

श्री. दत्तो आप्पाजी तुळजापूरकर यांनीं 'माझें रामायण' ही एकच कादंबरी लिहिली असली तरी कादंबरीची लांबीरुंदी, तिच्यांतील काल व घटना, तींत चर्चिलेले अनेक विषय व कथानकाचा विस्तार यांचा विचार केला म्हणजे तुळजापूरकरांनीं एक कादंबरी लिहून एकदम चारपांच कादंबऱ्या लिहिण्याचें श्रेय मिळविलें आहे असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. कादंबरीकारांनीं आपल्या कादंबरीस 'माझें रामायण' हें अन्वर्थक नांव देऊन टीकाकारांचीं तोंडें बंद करण्याचा प्रयत्न केला आहे, यांत शंका नाहीं. परंतु ह्या रामायणाचेंहि महाभारत झालें आहे, अशी कोणीं टीका केल्यास ती अगदींच अनाठायीं होईल काय? ही कादंबरी उषा या नांवाच्या एका सुशिक्षित स्त्रीच्या आत्मचरित्राची नवलकथा असून तींत सत्तावन सालच्या बंडापासून तों थेट १९१९ सालांतील जालियनवाला बागेच्या कत्तलीपर्यंतच्या अनेक राजकीय, धार्मिक व सामाजिक घडामोडींची हकीकत आली आहे. फलज्योतिष, ग्रामसुधारणा, गृहव्यवस्था, संस्थानांतील कारभार, हिंदी स्त्रियांची सुधारणा, आदर्श मासिकाची योजना, सॉलिसिटर लोकांच्या धंद्याचें स्वरूप, हिंदु धर्म, चापेकर प्रकरण, रौलेट ॲक्ट इत्यादि हरतऱ्हेचीं प्रकरणें कादंबरींत आलीं असल्यामुळें कादंबरीची रचना बरीच सैल झाली असली तरी तिच्यांतील माहिती व चर्चा पुष्कळच मनोरंजक व उद्बोधक आहे. प्रस्तुत कादंबरीचा सर्वांत मोठा गुण म्हणजे लेखकाची व्यापक दृष्टि हा होय. हिंदी राजकारणाचा व समाजसुधारणेचा या कादंबरींत जितक्या बहुश्रुतपणानें व राष्ट्रीय दृष्टीनें विचार केला आहे तितका दुसऱ्या कोणत्याहि मराठी पुस्तकांत केला असेल असें वाटत नाहीं. आपल्याकडील कादंबरीकारांत जर कोणत्या गुणाचा अभाव असेल तर तो म्हणजे व्यापक दृष्टीचा. ज्यांना एखादी विशिष्ट राजकीय दृष्टि आहे असे कादंबरीकार आपल्याकडे अगदीं विरळा. प्रणयाला पोषक अशा एखाद्या लहानशा घटनेवरच बहुतेक कादंबरीकार आपल्या कथेचा टुमदार बंगला उठवतात. प्रस्तुत कादंबरी म्हणजे एक अवाढव्य

इतिहासप्रसिद्ध वाडा आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. अर्थात् टुमदार बंगलीचें सौंदर्य या वाड्यांत दिसून आलें नाहीं तरी त्याला एक प्रकारचें विशिष्ट वैभव खास आहे. सज्जनांचा जय व दुर्जनांचा पराजय अशा तऱ्हेच्या काल्पनिक जगांतल्या रूढीला इतरहि अनेक सामाजिक रूढींप्रमाणें या कादंबरींत फांटा दिला असल्यामुळें तिच्यांत ध्येयवादाबरोबर व्यावहारिकपणाहि भरपूर आला आहे. हरिभाऊंच्या परंपरेंतील अलीकडील एक ध्येयप्रधान कादंबरी असें या कादंबरीचें स्थूलपणें वर्णन करावयास हरकत नाहीं.

## स्त्रियांचे कैवारी

हिंदुस्त्रियांच्या कायदेशीर दुर्दशेची मराठी वाचकांना लेखनद्वारें ओळख करून देणारे श्री. कृ. के. गोखले यांच्या 'एकत्र कीं विभक्त' ह्या कादंबरींत कायदेशीर हक्कांच्या अभावीं समायिक कुटुंबांतील स्त्रियांची कशी दुर्दशा होते, याचें चित्र रेखाटलें आहे, तर बडोद्याचे सुप्रसिद्ध वकिली-साहित्यिक श्री. वा. वि. जोशी यांच्या 'रोहिणी' व 'जन्माचा बंदिवास' ह्या कादंबऱ्यांतून स्त्रियांचें वकीलपत्र घेऊन त्यांचीं दुःखें वाङ्मयाच्या वेशीवर टांगलीं आहेत. आजच्या समाजस्थितींत मिश्र-विवाह होणें ही घटना अशक्य नाहीं व अस्वाभाविकहि नाहीं. परंतु मिश्रविवाहाच्या पायीं नातेवाइकांपासून व समाजापासून होणारा त्रास व छळ हा पुरुषापेक्षां स्त्रीलाच अधिक कसा सहन करावा लागतो, हें 'रोहिणी' या कादंबरींत दाखविलें आहे. 'जन्माचा बंदिवासां'त कायद्यांच्या एकदेशीयपणामुळें हिंदुस्त्रियांच्या वैवाहिक जीवनाची कशी राखरांगोळी होते, हें कालिंदी, धनवंता, दमयंती व तरंगिणी या चार स्त्रीपात्रांच्या द्वारें दाखविलें असून त्याचें निराकरण करण्याकरितां घटस्फोटाची आवश्यकता प्रतिपादिली आहे. घटस्फोटाच्या प्रश्नाला ज्या अनेक बाजू आहेत त्या सर्वांचा जरी प्रस्तुत कादंबरींत विचार केलेला नाहीं, तरी या प्रश्नांत कायद्याचें स्थान काय आहे व तें कसें असावें, याचें फार चांगलें विवेचन केलें आहे. बळिभद्र, गोवर्धन, सुरेश व महीपती हे चार नादान नवरे आजच्या हिंदुसमाजांतील नवरेशाहीचे चार इरसाल प्रतिनिधीच आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं. कथासूत्राच्या अनुषंगानें विवाहविषयक कायद्यांचीं कलमें व माहिती देण्याकरितां लेखकानें ज्या युक्त्यांचा अवलंब केला आहे, त्या सर्वच कलेच्या दृष्टीनें समर्थनीय ठरल्या नाहींत तरी त्यांत लेखकाचें चातुर्य चांगलेंच प्रकट झालें आहे. एका प्रकरणाला तर 'न वाचला

तरी चालेल असा मजकूर ' हा मथळा देऊन त्या आधारावर टीकाकारांचीं तोंडें बंद करण्याचा श्री. जोशी यांनीं आपला वकिली बाणा मोठ्या कौशल्यानें दाखविला आहे. कादंबरींत शेवटीं शेवटीं सत्याग्रहाच्या चळवळीचें वर्णन आलें आहे; त्याचा फायदा घेऊन लेखकानें आपला पुण्यावरील बुस्ला व्यक्त केला आहे तो इतर दृष्टींनीं कदाचित् समर्थनीय ठरला तरी कादंबरीच्या कथानकाला किंवा त्यांतील हेतूला त्याची काय आवश्यकता आहे याचा उलगडा होत नाहीं.

## गरिबांचे कादंबरीकार

नाटक-नाटिकाकार म्हणून अलीकडे विशेष प्रसिद्धीस आलेले श्री. ना. वि. कुळकर्णी यांनीं 'महाराष्ट्र-कुटुंब-मालें 'तून ध्येयप्रधान अशा बऱ्याच कादंबऱ्या लिहिल्या आहेत. ही माला चालू असतांना तिच्या पांचसहा वर्षांच्या आयुष्यांत जीं एकंदर वीसएकवीस पुस्तकें बाहेर पडलीं त्यांतलीं श्री. कुळकर्णी यांनीं स्वतःच सुमारें दहाअकरा पुस्तकें लिहिलीं आहेत, यावरून त्यांच्या लेखनसंसाराची साक्ष पटते. श्री. ना. ह. आपटे यांच्याप्रमाणेंच समाजांतील निरनिराळ्या प्रश्नांवर लहानमोठ्या कादंबऱ्या लिहून त्याजपुढें उच्च ध्येयें ठेवणें हा त्यांच्या कादंबऱ्यांचा एक विशेष आहे. ' कसे दिवस जातील ' ह्या कादंबरींत नगर कीं नांगर हा प्रश्न उपस्थित केला असून, शेतकरी व मजूर यांजसारख्या श्रमजीवी लोकांच्या शहरांतील दुःखमय आयुष्याचा विचार करतां त्यांनीं शेती करणेंच अधिक हितावह आहे असा निष्कर्ष काढला आहे. ' शिपाई ' ह्या कादंबरींत खेडेगांवांतील आयुष्यक्रमाची दुसरी बाजू दाखविली असून त्यांत सरकारी अधिकाऱ्यांना वश करून घेऊन कांहीं लब्धप्रतिष्ठित लोक गरीब व अज्ञानी लोकांना कसे छळतात, याचें चित्र पाहावयास सांपडतें. ' मजूर ' ह्या कादंबरींत भांडवलवाल्यांनीं थोडासा मनाचा उदारपणा दाखविला तर संपाच्या वावटळी सहज टाळतां येण्यासारख्या असून मजुरांचें जिणेंहि त्यामुळें अधिक सुखावह होण्याचा संभव आहे याचें चित्र रेखाटलें आहे. गाल्सवर्दीच्या ' स्ट्राइफ ' ह्या नाटकामुळें लेखकाला प्रस्तुत कादंबरी लिहिण्याची स्फूर्ति झाली असावी, असें वाटतें. ' माणिक ' ह्या कुटुंबमालेच्या एकोणिसाव्या पुष्पांत महाराष्ट्रांतील इनामदार-वर्गाच्या जुलमी वृत्तीचें, व्यसनाधीनतेचें शब्दचित्र काढलें असून त्यांत ग्रामसुधारणेच्या कांहीं दिशा दर्शविल्या आहेत. प्रस्तुत कादंबरींतील नायक राजाभाऊ याच्या अधःपाताचें दृश्य जितकें भेसूर आहे तितकेंच नायिका माणिक हिच्या अंतकालाचें दृश्य हृदयस्पर्शी आहे. श्री. कुळकर्णी यांच्या कादंबऱ्यांचीं कथानकें साधीं असून

भाषाहि बाळबोध वळणाची आहे. ग्रामसुधारणेवर त्यांचा विशेष कटाक्ष दिसतो. 'गरीब लोकांचे गरीब लेखक' असें कादंबरीकार या नात्यानें त्यांचें थोडक्यांत वर्णन करावयास हरकत नाहीं.

सुप्रसिद्ध नाटककार काकासाहेब खाडिलकर यांचे चिरंजीव श्री. य. कृ. खाडिलकर यांनीं 'संसार-शकट' व 'सदानंद' ह्या कादंबऱ्या लिहून आपल्या वडिलांनीं उपेक्षिलेल्या अशा एका वाङ्मय-क्षेत्रांत थोडाबहुत लौकिक संपादन केला आहे. 'प्राविण्यां'तून क्रमशः प्रसिद्ध झालेल्या 'संसार-शकटां'त आपल्या समाजांतील विवाहपद्धतींतील दोषांचें दिग्दर्शन केलें असून स्त्रियांच्या समान हक्कांचा पुरस्कार केला आहे. आपणास 'पाहावयास' आलेल्या मंडळीच्या उद्गारांमुळें चिडून जाऊन पुरुषजातीवरील आपला राग काढण्याकरितां स्थळ नापसंत करणारी तडफदार सरला ही कादंबरीची नायिका, पुढें दुसऱ्या एका पुरुषाबरोबर स्वपसंतीनें लग्न लावूनहि आपल्या पारतंत्र्याची जाणीव होतांच गृहत्याग करते व शील सांभाळून स्वकष्टानें आपलें पोट भरणें बायकांनाहि शक्य आहे, हें सिद्ध करून दाखविते; व शेवटीं भागीदारीचे समान हक्क देऊन तिचा नवराहि तिचा पुन्हा स्वीकार करतो. संवादांतील क्वचित् प्रसंगीं दिसून येणारा भाषेचा नाटकी थाट पाहिला म्हणजे कादंबरीकारांनीं आनुवंशिक गुणांवरील आपला हक्क सर्वस्वीं बुडूं दिला नाहीं, असें म्हणावेंसें वाटतें. 'सदानंद' या कादंबरींत सेवा, सहिष्णुता व त्याग या गुणत्रयीचें महत्त्व पटवून देण्याकरितां लेखकानें एका जुन्या वळण्याच्या महाराष्ट्रीय कुटुंबाचें चित्र काढलें आहे. मात्र स्वतःच्या जबाबदारीवर 'संसार-शकट' हांकण्याची आपली लायखी सिद्ध करणाऱ्या तडफदार सरलेचें पात्र निर्माण केल्यानंतर सदर कादंबरींतील प्रातिव्रत्याच्या रडकथा सांगणारी प्रतिकारशून्य नायिका रंगविण्यांत लेखकानें काय साधलें तें समजत नाहीं. कादंबरीचा कांहीं भाग नीरस झाला असला तरी सुरुवातीस विनोदामुळें बरेंच मनोरंजकत्व आलें आहे.

'नवाकाळ' मध्येंच काम करणारे श्री. के. रा. पुरोहित यांनीं 'शून्यजगत्', 'आकाशपुष्प' व 'मी कोण ?' या कादंबऱ्या लिहून मराठी कथात्मक वाङ्मयांत चांगली भर घातली आहे. उपयुक्त तीन कादंबऱ्यांपैकीं पहिल्या दोन टॉलस्टॉयच्या Resurrection व Anna Karenina या जगत्प्रसिद्ध कादंबऱ्यांचीं रूपांतरें असून तिसरी 'मी कोण' ही स्वतंत्र आहे. 'जन्माचा बंदिवास', 'बंधुमुक्ता' इत्यादि कादंबऱ्यांप्रमाणें या कादंबरींतहि हिंदु स्त्रियांच्या वैवाहिक जीवनांतील दुःखमय

परिस्थितीचें वर्णन केलें असून घटस्फोटाच्या कायद्याची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. कादंबरीची नायिका नलिनी हिच्या वैवाहिक जीवनांतील निराशामय घटनांवर कादंबरीचें मुख्य कथासूत्र गुंफिलें आहे. परंतु तिच्या दुःखमय आयुष्याला इतरांपेक्षां तिची स्वतःची दुबळी मनोवृत्तीच अधिक जबाबदार आहे, हें पाहिलें म्हणजे लेखकानें पुरस्कारिलेलें तत्त्व बिनतोड सिद्ध झालें आहे असें म्हणवत नाहीं. नलिनीवर प्रेम करणाऱ्या व तिच्याच सांगण्यावरून विमलशीं लग्न करून मग दुःखाचे दीर्घ निश्वास सोडीत बसणाऱ्या वसंतालाहि स्वतःच्या दुःखांबद्दल तक्रार करण्याचा काय अधिकार आहे, तें कळत नाहीं. 'निराशा म्हणजेच प्रेम, निराशेंतच प्रेमाचें सारसर्वस्व सांठविलेलें असतें' या प्रेमविषयक तत्त्वज्ञानाच्या आधारावर घटस्फोटाची आवश्यकता सिद्ध होण्याऐवजीं त्याची निष्फलता व निरर्थकताच सिद्ध होण्याचा अधिक संभव आहे.

## संस्थानी राजकारण

श्री. तात्यासाहेब केळकर यांची केसरींतून खंडशः प्रसिद्ध झालेली व पुढें पुस्तकरूपानें प्रसिद्ध होतांच तिची लवकरच दुसरी आवृत्ति काढावी लागणारी 'नवलपूरचा संस्थानिक' ही कादंबरी मराठी कथात्मक वाङ्मयांत एका दृष्टीनें अपूर्वच मानिली पाहिजे. कारण संस्थानी राजकारणावरच जिची उभारणी केली आहे, अशी मराठींत याखेरीज दुसरी कादंबरी नाहीं. आपल्या संस्थानिकांचे विविध प्रकारचे छंद व चाळे लक्ष्यांत घेतले म्हणजे संस्थानी कारभारावरील कादंबरी ही रहस्यमय व मनुष्यस्वभावाच्या विकृत मनोवृत्तींचें भेसूर दृश्य दाखविणारीच असली पाहिजे, असें मानण्याकडे वाचकाची प्रवृत्ति होते. परंतु प्रस्तुत कादंबरी त्याला अपवाद आहे. हिंदी विशेषतः महाराष्ट्रीय संस्थानांविषयींची श्री. केळकर यांना वाटत असलेली आपुलकीची भावना लक्ष्यांत घेतली म्हणजे त्यांनीं काढलेल्या आदर्श संस्थानिकाच्या चित्रासंबंधीं आश्चर्य वाटत नाहीं. अर्थात् प्रस्तुत कादंबरींत विकृत मनोवृत्तीचे दाखले सांपडतच नाहींत, अशांतला प्रकार नाहीं; पण ते संस्थानांतील दिवाण व त्यांचे बगलबच्चे यांच्या कृष्णकारस्थानाच्या रूपानें. कादंबरी ध्येयप्रधान असली तरी तींत वस्तुस्थितीचेंहि चित्रण केल्यामुळें तिचें स्वरूप केवळ काल्पनिक व आभासात्मक झालेलें नाहीं. दिवाणसाहेब, माईसाहेब, पोलिटिकल रेसिडेंट, व भाऊसाहेब इत्यादि पात्रें हीं सत्यसृष्टींत वावरणारींच वाटतात. कॉमरेड डंखीचें पात्र घालून मात्र केळकरांनीं कम्युनिस्टांना विनाकारण अन्याय केला आहे,

असें म्हणावें लागतें. परंतु हें एक गालबोट सोडल्यास संस्थानिकांविषयीं आदर-भाव व्यक्त करणारी ही कादंबरी लिहून तात्यासाहेबांनीं मराठी कथात्मक वाङ्मयांतील एक उणीव फार चांगल्या रीतीनें भरून काढिली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आमच्या संस्थानिकांनीं प्रस्तुत कादंबरींत पुरस्कारिलेलें ध्येय आपल्या समोर ठेवल्यास कादंबरीकाराप्रमाणेंच त्यांच्या प्रजाजनांसहि धन्यता वाटेल.

तात्यासाहेब केळकरांचे एक स्नेही श्री. ल. ब. भोपटकर यांनींहि 'मृत्यूच्या मांडीवर' ही नवीन धर्तीची कादंबरी लिहून राजकारणाप्रमाणें ललित वाङ्मयांतहि आपली चांगली गति आहे, हें सिद्ध केलें आहे. शारीरिक सामर्थ्याविषयींची अण्णा-साहेबांची आवड प्रस्तुत कादंबरींतहि व्यक्त झाली असून त्याचें पर्यवसान शरीरानें व मनानें क्षीण होत चाललेल्या आधुनिक तरुणांचें विडंबनचित्र काढण्यांत झालें आहे. कादंबरीच्या शेवटीं फांशीची शिक्षा झालेल्या असलेल्या तरुणाशीं विवाहबद्ध होणाऱ्या नायिकेचें दृश्य पाहिलें म्हणजे अण्णासाहेबांच्या लढाऊ मनोवृत्तींत एखाद्या कवीला शोभेल अशा तऱ्हेचा 'रोमॅंटिक'पणाहि आहे, असें म्हणावें लागतें!

श्री. दा. न. शिखरे यांची 'थोरली आई' (म्हणजे मातृभूमि) ही राजकारणविषयक कादंबरी कोणत्या तरी एका सरकारी कायदेकानूखालीं आल्या-मुळें जप्त झाली आहे. साहित्यांतील टीकाकारांनीं नाकारलेलें महत्त्वाचें स्थान सर-कारी सेन्सॉरनीं तिला देऊन टाकल्यामुळें श्री. शिखरे यांस आपल्या ललित कृतीची सर्वांकडून उपेक्षा केली गेली अशी तक्रार करण्यास आतां जागा राहिलेली नाहीं.

लघुकथालेखक ह्या नात्यानें महाराष्ट्रास सुपरिचित असलेले श्री. दिवाकर कृष्ण यांनीं 'किशोरीचें हृदय' ही कादंबरी लिहून आपल्या लौकिकांत आणखी भर घातली आहे. सदरहू कादंबरींत शाळा व कॉलेज यांतील वातावरणांत प्रेमोद्भव झाला म्हणजे प्रकृतिभिन्नतेमुळें त्याला निरनिराळे फाटे कसे फुटतात, याचें मार्मिक वर्णन केलें आहे. कादंबरीची नायिका किशोरी हिच्या प्रणयभावनांचें चित्रण करून 'खऱ्या प्रेमाचा उद्भव ही एक फार मोठी प्रायोगिक प्रक्रिया आहे,' हा प्रेम-विषयक सिद्धान्त निरनिराळया बाजूंनीं सिद्ध करण्याकरितां जयंती, प्रभा, इरावती, वत्सला इत्यादि इतर अनेक पात्रांची योजना केली आहे. प्रेमभावनांचे विविध रंग लेखकानें चांगल्या रीतीनें चित्रित केले आहेत.

कांहीं वर्षांपूर्वी 'एक विद्यार्थी' ह्या नात्यानें वाचकांसमोर आलेले श्री. य. ग. नाईक हे प्रोफेसर होऊन 'नंदादीप' ह्या कादंबरीचे लेखक म्हणून आतां

रसिकांसमोर आले आहेत. विद्यार्थ्यांचा प्रोफेसर होणें, त्याचप्रमाणें लघुकथालेखकाचा कादंबरीकार होणें, हें देखील बौद्धिक प्रगतीचें एक लक्षण आहे. श्री. नाईक यांच्या बौद्धिक विकासाचा ठसा त्यांच्या कादंबरींतहि उत्कटत्वानें उमटला आहे, असें त्यांची कादंबरी वाचली म्हणजे म्हणावेंसें वाटतें. कारण एखाद्या प्रोफेसरालाच शोभेल अशी उच्च विचारसरणी व भाषासरणी यांचा प्रस्तुत कादंबरींत मिलाफ झालेला आढळतो. विनोदाप्रमाणेंच बिचाऱ्या प्रणयालाहि या कादंबरींत फांटा मिळाला आहे. सारस्वत समाजांतल्या कांहीं कुटुंबांतील सामाजिक व आर्थिक संबंधांचें चित्र कादंबरींत रेखाटलें असून तद्वारें उदात्त ध्येयवाद व अधम व्यवहारवाद यांजमधील लढ्याचें स्वरूप कसें असतें हें सुंदर रीतीनें दाखविलें आहे. हार्डीच्या तत्त्वज्ञानाची व विचारसरणीची छाप लेखकाच्या मनावर बरीच पडलेली दिसते. कादंबरीचें कथानक अधिक सुटसुटीत असलें व त्यांतील घटना अधिक स्वाभाविक असत्या व भाषा अधिक सोपी व सरस झाली असती तर बरें झालें असतें. तथापि हे दोष मान्य करूनहि प्रस्तुत कादंबरीनें मराठी कथात्मक वाङ्मयांत एक नवीन पायंडा पडला याबद्दल प्रो. नाईक हे स्तुतीस पात्र आहेत.

'वसुंधरा' साप्ताहिकाचे कल्पक संपादक म्हणून प्रसिद्धीस आलेले श्री. मो. ग. रांगणेकर यांनीं 'सीमोल्लंघन' ह्या आपल्या कादंबरींतहि बरीच कल्पकता व नाविन्य दाखविलें असल्यामुळें तिचा उल्लेख करणें आवश्यक आहे. सध्यांच्या सामाजिक क्रांतीच्या काळांत बहुपतित्वाची शक्यता व समर्थनीयता दाखविण्याचा कादंबरीकाराचा मुख्य हेतु जरी बिनतोड साध्य झालेला नसला तरी त्यांत प्रगट झालेली अभिनवता मात्र वाखाणण्यासारखी आहे, ह्यांत शंका नाहीं. नायिका अहल्या ही वल्लभ व भागवत या दोघांशींहि पत्नी ह्या नात्यानें वागते हें जरी खरें तरी त्या दोन नवऱ्यांतील एकाला व्यक्तिमत्ता व स्वयंप्रकाशितपणा अजिबात नसल्यानें कादंबरीच्या मुख्य हेतूला वैगुण्य येतें व तींत उपस्थित केलेल्या प्रश्नाचें समाधानकारक व चिकित्सक बुद्धीस पटेल असें उत्तर मिळत नाहीं. अहल्या, वल्लभ व उमा यांच्या स्वभावाचें व प्रणयभावनांचें चित्रण चांगलें साधलें आहे; पण पंढरीनाथ-गौरी, आनंद-मालती इत्यादि जोड्यांची कादंबरीच्या मुख्य कथासूत्राला त्याची लांबी वाढविण्याखेरीज काय आवश्यकता आहे, तें कळत नाहीं. कथानकाप्रमाणेंच भाषेंतहि सैलपणा बराच आहे. परंतु एक नवीन धर्तीची कादंबरी म्हणून प्रस्तुत कादंबरीच्या महत्त्वाला त्यामुळें फारसा बाध येत नाहीं.

कासमखान महंमदखान दलवाई ह्या मुसलमान लेखकानें 'दिलावर' या नांवाची कादंबरी मराठींत लिहिली आहे, हें वाचून पुष्कळांस आश्चर्य वाटेल. परंतु कादंबरीचें स्वरूप लक्षांत घेतलें म्हणजे त्यापेक्षांहि अधिक आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाहीं. कोंकणचा हिंदुमुसलमान समाज परस्परांशीं गोडीगुलाबीनें व प्रेमानें वागतो एवढेंच नव्हे, तर त्यांची भाषा व संस्कृति यांमध्येंदेखील बरेंचसें साम्य आढळतें. हिंदुमुसलमानांच्या स्वभावांतील साधर्म्य, धर्मांतील साम्यवाद, हिंदु-संस्कृतीचा पाठीराखेपणा, गरिबांचा कैवार व त्यागांतून जन्म पावलेला संन्यास इत्यादि गोष्टींचें सात्त्विक, साधें व ध्येयप्रधान चित्र प्रस्तुत कादंबरींतील भावकथेंत रेखाटलें आहे.

'देशसेविकेचें रहस्य' ही १९३० सालच्या सत्याग्रहावर अधिष्ठित झालेली एक अगदीं छोटी कादंबरी प्रो. बा. म. जोशी, रा. वाग्भट ना. देशपांडे, रा. ना. ह. आपटे, 'शिवराम', रा. अ. का. प्रियोळकर, रा. चं. वि. बावडेकर व रा. श्री. म. वर्दे या सातजणांनीं मिळून लिहिलेली असल्यामुळें कथावाङ्मयांतील एक चूष म्हणून तिचा उल्लेख करावयास हरकत नाहीं.

उपर्युक्त कादंबरीकारांखेरीज 'अपराध कोणाचा', 'शंभूनाद', 'मुक्तबंध' ह्या कादंबऱ्या लिहिणारे प्रसिद्ध साहित्यिक व वक्ते प्रो. आळतेकर, श्री. श्री. म. वर्दे, 'चारित्र्य-सुधा' लिहिणारे प्रो. वि. पां. दांडेकर, 'सीते'चे कर्ते श्री. रा. शा. माने पाटील, 'बेहेन पिरोज' या लैंगिक प्रश्नाची चर्चा करणाऱ्या मराठींत पहिल्याच कादंबरीचे कर्ते श्री. भवाळकर, प्रो. शिवरामपंत परांजपे यांचे चिरंजीव श्री. कृ. शि. परांजपे, 'जिंजीवास' लिहिणारे श्री. व्हि. एल्. काळे, श्री. शिवराम, श्री. शुक्ल, 'पावनतीर्था'चे कर्ते श्री. एम्. व्ही. जोशी, श्री. अस्नोडकर, 'अपोलो चंद्रावर' वाचकांस नेऊन त्यांस फजित करणारे वऱ्हाडशाळापत्रकाचे संपादक श्री. बाळके, 'आसवांची माळ' गुंफणारे ठाण्याचे उदयोन्मुख तरुण लेखक श्री. भ. दि. गांगल, श्री. निरंतर, 'चिरंजीव', 'अनलज्वाला', 'प्रपंचकथा', 'सौदा-मिनी' ह्या कादंबऱ्या लिहिणारे श्री. शं. बा. शास्त्री, 'अस्तप्राय भानु' व 'रक्ताचें गालबोट' लिहिणारे श्री. द. रा. परांजपे, व 'खरा देशभक्त' लिहिणारे श्री. वा. कृ. भावे इत्यादि अनेक लहानथोर कादंबरीकारांनीं मराठी कथात्मक वाङ्मयाची चांगली सेवा केली आहे.

## कांहीं स्त्रीकादंबरीकार

स्त्रीकादंबरीकारांमध्यें सौ. जानकीबाई भट, सौ. सोहनी, सौ. शांताबाई नाशिककर, सौ. कमलाबाई बम्बेवाले, सौ. इंदिराबाई सहस्रबुद्धे, कु. पिरोज आनंदकर, कु. कुमुदिनी प्रभावळकर, श्री. आनंदीबाई जयवंत, सौ. इंदिराबाई आंबेगांवकर, विभावरी शिरूरकर इत्यादि नांवें मराठी वाचकांच्या परिचयाचीं आहेत.

'मुलांचें बंड' व 'कुठें' ह्या कादंबऱ्या अनुक्रमें सौ. जानकीबाई भट व सौ. सोहनी यांनीं लिहिल्या आहेत. सौ. कमलाबाई बम्बेवाले यांची 'बंधमुक्ता' ही कादंबरी घटस्फोटाच्या प्रश्नावर लिहिली आहे. नायिका उषा ही सुशील, सुविद्य व सुंदर असते. परंतु तिचा नवरा व्यसनाधीन बदफैली असतो. तो विलायतेंत जाऊन तिकडेच भलभलते थेर करूं लागल्यामुळें उषा ही आपली यौवनसुलभ कामवासना तृप्त करण्यासाठीं प्रभाकर नांवाच्या तरुणाशीं लग्न करण्याकरितां तयार होते. पण धर्मांतर करूनहि घटस्फोटाचा उपयोग होत नाहीं हें हिंदु कायद्यांतील एका कलमाच्या आधारावर तिच्या नवऱ्यानें सिद्ध करून दाखविल्यामुळें शेवटीं तिची निराशा होते. उषा व प्रभाकर यांस या जगांतील नैराश्यमय वातावरणांत फार वेळ जिवंत ठेवण्यांत अर्थ नाहीं, असें पाहून लेखिकेनें त्यांना परलोकची वाट दाखवून त्यांच्या बरोबर कादंबरीचाहि अंत करून टाकिला आहे. उषा ही बी. ए. झालेली असूनहि इतक्या दुबळ्या मनाची दाखविली आहे कीं, ती शेवटीं घटस्फोटाच्या गोष्टी बोलायला लागून त्याकरितां धर्मांतर करावयास तयार होते हें बिल्कूल खरें वाटत नाहीं. कादंबरीच्या कथानकांत व पात्रांच्या स्वभाव-रेखनांत फारसें कौशल्य दिसून येत नसलें तरी कादंबरींतील कांहीं वादविवाद चांगले साधले आहेत. घटस्फोटाच्या कायद्याचा तयार केलेला मसुदाहि समतोलपणाचा आहे.

सौ. शांताबाई नाशिककर यांनीं लिहिलेल्या 'लग्नाचा बाजार' ह्या कादंबरीच्या नांवावरूनच तिच्या स्वरूपाचा बोध होतो. हुंड्याची घातुक पद्धति, विधवांचा समाजाकडून होणारा छळ व विवाहित हिंदु स्त्रीचें दुबळें जीवन यांचीं लेखिकेनें काढलेलीं चित्रें हृदयस्पर्शी आहेत. 'विधवा कुमारी'तल्याप्रमाणें प्रस्तुत कादंबरींतहि विधवांनीं कुंकूं लावावें कीं न लावावें याविषयींची चर्चा आली आहे. पात्रांचें स्वभावरेखन चांगलें साधलें असून लेखिकेची विचारसरणीहि एक-दोन ठिकाणीं थोडी अनुदारपणाची दिसते तरी सर्वसाधारणपणें प्रगतिपर आहे.

सखुताई व सत्यवती यांच्या दोर दुबळ्या व तडफदार मनोवृत्तींचीं दोन निरनिराळीं चित्रें चांगलीं रेखाटलीं आहेत. कादंबरीची भाषा देखील प्रौढ व संस्कार-युक्त आहे.

सौ. इंदिराबाई सहस्रबुद्धे यांच्या 'गोदावरी', 'केवळ ध्येयासाठीं' व 'बाळुताई धडा घे' ह्या तीन कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. 'गोदावरीं'त बालविवाहाचा निषेध केला असून विधवाविवाहाची आवश्यकता पटवून दिली गेली आहे तर 'केवळ ध्येयासाठीं' या कादंबरींत विवाहसंस्थेची अनावश्यकता प्रतिपादन केली आहे! विवाहाच्या बेडीमुळें स्त्रीचें स्वातंत्र्य नष्ट होतें सबब ती विवाह-संस्थाच नको असें सांगणाऱ्या एका इंग्लिश कादंबरीचें उपर्युक्त कादंबरी हें भाषांतर असल्यामुळें, हिंदुसमाजाच्या एकदम गळीं न उतरणारें तत्त्वज्ञान ह्या कादंबरींत आलें आहे हें लक्ष्यांत आणलें म्हणजे त्याविषयीं आश्चर्य वाटेनासें होतें. आश्चर्य वाटतें तें एवढेंच कीं, भाषांतराकरितां कां होईना पण नेमक्या ह्याच कादंबरीची लेखिकेनें निवड केली. 'बाळुताई धडा घे' ह्या कादंबरींत सुशिक्षित व स्वतःस सुधारक म्हणविणाऱ्या पुरुषांकडूनहि स्त्रियांच्या बाबतींत कशी अनुदारपणाची वृत्ति दाखविली जाते याचें चित्र रेखाटलें आहे. स्वतःस सुधारक म्हणविणारे बाबासाहेब आपल्या मुलीस प्रथम स्वातंत्र्याच्या वातावरणांत वावरूं देऊन आयत्या वेळीं (म्हणजे लग्नाच्या) कसे रंग पालटतात, हें पाहिलें म्हणजे लब्धप्रतिष्ठित सुधारकांच्या ढोंगीपणाची चांगली कल्पना येते. प्रस्तुत कादंबरीवर 'स्वतंत्र सामाजिक कादंबरी' म्हणून जरी लिहिलें आहे तरी तिच्यांतील विलायती वातावरण व हिंदु-समाजांतील सहसा न आढळणारीं दृश्यें पाहिलीं म्हणजे ती रूपांतरित आहे कीं काय असा संशय येतो. विशेषतः वेल्सच्या The Passionate Friend या कादंबरीची सदरहू कादंबरीवर दाट छाया पडलेली दिसून येते. कादंबरीची भाषा मात्र ओघवती असून भाषांतरित वाटत नाहीं.

सौ. इंदिराबाई आंबेगांवकर यांची 'उजळलेला हिरा' ही Halliburton's Troubles या सुप्रसिद्ध कादंबरीचें रूपांतर आहे. सौ. इंदिराबाई आंबेगांवकर यांना ह्याच कादंबरीवरून श्री. वा. गो. आपटे यांनीं 'दुःखाअंतीं सुख' ही कादंबरी लिहिली आहे, हें माहीत नसल्यामुळें त्यांच्या हातून हें द्विरुक्तीचें पाप घडलें. श्री. आनंदीबाई जयवंत यांनींहि दोन कादंबऱ्या लिहिल्या असून त्यांपैकीं यंदाच प्रसिद्ध झालेली 'जगाशीं बंडखोरी' वाचनीय आहे.

कु. कुमुदिनी शं. प्रभावळकर यांच्या 'अनियमित जगां'त कोणत्याहि एखाद्या तत्त्वाचें असें प्रतिपादन केलेलें नाहीं; कारण तत्त्व प्रतिपादन करावयाचें म्हणजे जगाचे व्यवहार नियमांनीं बद्ध आहेत असेंच कबूल करण्यासारखें नाहीं का? प्रस्तुत कादंबरींत मनुष्याचे आचार काय, किंवा विचार काय, ते केव्हां बदलतील याचा नेम नाहीं, हें दाखविलें आहे. गरिबींत वाढलेला मधुकर यानें प्रथम स्वाभिमानपूर्वक दत्तक होण्याचें नाकारणें पण लतिकेच्या प्रेमासाठीं शेवटीं त्यानें दत्तक जाण्यास तयार होणें, नटण्याची मनस्वी हौस असलेल्या लतिकेनें नंदिनीच्या सहवासामुळें पुढें साधेपणाचा वसा घेणें, मधुकरावर प्रेम नसतांना लतिकेनें त्याच्याशीं विवाहबद्ध होण्यास स्वतःची संमति देणें, या सर्व गोष्टी प्रत्येकाच्या विशिष्ट मनोवृत्तीमुळेंच जरी खरोखरी घडल्या आहेत तरी वरवर पाहणाराला त्या जगाच्या दृष्टीनें अनियमित ठरविण्याला पुरेशा वाटावयाला काय हरकत आहे? कादंबरीचें कथानक साधेंच असलें तरी लेखिकेनें चांगल्या रीतीनें रंगवून चटकदार केलें आहे. कादंबरीची भाषाहि साधी, सरळ व प्रौढ असून तिच्यांतील कित्येक उपमा घरगुती असूनहि नाविन्यपूर्ण आहेत. सहृदयता हा लेखिकेचा प्रमुख गुण दिसतो. 'शकुनी मोहोर' ही कादंबरी 'अनियमित जगा'च्या अगोदर लिहिलेली असल्यामुळें तींत पुढील कादंबरीचे गुण आढळून न येणें अगदीं स्वाभाविक आहे. ह्या अगोदरच्या कादंबरीचें कथानक अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांतील असून तींतील पात्रें रजपूत आहेत. कादंबरीचा काल लक्षांत घेतला म्हणजे तींतील सुडाच्या प्रतिज्ञा व रक्ताचे सडे स्वाभाविक वाटले तरी आपल्या कडवेपणाची घोषणा करणाऱ्या नायिकेनें शेवटीं मनाचा दुबळेपणा दाखवून विश्वासघातकी वाटणाऱ्या विश्वासरावाशीं विवाहबद्ध व्हावें ही घटना अस्वाभाविक वाटते. भाषेच्या व रचनेच्या दृष्टीनें सदरहू कादंबरींत बरेच दोष आहेत. 'कर्तव्याची जाणीव' या कादंबरींत केव्हां केव्हां प्रेमापेक्षां कर्तव्यालाच अधिक महत्त्व कां द्यावें लागतें या व्यावहारिक सिद्धान्ताचें प्रतिपादन केलें आहे. कुमुदिनीबाईंची अगदीं अलीकडे प्रसिद्ध झालेली 'निर्माल्यांतील कळी' ही कादंबरी वेश्याव्यवसायावर लिहिलेली असून तींत देहविक्रय करून चरितार्थ चालविणाऱ्या स्त्रियांनीं आपल्या निर्माल्यवत् बनलेल्या जीवनक्रमाचा त्याग करून त्यांतील पुन्हां कलिका कसें बनावें याचें विवेचन केलें आहे. पतित तरुणींचा उद्धार करण्याची जबाबदारी त्याच जातींतील सुशिक्षित तरुण वर्गावर घालण्यांत लेखिकेनें मार्मिकपणाबरोबरच विचारसरणीचें नाविन्यहि दाखविलें आहे.

श्री. सरस्वतीबाई दाभोळेकर यांच्या नांवावर प्रसिद्ध झालेल्या 'हृदयाचे कढ' ह्या कादंबरींत स्त्रियांच्या वैवाहिक जीवनांतील विविध दुःखांचें वर्णन केलें आहे. प्रथम पत्नी जिवंत असतांना नवरा दुसरें लग्न करून घरांत पहिलीला सवत कां आणतो ह्या अलीकडेच उपस्थित झालेल्या सामाजिक प्रश्नाची प्रस्तुत कादंबरींत चर्चा केली असून त्यावरून चांगला प्रथमवर मिळत नसल्यामुळेंच सुशिक्षित कुमारी प्रथमपत्नी जिवंत असलेल्या पुरुषाशीं विवाह करण्यास तयार होतात असा निष्कर्ष काढला आहे. पुरुषानें अनिर्वाह पक्ष म्हणून प्रथमपत्नी जिवंत असतां दुसरें लग्न करणें एक वेळ समर्थनीय ठरलें तरी असल्या विवाहाचीं शहाण्या माणसांनीं अभिनंदनें करूं नयेत हें कादंबरींत प्रतिपादन केलेलें मत कोणालाहि पटण्यासारखें आहे. कु. पिरोज आनंदकर, बी.ए., बी.टी., यांनीं 'माझें बाळ तें' ही एक कादंबरी लिहिलेली असून तींत स्त्रीस्वातंत्र्याच्या हक्कांसंबंधीं व त्यांच्या भावी आयुष्यक्रमासंबंधीं चर्चा केली आहे.

श्री. विभावरी शिरूरकर, बी.ए., यांची 'हिंदोळ्यावर' ही कादंबरी प्रसिद्ध होतांच वाङ्मयक्षेत्रांत व बाहेरहि जी एकदम मोठी खळबळ उडाली तिला तींतील मानीव व काल्पनिक अश्लीलता ही कारणीभूत झाली नसून लेखिकेचा बुरखा व कादंबरींतील अत्यंत उज्ज्वल असे अनेक गुण हेच कारणीभूत झाले असले पाहिजेत, असा निष्कर्ष काढावा लागतो. कारण प्रस्तुत कादंबरी अश्लील मानली तर मराठींतील अगदीं नामांकित लेखकांनीं लिहिलेल्याहि कित्येक कादंबऱ्या इतक्या मोठ्या प्रमाणांत अश्लील ठरतील कीं त्यांचा निषेध करण्याकरितां सभा भरविण्यासाठीं साहित्यसंमेलनामार्फत एक स्वतंत्र कमिटी नेमावी लागेल. प्रस्तुत कादंबरी बिल्कूल अश्लील नाहीं एवढेंच नव्हे, तर सदभिरुचीला धक्का बसेल असें एक वाक्यहि किंवा एक विचारहि तींतून काढून दाखवितां येणार नाहीं, हें कोणास सांगितलें तर आश्चर्य वाटेल. कादंबरीची नायिका अचला हिनें समाजाला टाकलेल्या प्रश्नाला समाधानकारक उत्तर देण्याचें टाळतां यावें म्हणूनच कदाचित् समाजानें सदरहू कादंबरी अश्लील आहे अशी ओरड करून तिजविरुद्ध काहूर उठविलें असावें. खरें पाहिलें तर कादंबरीचा सारा रोंख समाजांतील मध्यम वर्गाच्या स्थितिस्थापकत्वाच्या पायीं किंवा सुवर्णमध्य राखण्याच्या धोरणापायीं समाजाच्या कर्तृत्वशक्तीचा जो ऱ्हास होत चालला आहे, त्याविरुद्ध आहे. परंतु ही गोष्ट लक्ष्यांत न आल्यामुळें भलत्याच मुद्याला महत्त्व दिलें गेलें व मूळ मुद्दा तसाच शिल्लक राहिला, असें मोठ्या खेदानें म्हणावें

लागतें. कादंबरींत कला व तत्त्वप्रतिपादन यांचा मिलाफ इंद्रधनुष्यांतील रंगांप्रमाणें सुंदर व आकर्षक झाला आहे. भाषा रेखीव व लालित्यपूर्ण असून प्रसंगाप्रमाणें लवचिक झाली आहे. प्रस्तुत कादंबरीवर टीका करतांना टीकाकारानें अश्लील व अनैतिक यांमधील फरक लक्षांत घेणें जरूर आहे.

इंग्रजी अमदानींत स्त्रीशिक्षणाला सुरुवात होऊन त्याचा हळूहळू प्रसार होऊं लागला तेव्हां थोडेंबहुत इंग्रजी वाचतां बोलतां येणाऱ्या स्त्रियांनाहि विदुषी ह्या आदरयुक्त विशेषणानें संबोधण्यांत येऊं लागलें व त्यांनीं मोडक्यातोडक्या भाषेंत एखादा लेख किंवा एखादी गोष्ट लिहिली तरी तिचा गौरवयुक्त उल्लेख करण्याचा प्रघात पडला. ‘ यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ’ हें ब्रीद वाक्य शिरोभागीं धारण करणाऱ्या मासिक–मनोरंजनानें स्त्रीदाक्षिण्यानें प्रेरित होऊन पुष्कळ विदुषींना लेखिका बनविलें व त्यांना उत्तेजन देऊन त्यांजकरवीं शक्य ती वाङ्मयसेवा सेवा करवून घेतली. स्त्रीशिक्षणाच्या सुरुवातीच्या काळांत स्त्रियांनीं निर्माण केलेल्या वाङ्मयाचें समाजाकडून कोडकौतुक होणें क्षम्य किंबहुना इष्टहि असलें तरी आज पुरुषांच्या बरोबरीनें शिक्षण घेणाऱ्या लेखिकांनीं निदान वाङ्मयाच्या क्षेत्रांत तरी स्त्रीदाक्षिण्याची अपेक्षा न करणें हें त्यांच्या स्वतःच्या व वाङ्मयाच्याहि हिताच्या दृष्टीनें उचित ठरणार आहे. अर्थात् आजच्या लेखिका अशा तऱ्हेच्या स्त्रीदाक्षिण्याची अपेक्षा करतात, असें म्हणावयाला कांहींच आधार नाहीं. तथापि स्त्रियांनीं लिहिलेल्या कादंबऱ्यांची चिकित्सा करतांना आपल्याकडील स्त्रियांच्या अनुभवाचें मर्यादित क्षेत्र लक्ष्यांत घेणें जरूर आहे. ह्या दृष्टीनें विचार करतां आपल्याकडे जॉर्ज ईलिअट्, जॉर्ज सॉंड्, व्हर्जिनिआ वुल्फ, रोझ मेकॉले, किंवा एखादी व्हिकिबॉम् निर्माण झाली नाहीं याबद्दल तक्रार, कुरकूर किंवा खेद मानण्याचें कारण राहत नाहीं. तसेंच पाहिलें तर इंग्लंडांतील जेन ऑस्टेन व शॉर्लेटी किंवा एमिली ब्रॉन्टी यांच्या जगाविषयींच्या अनुभवांचें क्षेत्र फारसें विस्तृत होतें अशांतला भाग नाहीं. परंतु असें असून सुद्धां प्रतिभेच्या आणि सूक्ष्म अवलोकनशक्तीच्या जोरावर कादंबरीक्षेत्रांत त्यांनीं आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. आपल्याकडील कादंबरी-लेखिकांत ज़ेन ऑस्टेनच्या तोडीची कोणी लेखिका आहे असें म्हणतां येणार नाहीं, हें खरें; परंतु आमच्या लेखिकांनीं भलत्याच विषयावर मोठ्या कादंबऱ्या लिहिण्याचा मोह सोडून आपल्या मर्यादित जगांतलेच कां होईना पण

आपले स्वतःचे विचार व अनुभव कलात्मकदृष्ट्या लघुकादंबऱ्यांतून रंगविले तर त्यांचा कथावाङ्मयाप्रमाणेंच समाजालाहि फार उपयोग होणार आहे. विभावरी शिरूरकर यांची ' हिंदोळ्यावर ' ही कादंबरी आहे असें म्हणतां येणार नाहीं. तिला दीर्घ भावकथा किंवा कादंबरिका म्हणणेंच योग्य ठरेल. परंतु त्यामुळें कथा-वाङ्मयांतील तिचें स्थान कमी होत नाहीं. किंबहुना तिच्या आटोपशीरपणामुळेंच ती इतकी परिणामकारक होऊं शकली असें म्हटलें पाहिजे.

आपल्या कादंबरीकारांचे जगांतले अनुभवहि फारसे विस्तृत आहेत अशांतला बिलकुल प्रकार नाहीं. युरोपांतील अगदीं सर्वसाधारण लेखकालाहि तेथील विशिष्ट परिस्थितीमुळें जें वैचित्र्यपूर्ण आयुष्य अनुभवावयास मिळतें तें आपल्याकडील अगदीं पहिल्या दर्जाच्या कादंबरीकाराला तरी पाहावयास मिळतें किंवा काय याची शंका आहे. आपल्या महाराष्ट्रीय समाजाच्या आयुष्याचें क्षेत्रच इतकें संकुचित झालें आहे कीं, कादंबरीकाराला त्यांत वारंवार नवीन विषय सांपडणेंच शक्य नाहीं. महाराष्ट्रियांची बुद्धिमत्तेबद्दल ख्याति असली तरी त्यांच्यांत धाडसाची किंवा प्रवासाची आवड बिलकुल दिसून येत नाहीं. व्यापारी बाणा नसल्यामुळें हिंदुस्थानांतील इतर समाजांशीं व परकीय देशांतील लोकांशीं त्यांचें दळणवळण बेताचेंच असतें. कादंबरीला नुसती बुद्धिमत्ताच पुरेशी होत नाहीं. कार्यक्षेत्र विस्तृत नसेल तर बुद्धीलाहि संकुचितपणा व एकांगीपणा येतो. दुसरी गोष्ट म्हणजे आपल्या समाजाची घडीहि विसकटल्यासारखी झाली आहे. त्यामुळें ज्याला जें सुचेल तें त्यानें लिहावें, असा प्रकार सुरू झालेला दिसतो. लैंगिक स्वातंत्र्य, घट-स्फोट, कुटुंबसंस्थेची अनावश्यकता, राजकीय स्वातंत्र्यवाद, समाजसत्तावाद, साम्य-वाद इत्यादि अनेक वाद आज समाजांत सुरू असल्यामुळें एकंदर वाङ्मयांत व म्हणून कथावाङ्मयांत एकसूत्रीपणा किंवा एखादी विशिष्ट दृष्टि अशी आढळून येत नाहीं. ह्या एकंदर परिस्थितीमुळें मराठी वाङ्मयांत ह्यूगो, टॉलस्टॉय, टर्जिनेव्ह, हार्डी, बाल्झाक, स्टीफेन झ्वीग, कुप्रीन ह्यांच्या तोडीचे तर दूरच पण डिकेन्स, थॅकरे, वेल्स, बेनेट, गॉल्सवर्दी, व ह्यू वॉलपोल, इत्यादिकांच्या दर्जाचेहि कादंबरीकार आपल्याकडे अद्याप फारसे निर्माण होऊं शकत नाहींत. बंगाली किंवा हिंदी कथा-वाङ्मय आपल्यापेक्षां फार वरच्या दर्जाचें आहे, असें म्हणण्यांत येतें. शरच्चंद्र चट्टोपाध्याय, प्रेमचंद्र इत्यादिकांच्या कादंबऱ्या पाश्चात्य वाङ्मयांतहि फार वरचें स्थान मिळवितील अशा दर्जाच्या आहेत, असें वाचनांत येतें.

कदाचित् हें खरेंहि असेल. परंतु ज्या बंगाली अगर हिंदी कादंबऱ्यांचीं रूपांतरें मराठींत झालीं आहेत त्यांवरूनच निष्कर्ष काढावयाचा झाला तर मराठी कथात्मक वाङ्मय बंगाली किंवा हिंदी कथात्मक वाङ्मयापेक्षां हिणकस आहे, असें म्हणवत नाहीं. उलट कांहीं बाबतींत तें त्यापेक्षां सरसहि आहे, असें म्हणण्याचा मोह होतो.

मराठी कादंबरीकार आपल्या कादंबऱ्यांतून केवळ पांढरपेशा समाजाचें चित्र रंगवितात, असा त्यांजवर एक मोठा आक्षेप घेण्यांत येतो. हा आक्षेप अगदीं खरा आहे. आपल्या कादंबरीकारांनीं आपली दृष्टि अधिक विस्तृत केली पाहिजे यांत शंका नाहीं. परंतु समाजांतील ज्या थरांशीं आपला निकट संबंध येत नाहीं त्यांज-बद्दल भ्रामक व भरमसाट कांहीं तरी लिहून वाचकांची दिशाभूल करण्यापेक्षां कादंबरीकारांनीं आपणाला परिचित असलेल्या समाजाचें चित्र रेखाटणें व त्यांपुढें असलेल्या प्रश्नांची चर्चा करणें सत्याच्या व समाजाच्या दृष्टीनें अधिक श्रेयस्कर होणार आहे. समाजांतील खालच्या वर्गांचें वाङ्मयांत प्रतिबिंब पडावयास पाहिजे असेल तर आपल्या लेखकांनीं त्यांच्यांत मिसळलें पाहिजे किंवा त्याच वर्गांतून लेखक निर्माण झाले पाहिजेत. पांढरपेशा लेखकवर्ग समाजांतील दलितवर्गाकडे आज सहानुभूतीनें पाहूं लागला आहे यांत संशय नाहीं. परंतु खुद्द खालच्या वर्गांतूनच लेखक निर्माण होऊन त्यांनीं आपलीं स्वतःचीं दुःखें वाङ्मयाच्या वेशीवर टांगायला सुरुवात केल्याखेरीज तीं वाचकांच्या अंतःकरणाला पाझर फोडूं शकणार नाहींत, हें उघड आहे.

ता. १ जून १९३५

४

# मराठी नाटकें व नाटककार

[ लेखकः—श्री. विष्णु सखाराम खांडेकर ]

मराठी वाङ्मयाची गंगा प्राकृताच्या पर्वतांतून निघाली असली तरी तिला तीर्थांचें माहात्म्य ज्ञानेश्वरांनींच आणलें. या अलौकिक प्रतिभावंताच्या प्रभावानें मराठी भाषा इतके गोड बोल बोलूं लागली कीं, अमृत इहलोकीं असतें तर तें लाजून पुन्हां समुद्रांत जाऊन लपलें असतें. पण ज्ञानेश्वरांच्या उदयाच्या वेळची महाराष्ट्रीय समाजाची परिस्थितीच अशी विचित्र होती कीं, तिच्यांत काव्याची व तीहि निवृत्तिप्रधान काव्याची वेलच फक्त फुलावी. वाङ्मयांतील सर्व वृक्षवेलींना मानवेल अशी हवाच नव्हती ती! यामुळें संस्कृत वाङ्मयांत सुंदर फुलांनीं नटलेली नाट्यकल्पलता मराठी उद्यानांत आरंभीं अदृश्यच झाली.

कलेचा उदय व उत्कर्ष देशकालपरिस्थितीवर अवलंबून असला तरी कुठलीहि कला एखाद्या देशांत शतकानुशतकें मुकी राहूं शकत नाहीं. आजीच्या स्वभावाचे विशेष मधल्या पिढीला गुप्त राहून नातींत तिच्या मुग्धपणीं प्रगट व्हावेत, त्याप्रमाणें संस्कृतांतील नाट्यकलेचा एकोणिसाव्या शतकाच्या मध्यभागीं मराठींत पुनर्जन्म झाला. ललितें व तमाशे यांच्यासारखीं मनोरंजनाचीं साधनें व गोंधळी आणि बहुरुपी यांच्यासारखे रंजक लोक तत्पूर्वींहि समाजांत होतेच. पण या कच्च्या मालाचें पक्कें रूपांतर १८४२–४३ सालीं सांगलीचे अधिपति श्रीमंत चिंतामणराव

आप्पासाहेब यांचें प्रोत्साहन व विष्णुदास भावे यांची कल्पकता असा ' समसमा संयोग ' होऊन झालें. उत्तर कानडा प्रांतांतील भागवत मंडळी राजाश्रयाकरितां सांगलीला आली. कला या दृष्टीनें तिचे खेळ विशेष उच्च दर्जाचे नव्हते. पण त्यांत सुधारणा करून तसले खेळ मराठींत व्हावेत अशी श्रीमंतांना इच्छा उत्पन्न झाली. कल्पक विष्णुदासांनीं ' इच्छा आहे तेथें मार्ग असतोच ' हें श्रीमंतांच्या प्रत्ययाला आणून दिलें. रसानुकूल नवीन पदें करून, सीतास्वयंवराचें आख्यान नाट्यरूपानें त्यांनीं १८४३ मध्यें श्रीमंतांपुढें करून दाखविलें.

न्यायमूर्ति रानडे हे आधुनिक महाराष्ट्राचे जनक मानले जातात. त्यांचा व मराठी नाट्यकलेचा जन्म जवळजवळ एकाच वेळीं झाला हा योगायोग मोठा मनोरंजक आहे यांत शंका नाहीं. गेल्या ९० वर्षांत नाट्यकला, नाटककार व नट यांविषयींच्या समाजाच्या कल्पना झपाट्यानें बदलत गेल्या आहेत. नटवेष घेणें धर्मबाह्य आहे म्हणून भावे यांच्या नाटकांतील मंडळींना दोन तीन वेळां भर पंक्तींतून उठवून त्यांच्यावर बहिष्कार टाकण्याचा प्रयत्न लोकांनीं केला होता. पण पुढें तीन तपांनीं आण्णासाहेब किर्लोस्करांच्या हस्तपत्रकांवर विद्वान् लोकांच्या सह्या झळकूं लागल्या. तीन तपांचा आणखी एक फेरा पुरा झाल्यावर गंधर्वटोपी लोकांच्या डोक्यावर येऊन बसली. इतकेंच नव्हे तर बालगंधर्वांसारख्या कुशल नटांना जनतेकडून मानपत्रें मिळूं लागलीं. आजच्या घटकेला तर नाटकांइतकें सर्व-स्पर्शी वाङ्मय, नटांइतके लोकप्रिय कलावंत आणि नाटककारांप्रमाणें लेखणीवर चरितार्थ चालविणारे लेखक मराठींत आढळणें शक्य नाहीं.

१८४३ पासून आतांपर्यंतच्या या पुऱ्या नव्वद वर्षांचे, नाट्यकलेच्या ऐति-हासिक रसग्रहणाच्या दृष्टीनें, तीन खंड पाडतां येतील. पहिला १८४३ ते १८८०; दुसरा १८८० ते १९११; व तिसरा त्यानंतरच्या कालाचा. पहिला कालखंड हा मंदिराच्या पायासारखा आहे. या कालांत सांगलीकर, चित्तचक्षुचमत्कारिक, इचल-करंजीकर, पुणेंकर, वगैरे अनेक नाटक मंडळ्यांनीं पौराणिक नाटकें करून समा-जाला नाटकांची गोडी लावली. सुभद्राहरण, कीचकवध, कचदेवयानी, नारदाची नारदी, हरिश्चंद्र वगैरे नाटकें ह्या मंडळ्या करीत असत. यावरून नाट्याचा उत्कर्ष करणारीं कथानकें निवडण्याची त्यांची शक्ति सहज दिसून येते. देवपार्टी, राक्षस-पार्टी, विदुषक, नाटकांतील गाण्याचा मक्ता घेतलेला सूत्रधार, गणपति-सरस्वतींचें दांपत्य वगैरे या पौराणिक नाटकांचे घटक बहुधा सर्वत्र सारखेच असत. या कालाचें

ऐतिहासिक वर्णन मराठी रंगभूमीसारख्या पुस्तकांत व टीकात्मक विनोदी वर्णन ' नाटक्याचे तारे ' यासारख्या पुस्तकांत आढळतें.

मुंबई विद्यापीठाची स्थापना, इंग्रजी नाटककंपन्यांचे मुंबईला होणारे कलायुक्त नाट्यप्रयोग, कॉलेजांत केलीं जाणारीं संस्कृत व इंग्रजी नाटकें ( अशा प्रयोगांपैकीं कालिदास एल्फिन्स्टन सोसायटीनें केलेल्या इंग्रजी शाकुंतलांतील शकुंतलेसाठीं मद्रासहून ४०० रु. चीं वल्कलें व तिच्या तिसऱ्या अंकांतील पुष्पशय्येसाठीं पुण्याहून फुलाच्या दोन वाघिणी नेल्या होत्या म्हणे ! सजावटीपायीं हजारों रुपये खर्च करणाऱ्या सध्यांच्या नाटक मंडळ्यांना हें ऐकून खचित समाधान वाटेल ), संस्कृत व इंग्रजी नाटकांचीं भाषांतरें, इत्यादिकांचा तत्कालीन पौराणिक नाटकांवर परिणाम होणें अपरिहार्य होतें. हा परिणाम म्हणजे बुकिश ( नेटिव्ह शब्दाप्रमाणें या शब्दाचा उगम थोड्या तिरस्कारांतच असावा ! ) ऊर्फ गद्य नाटकांचा आरंभ हा होय.

या स्थित्यंतराच्या कालांत परशुरामतात्या गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे प्रभृतींचीं 'शाकुंतल', ' मृच्छकटिक ', ' वेणीसंहार ', ' मुद्राराक्षस ' वगैरे गद्य-पद्यात्मक रूपांतरें लोकांपुढें आलीं. ' भ्रांतिकृत चमत्कार ', ' अथेल्लो ', ' तारा ', ' किंग लियर ' इत्यादि इंग्रजी नाटकांचीं रूपांतरें व कीर्तन्यांचीं ' थोरले माधवराव ', ' जयपाळ ' यांसारखीं नाटकेंहि याच कालांत निर्माण झालीं. यांपैकीं अनेक रंगभूमी-वरहि आलीं. नाटकाबरोबर पडदे, पोषाख, देखावे वगैरे आनुषंगिक गोष्टींतहि ओघानेंच बदल झाला. पडद्यावरील देवादिकांना पदच्युत करून त्यांची जागा महाल अगर जंगल, रस्ता अथवा नदी अशा गोष्टींनीं पटकाविली.

१८८० सालीं संगीत नाटकांचा उदय झाला. नंतरहि गद्य नाटकांची परंपरा अव्याहत चालू राहिलीच. शाहूनगरवासी, सामाजिक, महाराष्ट्र, चित्ताकर्षक, लोकमान्य, भारत, नूतन महाराष्ट्र, समर्थ इत्यादि मंडळ्यांनीं गद्य नाटकांची प्रथा महाराष्ट्रांत अखंड सुरू ठेवण्याचा प्रयत्न केला. अजून गद्य नाटकें जिवंत आहेत हें खरें. पण हा जिवंतपणा अंथरुणाला खिळलेल्या रोग्यापेक्षां पलीकडच्या दर्जाचा नाहीं. शाहूनगरवासी व महाराष्ट्र यांनीं किर्लोस्कर-संगीत-मंडळीप्रमाणें एके काळीं लोकप्रियतेचें शिखर पाहिलें यांत शंका नाहीं. पण तेथें त्यांचा पाय फार वेळ ठरला नाहीं. इतकेंच नव्हे तर आजच्या घटकेला गद्यनाटकमंडळीला तें शिखर दिसणें म्हणजे कुबड्या घेऊन चालणाऱ्या माणसानें गौरीशंकराच्या जटेला हात घालण्याइतकेंच अशक्य आहे. नाटकमंडळीच्या पत्रिकेंत संगीताचा ग्रह अनुकूल

असला म्हणजे झालें. मग नाटकें, अभिनय इत्यादि ग्रहांची तिच्यावर वक्रदृष्टि असली तरी चालते ! तिसऱ्या दर्जाच्या संगीत नाटक मंडळ्या, टुटुखुटु कां होईना, आपलें जीवन कंठीत आहेत. पण पहिल्या दर्जाच्या गद्य नाटकमंडळीची स्थिति नुसती हातावर पोट असल्यासारखी नाहीं ! जीवनकलहांत हातावर शिर घेऊन तिला लढावें लागत आहे. गद्य नाटकें लिहून उदयाला आलेल्या अगर संगीतानुकूल प्रतिभा नसलेल्या गडकरी, खाडिलकर, वरेरकर प्रभृति नाटककारांना सुद्धां अखेर संगीताच्या गोटांत शिरावें लागलें ही एकच गोष्ट संगीत नाटकांचा वरचष्मा सिद्ध करावयाला पुरेशी आहे. गद्य रंगभूमीवर मरणोन्मुख झालेल्या अनेक नाटकांचा संगीत रंगभूमीवर पुनर्जन्म होऊन त्यांची प्रकृतिहि सुधारली. पण संगीत रंगभूमी-वरील एकहि नाटक गद्य रंगभूमीवर अद्यापि गेलेलें नाहीं. नाट्यरूपी शंकराला जाळावयाला निघालेल्या भस्मासुराला संगीताची मोहिनी आपल्या इच्छेप्रमाणें अजून नाचवूं शकते हेंच खरें !

संगीत नाटकांची गंगोत्री किर्लोस्कर असले तरी मानससरोवर सोकर बापूजी त्रिलोकेकर हे होत. १८७१ सालीं एल्फिन्स्टन कॉलेजांत संस्कृत शाकुंतलाचा जो गद्यात्मक प्रयोग झाला त्यानें त्रिलोकेकरांना नाट्यलेखनाची स्फूर्ति दिली. १८७९ च्या आरंभीं त्यांच्या नलदमयंती नाटकाचे प्रयोग होऊं लागले. त्रिलोके-करांनीं केलेली मोठी सुधारणा म्हणजे पद्यांची वांटणी होय. अनियंत्रित राजाप्रमाणें संगीताचे सर्व हक्क तोंपर्यंत सूत्रधाराच्या आधीन होते. लोकशाहीच्या नव्या मनूला अनुसरून ते इतर पात्रांना देण्याला त्रिलोकेकरांनीं त्याला भाग पाडलें. ‘ नल-दमयंती ’ च्या पाठोपाठ ‘ हरिश्चंद्र ’ लिहून त्यांनीं संगीत नाटकांचा पाया घातला, असें म्हणावयास हरकत नाहीं !

पण इतिहासाची दृष्टि निराळी व भविष्यकाळाची निराळी ! उज्ज्वल कीर्ति म्हणजे देवाची मूर्ति ! किर्लोस्करांच्या सौभद्राच्या अपूर्व यशामुळें १८७५ ते १८८५ या कालखंडाचें प्रतिनिधित्व त्रिलोकेकरांपेक्षां किर्लोस्करांकडेच देणें रसि-कांना योग्य वाटलें. १८७५ पासून ते १९३५ च्या साठ वर्षांचे, दशकाचा एक असे, सहा भाग पडतात. यांपैकीं प्रत्येक दशकांतील श्रेष्ठ व स्वतंत्र नाट्यलेखकाच्या कृतींचें थोडक्यांत समालोचन केलें कीं, इतिहास, कला व वाङ्मय या तीन्ही दृष्टींनीं मराठी नाट्यवाङ्मयाचा जो विकास झाला त्याची रूपरेषा आंखल्यासारखी होईल. असे प्राति-निधिक नाटककार सांगावयाचे झाले तर खालील निवडीबद्दल सहसा दुमत होणार नाहीं.

(१) १८७५–१८८५...किर्लोस्कर. (२)१८८५–१८९५...देवल. (३) १८९५–१९०५...श्री. कृ. कोल्हटकर. (४) १९०५–१९१५...कृ. प्र. खाडिलकर. (५) १९१५-१९२५...गडकरी. (६) १९२५-१९३५...वरेरकर.

त्या त्या दशकांतील नाट्यलेखक राजा व पुढील दशकांतील नाट्यलेखक युवराज अशी कल्पना केली तर हें कोष्टक या सहा मराठी नाटककारांच्या उदयोत्कर्षादि गोष्टींवर कालक्रमाच्या दृष्टीनें चांगलाच प्रकाश पाडूं शकेल. प्रत्येक दशकाच्या शेवटीं त्या नाटककारानें असामान्य लोकप्रियता मिळविल्याचें दिसून येईल. यथा राजा तथा प्रजा या न्यायानें त्या त्या कालखंडांतील दुय्यम दर्जाच्या नाटकांवरहि त्या विशिष्ट नाटककाराची थोड्याफार प्रमाणांत छाया पडलेली आढळेल. युवराजानें राजपदाची पात्रता सिद्ध केल्यानंतर वानप्रस्थ झालेल्या राजानें त्याला सुंदर सल्ला द्यावा त्याप्रमाणें आपल्या दशकाच्या पुढील दशकांतहि यांपैकीं कांहीं नाटककारांनीं सुंदर नाट्यकृति निर्माण केल्याचें आढळून येईल. सूर्य अस्ताला गेल्यानंतर त्याचा उज्ज्वल प्रकाश कितीतरी वेळ मागें राहतोच कीं नाहीं ? गडकऱ्यांसारखा नाटककार आपल्या दशकाच्या मध्यभागींच दिवंगत झाला असला तरी त्याचा प्रभाव नाट्यक्षेत्रांत प्रत्यक्ष कार्य करीत असल्याप्रमाणेंच झाला.

या परंपरेकडे पाहिलें तर चालू दशकांतला राज्याधिकार वरेरकरांचा आहे. युवराजपद मात्र दुर्दैवानें अजून रिकामेंच आहे असें म्हणावें लागतें. तसें पाहिलें तर गेल्या दशकांत कांहीं थोडेथोडके तरुण नाटककार उदयाला आले नाहींत. पण रंगभूमीवरील यश, आपल्या भावी कृतींविषयीं प्रेक्षकांच्या मनांत उत्कंठा निर्माण करण्याचें सामर्थ्य, आणि चिरंतन वाङ्मयगुणांचें वैपुल्य हा त्रिवेणीसंगम झालेला नाटककार त्यांत एकहि दिसत नाहीं. गेल्या एक दोन वर्षांत एकीकडे रंगभूमीला बोलपट गिळून टाकीत आहे, तर दुसरीकडे ती नावीन्यपरिपूर्ण रीतीनें पुनर्जन्म पावत आहे, असें परस्परविरोधी दृश्य दिसूं लागलें आहे. या रस्सीखेंचीचा परिणाम काय होईल हें जसें सांगतां येत नाहीं, त्याप्रमाणें युवराज म्हणून वरेरकरांच्या हातांतील राजदंड वर्तक, अत्रे, फडके अगर आतांपर्यंत अज्ञात असलेलाच दुसरा एखादा नाटककार घेईल कीं काय, याचें भविष्य वर्तविणेंहि कठिण आहे. त्यापेक्षां इतिहास व कला या दोन डोळ्यांनीं या सहा दशकांतील नाट्यवाङ्मयाचें ओझरतें निरीक्षण करून भविष्याचा तृतीय नेत्र अद्यापि मिटलेलाच आहे, अशी मनमोकळी कबुली दिलेली काय वाईट ?

## ( १ ) बळवंत पांडुरंग किर्लोस्कर

'मराठी नाट्याचे जनक' या गौरवपर पदवीवर किर्लोस्करांचा हक्क पोंचतो, याबद्दल केव्हांहि दुमत होणार नाहीं. नाटकाची आवड त्यांना उपजत असल्यामुळें वयाच्या तेविसाव्या वर्षी 'भरत शास्त्रोत्तेजक' मंडळी काढून 'विक्रमचरित्र', 'बाजीराव यांचा फार्स' इत्यादि खेळ करण्यापर्यंत त्यांची मजल गेली होती, हें स्वाभाविकच आहे. वयाच्या तिसाव्या वर्षी त्यांनीं 'श्रीशंकरदिग्विजय' हें गद्य नाटक लिहिलें. पुढें ऊर्दू नाटकें पाहून त्यांना संगीत नाटकाची कल्पना सुचली. त्या वेळीं बहुतेक मराठी नाटकें म्हणजे पौराणिक कथांचीं नाटकाच्या गांवठी सांच्यांत घालून केलेलीं ओबडधोबड रूपांतरें असत. किर्लोस्करांचा कलावंत हात या दगडाला लागला आणि लवकरच सुंदर नाट्यमूर्ति त्यांतून बाहेर पडली. मराठी नाटकांना कलात्मक वळण देणाऱ्या आण्णासाहेबांच्या लेखणींतून शाकुंतल (१८८०), सौभद्र (१८८२) व रामराज्यवियोग (अपूर्ण १८८४) अशीं अडीच नाटकें बाहेर पडलीं.

**शाकुंतल**—हिऱ्यांत कोहिनूर, तसें संस्कृत नाटकांत शाकुंतल मानलें जातें. किर्लोस्करांनीं त्याचें केलेलें भाषांतर सरस असलें तरी निर्दोष नाहीं. 'अथवा भवितव्यानां द्वाराणि भवन्ति सर्वत्र' या चरणाचें 'अथवा भवितव्यद्वारें चहुंकडे दैव फळफळतें' हें भाषांतर कुणाला आवडेल? 'सरसिजमनुविद्धं शैवलेनापि रम्यं' या सुंदर श्लोकांतील 'अपि' या अव्ययाची खुमारी किर्लोस्करांच्या भाषांतरांत नाहीं. शेवाळ चिकटलें असलें तरीदेखील कमल सुंदर दिसतें, असा कालिदासाच्या चरणाचा भावार्थ आहे. किर्लोस्कर म्हणतात, 'शैवालें युक्त जैसें पंकज तें शोभतें.' जणूं काय कमल सुंदर दिसावयाला त्याला शेवाळाचीच जोड पाहिजे! 'काय बेटया हरिणाची मजा', 'आमुच्या गप्पा मनिं कोरड्या' असली शब्दरचनाहि शाकुंतलांत दुर्मिळ नाहीं. यतिभंगहि विपुल आहेत. 'शशिकुलभूषण गुणवंता', 'अभिनवमधुलोलुप' वगैरे पदांसारखीं कांहीं पदें सुंदर साधलीं आहेत. पण कालिदासाच्या मधुर प्रतिभेचें तितकेंच मधुर प्रतिबिंब अण्णांच्या नाटयादर्शांत पडलें आहे, असें म्हणवत नाहीं.

**सौभद्र**—देवांना वार्धक्य कधींहि येत नाहीं, अशी समजूत आहे. अशा देवकोटीला पोंचलेल्या मराठी नाटकांची यादी करूं लागल्यास तिच्यांत श्रीकाराच्या खालीं सौभद्राचेंच नांव घालावें लागेल. आज पन्नास वर्षें बऱ्यावाईट नाटकमंडळ्या

हें नाटक एकसारखें करीत आहेत. पण द्रौपदीची ल्हानशी स्थाली जशी दुर्वासाच्या हजारों शिष्यांची क्षुधा शांत करूं शकली त्याप्रमाणें किर्लोस्करांच्या प्रतिभेचें हें सुंदर अपत्य पिढ्यान्‌पिढ्या नाट्यलोलुप रसिकांचें मनोरंजन करीत आहे.

तसें पाहिलें तर सुभद्राहरणाची कथा कांहीं अगदीं नवीन नाहीं. पण किर्लोस्करांनीं तिला दिलेलें रूप इतकें मोहक आहे कीं, त्याची छाप ज्याच्यावर पडली नाहीं असा प्रेक्षक विरळाच सांपडेल. मानवी मनाला मोहिनी घालणारे सर्व गुण या नाटकांत आहेत. यांत प्रेमविवाहाचा विजय आहे, रमण-रमणीपैकीं एखाद्यानें वेषांतर केल्यामुळें उत्पन्न होणारी चमत्कृति आहे, आणि सद्धेतूनें कृष्णानें रचलेलें कपटनाटकहि आहे. व्यवहारांत तरुणतरुणींच्या विवाहांचा मक्ता रूढीनें त्यांच्या आईबापांकडे दिला असला तरी कल्पनेच्या जगांत तरुणतरुणींचा स्वयंवराचा हक्क प्रस्थापित झालेला पाहूनच सर्वांना आनंद होत असतो. प्रणयकथेची रम्यता आणि हृदयंगमता हीं सौभद्रांत सुंदर रीतीनें प्रगट झालीं आहेत.

कालिदासाच्या शाकुंतलासारखें गोड पक्वान्न खाऊन कंटाळलेल्या रसिकांपुढें तोंडपालट म्हणून आपण हें तिखट खाद्य ठेवीत आहों, असें किर्लोस्करांनीं सौभद्राच्या प्रारंभीं म्हटलें आहे. पण त्यांचें हें ‘ तिखट ’हि गोडच आहे, यांत शंका नाहीं. भारतांतील सुभद्राहरणाची कथा व मोरोपंतांचें तद्विषयक आख्यान यांचें साहाय्य त्यांनीं कथानकाची रचना करण्याच्या कामीं घेतलें आहे. पण नाटकांतले रसात्मक प्रसंग सुंदर साधले असल्यामुळें कथानकाच्या गुणदोषांकडे प्रेक्षकांचें तादृशहि लक्ष जात नाहीं. रचनेच्या दृष्टीनें विशेष लक्ष्यांत ठेवण्याजोगी गोष्ट म्हणजे सौभद्राचा पहिला व चवथा अंक आधुनिक पाश्चात्य नाटकांप्रमाणें एकप्रवेशात्मक असून पांचवा जवळजवळ तसाच आहे. दुसरा व तिसरा हे दोन्ही अंकहि थोडासा बदल केल्यास एकप्रवेशात्मक होऊं शकतात. कळीला फुलावें कसें हें कोणी शिकवीत नसलें तरी तिच्या उमलत्या पाकळ्यांत जशी सुंदर प्रमाणबद्धता असते त्याप्रमाणें ती सौभद्राच्या रचनेंतहि आढळते.

या नाटकांत मुख्य भूमिका अवघ्या चार : अर्जुन, सुभद्रा, कृष्ण व बळिराम. किरकोळ भूमिकांची काटकसर करण्याकडे नाटककर्त्यानें लक्ष दिलें नसलें तरी रुक्मिणीखेरीज दुसऱ्या कोठल्याहि पात्राला महत्त्व दिलेलें नाहीं. मुहूर्त चुकविण्याकरितां आपण महालांतून कोठें तरी गेलों असा कलंक लागण्याची भीति वाटतांच मूर्च्छित होणारी, कुसुमावतीसारख्या प्रेमळ दासीपाशीं आपलें हृद्गत व्यक्त करणारी, ‘वहिनी,

तुझ्या भावानें तुला शिशुपाल राजाला देऊं केली होती. तो काय रूपानें, पराक्रमानें किंवा ऐश्वर्यानें कमी होता, म्हणून तूं चोरून ब्राह्मणाबरोबर पत्र पाठवून कृष्णाला वरलेंस?' असा खोंचदार प्रश्न करून रुक्मिणीचें तोंड बंद करणारी सुभद्रा पाहून कोणाच्याहि मनांत तिच्याविषयीं सहानुभूति उत्पन्न होईल. प्रियकरिणीसाठीं धनुष्य-बाण टाकून दंडकमंडलु घेणाऱ्या अर्जुनाची भूमिका साहजिकच मनोरंजक झाली आहे. सुभद्रेबरोबर संसार करावयाला मिळावा म्हणून बिचाऱ्यानें संन्यास घेतला! कृष्ण व बळिराम यांच्या स्वभावचित्रांतील विरोधानें नाट्यवस्तूप्रमाणें विनोदाचाहि चांगला परिपोष झाला आहे. अर्जुनाचा शेला सुभद्रेकडे जाणें व सुभद्रेची माळ अर्जुनाकडे जाणें असल्या अदलाबदलीनेंहि नाटकाच्या चमत्कृतींत भर घातली आहे.

सौभद्रांतील विदूषकाचा कृत्रिम व सामान्य विनोद सोडून दिला तरी संभ्रमामुळें उत्पन्न होणारा प्रसंगात्मक विनोद त्यांत फार बहारीचा साधला आहे. यति म्हणजे अर्जुन हें ठाऊक नसल्यामुळें बळिराम तुपांत मीठ व खिरींत कढी घालण्याच्या त्याच्या कृतीचें भक्तिभावानें कौतुक करतो. वैराग्याप्रमाणें प्रेमहि वेडें असतें हें तत्त्व आणि यतीचें सत्य स्वरूप या दोन्ही गोष्टी जाणणारा कृष्ण त्याला विरोध करतो. भावाभावांतील हा वाद, कृष्णाचीं भविष्यसूचक दुटप्पी विधानें, कृष्ण यतीविरुद्ध बोलत असल्यामुळेंच बळिरामाची गणितश्रेढीनें वाढणारी श्रद्धा, इत्यादिकांमुळें तिसऱ्या अंकाचा पहिला प्रवेश छान रंगतो. रुक्मिणी संन्यासी अर्जुनापुढें जाऊन सुभद्रेच्या लग्नाची ठिणगी सोडते व त्याच्या अंगाचा भडका उडविते, हा प्रसंगहि नाट्यदृष्ट्या सुंदर आहे. बळिरामानें संन्यासाची तयारी करा म्हणून म्हणतांच अर्जुनाचा यतिवेष घेऊन चाकरानें येणें, हा योगायोगहि गमतीचा आहे. रहस्य व रसपरिपोष यांच्या मिश्रणाचें सौभद्र हें एक नमुनेदार उदाहरण आहे.

नाट्यशास्त्राच्या निकषावर घासलें असतां मात्र हें नाटक तितकेंसें निर्दोष ठरणार नाहीं. श्री. कृ. कोल्हटकर यांनीं आपल्या विस्तृत टीकेंत त्याचें सूक्ष्म दृष्टीनें परीक्षण केलेंच आहे, पण स्थूल दृष्टीनें देखील पहिल्या अंकांतील घटोत्कच आणि नारद यांची योजना सदोष व कृष्णरुक्मिणीचा शृंगारिक प्रवेश अनावश्यक वाटतो. नाटकाच्या शेवटीं घटोत्कच अर्जुनानें आपल्या शरीरांतून रक्त काढलें याबद्दल आनंदच प्रदर्शित करतो! जणूंकाय तो अधिक रक्तानें फुगलेला एखादा मल्लच होता! अर्जुनानें सुभद्राहरण करावें म्हणून

चोरांकडून गाई चोरविण्यापासून कृष्णाला खटाटोप करावा लागला, असें नाटकांत दाखविलें आहे. नारद-गर्गांसारखे ऋषि आणि घटोत्कचासारखा राक्षस इतके साथीदार जमवून तो जें कारस्थान करतो तें बळिरामाच्या दुराग्रही स्वभावामुळेंच यशस्वी होतें, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. ' आज्ञाबद्ध होत्साता ' सारखे गद्यप्रयोग वगळले तर सौभद्राची भाषा साधी पण मधुर आहे. वायकांच्या तोंडांतली भाषाहि स्वाभाविक आहे. या नाटकांतील बरींच पदें बऱ्याच दर्जाचीं आहेत. प्रसादामुळें आलेलें सौंदर्य ( १ ) झाली ज्याची उपवर दुहिता, ( २ ) व्यर्थ मी जन्मलें, ( ३ ) अरसिक किति हा शेला, ( ४ ) वसंतीं बघुनी मेनकेला, ( ५ ) नभ मेघांनीं, ( ६ ) नच सुंदरि करूं कोपा-प्रभृति पदांत आढळतें. 'राधाधरमधुमिलिंद', 'लाल शालजोडी', वगैरे पद्यांत नादमाधुर्य व ठसकेबाजपणा आहे. कल्पनासौंदर्याच्या दृष्टीनें ( १ ) बल्सागर तुम्हि, ( २ ) सुवर्णकेतकिपरि जो दिसतो, ( ३ ) बघुनि उपवना, ( ४ ) प्रिये पहा रात्रीचा समय सरुनि येत उषःकाल हा, ( ५ ) गिरिवर हा सौदागर आणी, इत्यादि पदांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे.

आनंदप्रधान नाटक ( Comedy ) या दृष्टीनें सौभद्र चांगलें साधलें आहे असें म्हणावयाला हरकत नाहीं. चमत्कृतिपूर्ण कथानकाची सुंदर मांडणी, मुख्य भूमिकांचा योग्य विकास, रसपरिपोष, कर्णमधुर कानडी व इतर चाली, सुबोध व सरस पद्यें इत्यादि चिरंतन गुणांमुळें या नाटकाचें स्थान रंगभूमीवर अढळच राहील.

**रामराज्यवियोग**—पेशवाईतल्या साडेतीन शहाण्यांप्रमाणें किर्लोस्करांच्या अडीच नाटकांनींहि महाराष्ट्राला झुलविलें. साडेतीन शहाण्यांत नाना फडणविसाचा जो मान तोच या अडीच नाटकांत रामराज्यवियोगाचा. सौभद्राप्रमाणें हें नाटकहि पौराणिक आहे. पण कृष्णाच्या गोड कपटामुळें सौभद्रांत करुणाला फारसा अवसर मिळत नाहीं. रामराज्यवियोगांत देवांच्या कटुकपटामुळें करुणाचेंच राज्य होणार होतें, असें दिसतें.

रसोत्कर्षाला अनुकूल असें कथानक शोधण्याची किर्लोस्कांची रसिक दृष्टि रामराज्यवियोगांतहि आढळून येते. किर्लोस्करांच्या हातून या नाटकाचे तीनच अंक लिहून झाले. तिसऱ्या अंकाच्या शेवटीं कैकेयी वर मागते, पण ते घोर शापासारखे वाटून दशरथ बेशुद्ध होतो, इतका कथाभाग आला आहे. यावरून चवथ्या व पांचव्या अंकांत रामाच्या उज्ज्वल त्यागाचें चित्र रेखाटून राम वनाला जावयाला

निवाल्याबरोबर अयोध्येच्या जनतेप्रमाणें रंगभूमिहि दुःखानें आपलें तोंड झांकून घेते, अशी किर्लोस्करांची पुढील मांडणी असावी. याच कथानकावर लिहिलेल्या ' सवतीमत्सरा'चा खाडिलकरांनीं असाच शेवट केला आहे. प्रिय पुत्राच्या शिरो-विहीन देहाला गजासुराचें डोकें लावणाऱ्या शंकराप्रमाणें कित्येकांनीं अपुरें रामराज्य-वियोग पुरें केलें आहे; पण या प्रयत्नांत नांव घेण्याजोगा एकहि नाहीं.

मंथरेला रामाच्या राज्यारोहणाविषयीं वाटणाऱ्या मत्सराचें मूळ मानवी स्वभावांत नसून देवांच्या कारस्थानांत आहे, ही पौराणिक कल्पनाच किर्लोस्करांनीं स्वीकारली आहे. त्यांच्या काळाला ती पटण्याजोगी होती. पण अशा रीतीनें नाटकाचा आत्मा मानवी स्वभाव न होतां चमत्कार हा झाल्यामुळें पहिले दोन अंक व्हावे तितके सरस झाले नाहींत. उत्तररामचरित्रांत निषिद्ध तप करीत बसणाऱ्या शंबूक नांवाच्या शूद्राचा राम शिरच्छेद करतो. त्या शंबुकाला दंडकारण्यांतून अयोध्येंत आणून किर्लोस्करांनीं आपलें कथानक मनोरंजक केलें आहे. राम व वसिष्ठ यांच्यावर शंबूक चिडलेला असतो. मंथरा रामाच्या राज्यारोहणाला विघ्न करील म्हणून तिला ज्या किल्ल्यांत कोंडलेलें असतें तेथें शंबूक अन्न घेऊन जाणाऱ्या दासीच्या वेषानें जातो आणि तिची सुटका करतो.

कथानकांतली ही गुंतागुंत व मंथरेचा स्पर्श होतांच कलीचा कैकेयीच्या शरीरांत प्रवेश होणें, याच काय त्या पहिल्या दोन अंकांतील महत्त्वाच्या गोष्टी आहेत. दशरथ, राम वगैरे महत्वाच्या भूमिका या दोन्ही अंकांत पडद्याआडच राहतात. कैकेयीचेंहि काम विशेष नाहीं. एकीकडे रामविरोधी मंथरा व दुसऱ्या बाजूला वसिष्ठ, सुमंत वगैरेहि रामपक्षपाती मंडळी यांच्यांतला हा झगडा आहे. पण वसिष्ठाचें पात्र एखाद्या भिक्षुकासारखें व सुमंताचें पात्र खेडेगांवांतील खाष्ट म्हाताऱ्यासारखें भासत असल्यामुळें या कलहाला रंग चढत नाहीं. मंथरेला देहांत प्रायश्चित्त दिलें पाहिजे, असें सुमंतानें म्हणतांच वसिष्ठ उत्तरतातः " अहो, देवो दुर्बलघातकः ही म्हण खरी आहे. तुम्हांला सांगून ठेवतों तिनें जर मनांत आणलें तर तुम्हांला देखील ती घरीं बसायला लावील. " वयोवृद्ध वसिष्ठ ऋषींच्या तोंडीं हे दीनवाणे उद्गार मुळींच शोभत नाहींत. मंथरा सुमंताला तोंड आटपून बोलावयाला सांगते, तेव्हां तो आवेशानें हुकूम सोडतो, ' लावारे रांडेच्या कानाला चाप ! ' राजकारणापेक्षां गालिप्रदानांतच तो बहुधा पारंगत असावा ! वसिष्ठाच्या समोर ' राज्यलक्ष्मीला बारवधूप्रमाणें जसा तरुण राजा प्रिय होतो, तसा वृद्ध आवडत

नाहीं ' हे उद्गार दशरथ काढतो. यावरून अयोध्येंतला दशरथाचा दरबार सध्यांच्या एखाद्या क्लबासारखा असावा असा भास होतो. तिसऱ्या अंकांतील दशरथ व कैकेयी यांचाच प्रवेश काय तो सर्व दृष्टींनीं बरा साधला आहे.

या प्रवेशांत कैकेयी दशरथावर ' निर्बल्या, नपुंसका, षंढा ' वगैरे संबोधनांचा मारा करते. दशरथ हीं विशेषणें मुकाट्यानें सोसतो. याचें कारण कामुकता, अग्नीच्या प्रसादानें पुत्रप्राप्ति झाल्याची जाणीव आणि गालिप्रदानशास्त्राची रामायणकालीं पूर्ण वाढ, यांपैकीं कोणतें असावें, हें नक्की सांगतां येत नाहीं. पहिल्या अंकांतील विष्कंभकांत मंथरेची वार्ता वसिष्ठांना कळविण्याकरितां विनत जातो. त्याच्या पाठोपाठ वसिष्ठ रंगभूमीवर प्रवेश करीत असूनहि त्याला मंथरा खवळून गेल्याची बातमी कळलेली असते. हा बहुधा महर्षींच्या अंतर्ज्ञानाचा प्रभाव असावा ! मंथरेचें ' धेनुमुखीं हा व्याघ्रचि ' हें पद नगररक्षक विनत एकदांच ऐकतो. पण वसिष्ठासमोर तो तें तोंडपाठ म्हणून दाखवितो. अशा एकपाठी तैलबुद्धीच्या मनुष्याला रक्षकाऐवजीं शिक्षक करणें अधिक योग्य झालें असतें !

नाटकाची भाषा सुबोध असली तरी विशेष सुंदर नाहीं. पद्यांपैकीं ' सुटला पितृदिशेचा वारा ', ' जो मम नयनचकोरा इंदु ', ' सोडुनि मज रामराय ', ' सफलेच्छा ती करिन सुरांची ', ' कटु तव शब्दांहुनी ' वगैरे पद्यें सुंदर आहेत. पण ऱ्हस्वदीर्घाची ओढाताण, मात्रादोष, पद्यबद्ध गद्य इत्यादि दोष या नाटकांतील कवितेंत विपुल आहेत. दत्ताचें नांव ऐकून भुतें पळून जातात, ही माहिती रामाच्या वेळच्या नगररक्षकाला आहे. दत्ताचा अवतार रामापूर्वी झाला कीं नंतर, ही गोष्ट इतरांपेक्षां स्वतः एकतृतीयांश दत्त असलेल्या रामालाच अधिक माहीत असण्याचा संभव असल्यामुळें या उल्लेखाबद्दल अधिक लिहावयालाच नको. ' नारि ', ' छाति ', ' किं ', ' जानाकि ' वगैरे जखमी शब्दांची यादी केल्यास ती बरीच लांबलचक होईल. ' रुचती कां तीर्थयात्रा ' या चालीवर ' ओळखतें लहान होता मी तेंव्हांपासुनी ' ही ओळ म्हणावयाला लागलें कीं, ' लहान ' शब्द ' लहन ' होतो ! नाटकारंभीं ईशस्तवन करणाऱ्या सूत्रधाराची पत्नीच मंथरा आहे, असा प्रस्तावना व नाटक यांचा सांधा जोडलेला आहे. ही युक्ति कौशल्यदर्शक आहे. शापसंभ्रम व मानापमान यांच्यांतहि हिचाच अवलंब करण्यांत आला आहे. पण नटीनें कलिसंचार झालेल्या मंथरेचें भाषण सुरू केल्यानंतर सूत्रधारानें ' मलाहि पण दशरथ झालेंच पाहिजे ' असें म्हणून निघून जाणें रसभंगकारक होतें. या सर्व

गोष्टींवरून रामराज्यवियोग किर्लोस्करांच्या हातून पुरें झालें असतें तरी तें सौभद्रा-इतकें सुंदर व सरस वठलें नसतें, असें म्हणणें चुकीचें होणार नाहीं.

नाट्यकलेला गायन-कलेची जोड देऊन किर्लोस्करांनीं संगीत नाटकांची जी प्रथा पाडली ती आज अर्धशतक होऊन गेलें तरी जोमानें चालू आहे. 'शाकुंतला'च्या तुरस भाषांतराप्रमाणें 'सौभद्र' व 'रामराज्यवियोग' हीं त्यांचीं स्वतंत्र नाटकेंहि नाट्यवाङ्मयांत अढळ स्थान पटकावून बसलीं आहेत. नादमधुर व प्रसाद-पूर्ण शब्दरचना, अल्पविस्तर पण चटकदार संभाषणें, रसपरिपोषक प्रसंगांची निवड, रंगभूमीचें मार्मिक ज्ञान, मधुर पदें इत्यादि गुणांच्या संगमामुळें त्यांचें 'सौभद्र' नेहमींच लोकप्रिय राहील. शृंगाराचा उठाव करण्यांत किर्लोस्कर कुशल होते. स्त्रियांचे संवाद हुबेहूब वठविण्यांतहि त्यांनीं चातुर्य प्रगट केलें आहे. सौभद्र नाट-कांतील दोन अंक एकप्रवेशात्मक असून इतर अंकांनाहि तसें स्वरूप देणें फारसें कठिण नाहीं, हें लक्षांत घेतलें म्हणजे आधुनिक नाट्यरचनेचे नियम ठाऊक नसतांहि त्यांनीं दाखविलेल्या रचनाचातुर्याचें कौतुक वाटूं लागतें.

## ( २ ) गोविंद बल्लाळ देवल

देवल स्वतःला किर्लोस्करांचे शिष्य मानीत असत. त्यांच्या सर्व संगीत नाटकांत नांदीच्या पदांत 'बलवंता'ला नमन केलेलें आढळतें. हे बलवंत जसे त्यांचे वडील बल्लाळ त्याप्रमाणेंच लेखनगुरु बळवंत पांडुरंग किर्लोस्कर हेहि होत. अशी एक आख्यायिका आहे कीं, या गुरुशिष्यांचा कांहीं कारणानें खटका होऊन 'माझ्या आयुष्यांत तुझें नाटक रंगभूमीवर येणार नाहीं' अशी शापवाणी गुरुजींच्या मुखांतून निघाली. गुरुदेवतेचें हृदय व देवलांची प्रतिभा हीं दोन्ही हा शाप खोटा ठरवावयाला समर्थ होतीं. पण मराठी नाट्यकलेच्या दुर्दैवानें किर्लोस्कर अकालीं दिवंगत झाले व उःशापानें शाप नाहींसा होण्याऐवजीं योगायोगानें तो खराच ठरला.

देवलांचीं एकंदर नाटकें सात. मृत्युसमयीं त्यांचें वय जवळ जवळ साठ वर्षांचें होतें. अर्थात् अकाल निधनामुळें किर्लोस्कर किंवा गडकरी यांच्याप्रमाणें त्यांचें नाट्यलेखन अपूर्ण राहिलें, असें म्हणतां येणार नाहीं. किंबहुना शारदेच्या जन्मानंतर सोळा सतरा वर्षांत ते एकहि नवीन नाट्यकृति निर्माण करूं शकले नाहींत. यावरून त्यांच्या प्रतिभावृक्षाचा फळांचा हंगाम संपून गेला होता, असें निश्चित अनुमान बांधतां येतें. त्यांच्या सात नाटकांपैकीं तीन युरोपियन नाटकांच्या आधारानें रचलेलीं, तीन संस्कृत नाटकें व कादंबरी यांच्या पायावर उभारलेलीं व एक पूर्ण स्वतंत्र, अशीं

आहेत. यावरूनहि निर्मितिशक्ति (Creative Power) व कल्पकता यांपेक्षां रसिकता व मार्मिकता हेच त्यांचे प्रभावी गुण होते, असें दिसून येतें.

त्यांच्या पाश्चात्य कृतींच्या रूपांतरांपैकीं दुर्गेला बक्षीस मिळालें होतें व झुंझारराव रंगभूमीवर अतिशय उठावदार होत असे, ह्या गोष्टी खऱ्या; पण नाट्यदृष्ट्या उत्तम रूपांतराला आवश्यक असणारे सर्व गुण ह्या दोन्ही नाटकांपेक्षां संशयकल्लोळातच उत्कटत्वानें प्रगट झाले आहेत. दुर्गा व झुंझारराव जेव्हां जन्माला आलीं तेव्हां मराठी रंगभूमीवर शेक्स्पीयरचा पगडा नुकताच बसूं लागला होता. पण देवलांच्या स्वयंसिद्ध नाट्यगुणांचा विचार केला तर त्यांचा ओढा अशा करुण-गंभीर नाटकांकडे नव्हता. यामुळेंच हास्यप्रधान संशयकल्लोळांत त्यांची प्रतिभा पूर्णपणें प्रकाशूं शकली. संशयकल्लोळ संगीत रंगभूमीवर आलें त्या वेळीं (१९१६) कोल्हटकर-गडकऱ्यांच्या नाटकांमुळें विनोद लोकांना आवडूं लागला होता, ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. प्रसादपूर्ण भाषा, सुबोध व मधुर पद्यें, कथानकाची ठाकठिकीची मांडणी आणि नाजुक कुंचल्यानें चित्रित केलेले स्वभावांचे विविध रंग, यांचा सुंदर संगम या नाटकांत आढळतो.

संस्कृतांतून रूपांतरित केलेल्या कृतींपैकीं विक्रमोर्वशीय मुळांतच दुय्यम दर्जाचें. अंधुक ताऱ्याकडे ज्याप्रमाणें कोणाचेंहि लक्ष जात नाहीं त्याप्रमाणें या नाटकाला फारशी लोकप्रियता मिळूं शकली नाहीं. मृच्छकटिक नाटक शाकुंतलाच्या तोडीचें किंबहुना नाट्यगुणांत वरचढ! पण त्याचें रूपांतर करतांना गाळावयाचा भाग कोणता, हें ठरविणें कांहीं फारसें सोपें नाहीं. वृक्षाच्या सौंदर्याला धक्का न लावतां त्याला डोईजड झालेला शाखाभार कमी करण्यापैकींच हा प्रकार होता. पण देवलांनीं अत्यंत चातुर्यानें तें काम केलें आहे. मोती काढून घेऊन शिंपला फेंकून द्यावा त्याप्रमाणें मृच्छकटिकांतील अनेक प्रसंगांचें त्यांनीं थोडक्यांत सुंदर रूपांतर केलें आहे.

संस्कृतांतील बाणभट्टाच्या कादंबरीचें रूपांतर नाटकांत करणें हें तर याहूनहि कठीण काम होतें. देवलांनाहि तें पूर्णपणें साधलें, असें म्हणतां येणार नाहीं; पण शापसंभ्रम नाटक वाचतांना देखील फुलांतला मध तेवढा घेऊन थोडक्यांत गोडी उत्पन्न करण्याची त्यांची उपजत हातोटी ठळकपणें दिसून येते.

शारदा हें अभिजात मराठी नाट्यवाङ्मयाच्या दृष्टीनें पहिलें सामाजिक नाटक. त्यापूर्वी प्रचलित सामाजिक प्रश्नांवर थोडीं प्रहसनें व नाटकें लिहिलीं गेलीं होतीं; पण कला व वाङ्मय या दोन्ही दृष्टींनीं तीं अल्पजीवी ठरलीं. बळवाच्या

पावसाच्या सरींनीं ज्याप्रमाणें पावसाळा सुरू होत नाहीं, त्याप्रमाणें असल्या कलाहीन नाट्यकृति परंपरा निर्माण करूं शकल्या नाहींत.

शारदा नाटक जनतेंतःच अत्यंत लोकप्रिय झालें. तें इतकें कीं, दळणवळणाचीं अतिशय कमी साधनें असलेल्या तीसपस्तीस वर्षांपूर्वींच्या कालांतहि गोमंतकांतील उपहारगृहांतून 'कां न भक्षिसी गोमय ताजें' या चालीवर 'कां न भक्षिसी बेसन ताजें' अशीं पदें म्हटलीं जात असत. गोमयाच्याऐवजीं बेसन घालणें हा गोमंतकस्थ लोकांचा उदारपणा असला तरी नाटकाच्या लोकप्रियतेचें एक गमक म्हणून ही गोष्ट गमतीची वाटते. शारदेंतील विषयहि असा होता कीं, केवळ सुधारकांनाच नव्हे, तर पुराणमतवाद्यांनाहि नाटककाराचें म्हणणें पटावें. या नाटकांतील कितीतरी भूमिका देवलांनीं प्रत्यक्ष अनुभवावरून रेखाटल्या असाव्यात, असा भास होतो. नाटकांतल्या पात्राचें नांव व्यवहारांत विशिष्ट अर्थी रूढ झाल्याचा मान भद्रेश्वराप्रमाणें फारच थोड्या पात्रांना मिळाला असेल. या नाटकांत करुण व हास्य या परस्परविरोधी रसांचा मोठा मनोहर मिलाफ झालेला आहे. त्यांतील एकप्रवेशी पहिला अंक, दुसऱ्या अंकांतील दुसरा प्रवेश, शारदेच्या मैत्रिणी तिची थट्टा करतात तो प्रवेश, इत्यादि स्थळें देवलांच्या नाट्यगुणांचीं चिरंतन स्मारकें आहेत. शापसंभ्रम व मृच्छकटिक यांच्याप्रमाणें मूळ संस्कृताचें साहाय्य नसल्यामुळें या नाटकांतील पदें कल्पनेच्या दृष्टीनें फिकीं वाटतात. पण सुबोधपणामुळें तीं नाटकांत रंग भरूं शकत असत, हें मात्र निर्विवाद आहे.

भावी वाङ्मयावर कायमचे संस्कार करण्याइतके स्फूर्तिदायक गुण देवलांच्या प्रतिभेंत नव्हते हें खरें. पृथ्वीवरील पिकें पावसानें पिकतात; दंवबिंदूंनीं नाहींत. त्याप्रमाणें वाङ्मयांतहि संप्रदाय उत्पन्न होण्याला अगर संस्कार चिरंतन राहण्याला प्रतिभाहि तशीच समर्थ हवी. तथापि मराठी नाट्यवाङ्मयाच्या आजच्या काळांत देवलांचें महत्त्व असाधारण आहे. शेक्स्पीयर-मोलियर मागें पडले असले तरी शॉ, इब्सेन, गॅल्सवर्दी यांचीं रूपांतरें करण्याचे दिवस आले आहेत. अशा वेळीं संशयकल्लोळ किंवा मृच्छकटिक या त्यांच्या कृती अभ्यासकांना मार्गदर्शक झाल्याशिवाय राहणार नाहींत. या दोन्ही नाटकांच्या जोडीनें 'शारदा' आपल्या पित्याच्या नाट्यचातुर्याची साक्ष भावी मराठी वाचकांना देत राहील यांत शंका नाहीं.

## ( ३ ) श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

कोल्हटकरांचें पहिलें नाटक वीरतनय हें शापसंभ्रम व शारदा या दोन्हींच्यामध्यें किर्लोस्कर नाटकमंडळीच्या रंगभूमीवर आलें. मंडळीनें मुद्दाम बक्षिस लावून

नाटकें मागविलीं होतीं. त्या निमित्तानें आलेल्या कृतींतून या नाटकाची निवड झाली. किर्लोस्कर-देवलांचीं नाटकें संग्रहीं असतांना मंडळीला नवीन नाटककाराची जरूर भासूं लागली याचीं कारणें, प्रेक्षक वर्गाच्या वाढत्या आकांक्षा व गद्यरंगभूमीवर आलेलीं शेक्स्पीयरसारख्या जगन्मान्य नाटककारांचीं नाटकें, हीं होत.

कोल्हटकरांच्या वीरतनयापासून मराठी नाट्यवाङ्मयांतील स्वतंत्र मनूला सुरवात झाली. कल्पित कथानक, शेक्स्पीयर-मोलियरसारख्या पाश्चात्य नाटककारांच्या धर्तीवरील त्याची गुंफण, चटकदार संवाद, विनोद, काव्यात्मता, समाजांतील दोषांचें दिग्दर्शन इत्यादिकांनीं सांगोपांग सजलेलें नाटक आदर्श म्हणून पुढें ठेवण्याची प्रवृत्ति कोल्हटकरांच्या नाटकांनींच निर्माण केली.

त्यांनीं एकंदर बारा नाटकें लिहिलीं. विविध पुष्पांचे रम्य गुच्छ अनेक रीतींनीं बांधतां येतात त्याप्रमाणें या नाटकांचें वर्गीकरणहि अनेक प्रकारांनीं होऊं शकेल. पण नाट्यवाङ्मयाच्या इतिहासाच्या दृष्टीनें या बारा नाटकांचे मुख्य दोन भाग कल्पितां येतील. पहिल्यांत वीरतनयापासून वधूपरीक्षेअखेरचीं सहा नाटकें येतात. खाडिलकर, गडकरी व वरेरकर यांच्या नाटकांवर कोल्हटकरांच्या ज्या नाटकांचा परिणाम झाला अगर जीं रंगभूमीवर गाजलीं अशीं नाटकें याच वर्गांतलीं आहेत. विशाल पात्राच्या नदीचा ओघ अकस्मात् एखाद्या वाळवंटांत गुप्त व्हावा त्याप्रमाणें वधूपरीक्षेनंतर कोल्हटकरांच्या लोकप्रियतेची स्थिति झाली. याचीं कारणें विविध व विलक्षण असलीं तरी त्यांच्या नंतरच्या नाटकांचा मराठी वाङ्मयावर व रंगभूमीवर परिणाम होऊं शकला नाहीं ही गोष्ट निश्चित आहे.

वीरतनयाच्या प्रस्तावनेंत कोल्हटकर म्हणतात, "नाटक लिहितांना नाटककाराचे दोन हेतू होते. एकतर शृंगाररसाबरोबर वीररसहि आणण्याचा प्रयत्न करणें व दुसरा नवीन चालींवरील पदें प्रचारांत आणणें." पुढें दहा वर्षांनीं लिहिलेल्या मतिविकाराच्या प्रस्तावनेंत वीरतनय विधुरविवाहाच्या हेतूनें लिहिल्याचेंहि त्यांनीं सांगितलें आहे. प्रस्तावना म्हणजे दाखवावयाचे दांत अशी निदान विनोदी लेखकाच्या बाबतींत तरी स्थिति असण्याचा फार संभव आहे. कारण खुद्द वीरतनयांतहि मधून मधून चमकणाऱ्या तलवारीखेरीज फारसा वीररस नाहीं. मूकनायकापासून तर कोल्हटकरांना त्याचें विस्मरणच झालेलें दिसतें. वीरतनय, मूकनायक व गुप्तमंजूष हीं त्यांचीं पहिलीं नाटकें कल्पनारम्यतेवरच उभारलीं आहेत. मराठी नाट्यवाङ्मयाला सर्वस्वीं अपरिचित असलेल्या अनेक नवीन गोष्टी याच नाटकांतून प्रथमतः

प्रेक्षकांच्या दृष्टीला पडल्या. कोल्हटकरांच्या प्रतिभेची ठेवण शेक्स्पीयरपेक्षां मोलियरशीं जुळणारी होती. पण विनोदी नाटकांचें स्वागत होण्याला तो काळ अनुकूल नसल्यामुळें असो, अगर शेक्स्पीयर व मोलियर यांचें आकर्षक मिश्रण करण्याच्या महत्त्वाकांक्षेमुळें असो, कोल्हटकरांनीं या तिन्ही नाटकांत गंभीर कथानक व विनोद हीं एकत्र आणण्याचा प्रयत्न केला. मूकनायकासारख्या नाटकांत बैठक आणि मूर्ति यांचें प्रमाण साधल्यामुळें तो यशस्वी होऊन नाटक कलासुंदर झालें आहे. पण गुप्तमंजूष—त्यांत कितीहि मनोरंजकता असली तरी—कलादृष्ट्या हिणकस वाटतें. स्त्रीशिक्षणासारखा विषय, त्याचें महत्त्व सिद्ध करण्यासाठीं नवऱ्याला व मुलीला टाकून जाणारी प्रौढ राणी, रुग्णमार्जार औषधानें राजाचा प्राण घेऊं इच्छिणारा विद्वान् खलपुरुष, भविष्यामुळें बापापासून दूर ठेवला गेलेला राजपुत्र, पुरुषवेषांत आपल्या मुलीशीं प्रणयसंवाद करणारी आई, या सर्वच गोष्टी—त्या सुरस व चमत्कारिक असल्या तरी—अरबी भाषेंतल्या वाटतात! अद्‌भुतरम्यतेचें रूपांतर कृत्रिमतेंत अतिशय लवकर होतें, याचा गुप्तमंजूष मोठा पुरावा आहे.

यापुढील तीन नाटकें हीं कोल्हटकरांच्या नाट्यप्रतिभेचीं उत्कृष्ट फळें होत. खऱ्याखुऱ्या सामाजिक कथानकाला व प्रश्नाला त्यांनीं मतिविकारांतच हात घातला. चकोरासारख्या जपानहून परत आलेल्या तरुणानें चंद्रिकेची भेट घेण्याकरितां वैराग्याच्या वेषानें तिच्या घरीं जाणें अगर तरंगिणीनें कल्याणी या नांवानें बुरख्यांत आणि मनोहराच्या आश्रमांत राहणें, या गोष्टी पूर्णपणें वास्तव नाहींत हें खरें. पण चटकदार कथानक, आनंदराव, सरस्वती, विहार व मनोहर अशीं आपल्या भोंवतालीं दिसणारीं पात्रें, सुंदर संवाद आणि कल्पनायुक्त पद्यें इत्यादि गुणांमुळें वाङ्मयदृष्ट्या हें नाटक केव्हांहि अमर ठरेल. या नाटकांतील पात्रांची संख्या बाजवीपेक्षां अधिक वाटते. कदाचित् त्या वेळच्या किर्लोस्कर मंडळींतील सर्व होतकरू नटांना नाटकांत काम मिळावें म्हणूनहि अशी रचना झाली असेल. यापुढील प्रेमशोधन नाटकांत तो दोष दिसत नाहीं. कारण त्यांतील जुळ्यासंबंधींचा भाग प्रयोगाच्या दृष्टीनें गैरसोईचा आहे, याची जाणीव नाटक लिहितांना लेखकाच्या मनांत होती. पण त्यामुळेंच नाटकाला कलेच्या दृष्टीनें अधिक निर्दोष स्वरूप प्राप्त झालें. या नाटकांत विनोद आहे; पण त्याचा गंभीर भागावर वरचष्मा नाहीं. कथानकाची गुंतागुंत आहे; पण ती स्वभावविकासाला अगर रसोत्कर्षाला मारक नाहीं. यांतील नायिका इंदिरा व नायक कंदन यांच्यासारखीं नाजुक पण

विविध रंगांनीं रंगविलेलीं स्वभावचित्रें मराठी नाटयसृष्टींत थोडींच आढळतील. वधूपरीक्षा हें कोल्हटकरांचें पहिलें गद्य नाटक. संगीताचा पाठिंबा नसल्यानें तें कदाचित् यशस्वी होणार नाहीं या भीतीनें त्यांनीं त्याचें कथानक शक्य तितकें उत्कंठावर्धक करण्याचा प्रयत्न केला आहे. हें कथानक विलक्षण गुंतागुंतीचें असूनहि गुलबकावलीप्रमाणें अथवा पुराणांतील कथांसारखें शिथिल नाहीं. तथापि त्यांतील ताईताचा गोंधळ व धुरंधरावर आलेला स्वतःच्या खुनाचा आरोप या गोष्टींतील कृत्रिमपणा मनाला जाणवतोच. कलादृष्ट्या या नाटकांत अनेक गुण आहेत व त्यामुळेंच संगीत रंगभूमीवर त्याचा पुनर्जन्म होऊं शकला. पण मूकनायक, मतिविकार व प्रेमशोधन यांच्यांतील सरसता त्यांत आढळत नाहीं.

दुसऱ्या विभागांतील सहा नाटकांपैकीं सहचारिणी व जन्मरहस्य यांनीं रंगभूमि पाहिली. पण माळ्याच्या दोषामुळें सुंदर फुलझाडें कोमेजून जावींत त्याप्रमाणें या नाटकांची स्थिति झाली. प्रहसनवजा नाटक या दृष्टीनें सहचारिणी अत्यंत मनोरंजक आहे; किंबहुना त्यांतील वजा शब्द काढून कोल्हटकरांनीं तें शुद्ध प्रहसन ह्मणून लिहिलें असतें तर यापेक्षांहि तें अधिक निर्दोष होऊं शकलें असतें. जन्मरहस्य हें कांहीं दृष्टींनीं तरी कोल्हटकरांच्या नाटकांत सर्वश्रेष्ठ ठरेल. कल्पनाविलास व संयम, रहस्य व रस, विषय व कथानक, स्वभाव व प्रसंग या विरोधी जोड्यांचें सुंदर संमिश्रण या नाटकांत साधलें आहे. इब्सेनची कला आपणांला कळत नाहीं, असें कोल्हटकर ह्मणत असत. पण या नाटकाची रचना इब्सेनलाहि आवडली असती, अशा प्रकारची झाली आहे. परिवर्तनांत विनोदी अद्भुतरम्यता आहे. शिवपावित्र्य या ऐतिहासिक नाटकांत कोणताच गुण उत्कटत्वानें आढळत नाहीं. श्रमसाफल्याचा विषय सध्यांच्या कालाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आहे. श्रमाचें माहात्म्य तरुण पिढीला पटलें तर देवच पावला म्हटलें पाहिजे! पण विषय जितका वास्तव तितकीच त्याची बैठक कल्पनारम्य केल्यामुळें हें नाटक परिणामकारक होऊं शकत नाहीं. यांतील नायकाला श्रम करावे लागतात ते जमाखर्चाच्या चोपड्या तपासून दिवाणजीची लुच्चेगिरी बाहेर काढण्याचे! पाटावर रांगोळीनें काढलेला चंद्र पाहून संकष्टी सोडण्यापैकींच हा प्रकार वाटतो. श्रमसाफल्याचें धाकटें भावंड मायाविवाह अजून अप्रकाशित आहे.

कोल्हटकरांच्या नाटकांनीं मराठी वाङ्मयांत एवढा जोरदार नवा प्रवाह निर्माण केला कीं, मूळची नदी त्या प्रवाहाला येऊन मिळाली आहे असेंच भासूं

लागलें. स्वतंत्र व चमत्कृतिप्रधान कथानक, काव्यात्मता, सहेतुकता, विनोदविलास, इत्यादि आज चांगल्या नाटकाला आवश्यक होऊन बसलेल्या गोष्टी त्यांच्याच नाटकांतून प्रथम मराठी वाचकांच्यापुढें आल्या. त्यांचीं पद्यें कित्येकदां दुर्बोध वाटत असलीं व त्यांनीं रूढ केलेल्या पार्शी-गुजराथी चाली मागें पडल्या असल्या, तरी कल्पकता व माधुरी या गुणांनीं तीं वाचकांना नेहमीं आनंदच देतील. आजच्या घटकेला रंगभूमीवर त्यांचीं अवघीं दोनच नाटकें उरलीं आहेत, ही गोष्ट खरी. रंगभमीवरून सूत्रधार व नटी यांना हांकून देण्याचें जें पाप त्यांनीं केलें त्याचें हें प्रायश्चित्त आहे, असेंहि कोणा जुन्या परंपरेच्या अभिमान्याला वाटण्याचा संभव आहे! तें कसेंहि असलें तरी कल्पकता, कला व विनोद या तीन प्रभावी वाङ्मयगुणांमुळें जों जों वाचकवर्ग सुसंस्कृत होत जाईल तों तों त्यांचीं नाटकें अधिक आवडीनें वाचलीं जातील. ‘ कोल्हटकर शंभर वर्षें आधीं जन्माला आले ’ हे गडकऱ्यांचे उद्गार रंगभूमीच्या दृष्टीनें खरे ठरतील किंवा काय, हें सर्वसमर्थ काळाशिवाय दुसरा कोण सांगूं शकणार?

## ( ४ ) कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर

जीं झाडें लवकर फळें धरूं लागतात त्यांचा हंगामहि लवकर संपतो, असें म्हणतात. कोल्हटकरांचा नाट्यसंसार थोडासा असाच झाला. खाडिलकरांची स्थिति बरोबर याच्या उलट झाली. त्यांना रंगभूमि पादाक्रांत करावयाला वेळ लागला. पण तिचें स्वामित्व मिळविल्यानंतर गडकरी-वरेरकरांसारखे ताज्या दमाचे नाटककार यशस्वी झाले असूनहि खाडिलकरांचें स्थान जवळजवळ अढळच राहिलें.

बी. ए. होतांच १८९३ सालीं त्यांनीं ‘ सवाई माधवरावांचा मृत्यु ’ हें ऐतिहासिक नाटक लिहिलें. एखाद्या दागिन्याचें महत्त्व त्यांतल्या सोन्याच्या किंमतीपेक्षां सोनाराच्या कौशल्यावरच जसें अवलंबून असतें त्याप्रमाणें या नाटकांत इतिहासापेक्षां नाट्यचातुर्यच अधिक आहे. शेक्स्पीयरच्या हॅम्लेट व यागो या भिन्न नाटकांतील भूमिका सवाई माधवराव व केशवशास्त्री यांच्या रूपानें खाडिलकरांनीं एकत्रित केल्या. कलाविलास या दृष्टीनें त्यांचा हा प्रयत्न निःसंशय अभिनंदनीय होता. पण नाट्यकौशल्यापेक्षां इतिहासाच्या दृष्टीनेंच वाचकवर्गानें या नाटकाकडे पाहिलें व त्यामुळें त्याची व्हावी तितकी बूज होऊं शकली नाहीं. मराठी गद्य रंगभूमीवर त्या वेळीं शेक्स्पीयरचीं करुणगंभीर नाटकें गाजत होतीं. खाडिलकरांचें पहिलें नाटक हें एका दृष्टीनें त्यांचेंच फळ आहे, असें म्हणतां येईल.

पुढें पांच वर्षांनीं १८९८ त त्यांनीं ‘ कांचनगडची मोहना ’ लिहिली. हें नाटक तसें पाहिलें तर काल्पनिक आहे. परंतु त्याच्यांत ऐतिहासिक वातावरण निर्माण करण्यांत खाडिलकर यशस्वी झाले यांत शंका नाहीं. शेक्स्पीयरच्या पद्धतीचा नाट्यविलास या वेळींहि त्यांच्या डोक्यांत घोळत असावाच. प्रतापरावाच्या उतावळ्या स्वभावामुळें झालेला दुःखांत, हंबीररावाच्या करुणरम्य स्वभावाचें चित्र इत्यादि गोष्टी याची साक्ष देण्याला समर्थ आहेत. पण नाट्यविलासाला त्या वेळच्या देशाभिमानाच्या चळवळीची व रंगभूमीवर गाजणाऱ्या नाटकांचीहि जोड मिळालेली दिसते. शाहूनगरवासीच्या रंगभूमीवर हें नाटक फारसें यशस्वी होऊं शकलें नाहीं. त्यामुळें १९०५ पर्यंत खाडिलकरांची प्रतिभा मूकच राहिली. १९०७ सालीं महाराष्ट्रमंडळीच्या रंगभूमीवर आलेल्या त्यांच्या दोन नाटकांनीं त्यांना एकदम कीर्तीच्या शिखरावर नेऊन बसविलें. हीं दोन नाटकें ‘ बायकांचें बंड ’ व ‘ कीचकवध ’ हीं होत. ‘ विनाश्रयं न तिष्ठन्ति पंडिता वनिता लताः ’ या न्यायानें बायकांनीं बंड केलें तरी त्याला कोणाचा तरी आधार लागावयाचाच! तसा खाडिलकरांच्या बायकांच्या बंडालाहि टेनिसनच्या प्रिन्सेसचा आधार आहे. पण सुंदर मंदिराला पायाचा आधार असतो म्हणून त्याच्या रचनेंतील कौशल्य कोणीं कमी मानलें आहे काय ? मधुर कल्पनारम्य वातावरण व निर्मल विनोद यांचा इतका रम्य संगम खाडिलकरांच्या कृतींत इतरत्र क्वचितच आढळेल. कोल्हटकरांच्या नाटकांची विशेषतः मूकनायकाची त्यांच्या मनावर पडलेली छाप बायकांच्या बंडांत व मानापमानांत स्पष्टपणें आढळून येते. बायकांच्या बंडाचें जुळें भावंड कीचकवध हें त्याच्यापासून अंतर्बाह्य भिन्न आहे. नाट्यपरिपोषक कथानक, दृश्य व अदृश्य द्वंद्वें निर्माण करणारे रसोत्कर्षांचे प्रसंग आणि सर्व पौराणिक कथानकांतून उमटणारा तत्कालीन राजकीय परिस्थितीचा ध्वनि, या त्रिवेणीसंगमामुळें कीचकवध तत्काल लोकप्रिय झालें. त्या वेळीं भीमाचीं भाषणें टिळकांच्या जहाल लेखांसारखीं वाटून लोक त्यांचा सत्कार करीत असत. गांधीयुगांत भीम मागें पडून टाळ्या मिळविण्याचा मान अहिंसावादी धर्माला मिळूं लागला. राजकारणांतल्या लाटांबरोबरच वहात जाणाऱ्या प्रेक्षकांच्या तात्पुरत्या अभिरुचीचा हा प्रश्न सोडून दिला तरी कीचकवधांतील नाट्यगुण त्याला मराठी वाङ्मयांत अमर करण्याला समर्थ आहेत.

कीचकवधानंतर खाडिलकरांनीं लिहिलेल्या भाऊबंदकीचा उगम सुरतेच्या प्रसिद्ध काँग्रेस-लढ्यांत आहे कीं काय कोणाला ठाऊक. पण पक्षोपपक्षांनीं

छिन्नभिन्न होऊन गेलेल्या समाजापुढें त्यांनीं हा नाट्यादर्श अहेतुकपणें ठेविला असेल असें वाटत नाहीं. शेक्स्पीयरच्या पद्धतीचा कलाविलास करण्याची खाडिलकरांची हौस या नाटकांतहि दिसून येते. राघोबा, आनंदीबाई व नारायणरावांचें भूत यांची मॅकबेथ, लेडी मॅकबेथ व बँकोचें भूत यांच्याशीं तुलना केली असतां ही गोष्ट चटकन् लक्षांत येण्याजोगी आहे. भाऊबंदकीनंतर स्कॉटच्या टॅलिसमनचें प्रेमध्वज हें रूपांतर करून खाडिलकर संगीताकडे वळले.

खाडिलकरांसारखा कलाकुशल नाटककार संगीत नाटकांकडे उशीरां वळला, हें एका दृष्टीनें मराठी रंगभूमीचें भाग्यच म्हटलें पाहिजे. संगीताची थंड हवा त्यांच्या प्रतिभावृक्षाला न मानवणारीच होती. विद्याहरणासारखें कीचकवधाच्या तोडीचें संगीत नाटक त्यांनीं लिहिलें असलें तरी किर्लोस्कर मंडळीच्या मृदु, गोड व गुंगविणाऱ्या गायनानें त्यांना जें भुलवून नेलें तें उच्चत्वाच्या शिखरापासून दूरदूरच नेलें. विविध व विरोधी भूमिकांचें चित्रण, करुण-वीर-रौद्र रसांचे उत्कट प्रसंग, अत्यंत तीव्र बाळगारें तत्त्वप्रतिपादन, संभाषणांची रसरशीतच या सर्व गोष्टी संगीत नाटकांत उत्तम रीतीनें चित्रित करणें जवळजवळ अशक्य आहे. त्यामुळें खाडिलकरांना आपल्या आत्मीय-गुणांना मुरड घालूनच संगीत नाटकें लिहावीं लागलीं.

उदाहरणार्थ, अत्यंत लोकप्रिय असलेलें त्यांचें मानापमान नाटकच पाहावें. कोल्हटकर-पद्धतीचें कल्पनारम्य कथानक गुंफल्यामुळेंच त्याला रंग चढतो हें खरें आहे. पण त्यांतील चवथ्या अंकांत वनमालेच्या रूपानें राहिलेली भामिनी धैर्यधरावरील प्रेम व्यक्त करण्याच्या हेतूनें त्याचे चढाव घेऊन पुसूं लागते तेव्हां समंजस प्रेक्षकाला या कृत्रिम शृंगाराचा कंटाळा आल्यावांचून राहत नाहीं. मानापमानांतील वातावरणहि सामान्यत: कल्पनारम्यच आहे. पण कल्पनारम्यता प्रभावशाली करण्यासाठीं लागणारी काव्यात्मता खाडिलकरांत कमी असल्यामुळें तें नाटक सौंदर्यलोलुप रसिकांचें पूर्ण समाधान करूं शकत नाहीं. कथानक, तत्त्व, नाट्यप्रसंग इत्यादि दृष्टींनीं मराठी नाटकांत विद्याहरणाचा दर्जा फार श्रेष्ठ आहे. पण संगीताच्या नादामुळें विनोदाचें गालबोट ओढतां ओढतां खाडिलकरांनीं त्याच्या गालालाच काजळ फांसून ठेवलें आहे. विद्याहरणांतल्या गंभीर भागांत त्यांच्या नाट्यगुणांना भरती आली होती, असें म्हणावयाला हरकत नाहीं. पण त्याच सालीं पुढें आलेल्या सत्त्वपरीक्षेपासून नाट्यगुण व तत्त्वचर्चा यांचा सुंदर मेळ त्यांच्या नाटकांत पडेनासा झाला. सत्त्वपरीक्षेंतील हरिश्चंद्राचें स्वभावरेखन धीरोदात्त असलें तरी क्लिष्ट तत्त्वज्ञान व गडकरी-पद्धतीची

कृत्रिम भाषा, यांमुळें तें नाटक वाचकाच्या मनाची पकड घेऊं शकत नाहीं. स्वयंवरापासून तर त्यांना माळ घातलेल्या नाट्यकलेनें त्यांच्याशीं घटस्फोट करण्याचा बेत केला असावा असें वाटूं लागतें. स्वयंवर, द्रौपदी, मेनका व सावित्री या चार एकखांबी तंबूंत खाडिलकरांच्या भाऊबंदकी अखेरच्या गद्य नाट्यमंदिरांची व विद्याहरणासारख्या संगीत महालाची कलाकुसर नाहीं. शृंगारप्राचुर्य, नवीन चालींचीं पदें इत्यादिकांमुळें स्वयंवर रंगभूमीवर यशस्वी झालें. पण द्रौपदीपासूनचीं नाटकें क्रमाक्रमानें इतकीं नीरस उतरलीं कीं सावित्रींत प्रेक्षक कुठल्याहि वाक्याला टाळी देणार नाहींत म्हणून खुद्द नाटककारानेंच आपल्या विनोदी पात्राच्या मुखानें ' द्या बाबा टाळी 'चा जयघोष चालविला ! मेनकेनंतर रंगभूमीवर आलेलें सवती-मत्सर हें-त्यांचें गद्यनाटक मात्र अलीकडील संगीत नाटकांपेक्षां पुष्कळ सरस आहे. त्यांतील रामाची भूमिका अत्यंत आकर्षक झाली आहे. पण मंथरा, कैकेयी, दंडकेश्वर इत्यादि भूमिका रंगवितांना संगीत नाटकाचे रंगच त्यांनीं वापरल्यामुळें त्यांच्या पूर्वीच्या गद्य नाटकांइतकें तें कलासुंदर वाटत नाहीं.

खाडिलकरांच्या एकंदर चौदा नाटकांपैकीं एक रूपांतरित, एक काल्पनिक, तीन ऐतिहासिक व नऊ पौराणिक आहेत, यांवरून त्यांचा ओढा कोणत्या पद्धतीच्या कथानकाकडे आहे, हें सहज दिसून येईल. पौराणिक कथानकांतील सौभद्रासारखीं आनंदप्रधान कथानकें त्यांना फारशीं आवडत नाहींत. जीवितांतील निकराचे प्रसंग, अटीतटींचे सामने, विरोधी दैवाशीं झुंज इत्यादि भव्य, गंभीर, भीषण अगर उदात्त प्रसंगांवरच त्यांचें विशेष प्रेम आहे. त्यांच्या प्रतिभेची एकंदर ठेवणच गंभीर· बायकांचें बंड व मानापमान या नाटकांखेरीज इतरत्र त्यांना उच्च विनोद न साधण्याचें कारण हेंच. मूळच्या गंभीर मनोरचनेला व्यवसाय व टिळकांचें शिष्यत्व यांमुळें विशिष्ट वळण मिळालेलें. नाट्यरचनेचा एकंदर डौल शेक्स्पीयरच्या गंभीर नाटकांच्या पद्धतीचा. या सर्व गुणांचा समन्वय झालेलीं कीचकवध, भाऊबंदकी, विद्याहरण व कांचनगडची मोहना इत्यादि त्यांचीं नाटकें मराठी वाङ्मयाला सदैव भूषणभूतच होतील. पौराणिक कथारसांतून आधुनिक समाजाला पटेल असें तत्त्व निर्माण करण्याचें त्यांचें कौशल्यहि मोठें आहे; पण त्यांच्या अलिकडच्या संगीत नाटकांतून तत्त्व व कला यांची सांगड जुळेनाशी झाली.

भूमिकांची परिमित संख्या, विविध रसांचा उत्कर्ष, संयम, आटोपशीर मांडणी, परिणामकारक संवाद या बाबतींत कोल्हटकरांच्यापेक्षां त्यांचें कौशल्य

अधिक उच्च दर्जाचें वाटतें. म्हणूनच आजच्या सामान्य नाटककारांवरच नव्हे तर कोल्हटकरांच्या परंपरेंतील गडकरी-वरेरकरांसारख्या श्रेष्ठ नाट्यलेखकांवरहि त्यांच्या कलाकुशलतेचे संस्कार झालेले दिसतात.

## ( ५ ) राम गणेश गडकरी

प्रेमसंन्यास ( १९१२ ) या सामाजिक नाटकांत पुनर्विवाह, विषमविवाह, प्रेमविवाह यांचा विचार करण्यांत आला आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. पतिमूर्तीच्या चिंतनांत मग्न असलेली सुशीला, जयंताच्या प्रेमासाठीं तळमळणारी लीला आणि प्रथमतः कमलाकराच्या कामुक बाहुपाशांत आणि नंतर मृत्युपाशांत सांपडणारी दुर्दैवी द्रुमन, हीं तीन विधवांचीं चित्रें पुनर्विवाहाच्या सर्व बाजू पुढें मांडतात. विषम विवाहाचे दुष्परिणाम काव्यदृष्टीनें जयंत-मनोरमेच्या कलहांत आणि विनोददृष्ट्या गोकुळ-मथुरेच्या झगड्यांत पाहावयाला मिळतात. जयंत व लीला यांचें प्रेम आणि त्यांचा झालेला निराशाजनक अंत पाहून प्रेमविवाहाच्या विरोधकांचें हृदय देखील द्रवून जाईल.

विषयाच्या दृष्टीनें हा विचार झाला. नाटक रंगभूमीवर परिणामकारक करण्याकरितां गडकऱ्यांनीं अनेक चमत्कृति व संक्षोभ उत्पन्न करणाऱ्या प्रसंगांचा आश्रय केला आहे. सुशीला गत पतीचें चिंतन करण्यांत मग्न आहे एवढें दाखवून त्यांचें समाधान झालें नाहीं. पुराणांतल्या सीमंतिनीला तिचा बुडालेला नवरा जसा परत मिळतो, त्याप्रमाणें सुशीलेला पतिप्राप्ति झाली पाहिजे असें वाटून, त्यांनीं विद्याधर व त्याचें रहस्य नाटकांत घातलें. हें रहस्य फारशा कुशलतेनें रचण्यांत आलेलें नाहीं. विद्याधराचा कपटनाटकाच्या कथानकालाहि तादृश उपयोग नाहीं. त्याच्या हातून होणारें काम इतर भूमिकांच्याकडूनहि सहज करून घेतां आलें असतें.

विद्याधराच्या उपकथानकाच्या मुळाशीं चमत्कृति आहे असें म्हटलें तर कमलाकराच्या चित्रणाचा हेतु संक्षोभ हाच मानतां येईल. हा कलिपुरुष लीलेचें जयंतावर प्रेम आहे म्हणून त्याचा द्वेष करतो, लीलेचा पापी हेतूनें हात धरतो, त्यांत यश न आल्यामुळें तिचा सूड घेण्याच्या नादाला लागतो, द्रुमनला पापाचा मार्ग दाखवून शेवटीं तिला आगगाडींत बसवून नशीब नेईल तिकडे तिला पाठवून देतो. नाइलाजानें बालहत्या करणारा द्रुमन चवताळून परत आलेली पाहून कमलाकर तिला कुत्र्याच्या मोतीनें मारतो, तिच्या प्रेताचे तुकडे करून ते पेटींत भरतो, पेटींतील प्रेताचा संबंध जयंताकडे लागावा म्हणून लीलेच्या नांवचें खोटेंच पत्र

त्याला पाठवितो—एक न् दोन! कमलाकराचीं सर्व कृष्ण कृत्यें कळावयाला प्रेमसंन्यास अक्षरशः वाचलें पाहिजे! शिशुपालाचे शंभर अपराध भरतांच कृष्णानें त्याचें डोकें उडविलें. पण कमलाकराच्या अगणित अपराधांचें शासन होण्याची शक्यता नाटकांत प्रथमतः तरी कोठेंच दिसत नाहीं. शेवटीं तंट्या मानकाप्या त्याच्या उरावर बसून त्याचा गळा दाबतो व कमलाकराचा अवतार समाप्त होतो.

या नाटकांतील भावनाप्रधान जयंत व लीला यांचीं स्वभावचित्रें चांगलीं साधलीं आहेत. कमलाकराच्या रेखनांत अतिरंजनाचा दोष दिसून येतो. द्रुमनच्या चित्रणाला फारसा अवसर मिळाला नसला तरी तें परिणामकारक झालें आहे. नाटकाशीं फारसा संबंध नसलेलें बसंत-वीणेचें जोडपेंही ठीक आहे. विनोदपरिपोष करणाऱ्या गोकुळाचा कथानकाशीं बादरायण संबंध आहे. साखर व केशर यांत शेरभर काय आणावयाचें याची आठवण न राहणारा हा विस्मरण-विशारद उत्कृष्ट कोट्या करतो! ही विसंगति दृष्टीआड केल्यास गोकुळच्या सर्व प्रवेशांत गडकऱ्यांचा कोटिबाजपणा उत्तम रीतीनें प्रगट झाला आहे. विनोदी प्रवेशांत प्रसंगगत विनोद फारच थोडा आहे. बहुतेक भर कोटि व कल्पनाचातुर्य यांच्यावरच!

प्रेमसंन्यासाची भाषा प्रौढ व काव्यमय आहे. काव्य बोलत नाहीं, असें पात्रच या नाटकांत नाहीं म्हटलें तरी चालेल. अंक १ प्र. ५, अंक २ प्र. ५ आणि शेवटच्या अंकांतील लीलेचा विषपानाचा व जयंताचा प्रेमसंन्यासाचा हे सर्व प्रवेश काव्यकल्पनांनीं फुलून गेले आहेत. मात्र हें काव्य कळायला वाचक चांगलाच रसिक व बहुश्रुत असला पाहिजे. रंगभूमीच्या दृष्टीनें काव्यप्रचुर व लांबलचक संभाषणें फारशीं इष्ट नसतात. गडकऱ्यांनीं या निर्बंधाकडे पूर्णपणें दुर्लक्ष केलें आहे. स्त्रिया व पुरुष, असंस्कृत व सुसंस्कृत या सर्वांची या नाटकांतील भाषा एकरूप भासते व त्यामुळें नाट्य चित्रांतील सत्याभास कमी होतो.

पुण्यप्रभाव (१९१६) या नाटकांतील मुख्य विषय पतिव्रतेचा प्रभाव हा आहे. वसुंधरेच्या पतीला कपटानें अंधारकोठडी दाखविणारा आणि तिच्या देखत तिच्या पुत्राची हत्या करणारा वृंदावन शेवटीं तिच्या तेजापुढें फिक्का पडतो आणि तिच्या हातांतील हार स्वतःच्या गळ्यांत घालून घेण्याऐवजीं तिच्या पायावर आपलें डोकें ठेवतो. वसुंधरा व वृंदावन यांच्यांतील विरोधाला तिसऱ्या अंकांत स्पष्टपणें सुरुवात होते. पहिले दोन अंक भूपाल व वसुंधरा वृंदावनाच्या ताब्यांत देण्याकरितां खर्च करण्यांत आले आहेत. नाटकाच्या या पूर्वार्धांत विनोदी पात्रांच्या

फालतू प्रवेशाखेरीज एक लहानसें कारस्थानहि आहे. राजपुत्राचा वध करून गादी बळकावण्याचा आरोप भूपालावर लादण्याचें हें कपटनाटक इतकें कृत्रिम आहे कीं, तें प्रत्यक्ष दाखविलें नसतें तर नाट्यरचना व स्वाभाविकपणा या दोन्ही दृष्टींनीं बरें झालें असतें.

वसुंधरेचा स्वभाव धीरोदात्त आहे. पातिव्रत्याकरितां ती पुत्राच्या प्राणावर पाणी सोडते. पण जेव्हां पतीच्या प्राणांचा प्रश्न पुढें येतो त्या वेळीं तिचा आत्मविश्वास जागृत होतो आणि वृंदावनाच्या इच्छेप्रमाणें ती त्याच्या गळ्यांत हार घालण्याचें कबूल करते. वृंदावनाच्या पाषाणतुल्य हृदयाला पाझर फुटूं लागल्याचें तिनें पाहिलेलें असतें. हार घालण्याच्या वेळेच्या तिच्या तेजस्वी भाषणानें हा पाषाण एकदम द्रवून त्याचें पाणी पाणी होतें.

वसुंधरेचें वर्तन मानवी कोटींतलें वाटत नाहीं. ती कर्तव्यनिष्ठुर देवता आहे. तत्व व हृदय यांच्या कलहांत तत्वाचाच विजय झाला पाहिजे, असें तिचें तत्त्वज्ञान आहे. हें तत्वज्ञान लक्षांत घेतलें म्हणजे तिच्या वज्रकठोर वर्तनाचें आश्चर्य वाटत नाहीं. वृंदावनाच्या कठोर हृदयांतहि थोडें मृदुत्व आहे, असें गडकऱ्यांनीं दोनतीन ठिकाणीं सूचित केलें आहे. पण सहारांत मधून मधून आढळणाऱ्या हिरवळीमुळें त्या वालुकामय मैदानांत जिकडे तिकडे फळांच्या बागा होणें शक्य आहे, असा अभिप्राय देणाऱ्या कृषिशास्त्रज्ञाची गणना वेड्यांतच होईल. वृंदावनाच्या अंतःकरणांतील अमावास्येच्या अंधःकाराचें रूपांतर सुंदर सूर्योदयांत कसें होतें, हें क्रमाक्रमानें व नाजुक कुंचल्यानें रंगविणें आवश्यक होतें. या मुख्य दोन भूमिका सोडल्या कीं, भूपाल, ईश्वर व कालिंदी यांच्याकडे दृष्टि वळते. भूपाल वसुंधरेचा नवरा आहे म्हणूनच त्याला या नाटकांत महत्त्व आहे, असें मानावयाचें. कालिंदी वसुंधरेच्या मुलाला वांचविण्यासाठीं आपल्या मुलाचा बळी देते; तेव्हां तिच्या मुलाचें रक्षण करण्याकरितां एखाद्या मेलेल्या मुलाचा बळी देण्याची क्लृप्ति लढवावयाला नाटकांत कोणीतरी पाहिजेच होतें. मुलांची अदलाबदल कथानकाच्या प्रगतीला कितीहि आवश्यक मानली तरी बाजारांत जाऊन साबण आणण्याइतकें मेलेलें मूल संपादन करणें हें सोपें नाहीं. हें रहस्य निर्माण करण्यांत व उलगडण्यांत गडकऱ्यांनीं उच्च दर्जाचें रचनाचातुर्य दाखविलें नाहीं, असें खेदानें म्हणावें लागतें. कालिंदीची भूमिका मात्र उठावदार झाली आहे. पातिव्रत्याची तिची कल्पना वसुंधरेच्या इतकीच उज्ज्वल आहे. मात्र तिच्या अंतःकरणावर त्यागबुद्धीनें उत्पन्न होणाऱ्या

त्याला पाठवितो—एक न् दोन! कमलाकराचीं सर्व कृष्ण कृत्यें कळावयाला प्रेमसंन्यास अक्षरशः वाचलें पाहिजे! शिशुपालाचे शंभर अपराध भरतांच कृष्णानें त्याचें डोकें उडविलें. पण कमलाकराच्या अगणित अपराधांचें शासन होण्याची शक्यता नाटकांत प्रथमतः तरी कोठेंच दिसत नाहीं. शेवटीं तंट्या मानकाप्या त्याच्या उरावर बसून त्याचा गळा दाबतो व कमलाकराचा अवतार समाप्त होतो.

या नाटकांतील भावनाप्रधान जयंत व लीला यांचीं स्वभावचित्रें चांगलीं साधलीं आहेत. कमलाकराच्या रेखनांत अतिरंजनाचा दोष दिसून येतो. द्रुमनच्या चित्रणाला फारसा अवसर मिळाला नसला तरी तें परिणामकारक झालें आहे. नाटकाशीं फारसा संबंध नसलेलें वसंत-वीणेचें जोडपेंही ठीक आहे. विनोदपरिपोष करणाऱ्या गोकुळाचा कथानकाशीं बादरायण संबंध आहे. साखर व केशर यांत शेरभर काय आणावयाचें याची आठवण न राहणारा हा विस्मरण-विशारद उत्कृष्ट कोट्या करतो! ही विसंगति दृष्टीआड केल्यास गोकुळच्या सर्व प्रवेशांत गडकऱ्यांचा कोटिबाजपणा उत्तम रीतीनें प्रगट झाला आहे. विनोदी प्रवेशांत प्रसंगगत विनोद फारच थोडा आहे. बहुतेक भर कोटि व कल्पनाचातुर्य यांच्यावरच!

प्रेमसंन्यासाची भाषा प्रौढ व काव्यमय आहे. काव्य बोलत नाहीं, असें पात्रच या नाटकांत नाहीं म्हटलें तरी चालेल. अंक १ प्र. ५, अंक २ प्र. ५ आणि शेवटच्या अंकांतील लीलेचा विषपानाचा व जयंताचा प्रेमसंन्यासाचा हे सर्व प्रवेश काव्यकल्पनांनीं फुलून गेले आहेत. मात्र हें काव्य कळायला वाचक चांगलाच रसिक व बहुश्रुत असला पाहिजे. रंगभूमीच्या दृष्टीनें काव्यप्रचुर व लांबलचक संभाषणें फारशीं इष्ट नसतात. गडकऱ्यांनीं या निर्बंधाकडे पूर्णपणें दुर्लक्ष केलें आहे. स्त्रिया व पुरुष, असंस्कृत व सुसंस्कृत या सर्वांची या नाटकांतील भाषा एकरूप भासते व त्यामुळें नाट्य चित्रांतील सत्याभास कमी होतो.

**पुण्यप्रभाव** ( १९१६ ) या नाटकांतील मुख्य विषय पतिव्रतेचा प्रभाव हा आहे. वसुंधरेच्या पतीला कपटानें अंधारकोठडी दाखविणारा आणि तिच्या देखत तिच्या पुत्राची हत्या करणारा वृंदावन शेवटीं तिच्या तेजापुढें फिका पडतो आणि तिच्या हातांतील हार स्वतःच्या गळ्यांत घालून घेण्याऐवजीं तिच्या पायावर आपलें डोकें ठेवतो. वसुंधरा व वृंदावन यांच्यांतील विरोधाला तिसऱ्या अंकांत स्पष्टपणें सुरुवात होते. पहिले दोन अंक भूपाल व वसुंधरा वृंदावनाच्या ताब्यांत देण्याकरितां खर्च करण्यांत आले आहेत. नाटकाच्या या पूर्वार्धांत विनोदी पात्रांच्या

फालतू प्रवेशाखेरीज एक लहानसें कारस्थानहि आहे. राजपुत्राचा वध करून गादी बळकावण्याचा आरोप भूपालावर लादण्याचें हें कपटनाटक इतकें कृत्रिम आहे कीं, तें प्रत्यक्ष दाखविलें नसतें तर नाट्यरचना व स्वाभाविकपणा या दोन्ही दृष्टींनीं बरें झालें असतें.

वसुंधरेचा स्वभाव धीरोदात्त आहे. पातिव्रत्याकरितां ती पुत्राच्या प्राणावर पाणी सोडते. पण जेव्हां पतीच्या प्राणांचा प्रश्न पुढें येतो त्या वेळीं तिचा आत्मविश्वास जागृत होतो आणि वृंदावनाच्या इच्छेप्रमाणें ती त्याच्या गळ्यांत हार घालण्याचें कबूल करते. वृंदावनाच्या पाषाणतुल्य हृदयाला पाझर फुटूं लागल्याचें तिनें पाहिलेलें असतें. हार घालण्याच्या वेळेच्या तिच्या तेजस्वी भाषणानें हा पाषाण एकदम द्रवून त्याचें पाणी पाणी होतें.

वसुंधरेचें वर्तन मानवी कोटींतलें वाटत नाहीं. ती कर्तव्यनिष्ठुर देवता आहे. तत्त्व व हृदय यांच्या कलहांत तत्त्वाचाच विजय झाला पाहिजे, असें तिचें तत्त्वज्ञान आहे. हें तत्त्वज्ञान लक्षांत घेतलें म्हणजे तिच्या वज्रकठोर वर्तनाचें आश्चर्य वाटत नाहीं. वृंदावनाच्या कठोर हृदयांतहि थोडें मृदुत्व आहे, असें गडकऱ्यांनीं दोनतीन ठिकाणीं सूचित केलें आहे. पण सहारांत मधून मधून आढळणाऱ्या हिरवळीमुळें त्या वालुकामय मैदानांत जिकडे तिकडे फळांच्या बागा होणें शक्य आहे, असा अभिप्राय देणाऱ्या कृषिशास्त्रज्ञाची गणना वेड्यांतच होईल. वृंदावनाच्या अंतःकरणांतील अमावास्येच्या अंधःकाराचें रूपांतर सुंदर सूर्योदयांत कसें होतें, हें क्रमाक्रमानें व नाजुक कुंचल्यानें रंगविणें आवश्यक होतें. या मुख्य दोन भूमिका सोडल्या कीं, भूपाल, ईश्वर व कालिंदी यांच्याकडे दृष्टि वळते. भूपाल वसुंधरेचा नवरा आहे म्हणूनच त्याला या नाटकांत महत्त्व आहे, असें मानावयाचें. कालिंदी वसुंधरेच्या मुलाला वांचविण्यासाठीं आपल्या मुलाचा बळी देते; तेव्हां तिच्या मुलाचें रक्षण करण्याकरितां एखाद्या मेलेल्या मुलाचा बळी देण्याची क्लृप्ति लढवावयाला नाटकांत कोणीतरी पाहिजेच होतें. मुलांची अदलाबदल कथानकाच्या प्रगतीला कितीहि आवश्यक मानली तरी बाजारांत जाऊन साबण आणण्याइतकें मेलेलें मूल संपादन करणें हें सोपें नाहीं. हें रहस्य निर्माण करण्यांत व उलगडण्यांत गडकऱ्यांनीं उच्च दर्जाचें रचनाचातुर्य दाखविलें नाहीं, असें खेदानें म्हणावें लागतें. कालिंदीची भूमिका मात्र उठावदार झाली आहे. पातिव्रत्याची तिची कल्पना वसुंधरेच्या इतकीच उज्ज्वल आहे. मात्र तिच्या अंतःकरणावर त्यागबुद्धीनें उत्पन्न होणाऱ्या

संयमापेक्षां वात्सल्यानें उत्पन्न होणाऱ्या भावनांचेंच स्वामित्व चालतें. वृंदावनाच्या कृष्णकृत्यांची उज्ज्वल पार्श्वभूमि या दृष्टीनेंहि नाटकांत तिचें कार्य महत्त्वाचें आहे.

या नाटकांत विनोदी पात्रें पांच आहेत. त्यांतील दामिनी बुरखा पांघरीत असल्यामुळेंच तिच्याऐवजीं कालिंदीला तळघरांत जाऊन बसतां येतें. दामिनी-इतकें कथानकाशीं निगडित न झालेलें, परंतु अगदींच विलग न वाटणारें, विनोदी पात्र कंकण हें आहे. बाकीचीं तीन—सुदाम दामिनीचा नवरा म्हणून, किंकिणी कंकणाची भावी पत्नी या नात्यानें आणि नूपुर ग्रामकंटक असल्यामुळें, या नाटकांत रंगभूमीवर येतात. या नाटकांतील विनोदाचा रोख अनेकदां स्त्रीपुरुषांच्या अनिष्ट संबंधावर असल्यामुळें तो उत्तान वाटतो. नाटकांतील विनोदाची मदार मुख्यत: कोटीवरच आहे. ज्या पेटाऱ्यांत सुदाम दामिनीला न कळत आधींच दडून बसलेला असतो त्याच पेटाऱ्यांत तिनें नूपुराला लपविणें, बुरख्याच्या अदलाबदलीमुळें होणारा घोंटाळा, इत्यादि ठिकाणीं प्रसंगगत विनोद आढळतो. नाटकाची भाषा प्रेमसंन्यासा-इतकीच किंबहुना त्याच्याहूनहि अधिक काव्यमय व त्यामुळेंच अनेक स्थळीं क्लिष्ट झाली आहे. आर्द्रा नक्षत्राच्या पावसाप्रमाणें गडकऱ्यांच्या कल्पकतेनें भूपाल-वसुंधरा ( अंक २ प्र. २ ) आणि वसुंधरा-वृंदावन ( अंक ६ प्र. ४ ) यांच्या प्रवेशांत आपलें सर्वस्व ओतलें आहे. सुंदर व नावीन्यपूर्ण काव्यकल्पनांनीं हें नाटक गजबजलें असलें तरी भूमिका, प्रसंग आणि भाषा इत्यादिकांच्या औचित्याचा अनेक स्थळीं भंग झाला असल्यामुळें त्या कल्पना व्हाव्या तितक्या आनंदप्रद होत नाहींत.

**एकच प्याला** ( १९१९ ) हें नाटक पूर्वीच्या दोन नाटकांपेक्षां आकारानें लहान असून कथानकदृष्ट्याहि बरेंच सोपें आहे. गडकऱ्यांनीं १९१७ सालीं याचें लेखन संपविलें. दारूच्या पायीं बुद्धिमान मनुष्य मातीमोल होतो, त्याच्या सोन्या-सारख्या संसाराची राखरांगोळी होते, बायकामुलांना जीव कीं प्राण करणारा मनुष्य दारूबाज झाला कीं त्यांचे जीव घेतो, इत्यादि गोष्टी या नाटकांत परिणामकारक रीतीनें रेखाटण्यांत आल्या आहेत. सुधाकर, सिंधू व त्यांचा मुलगा या तिघांच्या मृत्यूंत या करुणान्त नाटकाचा शेवट झाला आहे.

सुधाकराचा मित्र रामलाल, त्याच्या उपदेशानें मद्यपान सोडून देणारा भगी-रथ आणि सुधाकराची बहीण शरद् अशीं तीन पात्रें नाटकांत असून त्यांचें एक उपकथानक बनविण्याचा कर्त्यानें प्रयत्न केला आहे. पण विषय अगर कथानक या दोहोंच्याहि दृष्टीनें हें उपकथानक परिपोषक होत नाहीं. ‘ दारूच्या एकच

त्याचप्रमाणें स्त्रीचा एकच स्पर्शहि मनुष्याचा अधःपात करतो' हें तत्त्व रामलालच्या मुखांतून वदविण्याकरितां उपकथानकाचा डोंगर उभारण्याचें कांहींच कारण नव्हतें. एकमेकांचा कांहींच संबंध नसलेले दोन प्रवासी वाटेनें बरोबर जात असतात, त्यांतलाच मुख्य कथानक व उपकथानक यांचा हा प्रकार झाला आहे! शिवाय रामलालनें स्वतःला सुधाकराचा जीवश्चकंठश्च मित्र म्हणवून घेऊनहि त्याची दारू सोडविण्याचा कुठलाहि दृश्य प्रयत्न न करणें, सुधाकराच्या आधीं दारू प्यायला लागलेल्या भगीरथाची दारू रामलालच्या छोट्या व्याख्यानानें सुटणें आणि सुधाकरावर सत्त्वशील सिंधूच्या सद्वर्तनाचाहि परिणाम न होणें, शरद्नें दारूबाज भाऊ व विपद्ग्रस्त भावजय यांच्याविषयीं चकार शब्दहि न काढतां रघुवंशाचें अध्ययन करीत बसणें, इत्यादि गोष्टी रसभंगकारकच वाटतात.

विनोदाकरितां स्थापण्यांत आलेलें आर्यमदिरामंडळ व त्याचे अध्वर्यु तळिराम यांचा देखील मुख्य कथानकाशीं असावा तेवढा निकट संबंध नाहीं. आग लावावयाला जशी कोणीतरी काडी ओढावी लागते त्याप्रमाणें सुधाकराचा दारूच्या पायीं नाश व्हावयाला कोणीतरी प्रथमतः त्याला दारूचा प्याला द्यायला पाहिजे. हें काम करण्याकरितां ग्रंथकर्त्यांनीं तळिरामाला 'निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्' (दोन्ही हातांनीं दारूचे पेले पिणें तळिरामला अशक्य नसल्यामुळें सव्यसाची या पदवीवर त्याचा पूर्ण हक्क पोंचतो!) अशा शब्दांनीं विनंति केली व त्या मद्यपानबहाद्दरानें ती मान्यहि केली. आर्यमदिरामंडळांत जोंपर्यंत दारूवर कोट्या चालतात तोंपर्यंत त्याचें कथानकाशीं थोडेंतरी नातें आहे, असा भास होतो. पण आसन्नमरण तळिरामाला तपासण्याच्या निमित्तानें डॉक्टर आणि वैद्य जेव्हां रंगभूमीवर एकमेकांच्या उरावर बसूं लागतात तेव्हां 'तुमच्या बायकोच्या माहेरचा कुत्रा आणि माझ्या बायकोच्या माहेरचा कुत्रा हे अगदीं सख्खे भाऊ' असें सांगून एखाद्याच्या घरांत पाहुण्याच्या नात्यानें महिनेच्या महिने पुख्खा झोडणाऱ्या मनुष्याची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं!

या नाटकांतील सुधाकर-सिंधूच्या सुखी संसाराचा पहिला प्रवेश सुंदर साधला आहे. सुधाकराला दारूचें व्यसन निमिषार्धांत लावण्यांत मात्र भलती घाई झाली असून, दुसऱ्या व तिसऱ्या अंकांत सिंधू व रामलाल त्याचें व्यसन सोडविण्याचा म्हणण्यासारखा कांहींच प्रयत्न करीत नाहींत, हें कसेंसेंच वाटतें. दारूबाज नवऱ्याच्या आज्ञेप्रमाणें दुसऱ्याची पैदेखील न घेण्याची सिंधूनें घेतलेली शपथ, मोकळ्या जिभेच्या गीतेचे उद्गार ऐकून सुधाकराला झालेला पश्चात्ताप आणि दुधाच्या

थेंबालाहि महाग झालेल्या आपल्या चिमुकल्याला उद्देशून सिंधूनें काढलेले उद्गार, हे सर्व प्रसंग करुणरसाचा परिपोष करणारे असून चांगले साधले आहेत. सुधाकरानें मद्यपानाच्या मीमांसेवर दिलेलें व्याख्यान, विद्वत्ताप्रचुर असलें तरी नाट्यदृष्ट्या अस्वाभाविक वाटतें. सिंधूचें स्वभावचित्र आकर्षक आहे; पण दारूबाज नवऱ्याची आज्ञा वेदतुल्य मानण्याची तिची प्रवृत्ति अनुकरणीय आहे, असें कोणीहि मानणार नाहीं.

या नाटकाची भाषा पूर्वीच्या दोन्ही नाटकांपेक्षां अधिक सुबोध व रसपरिपोषक आहे. सिंधू व गीता यांचीं कांहीं भाषणें तर अगदीं व्यवहारांतील भासतात. सुंदर कल्पना या नाटकांत पुष्कळ आहेत; पण पूर्वीच्या नाटकांतल्याइतकी त्यांची खैरात केलेली नाहीं. यामुळें कृत्रिमतेचा दोष बऱ्याच कमी प्रमाणांत आढळतो. विनोद कोटिप्रधान आहे. कथानकांतले दोष काढून टाकून गडकऱ्यांनीं अधिक रचनाचातुर्य दाखविलें असतें तर 'एकच प्याला' हें निःसंशय त्यांचें सर्वोत्कृष्ट नाटक ठरलें असतें.

**भावबंधन** ( १९२० ): या नाटकाचें लेखन गडकऱ्यांच्या आयुष्याच्या अखेरच्या प्रहरांत पूर्ण झालें. गडकऱ्यांच्या सर्व नाटकांत हें मोठें असून ( १८० पृष्ठांचें ) त्यांत कोणत्याहि विशिष्ट विषयाचें प्रतिपादन नाहीं. फटकळ लतिकेच्या बोलण्यानें चिडलेला घनश्याम तिचा व तिच्या प्रियजनांचा सूड घेण्याकरितां दोन कारस्थानें रचतो; एक मालतीच्या बापाकडून चोरीची खोटी कबुली लिहून घेणें व दुसरें लतिकेच्या बापाचे खोटे दस्तऐवज महेश्वराकडून चोरविणें. या दोन कारस्थानांच्या पात्यांची कात्री करून तो भराभर धुंडिराज, मालती, लतिका वगैरेंचीं हृदयें छिन्नविछिन्न करूं लागतो. मालतीचा प्रियकर मनोहर याला स्मशानांत घनश्यामानें पुरून ठेवलेले धनेश्वराचे खोटे कागद मिळतात व अशा रीतीनें घनश्यामाच्या तीक्ष्ण कात्रीचें एक पातें मोडून पडतें. घनश्यामानें पोलिसाच्या वेषांत यावें असें आमिष निर्माण करून त्याचा उरलासुरला दुष्टपणाहि नाहींसा करण्यांत आला आहे.

धुंडिराज-मालती व धनेश्वर-लतिका यांचीं सुखदुःखें या कथानकांत एकत्र गुंफण्यांत आलीं आहेत. घनश्याम आणि लतिका यांच्या मुख्य कथानकांत मालतीचें उपकथानक गुंतवून टाकण्यामध्यें गडकऱ्यांनीं पूर्वीच्या सर्व नाटकांपेक्षां अधिक चातुर्य प्रगट केलें आहे. मात्र दुसऱ्या अंकामध्यें उपकथानकच इतकें रंगतें कीं, त्यापुढें मुख्य कथानक फिकें भासतें. धनेश्वराचे कागद चोरण्याकरितां अंधळ्याचें

सोंग घेणारा महेश्वर निर्माण केला असून त्याला विनोद करतां यावा म्हणून त्याच्या पाठीमागें इंदुबिंदु या दोन काळ्याकुट्ट पोरी लावल्या आहेत. हें उपकथानक केवळ विनोदसुखार्थंच चिकटविण्यांत आलें आहे, असें म्हणावयाला हरकत नाहीं.

या नाटकांतील कलिपुरुष घनश्याम याच्या सुडाला अपमानाचें भरभक्कम कारण आहे. परंतु लतिका शरण येऊन पायांवर डोकें ठेवूं लागली तरी देखील त्याचें अंतःकरण तिळमात्र द्रवत नाहीं, हें फारसें सुसंगत नाहीं. मात्र शेवटच्या प्रवेशांत निरपेक्ष दयेचें दर्शन होतांच तो एकदम सज्जन होतो! लतिका व मालती या दोन्ही मैत्रिणींचे स्वभाव चांगले रेखाटण्यांत आले आहेत. लतिकेच्या स्वभावाचे निरनिराळे पैलू वाचकांच्या दृष्टीला पडत असल्यामुळें तिची भूमिका अधिक रमणीय वठली आहे. नायक व उपनायक हे दोन्ही निर्जीव पुतळे वाटतात. त्यांच्याकडून नाटककारानें थोडें कार्य करून घेतलें असलें तरी त्यांचें स्वतंत्र अस्तित्व कुठेंहि जाणवत नाहीं. धुंडिराजाची भूमिका इतकी स्वाभाविक व सुंदर वठली आहे कीं, मराठी नाट्य-वाङ्मयांतील स्वतंत्र व उत्कृष्ट स्वभावचित्रांत तिची गणना होईल. या बडबड्या परंतु प्रेमळ पित्यामुळें नाटकांत हास्य व करुण या दोन्ही रसांचा उत्कृष्ट परिपोष झाला आहे. अकृत्रिम विनोद निर्माण करण्याचीहि शक्ति गडकऱ्यांमध्यें विपुल प्रमाणांत होती, याचें हें पात्र हें उत्तम उदाहरण आहे. धनेश्वराचें पात्र ठरीव ठशाचें वाटलें तरी स्वाभाविक पश्चात्तापामुळें तेंहि थोडें फार सजीव भासूं लागतें. महेश्वर व इंदुबिंदु यांच्याविषयीं कांहीं लिहावयालाच नको. या तिघांनाहि लग्नाची गरज आहे व गरजवंताला अक्कल नसते ही म्हण सुप्रसिद्धच आहे.

भावबंधनाचा पहिला अंक ५८ पृष्ठांचा असून तो मुख्य कथासूत्राची पूर्वतयारी करण्यासाठीं खर्च झाला आहे. रचनेचें हें शैथिल्य नाटकांत सर्वत्र आढळतें. प्रत्येक प्रवेश संपूर्ण नाटकासाठीं लिहावयाचा असतो याचा विसर पडून, कित्येक प्रवेश त्यांची कल्पना चांगली वाटल्यामुळें लिहिण्यांत आले आहेत. भाषा व कल्पना या दोहींत बरीच सुबोधता आहे. पण अं. १ प्र. २ सारखीं क्लिष्ट स्थळें दुर्मिळ आहेत, असें मात्र नाहीं. धुंडिराजाच्या स्वभावप्रधान विनोदाप्रमाणें प्रभाकराचा प्रसंगपर व महेश्वराचा कोटिबाज विनोदहि नाटकांत भरपूर आहे. नाटकाचा शेवट करण्याकरितां कथानकाचीं सूत्रें शेवटीं कशीं तरी गुंडाळलीं आहेत, असें वाटल्यावांचून राहत नाहीं. 'राजसंन्यास' व 'वेड्यांचा बाजार' हीं अपूर्ण नाटकें अद्भुतरम्य कल्पकता व विनोद या दृष्टींनीं वाचनीय आहेत.

## ( ६ ) भार्गवराम विठ्ठल वरेरकर

कोल्हटकर-खाडिलकरांच्या मानानें वरेरकरांचें शिक्षण व गडकऱ्यांशीं तुलना केली तर त्यांची प्रतिभा एकंदरींत कमीच. पण रंगभूमीची दोन तपांहून अधिक काळाची सेवा, मध्यम व खालच्या वर्गांतील समाजाचे विविध अनुभव, पाश्चात्य नाटककारांचें सहेतुक वाचन आणि कोल्हटकर-खाडिलकरांनीं आपल्या प्रतिभाजलानें वाढविलेल्या नाट्यलतिकेवर अधिक सुंदर फुलें उमलविण्याची महत्त्वाकांक्षा, इत्यादि विशेषांमुळें गेल्या दशकांतील नाटककारांचें अग्रेसरत्व त्यांनाच दिलें पाहिजे. गेलीं चौदा पंधरा वर्षें त्यांनीं वाङ्मयसेवेलाच स्वतःला वाहून घेतलें असल्यामुळें संख्येच्या दृष्टीनें लहान मोठीं मिळून त्यांचीं सुमारें वीस नाटकें आतांपर्यंत रंगभूमीवर आलीं आहेत.

१९०७–१९०८ सालीं 'कुंजविहारी'च्या रूपानें वरेरकरांनीं रंगभूमीवर पाऊल टाकलें. यापुढील सातआठ वर्षांत त्यांनीं आणखी चार नाटकें लिहिलीं. त्यांपैकीं एक सावित्रीच्या कथेवर असून दुसरें कचदेवयानीच्या सुप्रसिद्ध आख्यानावर उभारलेलें आहे. चंद्रशेखर व सरस्वती हीं नाटकें याच काळांतलीं. वरेरकरांच्या नाट्यवाङ्मयांतला हा पौराणिक नाटकांचा काळ म्हणतां येईल. योग्य नाटकमंडळींच्या अभावामुळें असो अगर इतर कांहीं कारणांमुळें असो, या नाटकांपैकीं फक्त कुंजविहारी लोकप्रियता संपादन करूं शकलें. ' त्यजि भक्तासाठीं लाज ' हें त्यांतील पद एके काळीं लहानथोरांच्या जिव्हाग्रावर नाचत होतें. राधाकृष्णांच्या प्रेमाचें निर्मल स्वरूप या नाटकांत रंगविण्यांत आलें आहे.

१९१६ सालीं ' हाच मुलाचा बाप ' लिहून वरेरकरांनीं आपल्या सामाजिक नाटकांना प्रारंभ केला. मोलियरची विनोदप्रधान व वास्तव नाट्यरचना या नाटकांत बऱ्याच मोठ्या प्रमाणांत आढळते. लोखंड तापलें असेल तोंपर्यंतच त्याच्यावर घाव घालणें इष्ट असतें, हें तत्त्व सामाजिक प्रश्नांच्या बाबतींत वरेरकरांच्याइतकें दुसऱ्या मराठी लेखकानें क्वचितच जाणलें असेल. १९१४ सालीं हुंड्यापायीं आपल्या बापाच्या घराची राखरांगोळी होऊं नये म्हणून स्नेहलतेनें स्वतःला जाळून घेतलें. या प्रसंगानें हुंड्याच्या प्रश्नाला मिळालेल्या चालनेचा ' हाच मुलाच्या बापां'त वरेरकरांनीं भरपूर उपयोग करून घेतला. गजाननराव वैद्यांनीं हिंदु मिशनरी सोसायटी काढतांच 'संन्याशाचा संसार' रंगभूमीवर थाटण्यांत आणि महात्मा गांधींनीं वकिली-

'सतांच ' सत्तेच्या गुलामां 'त एका वकिलाला खलपुरुष करण्यांत

त्यांनीं दाखविलेलें प्रसंगावधान त्यांच्या तीक्ष्ण व्यावहारिक दृष्टीचें द्योतक आहे. १९३२ सालीं पुढें आलेल्या ' सोन्याच्या कळसां 'तहि लोकगंगेपुढें जाऊन तिला मार्गदर्शी होण्याकरितां भगीरथ प्रयत्न करण्याची त्यांची प्रवृत्तीच दिसून येते. काळाबरोबर धांवण्याची ही शक्ति कोल्हटकर-खाडिलकरांत फारशी दिसून येत नाहीं.

१९१६ पासून १९२३ पर्यंतच्या सात वर्षांत ' हाच मुलाचा बाप ', ' संन्याशाचा संसार ' व ' सत्तेचे गुलाम ' या तीन सामाजिक नाटकांशिवाय ' लयाचा लय ' हें पौराणिक नाटकहि वरेरकरांनीं लिहिलें. कुंजविहारीप्रमाणें या नाटकाला लोकप्रियता मिळाली नसली तरी तें वाचनीय आहे, यांत शंका नाहीं. ' सत्तेच्या गुलामा'ला अभूतपूर्व यश मिळतांच वरेरकरांनीं नाट्यतंत्राचे नवीन प्रयोग करून पाहावयाला सुरुवात केली. इब्सेनप्रभृति पाश्चात्य नाटककारांच्या नाट्यरचनेचा त्यांच्या मनावर झालेला हा परिणाम असावा. एकप्रवेशी अंक व नाटकाच्या लांबीची छाटाछाट या सुधारणा 'तुरुंगाच्या दारांत,' 'करग्रहण' व 'नवा खेळ' या नाटकांत त्यांनीं करून पाहिल्या. या नाटकांना आलेल्या अपयशाचें खापर पुष्कळदां प्रेक्षकवर्गाच्या प्रगतिपराङ्मुख अभिरुचीवर फोडण्यांत येतें. तें खरें असलें तरी फारच थोड्या अंशीं. एकप्रवेशी अंक लिहूनहि रसपरिपोषक कथानक, जिव्हाळ्याचा विषय व आकर्षक स्वभावचित्रें रंगवितां येतात. पण यांपैकीं कोणताच गुण मोठ्या प्रमाणांत नसल्यामुळें हीं नाटकें प्रेक्षकांच्या डोळ्यांत भरूं शकलीं नाहींत.

१९२३ ते १९३१ या काळांतील वरेरकरांचें यशस्वी नाटक ' करीन ती पूर्व ' हेंच होय. ऐतिहासिक नाट्यक्षेत्रांत त्यांनीं टाकलेलें हें पहिलें पाऊल असूनहि तें यशस्वी झालें. त्यांतील नाटककाराच्या मतानें दासबोधाच्या वळणाची असलेली भाषा आणि शॉच्या सेंट जोनच्या पद्धतीवर लिहिलेले परिशिष्टवजा शेवटचे प्रवेश यांच्याविषयीं मतभेद होऊं शकेल. पण वरेरकरांचें नाट्यरचनेचें चातुर्य या नाटकांत चांगलेंच प्रत्ययाला येतें.

यापुढच्या कालखंडांत 'सोन्याचा कळस', 'जागती ज्योत', 'स्वयंसेवक' हीं नाटकें आणि 'नामानिराळा', 'सदा बंदिवान' वगैरे लघु नाटकें येतात. या नाटकांपैकीं सोन्याच्या कळसांत अद्‌भुतरम्यता व वास्तवता यांचें फार कृत्रिम भासणारें मिश्रण झालें असलें तरी त्यांत विपुल नाट्यगुण आहेत. जागती ज्योत लौकरच विझली. पण तिच्यांतील जागृत झालेल्या स्त्रीवर्गाचीं चित्रें वरेरकरांच्या वाङ्मयांत पदोपदीं आढळत असल्यामुळें त्याबद्दल दुःख करावयाला नको. स्वयंसेवक नाटकांत स्त्रियांच्या

गुलामगिरीच्या प्रश्नाला ऋणकोच्या गुलामगिरीची जोड त्यांनीं दिली आहे. पण हा सांधा अखंड झाला आहे, असें वाटत नाहीं.

बरेरकरांइतका प्रगमनशील नाटककार मराठींत झाला नाहीं, असें म्हटलें तरी अतिशयोक्ति होणार नाहीं. कोल्हटकरांची कला, खाडिलकरांचें रचनाचातुर्य, मोलियरपासून शॉपर्यंतच्या विविध पाश्चात्य नाटककारांचे नाट्यगुण, इत्यादि विशेष त्यांनीं आपल्या नाटकांत प्रतिबिंबित करण्याचा थोडाफार यशस्वी प्रयत्न केला. एवढेंच नव्हे, तर कालाबरोबर उत्पन्न होणारे नवेनवे प्रश्न नाट्यरूपानें मांडण्याची प्रगतिप्रियताहि दाखविली. दीनदुबळ्यांविषयीं वाटणारा जिव्हाळा आणि गांजलेल्यां-विषयीं उत्पन्न होणारा कळवळा हे त्यांच्या भावनेचे विशेष आहेत. तैलचित्र योग्य अंतरावरून पाहिलें नाहीं तर तें बेडौल दिसतें. आपल्या हक्कांविषयीं जाग्या झालेल्या स्त्रीचें चित्र रेखाटतांना बरेरकर कलादृष्ट्या आवश्यक असलेलें हें अंतर अनेकदां विसरतात. स्वातंत्र्याचा पुकारा करणाऱ्या त्यांच्या स्त्रीपात्रांचीं भाषणें जागृतावस्थेचीं द्योतक नसून स्वप्नांतली बडबड आहे कीं काय, अशीहि शंका मनाला येते. स्त्रीवर्गाच्या कैवाराकरितां ‘ डॉल्स हाउस ’ लिहिणाऱ्या इब्सेननें ‘ धि लेडी फ्रॉम् धि सी ’ ह्या नाटकाच्या द्वारें स्त्रीजीवनाची दुसरी बाजू दाखवून आपली कलापूर्णता वाचकांना पटविली. पण बरेरकरांत कलावंताच्या समतोलपणापेक्षां मतप्रचारकाचा अभिनिवेशच जास्ती ! कुठल्याहि विषयाला दुसरी बाजू असूं शकते व समुद्राच्या भरतीप्रमाणें प्रचारा-लाहि मर्यादा असूं शकतात, याची जाणीव ते सहज विसरतात. कोल्हटकर-संप्रदायाचें चिन्ह म्हणून असो अगर मागसलेल्या प्रेक्षकवर्गाची लहर सांभाळल्याशिवाय गत्यंतर नाहीं म्हणून असो, अद्‌भुतरम्यता व वास्तवता यांचें कलाहीन मिश्रण अद्यापहि त्यांच्या नाटकांत आढळतें. नुकतेंच रंगभूमीवर आलेलें त्यांचें स्वयंसेवक नाटक पाहावें. त्यांतील रघोजीला होणारा पश्चात्ताप अगर मंजुळेला नाटक संपत आल्यामुळें लाभणारें समाधान याचा वास्तवाशीं काय संबंध आहे? गडकऱ्यांच्या भावबंधनांतील घनश्याम शेवटच्या पानावर धुंडिराजाच्या दयेच्या फुंकरीनें ज्याप्रमाणें कोलमडून पडतो, तसाच रघोजी चारदोन पानांत ताळ्यावर येतो. अशा प्रकारचे अनेक दोष त्यांच्या नाट्यकृतींत असले तरी व्यापक सामाजिक प्रश्नांवर विविध व वास्तवाकडे झुकणारीं नाटकें लिहून तीं यशस्वी करण्याचें श्रेय त्यांनाच दिलें पाहिजे. कोल्हटकर-गडकऱ्यांच्या मानानें कल्पकतेचें देणें त्यांना कमीच आहे. पण त्याचा खचपा सुटसुटीत, सुबोध व चटकदार संवादांनीं त्यांनीं भरून काढला आहे. परंपरा

निर्माण करण्याचें सामर्थ्य त्यांच्या प्रतिभेंत नसलें तरी ' मराठी रंगभूमीवर बहुविध सुधारणा घडवून आणणारा नाटककार ' या दृष्टीनें त्यांचें कार्य नेहमींच महत्त्वाचें मानलें जाईल.

## गद्य विरुद्ध संगीत

किर्लोस्करांनीं नाटकाला संगीताची जोड देतांना लोकांचें मनोरंजन हा उद्देश प्रामुख्यानें डोळ्यांपुढें ठेविला होता, यांत शंका नाहीं. सौभद्रासारखें आनंदप्रधान नाटक (comedy) संगीतामुळें शोभून दिसतें हेंहि खरें! पण एकीकडे अशीं रंजनप्रधान संगीत नाटकें रंगभूमीवर येत असतांना दुसरीकडे गद्यरूपानें शेक्सपीअर-मोलियरचीं नाटकें मराठी रंगभूमीवर चमकूं लागलीं होतीं. हीं गद्य नाटकें स्वभावतःच अधिक गंभीर, मानवी जीवितांतील निकराच्या प्रसंगांचें दिग्दर्शन करणारीं व आपल्या नाट्यरसाच्या प्रवाहाबरोबर प्रेक्षकांची बुद्धि आणि भावना खेंचून नेणारीं अशीं होतीं. अशा स्थितींत संगीत रंगभूमीवर कोल्हटकरांचा उदय झाला. रहस्यमय आकर्षक संविधानक, विनोदपरिपोष, तत्त्वप्रदिपादन, इत्यादि अनेक गुणांची जोड त्यांनीं संगीत रंगभूमीला करून दिली. पण तीमुळें संगीताच्या स्वैरसंचाराला आळा बसला असें मात्र नाहीं. मतिविकारासारखीं त्यांचीं नाटकें गद्यस्वरूपांत अधिक स्वाभाविक वाटलीं असतीं, यांत शंका नाहीं. कोल्हटकरांच्याप्रमाणें याच वेळीं गद्य-रंगभूमीवर आलेल्या खाडिलकरांच्या नाटकांचेहि विविध संस्कार घेऊन गडकऱ्यांनीं आपलीं संगीत नाटकें रचलीं. गडकऱ्यांचीं सर्वच नाटकें गद्यांत विशेष खुलून दिसणारीं आहेत. पण संगीत रंगभूमीची लोकप्रियता लक्षांत आणून त्यांना सुधाकरासारख्या वकिलाला आणि वसुंधरेसारख्या विलक्षण निग्रही स्त्रीला ठिकठिकाणीं गावयाला लावणें भाग पडलें. वरेरकरांचीं नाटकें अधिक सामाजिक आणि अधिक वास्तव. त्यांनीं पूर्वींची शेंदीडशें पदांचें पीठ पाडणारी गिरणी आपल्या नाटकांना जोडली नाहीं; पण गायकी चालींच्या वीसपंचवीस पदांचें जात्यावरील दळण घातल्या-खेरीज त्यांचींहि नाटकें रंगभूमीवर उभीं राहूं शकत नाहींत. सोन्याच्या कळसांतला आरंभींचा नाट्यमय भाग व नंतर अनाथ मजूर म्हणून आलेल्या विठू कृष्णानें केलेला संगीत जलसा यांचा मेळ कसा पडायचा? एवढें चांगलें गायला येत असलेल्या मनुष्यानें गिरणींत मजूर व्हावयाला कां यावें अशी शंका बिजलीला पहिल्या प्रवेशांत आली नाहीं, हें मोटाभाईचें भाग्यच म्हणावयाचें! शाहुनगरवासी मंडळीच्या कारकीर्दींत आगरकर, रानडे, मोडक, केळकर व शिरवळकर यांच्या कृतींनीं आणि

महाराष्ट्र, भारत व चित्ताकर्षक मंडळींच्या ऐन अमदानींत खाडिलकर, खरे, केळकर, टिपणीस, औंधकर, प्रभृतींच्या नाटकांनीं गद्यरंगभूमीनें संगीताशीं यशस्वी स्पर्धा करण्याचा प्रयत्न केला. पण मोठ्या माशानें लहान माशाला खाऊन टाकावें त्याप्रमाणें संगीतानें शेवटीं गद्याचा पाडाव केला. या मोठ्या माशाला गिळण्याकरितां आज बोलपटाचा देवमासा आ वासून उभा राहिला आहे, ही गोष्ट निराळीच !

तसें पाहिलें तर संगीत व गद्य या दोन्ही एकाच नाट्यवृक्षाच्या शाखा ! पण एका शाखेला फळांचा बहर यावा आणि दुसरीवरला मोहर अकालीं जळून जावा, असा विलक्षण प्रकार मराठी रंगभूमीच्या इतिहासांत झाला आहे. पूर्वी अंगणांत उभें राहण्याचा हक्क नसलेला अस्पृश्य धर्मांतर करतांच जसा सोप्यावर येऊन बसतो, त्याप्रमाणें गद्यस्वरूपांतलीं अनेक नाटकें संगीत होतांच लोकप्रिय झालीं. पण काव्य-गायनाला भलतें महत्त्व आल्यामुळें गेल्या दशकांतील मराठी काव्याची वाढ जशी एका परीनें खुरटली त्याप्रमाणें किर्लोस्करांच्या कानडी, कोल्हटकरांच्या पार्शी-गुजराथी व खाडिलकर-वरेरकरांच्या गायकी चालींवर झुलून संगीत नाटकांकडे धांव घेण्याची प्रवृत्ति लोकांत वाढल्यामुळें मराठी नाट्यवाङ्मयाच्या विकासाला मोठाच अडथळा झाला आहे. गंभीर स्वरूपाचीं, उत्कट भावनेचीं, विचारप्रवर्तनाचीं अगर तत्त्वप्रति-पादनांचीं नाटकें गद्यरूपांतच अधिक कलायुक्त रीतीनें मांडतां येतात. इब्सेन, शॉ, गाल्सवर्दी यांच्यासारखे आधुनिक पाश्चात्य नाटककार मराठींत प्रचलित असणाऱ्या धेडगुजरी पद्धतीचीं नाटकें लिहावयाला क्षणभरहि तयार झाले नसते. सध्यांचें मराठी संगीत नाटक म्हणजे उपहारगृहांतील लोकप्रिय मिसळच. तींत कसले तुकडे सांपडतील आणि कसले नाहीं याचा नेम नाहीं. गायन, काव्य, विनोद, समाजशास्त्र इत्यादिकांच्या थोड्या थोड्या चिंध्या घेऊन शिवलेल्या या चित्रविचित्र गोधडींत एकरंगी नाजुक सुताचें दर्शन कसें होणार ? संगीत नाटक, इंग्लिश ऑपेराप्रमाणें, मुख्यतः मनोरंजक असावें. सौभद्र-संशयकल्लोळासारखीं कथानकें कलाहानि होऊं न देतां संगीत स्वरूपांत मांडतां येतील. पण मतिविकार, विद्याहरण, भावबंधन, सोन्याचा कळस अगर तोतयाचें बंड या नाटकांना संगीत करून त्यांत नाट्यकलेचा उत्कर्ष आहे असें मानणारा प्रेक्षकवर्ग आंबटशोकीच म्हटला पाहिजे. शंकराचें तांडवनृत्य व नर्तिकेचें कोमल नृत्य यांचा संकर करून कांहीं नृत्यकलेचा आनंद द्विगुणित होणार नाहीं. संगीत नाटकांनीं गद्यनाटकें मारलीं व संगीत नाटकांतील मुख्य भाग जो संगीत तो बोलपटांतून अधिक

विविधतेनें ऐकायाला मिळूं लागल्यामुळें संगीत नाटकेंहि मरणाच्या दारीं येऊन बसलीं. यापुढें मराठी नाट्यकलेला चांगल्या तऱ्हेनें जगावयाचें असल्यास संगीत व गद्य यांतील मूलभूत भेद ओळखून प्रेक्षकांच्या नाट्याभिरुचीची सर्वांगीण वाढ करण्याचा प्रयत्न तिनें केला पाहिजे. बोलपटांत जें मिळणें शक्य नाहीं तें देण्याची शक्ति असलेलीं कलासुंदर संगीत व गद्य नाटकें फारशीं रंगभूमीवर येतच नाहींत. दोन्ही स्थळें सारख्याच दर्जाचीं असल्यावर अधिक हुंड्याचा जांवई पतकरण्याचा वेडेपणा मुलीचा बाप कधींतरी करील का? आजच्या प्रेक्षकवर्गाची दृष्टिहि तशीच आहे.

## इतर नाट्यवाङ्मयाचे परिणाम

अगदीं पहिल्या मराठी नाटकांना कानडी नाटकांपासून स्फूर्ति मिळाली असली तरी वाङ्मय या दृष्टीनें त्यांचा मराठी नाट्यवाङ्मयावर कांहींच परिणाम झाला नाहीं. कालिदास-शूद्रक, शेक्सपियर-मोलियर आणि अगदीं अलीकडे इब्सेन-शॉ यांनीं मराठी नाट्यवाङ्मयाच्या प्रवाहांत थोडाफार बदल घडवून आणला यांत मात्र शंका नाहीं. ऊर्दू रंगभूमीचाहि मराठी रंगभूमीवर परिणाम झाला आहे. वरेरकरांनीं पापी पुण्य या त्रुटित नाटकाला लिहिलेल्या विस्तृत प्रस्तावनेंत परकीय नाटकांच्या मराठी नाट्यवाङ्मयावर झालेल्या विविध परिणामांची मार्मिक चर्चा केली आहे. त्यांच्या मतें कालिदास व शेक्सपियर हे कल्पनाप्रधान ( melodramatic ) म्हणजे कृत्रिम नाटकें लिहिणारे व मराठी मृच्छकटिकांत प्रतिबिंबित न झालेला शूद्रक आणि मोलियर हे वास्तवताप्रधान (realistic) म्हणजे अकृत्रिम नाटकें लिहिणारे; मराठी रंगभूमीवर मोलियरचा संप्रदाय निरनिराळ्या कारणांनीं शुद्ध स्वरूपांत राहिला नाहीं, व त्यामुळें नाट्यवाङ्मयाची प्रगति खुंटली, असा त्यांच्या विवेचनाचा निष्कर्ष आहे.

शेक्सपियरविषयीं—कदाचित् शॉचें मत शेक्सपियरच्या विरुद्ध आहे हें ऐकिवांत आल्यामुळें असो—वरेरकरांचा ग्रह फार वाईट झालेला दिसतो. “शेक्सपियरचा अवजड विलायती मुडदा” मूठमाती दिल्यामुळें आतां तिकडच्या प्रेक्षकांच्या उरावर बसत नाहीं, अशी माहितीहि त्यांनीं मिळविली आहे. बिचारा शेक्सपियर तीनशें वर्षांपूर्वींच मेला म्हणून सुटला! नाहींतर वरेरकरांनीं त्याची हजेरी घेण्याकरितां इंग्लंडवर स्वारी करण्याचा बेताहि मुक्रर केला असता! कुठल्याहि वाङ्मयाकडे आपल्या काळाच्या दृष्टीप्रमाणें ऐतिहासिक दृष्टीनेंहि पाहावें लागतें, ही गोष्ट दुर्दैवानें

वरेरकरांसारखे कुशल नाटककारहि विसरतात. शेक्सपियरचीं नाटकें कल्पनाप्रधान, अवास्तव, कृत्रिम याचा अर्थ काय ? गिरणीमालकाच्या मुलानें मजूर होऊन आपल्या भावी सासऱ्याच्या गिरणींत राहणें आणि हॅम्लेटनें आपली मनःस्थिति लपविण्याकरितां वेड्याचें सोंग घेणें, यांत पहिलीच गोष्ट अधिक अस्वाभाविक नाहीं का ? महत्त्वाकांक्षी मॅकबेथ, अहंकारी लिअर, निसर्गसुंदर मिरांडा, नाकासमोर जाणारा शूर अथेल्लो, या शेक्सपियरच्या साऱ्या भूमिका कल्पनाप्रधान म्हणजे कृत्रिम आणि वरेरकरांचा डॉक्टर पशु, गुलेलु, अगर विजली या भूमिका वास्तवताप्रधान व स्वाभाविक ठरविणारें नाट्यशास्त्र फार संकुचित ठरल्यावांचून राहणार नाहीं.

वैचित्र्यपूर्ण मानवी जीवनाकडे पाहण्याच्या दोन भिन्न दृष्टी आहेत. पहिली काव्यमय तर दुसरी विनोदप्रधान. कालिदासासारख्या सूक्ष्म सौंदर्यदृष्टि असलेल्या आणि राजदरबारीं वाढलेल्या नाटककाराचा दृष्टिकोन काव्यमय व्हावा यांत नवल कसलें ? दुष्यंताला धीरोदात्त करण्याकरितां दुर्वासाच्या शापाची योजना केल्यामुळें सबंध शाकुंतल कल्पनाप्रधान व कृत्रिम ठरतें असें थोडेंच आहे ! कण्वासारख्या प्रमुख किंवा प्रियंवदा, कण्वशिष्य अथवा कोळ्याच्या प्रवेशांतील पात्रें, असल्या दुय्यम भूमिका यांत मनुष्यस्वभावाच्या वास्तव छटा कालिदासानें किती कुशलतेनें रंगविल्या आहेत. प्रसंगांचा भडकपणा व उच्च कुळांतील स्त्रीपुरुषांच्या कृतींनीं गुंफिलेलीं कथानकें शेक्सपियरमध्यें प्रामुख्यानें आढळतात. पण त्या सर्वांच्या खालून वाहणारा स्वभावचित्रणाचा विविध प्रवाहच शेक्सपियरला अजरामर करूं शकला. शॉ व इब्सेन यांचे सामाजिक प्रश्न अगर नाट्यतंत्र शेक्सपियरमध्यें आढळत नसलें तर तो अवगुण काळाचा आहे. वरेरकरांना अगदीं वास्तव वाटणाऱ्या मोलियरचींच नाटकें पाहावींत. कालिदासासारखे कवि आपल्या डोळ्यांवरील सौंदर्याचा चष्मा दूर करूं शकत नाहींत त्याप्रमाणें मोलियर अगर त्याच्या परंपरेंतील नाटककारहि प्रत्येक गोष्टीकडे विनोदाच्या सूक्ष्मदर्शक यंत्रांतूनच पाहत असतात. काव्याप्रमाणें विनोदांतहि अतिरंजनाचा दोष लेखकाच्या हातून घडतोच. मोलियरपासून आतांपर्यंतच्या सर्व विनोदी नाटककारांत या गोष्टीचीं उदाहरणें मिळतील. वरेरकरांना प्रिय असलेल्या आधुनिक नाट्यपद्धतीचा अग्रणी इब्सेनच घ्या. 'डॉल्स हाउस'सारख्या त्याच्या जगद्विख्यात नाटकांतील नोराचा स्वभावविकास सर्वथैव वास्तव आहे काय ? नाटकाच्या आरंभीं नोराला बारा वर्षांनीं अचानक भेटावयाला येणारी तिची मैत्रीण म्हणजे कथानकाचें पूर्वसूत्र सांगण्याची एक कृत्रिम युक्ति, असेंच मार्मिक

वाचकाला वाटत नाहीं काय? या नाटकांतील सर्व अंक एकप्रवेशी असले तरी उंच जागा गांठण्याकरितां जशा पायऱ्या पायऱ्या बांधलेल्या असतात त्याप्रमाणें प्रत्येक अंकांत एकाच स्थळीं होणारे चारपांच पोट-प्रवेश त्यांत आढळत नाहींत काय? सारांश, आज सामाजिक प्रश्नांना, समाजचित्रणाला आणि नवीन नाट्य-तंत्राला कालानुसार महत्त्व आलें आहे. मागील पिढींतील कोल्हटकरांसारख्या मोलि-यरपद्धतीचीं नाटकें लिहूं शकणाऱ्या नाटककारांनींसुद्धां शेक्सपियरच्या पद्धतीचा अवलंब केला, ही गोष्ट लक्षांत घेण्याजोगी आहे. पौराणिक व ऐतिहासिक नाटकांचें महत्त्व बहुजनसमाजाच्या दृष्टीनें अद्यापि कमी झालेलें नाहीं. अशा प्रकारचीं नाटकें लिहितांना शेक्सपियरच्या पद्धतीचाच अधिक उपयोग होतो. याचा अनुभव त्याला 'अवजड मुडदा' म्हणणाऱ्या मामांना 'करीन ती पूर्व' लिहितांना आलाच आहे. मराठी नाटकांत विलक्षण कृत्रिमता आढळते ही गोष्ट खोटी नाहीं. पण त्याचें खापर कालिदास-शेक्सपियरच्या डोक्यांवर फोडण्यांत हंशील नाहीं. यापुढें मराठी नाटकें अधिक प्रमाणांत सामाजिक होतील असें अनुमान केलें तर तें फारसें चुकीचें होणार नाहीं. अशा नाटकांनीं इब्सेनसंप्रदायांतील नाट्यगुण आत्मसात् करणें अवश्य आहे. पण तेवढ्यासाठीं कालिदास-शेक्सपियर यांच्या नाट्यपंथांत व आपल्या पंथांत जमीनअस्मानाचें अंतर आहे, अशी विचित्र समजूत त्यांनीं उराशीं बाळ-गण्याचें कांहीं कारण नाहीं. एकाग्रवृत्तीच्या तत्त्वज्ञानालाहि ज्या वास्तवाचा पत्ता लागत नाहीं तें चंचल नाट्यवाङ्मयांत प्रतिबिंबित करण्याचा अट्टाहास शेवटीं विफ-लच होतो. आजच्या पिढीचें वास्तव वाङ्मय उद्यांच्या पिढीला काल्पनिक वाटावें, हें कालमाहात्म्य आहे. पण तसें वाटलें म्हणून त्यांतले नाट्यगुण कांहीं कमी होत नाहींत. सूर्योदयाची शोभा अगर देवालयाचें सुंदर शिल्प नास्तिकालासुद्धां मोहिनी घालीत नाहीं काय?

## पौराणिक नाटकें

सर्व भाषांत नाट्यकलेच्या बारशाला पुराणें हजर असलेलीं दिसून येतात. मग हिंदुस्थानसारख्या देशांत—कीं, जेथें पुराणकथांचे महासागर पसरले आहेत आणि बहुजनसमाजावर श्रद्धेचा पगडा फार मोठ्या प्रमाणांत आहे, तेथें नाट्यकलेचा आरंभींचा प्रवास पुराणांच्या सोबतीनें व्हावा यांत नवल काय? विष्णुदास भाव्यांनीं सांगलीला प्रथमतः जीं नाटकें केलीं तीं नाटककारांनीं संपूर्ण लिहिलेलीं अगर नटांनीं भाषणें पाठ केलेलीं अशीं नव्हतींच! फक्त कथेची दिशा ठाऊक असायची! मग

जशी वाट सांपडेल त्याप्रमाणें नाटकानें प्रवास करावयाचा. अशा स्वच्छंदी रचनेला पौराणिक कथा अत्यंत अनुकूल. कोंकणांतील कांहीं भागांत अश्विनी पौर्णिमेपासून चार महिने जत्रांचा हंगाम सुरू असतो. जत्रा म्हटली कीं, तेथें नाट्यप्रयोग हा आलाच. हीं नाटकें अद्यापि विष्णुदास भाव्यांच्या पद्धतीनेंच होतात! उदाहरणार्थ, कृष्णानें स्यमंतकमणि हरण केल्याची कथा घ्या. या कथेचें 'जांबुवंतीस्वयंवर' असें नामकरण झालें आणि कथानकांतील प्रसंग व त्यांचा अनुक्रम पात्रांना कळला कीं, नाट्यप्रयोगाला फारशी अडचण पडत नाहीं. वर्ष दोन वर्षें एकेक नाटक बसविणाऱ्या नाटकमंडळ्यांना या प्रसंगावधानी नटांपासून बराचसा बोध घेतां येईल! आतां जांबुवंतीस्वयंवरांत बापाच्या इच्छेविरुद्ध कृष्णाला माळ घालतांना जांबुवंती 'असे पति देवचि ललनांना' हें पद सुद्धां एखादे वेळीं म्हणून जाते, ही गोष्ट निराळी!

आयता तयार पाया मिळावा त्याप्रमाणें पौराणिक कथेचा नाटककाराला उपयोग होतो, ही गोष्ट तर खरीच! त्याशिवायहि पौराणिक कथांच्या आकर्षणाचें दुसरें एक कारण आहे. विविधरसपूर्ण, अद्भुतरम्य व उत्कट प्रसंग सध्यांच्या साध्यासुध्या सामाजिक जीवनांत कोठून आढळणार? एखाद्या मुलीवर आपलें प्रेम जडलें आहे म्हणून तिच्या घरीं वेषांतर करून राहणाऱ्या नायकाला खऱ्याखुऱ्या समाजांत निराळ्या अर्थानेंच चतुर्भुज होण्याची पाळी येईल! पण हाच प्रसंग सौभद्र नाटकाचा पाया नाहीं का? हरिश्चंद्राचें औदार्य, रामचंद्राचा त्याग, प्रमिलेचा पुरुषद्वेष, कृष्णार्जुनांचा प्रतिज्ञापालनाचा हट्ट, इत्यादि गोष्टी समाजांत भव्य स्वरूपांत आढळणें कठिणच. ही उत्कट भव्यतेची पार्श्वभूमि लाभल्यामुळेंच सामान्य प्रेक्षकांवर पौराणिक नाटकांचा पगडा सहज बसूं शकतो.

किर्लोस्करांच्या सौभद्रापासून अरुणोदय नाटकमंडळीच्या सैरंध्रीपर्यंत बरींवाईट शेंकडों पौराणिक नाटकें आतांपर्यंत मराठी रंगभूमीवर आलीं. मोरोपंतांनीं रामायण-महाभारत जसें काव्यरूपानें लिहिलें त्याप्रमाणें तीं महाकाव्यें नाट्यरूपानेंहि चित्रित करण्याचा प्रयत्न करणारे लेखक झाले. मोर नाचतो म्हणून लांडोरीनें नाचूं नये हा अनुभव अशा लेखकांच्या प्रतिभाहीनतेमुळें आला हा भाग निराळा! किर्लोस्करांनीं कथानकाच्या रसवत्तेकडे लक्ष देऊन पौराणिक नाटकें लिहिलीं. खाडिलकरांनीं त्या रसवत्तेला तत्त्वप्रतिपादनाची जोड दिली. बायकांचें बंड, कीचकवध, विद्याहरण इत्यादि त्यांच्या नाटकांत या दोहोंचा मधुर संगम झाला आहे.

द्रौपदीपासून मात्र त्यांच्या लेखणींतील रस आटल्यामुळें जिकडे तिकडे तत्त्वाचेच खडक दिसूं लागले. सध्यां मराठींत पौराणिक नाटकें लिहिलीं जातात, तीं सामान्यतः खाडिलकरांच्या पद्धतीचीं. 'तत्त्वमसि'पेक्षां ज्याला दुसरें तत्त्व ठाऊक नाहीं, असा नाटककारदेखील पौराणिक कथानकांतून समाजाला संदेश सांगत सुटतो! पौराणिक कथानकाची रचना ध्वनिदर्शक करणें व प्रेक्षक आणि पात्रें यांच्यामधील काळाचें अंतर तोडून सद्यःस्थितीवर प्रकाश पाडणें हीं येरागबाळांचीं कामें नव्हेत. पण खाडिलकरांच्या पद्धतीचा पगडा जबरदस्त बसल्यामुळें किर्लोस्करांच्या रसोत्कर्ष-कारक मार्गाचा पौराणिक नाटककारांकडून बहुधा अवलंब केला जात नाहीं. दीक्षितांसारख्या नाटककारांनीं तोंडीस तोड म्हणून खाडिलकरांच्या पौराणिक नाटकांच्या जोडीनें आपलीं नाटकें रंगभूमीवर आणलीं. पण केवळ पिवळ्या रंगा-मुळें पिठल्याला कोणी श्रीखंड मानीत नाहीं. दीक्षितांच्या कलेच्या कल्पना इतक्या विलक्षण कीं 'रुक्मिणीस्वयंवर' या नाटकांत ताशेवाजंत्र्यांच्यामागून जाणाऱ्या लग्नांतील मंडळीचें दर्शनहि त्यांनीं प्रेक्षकांना करविलें आहे. पुराणकथांतील स्वभाव-वैचित्र्याचा, उत्कटतेचा अगर कार्यकारणभावांनीं बांधलेल्या प्रसंगांचा फायदा न घेतां असंभाव्य चमत्कारांवर प्रेक्षकांना झुलविणारे पौराणिक नाटककारहि पुष्कळ झाले आहेत. खाडिलकर अगदीं नाइलाज असेल तेव्हांच चमत्काराचा आश्रय करतात. उच्च कलेनें तो तसा न करणें श्रेयस्कर. सत्त्वपरीक्षेत शंकरानें प्रगट होऊन तारामतीचा वध करण्याला उद्युक्त झालेल्या हरिश्चंद्राचा हात धरण्यापेक्षां पश्चात्तप्त विश्वामित्रानेंच तो धरणें अधिक श्रेयस्कर होणार नाहीं काय?

कथांची निवड करण्याच्या दृष्टीनेंहि नाट्यलेखकांच्या अभ्यासाचा अभाव फार जाणवतो. एकट्या सावित्रीला व अर्थातच तिच्या बरोबर यमालाहि किती तरी नाटककारांनीं आतांपर्यंत रंगभूमीवर खेंचलें आहे. द्रौपदीवस्त्रहरणावरहि आमच्या नाटककारांचें जबरदस्त प्रेम दिसतें. गरीब बिचारा हरिश्चंद्र! त्यालाहि दर पांच दहा वर्षांनीं एखादा नाटककार पुन्हां राज्यदान करावयाला लावतो! तींच तींच पौरा-णिक कथानकें घेण्यापेक्षां उपेक्षित अगर दुर्लक्षित अशीं नवीं कथानकें घेणें कला-विलासाच्या दृष्टीनें निःसंशय श्रेयस्कर होईल. पुराणांचा अभ्यास करून शॉप्रमाणें Back to Methuselah सारखें नाटक कोणी मराठी नाटककार लिहील अशी अपेक्षा आज तरी करतां येत नाहीं. पण ऋग्वेदापासून भागवतापर्यंत जें वैदिक व पौराणिक कथावाङ्मय आहे तें कलावंत नाटककाराला विविध रसमय कृतींना

आवश्यक असलेलें साहित्य निःसंशय पुरवूं शकेल. किर्लोस्कर-खाडिलकरांखेरीज नांव घेण्यासारखीं थोडीं पौराणिक नाटकें अनेकांनीं लिहिलीं आहेत; नाहीं असें नाहीं. केळकरांच्या कृष्णार्जुनयुद्धांत तत्त्व व विनोद यांचा सुंदर मेळ पडला आहे, तर टेंब्यांच्या पटवर्धनांत कथेंतून ध्वनित केलेलें रूपक नावीन्यपूर्ण आहे. टिपणीसांच्या मत्स्यगंधेपासून वेडेकरांच्या ब्रह्मकुमारीपर्यंत एखादें दुसरें वाचनीय पौराणिक नाटक लिहिणारे लेखक दहा पंधरा तरी झाले. अगदीं अलीकडील नाटककारांत शुक्लांनीं बरींच पौराणिक नाटकें लिहिलीं आहेत. अभिमन्यु, प्रल्हाद, ध्रुव वगैरे बालवीरांकडेच त्यांचा ओढा दिसून येतो. सामान्य प्रेक्षकांना आकृष्ट करण्याच्या दृष्टीनें त्यांचीं नाटकें यशस्वी असलीं तरी वाङ्मय व कला या दृष्टींनीं त्यांना विशेष बरचें स्थान मिळणें शक्य नाहीं. विनोदा-करितां पौराणिक कथानक धुंडाळण्याचीहि प्रवृत्ति क्वचित् दिसून येते. कमत-नूरकरांनीं 'स्त्री-पुरुषां'त नारदाला लेकुरवाळी बाई करून जो अलभ्य लाभ करून दिला आहे तो पुष्कळांना परिचित असेलच. पुराणांतरींचें विनोदी कथानक निव-डतांना व मांडतांना कलादृष्टि अधिकच सूक्ष्म व्हावयाला हवी ! नाहीं तर एखाद्या नाटककाराला खालील कथानक घेण्याचीहि स्फूर्ति व्हावयाची ! "यादवांनीं सांबाला-स्त्रीचें रूप देऊन एका ऋषीच्या दर्शनाला नेलें. त्या ऋषीनें अंतर्ज्ञानानें सत्य गोष्ट जाणली आणि या गरोदर स्त्रीला काय होईल या प्रश्नाला 'मुसळ' असें उत्तर दिलें. पुढें सांबाला मुसळ झालें व त्यानेंच यादवांचा संहार केला." संख्येच्या मानानें चांगलीं पौराणिक नाटकें कमी असलीं तरी चंद्रहास, कुंजविहारी, पहिला पांडव, वीरविडंबन, महारथी कर्ण, सुंदोपसुंद, ब्रह्मकुमारी इत्यादि या विभागांतील इतर नाटकें कोणालाहि वाचनीय वाटतील.

संतचरित्रावरील नाटकें वास्तविक ऐतिहासिक, पण तीं अद्भुत चमत्कारांचा आश्रय करीत असल्यामुळें त्यांची गणना पौराणिकांतच करणें योग्य होईल. ग्यानबा तुकाराम म्हणजे जिव्हाळा हा सिद्धांत खरा असल्यामुळें असो अगर दुबळ्या हिंदु मनाला अजून अंधश्रद्धेच्या भुतानें सोडलें नाहीं म्हणून असो, संतमंडळींना अद्या-पिहि रंगभूमीवर मागणी आहे. शाहूनगरवासीच्या गद्यरंगभूमीवर तुकाराम-राम-दासादि सर्व संत आपलें जागृतीचें कार्य करून गेले. पण तेवढ्यानें समाधान न झाल्यामुळेंच कीं काय ते गात गात राजापूरकर नाटकमंडळीच्या रंगभूमीवर अव-तीर्ण झाले. मिराबाई एका मंडळींत जन्माला येऊन दोन तीन वर्षें झालीं नाहींत

तींच दुसऱ्या मंडळींत तिनें पुन्हां अवतार घेतला. राजापूरकर मंडळीची कलादृष्टि तिच्या दराच्या प्रमाणांतच होती असें म्हटलें तर अगदीं अलीकडे सर्वांत भारी दर असलेल्या गंधर्व नाटकमंडळीच्या रंगभूमीवर कान्होपात्राचें भजन व मिराबाईचें गायन सुरू झालें. मागणी तसा पुरवठा, या न्यायानें कदाचित् अशा नाटकांचें समर्थन होऊं शकेल. पण या सर्व नाटकांत नाट्यगुणांनीं संपन्न असें नाटक विरळाच सांपडेल ! तुकाराम, संत सखुबाई, तुलसीदास, इत्यादि या वर्गांतील नाटकें वाचनीय आहेत.

## ऐतिहासिक नाटकें

ऐतिहासिक नाटकें म्हणजे पौराणिक व सामाजिक नाटकांना सांधणारा दुवाच म्हणावयाचा. पौराणिक कथानकांतील अद्‌भुत चमत्कार ऐतिहासिक कथानकांत दिसणें शक्य नाहीं. पण भव्यता, उद्दीपकता, वैचित्र्य व उत्कटता ह्या दृष्टींनीं तीं पौराणिक कथानकांची बरोबरी करूं शकतात. ध्रुव आणि प्रल्हाद यांच्या सहाय्याकरितां धांवून येणारा परमेश्वर ऐतिहासिक नाटकांत प्रगट होत नाहीं. पण या बालवीरांच्याइतकेंच धैर्य राजपुत्राची जागा घेऊन त्याच्याकरितां बळी जाणारा पन्नादाईचा मुलगा दाखवूं शकतो. पुराणांतरींच्या पतिव्रता व भाऊसाहेबांच्या दर्शनाकरितां डोळ्यांत प्राण आणून बसलेली पार्वतीबाई यांच्यांतहि असेंच साम्य नाहीं काय ? या सर्व कारणांमुळें सर्व देशांतील नाट्यवाङ्मयांत पौराणिक कथांच्या पाठोपाठ ऐतिहासिक कथा चमकूं लागतात. आपल्याकडेहि असेंच झालें. गद्यरंगभूमीवर शेक्सपियरचीं ऐतिहासिक नाटकें कथानकाच्या परकीयत्वामुळें येऊं शकलीं नाहींत. पण त्यांचा नाट्यलेखकांवर परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. यांतच राष्ट्रीय सभेच्या स्थापनेमुळें उत्पन्न झालेल्या आकांक्षा, उज्ज्वल पूर्वकालाची आठवण देण्याकरितां पुढाऱ्यांनीं सुरू केलेले शिवजयंतीसारखे उत्सव, इत्यादिकांची भर पडली. संगीत रंगभूमीवर सुभद्रेचें मोडलेलें लग्न जुळत असतांना गद्यरंगभूमीवर नारायणरावाच्या मृत्यूचा फार्स साजरा केला जात होता. टिपूसुल्तान, अफझुलखान वगैरे मंडळीहि याच वेळीं रंगभूमीवर येऊन गेली. शाहूनगरवासीच्या रंगभूमीवर उभा राहून स्वर्गाचीं कपाटें फोडणारा राणा भीमदेव हा मूळचा परदेशी ! पण त्या वेळच्या देशाभिमानानें भरलेल्या वातावरणाचा परिणाम होऊन त्या नाटकाला ऐतिहासिक स्वरूप प्राप्त झालें. गुणोत्कर्ष, बाजीराव आणि मस्तानी, पानपतचा मुकाबला,

बाजी देशपांडे, नरवीर मालुसरे, पानपतचा मोबदला, हीं त्या काळांतील प्रमुख ऐतिहासिक नाटकें होत.

किर्लोस्करांच्या पूर्वीच्या नाटक मंडळ्यांनीं जशीं बहुतेक महत्वाचीं पौराणिक कथानकें हाताळलीं होतीं तशींच गद्यनाटकमंडळ्यांनींहि अनेक महत्त्वाच्या ऐतिहासिक प्रसंगांवर लिहिलेलीं नाटकें रंगभूमीवर आणलीं. पण कला व वाङ्मय या दृष्टींनीं त्यांपैकीं बहुतेक सामान्य आहेत. रजपुतांनीं भगवान् एकलिंगजीचें नांव घेऊन मुसलमानांविरुद्ध अकांडतांडव करावयाचें अगर शिवकालीन मावळ्यांनीं हरहर महादेव करून अविंधांचा सूड उगवायचा ही काय ती अशा नाटकांतील मध्यवर्ती कल्पना. खाडिलकरांसारख्या कलावंत नाटककाराच्या 'कांचनगडची मोहना' या पहिल्या कृतींत स्वाभिमानाची ज्योत चेतविण्याचा हाच प्रकार दृष्टीस पडतो. 'सवाई माधवरावांचा मृत्यु' व 'भाऊबंदकी' हीं त्यांचीं नाटकें मात्र वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

पण एखाद्या नदीला दोन मुखें असलीं तरी त्यांतील एक अतिशय मोठें असावें तशी खाडिलकरांच्या पौराणिक नाटकांची स्थिति आहे. भाऊबंदकी-नंतर त्यांनीं खरेंखुरें असें ऐतिहासिक नाटक लिहिलेंच नाहीं. मात्र त्यानंतर चार पांच वर्षांतच खरे व केळकर ही गुरुशिष्यांची ( शाळेंतील शिक्षणाच्या दृष्टीनें ) जोडी रंगभूमीवर झळकूं लागली. 'तोतयाचें बंड', 'चंद्रगुप्त' व 'अमात्यमाधव' या केळकरांच्या तीन ऐतिहासिक नाटकांपैकीं शेवटच्या दोन्हींना इंग्रजी कादंबऱ्यांचा आधार आहे. 'अमात्य-माधवां'त ऐतिहासिक वातावरण व स्वभावचित्रण यांच्यापेक्षां चमत्कृतिजनक प्रसंगच अधिक आहेत. चंद्रगुप्तांत या सर्वांचा सुंदर मेळ पडला आहे; पण त्यांतहि इतिहासापेक्षां कल्पनारम्यताच अधिक आकर्षक वाटते. 'तोतयाचें बंड', त्यांतील कथानक पेशवाई-तील असल्यामुळें असेल, चंद्रगुप्तापेक्षांहि रंगभूमीवर अधिक यशस्वी होऊं शकलें. पहिल्या अपत्याची अपूर्वाई व्यवहारांत पाठचीं भावंडें अनेकदां नाहींशी करतात. तोतयाच्या बंडाच्या बाबतींत मात्र तसा प्रकार झाला नाहीं. केळकरांचें नाट्यचातुर्य, भाषाविलास आणि विनोदकौशल्य यांचा त्रिवेणीसंगम या नाटकांत झाला आहे. खऱ्यांचीं नाटकें वातावरणाच्या दृष्टीनें ऐतिहासिक आहेत; पण त्यांचीं कथानकें प्राय: काल्पनिकच असतात. ऐन पंचविशींत लिहिलेल्या गुणोत्कर्षानंतर पन्नाशीच्या घरांत आल्यावर त्यांनीं पुन्हां नाट्यलेखनाकरितां लेखणी हातांत धरली आणि

'तारा-मंडळ', 'चित्रवंचना', 'कृष्णकांचन', 'शिवसंभव', 'उग्रमंगल' व 'देशकंटक' हीं नाटकें लिहिलीं. यांपैकीं शुद्ध ऐतिहासिक असें फक्त शिवसंभवच आहे. ऐतिहासिक वातावरण निर्माण करण्याचा या नाटकांतील त्यांचा प्रयत्न यशस्वी झाला आहे. बाकीच्या नाटकांचीं कथानकें इतिहासांत इतस्तत: आढळ-णाऱ्या प्रसंगांनीं सजविलेलीं असलीं तरी तीं कल्पनारम्यच वाटतात. मात्र या कल्पनारम्यतेंत कोल्हटकरांच्या पद्धतीची कथानकाची गुंफण, भाषेचा विलास अगर स्वभावांची निर्मिति नाहीं. नाट्यदृष्टीनें शास्त्रीबोवांच्यापुढें संस्कृत नाटकांचेच आदर्श असावेत. रंगभूमीवर त्यांचीं नाटकें सामान्यतः यशस्वीच झालीं. पण वैशिष्ट्याच्या अभावीं नाट्यवाङ्मयाला वळण लावण्याचें सामर्थ्य त्यांच्यामध्यें कधींच आलें नाहीं.

यानंतरचे प्रमुख ऐतिहासिक नाटककार य. ना. टिपणीस व औंधकर हे होत. टिपणिसांचें चंद्रग्रहण अंतराळांत डौलानें चमकणाऱ्या आकाशदिव्याप्रमाणें आहे. त्यांत वाङ्मयविलासाच्या ताऱ्याचें तेज नसलें तरी रंगभूमीची मधुर आकर्षकता भरपूर आहे. शहाशिवाजी, शिक्काकट्यार, शिवाजीला शह, हीं त्यांचीं पुढील नाटकें कालमानाप्रमाणें संगीत झालीं. शिवाजीला लिहितां येत होतें कीं नाहीं याबद्दल अगदीं अलीकडेपर्यंत इतिहाससंशोधकांत वाद चालत असत; पण आमच्या रंगभूमीवरील शिवाजी गायनकलेंतहि पारंगत असतो. जणूं कांहीं त्याचे दादोजी कोंडदेव म्हणजे एखादे खांसाहेबच असावेत! ऐतिहासिक नाटकांतील धामधुमीला व भूमिकांच्या स्वभावाला संगीत विसंगत असल्यामुळें टिपणिसांचीं हीं नाटकें विशेष उच्च दर्जाचीं वाटत नाहींत. त्यांचा विनोद यथातथाच असतो. कथानकाची गुंतागुंत उलगडण्याच्या त्यांच्या युक्त्याहि पोरकटपणाच्या वाटतात. पण जनसमूहाच्या दृष्टीनें नाटक कसें लिहावें ही कला त्यांना अवगत आहे, यांत संशय नाहीं. औंधकरांना बेबंदशाही लिहितांना राजसंन्यासाचा कित्ता उपयोगी पडला असला तरी त्यांचें स्वतःचें नाट्यचातुर्य अव्वल दर्जाचें आहे, यांत शंका नाहीं. प्रेक्षकांना उत्कट भावनांच्या लाटांवर हेलकावे खात ठेवण्याच्या दृष्टीनें बेबंदशाही नाटक अत्यंत यशस्वी झालें आहे. 'आग्र्याहून सुटका' तितकें सरस वाटत नाहीं. तरी या दोन्ही नाटकांत उत्कट प्रसंगांची गुंफण, विरोधी स्वभावांचें चित्रण व अनुकूल भाषेची घडण या गोष्टी आढळतात. नुक्तेंच रंगभूमीवर आलेलें 'उमाजी नाईक' हि उल्लेखनीय आहे.

ऐतिहासिक कथानक संगीत नाटकांत मांडणें म्हणजे तारेवरील कसरतच. गद्यनाटकमंडळ्यांना हा काळ प्रतिकूल असल्यामुळें ऐतिहासिक नाटकांची निपज एकंदरींत कमीच होत आहे. शॉच्या सेंट जोनप्रमाणें ऐतिहासिक कथानकाच्या पार्श्वभूमीवर तत्त्वमूर्तीचें चित्र काढणारा कलावंत लेखक महाराष्ट्रांत अजून निर्माण झाला नाहीं. या विभागांत किरात, अच्युतराव कोल्हटकर, दीक्षित, सारोळकर, सावरकर प्रभृतींनीं भर घातली आहे. पण फुलें थोडीं व पाल्वी फार, अशीच या विभागाची स्थिति आहे.

## कल्पनारम्य ( romantic ) नाटकें

पौराणिक व ऐतिहासिक नाटकांत कथानकाचीं बंधनें फार. त्यामुळें स्वैर संचार करणाऱ्या नाट्यप्रतिभेची कुचंबणा झाल्यावांचून राहत नाहीं. अशा वेळीं ती रम्य व स्वतंत्र कथानकांचा आश्रय करते. मराठी गद्यरंगभूमीवर आरंभीं आरंभीं मंजुघोषेसारख्या अद्भुत कादंबऱ्या नाट्यरूपानें चमकल्या याचें कारण हेंच. शेक्सपियर-मोलियरच्या नाटकांमुळें मिळालेली स्फूर्तिहि कल्पनारम्य नाटकांच्या रचनेला अनुकूल होती. अशा तऱ्हेचीं वाङ्मयदृष्ट्या उच्च दर्जाचीं नाटकें प्रथमतः श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनींच लिहिलीं. किर्लोस्कर मंडळीच्या रंगभूमीवर वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष व प्रेमशोधन गाजत असतांना नाट्यकलाप्रवर्तक संगीत मंडळीच्या रंगभूमीवर शेक्सपियरचीं त्याच पद्धतीचीं सुखान्त नाटकें लोकप्रियता मिळवीत होतीं हीहि गोष्ट लक्षांत घेण्याजोगी आहे. चमत्कृतिजनक कथानक, मार्मिक विनोद, सुंदर संभाषणें इत्यादि गुणांमुळें कोल्हटकरांच्या या नाटकांना वैशिष्ट्य प्राप्त झालें. खाडिलकरांचें मानापमान, गडकऱ्यांचें पुण्यप्रभाव हीं नाटकेंहि याच परंपरेंतलीं. खरेशास्त्र्यांच्या कथानकांचा सांगाडा ऐतिहासिक स्वरूपाचा भासत असला तरी तत्त्वदृष्ट्या तीं याच वर्गांत मोडतील. पण अशा प्रकारच्या नाटकांना लागणारी कल्पनारम्यता खरेशास्त्र्यांत विपुल प्रमाणांत आढळत नाहीं.

वीर वामनराव जोशी यांचीं 'राक्षसी महत्त्वाकांक्षा', 'रणदुंदुभि' व 'धर्मसिंहासन' हीं तीन्ही नाटकें कल्पनारम्यच! मात्र या सर्वांवर कर्त्यांच्या जळजळीत देशाभिमानाची दाट छाया पडलेली असल्यामुळें तीं निराळ्या पद्धतीचीं वाटतात. या तिन्ही नाटकांचें तुलनात्मक दृष्टीनें निरीक्षण केल्यास वीर वामनरावांनीं एक ठराविक सांचा केला आहे असें दिसून येईल. देशभक्त व देशद्रोही स्त्रीपुरुषांच्या जोड्या आणि त्यांच्यामधील झगडा रंगविण्याचा त्यांचा मार्ग धोपट आहे. राक्षसी महत्त्वाकांक्षा नाटक जवळजवळ

होत तर्प रंगभूमीवर टिकून राहिलें आहे. पण त्याचें मुख्य कारण त्यांतील राक्षसी कृत्यें व गोड चालींवरील गाणीं हेंच होत. चालू पिढीच्या प्रेक्षकांना तर हें नाटक म्हणजे कलाशून्य नाट्यकृतीचा नमुना आहे असें वाटल्यास त्यांत नवल नाहीं. अंग थरारून सोडणारे प्रसंग, देशाभिमानाच्या भावनेला चेतवणारी भाषा, आणि रंगभूमीचें मार्मिक ज्ञान यांमुळें वीर वामनरावांचीं पहिलीं तीन नाटकें रंगभूमीवर यशस्वी झालीं. पण मराठी नाट्यवाङ्मयांत त्यांचें स्थान विशेष महत्त्वाचें नाहीं.

सामाजिक नाटकें लिहिण्याची प्रथा जसजशी अधिक रूढ झाली तसतशी कल्पनारम्य नाटकें मागें पडूं लागलीं. तथापि सामाजिक नाटकांच्या मर्यादित क्षेत्रांत न बसणाऱ्या अनेक भव्य व सुंदर कल्पना असतात. त्या व्यक्त करण्याकरितां कल्पनारम्य नाटकेंच अधिक उपयोगी पडतात. गडकरी उदयाला आल्यानंतरच्या काळांत अशीं जीं नाटकें झालीं त्यांत माझी बहीण, अरुणोदय, संन्यस्तखड्ग, विधिलिखित वगैरे कृती येतात. त्यांपैकीं कांहीं बऱ्या असल्या तरी संख्या व गुण या दोन्ही दृष्टींनीं या विभागाला ओहोटी लागली आहे यांत संशय नाहीं.

वाङ्मयदृष्ट्या उच्च दर्जाचीं असलेलीं नाटकें खालच्या दर्जाच्या प्रेक्षकांचें समाधान करूं शकत नाहींत. त्यामुळें अशा प्रेक्षकांचें रंजन करणारे नाटककार दर पिढीला हवेच असतात. यांपैकीं ज्यांनीं मराठी रंगभूमि गाजविली असे लेखक म्हणजे माधवराव पाटणकर, नेवाळकर प्रभृति होत. सत्यविजय, विक्रमशशिकला वगैरे पाटणकर मंडळीचीं नाटकें लौकिक दंतकथांवर उभारलीं असलीं तरी कल्पनारम्यच म्हणतां येतील. मात्र त्यांच्या रचनेंत कल्पकतेपेक्षां ओबडधोबडपणा व सौंदर्यापेक्षां प्रेक्षकांच्या हीन भावनांना आनंद देण्याची इच्छा अधिक स्पष्ट दिसून येते. नेवाळकरांचें मनोविजय हें रूपकात्मक नाटक कल्पनेच्या दृष्टीनें चांगलें साधलें आहे. तथापि त्यांतील कांहीं प्रसंग व कांहीं ठिकाणची भाषा अधिक नाजुक कलमानें लिहिणें आवश्यक होतें. मनोहर स्त्री संगीत मंडळी, नाट्यकलाप्रसारक नाटकमंडळी, इत्यादि मंडळींच्या रंगभूमीवर अनेक कल्पनारम्य नाटकें आलीं व गेलीं; पण कला व वाङ्मय या दोन्ही दृष्टींनीं त्यांचा दर्जा विशेष उच्च नाहीं. त्यांतलीं कित्येक तर छापखान्यापर्यंतहि पोंचलीं नाहींत.

पाश्चात्य नाट्यवाङ्मयाकडे पाहिल्यास कल्पनारम्य नाटकांचा काल मागें पडलेला दिसतो. सूर्योदयानंतर नक्षत्रमंडित रजनीचें दृश्य जसें नाहींसें होतें त्याप्रमाणें विषय व रस या दोन्ही दृष्टींनीं विविध असलेल्या सामाजिक नाटकांनीं कल्पनारम्य

नाटकांना पाश्चात्य रंगभूमीवरून हुसकून लावलें आहे. आपल्याकडे तशी स्थिति येण्याला अद्याप अवकाश आहे, सामाजिक नाटकांच्या मानानें कल्पनारम्य नाटक कृत्रिम वाटतें हें खरें, पण कल्पकता, काव्यात्मता, भव्यता व तत्त्वप्रतिपादन इत्यादिकांच्या दृष्टींनीं त्याचा उपयोग कुशल लेखकाला निःसंशय करून घेतां येईल. गतवर्षींच रंगभूमीवर आलेलें तक्षशिला हें इब्सेनच्या सुंदर नाटकाचें रूपांतर व्हावें तितकें लोकप्रिय होऊं शकलें नाहीं. कायम ठशाच्या काव्यहीन पौराणिक नाटकांना प्रेक्षकवर्ग मिळावा आणि नावीन्यपूर्ण, कल्पनारम्य नाटकांना तो लाभूं नये ही गोष्ट कांहीं रसिकतेची द्योतक नाहीं. बोलपटांशीं टक्कर मारून मराठी नाट्यकलेला जिवंत रहावयाचें असेल तर कल्पनारम्य नाटकांकडे तिनें सध्यांपेक्षां अधिक लक्ष दिलें पाहिजे.

## सामाजिक नाटकें

संस्कृत नाटकांच्या परंपरेंतून पौराणिक नाटकें व शेक्सपियर-मोलियरपासून मिळालेल्या स्फूर्तीमुळें कल्पनारम्य नाटकें मराठी रंगभूमीवर रूढ झालीं. हवा थंड झाली कीं वाफेचें रूपांतर जसें दंवबिंदूंत होतें त्याप्रमाणें कल्पनारम्य वातावरणांत विहार करणारी प्रतिभा सभोंवतालच्या परिस्थितीशीं समरस होऊं लागली कीं सामाजिक नाटकें जन्माला येतात. नाटक हें लोकजागृतीचें अमोघ साधन असल्यामुळें त्याचा शक्य तितका उपयोग करून घेण्याचाहि मतप्रचारक प्रयत्न करतात. अशा प्रयत्नांत कलेचा भाग असतोच असा मात्र नियम नाहीं. मराठी रंगभूमीवर पौराणिक व कल्पनारम्य नाटकांचा ज्या वेळीं उदय होत होता त्या वेळींच मराठी समाजांत सामाजिक सुधारणेविषयीं दोन तट पडले होते. ह्या दोन्ही पक्षांमधील विचारयुद्धाचे प्रतिध्वनि सौभाग्यरमा, जरठोद्वाह, संमति कायद्याचें नाटक, शीघ्रसुधारणा-दुष्परिणाम, तरुणीशिक्षण, मोर एल्. एल्. बी. प्रहसन, इत्यादि १८८० ते १९०० या काळांत निर्माण झालेल्या नाटकांत ऐकूं येतात. सुधारणावादी नाटककारांचा सर्व भर पुनर्विवाहाचा पुरस्कार व बालावृद्धविवाहाचा निषेध यांवरच होता. सुधारणाविरोधी लेखक स्त्रीशिक्षण, सुशिक्षित पुरुषवर्ग व संकल्पित सामाजिक सुधारणा इत्यादिकांचें विडंबन करण्यांत आपलें सर्व कौशल्य खर्च करीत. पण देवलांच्या शारदेपूर्वी झालेल्या अशा नाटकांत वाङ्मयदृष्ट्या अमर अशी एकहि कृति नाहीं.

देवलांनीं एकच सामाजिक नाटक लिहिलें. त्याचा विषय सर्वांना सहज पटण्यासारखा होता. सुबोध मांडणी व नाट्यरचनेचें कौशल्य यांमुळें मराठी नाट्य-

वाङ्मयाच्या इतिहासांत शारदेचें स्थान अढळ आहे. कोल्हटकरांच्या सामाजिक नाटकांपैकीं बहुतेकांत स्त्रीपुरुषांतील प्रेम, समता व स्वातंत्र्य यांचा पुरस्कार केलेला असून त्यांपैकीं मतिविकार व जन्मरहस्य हीं नाटकें मराठी भाषेला भूषणभूत होतील, अशींच आहेत. प्रेमसंन्यास व भावबंधन यांतहि गडकऱ्यांनीं सामान्यतः याच सुधारणांची आवश्यकता प्रतिपादन केली असून वाङ्मयिक गुणांमुळें त्यांचें महत्व चिरकाल टिकेल. वरेरकरांच्या सामाजिक नाटकांना हुंड्यासारख्या पांढरपेशा वर्गांतील विषयांनीं प्रारंभ झाला तरी पतितपरावर्तन व मजूरभांडवलवाल्यांचा लढा, अशा व्यापक सामाजिक प्रश्नांना हात घालण्यापर्यंत त्यांनीं प्रगति केली आहे.

कालाबरोबर सामाजिक प्रश्नहि बदलत जातात. यामुळें समाजाला नित्य नवीं कोडीं सोडविण्याचा प्रसंग येतो. आमच्या नाट्यलेखकांना भोंवतालचे विविध सामाजिक प्रश्न नाजुक कुंचल्यानें चित्रित करतां येतात, असें म्हणतां येत नाहीं. दारू, जुगार वगैरे सर्वसामान्य व्यसनें अगर पुनर्विवाह, सावत्र आईचा छळ इत्यादि जुने विषय त्यांनीं पुनःपुन्हां हाताळले आहेत. जुगारी जग, श्री, सौभाग्यलक्ष्मी, माईसाहेब इत्यादि नाटकांवरून हें सहज लक्षांत येईल. अशा नाटकांपेक्षां नाटककारांचें कौशल्य अधिक व्यक्त करणारीं अलिकडील सामाजिक नाटकें सरलादेवी व आंधळ्यांची शाळा हीं होत. दोहींतहि वैवाहिक नीतीचे प्रचलित नियम कितपत योग्य आहेत, याचा भावनापूर्ण कथानकाच्या व सूक्ष्म स्वभावचित्रणाच्या द्वारें विचार केला आहे. या नाटकांचें स्वरूप कौटुंबिक असलें तरी सुधारकांची केवळ तात्त्विक दृष्टीनें विचार करणारी पिढी आतां मागें पडली असून नवीनच उपस्थित झालेल्या प्रश्नांचा आजच्या दृष्टीनें विचार करणारे लेखक पुढें येत आहेत, हें यावरून स्पष्ट दिसतें. सरलादेवी हें नाटक आंधळ्यांच्या शाळेप्रमाणें रंगभूमीवर गाजूं शकलें नाहीं. तथापि मराठी सामाजिक नाटकांत त्याचा दर्जा उच्च आहे. फडक्यांचीं युगांतर व संजीवन, कमतनूरकरांचें सज्जन वगैरे नाटकें बाह्यतः सामाजिक दिसलीं तरी त्यांत बोंचक सामाजिक प्रश्नांचें वैशिष्ट्य नाहीं, सर्वसामान्य मानवी जीवनाचें चित्रण आहे. त्यामुळें त्यांचें कल्पनारम्य नाटकांत रूपांतर करणें फारसें कठीण जाणार नाहीं. नाट्यदृष्ट्या संजीवन युगांतरापेक्षां बरें साधलें आहे.

सुधारणाविरोधी लेखकांचीं नाटकें १९०० नंतरच्या कालांतहि रंगभूमीवर येत होतींच. कोल्हटकरांच्या मतिविकाराला टक्कर देण्याकरितां निर्माण झालेला नेवाळकरांचा दंडधारी पंचवीस वर्षांपूर्वी चांगलाच लोकप्रिय होता. कृष्णाजी हरि दीक्षित

हेहि सुधारणाविरोधी नाटककारांपैकीं एक प्रमुख होत. अठरा वर्षांपूर्वी त्यांनीं समाजसुधारणेवर ' सुदर्शन ' सोडलें. या गोष्टीला दीड तप होऊन गेलें, तरी अजूनहि ते तीन कलमी ठरावाचा ' इषारा ' प्रेक्षकांना देत आहेत ! त्यांचें ' सुदर्शन ' दुर्दर्शन होतें व ' इषाऱ्या ' ची टिमकी ' आंधळ्याच्या शाळे 'च्या नगाऱ्यांत लोकांना ऐकूंहि गेली नाहीं ही गोष्ट निराळी ! समाजशास्त्राचा अभ्यास, मानवी स्वभावाचें खोल ज्ञान आणि सूक्ष्म कलादृष्टि यांच्या संगमांतून सुधारणाविरोधी नाटक उत्पन्न झालें तर तें सुधारकांनाहि विचार करण्यास लावील. पण दीक्षितांचीं व त्यांच्यासारख्या लेखकांचीं नाटकें उथळ व कलाहीन असल्यामुळें त्यांचा समाजावर कोणताच परिणाम होऊं शकला नाहीं.

म्युनिसिपालिटीकर्ते माधवराव जोशी यांचा पंथ तिसराच आहे. सुशिक्षित स्त्रिया, कॉलेजचे विद्यार्थी, प्रचलित प्रेमकल्पना इत्यादिकांचें विडंबनच त्यांच्या नाटकांत प्रामुख्यानें आढळतें व त्यामुळें सुधारणाविरोधी वर्गांत त्यांचें नांव घालण्याचा मोह उत्पन्न होतो. पण जोशांचा एकंदर थाट वैशिष्ट्यपूर्ण आहे. वरेरकरांनीं थोड्याफार गंभीर स्वरूपांत सामाजिक विषयांचें क्षेत्र जसें विस्तृत केलें त्याप्रमाणें विडंबनरूपांत माधवरावांनींहि तें वाढविलें. म्युनिसिपालटी नाटक हें त्याचें चांगलें उदाहरण आहे. समाजावरील टीका हा माधवरावांच्या नाटकांचा विषय मानतां येईल. मग त्या टीकेच्या विषय वशीकरणाचा दांडू असो वा कॉलेजविद्यार्थ्यांचा व्हॅलेट सेफ्टी रेझर असो !

कल्पनाविलासाच्या जोडीला समाजाचें निरीक्षण व त्याच्या सर्वांगीण सुखदुःखांची कल्पना असल्याखेरीज विविध सामाजिक नाटकें निर्माण होऊं शकत नाहींत. नाटकाचा विषय पतितपरावर्तन असो वा मजूरभांडवलवाल्यांचा लढा असो, प्रेमकथेचें अस्तर जोडल्याखेरीज आमची सामाजिक नाट्यकथा रंगभूमीच्या अंगाला बसूंच शकत नाहीं. तींच गाल्सवर्दीचें ' सिल्व्हर बॉक्स ' व इब्सेनचें ' एनिमी ऑफ दि पीपल् ' हीं नाटकें पाहावींत. प्रेमकथेचा काडीमात्र पाठिंबा नसतांना त्यांचीं कथानकें आकर्षक व तत्त्वप्रतिपादन हृदयस्पर्शी वाटतें. अशा व्यापक भूमिकेवरून लिहिलेलीं उच्च दर्जाचीं सामाजिक नाटकें अजून झालेलीं नसलीं तरी त्यांचा काळ कांहीं दूर नाहीं असें वाटतें.

## भाषांतरें व रूपांतरें

संस्कृत नाटकांपैकीं बहुतेकांचीं संगीत रूपांतरें १८८० ते १९०० च्या दरम्यान् मराठी रंगभूमीवर आलीं. त्यांपैकीं शाकुंतल लोकांच्या स्मरणांत असून

मृच्छकटिक अद्यापिहि प्रेक्षकांना नाट्यगृहाकडे आकर्षून नेत आहे. संस्कृत नाटकानंतर शेक्सपियर-मोलियरचीं रूपांतरें प्रथम गद्य व नंतर संगीत रंगभूमीवर चमकलीं. महाजनि, शंकर मोरो रानडे, आगरकर, केळकर इत्यादि विद्वानांचा या कामीं हातभार लागल्यामुळें हीं रूपांतरें अगदीं निर्दोष नसलीं तरी वाचनीय ठरलीं. रानड्यांचें नाट्यकथार्णव मासिक तर अशाच रूपांतरांना वाहिलेलें होतें. कोल्हटकर-खाडिलकरांच्या उदयानंतर स्वतंत्र नाटकांचा मनु मराठींत सुरू झाला. ज्याला चालतां येतें त्यानें कुबडीचा आधार घेऊं नये, हें खरें आहे. पण गेल्या पंचवीसतीस वर्षांत स्वतंत्र नाट्यलेखनामुळें मराठी लेखकांचें उत्तमोत्तम पाश्चात्य कृतींचें रूपांतर करण्याकडे दुर्लक्षच झालें. कित्येक लेखकांची प्रतिभा लतिकेसारखी असते. वृक्षाच्या आश्रयानेंच तिची शोभा वाढते. पण ती स्वतंत्र विहार करूं लागली तर मातीमोल झाल्याशिवाय राहत नाहीं. संशयकल्लोळ, वार्ताविहार इत्यादि लोकप्रिय नाटकें आधाररचितच आहेत, ही गोष्ट स्वतंत्र लिहिण्याचें कंकण हातांत बांधून नीरस नाट्यवाङ्मय प्रसवणारे लोक अजिबात विसरून जातात. उच्च दर्जाच्या नाट्यकृतींचीं रूपांतरें करून घेऊन तीं छापण्याकडे मराठी नियतकालिकांचें लक्ष नाहीं. या सर्वांचा परिणाम नाट्यवाङ्मयाच्या अंगणांत भरपूर गवत वाढण्यांत झाला आहे. फुलें येणारी वेल त्यांत क्वचितच आढळते. अशा वेली—त्या विलायती असल्या तरी—आपल्या अंगणांत आणून लावणें नाट्यवाङ्मयाच्या दृष्टीनें हितकारक नाहीं काय ? व्यायामशाळेंत होतकरू विद्यार्थ्यांपुढें आदर्श म्हणून पीळदार शरीरांचीं छायाचित्रें जशीं लावलीं जातात त्याप्रमाणें इब्सेन, शॉ, गाल्सवर्दीप्रभृति युरोपियन नाटककारांचीं नाटकें मराठी नाट्यमंदिरांत असणें आवश्यक आहे. प्रेक्षकवर्गाची अभिरुचि व्यापक व सुसंस्कृत करण्याला अशा रूपांतरांची निःसंशय मदत होईल. मात्र कीर्तीपेक्षां हौसेनें प्रेरित झालेले लोकच हें काम करूं शकतील.

## नाटिका

नाटिकांचें नांव अलीकडेच विशेष कानांवर पडत असलें तरी छोटीं नाटकें मराठी रंगभूमीच्या बाल्यावस्थेंत सुद्धां लिहिलीं गेलेलीं आढळतात. त्यांपैकीं बरींचशीं सामान्य होतीं. जोंपर्यंत प्रेक्षक रात्रभर जागून आपल्या तिकिटांचे पैसे वसूल करण्यांत आनंद मानीत होते तोंपर्यंत नाटकें लहान करण्याकडे नाटककारांचें लक्ष जाणें शक्यच नव्हतें. कोल्हटकरांच्या नाटकांतील भरपूर गद्य व शेंकड्यावर असलेलीं पदें, या गोष्टीची साक्ष देतील. शहरांतील यांत्रिक राहणी, दिडाला नाटक बंद करण्याचा

कायदा, आर्थिक हलाखी, चित्रपटांची स्पर्धा इत्यादिकांमुळें लघुनाटकांचा जन्म होणें स्वाभाविक होतें. गद्रे, वरेरकर, बेंडे आणि अनेक होतकरू व हौशी लेखक यांनीं नाटिकेच्या वाहत्या गंगेंत आपले हात धुवून घेतले. पण ध्येय, धंदा व कला या तीन्ही दृष्टींनीं अजून हा संप्रदाय बाल्यावस्थेंत आहे, असेंच म्हटलें पाहिजे. आमच्या नाटिकांत धड मोठ्या नाटकाचा कलाविकास नसतो अगर युरोपियन एकांकी नाटकांतील सूचकता व सफाईहि नसते. बेबीसारखी नाटिका विशिष्ट विषयामुळें लोकप्रिय झाली तरी नाट्यदृष्ट्या ती सामान्यच ठरेल. विषय, पात्रें, मांडणी इत्यादि नाटिकेचीं सर्व अंगें नाटकांहून भिन्न असणें आवश्यक आहे. त्या दृष्टीनें आजच्या नाटिकाकारांनीं फारसा विचार केला आहे, असें म्हणवत नाहीं. लघुकथा म्हणजे जसा कादंबरीचा सारांश होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें नाटिका हें कांहीं बेतास बात केलेलें नाटक होणार नाहीं. बोलपटाशीं टक्कर मारण्याच्या कामीं नाट्यकलेला नाटिकांचा बराच उपयोग होण्यासारखा आहे. पण नाटिकालेखन ही कलेची गोष्ट आहे, हें विसरून चालणार नाहीं. 'अरुणोदय' संगीत मंडळी अल्प दरांत नाटिका दाखवून प्रेक्षकांची करमणूक करीत असते. केवळ करमणुकीच्या दृष्टीनें यांत कांहीं गैर नाहीं. पण सदरहू मंडळीला आपल्या नाटिका छापण्याची तादृश गरज भासत नाहीं, यांतील मर्म सहज समजण्याजोगें आहे. इंग्लिशमधील एकांकी नाटकें ( One Act Plays ) वाचलीं कीं, लघुनाटकांतहि रचनाकौशल्याला व रसोत्पादनाला अवकाश असतो याची खात्री पटते. विषय, कथानकाची मांडणी, रचनापद्धति इत्यादि सर्व अंगें वैशिष्ट्यपूर्ण असलीं तर नाटिका निःसंशय नाटका-इतकीच लोकप्रिय होईल. पण एखाद्या लहान पोराच्या कोटाचे हात कापून त्याला मोठ्या माणसाच्या जाकिटाचें स्वरूप देण्याचा प्रयत्न करावा अशापैकीं लघुनाटक-लेखनाचा प्रकार जोंपर्यंत चालत राहील तोंपर्यंत त्याचें महत्त्व रसिकांना पटणार नाहीं.

## इतिहासाची शिकवण

नाट्यकलेचे मूलभूत नियम सर्व प्रकारच्या नाटकांना लागत असले तरी विषय, मांडणी, रस इत्यादिकांना अनुसरून नाटकांचे निरनिराळे वर्ग पडतात. सुखान्त व दुःखान्त असें हें वर्गीकरण करण्याचा सामान्य प्रघात आहे. पण त्यांत फारसा मार्मिकपणा नाहीं. गेल्या साठ वर्षांतील मराठी नाटकांच्या वाढी-कडे पाहिलें तर स्वतंत्र आनंदप्रधान नाटकांना (comedy) सौभद्रानें सुरुवात

केली असें दिसून येईल. अशा नाटकाचें कथानक बरेंचसें खेळकर असतें. आयुष्यांतील आणीबाणीचे प्रसंग अथवा भावनांच्या भोंवऱ्यांत सांपडलेल्या स्त्रीपुरुषांचें चित्रण हा त्यांचा विषयच होऊं शकत नाहीं. नाटक सुखान्त असावें, या संस्कृत नाट्यशास्त्रांतील नियमाचें पालनहि आनंदप्रधान नाटकांच्या हातून सहजासहजीं होतें. यामुळें या नाटकांची परंपरा यशस्वी व अखंडित आहे. मूकनायक, मानापमान, भावबंधन, सत्तेचे गुलाम, विचित्र लीला वगैरे नाटकें याच सदरांत पडतात. आनंदप्रधान नाटकांतला गंभीर भाग काढून टाकून खेळकरपणाला त्यांत पूर्ण वाव दिला कीं, नाटक हास्यप्रधान (light comedy) होतें. वेड्यांचा बाजार, सहचारिणी, खडाष्टक, माधवराव जोशांचीं बहुतेक नाटकें, साष्टांग नमस्कार, पंतांची सून वगैरे मंडळी या वर्गांतील होत. पण कलेच्या दृष्टीनें संशयकल्लोळाइतकें सरस नाटक यांपैकीं एकहि नाहीं. कथानक, विषय, प्रसंग, भाषा या सर्वांतून खेळकरपणाचें सूत्र संयमनानें व कुशलतेनें खेळविणें वाटतें तितकें सोपें नाहीं. त्यामुळेंच She Stoops to Conquer अगर School for Scandal यांच्या दर्जाचें स्वतंत्र हास्यप्रधान नाटक मराठींत सहसा आढळत नाहीं.

आनंदप्रधान नाटकांत क्रूर खलपुरुष अगर विलक्षण प्रसंग घालून त्याला कल्पनारम्यता व कृत्रिम आकर्षकता आणण्याचा मोह नाट्यलेखकांना सहसा आवरतां येत नाहीं. गुप्तमंजूष, पुण्यप्रभाव, स्वयंसेवक इत्यादि नाटकें या पद्धतीचीं होत. मानवी स्वभावावर खोल प्रकाश पाडण्याऐवजीं अद्भुत घटना, चमत्कृतिपूर्ण प्रसंग आणि योगायोग यांवरच या नाटकांची चित्ताकर्षकता अवलंबून असते. नाटकांतील कृति व पात्रांचे स्वभाव यांचा सहजसुंदर मेळ घालण्याचा प्रयत्न करण्याऐवजीं अशा नाटकांत संकटें भडक रीतीनें निर्माण करून तीं आकस्मिक रीतीनें निवारलीं जातात. अशा कृत्रिम नाटकांना (melodrama) भाळणारा असंस्कृत प्रेक्षकवर्ग आपल्याकडे मोठ्या प्रमाणांत आढळतो. त्यामुळें नाट्यवाङ्मयांत सामान्य लेखकाकडून जी भर पडते ती असल्याच नाटकांची.

हा कृत्रिमपणाचा खडक टाकून अधिक खोल जाणाऱ्या नाटककाराला गंभीर स्वरूपाची (serious drama) रचना करतां येते. प्रेमशोधन, कीचकवध, एकच प्याला वगैरे नाटकें या वर्गांत मोडतात. यांतील एकच प्याला करुणरम्य असलें तरी करुणोदात्त (tragedy) नाटकांत त्याची गणना करणें कठिण आहे. आकाशांतील चंद्र खालीं कोसळून पडावा त्याप्रमाणें एखाद्या श्रेष्ठ व्यक्तीचा

अधःपात भव्य, परिणामकारक व हृदयस्पर्शी रीतीनें ज्या वेळीं रंगविला जातो त्याच वेळीं करुणोदात्त कृति निर्माण होते. त्या दृष्टीनें एकच प्याल्यापेक्षां विद्याहरणाचाच अंतर्भाव अशा प्रकारच्या कृतींत होईल.

सामाजिक नाटकांतून करुणोदात्त कृतींची भव्यता दिग्दर्शित करणें एकंदरींत कठिणच. त्यामुळें सामाजिक नाटकें मुख्यतः आनंदप्रधान, हास्यप्रधान अगर करुणगंभीर होतात. हाच मुलाचा बाप हें आनंदप्रधान नाटकाचें व शारदा, मतिविकार, संन्याशाचा संसार इत्यादि गंभीर स्वरूपाच्या नाटकाचीं उदाहरणें होत. हास्यप्रधान नाटकांतहि शं. प. जोशी अतिशयोक्तीचा तर माधवराव जोशी उपरोधाचा व विडंबनाचा विशेष उपयोग करतात. कृत्रिमपणाचें ( melodrama ) गालबोट यांपैकीं बहुतेक नाटकांना लागलेलें दिसून येईल.

सामाजिक नाटक म्हणजे बोलून चालून समाजावरील टीका. टीकादृष्टि काव्यकल्पनेच्या भव्य भरारीला फारशी पोषक नसते. यामुळें मानवी जीवनांतील उत्कटतेचे क्षण, उदात्त भावना व त्यांना अनुरूप अशी अर्थगर्भ भाषा प्रचलित सामाजिक नाटकांत आढळणें शक्य नसतें. शॉच्या ' सेंट जोन ' सारखें एखादेंच नाटक असें आढळेल कीं ज्यांत समाजटीकेची सूक्ष्मता व काव्याची उदात्तता यांचें संमेलन झालें आहे. सामाजिक नाटकांतील काव्यहीन रूक्ष वातावरणाला कंटाळूनच यीट्स्, सिंज, चेकाव्ह वगैरे पाश्चात्य नाटककारांनीं काव्यमयतेचा पुरस्कार करणारीं नाटकें लिहिलीं आहेत. रवींद्रांची Sacrifice, The King and the Queen इत्यादि नाटकें व कर्ण-कुंती आणि कच-देवयानी इत्यादि नाट्यसंवाद, काव्यमय वातावरणाचा प्रभाव किती असतो, हें सिद्ध करूं शकतील. कोल्हटकर-गडकऱ्यांच्या मागाहून मराठी नाटकांत आधींच कमी प्रमाणांत असलेल्या काव्यमयतेला ओहोटी लागली आहे असें म्हणावयाला हरकत नाहीं.

रसदृष्ट्या पाहिलें तर सौभद्रापासून सोन्याच्या कळसापर्यंत शृंगाराचेंच राज्य दिसून येतें. नाटकांतील विषय कोणताहि असो, तो संगीतांत तळला आणि शृंगारांत घोळला म्हणजे गोड होतो अशीच अजून आमची समजूत आहे. इतरांपेक्षां अधिक वास्तव असणारीं वरेरकरांचीं नाटकेंसुद्धां या शृंगारप्रवणतेला अपवाद नाहींत. Strife मध्यें गाल्सवर्दीनें प्रणयाला कोपऱ्यांत उभें राहायलाहि जागा दिली नाहीं. रॉबर्टसची बायको व अँथोनीची मुलगी या स्त्रीपात्रांचा उपयोग मजूरभांडवलवाल्यांचा परस्पर विनाशी झगडा तीव्र करून दाखविण्यांतच त्यानें

केला आहे. पण वरेरकरांच्या मोठ्याभाई हेलेशीं वाङ्निश्चय करून मजुरांची स्थिति पाहण्याकरितां जो गिरणींत जातो तो तडक बिजलीवर प्रेम करूं लागतो. स्वयं-सेवक नाटकांतहि हाच दोष आढळतो. गाल्सवर्दीच्या जस्टिसशीं तुलना केली असतां स्वयंसेवकांतील प्रणयकथेची अनावश्यकता दिसून येईल.

प्रणयकथात्मक नाटकें लिहिलीं जाऊं नयेत असा याचा अर्थ नव्हे. पण प्रतिपाद्य विषय व कायम ठशाची प्रणयकथा हीं समरस करणें सोपें नाहीं. नाटकांतील रसोत्कर्षाला आवश्यक असणारी भावना जेव्हां स्वभावचित्रें, कथानक व विषय यांच्यांतून निर्माण होते तेव्हांच ती परिणाम करूं शकते. इब्सेनच्या डॉल्स हाउस, वाइल्ड डक्, एनिमी ऑफ दि पीपल्, पिलर्स ऑफ सोसायटी, घोस्ट्स, इत्यादि नाटकांत आढळून येणारी सूचक कला, सामाजिक अन्यायांवरील तीव्र टीका व मनुष्यस्वभावांची विविधता ह्या गोष्टी गुळगुळीत प्रणयकथांतून निर्माण झालेल्या नाहींत, हें भावी मराठी नाट्यवाङ्मयाला तरी विसरून चालणार नाहीं.

शृंगाराच्याखालोखाल करुण व हास्य या दोन रसांचा उपयोग केलेला आढळतो. देवल, कोल्हटकर, खाडिलकर, गडकरी प्रभृतींच्या कुशलतेमुळें मराठी नाट्यवाङ्मयांतील करुणरस विविधतेनें नटला आहे. पण हास्यरसाची मात्र व्हावी तितकी प्रगति झाली नाहीं. खादाड भिक्षुकांऐवजीं वेडसर कवींचीं पात्रें घालून आणि ठराविक चाकोरींतून जाणाऱ्या कोटया करून मराठी रंगभूमीवर गेलीं अनेक वर्षें हास्यरस पिकविला जात आहे. पण नाजुकपणा, विविधता व समाजटीका या तीन्ही दृष्टींनीं त्याची वाढ थोडीशी खुरटलेलीच आहे.

वीररसाची गोष्ट तर बोलायलाच नको. खाडिलकरांचीं थोडीं नाटकें व जोशी-सावरकरांचे कांहीं प्रसंग सोडून दिल्यास मराठी नाट्यवाङ्मयांत वीररस औषधालाहि मिळणें कठिण आहे. सामाजिक नाटकांतून प्रसंगोपात्त पिस्तुलें वापरलीं जात असलीं तरी त्यांचा उपयोग नायकापेक्षां खलनायकच अधिक करतात. स्वभावाची उदात्तता व त्याग हीं वीररसपरिपोषकच असतात. पण या वृत्तींचें स्वतंत्र सामाजिक कथानकांत कौशल्यपूर्वक पोषण केलेलें क्वचितच आढळतें.

## नवें नाट्यतंत्र

किर्लोस्कर देवलांची रचना सामान्यतः संस्कृत नाटकांच्या पद्धतीवर होती. कोल्हटकर-खाडिलकरांनीं मोलियर-शेक्सपियरच्या नाट्यगुणांचें कलम या झाडावर

केलें, वैचित्र्य व विभ्रम या दोन्ही दृष्टींनीं हा प्रयोग यशस्वी झाला, असें म्हणावयाला हरकत नाहीं. पण त्यामुळेंच विचित्रलीलेंतील विचित्राच्या पोषाखाप्रमाणें मराठी नाटकांचें स्वरूप भेंडगुजरी झालें. नाट्यविलासाच्या दृष्टीनें गद्यानें हातपाय पसरले; पण संगीतानें कांहीं आपले हातपाय आंखडून घेतले नाहींत. विनोदाची इष्ट परंपरा सुरू झाली; पण स्थळकाळ न बघतां बडबडणाऱ्या वेड्याप्रमाणें त्याचा उपयोग होऊं लागला. एका रंजकतेच्या पायीं कृत्रिमपणा, संयम व सौंदर्यदृष्टि यांचा अभाव इत्यादि दोष मराठी नाटकांत शिरले. आधुनिक युरोपियन नाटकांचा परिचय, प्रगतीची आकांक्षा, सामाजिक नाटकांची वाढती लोकप्रियता इत्यादिकांमुळें हे दोष दूर करण्याचे प्रयत्न अलीकडे होऊं लागले आहेत. वरेरकरांचीं नाटकें, नाट्यमन्वंतर-सारख्या मंडळ्या इत्यादि गोष्टी म्हणजे या प्रयत्नाचे प्रत्यक्ष पुरावेच होत.

आपल्याकडे येऊं घातलेल्या या नव्या नाट्यतंत्राचा पहिला पुरस्कर्ता प्रख्यात युरोपियन नाटककार इब्सेन हा होय. जीवनांतील कूट प्रश्न—मग ते नैतिक, सामाजिक, राजकीय, कोणत्याहि प्रकारचे असोत—हेच नाटकाचे विषय केल्यामुळें इब्सेनला त्यांना अनुरूप असेंच तंत्र निर्माण करावें लागलें. त्याचे संवाद अर्थगर्भ व सूचक पण अत्यंत स्वाभाविक असतात. व्यवहारांत वेड्या माणसांखेरीज स्वगत भाषण कोण करीत राहणार ? अर्थातच इब्सेननें आपल्या सामाजिक नाटकांत स्वगत भाषणांवर कडक बहिष्कार घातला. त्याचें कथानकहि खून अगर रक्तपात असल्या बाह्य भडक प्रसंगांपेक्षां अंतरंगांतल्या अगर समाजांतल्या झगड्यानेंच रंगत जातें. नाटकांतील परिसीमेचा प्रसंग उत्कट करण्यांतहि त्याचा हातखंडा आहे. नाटकांतल्या दुष्ट पात्रांना मारून मुटकून सज्जन करून नाटक आनंदपर्यवसायि करण्याची कलाहीन पद्धत त्याच्या नाटकांत कोठेंच आढळायची नाहीं. स्थलकालांच्या स्वाभाविक ऐक्याचा भंग होऊं द्यायचा नाहीं असें ठरविलें कीं, एकप्रवेशी अंक लिहिणें ओघानेंच प्राप्त होतें. हे व अशाच प्रकारचे नाट्यनियम नवीन नाट्यतंत्रांत आढळतात. पण नियमांचें केवढेंहि महत्त्व असलें तरी नियम म्हणजे निर्जीव सांगाडा ! एखाद्या सुरूप स्त्रीच्या निष्प्राण देहाला तितकें रूप नसलेल्या जिवंत स्त्रीची सर कधीं तरी येईल काय ? आपल्याकडे इब्सेनप्रभृति नाटककारांचें जें थोडेंसें अनुकरण होत आहे, तेंहि अजून फारसें मार्मिक नाहीं. सौंदर्यसंवर्धक रचनेंत ( form ) डोळसपणानें त्याचें अनुकरण करणें केव्हांहि इष्ट होईल. पण जिव्हाळा ( sincerity ) व व्यापक विचारसरणी यांच्या अभावीं नुसती रचना कोणत्याहि नाटकाला अढळपद देऊं शकणार नाहीं.

## उपसंहार

कोटि, विनोद, काव्य, भावनाविलास, स्वभावचित्रण, अद्भुतरम्यता, वास्तवता, रचनाकौशल्य, मानवी मनांचे विविध खेळ नाजुकपणानें चित्रित करण्याची शक्ति, नाट्यदृष्ट्या परिणामकारक प्रसंग सुंदर रीतीनें गुंफण्याची हातोटी, एक ना दोन जितके कलागुण नाट्यलेखकाच्या अंगीं असतील तितके इष्टच आहेत. ते संपादन करण्याला लेखकानें निसर्गदत्त प्रतिभेला परिश्रमांची जोड दिली पाहिजे. पण लेखकाचे हे परिश्रम सफळ होण्याला प्रेक्षकवर्गहि तसाच तयार व्हावयाला हवा. संस्कृत नाटकांचे सारविचार मराठींत सांगणाऱ्या टीकांपासून वरेरकरांच्या स्वयंसेवकावरील टीकांपर्यंतचें सर्व टीकावाङ्मय एकत्रित केलें तरी तें फार थोडें भरेल. आतांपर्यंत मराठींत १२०० पेक्षां अधिक नाटकें झालीं असतील. पण शास्त्रशुद्ध व विचारप्रवर्तक असे नाट्यटीकाग्रंथ हाताच्या बोटावर मोजण्याइतके तरी सांपडतील कीं नाहीं, याची शंकाच आहे. नाट्यविषयक माहितीला गेल्या दहा पंधरा वर्षांत अनेक नियतकालिकांतून नियमितपणें स्थान मिळत आहे. पण प्रेक्षकवर्गाची अभिरुचि सुसंस्कृत करण्याकडे असल्या मजकुराचा तिळभरसुद्धां उपयोग होत नसेल. रंगभूमीचा रागरंग लिहावयाचा खरा ! पण तो अशा बेतानें कीं, नाटकमंडळ्यांना राग न येतां परस्परांच्या मैत्रीला रंग भरावा ! असल्या गुळमट गोष्टींनीं सामान्य वाचकांची अभिरुचि अगर मंडळ्यांची कला कशी सुधारणार ? हिंवताप घालवायचा म्हणजे त्याला लिमलेटच्या गोळ्या देऊन भागत नाहीं, तेथें कोयनेलच पाहिजे.

श्री. कृ. कोल्हटकरांची तोतयाच्या बंडावरील विस्तृत टीका, किर्लोस्कर, देवल, खाडिलकर प्रभृति नाटककारांवरील टीकात्मक प्रबंध इत्यादि उपयुक्त नाट्यटीकावाङ्मय अलीकडे उपलब्ध झालें आहे, हें खरें. पण मधाच्या बोटानें कुणाची भूक आतांपर्यंत भागली आहे का ? इतर व्यवहाराप्रमाणें वाङ्मयांतहि उमेदवारी असते. या उमेदवारीच्या कालांत हौसेनें टीका लिहिण्याचे परिश्रम होतकरू नाटककारांनीं घेतले तर ते त्यांच्या स्वतःच्या लेखनालाहि उपकारक होऊं शकतात. हें ह्यांच्या उदाहरणावरून दिसून येईल, पण 'व्यक्तित्व' प्रगट करण्याच्या या धांदलीच्या काळांत असल्या गोष्टी कोण लक्षांत घेणार ?

उच्च दर्जाचें नाट्यटीकावाङ्मय आधींच अल्प. त्यांत कितीतरी चांगले लेख मासिकांतल्या मासिकांत पडून राहिले असतील ! त्यांचा पुस्तकरूपानें पुनर्जन्म होणें अशक्यच ! टीकेप्रमाणें रूपांतराकडे वळण्याची प्रवृत्तिहि कमी झाली

आहे. शंकर मोरो रानडे, वासुदेव बाळकृष्ण केळकर प्रभृति कुशल लेखकांनीं रूपांतरें करण्यांत कमीपणा मानला नाहीं. त्यामुळें त्या काळीं शेक्सपियरसारख्या विदेशी नाटककारांच्या कृतींचा परिचय सामान्य लोकांना सुद्धां झाला. पण पूर्वीपेक्षां प्रसिद्धीचीं साधनें व लेखकांची संख्या या दोन्ही गोष्टी वाढल्या असूनहि आधुनिक युरोपियन नाट्यवाङ्मयाचा निव्वळ मराठी वाचकांना मुळींच परिचय नाहीं.

किर्लोस्करांपासून गडकऱ्यांपर्यंत मराठी नाटकांतील गद्य भरदार होत गेलें. मात्र पानांच्या गजबजाटांत फुलें दिसूं नयेत त्याप्रमाणें गडकऱ्यांच्या भाषाबडंबरामध्यें नाट्यपरिपोष करूं शकणाऱ्या काव्यकल्पनांची थोडी फार गळचेपीच झाली. आतां या अतिरेकाला आळा पडला आहे. शिवाय जे पाश्चात्य नाटककार आदर्श म्हणून सध्यां पुढें ठेविले जात आहेत ते सामाजिक विषयांवर लिहिणारे व बहुधा संयमाचें व्रत पाळणारे. यामुळें काव्याच्या बुरख्याखालीं नाट्याचें सौंदर्य लोपून जाण्याची भीति सध्यां तरी मराठी नाटकांत नाहीं. मात्र एका गोष्टीविषयीं नाट्यलेखकांनीं दक्षता बाळगणें जरूर आहे. साधेपणाकडे झुकतां झुकतां नाट्यवाङ्मयाची काव्याशीं फारकत होऊं लागली तर तो अतिरेकहि कलादृष्ट्या त्याज्यच ठरेल. इब्सेन-गाल्सवर्दीच्या बाह्यतः साध्या दिसणाऱ्या भाषेला विषयांची भव्यता व उत्कटता आणि स्वभावचित्रांचें सजीव सौंदर्य यांची जोड मिळालेली आहे. पण हे गुण आपल्या कृतींत न उतरवितां त्यांच्या साध्या भाषेची नुसती नक्कल केली तर ती कलात्मक ठरण्यापेक्षां हास्यापदच व्हायची! नाटक हें दृश्य काव्य आहे, या सूत्रांतील ‘ दृश्य ’ शब्द जसा डोळ्याआड होऊं देणें योग्य नाहीं, त्याप्रमाणें ‘काव्य’ शब्दाकडेहि डोळेझांक होऊं नये.

चालींच्या दृष्टीनें किर्लोस्करांपासून संगीतांत अनेक स्थित्यंतरें झालीं. पूर्वींची लावणीची लोकप्रियता आतां गझलाला मिळाली आहे. पण गायनकलेचा प्रश्न सोडून दिला तरी भावपोषक गीतें या दृष्टीनें संगीताकडे दुर्लक्ष करून कसें चालेल? किर्लोस्कर-देवलांच्या प्रासादिक पद्यांचें सौंदर्य अगर कोल्हटकरांच्या कल्पकतापूर्ण पदांतील माधुर्य सध्यां तरी सोन्याहून महाग होऊन बसलें आहे. नाटककार हा पद्यरूपी मोटारचा ड्रायव्हर. चाल देणारे गायक हे पोलिस शिपाई. जेवढ्या शब्दांचें व मात्रांचें ‘ लायसेन ’ असेल तेवढ्या भरल्या कीं ड्रायव्हर व पोलिस दोघेहि आपल्या कर्तव्यांतून मोकळे होतात. मग आंत बसलेल्या उतारूंचे काय हाल होतात अगर रस्त्यानें जाणाऱ्या प्रवाशांना किती धूळ खावी लागते याची पर्वा कोण

करितो ? संगीतप्रधान नाटकांची ( opera ) प्रथा पडल्याखेरीज मराठी नाटकांतील पदांना बरे दिवस येतील असें वाटत नाहीं. वामनराव जोशी-टेंबे-गुर्जर-शुक्ल प्रभृति कांहीं नाटककारांचीं पदें इतरांपेक्षां सरस वठलीं आहेत. पण ती साहारांतील हिरवळच म्हणावयाची ! 'नाट्यमन्वंतर' नें केलेला भावगीतांचा उपक्रम नावीन्य या दृष्टीनें चांगला आहे. पण दुधाची तहान ताकानें भागणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें नुसत्या भावगीतांनीं संगीताची उणीव भरून निघणार नाहीं. शिवाय कुठलीं तरी भावगीतें कुठल्या तरी कथानकाला चिकटविण्याच्या रूढींत याचें रूपांतर होण्याची भीति फार ! असल्या वटपिप्पल-न्यायानें घालावयाच्या भावगीतांपेक्षां लहान लहान मधुर पदेंच संगीतात्मक वातावरण अधिक प्रमाणांत निर्माण करूं शकतील.

पौराणिक व ऐतिहासिक कथा विशिष्ट तऱ्हेचा बोध बहुधा देत असतातच. सामाजिक कथानकाची स्फूर्ति ही, एखाद्या विषयाविषयीं विचारांचें काहूर मनांत उठल्याखेरीज सहसा होत नाहीं. बहुतेक सर्व फळांत लहानमोठ्या बिया असतात; पण काबुली द्राक्षांत त्या नसतात. त्याप्रमाणें सामान्यतः नाटक सहेतुक असलें तरी तें निर्हेतुक असतां कामा नये, असा निर्बंध कोणीच घालणार नाहीं. पण नाटकांत हेतु असला तरी तो कलावगुंठित असावा. त्याचें स्वरूप तत्त्वप्रतिपादनाचें हवें. कायदेमंडळाचे उमेदवार निवडणुकीच्या वेळीं जीं भाषणें करतात तशी नाट्यविषयाची चर्चा वाटूं नये. कलाहीनतेमुळें मतप्रचारक नाटकांची आयुर्मर्यादा वाढत नाहीं. सावरकरांचें ' उःशाप ' नाटक हें याचें उत्तम उदाहरण आहे. संभाव्यता, सुसंगतता, रमणीयता, केंद्रीभूत आकर्षकता या चौरंगावर नाट्यदीप ठेविला तरच त्याचा प्रकाश दूरवर पडूं शकेल. इब्सेन जेवढा समाजसुधारक तेवढाच कलावंतहि होता. 'Wild Duck' सारखें त्याचें नाटक नाट्यकलेचा सुंदर नमुनाच म्हणतां येईल. त्यांत नांवापासून सूचक सौंदर्य भरलेलें आहे. जों जों नाटक वाचत जावें तों तों ही सूचक रमणीयता वाढतच जाते. घे एखादा प्रचलित विषय, पकड एक प्रेमी जोडपें आणि घाल त्या दोघांची कशीतरी सांगड, असें केल्यानें तत्त्वप्रतिपादन व कलासौंदर्य या दोहोंचीहि हानि होते.

गेल्या साठ वर्षांतील मराठी नाटकांची वाढ पाहून डोळ्यांपुढें एकच दृश्य उभें राहतें. विमान ज़मीन सोडून वर गेलें आहे; पण अजून अंतरिक्षांत एखाद्या पांखराप्रमाणें स्वच्छंद विहार करण्याचें सामर्थ्य त्याला आलेलें नाहीं. या साठ वर्षांचा विस्तृत इतिहास लिहिला जाणें आवश्यक आहे. अशा लेखकाला कितीतरी

महत्त्वाच्या प्रश्नांची मनोरंजक व सोदाहरण चर्चा करितां येईल. नटांच्या वैशिष्ट्यांचा नाटकांवर कसा परिणाम होतो हें दाखवावयाला किर्लोस्करांची न गाणारी शकुंतला, कोल्हटकरांची पात्रप्रचुर रचना, गडकऱ्यांची लतिका, खाडिलकरांची स्वयंवरापासून नायिकाप्रधान झालेलीं नाटकें, वरेरकरांचे ‘ वैकुंठ ’ छाप नायक, इत्यादि गोष्टी त्याला साहाय्य करतील. ‘ स्त्रियांनीं रंगभूमीवर यावें कीं नाहीं ’ या प्रश्नावर मत देतांना स्त्रिया भूमिका करणार आहेत हें लक्षांत घेऊन लिहिलेल्या नाटकांतील शृंगाराचा नाजुकपणा त्याला तुलनेनें दिग्दर्शित करतां येईल. राजकीय विषयांवर नाटक लिहिणें शक्य नसल्यामुळें कजाग सासूच्या हाताखालीं वावरणाऱ्या सुनेचा राग जसा तिच्या गालावरील लालीनें व्यक्त होतो, त्याप्रमाणें पौराणिक व कल्पनारम्य नाटकांतून, समाजाची स्वातंत्र्याची तळमळ अन्योक्तिरूपानें प्रगट झाल्याचीं कैक उदाहरणें त्याला मिळतील. सामाजिक नाटकांत पडलेलीं समाजाच्या सूक्ष्म मनाचीं प्रतिबिंबें जुळवून त्याला सामाजिक इतिहास दाखविणारा चित्रपटच तयार करतां येईल. १९२० सालीं ‘ एकच प्याल्यां’तील सिंधू रंगभूमीवर आली. तिच्या पातिव्रत्याला दुबळेपणाची दुसरी बाजू आहे ही गोष्ट समाजाला जाणवल्यावांचून राहिली नाहीं. नुकतेंच रंगभूमीवर आलेलें अत्रे यांचें ‘ घराबाहेर ’ नाटक ही दुसरी बाजू पाहिल्यामुळेंच निर्माण झालें नाहीं काय? सारांश, चिकित्सक व रसिक लेखकानें मराठी रंगभूमीचा इतिहास लिहिल्यास तो एकाद्या कादंबरीइतकाच आकर्षक होईल.

कोठल्याहि वाङ्मयांत फुलें फार, रत्नें थोडीं ! फुलें फुलून त्या वेळेपुरता आनंद देतात, त्यांचा पुढें मागमूस देखील लागत नाहीं. गेल्या साठ वर्षांतील शेंकडों नाटकें व त्यांचे कर्ते या फुलांसारखेच आहेत. त्यांचीं नांवें आजच्या वाचकांना ठाऊक नसलीं तरी भूतकाळाकडे आदरानें पाहणारा मनुष्य त्यांना योग्य तो मान दिल्याशिवाय राहणार नाहीं. मराठी नाट्यकलेचें मंदिर आज पायापासून दोन मजले वर आलेलें दिसत आहे. या कामीं आतांपर्यंत उल्लेखिलेल्या नाट्यलेखकांप्रमाणें अनेक अनुल्लेखित नाट्यभक्तांचे परिश्रमहि खर्ची पडले आहेत. ह्या मंदिराचे मजल्यावर मजले उठून तें गगनचुंबी व्हावें, इतर भाषांनीं त्याचें सौंदर्य पाहून त्याचीं छायाचित्रें घेण्याकरितां यावें आणि या गगनचुंबी मंदिरावरील सोन्याच्या कळसावर नोबेल प्राइझच्या रूपानें आकाशांतील चंद्र विलसावा अशी इच्छा केली तर— अनेकांना तें एक गोड स्वप्न वाटेल. स्वप्न तर खरेंच ! पण मराठी नाट्यवाङ्मयाच्या प्रभातकालीं तें पडलेलें आहे. पहांटेचीं स्वप्नें बहुधा खरीं होतात असें म्हणतात.

शिरोडें, ता. ३१ आक्टोबर १९३४.

---

५

# विनोदी वाङ्मय

[ लेखकः—श्री. रामकृष्ण गणेश हर्षे, वाङ्मयविशारद ]

## विनोदी वाङ्मयाची पूर्वपीठिका

प्राचीन मराठी वाङ्मय हें बव्हंशीं संस्कृतावलंबी असल्यामुळें विनोदासंबंधींहि प्राचीन मराठी वाङ्मयाची स्थिति फारशी भिन्न असण्याचें कारण नाहीं. तथापि संस्कृतांतील ललित विषयांकडे प्राचीन मराठी लेखकांचें फारसें लक्ष लागलेलें नव्हतें, त्यामुळें ललितकृतींमध्यें आलंकारिकतेबरोबर येणारी चमत्कृति व तज्जन्य हास्य याला सुद्धां प्राचीन मराठी वाङ्मय पारखें आहे. याचें कारण असें कीं, महाराष्ट्रियांची जन्मभाषा जरी मराठी असली तरी शिक्षणाची व संस्कृतीची भाषा संस्कृत असल्यामुळें समाजांतील सुशिक्षित पंडितवर्गाचा संस्कृतांत ग्रंथरचना करण्याकडे कल असे. शिष्टांच्या मान्यतेचा छाप देशी भाषेंतील ग्रंथांस क्वचित् मिळे व ह्यासंबंधींची तक्रार ज्ञानेश्वर, दासोपंत आणि एकनाथ यांनीं आपल्या ग्रंथांत केली असून मराठीविषयींचा आपला पक्षपात मोठ्या जाज्वल्य शब्दांत प्रगट केला आहे. तथापि हें सर्व वाङ्मय आध्यात्मिक असल्यामुळें एक तर यांत विनोदाला फार थोडा अवकाश आहे आणि दुसरें बहुजनसमाजाची एक गरज भागविण्यासाठींच अध्यात्मानें मराठीचा आश्रय केला. सारांश, मराठी ही या कालीं वाङ्मयीन केल्या मात्र नसून व्यवहाराचीच भाषा होती हें कटु सत्य यावरून सिद्ध होतें; व महजर,

मस्तकें, पत्रांचे मायने, वगैरे व्यवहारांतील देवघेवींबद्दलच्या प्राचीन लेखन-पद्धतीची माहिती देणारे तसे नमुने आजहि आपणांस उपलब्ध आहेत.

धर्मप्रवृत्त हिंदुसमाजास विनोदाच्या यथार्थ स्वरूपाविषयींची योग्य कल्पना असली तरी अकालीं शास्त्राध्ययनाच्या रूक्ष वाळवंटांत शिरलेल्यांच्या निरनिराळ्या आचारविषयक बंधनांनीं व धार्मिक ध्येयांनीं जखडलेल्या बुद्धीस विनोदवृत्तीस अवश्य असणारा मनाचा मोकळेपणा व तिऱ्हाइतपणा लाभण्यासारखा नव्हता. आमची वृत्ति अकालीं प्रौढ व अवास्तव गंभीर बनत असे; हा दोष आमच्या शिक्षणपद्धतींत व आमच्या कर्तव्यभावनेंतच अनुस्यूत होता. म्हणून आम्हांला ललित वाङ्मया-पेक्षां अध्यात्माचीच गोडी जास्त. अधिकारी सत्पुरुष ज्या जनतेला अध्यात्माचा उपदेश करीत, त्यांच्या दु:शीलतेबद्दल किंवा दुरवस्थेबद्दल बोलत असतांना जो कांहीं विनोद स्वाभाविक रीत्या त्यांना सुचत असेल तेवढाच विनोद आमच्या प्रचंड संत-वाङ्मयांत आढळेल. मुक्तेश्वर, वामन, मोरोपंत वगैरे आख्यानकवींमध्यें मात्र आलं-कारिक विनोद पाहावयास मिळतो. विशेषतः मोरोपंतांनीं तर आपल्या मार्मिक कल्पनांनीं व अनुरणनात्मक शब्दांनीं कित्येक ठिकाणीं अतिशय बहार करून सोडली आहे.

विनोदाबद्दल प्राचीन साहित्यशास्त्रज्ञांची कल्पना अशी कीं, विनोद किंवा हास्यरस हा प्रधान रस होणें अशक्य असून, दुसऱ्या एखाद्या प्रधान रसाच्या आवि-ष्करणांत रुचिपालट अगर तोंडीं लावणें म्हणून त्याचा उपयोग करावयाचा व त्याच दृष्टीनें त्याचा सर्वत्र उपयोग केलेला दिसतो. आज रूढ असलेली खास विनोदी लेखनपद्धति त्या काळीं नव्हती. म्हणून प्राचीन मराठी साहित्याचा आढावा घेतांना प्राधान्येंकरून आनुषंगिक रीत्या विनोदी व चमत्कृतिपूर्ण लेखनच लक्षांत घेतलें पाहिजे.

प्राचीन मराठी गद्यवाङ्मय पद्यवाङ्मयाच्या मानानें अत्यल्प होतें. केवळ दंतकथारूपानें प्रचलित असलेलें व पुढें पेशवाईनंतर संग्रहीत झालेलें वाङ्मय जमेस धरलें तरच आंग्लपूर्वकालीं आमच्यामध्यें विनोदी वाङ्मय होतें असें म्हणतां येईल. या विनोदी वाङ्मयाचें स्वरूप म्हणजे चातुर्यकथा, चुटके व चतुरालाप हें होय.

चातुर्ययुक्त नीतिबोध अन्योक्तिरूपानें मनावर ठसविणाऱ्या हितोपदेश-पंचतंत्रांतील गोष्टी; बृहत्कथेचें अनुकरण करणारी वेताळपंचविशी; विक्रमादित्याची सिंहासन-बत्तिशी; महाभारतांतील शुकरंभासंवादावर आधारलेली शुकबाहात्तरी;

दण्डीच्या दशकुमारचरिताच्या धर्तीवर लिहिल्या गेलेल्या चित्रसेन आणि ठकसेन राजपुत्रांच्या मनोरंजक सुरस गोष्टी; अथवा भोजप्रबन्धानुसारी 'चातुर्यसंग्रह अथवा भोजराजा आणि कालिदास', अशा प्रकारच्या संस्कृत वाङ्मयाचे स्पष्ट पडसाद उमटलेल्या चातुर्यकथा हें मराठी विनोदी वाङ्मयाचें मूळ होय, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

त्यानंतर ऐतिहासिक पुरुषांच्या ज्या दंतकथा 'विनोदमहदाख्यायिका' वगैरे-सारख्या पुस्तकांत संग्रहीत केलेल्या सांपडतात, त्यांत विनोद चमत्कृति किंवा चातुर्य-रूपानें पण आनुषंगिक रीत्या आढळतो. या दंतकथा परंपरेनें चालत आल्या असल्या-मुळें त्या केव्हां संग्रहीत करण्यांत आल्या हा प्रश्न अर्थात् गौण आहे; त्या आंग्ल-पूर्वकालीन होत हें निःसंशय. त्याचप्रमाणें ऐतिहासिक पुरुषास आधारभूत धरून पण कल्पनेचा मालमसाला भरपूर घालून रचलेल्या 'बादशहा अकबर व प्रधान बिरबल' यांच्या गोष्टी, किंवा 'चतुर साबाजी' सारख्या गोष्टी, चातुर्य-विनोदाच्या दृष्टीनें वाचनीय आहेत.

लोककथात्मक वाङ्मयसंग्रहांतहि विनोदाचे उत्कृष्ट मासले सांपडतात. त्या दृष्टीनें पाहतां 'जांवयाच्या गोष्टी' अत्यंत लोकप्रिय आहेत. 'मूर्खचिंतामणी' किंवा 'मनोरंजक मूर्खांच्या गोष्टी' यांचा समावेश त्यांतच करण्यास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें 'टिमाजी माकडाचें चातुर्य' किंवा 'चमत्कारिक न्यायाच्या व अकलेच्या गोष्टी' किंवा 'हत्तीच्या चातुर्याच्या गोष्टी', वगैरे पुस्तकें त्याच मासल्याचीं होत.

इंग्रजींतल्याप्रमाणें इकडेहि 'तस्कर-कथा' किंवा 'वाटसरूच्या गोष्टी' प्रसिद्ध आहेत व तेंहि एक स्वतंत्र वाङ्मयच होय. परंतु त्यांत विनोदापेक्षां चातुर्य व हिकमती-पणाच अधिक असून 'लुच्चेगिऱ्या आणि ठकबाज्या' यांना बळी पडलेल्यांचे विनोदप्रसंग तेवढेच विनोदाच्या सदराखालीं येतील. मात्र १८६८ सालापासून 'चमत्कारिक गोष्टी' (भाग १ ते ९), 'चातुर्यकथासंग्रह', विनोदपर 'गोष्टी' (भाग १ ते ३), 'विनोदरत्नमाला' इत्यादि लहानमोठीं बरींच पुस्तकें सतत प्रसिद्ध होत राहिलीं असून त्यांमध्यें सर्व प्रकारच्या गमतीदार गोष्टींचा, आख्यायिकांचा, सुभाषितांचा, चुटक्यांचा व नीतिबोधाचा समावेश झाला आहे. या अशा प्रकारच्या पुस्तकांचे उल्लेख मुबलक असले तरी त्यांपैकीं फारच थोडीं पुस्तकें आज उपलब्ध आहेत व उपलब्ध पुस्तकांवरून काढलेलें हें अनुमान फारसें चुकीचें असण्याचा

संभव नाहीं. कारण त्या काळच्या विनोदाविषयींच्या रूढ कल्पना पाहतां या व्यतिरिक्त अन्य प्रकार संभवत नाहीं. पण हें वाङ्मय अगदींच ओबडधोबड व उपेक्षणीय आहे असें म्हणतां येणार नाहीं. १८८५ सालीं रा. सावंत यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'विनोदरत्नमाला' (भाग १ ला) या अवघ्या ३० पानांच्या चोपड्यांतील सुमारें ३६ लहानमोठ्या विविध प्रकारच्या विनोद-प्रसंगांपैकीं बहुसंख्याक प्रसंग मनोरंजक आहेत. परंतु चुटके अथवा विनोदवचन या वाङ्मय-प्रकाराचा स्वतंत्रच उल्लेख करणें जरूर आहे. कांहीं अपवाद वगळल्यास या वाङ्मय-प्रकारांत अंतर्भूत होणारे प्रसंग इंग्रजी वाङ्मयामधून घेतलेले आहेत. इंग्रजी वर्तमानपत्रांत व मासिकांत विनोदी चुटक्यांचें एक स्वतंत्र सदरच असतें. तें पाहून विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं आपल्या निबंधमालेंतहि तसे चुटके देण्याची प्रथा पाडली व या चुटक्यांचा संग्रह 'विनोदमहदाख्यायिका' या नांवानें पुढें पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत आला. निबंधमालेचें हें अनुकरण करमणूक, हिंदुपंच, वगैरे साप्ताहिकांनीं व बहुतेक सर्व ललित मासिकांनीं केलेलें आहे. एखादी सुंदर कोटी, चुरचुरीत उत्तर, मार्मिक कल्पना, अतिशयोक्तिपूर्ण प्रसंग, मनोरंजक आख्यायिका, हास्योत्पादक विसंवादित्व, विनोदी वर्णन किंवा चातुर्याची गोष्ट, असें या वाङ्मयाचें स्वरूप असून त्याचे कांहीं संग्रह-ग्रंथहि प्रसिद्ध करण्यांत आले आहेत. उदाहरणार्थ 'करमणुकींतील करमणूक' ( १९३४ ), 'तासभर मौज' ( बा. बा. रानडे–१८८६ ), 'विनोदलहरी' ( ज्ञानमित्र, भाग १–२ १९१३ व १९२५ ), 'हास्यमंजूषा' ( लोकमित्र, १९१८ ) इत्यादि नांवें सांगतां येतील. घटकाभर करमणूक म्हणून हीं सर्वच पुस्तकें वाचनीय असलीं तरी, सरसता व मार्मिकता या दृष्टीनें 'विनोदमहदाख्यायिका' व 'करमणुकींतील करमणूक' यांनाच वाङ्मयीन महत्त्व आहे. 'मनोरंजक आणि संस्मरणीय प्रसंग' किंवा 'आठवणी आणि आख्यायिका' म्हणून अलीकडे प्रसिद्ध झालेले ग्रंथ विनोदाच्या दृष्टीनें वाचनीय आहेत.

प्रारंभींच्या पेशवाई-उत्तरकालीन मराठी गद्य वाङ्मयाचा विस्तार पाहिला व विषयानुरोधानें त्याची छाननी केली तर एकटें विनोदी वाङ्मयच तेवढें विनोदाच्या तत्कालीन कल्पनेप्रमाणें सर्वंकष होतें, असें म्हणतां येईल. कारण त्यांत विविध प्रकारच्या नकला ( १८७२ ) तर आहेतच, परंतु बहुरूप्यांचीं सोंगें देखील वाङ्मयनिविष्ट केलेलीं आढळतात. खरोखर बहुरूप्यांचीं भाषणें ज्यांनीं ऐकलीं असतील त्यांना त्यांचें प्रत्युत्पन्नमतित्व व हास्योत्पादक बुद्धिचापल्य दृष्टोत्पत्तीस

आल्याशिवाय राहिलें नसेल. परंतु चतुर भिक्षेकऱ्यांचा हा वर्ग आतां नामशेष होत चालला असून त्याची जागा भोंडे, नानिवडेकर, घोडके इत्यादि प्रतिष्ठित नकलाकारांनीं घेतली आहे. तथापि क्वचित् कोठें भेटणाऱ्या या नकल्या बहुरूप्यांचें वाङ्मय कोणी आस्थेवाईकपणानें संग्रहीत करील तर जुन्या जानपद विनोदी वाङ्मयाचा उत्कृष्ट नमुना म्हणून तें दाखवितां येईल यांत शंका नाहीं.

उपहास, विडंबन, व्याजोक्तिपूर्ण टीका, इत्यादि विनोदप्रकारांचें स्वरूप आपणांस पाहावयाचें झाल्यास तें प्रहसनांमध्यें फार चांगलें दिसून येतें व तत्कालीन वाङ्मयांत हें प्रहसनात्मक वाङ्मय विपुल आहे. याचें कारण असें कीं, इंग्रजी राज्याच्या सुरुवातीबरोबरच इंग्रजी पोषाख, इंग्रजी चालीरीति, इंग्रजी व्यसनें व इंग्रजी सांसारिक कल्पना यांचा पगडा तत्कालीन सुशिक्षितांच्या मनावर इतका जबरदस्त बसला होता कीं, त्यांचे ते स्वाभिमानशून्य चाळे त्यांच्या समकालिनांच्या हास्याचे विषय झालेले होते. क्रियेला प्रतिक्रिया या न्यायानें जुन्या नव्या दोन्ही पक्षांच्या लेखकांनीं आपआपल्या लेखण्या परजून एकमेकांना केलेले वाक्प्रहार अत्यंत मनोरंजक झाले आहेत. जुना समाज मोडकळीस आलेला होता व त्यांतील कित्येक चालीरीति त्या कालाशीं विसंवादी ठरल्यामुळें हास्यास्पद झालेल्या होत्या, हें जितकें खरें, तितकेंच नवशिक्षितांचेंहि स्वैर वर्तन व परकीयानुकरण हास्यास्पद झालें होतें हेंहि खरें. त्या वेळीं अत्यंत लोकप्रिय असलेलें 'मोर एल्एल्. बी.—प्रहसन' (१८८५), 'अभिनव-तरुणीविद्या', 'स्त्रीविद्यावैचित्र्य किंवा स्त्रीशिक्षण प्रहसन' (१८८३–८५), 'विचारसन्निपात उर्फ फ्याशनेबल वाइफ्', 'ट्वेंटिएथ सेंचुरी अथवा स्त्रीप्राबल्य प्रहसन;' त्याचप्रमाणें विजोड दंपती (बुड्ढी घोडी लाल लगाम), बालविवाह, हुंडा, सासुरवास इत्यादि प्रहसनांत या सामाजिक मतामतांतील झगड्यांचें चांगलें प्रतिबिंब दृष्टीस पडतें. याखेरीज चिक्कण मामा, दांभिक भोंदु, शेंदाडशिपाई, चहाडखोर, ढेरपोट्या, इत्यादि जगांतल्या नित्याच्या हास्यविषयांवरील प्रहसनें आहेतच. परंतु ज्याला खास विनोदी वाङ्मय म्हणून संबोधण्यांत येतें त्यांत ह्या प्रहसनांचा समावेश होऊं शकत नाहीं. कारण हास्यरसाला प्रहसनांत भरपूर वाव असला तरी, तो एक नाट्याचा—दृश्य काव्याचा—प्रकार समजला जात असल्यामुळें नाट्यवाङ्मयांतच त्याचें स्थान कल्पिणें योग्य होय. या ठिकाणीं त्याचा निर्देश करण्याचें कारण इतकेंच कीं, इतरांप्रमाणें महाराष्ट्रीयांमध्येंहि विनोदबुद्धि पूर्णपणें विकसित झालेली असून ती विविध प्रकारांनीं वाङ्मयनिविष्टहि झालेली आहे हें

दृष्टोत्पत्तीस यावें. तिनें पाश्चात्य विनोदी लेखनपद्धति अवलंबिली नाहीं, हा केवळ काळाचा प्रभाव होय.

आतां एकाच वाङ्मयप्रकाराचा निर्देश करून हें विवेचन पुरें करावयाचें आहे. तो प्रकार म्हणजे ग्रंथांवरील किंवा एखाद्या सामाजिक अगर राजकीय प्रसंगावरील विनोदी टीका हा होय. अगदीं प्रारंभींच्या अशा प्रकारच्या वाङ्मयांत चिपळूणकरांनीं शालापत्रकांतील वासीराम कोतवालावरील टीकेचा व ज्ञानप्रकाशांतील पिशाच्च, पठतमूर्ख, तसेंच लोककल्याणेच्छूंतील ' गोल्या घुबड ' या सहीचीं जीं पत्रें येत त्यांचा व विविधज्ञानविस्तारांतील कांहीं लेखांचा उल्लेख केला आहे. त्यानंतरचा अलीकडील विनोदी टीकेचा उत्कृष्ट मासला म्हणजे टोसर व मराठे यांचें कोल्हटकरांच्या नाटकांवरील ' नाट्यकलारुक्कुठार ' हें टीकात्मक पुस्तक होय. यांत उपहास, विडंबन, वक्रोक्ति इत्यादि सर्व हत्यारांचा भरपूर उपयोग केलेला आहे. याच प्रकारांत प्रो. शिवराम महादेव परांजपे यांच्या 'काळां'तील वक्रोक्तिपूर्ण लेखांचा समावेश केला पाहिजे. त्याचप्रमाणें ' हिंदुपंच ' पत्रांतील व्यङ्ग्यचित्रें व त्यांवरील भाष्यात्मक चुटके यांचाहि त्यांत अंतर्भाव करण्यास हरकत नाहीं. त्यानंतर इतर नाटक-कादंबऱ्या, लघुनिबंध, गोष्टी इत्यादिकांतील प्रासंगिक विनोद-स्थलें राहतात. परंतु तीं खास विनोदी वाङ्मयाच्या कक्षेत येत नसल्या कारणानें विचारांत घेण्याचें कारण नाहीं.

## इंग्रजी वाङ्मयाचें संस्करण

इंग्रजी राज्याच्या सुरुवातीनंतर प्रारंभींच्या काळांत जें विनोदी वाङ्मय निर्माण झालें त्याचा त्रोटक इतिहास वर दिलाच आहे. छापण्याची कला सोळाव्या शतकांतच पोर्तुगीजांनीं हिंदुस्थानांत आणली, असें जरी इतिहास सांगत असला तरी मराठींतील ग्रंथप्रकाशनास खरी सुरुवात एकोणिसाव्या शतकापासूनच झाली आहे. १८१० सालीं प्रसिद्ध झालेलें व ग्रंथ या संज्ञेस पात्र होणारें पहिलें मराठी पुस्तक म्हणजे कॅरेचा ' इंग्रजी-मराठी कोश ' हें होय. त्यानंतरचें प्रसिद्ध झालेलें वाङ्मय हें बहुंशीं शालोपयोगी असेंच आहे. नवी राज्यव्यवस्था, नवी शिक्षणपद्धति, नव्या चालीरीती, नवे आचार-विचार, यांमुळें त्या काळीं जिकडे तिकडे नवचैतन्य भरून राहिलें होतें व प्रभुप्रेषित इंग्रजबहादुरांकडूनच आपल्या हिंदुस्थान देशाचा उद्धार होणार अशा श्रद्धेनें येथील सर्व बौद्धिक आणि सामाजिक चळवळी चालू होत्या. महाराष्ट्रांतील नवशिक्षित बुद्धिमान् वर्ग इंग्रजांचा

स्तुतिपाठक बनल्यामुळें स्वाभाविकपणेंच जुन्या राजवटीचें, संस्कृतीचें, समाज-व्यवस्थेचें व चालीरीतींचें दोषाविष्करण करून तीं सर्व उपहासास्पद ठरविणें हें तत्कालीन लोकांचें एक व्यसनच होतें. स्वार्थी हेतूनें कां होईना पण ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं व त्यांच्या 'ज्ञानोदय' प्रभृति नियतकालिकांनीं या कामीं पुढाकार घेतला होता व तत्कालीन प्रसिद्ध ग्रंथकार रा. ब. गोपाळराव देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांनींहि मृतप्राय झालेल्या समाजांत नवचैतन्य उत्पन्न व्हावें व आपल्या परिस्थितीची त्यांस यथार्थ जाणीव व्हावी या उदात्त हेतूनें न कळत त्याच मार्गाचें अनुसरण केलें. लोकहितवादींच्या 'शतपत्री' बरोबरच मोरोबा कान्होबाकृत 'घाशीराम कोतवाल' व बाबा पदमनजींचें 'यमुनापर्यटण' इत्यादि तत्कालीन पुस्तकें त्या दृष्टीनें वाचनीय आहेत.

परंतु या क्रियेची प्रतिक्रिया झाल्याशिवाय राहिली नाहीं. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं त्याचें सव्याज उट्टें काढलें. त्यांनीं केलेला तत्कालिनांचा हा हृदयंगम परिहास व औपरोधिक उपहास निबंधमालेंत जागोजाग पाहावयास सांपडतो. चिपळूणकरांचा हा संप्रदाय त्यांच्या शिष्यांनीं चालू ठेविला व इंग्रजी राज्याचे व संस्कृतीचे गोडवे गाणाऱ्या मवाळांची व त्यांच्या सुधारकी प्रयत्नांची लो. टिळक, शिवरामपंत परांजपे, न. चिं. केळकर प्रभृतींनीं चांगलीच टर उडविली आहे. 'केसरी' आणि 'काळ' पत्रांतील हें चुरचुरीत लेखनच त्यांच्या लोकप्रियतेस बरेंचसें कारणीभूत झालें आहे. असो. वर्तमानपत्री विनोदी लेखनांत कै. अच्युत बळवंत कोल्हटकर यांचा व त्यांच्या 'संदेश'चा अवश्य उल्लेख केला पाहिजे. चटकदार मथळे देऊन व खुसखुशीत मजकूर घालून बहुजन समाजास वाचनाची गोडी लावण्यांत कै. अच्युतरावांचा फारच मोठा भाग होता. त्यांचीं 'वत्सलावहिनींचीं पत्रें' हें मराठी वाङ्मयांतील चिरस्मरणीय पुस्तक होय.

वर्तमानपत्रांतील हा विनोद म्हणजे त्या त्या परिस्थितीमुळें सुचलेला स्वाभाविक विनोद होय. पेशवाईच्या विनाशकालीं विषयपंकांत रुतलेल्या व अज्ञानांधःकारांत खितपत पडलेल्या आमच्या पुढाऱ्यांचे पाश्चात्य सुधारणांनीं डोळे दिपून गेले व दिङ्मूढ होऊन पाश्चात्य सुधारणेचा उदो उदो करण्याखेरीज त्यांस गत्यंतर उरलें नाहीं. कालांतरानें 'चकाकतें तें सारेंच सोनें नव्हे' याचा प्रत्यय येऊन मृगजळामागें धांवणारांचें हांसें व्हावें हें यथायोग्यच आहे. सारांश, विनोदगर्भ परिस्थितीच विनोदी लेखक निर्माण करते, हा इतरत्र आढळून येणारा सिद्धांत

येथेंहि खरा ठरला आहे. इंग्लंडच्या तत्कालीन परिस्थितीनें ॲडिसनला विनोदाला विपुल क्षेत्र मिळवून दिलें व तेथील सामाजिक क्रान्तीला त्याचे व त्याचा व्यवसायबंधु जो स्टील याचे लेख कारणीभूत झाले आहेत. डिकन्स, थॅकरे, सर् ह्यॅटिल, मार्क ट्वेन किंवा मॅक्स ऑरेल यांच्या ग्रंथांमधील विनोद त्या त्या देशांतील व कालखंडांतील सामाजिक जीवनाच्या स्मृतिचित्रांचा पडसाद होय. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या पुष्कळशा विनोदी लेखांतील व्यंग्य टीका तत्कालीन विशिष्ट सामाजिक परिस्थिति, प्रसंग व व्यक्ति यांना अनुलक्षून आहे. तसेंच मराठी रंगभूमीची प्रारंभीची स्थिति खरोखरच हास्यास्पद नसती तर ‘ नाटक्याचे तारे ’ हें पुस्तक जन्मास येतें ना !

सारांश, ‘ कलेकरितां कला ’ या तत्त्वानुसार केवळ लालित्याकरितां विनोदाचें ललित लेखन सुरू होण्यापूर्वी सामाजिक सुधारणांचें ‘ सुकुमारं प्रहरणं ’ या नात्यानेंच विनोदी लेखनपद्धतीचा उपयोग आमच्या आरंभींच्या प्रतिभाशाली लेखकांनीं केला आहे.

तथापि या सर्व वाङ्मयाकडे लक्ष दिलें तर ही गोष्ट स्पष्ट दिसते कीं, निदान वाङ्मयाच्या बाबतींत तरी गेलें सबंध शतक आमच्या पुढें इंग्रजी वाङ्मयाचा आदर्श होता. इंग्रजीच्या आवश्यक व आस्थेवाईक अभ्यासाचा हा स्वाभाविक परिणाम होय. आमचें सुरुवातीचें वाङ्मय बहुंशीं भाषांतरितच होतें व अजूनहि स्वतंत्र ग्रंथांची संख्या फारशी मोठी नाहीं. वाङ्मयाच्या सर्वच विभागांत आम्हीं इंग्रजांचें शिष्यत्व पत्करलें आहे. आधुनिक काव्यवाङ्मयाचे युगप्रवर्तक केशवसुत इंग्रजी कवितांचा अनुवाद-अनुकरण तर करतातच, पण त्यांची स्फूर्तीहि तेथूनच आहे. त्याचप्रमाणें आधुनिक गद्याचे संस्थापक विष्णुशास्त्री चिपळूणकर मराठीचे कडवे अभिमानी असूनहि त्यांची रचनापद्धति इतकेंच नव्हे, तर त्यांचीं कित्येक मतें व विचार हीं देखील इंग्रजी वाङ्मयाचे पडसाद होत. ज्या मेकॉलेची त्यांनीं इतकी टर उडविली आहे त्याच मेकॉलेचें त्यांनीं नकळत अगदीं तंतोतंत अनुकरण केलें आहे. कादंबरी तर आमच्यामध्यें नव्हतीच. मराठींतील पहिली कादंबरी ‘ फुलमुनी आणि करुणा ’ ही तर मिसेस म्यूलेन्स या ख्रिस्ती बाईच्या प्रचारविषयक गोष्टीचें भाषांतर आहे. सुप्रसिद्ध इंग्रज कादंबरीकार रेनॉल्ड्स यानें तर मराठी वाङ्मयावर व आमच्या कादंबरीलेखकांवर अगणित उपकार करून ठेवले आहेत. संस्कृतांतील उज्ज्वल नाट्यपरंपरा असूनहि आधुनिक नाट्याचा जन्म कीर्तने-महाजनी

प्रभृतींच्या नाटयाचार्य शेक्सपिअरच्या नाटयकृतींच्या भाषांतरापासूनच धरतात व अजूनहि ' आंधळ्यांची शाळा, ' 'घरकुल' इत्यादि अद्ययावत् नाटकांचें भाषांतरी वळण कायमच आहे. ऐतिहासिक संशोधन, शास्त्रीय वाङ्मय या बाबतींत तर आपली बाल्यावस्थाच चालू आहे. म्हणून सूक्ष्म निरीक्षणांतीं आमच्या सर्वच वाङ्मयविषयक चळवळी म्हणजे पाश्चात्यांचें अनुकरण होय, हें म्हणणें कोणासहि पटेल. किंबहुना आमचें सर्वच बौद्धिक जीवन त्या प्रकारचें झालें आहे. आजपर्यंत इंग्रजी वाङ्मयाचाच आम्ही अभ्यास करीत होतों. परंतु महायुद्धाच्या परिसमाप्तीनंतर युरोपांतील निरनिराळया प्रमुख देशांतील वाङ्मयाचा ओघ इकडे एकसारखा वाहूं लागला आहे. त्या दृष्टीनें पाहतां आपलें जीवन हें खरोखरच हळूहळू आंतरराष्ट्रीय बनत चाललें आहे. वर्तमानपत्रें, सिनेमा, रेडियो व जलद प्रवासाच्या वाढत्या सुख-सोयी यांच्यामुळें यापुढें कोणतेंहि वाङ्मय किंवा कोणतीहि विचारसंपत्ति एका राष्ट्राच्या मालकीची राहणार नाहीं. हें पाहिलें म्हणजे एका अबाढव्य जागतिक संस्कृतीचा हा जणूं संधिकालच येत आहे असें वाटतें.

आज मराठींतील विनोदी वाङ्मय ज्या ज्या प्रकारांनीं विकास पावत आहे त्यांकडे लक्ष दिलें असतां हीच अनुकरणबुद्धि सर्वत्र दिसून येईल. ॲडिसनप्रमाणें कोल्हटकर-गडकरी प्रभृतींनीं सामाजिक सुधारणांचें साधन म्हणून ही पद्धत स्वीकारली व त्यांच्या कालास तें योग्यच झालें. आमच्या सर्वच ललित मासिकांत विनोदी चुटक्यांचें सदर असे. आमच्या सुशिक्षित जीवनाला नित्याच्या वर्तमानपत्रांची जरूर लागली व जसजसें तें अधिकाधिक यांत्रिक होऊं लागलें तसतशीं मौज, विविधवृत्त, वसुंधरा, निर्भीड, इत्यादि करमणुकीचीं वर्तमानपत्रें निर्माण झालीं. परंतु हें वर्णन फक्त मुंबई शहरालाच लागू आहे. अजून ही गरज सार्वजनिक झाली नाहीं. उलट इंग्लंड हें औद्योगिक राष्ट्र असल्यामुळें तेथें अशा प्रकारच्या करमणुकीच्या वर्तमान-पत्रांची रोजची आवश्यकता असल्यामुळें न्याहारीच्या बरोबर खुसखुशीत करमणूक करण्यासाठीं तिकडे विनोदी लेखकांची अहमहमिका लागून राहिलेली असते व संपन्न अभिरुचीच्या पत्रांतून गार्डिनर, चेस्टरटन, हिलेअर बेलॉक प्रभृति प्रख्यात विनोदी लेखक लिहीत असतात. त्यांच्या लेखनाचा लोकांच्या अभिरुचीवरहि परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं. तशी स्थिति आपल्याकडे नसल्यामुळें आपला विनोद चटोरपणाकडे जास्त झुकत असतो व वैयक्तिक टीका, एकमेकांच्या उखाळ्या-पाखाळ्या, गटारगप्पा यांच्यावरच तो अधिष्ठित झालेला असतो. प्रतिष्ठित विनोदी

लेखक हाताच्या बोटांवर मोजण्याइतकेच आहेत. त्यांतहि आपल्या लेखनाचा दर्जा विशिष्ट प्रकारचाच असावा, असें मानणारे थोडेच. म्हणून कलेच्या दृष्टीनें आमचें विनोदी लेखन असावें तितकें चांगलें नसतें. अनुकरण आणि अनुवाद यांचें साहित्यकांना लागलेलें ग्रहण अजून सुटलें नाहीं.

इंग्लंडमध्यें लेखन हा धंदाच होऊन बसला आहे व उच्च दर्जाच्या लेखनाला प्राप्तीहि बरीच होत असल्या कारणानें स्पर्धेमुळें स्वभावतःच आपल्या लेखनाचा दर्जा उत्कृष्ट ठरावा अशी प्रत्येक लेखकाची इच्छा असते व त्यासाठीं लेखक अतिशय मेहनत घेतात. ब्ल्यू बुक्स, कोर्ट प्रोसीडिंग्ज, वर्तमानपत्रांतील विचित्र बातम्या, प्रवासवर्णनांतील मौजेच्या गोष्टी, वेड्यांच्या इस्पितळांचे वृत्तांत यांतून किंबहुना मनुष्यस्वभावाची ज्या ज्या ठिकाणीं मासलेवाईक हकीकत मिळेल तेथून ती ते वेत असतात व केवळ पुस्तकी ज्ञानावर अवलंबून न राहतां स्वतः समाजांतील निरनिराळ्या थरांमध्यें मिसळून सूक्ष्मनिरीक्षणपूर्वक माहिती मिळवीत असतात. या मिळविलेल्या माहितीचा ते कसा चातुर्यानें उपयोग करीत असतात, तें गार्डिनरच्या विनोदपूर्ण लेखनांत आपणांस दिसून येतें. किंबहुना विषयाचा नुसता धागा घेऊन त्याचें खुबीदार जाळें विणण्यांत त्याचा हातखंडा आहे. अशा या लेखकाचें अनुकरण केलें जावें यांत आश्चर्य नाहीं व क्वचित् कोठें महाविद्यालयीन मासिकांत ( उदा० फर्ग्युसन कॉलेज मॅगेझिन—A Fellow Traveller. ) त्याचा अनुवाद केलेला आढळतो किंवा एखाद्या 'झरोक्यांत' ( वि. ल. बरवे ) त्याचे पडसाद उमटलेले दिसतात. गार्डिनर काय किंवा चेस्टरटन काय त्यांच्या विनोदी लेखनांत गोष्टीपेक्षां आत्मनिवेदनात्मक निबंधाचाच उपयोग केलेला आहे. त्यामुळें विनोदाबरोबरच सहजगत्या आपणांस त्यांचे उन्नत विचार वाचण्याचा स्पृहणीय लाभ घडतो.

इंग्लंडमधील परिस्थिति इकडे नसल्यामुळें विनोदी लेखनाची निपज मूठभर लेखकांच्या लहरीप्रमाणें दुर्मिळच असते. स्पर्धाभावामुळें वाङ्मयांतील उत्कृष्ट आदर्शाचें अनुकरण करण्यापेक्षां आपआपसांतील लेखनाचेंच अनुकरण करण्यांत धन्यता मानली जाते. अशी या विनोदी वाङ्मयाची सद्यःस्थिति आहे. नाहीं म्हणावयास कै. शं. का. गर्गे यांनीं मात्र 'नाट्यछटे' चा नवीन विनोदी संप्रदाय प्रवर्तित केला असून तो बराच लोकप्रिय झाला आहे.

आधुनिक मराठी वाङ्मयावर जर कशाचा विशेष परिणाम झाला असेल तर तो इंग्रजी चिकित्सात्मक वाङ्मयाचा होय. अठराव्या शतकापासून हें चिकित्सायुग

तिकडे सुरू झालें व वाङ्मयाच्या बहुविध प्रकारांची चिकित्सा होऊं लागली. अर्थात् विनोदाचीं जीं Wit, Humour, इत्यादि प्रमुख अंगोपांगें आहेत त्यांचीहि चिकित्सा होऊं लागली व तिला मानसशास्त्रीय संशोधनाची जोड मिळाल्या कारणानें या विषयांवर अनेक पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. परंतु त्यांत बहुंशीं आपणांस विनोदाच्या अंगोपांगांची स्वरूपचिकित्सा व सर्वसामान्य विनोदभावना कोणकोणत्या हेतूंची निदर्शक असते हेंच विशेषतः चर्चिलेलें आढळतें. अर्थात् त्यामुळें विनोदाच्या सर्वांगीण स्वरूपाची यथार्थ कल्पना होण्यास अशा पुस्तकांचा उपयोग होत असला तरी, भारतीय नाट्यशास्त्रांत किंवा अवांतर संस्कृत साहित्यग्रंथांत उल्लेखिलेल्या हास्याच्या प्रधान कारणांत त्यामुळें विशेष भर पडली आहे असें म्हणतां येत नाहीं. पण आपल्या सूत्रात्मक उल्लेखाऐवजीं पाश्चात्यांच्या प्रयत्नांनीं आज हास्याचें सोपपत्तिक तत्त्वज्ञान निर्माण झालें आहे व त्याचा अभ्यास विनोदोत्पत्तीस कारणीभूत झाला नाहीं तरी विनोदाचें चिकित्सात्मक रसग्रहण करण्यास तो उपकारक होईल, यांत संशय नाहीं.

## कोल्हटकरांचें युग

कै० श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे आधुनिक विनोदी लेखनपद्धतीचे जनक होत. त्यांनीं घालून दिलेलें हें विनोदी वाङ्मय-लेखनाचें वळण त्यांचे सुप्रसिद्ध शिष्य बाळकराम ऊर्फ राम गणेश गडकरी आणि प्रशिष्य केशवकुमार ऊर्फ प्र. के. अत्रे व सरस्वतीकुमार ऊर्फ न. ग. कमतनूरकर इत्यादिकांनीं यथास्थित गिरविलें असून कांहीं सन्मान्य अपवाद वगळल्यास हेंच वळण अद्याप मराठी वाङ्मयांत कायम आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अतिशयोक्तीचा आश्रय करून किंवा व्याजोक्तीनें एखादी रूढि, संस्था अगर व्यक्ति यांचें हांसत हांसत दोषदर्शन करणें व त्यांस उपहासास्पद बनवून त्यांतील वैगुण्य नाहींसें होईल अशी परिणामकारक टीका करणें हा ह्या लेखनपद्धतीचा विशेष होय. श्री. कोल्हटकरांनीं निरनिराळ्या विषयांवर हें आपलें हत्यार चालविलें असून मनोरंजनाबरोबरच समाजाच्या डोळ्यांत चुरचुरण्याइतकें झणझणीत अंजन त्यांनीं घातलें आहे.

या विनोदी लेखनपद्धतीसंबंधीं लिहितांना 'माझे टीकाकार' या आपल्या लेखांत कोल्हटकरांनीं स्वतःच "व्हॉल्टेअर, स्टर्न, फील्डिंग, स्मॉलेट, मोलिएर, रॅबेले, पास्कल, सर्व्हॅन्टिस, मार्क ट्वेन वगैरे तिकडील पटाईत 'विनोदी लेखकांचा मीं परिचय करून घेतला व त्यांचें अल्प अनुकरण करण्याचा उपक्रम चालविला"

असें म्हटलें आहे. वरील ग्रंथकारांचा त्यांच्या लेखनपद्धतीवर कोणता परिणाम झाला हें सांगणें कठिण आहे. तथापि त्यांच्या विचारापेक्षां त्यांच्या लेखनपद्धतीचेंच अनुकरण करून त्यांनीं इकडील जिव्हाळ्याच्या विषयासंबंधीं आपलीं मतें समाजापुढें मांडलीं हें निश्चित होय. त्यांचें हें कार्य इतकें यशस्वी झालें आहे कीं, एक हरिभाऊ आपटे सोडले तर सुधारणापक्षाला आगरकरांच्या ज्वलज्जहाल लेखांपेक्षांहि कोल्हटकरांचे विनोदप्रचुर लेखच जास्त उपकारक ठरले आहेत. कारण रूढ चालीरीतींतील हास्यास्पदता त्यांनीं मोठ्या मार्मिकपणें दाखवून दिली असून, पुराणमताभिमानाच्या बुरख्याखालीं स्वमतपुष्ट्यर्थ त्यांनीं योजिलेला कोटिक्रम त्याच्या वास्तव स्वरूपांत मोठा खुलून दिसतो. त्या दृष्टीनें त्यांचे 'चित्रगुप्ताचा जमाखर्च,' 'मरणोत्तर,' 'पांडुतात्यांची निर्जळी एकादशी' इत्यादि निबंध वाचनीय आहेत.

कोल्हटकरांच्या लेखनाचा पहिला विशेष हा कीं, त्यांचे 'साहित्यबत्तिशीं'तील सर्वच लेख विद्वत्ताप्रचुर असून त्यांच्या विनोदाचें रहस्य समजण्यास सामान्य वाचकास अवघड गेल्यावांचून राहणार नाहीं. त्यांची भाषाशैली प्रौढ, आलंकारिक, कल्पनाप्रचुर, कोटीबाज व व्यंजनात्मक असल्यामुळें त्यांच्या लेखनांतील अस्फुट विनोद समजण्यास वाचकहि तसाच विदग्ध असावा लागतो. त्यांचें विविध विषयांवरील विस्तृत वाचन त्यांच्या लेखनांत पदोपदीं दिसून येतें व पुराण ग्रंथांतील टीकास्पद बारकावे, आमच्या समाजरचनेंतील व्यंगें, ऐतिहासिक व्यक्तींच्या कथा व अद्ययावत् शास्त्रीय सुधारणांची माहिती, यांमुळें त्यांच्या विनोदास एक प्रकारें जें भारदस्त स्वरूप आलें आहे तें त्यांच्या मागून येणाऱ्या त्यांच्या शिष्यप्रशिष्यांमध्यें फारसें दिसून येत नसल्यामुळें विनोदी वाङ्मयांतील त्यांचें अग्रस्थान अढळ आहे.

कोल्हटकरांनीं आपल्या लेखांत आपल्या काळच्या सामाजिक व्यंगांवर टीका केली असली तरी त्यांचे कित्येक लेख परिस्थितिनिरपेक्ष असल्यामुळें जुने वाटत नाहींत, व म्हणून वाङ्मयदृष्ट्या त्यांचें महत्त्व कमी झालेलें नाहीं. इंग्रजप्रभूच्या कृपेनें आमच्या देशांत जीं न्यायकोर्टें प्रस्थापित करण्यांत आलीं त्यामुळें उत्पन्न झालेला वकिलांचा व साक्षीदारांचा वर्ग कज्जेदलालीशिवाय अन्य व्यवसाय न मिळाल्यामुळें यापुढें वाढतच जाणार, ही गोष्ट उघड आहे. त्यामुळें साक्षीदारांची त्यांनीं केलेली मीमांसा खोटी ठरण्याचें कारण नाहीं. वाढत्या दारिद्र्याबरोबर पाठीशीं पाठ लावून आलेल्या बहीणभावांवर जेथें विश्वास टाकण्याची सोय उरली नाहीं तेथें आपल्याजवळ असलेलें किडुकमिडुक कड्या 'कुलपां' च्या बंदोबस्तांत ठेवणें क्रमप्राप्तच

आहे. शाळाधिकाऱ्यांच्या वक्रदृष्टीमुळें व आगरकर-कोल्हटकरांसारख्या सुधारकाग्रणींनीं व त्यांच्या भक्तगणांनीं तिचा सतत पाठपुरावा केल्यामुळें आमचा शिमग्याचा आर्य सण आतां कोणत्याहि तऱ्हेनें दोषास्पद राहिला नाहीं. पण म्हणून त्यावरील कोल्हटकरांची टीका जुनीपुराणी मानण्याचें कारण नाहीं. भावी पिढ्यांना तिचें ऐतिहासिक महत्त्व राहणारच. मूषकवाहन, वक्रतुंड, लंबोदर म्हणून कोल्हटकरांनीं गणपतीची कितीहि थट्टा केली तरी गणेशोत्सव मात्र अजून टिकून राहिला आहे व मनुष्य जोंपर्यंत उत्सवप्रिय आहे आणि स्वतःच्या मनोरंजनासाठीं धर्माचें पांघरूण घेण्याची त्याला जोंपर्यंत आवश्यकता वाटत राहील तोंपर्यंत हा प्रकार असाच चालत राहणार हें उघड आहे. गवयांनीं मात्र कोल्हटकरांच्या टीकेला भिऊन कायमचा पोबारा केलेला दिसतो. फार तर रामभाऊ कुंदगोळकर व मास्तर कृष्णराव यांच्या बैठकी गाण्यांत जुनी संगीतकला व तिचे कोल्हटकरांनीं वर्णिलेले विशेष थोडेफार अवशिष्ट राहिले असतील तेवढेच काय ते! ग्रामोफोन, बोलपट, रेडिओ किंवा ठिकठिकाणचीं म्युझिक सर्कल्स यांच्या उत्तेजनानें संगीतकलेला लागलेलें स्पृहणीय वळण पाहून कोल्हटकरांना स्वर्गांत देखील आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. त्यांची हजामतीची नीतिमीमांसा थोडीफार आजहि लागू पडण्यासारखी असली तरी हल्लींचा न्हावी आपल्या तत्कालीन पूर्वजांप्रमाणें आतां रानटी राहिला नसून पूर्वींच्या सलूनवाल्या न्हाव्याइतकाच आतां धोकटीवाला न्हावी दुर्मिळ झाला आहे, हें नमूद करण्यास संतोष वाटतो. हल्लीं प्रत्येक आबालवृद्ध पुरुषाच्या मस्तकावर कौशल्यपूर्ण रीतीनें वारंवार कर्तन करून व्यवस्थितपणें राखलेलें रमणीय केशोद्यान दिसेल, एवढेंच नव्हे, तर पुरुषांच्या या विशिष्ट अधिकाराचा हेवा वाटून कांहीं मत्सरी स्त्रियांनीं ह्या बाबतींत आपला बरोबरीचा हक्क प्रस्थापित करण्याचा उपक्रमहि केला आहे. पुरुषाप्रमाणें स्त्रीनेंहि केलेलें हें केशकर्तन पाहून सुधारकांना असह्य झालेली स्त्रियांची गुलामगिरी आतां केसाइतकीहि राहिली नाहीं, हें वरवर पाहणारासहि पटेल. ज्योतिषी, साधुसंत, याचक हे तर सार्वकालिक विनोदाचे विषय होत व जोंपर्यंत जन्मापूर्वींची व मरणानंतरची स्थिति समजून घेण्याचें साधन आपणांस उपलब्ध झालें नाहीं तोंपर्यंत भोळ्या भाविकांची भविष्यकथनावर श्रद्धा बसणार व भविष्यवाद्यांची पोळी पिकून दुरून सूक्ष्म निरीक्षण करणाऱ्यांचे दोघेहि सारखेच हास्यविषय होणार, हें निर्विवाद होय.

प्राथमिक शिक्षणाचा कायदा होऊन त्याच्या प्रसाराचीं सूत्रें स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्वाधीन झालीं असलीं तरी लोकांमधील दुरन्त अज्ञानान्धःकार

किमपीहि कमी होण्याची आशा दिसत नसल्यामुळें बुवाबाजीची ओरड आणखी किती दिवस चालणार, हें नक्की सांगतां येणें कठिण आहे. किंबहुना, बुवाबाजीचा जुना प्रकार गेला तरी प्रत्यहीं नवे नवे प्रकार प्रवर्तित करून भोळया भाविकांची भाबडी श्रद्धा आपणांकडे अखंड आकर्षित करून घेण्याची शक्ति आधुनिक बुवांच्या सुपीक मेंदूंत कांहीं कमी आहे असें मानण्याचें कारण नाहीं. बिचाऱ्या अशिक्षितांनींच हा साधुसंतांचा वर्ग पोसून पुष्ट केला आहे, हें म्हणणें आतां धादांत खोटें ठरत आहे. सुशिक्षितांनीं बुवांचे 'उदो उदो' करावे, बुवांच्या भजनीं आपल्या बायकामुलींसह लागावें, बुवांच्या अन्नसंतर्पणासाठीं पाण्यासारखा पैसा खर्च करून आपल्या इस्टेटी बुवांच्या चरणीं अर्पण कराव्यात व अखेरीस आपल्या मुलांबाळांस भिकेस लावावें, हा आधुनिक बुवाबाजीचा नमुना कांहीं दुर्मिळ नाहीं. साधुसंतांवरील कोल्हटकरांच्या निबंधानें अशांच्या डोळयांत झणझणीत अंजन पडलें तर हवें आहे. परंतु बुवांचे हे भगत सुशिक्षित असल्यामुळें बुद्धि-प्रामाण्यवादी नाहींत. ते शब्दप्रामाण्य मानतात, पण ते एकट्या बुवांचेंच. अन्धश्रद्धा हा त्यांचा मार्ग, बुवाभक्ति हें त्यांचें साधन व बुवाचा प्रसाद हा त्यांचा मोक्ष होय. नास्तिकतेकडून आस्तिक्याकडे ते झुकले असल्यामुळें कसल्याहि नास्तिक युक्तिवादास ते दाद देत नाहींत, इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष प्रमाणें दाखविलीं तरी बुवांविषयीं त्यांचीं मनें कलुषित न होतां विकृत मनोवृत्तीचीं माणसें म्हणून अशा निंदकांचा ते धिक्कार केल्याशिवाय राहत नाहींत. 'असाध्य रोगी' म्हणून कोणाहि समाजवैद्यानें त्यांची आशा सोडली पाहिजे.

तेलंगी भटांचा लोचट याचक-वर्ग आतां वेदघोषाइतकाच दुर्मिळ झाला आहे. पिढ्यानूपिढ्या चालणारीं घरंदाज भिक्षेकऱ्यांचीं घराणीं एखाद्या आडगांवीं आढळलीं तरी भिक्षेकऱ्यांच्या धंद्याचा प्रतिष्ठितपणा हळुहळू सर्वच हिंदुस्थानवासीयांस आतां पटत चालल्यामुळें या धंद्यांत बेसुमार गर्दी होऊं लागण्याचा संभव आहे. म्हणून बंडुनानांना आलेले अनुभव आपल्यामधील खाऊनपिऊन सुखी असणाऱ्या अपवादभूत दुढाऱ्यांस वाढत्या प्रमाणावर येणार. विशेषत: लोकशाहीच्या उदयाबरोबर उत्पन्न झालेल्या सार्वजनिक लोकोपयोगी संस्थांच्या स्वयंसेवकांनीं पूर्वीच्या याचकांची जागा आतां घेतली असल्यामुळें बंडुनानांप्रमाणें कांहीं तरी युक्त्या प्रयुक्त्या करून त्यांना टाळा देण्याच्या तयारींत राहण्याची धोक्याची सूचना अशा यजमानांना कोल्हटकरांच्या निबंधवाचनानें मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु बंडुनानांचे ग्रामस्थ आतां पूर्वीप्रमाणें सुशील राहिले नसल्यामुळें तसे ठराव

आतां पसार करून घेण्यास मारामार पडेल. शिवाय हे याचक सुशिक्षित व प्रतिष्ठित असल्यामुळे यांच्या तावडींतून सुटण्यास बहुमोल पैशाऐवजीं निदान बिनमोल मेंदू तरी बराच खर्च केल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

शारदा कायद्यानें बालावृद्धविवाह होणें अशक्य करून टाकल्यामुळे व 'बापानें केलें, मुलाला भोंवलें' या न्यायानें पूर्वजांच्या पापांमुळे आमची आयुर्मर्यादाहि कमी कमी होत गेल्यामुळें तीन तीन चार चार विवाह करण्याचें भाग्य थोड्यांच्याच वांटणीला येतें. त्यांतून चुकून एखादा जरठ-कुमारीविवाह होण्याची कुणकुण कोणाला लागली कीं, कित्येक तरुण-वीर प्रेमाचा धुडगुस घालून सुभद्रा-हरणाचें अनुकरण करतात व त्या भग्नदंत नवरदेवाची दंतवैद्याकडून बसविली गेलेली नवी बत्तिशी पुन्हां त्याच्याच घशांत घालतात. हें वर्तमानपत्रांत कोणीं वाचलें नाहीं? या पुंड लोकांची दहशत बसली, शिक्षणानें मुली बेफाट झाल्या, लोकापवाद सहन करण्याचें त्राण उरलें नाहीं, किंवा स्वतःची स्वतःलाच लाज वाटली म्हणून म्हणा किंवा कोणत्याहि प्रकारची प्रतिज्ञा करून ती पार पाडण्याइतकी कुवत हल्लींच्या पिढींत राहिली नाहीं म्हणून म्हणा, पण सुदामपंतांच्या भीष्मप्रतिज्ञेच्या वेळची परिस्थिति आतां राहिली नाहीं, याबद्दल पुरुषवर्गास खचित वाईट वाटल्याशिवाय राहणार नाहीं. पण दुःखांत सुख एवढेंच कीं, लग्नसमारंभाच्या पूर्वीच्या मिरवणुकी व सोहाळे आतां राहिले नसल्यामुळें व बदललेल्या फॅशनमुळें लंकेची पार्वती होऊन राहण्याचा प्रसंग येत असल्यामुळें स्त्रियांनाहि नाक वर करून पुरुषांना खिजवितां येणेंहि अशक्य झालें आहे.

ब्रह्मदेवाची श्रावणी जो शिमगा त्याची वासलात लागल्यानंतर मनुष्यांची श्रावणी वाऱ्यावर विरून जावी, हें क्रमप्राप्तच आहे. तेव्हां पंचगव्याचें स्वारस्य कळण्यास निदान पुढील पिढीस खूपच यातायात पडेल. त्याचप्रमाणें यज्ञोपवीताचेंहि वैयर्थ्य पटल्यामुळें तरुण पिढीनें त्याचा त्याग करण्याचें ठरविलें असून संध्या, चित्राहुती, सोंवळें-ओंवळें यांस कलिवर्ज्य प्रकरणांत ढकलून दिलें आहे. कोणत्याहि धर्माचीं बंधनें न पाळतां जगाचा रहिवासी होण्याचा मान आमचा आजचा साम्यवादी आर्य सुपुत्र खचित मिळवील, अशी आशा करण्यास जागा आहे.

आज पाव शतक लोटून वर दहा वर्षे झालीं तरीहि वर्तमानपत्रकर्त्यांच्या धंद्याविषयीं कोल्हटकरांनीं केलेलें भाकित खरें ठरलें आहे. स्वतंत्र रीतीनें केल्यास हा धंदा पदरमोडीचा असल्यामुळें कोणाहि एका व्यक्तीस अखेरपर्यंत तग धरून

राहणें अशक्य आहे. हा जोड-धंदा म्हणूनच यशस्वी होणारा आहे व त्याला कोल्हटकरांनीं सांगितलेल्या युक्त्यांचा अवलंब केल्यास लोकांच्या कुचेष्टेबरोबरच आपली प्रतिष्ठाहि निःसंशय वाढीस लागेल. वर्तमानपत्रकारास किंवा मासिककर्त्यास अजून फारशा विद्वत्तेची जरूरी लागत नाहीं. किंबहुना विद्वत्तेचें व लोकप्रियतेचें व्यस्त प्रमाण असल्यामुळें त्या दोघांना एकत्र आणूं पाहणें आत्मघातकीपणाचें आहे. त्यापेक्षां फुकट प्रसिद्धीच्या आमिषानें कित्येक आशाळभूत विद्वान् पदरीं बाळगणें विशेष सोइस्कर असतें; किंवा चार पैसे टाकले कीं, कोणत्याहि विद्वानाचा लेख हमखास मिळवितां येतो. 'प्रत्येक माणसाची एक ठराविक किंमत असतेच' हें बेकनचें म्हणणें आजच्या आर्थिक युगांत तरी खोटें ठरण्याचा संभव नाहीं.

मुंबईच्या दीपोत्सवापेक्षां 'मुंबईचें प्रदर्शन' हा लेख अधिक वाचनीय आहे. पांडुतात्या आणि बंडुनाना यांचे पोषाख, आगगाडींतील गर्दी, मुंबईच्या राहणीची त्रेधा, तेथील विचित्र नांवांची विचित्र उपपत्ति व प्रदर्शनाचें एकंदर वर्णन—विशेषतः हॉटेलमधील सीन—हे वाचतांना हांसून हांसून पोट दुखतें. त्याचप्रमाणें 'चोरांचें संमेलन' व 'साहित्यपरिषदेची तयारी' हे लेखहि असेच विनोदप्रचुर आहेत व हल्लींच्या परिषदा आणि संमेलनें यांचा त्यांनीं केलेला परिहास अत्यंत हृदयंगम झाला आहे.

'यांत्रिक चमत्कार' यांतील विनोद ओढूनताणून आणलेला दिसतो. 'लेखनकलेंतील स्थित्यंतरें' म्हणजे एक गंभीर टीकालेख असून त्यांत विनोद फक्त त्याचा कंटाळवाणेपणा घालविण्याकरितां मधून मधून शाब्दिक कोट्यांच्या रूपानें पेरण्यांत आला आहे. 'चित्रकार' अगदींच सामान्य दर्जाचा असल्यामुळें अतिशयोक्तीची अतिशयोक्ति करून विनोदाच्या बालिशतेवरच लेखकानें मनोरंजनाचें काम सोंपविलें आहे. ज्याच्यामुळें कोल्हटकरांच्यावरील कानड्यांचा राग निषेधरूपानें प्रगट झाला तो लेख म्हणजे 'भाषा आणि इतिहास' हा होय. परंतु त्यांत हजामअल्ली, पाजीराव इत्यादि पोरकट कोट्या किंवा तितक्याच पोरकट व्युत्पत्त्या यांच्या आधारानें विनोदाची सजावट केलेली असल्यामुळें तो कोल्हटकरांच्या चांगल्या लेखांत मोडतो, असें म्हणवत नाहीं. छायाचित्रांतील विनोदप्रसंग फार शिळे झाले असल्यामुळें त्यांचीहि भट्टी बरोबर साधलेली नाहीं. आमच्या बैठ्या खेळांतील अत्युक्तिपूर्ण वर्णनें मात्र अनावर हांसू आणतात व बसल्या बसल्या व्यायाम घेण्याची त्यांतील कल्पना अभिनव आहे व ती पुष्कळ ऐदोबांस पसंत पडण्यासारखी आहे.

कोल्हटकरांची प्रतिभा त्यांच्या शेवटच्या चारी लेखांत चांगली प्रत्ययास येते. निद्रेच्या बृहत् आणि लघु स्वरूपाची त्यांची मीमांसा अतिशय मार्मिक आहे. आतांपर्यंत अनेकांनीं ' मत्कुण-प्रताप ' गायिला असेल, परंतु उपमादृष्टान्तांनीं व तत्वमीमांसेनें सजविलेलें हें कोल्हटकरांचें वर्णन अजरामरच राहील. त्यांत बंडुनाना व पांडुतात्या या दुक्कलीनें हातभार लावल्यानें बंडुनानांचा निद्रानाश व पांडुतात्यांची अतिनिद्रा यांच्या सुरस कथांची भर पडून या लेखाचें स्वारस्य अधिकच वाढलें आहे. नानाप्रकारचे नवस-सायास, मंत्र-तंत्र, अंगारे-धुपारे, उतारे-तोडगे व गंडे-दोरे यांच्यासारखे ' यशःसिद्धीचे सोपे व अचूक मार्ग ' दृष्टीआड करणाऱ्या नव्या पिढीची त्यांनीं केलेली सोदाहरण थट्टा अत्यंत मनोरंजक झाली असल्यास नवल काय ? परंतु त्यांच्या गांवच्या पाण्याच्या दुर्भिक्षतेची त्यांनीं जी गोष्ट सांगितली आहे ती अत्यंत मनोवेधक असून एका अगदीं साध्या प्रसंगाभोंवतीं निरनिराळ्या बारीकसारीक गोष्टींचें जाळें विणून ती अतिशयोक्तीनें खुलवून सांगण्याची त्यांची हातोटी प्रेक्षणीय आहे. तसेंच आम्हां हिंदूंचा धर्माभिमान किती पोकळ असतो, स्वतःच्या खिशाला चट्टा बसण्याचा प्रसंग आला असतां किंवा आपल्या हाडींमासीं खिळलेल्या परंपरागत कल्पनांचा त्याग करण्यानें मोठें राष्ट्रकार्य साधण्यासारखें असतां तेवढ्या क्षुल्लक त्यागासहि आपली कशी तयारी नसते हें ' धर्मान्तर ' या निबंधांत उत्कृष्ट रीतीनें दर्शविलें आहे. आपली धर्मश्रद्धा अंतःकरणाच्या तळमळीची नसून वेगडी असते व तिच्यांत आपले अनेक स्वार्थ गुंतलेले असतात. ज्या ठिकाणीं धर्मश्रद्धेस तिलांजली दिल्यानें व सुधारक बनण्यानें घबाड हातीं येण्याचा किंवा साहेबाच्या जातिबांधवांची लाभदायक मर्जी संपादण्याचा प्रश्न असतो, तेथें आपण आपला धर्माभिमान व आपल्या चालीरीति कशा गुंडाळून ठेवतों तें वैयक्तिक बाबींतच काय पण तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणींहि अनेक वेळां दृष्टोत्पत्तीस येतें. कोल्हटकरांनीं पांडुतात्या व जान्या महार, तसेंच त्यांच्या मुलांचें धर्मांतर, यांच्या चित्ररेखनानें हिंदु विचारसरणीचें ओझरतें दर्शन करविलें आहे. त्याचप्रमाणें स्वतःच्या उच्छृंखल विषयसुखाच्या पूर्तीसाठीं धर्मांतर करणाऱ्या देवीदासाचीहि गोष्ट सांगून पतितपरावर्तनाच्या चळवळीच्या मर्यादाहि त्यांनीं सूचित केल्या आहेत.

कोल्हटकर हे स्वभावतःच विनोदी असत. त्यांचा विनोद ओढून ताणून आणलेला नसे. त्यांच्या विनोदांत जी क्लिष्टता आली आहे ती कृत्रिमतेमुळें नसून

त्यांच्या विस्तृत वाचनाचा त्यांच्या कल्पनाप्रवण बुद्धीवर झालेल्या संस्काराचा तो परिणाम होय. त्यांची ही विनोदवृत्ति त्यांच्या इतर लेखनांतहि दृष्टोत्पत्तीस येते. मग तो निबंध ऐतिहासिक पर्यालोचनात्मक असो किंवा कविसंमेलनाचें अगर साहित्यसंमेलनाचें अध्यक्षीय भाषण असो. त्यामुळें त्यांचें कोणतेंहि लेखन कंटाळवाणें न होतां उलट वाचकांच्या मुखावर क्षणोक्षणीं हास्यलहरी चमकविल्याखेरीज राहत नाहीं. त्यांची ही विनोदबुद्धि अगदीं अखेरपर्यंत कायम होती. आपल्या १९०८ सालच्या निबंधांत त्यांनीं ग्रथित केलेले ' म्हातारपणाचे फायदे ' पुढें २५ वर्षांनंतर थोडेफार त्यांच्याहि अनुभवास आले होते व त्याबद्दल खंती वाटून घेण्यापेक्षां ते खेळकर वृत्तीनेंच त्यांजकडे बघत. त्यांच्या ह्या म्हातारपणांतील विनोदबुद्धीची निदर्शक अशी ' बबीची तयारी ' ही रत्नाकरांत प्रसिद्ध झालेली गोष्ट नर्मविनोद व गूढविडंबन या दोन्ही दृष्टींनीं वाचनीय आहे.

कोल्हटकरांच्या विनोदाचें सामान्य स्वरूप त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे " एकाद्या परिचित सिद्धांताचा विरोधी अपसिद्धांत घटकाभर खरा मानिल्यास त्यापासून निघणारी अनुमानपरंपरा आपल्या पूर्व अनुभवाशीं किती विसंगत व हास्यास्पद ठरते हें दाखविणें. या लेखनपद्धतींत लेखकाची भिस्त अन्वयापेक्षां व्यतिरेकावर, सादृश्यापेक्षां विरोधावर व बुद्धीपेक्षां कल्पनेवर असते. " हे विनोदी लेख त्यांनीं ' सुदाम्याचे पोहे ' या टोपण नांवांनीं प्रथम प्रसिद्ध केले व पुढें साहित्यबत्तिशी हें नांव निवडण्यांतहि एक प्रकारची अन्वर्थक खोंच आहे. सामाजिक सुधारणेचे ते पक्षपाती असल्यामुळें तिच्याविषयीं त्यांना वाटणारी तीव्रता त्यांच्या कित्येक लेखांत बोचक विनोदाच्या रूपानें परिणत झाली आहे. " इंद्राय तक्षकाय स्वाहा " या न्यायानें इतरांबरोबर कांहीं कांहीं सत्प्रवृत्त चालीरीतींची त्यांनीं केलेली बेसुमार टवाळी कित्येकांच्या मनःक्षोभास कारणीभूत झालेली आहे. परंतु त्या समाजक्षोभाची धार बोथट व्हावी म्हणून त्यांनीं सुदामा हा आपला मानसपुत्र उत्पन्न केला व त्यांची पांडुतात्या व बंडुनाना या दुकलीशीं गांठ घालून दिली. नानांचा मूर्खपणा व तात्यांचा आचरटपणा मराठी विनोदी वाङ्मयांत उपमानभूत झाला असून त्यांच्या तत्सदृश सख्ख्या अगर चुलतभावांच्या निर्मितीखेरीज कोणताहि विनोदी लेख परिपूर्ण होऊं शकत नाहीं, असा कोल्हटकरांमागून येणाऱ्या लेखकांचा पक्का समज होऊन बसला आहे ! या दोन पात्रांच्या निर्मितीमुळें शालजोडींतले न समजणाऱ्या सनातनी वाचकांस कोल्हटकरांच्या खुसखुशीत विनोदाचा

मनमुराद आस्वाद घेण्यास प्रत्यवाय येत नाहीं. कारण परदुःख नेहमींच शीतल असतें व हास्यविषय झालेल्या बंडुनाना व पांडुतात्या यांची वाचकांस फार तर कींव येईल पण हांसू येण्याचें थांबेल असें थोडेंच आहे! अशा रीतीनें वाचकांस प्रथमदर्शनींच मूर्ख व बावळट वाटणाऱ्या पात्रांना आपल्या उपहासगर्भ टीकेचें लक्ष्य करण्यांत कोल्हटकरांची कल्पकता दिसून येते, इतकेंच नव्हे, तर त्याच कारणास्तव सुधारक व दुर्धारक या दोघांसहि त्यांचे लेख सारखेच प्रिय झाले आहेत.

एकादी कल्पना, रूढि किंवा व्यक्ति हास्यास्पद करणें झाल्यास आपल्या आयुधागारांतील बारिकसारिक सर्व शस्त्रास्त्रें उपयोगांत आणून ते आपला हल्ला चढवीत असतात. मग त्यासंबंधींचे बालिश कोटिक्रमहि ते त्यांत अंतर्भूत करण्यास कमी करीत नाहींत. त्यामुळें क्वचित् त्यांच्या नवनवोन्मेषशाली प्रतिभेबद्दलचा आदर दुणावला तरी एकंदर विनोद अगदीं कृत्रिम वाटतो व सर्वसामान्य कोटिबेल्हाळांचें त्यानें समाधान झालें तरी रसिकांचें रंजन मात्र होत नाहीं. कोल्हटकरांच्या विनोदाची ही कृत्रिमता त्यांच्या शिष्य-प्रशिष्यांनीं पराकोटीला नेली आहे. विनोदविषयाची गंभीरता कायम राहून तर्कशुद्ध विचारसरणी न सोडतां स्वाभाविकपणें निर्माण झालेला विनोद कोल्हटकरांच्यामध्यें क्वचितच आढळतो. त्यांचें व्यक्तिमत्व भासमान होण्याइतकें त्यांच्या लेखनांत प्रतीत होतें व त्यांचे लेख वाचीत असतां विनोद उत्पन्न करण्याचा लेखक बुद्ध्या प्रयत्न करीत आहे, ही जाणीव नष्ट होत नाहीं.

कोल्हटकरी विनोदाचा डोळ्यांत भरणारा विशेष म्हणजे त्यांचा आत्यंतिक कोटिबाजपणा हा होय. लेखक कोट्यांच्यामागें लागला कीं त्याचें औचित्याकडे फारसें लक्ष राहत नाहीं व वाक्याकरितां कोटी व कोटीकरितां वाक्य, प्रसंगाकरितां कल्पना व कल्पनेकरितां प्रसंग अशी त्याची कसरत एकसारखी चालू असते व लेखनाची फुगोटी निष्कारण वाढून समुचितार्थता हा जो लेखनाचा गुण त्याला तो लेखक पारखा होतो. कोल्हटकरांचें असें पुष्कळ ठिकाणीं झालें आहे. परंतु कोट्यां-च्या जोडीला सरस कल्पना, मार्मिक दृष्टांत, गहन विचार यांची जोड मिळाल्यामुळें त्यांचें लेखन हृद्य झालें आहे.

व्यवहारांतील नित्याच्या अनुभवाचेच प्रसंग पण त्यांना कोल्हटकरांच्या प्रतिभेनें दिलेलें दिव्य स्वरूप पाहतांच कोल्हटकरांची योग्यता आपणांस कळते. साहित्य-बत्तिशींतील त्यांनीं निर्माण केलेलीं पात्रें आणि प्रसंग हीं सत्यसृष्टींत या नाहीं त्या

स्वरूपांत आढळणारीं आहेत व ‘ मत्कुणपूजना ’ सारखी सकृद्दर्शनीं असंभाव्य वाटणारी गोष्ट सुद्धां आपण प्रत्यक्ष पाहिली असल्याची ते ग्वाही देतात.

आदरणीय व्यक्तींची व देवतांची आणि उपयुक्त सामाजिक संस्थांची व चालीरीतींची आत्यंतिक टवाळी केवळ विनोदाच्या पुष्ट्यर्थ कोल्हटकरांनीं केली, हा त्यांच्यावरील आक्षेप समर्थनीय आहे. कोणत्याहि चांगल्या गोष्टीला विकृत स्वरूप देणें सोपें असतें. परंतु त्या हास्यास्पदतेमुळें अज्ञानी लोकांची दिशाभूल होऊन आस्तिक्याची व पावित्र्याची भावना नष्ट होते, इकडे लक्ष देणें जरूर आहे. ‘ आर्य-जार ’ व ‘ आर्यचोर ’ हीं विशेषणें कृष्णाला लावून त्याच्या चरित्रांतील त्यांच्या दृष्टीनें आक्षेपार्ह असलेला तेवढाच भाग चवाठ्यावर मांडण्यापेक्षां त्याच्या जगद्वंद्य गीतेबद्दल अधिक सांगण्यासारखें नव्हतें काय? कुंतीला लग्नापूर्वी मुलगा झाला, किंवा तिनें नियोगपद्धतीनें पुत्र उत्पन्न केले, द्रौपदी कर्णावर भाळली, अहल्येशीं इंद्रानें जारकर्म केलें व चंद्रानें गुरुपत्नीशीं व्यभिचार केला, ह्याच गोष्टी महा-भारतादि इतिहास व पुराणग्रंथांत महत्त्वाच्या आहेत काय? पण आपलें लेखन आकर्षक व्हावें, अश्लीलप्रिय वाचकांस गुदगुल्या व्हाव्या, याच दृष्टीनें वरील उल्लेख करण्यांत आले, हें उघड आहे. ‘ माझे टीकाकार ’ या निबंधांत कोल्हटकरांनीं केलेलें या मुद्याचें समर्थन वरील कारणास्तव लंगडें आहे. गणपति, शंकर, दत्तात्रेय वगैरे ज्या लोकविलक्षण देवता वाटतात त्यांचें विकृत स्वरूप वास्तविक नसून प्रतीकात्मक असतें व त्याचा योग किंवा मंत्रशास्त्राशीं संबंध असतो ही गोष्ट पुष्कळांस माहित नसल्यानें शिवपूजा म्हणजे स्त्रीपुरुषांच्या जननेन्द्रियांची पूजा यासारख्या अज्ञानजन्य उपपत्ति पुढें मांडल्या जातात व टवाळीचें तें एक साधन होऊन बसतें. समाजांतील जबाबदार लेखकांनीं आपल्या लेखनांत अवश्य तो संयम राखला पाहिजे नाहींतर इतरांवर त्याचा विपरीत परिणाम होतो, हें कोल्हटकरांच्या शिष्य–प्रशिष्यांनीं अनुकरण केलेल्या या दोषाच्या विकृत स्वरूपावरून स्पष्ट होतें. कोल्हटकरांच्या अनुयायांनीं त्यांच्या गुणांऐवजीं दोषांचेंच अनुकरण अधिक केलें आहे ( कारण त्यांचे गुण अनुकरण करण्यास अशक्य असून ते केवळ ईश्वरी प्रसादामुळेंच प्राप्त होणारे आहेत ) व म्हणून कोल्हटकरी संप्रदाय त्यांच्या दोषां-मुळेंच मराठी वाङ्मयांत रूढ झाला आहे. अनुप्रासात्मक रचना, कोट्यांचा सुकाळ, कल्पनांची अतिरेकी पिंजण, चमत्कृतींचा हव्यास, अतिशयोक्तीची अतिशयोक्ति, अश्लील संसूचन व पावित्र्यविडंबन हे वरील अर्थानें कोल्हटकरी संप्रदायाचे

विशेष म्हणून सांगतां येतील व ते त्यांच्या चेल्यांत व्यक्तिभेदानें थोड्याफार प्रमाणांत निःसंशय आढळतात.

## मध्यंतरींचे कांहीं लेखक

कोल्हटकरी संप्रदायांतील लेखकांचें विनोदी वाङ्मय विचारांत घेण्यापूर्वी कालानुक्रमानें कोल्हटकरांमागून येणारे प्रो. ना. के. बेहरे, श्री. ग. स. मराठे व कै. का. ना. पटवर्धन यांच्या वाङ्मयाचें परीक्षण करणें अगत्याचें आहे.

प्रो. नारायण केशव बेहरे यांनीं आपले निरनिराळ्या मासिकांत विखुरलेले १९०९ ते १९१६ पर्यंतचे विनोदी लेख " बोथट बाण " या नांवाखालीं संग्रहीत केले आहेत. परंतु ते नांवाप्रमाणेंच बोथट आहेत. विनोद उत्पन्न होण्यास अशा लेखांत जो एक प्रकारचा अणकुचीदारपणा ( pointedness ) असावा लागतो तो या लेखांत फारसा आढळत नाहीं. याची जाणीव खुद्द बेहरे यांनाहि नाहीं असें नाहीं. " प्रथम हें वाचा " असें सांगतांना " या बाणांनीं दर्शविलेली वक्रता इतरांना कदाचित् सरळ भासेल, पण हा मतभेदाचा प्रश्न बाजूस सारला असतां, महाराष्ट्रांतील रसिक वाचकांनीं या बाणांबद्दल लेखकाला निदान गुन्हेगार ठरविलें नाहीं तरी त्यानंतर सोडलेले बाण तो पुढेंमागें उजेडांत आणल्यावांचून राहणार नाहीं इतका तो हल्लीं ( सन १९२२ ) बेडर झाला आहे. " असें त्यांनीं म्हटलें आहे. त्यांचे हे शालीनतेचे उद्गार निःसंशय हास्योत्पादक आहेत ! एवढ्यावरच ते थांबले नाहींत, तर त्यांना प्राप्त झालेल्या या बेडरपणामुळें आपल्या टीकाकारांची एकदम मुस्कटदाबी करण्यासहि ते चुकले नाहींत. " ज्या वाचकांच्या प्रेमामुळें लेखकांत हें स्थित्यंतर (?) घडून आलें त्यांना शतशः प्रणाम असोत (!) त्यांच्या गोड प्रेमावरून तो मोठमोठ्या झब्बूंचा अभिप्राय सहज ओवाळून टाकतो ! " अशा आत्मप्रत्ययी लेखकाच्या अंतरंगांत प्रवेश करण्याविषयीं कोणालाहि साहजिकच कुतूहल वाटेल !

या पुस्तकांत संग्रहीत केलेल्या १८ बोथट बाणांपैकीं ' नूतन भिक्षुकी शाळा आणि याज्ञिकी महाविद्यालय '; ' जीर्णग्रंथसंशोधक पौराणिक महासमाज '; ' देवांची उत्क्रान्ति'; 'पुराणशास्त्री व प्रो. डयांडी'; 'पंडित दयासागर'; 'मिसफ्याशन'; ' चीफ कमिशनर साहेबांचे तार-मास्तर ' इत्यादि बाण तर इतके बोथट आहेत कीं, त्यांचा समावेश फार तर उलथन्याच्या वर्गांत करतां येईल. भिक्षुक वर्गाचा हा प्रश्न धर्म-प्रवृत्त लोकांच्या दृष्टीनें अनुपेक्षणीय आहे आणि जोंपर्यंत आम्ही स्वतःस हिंदुधर्मीय

म्हणवून घेत आहों तोंपर्यंत धार्मिक विधि व संस्कार करीत राहणें हें बहुसंख्याक लोकांना आवश्यक वाटेल व त्यासाठीं तज्ज्ञांची आवश्यकताहि राहणारच. 'भिक्षुक विश्वविद्यालया'ची कल्पना अतिरिक्त असली तरी हास्यास्पद होऊं शकत नाहीं. विलायतेंत किंवा विशेषतः अमेरिकेंत आजमितीसहि Colleges of Divinity आहेतच कीं नाहींत ? मग बिचाऱ्या हिंदुस्थानानेंच काय पाप केलें आहे ? यांतील विनोद 'महामूर्खशिरोमणि धर्मखद्योत वेदशास्त्रशून्य राजभटजी रुईकर' असल्या शिव्या व बाष्कळ कोट्यांभोंवतीं घुटमळत आहे. यापेक्षां 'बल्लवमहाविद्यालय' हा फर्ग्युसन कॉलेजच्या त्रैमासिकांत आलेला एतत्सदृश लेख अधिक सरस आहे व त्यांत पद्धतीबरोबरच विनोदक्षमता आहे. तसा कोठलाच प्रकार येथें नसल्यामुळें बेहेऱ्यांचा हा बोथट बाण लक्ष्यवेध करण्यास असमर्थ आहे.

वस्तुतः त्यांच्या लेखांचें विस्तरशः परीक्षण करण्याचें कारण नाहीं. ज्या काळीं लेखापेक्षां लेखकाच्या व्यक्तिमत्वाकडे व त्याच्यामागें लागलेल्या पदव्यांच्या शेंपटांकडे पाहून मासिकांत लेखांना स्थान मिळे त्या काळचे हे लेख अगदीं सामान्य दर्जाचे आहेत हें वरवर पाहणारांसहि कळून येईल. एखादी इटुकली मिटुकली गोष्ट, सामाजिक चालीरीतींवर चार कोरडे व शेलक्या विशेषणांनीं अतिरंजित पात्रांची उडविलेली टर म्हणजे विनोद, असा प्रो. बेहरे यांचा समज दिसतो. परंतु त्यांचे हे लेख वाचतांना हांसावें कोठें हेंच समजत नाहीं. वस्तुतः विनोदी लेखकानें स्वतःचें व्यक्तिमत्व केवळ निर्देशकापुरतें मर्यादित ठेवून व्याजोक्तीच्या आश्रयानें स्वनिर्मित विनोदी पात्रांविषयीं सहानुभूतियुक्त व समर्थनपर लिहिलें पाहिजे व उपहास्य विषयाभोंवतीं गंभीरतेचें आभासमय वातावरण उत्पन्न केलें पाहिजे, तरच परिणामकारक विनोद निर्माण होऊं शकतो. याच्या उलट प्रो. बेहरे यांनीं कित्येक ठिकाणीं आपल्याच पात्रांच्या टीकाकाराची भूमिका आपणच पत्करून जो कांहीं थोडा विनोद एरवीं उत्पन्न झाला असता तोहि नाहींसा करून टाकला आहे. आपण फक्त विनोद निर्माण करावयाचा व हास्याची लूट वाचकाला करूं द्यावयाची, यांतच लेखनाचें खरें स्वारस्य असतें. परंतु प्रो. बेहरे यांना एवढा संयम राहिलेला नाहीं. आपल्या विनोदानें दुसऱ्याला हांसविण्यापेक्षां त्यांच्या स्वभावाप्रमाणें ते स्वतःच मोठ्यानें हांसत असलेले त्यांच्या लेखांत दृष्टीस पडतात. सारांश, प्रो. बेहरे यांच्या लेखांत विषयांचें, कल्पनांचें, अथवा विनोद-प्रसंगांचें नावीन्य तर नाहींच परंतु विनोदी लेखकानें सांभाळावयाचें तंत्रहि त्यांस माहीत आहे असें दिसत नाहीं.

त्यांच्या अफाट वाङ्मयसंसारांत विनोदाचेंहि एक दालन आहे एवढें दाखविण्या-पुरताच त्यांच्या या 'बोथटबाणां' चा उपयोग होणारा आहे.

महाराष्ट्रांतील हिशेबनीस व विमा-तज्ज्ञ म्हणून प्रसिद्ध असलेले श्री. गणेश सदाशिव मराठे, ॲक्चुअरी, यांनीं आपले विनोदी लेख 'थालीपीठ' या नांवा-खालीं प्रसिद्ध केले आहेत. सन १९०८ मध्यें श्री. सदाशिव नारायण ठोसर यांच्या सहकारितेनें 'श्रीमद्भरताचार्य प्रासादिक नाट्यकलारुक्कुठार' म्हणून श्री. कोल्हटकरांच्या 'गुप्तमंजूष' नाटकावर त्यांनीं जी विनोदी टीका लिहून प्रसिद्ध केली होती तेव्हांपासून—विशेषतः केसरींत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या 'विलायत-विहार' पासून—विनोदी लेखक म्हणून पुष्कळांस ते माहित होते. त्यांच्या विनोदाचें स्वरूप विशिष्ट प्रकारचें असल्यामुळें त्याचा परामर्श घेणें जरूर आहे.

श्री. मराठे हे सर्वगामी व सव्यसाची लेखक असल्यामुळें गद्याप्रमाणेंच पद्यहि त्यांना वश आहे. त्यांच्या विनोदाविषयीं सर्वसामान्य विधान करावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, तो प्रहसनात्मक विनोद आहे. ह्या विधानाच्या पुष्ट्यर्थ या संग्रहांत प्रत्यक्षतः समाविष्ट केलेल्या 'सुंठकेसर नटुकलें' व 'चक्रंचक्री' या प्रहसनां-कडे बोट दाखवितां येईल. हा सर्वच विनोद विदूषकी थाटाचा व अर्थातच कृत्रिम आहे. परंतु त्यांत श्री. मराठ्यांची प्रखर कल्पनाशक्ति दिसून येते व विनोदाची 'न्यारी तऱ्हा' म्हणून तिचें महत्त्व केव्हांहि आहेच.

या पुस्तकाची अर्पणपत्रिका व बाळूरायाचें विनोदी चित्र हीं तर अभिनव आहेतच, परंतु पुस्तक-प्रकाशनाच्या वेळीं हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी असलेल्या लॉर्ड बर्कनहेड यांच्या नांवाचा फायदा घेऊन लॉर्ड ब्रोकनहेड या सहीनें लिहिलेली इंग्रजी 'फोरवर्ड' हि फार सुंदर आहे. त्याचप्रमाणें 'स्थालिप्रीत पुराण'हि अत्यंत मनोवेधक असून थालिपिठाचें व लोण्याचें दिग्दर्शित केलेलें चिरसान्निध्य व त्याचा येथें प्रस्तावनेदाखल केलेला उपयोग मार्मिक आहे. तसेंच शेवटीं कोष्टकाच्या स्वरूपांत दिलेले आभार व अखेर तांबूलसमर्पणादाखल विनोदाची तरफदारी करणारा उतारा देऊन केलेला शेवटहि नावीन्यपूर्ण आहे.

"विलायतचीं वर्णनें पुष्कळांनीं लिहिलीं आहेत, पण त्यांत कांहीं स्वतंत्र विनोदी तऱ्हा घालतां आली तर पहा," या लेखकाच्या निवेदनांतच यांतील विनोदाचें स्वरूप व्यक्त झालें असून विनोदाकरितां विनोद म्हणून बुद्ध्या केलेल्या या विनोदांत कृत्रिमता उत्पन्न झाली असल्यास नवल नाहीं. अर्थात् हास्योत्पादक नांवें,

हास्योत्पादक कोटिक्रमांनीं भरलेले वादविवाद व मनोरंजक सृष्टिवर्णनें हीं त्यांत असणें अपरिहार्य आहे. परंतु त्यांतहि नावीन्य आहेच. वर्णनांत मधून मधून हितोपदेश-पंचतंत्राच्या धर्तीवर सुरस कथा दिलेल्या असून त्यांला अनुरूप असे सफाईदार संस्कृत श्लोकहि रचून घातले आहेत. किंबहुना मधून मधून अभिजात वाङ्मयानुकारी विनोदी संस्कृत वचनें व संभाषणें किंवा त्यांचीं विडंबनें उपयोजिल्यानें मोठी मौज झाली आहे. तसेंच वयस्य आणि सुहृद यांच्या संभाषणाबरोबरच बिरबलानें आपल्या जुन्या पूर्वजाच्या धर्तीवर सांगितलेल्या गोष्टी, सिंदबादचें सफरींचें वर्णन, नारदाचें पुराण, जांगिलमामाचा खादाडपणा यांनीं विनोदास चांगलाच रंग आला आहे. 'सुंठकेसर नटुकलें' या प्रहसनवजा नाट्यसंवादांत 'पराचा कावळा' कसा होतो हें गोष्टीवेल्हाळ व तिखटमीठ लावून सांगणाऱ्या बायकांच्या संवादप्रसंगांनीं दर्शविलें आहे. 'चक्रंचक्री'मध्यें दुपारच्या गप्पासप्पांत खाद्य पदार्थांचीं नांवें धारण करणाऱ्यांच्या असंभाव्य गोष्टी विनोदोत्पादनासाठीं दिल्या आहेत. या पुस्तकांतील कांहीं कांहीं इंग्रजी शब्दांचे मराठी प्रतिशब्द चांगले आहेत. उदाहरणार्थ ऱ्हीमती ( Rhine ), दानवा ( Danube ), अरुणा ( Arno ), पानशूर, धारास्नान, रोम, रोहक वगैरे. भाषा प्रौढ व प्रवाही असली तरी एकंदर विनोदाचें नाटकी स्वरूप त्यानें कमी झालेलें नाहीं.

'नाटक्याचे तारे' हें कै. श्री. काशिनाथ नारायण पटवर्धन यांचें पुस्तक एका काळीं बरेंच लोकप्रिय होतें, पण त्यांतील विनोदाचें रहस्य चालू पिढीला कळणें अशक्य आहे. या पुस्तकांतील विनोद मराठी रंगभूमीच्या प्रारंभींच्या स्थितीला अनुलक्षून केलेला असल्यामुळें ती परिस्थिति बदलल्याबरोबर विनोदाचें स्वारस्य कमी होतें. नाट्यविषयाचा लेखकांस जिव्हाळा असल्यामुळें त्यांची टीका आवेशपूर्ण झाली असून नाटकाच्या सर्व अंगोपांगांचा त्यांनीं यथास्थित समाचार घेतला आहे. प्रारंभीं स्वतःचा या विषयांतील अधिकार निवेदन केला असून नाटकमंडळ्या, जाहिराती, नाटकगृह, देखावे, पात्रांचे पोषाख, अभिनय, मालक, नाट्यगुरु वगैरे-संबंधीं माहिती देतांना व्याजोक्ति, वक्रोक्ति, उपहास, अतिशयोक्ति या सर्व शस्त्रास्त्रांचा उपयोग करण्यांत आला असून मधूनमधून चरित्रात्मक आख्यायिकाहि घातल्या आहेत. श्री. पटवर्धन यांच्या लेखनांत प्राचीन मराठी रंगभूमीचा सूक्ष्म अभ्यास व मनुष्यस्वभावाचें मार्मिक ज्ञान व्यक्त होतें. परंतु त्यांची टीकाविषयक परिस्थिति अत्यंत निकृष्ट दर्जाची असल्यामुळें अत्युक्तीबरोबरच अश्लीलताहि

अनेक ठिकाणीं आलेली आहे व टीकाहि सर्वच ठिकाणीं व्यक्तिनिरपेक्ष नाहीं. तथापि या पुस्तकाचें नाट्यसंबंधीं टीका या दृष्टीनें ऐतिहासिक महत्त्व आहेच व तें अबाधित राहील. अनुकरण केलें जाणें हा अनुकरणीभूत ग्रंथाचा गौरव म्हटल्यास तें भाग्य या पुस्तकास लाभलें आहे. 'बगूनानां'च्या आत्मचरित्रांत नाटक्याच्या तारेंतले बरेच पडसाद दृष्टीस पडतात.

'बगूनानांचें आत्मचरित्र' या नांवाची एक ६३ पृष्ठांची छोटेखानी विनोदी गोष्ट नवजीवन, मायाविनी, पावनतीर्थ, इत्यादि पुस्तकांचे कर्ते श्री. मोरेश्वर वासुदेव जोशी यांनीं लिहिली आहे. या गोष्टीची प्रस्तावना देखील विनोदी करण्याचा लेखकाचा प्रयत्न आहे. तथापि त्यांत ग्रथित केलेलें सत्य बगूनानांच्या आत्मचरित्रावरून वाचकांच्या गळीं उतरण्यासारखें आहे. "स्वतःचे अंगीं काडीचा वकूब नसतां जे लोक प्राप्तस्थितीचा कंटाळा करतात त्यांची गत काय होते हें बगूनानांचें चरित्र वाचून स्पष्ट कळून येतें. शेण काढायला देखील अक्कल लागते व तिचाहि अभाव बगूनानांच्या ठिकाणीं होता, असें ध्वनित करणाऱ्या टारगट व कुत्सित अशा एका आगंतुकाची प्रस्तावना देण्यापेक्षां ती आजिबात न दिलेली पुरवली," असा खुलासा लेखकांनींच प्रस्तावना लिहून केला आहे.

या पुस्तकांतील विनोद अगदीं सामान्य दर्जाचा असून त्यावर 'नाटक्याचे तारे' या पुस्तकाची बरीचशी छाया पडलेली दिसते. अगदीं प्रारंभींच्या दशावतारी नाटकांवर व तत्कालीन नाटकमंडळ्यांवर अधिष्ठित झालेला विनोद १९२६ सालांतहि लोकांना रुचेल असें मानणें म्हणजे वाचकांच्या अभिरुचीची बरीच ओढाताण करण्यासारखें आहे.

## गडकरी आणि त्यांचे चेले

प्रतिभाशाली नाटककार, कवि आणि विनोदी लेखक म्हणून ज्यांनीं आपल्या ललित लेखनानें महाराष्ट्र-रसिकांस कांहीं काळ वेडे करून टाकलें होतें त्या कै. राम गणेश गडकरी यांचे विनोदी लेख 'संपूर्ण बाळकराम' या नांवानें प्रसिद्ध करण्यांत आले आहेत. त्यांच्या काव्यांतील अगर नाटकांतील विनोदाचा या ठिकाणीं विचार कर्तव्य नाहीं. कारण खास विनोदी गद्यवाङ्मयाचाच आपणांस परामर्ष घ्यावयाचा आहे.

'संपूर्ण बाळकराम' या पुस्तकांत संग्रहीत केलेले अपुरे लेख सोडल्यास 'छोट्या जगूच्या रिपोर्टा 'खेरीज इतर सर्व लेखांचा हेतु त्या त्या सामाजिक व्यंगांवर

टीका करण्याचा असल्यामुळें साहजिकपणें मनोरंजनाबरोबरच बोधप्राप्तीहि होते. आमच्या लग्नसंस्थेची सांप्रतची अनुकंपनीय स्थिति, नवरबापांची चढेल बेपर्वाई, हुंड्याची प्राणघातक चाल व अनेकविध धर्मभोळया समजुती यांमुळें मुलींच्या बापांची होणारी कुचंबणा यांसंबंधींची गोविंदाग्रजांची खरमरीत टीका अत्यंत परिणामकारक वठली आहे. मासिक मनोरंजनांत येणाऱ्या 'स्वयंपाकघरांतील गोष्टी' या सदरावरून कल्पना सुचून जातां जातां विनोदपूर्ण शब्दांनीं स्त्रियांचे हक्क, अस्मादिकांची पूर्वजप्रीति व निकृष्ट स्थितीसहि चिकटून बसून त्यांतच अभिमान बाळगण्याची वृत्ति, धांदरट, आळशी स्त्रियांच्या स्वयंपाकघरांतील (अ) व्यवस्था, हणगोबा करून ठेवलेलीं मुलें, यांवर गोविंदाग्रजांनीं टीकाच केली आहे. 'कवींचा कारखाना' या लेखांत तर विद्यमान कविबुवांच्या काव्यविषयक हास्यास्पद कल्पना, तुटपुंजी साधनसामग्री, स्वतःच्या योग्यतेबद्दल फाजील घमेंड, कार्याकार्यविचारशून्यता आणि त्यामुळें बिचाऱ्या कवितादेवीची चाललेली विटंबना यांचें सुंदर चित्र रेखाटलें आहे. 'नाटक कसें लिहावें' याबद्दल मात्र नाविन्याचें सर्वच यश गोविंदाग्रजांना देतां येत नाहीं. आमचे चौर्यकलानिपुण नाटककार, जुन्या नाटकांतील ईशस्तुतीचे प्रकार, नटी-सूत्रधारांच्या भाषणाचे ठरीव सांचे इत्यादिकांसंबंधाची टीका 'नाटक्याचे तारे' या पुस्तकांत अगोदरच येऊन गेलेली आहे. "नाटक कसें पाहावें" या लेखांतील मूलभूत कल्पनाहि वरील पुस्तकांतच पहावयास सांपडेल. परंतु गोविंदाग्रजांची भाषाशैली मोहक, वर्णनपद्धति सरस व विनोद वरिष्ठ दर्जाचा असल्यामुळें मुळापेक्षां झाडाचाच विस्तार अधिक प्रेक्षणीय झाला असल्यास तेंहि स्वाभाविकच आहे.

लग्नसमारंभावरील सुंदर रूपक या दृष्टीनें 'छोट्या जगूचा रिपोर्ट' वाचनीय असून 'प्रमादपंचदशी' तर बोलून चालून नटांचे दोष दाखविण्याकरितांच लिहिलेली आहे. मध्यम वर्गाची सर्वच बाबतींत कशी करुणास्पद स्थिति झाली आहे, हें दाखविण्याचा 'संगीत मूकनायका' चा उद्देश असावा. 'प्रो. कोटिबुद्धे' हें दीडपानी नाटक तितकेंसें चांगलें उतरलें नसलें तरी तत्त्वचिंतनांत निमग्न असणाऱ्या व्यवहारशून्य दीर्घ-शहाण्यांची यःकश्चित् गोष्टींत सुद्धां कशी हास्यास्पद स्थिति होते, याची कल्पना त्यावरून सहज येईल. कांहीं ठिकाणची अत्युक्ति सोडल्यास 'सकाळचा अभ्यास' हा संवाद इतका स्वाभाविक उतरला आहे कीं, लोकप्रियतेचें माप अगोदरच त्याच्या पदरीं पडलें असल्याकारणानें त्याची निराळी स्तुति

करण्याची आवश्यकता नाहीं. सारांश, मनोरंजनाबरोबरच लोकांच्या डोळ्यांत झणझणीत अंजन खुपूं न देतां घालण्याचें काम गोविंदाग्रजांनीं मोठ्या सफाईनें केलें आहे असें दिसून येईल.

आपला विनोद हृदयंगम करण्याकरितां गोविंदाग्रजांनीं कोणत्या साधनांचा प्रामुख्यानें उपयोग केला आहे, हें आतां आपणांस पाहावयाचें आहे. सरस्वतीचा पूर्ण कृपाप्रसाद असल्यामुळें भाषेची मनोहर सजावट या कामीं त्यांस अत्यंत उपकारी झाली असून या बाबतींत त्यांनीं कोल्हटकरांनाहि मागें सारिलें आहे. अर्थातच थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ सांगण्याचें कोल्हटकरांचें कौशल्य यांच्या ठिकाणीं नाहीं. ठकीच्या लग्नांतील प्रारंभींचें वसंतऋतु-वर्णन, “ या जन्मीं आम्हांस कर्तव्य नाहीं ” हें उत्तर देणाऱ्या गृहस्थाची मुलाखत, ठकीचें सौंदर्य व लोकांच्या तद्विषयक ‘भिन्नरुची’चें दिग्दर्शन, ‘ तिंबूनाना व बाळक्या ’ यांचा पोपाख, आचारी धुरंधरांचीं महनीय कृत्यें, ‘ कवींच्या कारखान्यांतील कवितोपाख्यान ’ इत्यादि वर्णनें भाषेच्या दृष्टीनेंहि वाचण्यासारखीं आहेत. त्यांच्या नाटकांत दिसून येणारी भाषेची कृत्रिमता व कल्पनेच्या बेसुमार भराऱ्या या विनोदी लेखांत बिलकुल नाहींत, त्यामुळें दुर्बोधतेऐवजीं मनोरमताच सर्वत्र भरून राहिली आहे. शाब्दिक कोट्या व विनोदपूर्ण अनुप्रास यांबद्दलचा प्रयत्न जरी ठिकठिकाणीं दिसतो तरी तो कोल्हटकरांच्याइतका नाहीं ही समाधानाची गोष्ट होय. परंतु लोकांच्या धार्मिक भावनांना, उपास्यदेवतांची टवाळी करून दुखविण्याचें कोल्हटकरांचें अंधानुकरण मात्र पुरेपुर आहे. त्याचप्रमाणें शारीरिक व्यंगाबद्दल नाइलाज असल्यामुळें खरोखर अनुकंपनीय झालेल्या ठकीच्या वर्णनांतील विनोद हृदयभेदी आहे. तीच चूक भावबंधनमधील इंदूबिंदूच्या बाबतींत दिसून येते. मधून मधून व्याजोक्तिपूर्ण उपहास दिसून येत असला तरी गोविंदाग्रजांचा भर एकंदरींत अतिशयोक्तीवरच आहे. “ अष्टकन्या सौभाग्यवती भव” असा आशीर्वाद दिल्यामुळें नानांवर गुदरलेला घोर प्रसंग, भांबूरावास केलेली तार, नानांनीं जांवई होतोस कां म्हटल्यावर झालेला आजार व त्यांतील शस्त्रक्रिया, वेड्याचें इस्पितळ, बाळक्याच्या सफरींचा परिणाम इत्यादि अनेक ठिकाणीं विनोदाचें कारण अतिशयोक्तीच असल्याचें दिसून येईल. परंतु त्याबरोबरच समाजांत हरघडीं घडणारे पण कार्यव्यापृतत्वामुळें आपल्या दृष्टोत्पत्तीस न येणारे स्वाभाविक विनोदप्रसंग कांहीं यांत कमी नाहींत. परिस्थितीमुळें घडवून आणलेल्या विनोदाचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे ‘ मूकनायक ’ होय. यांत कोल्हटकरांच्या मूकनायकावर

कोटी करून विक्रांताला मुका बनवून 'नाटक हें समाजाचें चित्र आहे,' ही प्रस्तावना अक्षरशः खरी करून दाखविली आहे; आणि खरोखरच आपल्या संसाराचें हें हृदयविदारक चित्र स्वाभाविक नाहीं काय? लहान मुलांचीं रोगट शरीरें, आमच्या शिक्षणाचा फार्स, पोटाची खळगी भरण्याकरितां स्वीकारावी लागणारी स्वाभिमानशून्यता व लाचार वृत्ति, विवाहसंस्थेची थट्टा, संसारांतील वाढतें दारिद्य व पराक्रमशून्य जीवन हाच हिंदुस्थानांतील व्यक्तिमात्राचा आयुष्यक्रम होऊन बसला आहे. या भीषण सत्याची जाणीव प्रत्येकाला करून देण्याकरितां ही स्वाभाविक पद्धतीच अत्यंत परिणामकारक झाली आहे. याशिवाय कधीं औपरोधिक टीका करून तर कधीं विरोधाभास दाखवून, केव्हां समर्पक अवतरणें देऊन (वरसंशोधनांतील 'अडला हरि गाढवाचे पाय धरी' हें अवतरण किती मार्मिक व अर्थपूर्ण आहे बरें?) तर केव्हां विनोदपूर्ण शब्दप्रबंध उपयोजून, क्वचित् वस्तुतः असंबद्ध परंतु अकल्पित सादृश्य दर्शविणाऱ्या नावीन्यपूर्ण उपमांनीं तर केव्हां हास्यकारक व हृदयंगम रूपकांनीं, कोठें अप्रयोजकपणा तर कांहीं ठिकाणीं फाजील शहाणपणाचा आव; सारांश, लोकप्रसिद्ध व्यक्तींचे, स्थलांचे व कृत्यांचे विनोदपूर्ण निर्देश, नाटकी आविर्भाव, इत्यादि नाना प्रकारच्या साधनांचा शक्य त्या स्थळीं उपयोग करून त्यांनीं आपला विनोद रंगविलेला आहे. ओढून ताणून आणलेल्या विनोदाचे मासले किंवा नीरस कोट्या औषधापुरत्या कोठें कोठें मिळतील, नाहीं असें नाहीं. अश्लीलतेचें मात्र ठकीच्या लग्नाची जाहिरात हें एकच उदाहरण आहे. तिचें आणि तमाशांतील जाहिरातीचें सादृश्य एकदम डोळ्यासमोर उभें राहत असल्यामुळें अशा प्रकारचा विनोद सद्‌भिरुचीस पोषक नाहीं. परंतु असे दोष क्वचितच असल्यामुळें गोविंदाग्रजांच्या गुणसमुच्चयांत ते तेव्हांच बेपत्ता होऊन जातील. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास नाटककार व कवि म्हणून गोविंदाग्रजांचा जो आज लौकिक आहे त्यास साजेसाच उत्कृष्ट विनोदी लेखक म्हणून त्यांचा रसिकांकडून गौरव केला जाईल, यांत शंका नाहीं. परंतु ज्या सामाजिक परिस्थितीला उद्देशून त्यांनीं टीका केली आहे ती परिस्थिति झपाट्यानें बदलत असून अनुकरण करून त्याच त्याच विषयांची इतरांनीं पुनरुक्ति केल्यामुळें गडकऱ्यांच्या विनोदाचें स्वारस्य भावी पिढ्यांना वाटणें कठिण आहे.

कोल्हटकरी संप्रदायाचे जे विशेष मागें सांगितले आहेत ते सर्व गडकऱ्यांच्या ठिकाणीं दृष्टीस पडतात व त्यांच्या काव्याखेरीज बाकीच्या सर्वच वाङ्मयावर

कोल्हटकरांच्या लेखनाची छाया पडलेली आहे. गडकऱ्यांनीं कोल्हटकरांची केलेली उसनवारी अनेक लेखकांनीं दाखविली असून तो आतां वादग्रस्त मुद्दा राहिला नाहीं. परंतु उसनवारी आणि अनुकरण केलें तरी त्यांचा उपयोग मूळचें सौन्दर्य द्विगुणित करण्यासाठींच केला असून त्यांच्या अंगच्या उज्ज्वल प्रतिभेमुळें दुधांत साखर पडल्याप्रमाणेंच झालें आहे. प्रखर कल्पनाशक्ति, जातिवंत विनोदीपणा, उत्कृष्ट भाषाप्रभुत्व हे गडकऱ्यांचे स्वभावसिद्ध गुण होत व कोल्हटकरांना गुरु केल्यामुळें मात्र त्यांच्या प्रतिभेला विशिष्ट वळण लागलें इतकेंच.

प्रि. प्र. के. अत्रे हे आपणांस गडकऱ्यांचे शिष्य म्हणवितात. यांच्या बहुरूपी व बहुगुणी वाङ्मय-सेवेनें यांनीं गडकऱ्यांशीं असलेलें सजातीयत्व सिद्ध केलें आहे. गडकऱ्यांप्रमाणें ते एक प्रसिद्ध कवि, विनोदी लेखक व नाटककारहि आहेत. विनोदी टीकाकार व लघुकथालेखक म्हणूनहि त्यांनीं कीर्ति संपादिली असून त्यांचा शिक्षण-शास्त्राचा व्यासंग त्यांच्या वरिष्ठ शिक्षणाचें व व्यवसायाचें फल होय. त्यांच्या विनोदांत त्यांच्या गुरु किंवा परात्पर गुरुप्रमाणें तरल कल्पनेची अश्रांत भरारी, बुद्धिमत्तेची चमक, सर्वगामी संचार व कोट्यांची व कोपरखळ्यांची अनिवार हौस दिसून येते. वाचक एका कोटीचा आस्वाद घेतो न घेतो तोंच दुसरी, लगेच तिसरी, याप्रमाणें त्यांच्या कोट्यांच्या माराखालीं व तज्जन्य हास्य-विनोदाखालीं मनुष्य अगदीं हैराण होऊन जातो. पुण्यांतील श्री. अधिकारी यांनीं भरविलेल्या कविसंमेलनांत स्वागताध्यक्षाच्या खुर्चीवरून त्यांनीं केलेलीं प्रास्ताविक व समारोपाचीं भाषणें ज्यांनीं ऐकलीं असतील त्यांना त्यांचा विनोद सहजात आहे हें पटलें असेल. या विनोदाला त्यांचें विस्तृत वाचन, सूक्ष्म अवलोकन व सर्वगामी संचार हा उपकारक झाला आहे व त्यांचें विनोदक्षेत्रहि विस्तृत झालें आहे. परंतु गडकऱ्यांचा किंवा कोल्हटकरांचा ध्येयवाद त्यांचेजवळ नसल्यानें त्यांचें लेखन उथळ झालें आहे. खावें, प्यावें, मजा करावी, हांसावें, खिदळावें व आजचा दिवस उत्तम गेला, उद्यांहि असाच जाईल—जावा,—अशा आत्मविश्वासानें ते आपल्या भोंवतीं हास्याची लयलूट करून सोडतात. त्यांच्या 'वाळूची बायको' या गोष्टीमधील वाळूच्या मित्रासारखीच त्यांची खेळाडू व गुलहौशी वृत्ति आहे. त्यांच्या ठिकाणीं समकालीनांबद्दल मत्सरबुद्धि नसेल पण झोंडपणा आहे, कुचाळी करण्याची हौस व करूं देण्याचा मनमोकळेपणा आहे. त्यांच्या 'झेंडूचीं फुलें' या विडंबनकाव्यावरून व त्यांच्यासंबंधीं उत्पन्न झालेल्या वर्तमानपत्री वादरणांवरून हें दिसून येईल. त्यांच्या

विनोदांतील उपहासपरतेमुळें तो अधिक मर्मभेदक होतो व वैयक्तिक टीकेचा मोह त्यांना आवरतां न आल्यामुळें त्यांनीं आपणांस अकारण कित्येक अमित्र जोडले आहेत. गडकऱ्यांप्रमाणें अत्यंतातिशयोक्ति हा त्यांच्या विनोदी लेखनांतील मोठाच दोष आहे. कोट्यांविषयींची आपली इच्छापूर्ति करण्यासाठीं ते प्रसंगीं बीभत्स, आचरट व अश्लील कोट्या करण्यास मागेंपुढें पाहत नाहींत. त्यांच्या लेखनांतील दोषाविष्करणाच्या दृष्टीनें त्यांची ‘ जाबुवंत दंतमंजन ’ ही गोष्ट वाचण्यासारखी आहे. या गोष्टींतील सुंद्रीचें किळसवाणें वर्णन रसभरित करण्यांत त्यांनीं आपल्या गुरूवर ताण केली असून नावीन्याभावामुळें ही गोष्ट नीरस झाली आहे. इतकेंच नव्हे, तर ह्या गोष्टींतील आचरट विनोद किळसवाणा झाला आहे. तथापि त्यांच्या ‘ ब्रॅन्डीची बाटली ’, ‘ टांगेवाला ’, ‘ बाळूची बायको ’ या गोष्टी चांगल्या असून त्यांची ओघवती भाषा, जोरदार लेखनशैली व हास्यलहरी निर्माण करणारा खुस-खुशीत विनोद, वरील कांहीं ढळक दोष वगळल्यास, सर्वत्र आढळतो. विशेषतः उपहासपर टीकेंत ते कुशल असून मराठी काव्यांत विडंबनकाव्याची प्रभावी प्रथा त्यांनींच पाडली, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. यापूर्वी ‘कुलकर्णी-लीलामृत’ ‘ वल्लवदूत ’ इत्यादि सरस विडंबनें प्रसिद्ध झालीं खरीं, परंतु अत्रे यांनीं आधुनिक कवींमध्यें या प्रकारच्या काव्याचा अग्रेसरत्वानें पुरस्कार केला असल्यामुळें त्यांच्या स्फुट विडंबन काव्याचें काव्यवाङ्मयांत स्वतंत्र स्थान आहे, ही गोष्ट निर्विवाद होय.

गडकऱ्यांचे दुसरे प्रसिद्ध शिष्य श्री. नरहर गणेश कमतनूरकर हे होत. हेहि एक प्रसिद्ध लघुकथालेखक व नाटककार असून त्यांच्या फर्ग्युसन कॉलेज त्रैमासिकां-तील ‘ संध्या’च्या सर्वोत्कृष्ट पत्रानें त्यांच्या विनोदी लेखनाचा प्रथम परिचय करून दिला. औपरोधिक व उपहासपर टीकेंत यांचा विनोद विशेष खुलून दिसतो. परंतु कल्पनेचें निरर्थक वाग्जाल निर्माण करण्यानें, बाष्कळ कोटिक्रमानें व आचरट विनोदानें त्यांनीं आपल्या लेखनाचा दर्जा कमी करून घेतला आहे.

## कॅ० लिमये, चिमणराव आणि मंडळी

कै. गडकऱ्यांनंतर कालानुक्रमानें विशेष उल्लेखनीय असे विनोदी लेखक म्हणजे कॅ० गोपाळ गंगाधर लिमये हे होत. वैद्यकी हा नित्याचा व्यवसाय असूनहि मराठी साहित्यांत यांनीं स्पृहणीय भर घातली, ही गोष्ट कौतुकास्पद आहे. हे एक उत्कृष्ट लघुकथालेखक असून आपल्या तीन विनोदी कथासंग्रहांबरोबरच त्यांनीं

आपल्या पत्नी सौ. आनंदीबाई, बी.ए., यांच्या सहकारितेनें प्रसिद्ध केलेला 'शंकूचा भाऊ' हा लघुकथासंग्रह पुष्कळांच्या वाचनांत असेल. अलीकडे त्यांनीं घेतलेला वाङ्मयसंन्यास पाहून पुष्कळांना वाईट वाटल्यावांचून राहणार नाहीं.

कै० गडकऱ्यांच्या अनुपम भाषाशैलीची जोड त्यांना मिळाली नसली तरी कॅ० लिमये हे खरोखरीचे जातिवंत विनोदी लेखक आहेत. त्यांच्या व्यवसायामुळें त्यांचा अनेक व्यक्तींशीं आलेला संबंध त्यांचें विनोदाचें क्षेत्र विस्तृत करण्यास बराच कारणीभूत झालेला आहे. त्यांचें कौशल्य जसें विनोदी चित्ररेखनांत तसें त्यांच्या विषयाच्या निवडींतहि दिसून येतें. किंबहुना तोच त्यांचा विशेष आहे. केवळ विनोदाकरितां विनोद लिहिणारे ते पहिलेच लेखक होत. एखादा समाजसुधारणेचा विषय घेऊन दुर्धारकांवर उपहासमिश्रित टीकेचे कोरडे ओढणें हा जो जुना सांप्रदायिक विनोद, त्याच्या मगरमिठींतून त्यांनीं स्वतःची सोडवणूक करून घेतली असून कलेच्या द्वारें स्वतःबरोबर इतरांचीहि सात्त्विक करमणूक करणें व मनोरंजनाबरोबर स्वाभाविक रीत्या होईल तो बोध पर्यायानें करणें, हें त्यांच्या विनोदी लेखनाचें ध्येय आहे. आपल्या नित्याच्या अवलोकनांत जे स्वभावविशेष, जे अनुभव, जीं दृश्यें दिसतात त्यांतील हास्योत्पादकता कौशल्यपूर्ण रीतीनें वर्णन करण्यास लागणारा कोटिबाजपणा, कल्पनाचातुर्य व प्रत्युत्पन्नमतित्व त्यांच्या ठिकाणीं पुरेपूर आहे. डोळे उघडे ठेवून बघणाराला विनोदविषयांची कमतरता पडण्याचें कांहींच कारण नाहीं, तसेंच जुन्या लेखकांनीं हाताळलेल्या विषयांचें चर्वितचर्वण करावें लागणार म्हणूनहि हताश होण्याचें कारण नाहीं. दर पांच किंवा फार झालें तर दहा वर्षांनीं समाजस्थितींत नजरेंत भरण्यासारखा फरक पडत असतो व बदललेल्या परिस्थितीबरोबर नवे नवे प्रश्न उपस्थित होऊन सृष्टींतील विसंवादित्व हुडकून काढणाऱ्या दृष्टीला नवें नवें खाद्य मिळत असतें. उणीव कशाची असेल तर ती या प्रतिभेच्या कलासक्त दृष्टीचीच !

'विनोदी लेखसंग्रह' हें त्यांचें पहिलें पुस्तक होय. यांतील पत्रलेखन उपद्यापी पाहुणा, धी न्यू ओरिएन्टल काव्य मॅन्युफॅक्चरिंग कंपनी, शिलिझिम व त्याचे भाऊबंद, स्पेशालिझम, इत्यादि लेख चांगले आहेत. 'थेरडोपंताचें लग्न' या लेखाची कल्पना 'सोनेरी टोळी' मधील सदृश कल्पनेवरून सुचणारी आहे. प्रथम प्रयत्न असल्यामुळें पूर्वीच्या लेखकांनीं हाताळलेलेच 'मत्कुणप्रताप', 'रेल्वेउतारू' इत्यादि विषय असले तरी रचनेचें व विवेचनाचें नावीन्य आहेच. परंतु कॉलेजांतील संस्कार

अजून बुझलेले नसल्यामुळें ' आमच्या कॉलेजचें गॅदरिंग', ' अभ्यास ', ' त्या टर्मस्ती परीक्षा ! ', ' मदत मदत ' इत्यादि त्या वातावरणांतील मौजा त्यांनीं चित्रित केल्या आहेत. या पुस्तकांत फाजील कृत्रिमता, ग्राम्यपणा व अतिरेकी अतिशयोक्ति हे लिमयांच्या सर्वच लेखसंग्रहांत आढळून येणारे दोष ठळकपणें दृष्टीस पडतात.

कॅ. लिमये यांच्या विनोदसागरांतील तरंगांचें सौन्दर्य आपण अवलोकन करूं लागलों तर अगदीं साध्या व नित्याच्या परिचयाच्या विषयांतून ते कसे उत्कृष्ट विनोद निर्माण करतात तें दिसून येतें. ' पाण्याच्या बादलीचा विलक्षण खटला ', ' बालगंधर्वाचें वेड ', ' मुंबईतील उद्योगधंदे ', ' स्वाभाविक कल ', ' जगप्रसिद्ध उपाय ', ' पंत नवा बूट घेतात ' हे तरंग त्यांच्या विनोदाचा उत्कृष्ट परिचय करून देतील. पाण्याच्या बादलीच्या खटल्यांतील वादीतर्फेच्या वकिलाचें भाषण अतिशयोक्त असलें तरी मार्मिक, तर्कशुद्ध व हास्योत्पादक आहे. कोर्टाचा एकंदर सीनहि उत्कृष्ट वठला आहे. चंपूताईच्या बालगंधर्वाच्या वेडाची सर्वांगीण माहिती करून देऊन बालगंधर्वाच्या वेडामुळें निरनिराळ्या धंद्यांवर कसा सुपरिणाम झाला आहे तें सांगण्यांत वस्तुस्थितिकथन तर आहेच, पण या गोष्टींतील नर्म परिहास वाचनीय आहे. मुंबईतील सर्वांत मोठा उद्योगधंदा म्हणजे जीव बचावण्याचा आहे हें अत्यंत खुबीदारपणानें व नावीन्यपूर्ण कोटिक्रमानें त्यांनीं विस्तारपूर्वक दाखविलें आहे. हा लेख वाजवीपेक्षां अधिक लांबला असला व क्वचित् कोठें पुनरुक्ति व कंटाळवाणेपणा आलेला असला तरी मुंबईचें तें वास्तवचित्र होय, यांत शंका नाहीं. यांची नळदासाची ' ससुं फुटाटा पशसस् बुळं धोः ' ही समस्यापूर्ती ध्वन्यनुकारी व मार्मिक आहे. कित्येक घमेंडखोर आईबापांना आपला बाब्या म्हणजे प्रतिबृहस्पति वाटतो व त्याच्या मोठेपणाचीं चिन्हें त्यांना पाळण्यांतल्या पायांत दिसत असतात, ह्या मनुष्यस्वभावांतील दुर्बलतेचें मनोवेधक विडंबन त्यांनीं " धंद्याकडे स्वाभाविक कल " या गोष्टींत केलें आहे. या लेखांतील द्व्यर्थी वर्णनें व अर्थपूर्ण कोट्या त्याच्या सरसतेंत भर घालतात. ' जगप्रसिद्ध उपाय ' हाहि त्यांचा नर्म परिहासात्मक लेख सुंदर वठला आहे. मधून मधून पाल्हाळिक व अत्युक्तिपूर्ण वर्णन असलें तरी नवा बूट घेणाऱ्या पंतांची झालेली फजिती चांगली चित्रित केलेली आहे. ' बोध काय घ्यावयाचा ' या गोष्टींतील चिनी नांवें गमतीदार आहेत. राजा च्यांव म्यांव, सेनापति शिकेकाई, कवि काऊचिऊ, शुकशुक बाग, जपानी कसरतपटु कंपनी ' हाकामारू व मारासोटा ' यांत नुसतें अनुकरणच नसून हास्योत्पादकताहि आहे.

'जुना बाजार' हें त्यांच्या विनोदी लेखांचें सर्वांत अलीकडील पुस्तक होय. या पुस्तकास प्रो. पोकळडोके यांची प्रस्तावना व रा. सा. चोंबडे यांचे चार शब्द असून अखेरचा उपसंहार डॉ. उप्रे यांनीं लिहिला आहे. अशा कृत्रिम उपायांनीं निर्माण केलेला विनोद विदूषकी थाटाचा होय. परंतु प्रो. पोकळडोक्यांच्या प्रस्तावनेंत केलेलें विनोदी लेखनाचें वर्गीकरण मार्मिक आहे. तथापि त्यापेक्षांहि जास्त मार्मिकता डायरीकार पांडुतात्या व कुमारी टकी यांना हें पुस्तक अर्पण करण्यांत दिसून येते. पहिल्या दोन्ही पुस्तकांपेक्षां या पुस्तकांतील भाषा रेखीव व विनोद अधिक संयमशील आहे. तथापि या संग्रहांतील लेख विशेष चांगले नाहींत. 'पंत जेवावयास जातात' याची सुरुवात चांगली असली तरी पुढील लांबण कंटाळवाणी व रसहीन आहे. 'थंडी-वातावर रामबाण' हें नुसतें शब्दजंजाळ आहे. त्यांत विनोदाचा मागमूसहि नाहीं. असलाच तर तो आचरटपणा मात्र आहे. 'तान्सा तलावदर्शन' मात्र सुंदर आहे. 'अबलाप्रभाव', 'विठ्ठलरावांच्या घरांतील शिशुसप्ताह', 'स्वारीवर हॅम्लेट' यांतील उपरोध वाचनीय असून 'पिंटोच्या आत्महत्येचा शेवट' नावीन्यपूर्ण व 'तेलाची घाणी' ही विनोदी गोष्ट सरस उतरली आहे. 'नखरे-बाज गुलाब' चें स्वभावरेखनहि चांगलें साधलें आहे.

परंतु कॅ. लिमये यांच्या विनोदाचा दर्जा गडकऱ्यांच्या खालींच लागेल. त्यांचा विनोद हास्य उत्पन्न करणारा व मार्मिक आहे. त्यांची विषयांची निवड विनोदास उपकारक व कोट्याहि नावीन्यपूर्ण आहेत. आकर्षक भाषाशैली, सुंदर वचनांची खैरात व काव्यात्मता हे जे गडकऱ्यांचे गुण त्यांच्यावर विजय संपादन करण्यासारखे महत्त्वाचे गुण कॅ. लिमये यांच्याजवळ नाहींत. परंतु त्यांचें विनोदी लिखाण सर्वांपेक्षां पृष्ठसंख्येनें अधिक असून लेखनाचा दर्जाहि चांगला आहे. सूचकता, हास्यानुकूल व स्वाभाविक व्यक्तिरेखन व विनोदप्रसंगांची निर्मिति हे वरिष्ठ दर्जाच्या विनोदाचे गुण त्यांच्या ठिकाणीं दिसून येत नाहींत.

परंतु तेच गुण त्यांचे भाचे प्रो. चिंतामण विनायक जोशी, एम्. ए., यांच्या ठिकाणीं विशेषत्वानें दिसून येतात. त्यांच्या सरस व्यक्तिरेखनामुळेंच प्रोफेसर चिंतामणराव यांच्याऐवजीं त्यांना कॅप्टन चिमणराव हें त्यांच्याच एका पात्राचें अभिधान त्यांस प्राप्त झालें आहे. ललित विनोदी लेखकांत केवळ विनोदासाठीं विनोद लिहिणारांमध्यें प्रो. चिंतामणराव जोशी हेच सध्यां तरी सर्वश्रेष्ठ विनोदी लेखक होत यांत शंका नाहीं.

प्रो. जोशी यांचें ' एरंडाचें गुऱ्हाळ ' हें मराठीमधील एक अतिशय उत्कृष्ट विनोदी पुस्तक आहे. वस्तुतः एरंडाचें गुऱ्हाळ लावल्यापासून कोणताच रस निर्माण होणें कठिण आहे. परंतु या एरंडाच्या गुऱ्हाळांत वरिष्ठ प्रतीचा हास्यरस मुबलक चाखावयास मिळतो. ज्याला प्रसंगनिष्ठ विनोद म्हणतात असा विनोद या पुस्तकांत सर्वत्र आढळतो. किंबहुना, श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांची ' साहित्यबत्तिशी ' हें जसें एका विशिष्ट प्रकारच्या बौद्धिक विनोदाचें ' एकमेवाद्वितीयम् ' पुस्तक मानतां येईल त्याचप्रमाणें हें ' एरंडाचें गुऱ्हाळ ' प्रसंगनिष्ठ व स्वभावनिष्ठ विनोदाचें ' एकमेवाद्वितीयम् ' पुस्तक ठरेल. प्रो. चिंतामणराव जोशी यांनीं या पुस्तकांत आठ विनोदी प्रसंग घातले असून त्यांपैकीं दोन वगळल्यास बाकीच्या प्रसंगांतील विनोद बहारीचा वटला आहे. प्रो. जोशी यांची विनोदी प्रसंगांची निवड नेहमींच्या अनुभवांतील व अगदीं स्वाभाविक अशी असते. त्यामुळें त्यांना कोल्हटकरांच्या प्रमाणें विनोद निर्माण करण्याकरितां आपल्या बुद्धीला राबवावें लागत नाहीं. वस्तुतः पाहणाराला जगांत विनोद सर्वत्र भरून राहिला आहे. पण जगाकडे निर्विकार दृष्टीनें पाहून त्यांतील गमतीचा आस्वाद घेण्याची विनोदी मनोवृत्ति फारच थोड्यांपाशीं असते. प्रो. जोशी हे अशा खऱ्याखुऱ्या विनोदी वृत्तीचे लेखक आहेत. ' कंपाझिटरचा सूड ' या गोष्टीमध्यें त्यांनीं एका तालुक्याच्या गांवच्या सार्वजनिक आयुष्य-क्रमाचें जातां जातां जें विहंगमावलोकन केलें आहे तें मनोरंजक वाटल्यावांचून राहणार नाहीं. विशेषतः तेथील वर्तमानपत्रांची आपसांतील लाथाळी, अशा पत्रांच्या संपादकांची बौद्धिक योग्यता, त्यांतील विषय, झटपट पुढाऱ्यांचा आपस्वार्थीपणा वगैरे सर्व प्रसंग विनोदीच होत.

' बाबू चष्मेवाला ' या दरोडेखोरानें मध्यंतरींच्या काळांत वर्तमानपत्रकारांना चांगलें खाद्य पुरविलें होतें. त्याचा फायदा घेऊन लिहिलेली ' मुलाखत ' ही गोष्ट अतिशय चटकदार उतरली असून मनुष्यस्वभावाच्या सर्व खांचाखोंचा त्यांत कौशल्यानें दिग्दर्शित केल्या आहेत. त्या मानानें ' संपादकाची करामत ' विशेष चांगली नाहीं. त्यांतील अनंत आत्माराम इङ्गळे, उखळवाडी, ता. ऊंसगांव, जि. ऋषिपूर, किंवा दशरथ विसाजी साटे, मु. चाळीसगांव, बारभाई तेरभाई छपन्नासे, अकरकी-गल्ली, इत्यादि नावीन्यपूर्ण कोटया व ' दसलाखाची' गोष्ट सांगणारा फटका हीं वाचनीय आहेत. ' जाहिरातींसंबंधीं १८३२ शब्द ' हा ललित कलाकृतीचा नमुना म्हणून सांगतां येईल, इतकेंच नव्हे, तर त्यांतील ' प्रेमसंयोग ' ही गोष्ट प्रो. जोशी

यांच्या प्रतिभेची द्योतक आहे. 'त्यानें लग्न कां केलें नाहीं' हें त्यांच्या एका पुण्य-पत्तनस्थ मित्राचें विडंबन उत्कृष्ट साधलें असून त्यांत प्रतिबिंबित झालेलें त्याचें स्वभावचित्र अत्यंत मार्मिक आहे यांत शंका नाहीं. पण 'स्मरणशक्तीचे प्रोफेसर' हा अगदींच सामान्य लेख या पुस्तकांत समाविष्ट केला नसता तर तें अधिक चांगलें झालें असतें. 'ट्रामगाड्या आणि काळ' हें अतिशयोक्त व अद्भुत-रसात्मक वर्णन असून त्यांत मुंबईंतील ट्रामगाड्यांच्या अव्यवस्थेचा भेदक उपहास केला आहे. या पुस्तकांतील सर्वोत्कृष्ट लेख व मराठी वाङ्मयांत गडकऱ्यांच्या ढुंढिराजाप्रमाणेंच चिरस्मरणीय होऊन राहणारें स्वभावचित्र 'भिमा आजी' हें होय. तिच्या स्वभावाच्या बारीकसारीक छटा तर त्यांनीं रंगविल्याच आहेत, परंतु तिच्या भाषेचें अनुकरणहि त्यांनीं अत्यंत चातुर्यानें केलें आहे. कॉलेजांतील मुलांच्या सान्निध्यांत असलेली ती एक नमुनेदार खानाबळीण काकू असून तिचा भावडा व बडबड्या स्वभाव, तिची आत्मकथा व मध्यंतरीं होणारें विषयांतर, प्रासंगिक नीतिमीमांसा, सदस्यांचे स्वभावविशेष व त्याला अन्वर्थक अशी त्यांची भाषणशैली—सर्वच कांहीं उत्कृष्ट वठलें आहे.

त्या मानानें 'चिमणरावाचें चऱ्हाट' चांगलें वठलें गेलें नाहीं. 'माझा मुंबईचा प्रवास' हें एका प्रसिद्ध प्रवासलेखकाचें विडंबन असून, मधून मधून मार्मिक कोट्या व कोपरखळ्या घालून तें चटकदार केलें आहे. यांतील बहुतेक गोष्टी अतिशयोक्त वर्णनानें व कोटिक्रमानें भरलेल्या व औपरोधिक आहेत. अलीकडे फोफावणाऱ्या विमा-एजंटांच्या त्रासाला कंटाळल्यास त्यांना कसें चुकवावें याची खाशी युक्ति त्यांनीं सांगितली आहे. लग्नसराई, यू. किडवे, आय्. सी. एस्., वरसंशोधन, अखेर लग्न जमलें, बोळवण हीं प्रकरणें म्हणजे आमच्या विवाहसंस्थे-वरील टीकाच होय. या विषयावर गडकऱ्यांनीं इतकें सुंदर व परिणामकारक लिहिलें असतांहि त्याच विषयावर प्रो. जोशी यांनींहि पुन्हां लेखणी चालविली आहे. एकाच विषयावर भिन्न गुणधर्माच्या लेखकांनीं लिहिलेलें हें लिखाण अवश्य वाचनीय आहे. एका छोटेखानी संस्थानच्या आतिथ्याचें विडंबन करणारी 'चिमणराव स्टेटगेस्ट' ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. 'कॅप्टन चिमणराव, स्काउट मास्तर' यांत बालवीर चळवळीचें दोषाविष्करण केलें आहे. चऱ्हाटांतील सर्वच गोष्टींत कथानकास अनुकूल असें विशिष्ट प्रकारचें वातावरण निर्माण करणें, प्रादेशिकता (local colour) कायम ठेवण्यासाठीं तद्देशीय वाक्प्रचार, तसेंच व्यक्तींचीं व

स्थळांचीं नांवें उपयोजणें, कथानकांतील विविध पात्रांचे स्वभावविशेष हुबेहूब चित्रित करणें हे प्रो. जोशी यांच्या लेखनाचे विशेष दृष्टोत्पत्तीस येतात. या गुण-समुच्चयांत ओबडधोबड वाळबोधी भाषा, अतिरेकी अतिशयोक्ति, अद्भुतता, इत्यादि दोष लपून जातात. तथापि प्रो. जोशी यांनीं आपल्या लेखनाचा दर्जा सांभाळण्यासाठीं विशेष काळजी घेऊन अधिक संयमशीलता दाखविली तर पहिल्या प्रतीचें विनोदी लेखन निर्माण करण्याचें सामर्थ्य त्यांच्यामध्यें खचित आहे. त्यांची भाषा ओबडधोबड असली तरी त्यांची अभिजात मार्मिकता त्यांना प्रसंगीं दगा देत नसल्यामुळें त्यांच्या उत्कृष्ट लेखनांत अनुरूप शब्दयोजनाहि आपोआप झालेली दृष्टोत्पत्तीस येते. परंतु संपादकांच्या आग्रहाला व कांहीं अंशीं स्वतःच्या आत्मतुष्टीला बळी पडून स्फूर्ति नको म्हणत असतां बळेंच लिहिलेलें सामान्य लेखन प्रसिद्ध करण्याचा मोह त्यांनीं आवरला पाहिजे. उदाहरणार्थ, रत्नाकरांत प्रसिद्ध झालेली उन्हाळा, पावसाळा, व हिंवाळा ही त्यांची लेखमाला घेतली तर 'पावसाळा आला' हा अत्युत्कृष्ट लेख सोडला तर बाकीचे लेख त्यांनीं पुनश्च लिहावयास पाहिजे होते. मार्मिक लेखकांस आपल्या लेखनाचा दर्जा दुसऱ्यांनीं न सांगतांच कळत असतो. पण आपल्या कीर्तीस अननुरूप लेख प्रसिद्ध करण्याचा मोह मोठमोठ्या लेखकांनाहि आवरत नाहीं, त्यामुळें त्यांच्या वास्तविक योग्यतेविषयीं निष्कारण गैरसमजास जागा उरते. म्हणून आपला नवा लेखसंग्रह प्रसिद्ध करतांना प्रो. जोशी अवश्य ती काळजी घेतील अशी आशा आहे.

'विनोदमंजूषा' म्हणून एक पुस्तक प्रो. गो. चि. भाटे यांचे गांवकरी श्री. वामन राजाराम टिपणीस यांनीं प्रसिद्ध केलें आहे. या मंजूषेंत त्यांनीं मनोरंजन व इतर मासिकांत प्रसिद्ध झालेले लेख एकत्रित केले आहेत. विषयाचें नावीन्य तर नाहींच, परंतु कृत्रिम विनोदहि चांगलासा न साधल्यामुळें हें पुस्तक अगदींच सामान्य दर्जाचें झालें आहे. या पुस्तकांत कोऱ्या औषधापुरत्या देखील मिळणार नाहींत. विनोदापेक्षां विनोदी म्हणून घातलेल्या पात्रांविषयीं गंभीर प्रवचन मात्र भरपूर दिलें आहे. या पुस्तकांतील बेसुमार यांत्रिकतेमुळें क्वचित्काळीं साधणारा विनोदहि नीरस झाला आहे.

## नवोदितांचा साहित्यसंसार

मराठी वाङ्मयाची नव्या जमान्यांत सर्वांगीण वाढ होत नसली तरी ललित वाङ्मयाची निपज व कलोपासनेची हौस ही वाढत्या प्रमाणावर आहे यांत शंका

नाहीं. मागें सांगितल्याप्रमाणें युरोपांतून प्रत्यहीं येणाऱ्या विविध प्रकारच्या क्रांति-कारक वाङ्मयाचा परिणाम नवोदित लेखकांवर झाल्यावांचून राहिला नाहीं. त्यामुळें सांप्रत नव्या युगाचा उषःकाल दृष्टिगोचर होत असून काव्य, नाटक व विशेषतः लघुकथा आणि कादंबरी या प्रांतांत क्रान्तीचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. तसेंच जीवनाच्या वाढत्या गरजांबरोबर क्षणभर करमणुकीचें वाङ्मयहि निर्माण होत असून जगण्याच्या कोलाहलांत जिवाला हांसवील, रंजवील व भोंवतालच्या निराशा-मय दुःखद परिस्थितीचा विसर पाडील, असा जो विनोदी वाङ्मयाचा प्रकार तोहि दृढमूल होऊं पाहत आहे. अर्थात् उपदेशापेक्षां रंजन व मतप्रचारापेक्षां बुद्धीचे चमत्कार करून मनाला विरंगुळा प्राप्त होईलसें करणें हाच हल्लींच्या विनोदी लेखनाचा प्रधान हेतु होय. थोडक्यांत हल्लींचा विनोद केवळ विनोदाकरितांच लिहिला जातो व त्यामुळें त्याला सर्वसाधारण कृत्रिमतेचें स्वरूप आलें असल्यास आश्चर्य नाहीं. वाढती गरज व अल्प पुरवठा, अशी वस्तुस्थिति असल्यामुळें वाटेल त्या मालाला तूर्त गिऱ्हाईक आहे. म्हणून लेखनाचा अपेक्षित दर्जा क्वचितच राखला जातो.

नवोदित लेखकांत कालमानाप्रमाणें पाहिल्यास श्री. यशवंत नरसिंह केळकर, वाङ्मयविशारद, यांचें 'विषयांतर अथवा विनोदलहरी' हें पुस्तक प्रथम येतें. काव्यांत व इतिहाससंशोधनांत रंगलेल्या बुद्धीस प्रस्तुत लेखन म्हणजे विषयांतरच होय. लेखकाची अशी खात्री आहे कीं, प्रसंगोपात् सुचणारा विनोद हा स्वभावतः लहरी असला तरी आपली लहर लागेल तर त्यास खेंचून आणणें अशक्य नसतें. या पुस्तकांतील सर्वच विनोदलहरी म्हणजे बौद्धिक कसरती असून सुंदर सुंदर उपमा, उत्प्रेक्षा, दृष्टान्त, रूपकें, चमत्कृतिपूर्ण कल्पना यांच्या साहाय्यानें कोटीबाज विनोद निर्माण करण्याचा प्रयत्न होय. परंतु यांतील कित्येक कल्पना चमत्कृतिपूर्ण व मनोवेधक वाटल्या तरी अन्तःकरणांत हास्यलहरी उत्पन्न करण्याचें सामर्थ्य त्यांच्यामध्यें नाहीं. नाहीं म्हणावयास यांतील 'जाहिराती व जाहिरातदार' हा लेख बुद्धिनिष्ठ सरस विनोद या दृष्टीनें वाचनीय आहे.

श्री. मोरेश्वर गोविंद सोमण, बी. ए., यांनीं 'कॉलेजविहार' या नांवा-खालीं सुमारें १५ लेखांकांत हल्लींच्या कॉलेजांतील एकंदर जीवनाचें चित्र रेखाटलें असून, त्यास 'गणगोत्र जुळलें' येथपासून ते 'सासुरवासाला सुरुवात' येथपर्यंत एका लग्नविषयक रूपकांत गोंवून मधून मधून विनोदी उपमा, दृष्टान्त, उत्प्रेक्षा, रूपकें वगैरे घातलीं आहेत. कित्येक ठिकाणीं त्यांचें स्वारस्य लक्षांत येत

नाहीं, पण त्यांचा विशेष असा कीं, तीं बायकी भाषेंत व बायकी स्वभावास शोभेशीं दिलीं आहेत. मधून मधून शाब्दिक कोटयांची पखरण पसरली असून छोटींछोटीं कोटीबाज विनोदी वाक्यें बुद्ध्या दिलीं आहेत. तीं कृत्रिम असलीं तरी मार्मिक आहेत. कॉलेजांतील जीवनक्रमाशीं ज्यांचा परिचय आहे त्यांना यांत नवीन असें कांहीं नाहीं, पण अपरिचितांस मात्र त्यासंबंधीं थोडीफार कल्पना येईल व त्याच कुतूहलानें प्रेरित होऊन श्री. न. चिं. केळकर यांनीं या पुस्तकास प्रस्तावना लिहिली आहे. श्री. सोमण यांच्या ठिकाणीं विनोदबुद्धि आहे, थोडें काव्यहि आहे व बायकीपणाहि आहे. त्या सर्वांचा मिलाफ या पुस्तकांत झाला आहे. त्यांनीं 'खेडेगांवचीं स्वभाव चित्रें' या नांवाचें दुसरें पुस्तक प्रसिद्ध केलें असून तेंहि त्याच धर्तीवर आहे. हीं दोन्ही पुस्तकें त्यांच्या दोषांकडे दुर्लक्ष करूनहि वाचनीय वाटतात.

यापेक्षां जास्त पद्धतशीर व केवळ विनोदाचाच परिपोष करण्याच्या दृष्टीनें लिहिलेलें पुस्तक म्हणजे श्री. वि. मा. दी. पटवर्धन, एम्. एस्सी., यांचें 'साहित्य-गुदाम' हें होय. 'विविधवृत्तां'त प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या टीकालेखांचा संग्रह या पुस्तकांत करण्यांत आला आहे. 'गुदाम' या शब्दानें जशी विविधता तसाच अस्ताव्यस्तपणा व मालाचा चांगलेवाईटपणाहि ध्वनित होतो, पण त्याबद्दल लेखकाची तक्रार नाहीं. कारण पुस्तक प्रसिद्ध करून मागाहून तें खपत नाहीं म्हणून पस्ताव करीत बसण्याऐवजीं अगोदरच 'पस्ताव' लिहून पुस्तकें नाहींच खपलीं तर त्यांना 'घरची वाट' दाखवून स्वतःच्या गुदामांत ठेवून देण्याचा लेखकानें घाक घातला आहे.

या पुस्तकांत श्री. पटवर्धन यांनीं अनेक 'बाज्यां'चा समाचार घेतला असून चटकदार विनोदी वर्णनानें व हास्योत्पादक कोटिक्रमानें अशा बाजीरावांचा सुंदर उपहास केला आहे. नियतकालिकांत जरी भासलें नाहीं तरी पुस्तकांत एकामागून एक व्यसनापर्यंत मजल मारणाऱ्या संवयी विनोदी सांच्यांत घालून हास्यास्पद बनविणें कांहींसें कृत्रिम व कंटाळवाणें वाटल्याशिवाय राहत नाहीं. यांतील बराचसा विनोद अतिशयोक्तीच्या अतिरेकावर उभारला असला तरी मधून मधून विनोदी कथा व प्रसंग घालून तो सजविला आहे. आपल्याच बाबाकाकांना हास्यास्पद बनविणें विनोदी जगांतल्याहि सदभिरुचीस सोडून होईल. हा प्रकार टाळला गेला असता तर बरें झालें असतें. 'पुढील पिढीचें पुणें' या लेखमालेंतील बैठकी यापेक्षांहि आकर्षक करण्याइतकें साहित्य उपलब्ध होतें. यांतील हॉटेलवाल्याची

चुनावत, रावसाहेबांवर आलेला प्रसंग, बाळासाहेब वकील, पेन्शनरांवरील व व्यायामशाळांवरील टीका हीं सुरस आहेत. किंबहुना, मधून मधून लहानलहान कथा व आख्यायिका देऊन विनोद सजविण्याची हातोटी लेखकास चांगली साधली असून कांहीं कांहीं लोकप्रसिद्ध व्यक्तींचीं विडंबनचित्रें रेखाटण्याचा व कोपरखळ्या देण्याचाहि प्रयत्न करण्यांत आला आहे. सबंध पुस्तक मनोरंजक असून त्यांतल्या त्यांत सिनेमा-कीटक, पत्तेबाज, प्रसिद्धिप्रिय, दर्शनराज, फॅशनचा घोडा, इत्यादि चित्रें मनाची चांगली करमणूक करतील. नित्याच्या परिचयाच्या दृश्यांतून हास्योत्पादक प्रसंग हुडकून काढून व स्वतःच्या कल्पनेचा मालमसाला घालून मासलेवाईक विनोद निर्माण करण्याचें कौशल्य लेखकांत निःसंशय आहे. कांहीं कोट्या व काल्पनिक व्युत्पत्त्या मार्मिक असल्या तरी लेखकाचा भर कोट्यांवर नाहीं ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट होय. अतिरंजन स्वाभाविकतेपुरतें मर्यादित करून विनोदानुकूल स्वभावपरिपोष करण्याकडे व प्रासंगिक विनोदापेक्षां विनोदी प्रसंग निर्माण करण्याकडे जर लक्ष अधिक पुरविण्यांत येईल तर यापेक्षां श्रेष्ठ व कलात्मक विनोद उत्पन्न करणें लेखकास अशक्य नाहीं. 'जीते रहो पठ्ठे' या थिल्लर नांवापेक्षां दुसरें एखादें अन्वर्थक नांव घेऊन आपला पुढील विनोदी लेख-संग्रह श्री. पटवर्धन यांनीं प्रसिद्ध करावा असें सुचवावेंसें वाटतें.

श्री. शामराव ओक यांच्या विनोदी लेखसंग्रहाच्या पुस्तकाचें 'कोपरखळ्या' हें नांव खरोखरच अन्वर्थक आहे. या पुस्तकांतील त्यांच्या कोपरखळ्यांचा प्रसाद पुष्कळांस मिळाला आहे. सुशिक्षितांस हल्लीं 'करिअर' प्रमाणें वाटणाऱ्या पण अजूनहि अशिक्षितांच्याच हातांत असलेल्या सिनेमाच्या धंद्याचें दार किलकिलें करून त्यांतील दोन दृश्यें ओकांनीं दाखविलीं आहेत. त्यांपैकीं 'मुफ्ल-आषक्' हें अतिरंजित असून 'नटीचें वाण' हें वास्तव सृष्टींतील अर
हिडीस आहे. 'माझी माफक मुशाफरी' हें नांव मोठें अनुप्रासात्मक साध
असलें तरी विनोद 'आझादमैदानावरील क्रिकेट मॅच' इतकाच नीरस बन
आहे. 'छापखान्याचा छावा' हें पुण्यांतील एका वेळच्या प्रसिद्ध साहित्यस
व्यंगचित्र असल्यास न कळे! पण तें उत्कृष्ट साधलें आहे. 'असंभवां'त
मद्राश्याची प्रणयकथा अत्यंत सुरस व हास्यकरुणमिश्रित आहे. मद्राश्यां
बेमालूम रेखाटले आहेत. 'विद्येचा कारखाना' व 'गाईचें
ह्यांत अनुक्रमें नोटा लिहिणारे व क्लासवाले शिक्षक आणि गोरक्षणाचे

ह्यांच्यावर टीका आहे. परंतु ती विशेष समर्पक साधली नाहीं. 'तीन शिलेदार' यांतील 'स्वभावचित्रण' यथार्थदर्शी आहे, तथापि त्यांत चितारलेल्या लोकप्रसिद्ध सत्त्वशील व्यक्तींबद्दल कांहीं वैयक्तिक हेवा-दावा असल्याखेरीज त्यांची अशी टर उडविण्याचें कांहीं कारण नव्हतें. मग त्यांत उल्लेखलेल्या बेरत्ता आडदांड रानवटांच्या भूमिकेंत लेखक व त्यांचा एखादा रसिक मित्र असल्यास न कळे! 'फोल खडपड' आणि 'हिजरात' हीं एका कॉलेजियनचीं व शाळामास्तराचीं अतिरंजित चित्रें होत. 'संपादक-संमेलनां'त एका माजी पुण्यपत्तनस्थ 'साहित्य चळवळया'चें सुंदर विडंबन केलें आहे. त्याचप्रमाणें एका पुण्यालगतच्या संस्थानास गव्हर्नर-साहेबांनीं दिलेली भेट व एका उदारधी व सुसंस्कृत व सुप्रसिद्ध राजपुरुषाची पुण्यांतील प्रतिष्ठित भीकमाग्यांनीं केलेली दुरवस्था यांचें व्यंग्यचित्र उत्तम साधलें आहे. 'कविणींचा मेळ' जितका गद्य तितकीच दुग्धमंदिरांतील प्रेमकथा मूळ अर्थानें 'रोमॅन्टिक' आहे. पण शामराव ओकांची भाषा रसाळ आहे. कलेच्या बेहूटपणा त्यांच्याजवळ आहे. ते जर प्रयत्न करतील व आपल्या स्वाभाविक गुणांची योग्य जोपासना करतील तर त्यांच्या हातून अधिक कलासंपन्न कृति निर्माण होतील व तशा त्या होवोत, इति शम्।

## उपसंहार

मराठींतील विनोदी वाङ्मय इतर ललित वाङ्मयाच्या मानानें तोटकें आहे. मासिकांच्या चालकांनीं आपण प्रसिद्ध केलेल्या स्फुट वाङ्मयाचे संग्रह-ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा परिपाठ कर्तव्यबुद्धीनें सुरू केला तर अज्ञाताच्या उदरांतून कित्येक वाङ्मय-रत्नें सूर्यप्रकाश बघतील व मराठी वाङ्मयाची शोभा वाढवितील. या निबंधांत जुन्यानव्या मासिकांतील विनोदी वाङ्मयाचा आढावा घेणें शक्य झालें नाहीं तरी पण या वाङ्मयाचें वर केलेलें महत्त्वमापन चुकीचें ठरेल असें वाटत नाहीं.

वर प्रतिष्ठित ग्रंथकारांच्या गुणवर्णनाबरोबरच दोषाविष्करण जें केलें तें निष्ठुरपणें पण सद्धेतुपूर्वक केवळ लोकप्रिय व्यक्तींचें दोषानुकरण होऊं नये यासाठींच, केलें आहे. एरवीं प्रस्तुत लेखकाच्या मनांत त्यांच्याविषयीं नितांत आदर आहे.

उपदेशपरतेचें युग आतां संपलें. आतां कलेचें, व्यक्तिस्वातंत्र्याचें युग सुरू झालें आहे व सामान्यतः ओबडधोबड म्हणून मानल्या गेलेल्या मराठी वाङ्मयाला सुंदर, ऐटबाज व बाळसेदार स्वरूप येण्यास त्याची आवश्यकताच आहे. हा बहुंशीं पाश्चात्य वाङ्मयसंनिकर्षाचा परिणाम आहे व तो स्पृहणीय आहे. धोक्याची सूचना

एवढीच कीं, इतर स्वातंत्र्यांबरोबर कलेची उसनवारी नको. खरेंखुरें विचारस्वातंत्र्य लेखकाच्या नसानसांतून वाहिलें पाहिजे! आपला देश, आपली परिस्थिति, आपले प्रश्न, जिव्हाळ्यानें अभ्यासले व तळमळीनें लिहिले गेले पाहिजेत व तेंच कलेचें अभिजात स्वरूप होय. 'आत्मनिष्ठा' हीच कलेला वैशिष्ट्य आणून देते. तिला उसनवारीची गरज नाहीं. वाङ्मय-क्षितिजावर जे नवे नवे साहित्यक चमकूं लागले आहेत त्यांच्या ललित कृतींकडे पाहतां, चौफेर दृष्टि ठेवून जर वाङ्मयनिर्मिति होत राहील तर आपला भाग्योदय कांहीं दूर नाहीं अशीं सुखस्वप्नें कोणासहि पडतील!

---

६

# बालवाङ्मय

[ लेखक:—श्री. गोपीनाथ गणेश तळवलकर ]

सर्व मराठी वाङ्मयच अद्यापि बाल्यावस्थेंत आहे. तेव्हां त्याची एक लहानशी शाखा जें बालवाङ्मय त्याचें शैशव अजून संपलेलें नसावें, हें साहजिकच आहे. एकंदर मराठी वाङ्मयांत जे गुणदोष व उणीवा आहेत आणि त्याच्या विकासाला ज्या अडचणी आहेत, ते गुणदोष, त्या उणीवा व त्या अडचणी बालवाङ्मयालाहि लागू पडतात. मराठी वाङ्मय उत्कृष्ट होण्यास त्याच्या निर्मात्यांच्या अंगीं जी तयारी व कुशलता अवश्य आहे तीच तयारी व कुशलता बालवाङ्मय निर्माण करूं इच्छिणाऱ्यांना अवश्य आहे.

पण यापेक्षां आणखीहि कांहीं गोष्टी बालवाङ्मयांत अगत्याच्या होऊन बसल्या आहेत. एखाद्या प्रबल राष्ट्रानें दूरचा प्रदेश काबीज केला म्हणजे तेथील राज्यव्यवस्था प्रथम त्या जेत्या राष्ट्रांतील राज्ययंत्राप्रमाणेंच असते. परंतु तो नवा प्रदेश जसजसा विकास पावत जाईल तसतशी तेथील राज्यव्यवस्थाहि त्या प्रदेशाच्या सामाजिक, भौगोलिक, व धार्मिक परिस्थितीप्रमाणें बदलत जाईल आणि अखेरीस त्या प्रदेशाचें एक स्वतंत्र राज्ययंत्र तयार होईल. राज्यव्यवस्थेप्रमाणेंच कोणत्याहि शास्त्रांतून निघालेली शाखा प्रथम प्रथम त्या शास्त्राच्या मूलतत्त्वांवर चाललेली असली तरी तिचें अखेर विशिष्टीकरण ( specialisation ) होतें, असा अनुभव येतो.

म्हणूनच बालवाङ्मयाचा विचार स्वतंत्र रीतीनें केला पाहिजे. सामान्यतः आपण बालवाङ्मय हें शिक्षणशास्त्रापासून फारसें दूर नेऊं शकत नाहीं, आणि तें फारसें चूकहि नाहीं. शिक्षणाप्रमाणेंच वाङ्मयाचाहि उद्देश मुलांच्या मनोवृत्तीला इष्ट वळण लावणें आणि त्यांच्या ठिकाणीं असलेल्या सुप्त गुणबीजांचा विकास करणें हा असला पाहिजे. परंतु शिक्षणांत जो शिस्तीचा थोडाफार रुक्षपणा आहे, तो वाङ्मयांत असतां कामा नये. वाङ्मय हें स्वतंत्र, आनंददायी व आकर्षक असलें पाहिजे.

मराठी बालवाङ्मयांत शिक्षण आणि वाङ्मय यांची सरमिसळ झालेली दृष्टीस पडते. कारण स्वतंत्र बालवाङ्मय म्हणून रचलेलीं पुस्तकें देखील शाळांतून पुरवणी-वाचनाकरितां कशीं मंजूर केलीं जातील, या धोरणानें लिहिलेलीं असतात. अर्थात् अशा लेखनाला सर्व बाजूंनीं मर्यादा पडणें अपरिहार्य आहे. अलीकडे तर पुष्कळ शिक्षकच बालवाङ्मयनिर्मितीला सक्रिय हातभार लावीत असलेले दिसतात. अध्यापनांत हे लेखक कदाचित् वाकबगार असतील, परंतु यांपैकीं कित्येकांचें वाङ्मयकर्तृत्व फार कोतें असतें, हें सहज दिसून येण्यासारखें आहे. शाळांतून मंजूर होतील या आशेनें लिहिलेलीं पुस्तकें व अंगीं वाङ्मयगुण बेताचाच असणाऱ्या अध्यापकांनीं लिहिलेलीं पुस्तकें हीं होत असल्यामुळें शालोपयोगी पुस्तकें आणि बालवाङ्मय यांच्यांतील मर्यादा ओळखतां येईनाशा झाल्या आहेत. एका प्रख्यात लेखकानें एकंदर मराठी वाङ्मयावरच ' पंतोजीपणा'ची छाया पडलेली असल्याचें एके ठिकाणीं म्हटलें आहे. बालवाङ्मयावर तर ती फारच काळीकुट्ट पडली आहे !

यावरून अध्यापनाच्या क्षेत्रांतल्या मंडळींनीं बालवाङ्मय निर्मू नये असें लेखकाचें प्रतिपादन आहे, असें कोणीं समजूं नये. उलट शिक्षणशास्त्र व बालमानस-शास्त्र यांची उत्कृष्ट बालवाङ्मयनिर्मितीला अत्यंत जरूरी आहे, असेंच तो आग्रहानें म्हणतो. परंतु बालवाङ्मयाचें स्वरूप शालोपयोगी नसावें; त्यांत वाङ्मयगुणाचा पूर्ण अविष्कार व्हावा; व तें सुंदर असावें. सुदैवानें अलीकडे श्री. विठ्ठलराव घाटे, प्रि. प्र. के. अत्रे, प्रो. श्री. बा. रानडे, प्रो. ज. नी. कर्वे, प्रि. कारखानीस, प्रो. ना. म. पटवर्धन इत्यादि शिक्षणतज्ज्ञ व विख्यात वाङ्मयसेवक बालवाङ्मयाकडे विशेष आस्थेनें पाहूं लागले आहेत. तेव्हां बालवाङ्मय उत्तरोत्तर निकोप, सर्वांगसुंदर व प्रतिभाशाली होत जाईल अशी आशा करण्यास पूर्ण जागा आहे.

## मासिकें व नियतकालिकें

' बालबोधा ' चा जन्म म्हणजे महाराष्ट्र बालवाङ्मयाचा आरंभ होय असें म्हणावयास हरकत नाहीं. अर्थात् ' बालबोध ' चे जनक कै. विनायक कोंडदेव

ओक ह्यांना ' बालवाङ्मयाचे जनक ' ही पदवी देणें युक्त होईल. १८४० ते १९१५ एवढ्या आपल्या पाऊणशें वर्षांच्या आयुर्मानांत ओकांनीं आपल्या मगदुराप्रमाणें मराठी भाषेची उदंड सेवा केली. लहानमोठीं अशीं ५० पुस्तकें ओकांनीं लिहिलीं. तीं निर्णयसागर छापखान्यानें प्रसिद्ध केलीं आहेत. तीं बालवाङ्मयांतच जमा होतात.

कै. ओकांचें शिक्षण इंग्रजी तीन इयत्तेच्या पुढें जाऊं शकलें नाहीं. परंतु व्यासंग वाढवून त्यांनीं मराठी भाषा फारच चांगली कमावली होती, ' बालबोध ' मासिकाचें स्वरूप अगदीं ठरीव पद्धतीचें असे. प्रथम एखादें प्रसिद्ध व्यक्तीचें चरित्र, नंतर बोधपर कविता, एकदोन शास्त्रीय व मनोरंजक लेख, आणि सरतेशेवटीं ' लोक काय बोलतात ' या सदराखालीं सटीक वर्तमानसार एवढे विषय बालबोधांत येत. कै. ओकांची भाषा साधी, सरळ व अनलंकृत असे. असें सांगतात कीं, दररोज चार पानें लिहिल्याशिवाय झोंपावयाचेंच नाहीं असा त्यांचा नियम असे. त्यांनीं ' बालबोध ' मासिक सतत ३ वर्षें कोणाचेंहि लेखनसाहाय्य न घेतां चालविलें. " त्यांनीं बालबोधांत एकंदर ४०२ चरित्रें, ४०२ कविता, ४०२ निबंध, ३७१ शास्त्रीय विषयांवरील निबंध, आणि इतर विषय ८५०, एवढें लिहिलें आहे. "

' बालबोध ' हें एकच बालमासिक त्यांच्या काळीं बालवाचकांची सेवा करीत होतें, हें जरी खरें असलें तरी त्यांत पुष्कळ उणीवा होत्या. एकाच लेखकाच्या लेखणींतून उतरलेले लेख वाचण्याचा बालवाचकांना कंटाळा येई. शिवाय विविधता आणि वैचित्र्य यांचा त्यांत अभाव असे. सुप्रसिद्ध बालवाङ्मयप्रणेते कै. वा. गो. आपटे यांनीं ही गोष्ट ओकांना दाखवून दिली आणि बाहेरील लेखांचा व इतर सामग्रीचा स्वीकार करण्याची विनंति केली. पण कै. ओकांनीं खडसून उत्तर दिलें कीं, " माझ्या मासिकाचें धोरण बदलावें असें मला वाटत नाहीं. मी माझ्या स्वतःच्याच लेखणीच्या जोरावर माझें मासिक चालविणार. " अर्थात् वासुदेवराव आपटे यांचा नाइलाज झाला.

' आनंद ' मासिक जन्माला येण्याचें कारण हेंच होय. वासुदेवरावांच्या डोक्यांत बालमासिकासंबंधींच्या कांहीं कल्पना होत्या. त्या ' बालबोधां 'त उतरविण्याचा त्यांनीं प्रथम प्रयत्न केला. परंतु तें जेव्हां साधेना तेव्हां स्वतःच्याच बळावर त्यांनीं ' आनंद ' सुरू केला. शिक्षकासारख्या गरीब धंद्यांत प्रथमपासून राबणाऱ्या आणि जवळ वडिलोपार्जित धनसंचय मुळींच नसणाऱ्या गृहस्थानें नवें मासिक

सुरू करावयाचें म्हणजे त्या वेळीं मोठें धाडस होतें. पण वासुदेवरावांनीं आपली सर्व तुटपुंजी मिळकत त्यांत घातली आणि १९०६ च्या ऑगस्ट महिन्यांत 'आनंदा'चा पहिला अंक काढला.

'बालबोधा' नंतर 'आनंद' ही बालवाङ्मयांतली मोठीच प्रगति होती. कारण 'बालबोधा'चें स्वरूप फारच साधें आणि जुनें होतें, तर 'आनंद' विसाव्या शतकांत त्याच शतकांतला पेहराव घेऊन वावरूं लागला. जगांतली मनोरंजक माहिती, कोडीं, गमतीचीं चित्रें, लहान मुलांसाठीं ठळक टाइपांतल्या गोष्टी इत्यादि नवे नवे प्रकार त्यांत येऊं लागले आणि लवकरच 'आनंद' आणि बालमासिक हे शब्द महाराष्ट्रांत समानार्थी होऊन बसले. 'आनंदा'बरोबर वासुदेवरावजींचें इतरहि सरस बालवाङ्मय प्रकाशित होत राहिलें. १९२५ सालापासून 'आनंदा'ला १६ पानांची एक पुरवणी 'प्रौढ विद्यार्थी व स्त्रिया' यांकरितां देण्यांत येऊं लागली. देशांत चाललेल्या सामाजिक, धार्मिक व राजकीय घडामोडींच्या दोनहि बाजू मुलांना कळाव्या व पक्षाभिमान किंवा दुराग्रह याला बळी न पडतां या विषयांची सर्वांगीण माहिती त्यांना व्हावी असा या पुरवणीचा उद्देश असे. 'आनंदा'चा हा विभाग तात्काळ लोकप्रिय झाला आणि कै. वासुदेवरावांच्या मृत्यूनंतरहि (१९३०) त्याची वाढती लोकप्रियता तशीच कायम राहिली, हें गोव्याच्या 'हिंदू'पासून तहत नागपूरच्या 'महाराष्ट्रा'पर्यंत सर्वांनीं वेळोवेळीं 'आनंदा'वर दिलेल्या अभिप्रायांवरून कळून येण्यासारखें आहे. विशेषतः देशांतील राष्ट्रीय घडामोडींची माहिती, युरोप व हिंदुस्थान यांतील नव्या राजकीय पंथांचीं माहिती देणारे लेख, वर्तमानकालीन आंतरराष्ट्रीय विभूतींचीं चरित्रें व श्री. लक्ष्मीबाई प्रधान यांचे स्त्रियांच्या जीवनावरील संवादरूप निबंध यांचा बोलबाला झाला.

'आनंद' खेरीज बालमासिकांचे थोडेफार प्रयत्न झाले आणि त्यांपैकीं कांहीं नांवारूपालाहि आले आहेत. मध्यंतरीं पुणें येथील 'बालोद्यान' प्रेसचे मालक रा. सहस्रबुद्धे यांनीं 'बालोद्यान' हें बालमासिक काढलें होतें. हें १९१९ ते १९२५ पर्यंत चाललें. प्रथम याचा आकार विस्तृत होता. पौराणिक कथा वगैरे यांत फारशा नसत. पण इंग्रजींतील 'Hippo Boy's School' च्या धर्तीवर ढुके मास्तरांच्या शाळेंतील सचित्र गोष्टी भरपूर येत. या गोष्टींतून निरनिराळ्या जनावरांना माणसांचे वेष देऊन त्यांच्या गमती चितारलेल्या असत. त्यामुळें 'बालोद्यान' हें मासिक अगदीं लहान मुलांना फार आवडत असे. 'बालोद्यान' चें हें स्वरूप फार

दिवस टिकलें नाहीं. लवकरच त्यांतील चित्रांची संख्या कमी झाली. शेवटच्या दोन वर्षांचे अंक म्हणजे २३–२४ लहान लहान पुस्तकेंच होतीं. ह्या मासिकाचें आरंभींचें धोरण कायम राहतें तर मासिकाच्या लोकप्रियतेला ओहोटी लागली नसती. पण कारखान्याच्या व्यापांत मासिकाकडे लक्ष द्यावयाला संचालकांना सवड झाली नसावी.

'शालापत्रक' हें चित्रशाळेचें मासिक अलीकडे चांगलेंच चमकूं लागलें आहे. वास्तविक हें मासिक चिपळूणकर पितापुत्रांनीं काढलें तें शैक्षणिक हेतूनें आणि त्याचें हेंच धोरण पुष्कळ वर्षें कायम होतें. 'चित्रशाळे' चे मालक चिपळूणकरांचे परम भक्त असल्यानें त्यांनीं प्रसंगीं झीज सोसून 'शालापत्रका' च्या पडत्या काळांत त्याची धुगधुगी कायम ठेवली. परंतु पांच वर्षांपूर्वी 'शालापत्रका'चें रूपांतर बालमासिकांत झाल्यानंतर मात्र 'शालापत्रक' वाढीला लागलें. रा. धोंडो सखाराम कुलकर्णी यांच्या संपादकत्वाखालीं 'शालापत्रका' ची स्थिति सुधारली आहे. भरपूर चित्रें हें या मासिकाचें एक वैशिष्ट्य म्हणून सांगतां येईल.

'बालबोधमेवा' या मासिकाचीं ५० वर्षें १९३४ सालीं पुरीं झालीं. याचे संपादक रा. देवदत्त नारायण टिळक हे हौशी व मुलांचे लोभी असून 'बालबोध-मेव्यां' त सुधारणा करण्याची त्यांची खटपट चालू असते. प्रौढ विषयांची किंवा शास्त्रांची चर्चा 'मेव्यां' त होत नाहीं. मनोरंजक गोष्टी व माहिती आणि ख्रिस्ता-संबंधीं व ख्रिश्चन लोकांसंबंधींचे लेख त्यांतून अवतीर्ण होत. तथापि या वर्षापासून रा. टिळकांनीं महाराष्ट्रांतील प्रसिद्ध लेखकांचें साहाय्य संपादिलें असून ख्रिस्तीतर मुलांनाहि 'बालबोध मेवा' आपलासा वाटेल असें व्यापक धोरण ठरविलें आहे.

मुंबईचें 'खेळगडी' (सं. पालवणकर) आणि नागपूरचें 'मुलांचें मासिक' (सं. बा. रा. मोडक) हीं मासिकें चांगलीं आहेत. 'खेळगडीं'त सोपेपणा व बाह्यांगाची सजावट यांची दक्षता बाळगिली जाते तर 'मुलांचें मासिक' विषयाच्या विविधते-कडे बरेंच लक्ष देतें. 'बालकमंदिर' या नांवाचें एक मासिक प्रो. स. बा. हुदलीकर यांनीं काढलें होतें. पण सध्यां तें कोठें दिसत नाहीं. कै. वि. कों. ओक यांच्या 'बालबोध' या आद्य बालमासिकाचा जीर्णोद्धार करण्याचा प्रयत्न पुण्याचे रा. वि. ग. ताम्हणकर यांनीं १९३२ सालीं केला, पण तो टिकाऊ झालेला दिसत नाहीं. कोल्हापूर येथील दासराम बुकडेपोनें 'बालमासिक' म्हणून एक अगदीं छोटेखानी मासिक नुकतेंच काढलें आहे.

इंग्रजी आदिकरून पाश्चात्य भाषांत मुलांच्या हरएक आवडीच्या विषयावर एकेक वर्तमानपत्र असतें. परंतु मराठींत मुलांकरितां वर्तमानपत्रें, ही कल्पनाच अद्यापि कशीशीच वाटते. तथापि मालवण येथील प्रसिद्ध बालवाङ्मयलेखक रा. पा. ना. मिसाळ यांनीं १९३४ त एक 'बालमित्र' पाक्षिक सुरू केलें. गुजराथेंतील सुरतेचें 'गाण्डीव' हें पाक्षिक सोडलें तर हिंदुस्थानांतील भाषांत मुलांचें असें पाक्षिक नाहींच असें वाटतें. या दृष्टीनें मिसाळांचा हा नवीन प्रयत्न अभिनंदनीय नाहीं असें कोण म्हणेल? मालवणसारख्या आडगांवीं साधनांचा तुटवडा असतां आपलें पाक्षिक मुलांना शक्य तेवढें चटकदार करण्याचा ते प्रयत्न करतात ही कौतुकास्पद गोष्ट होय. 'शिक्षणपत्रिका' हें एक लहानसें नियतकालिक मॉंटेसरी शिक्षणपद्धतीच्या तज्ज्ञ श्री. ताराबाई मोडक या प्रकाशित करीत असतात. खेरीज 'संजीवनी', 'प्राविण्य', 'मनोहर' इत्यादि नियतकालिकांतील बालविभाग (juvenile corner) जमेस धरले म्हणजे बालनियतकालिकांचा आढावा पूर्ण होतो.

## कथा–नाट्य–चरित्रें

सर्व जगांतील वाङ्मय घेतलें तर त्यांत कथात्मक विभाग हा इतर सर्व विभागांपेक्षां बराच मोठा आहे असें आढळून येईल. बालवाङ्मयांत तर प्राधान्येंकरून कथांचाच भरणा फार मोठा असतो. लहान मुलें भारी गोष्टीवेल्हाळ असतात. अरबी भाषेंत एका सुलतानाची गोष्ट अशी सांगतात कीं, दररोज कोणी तरी विद्वान् बोलावून हा राजा त्याच्याकडून गोष्ट ऐके आणि गोष्ट संपली कीं रागावून त्या विद्वानाला ठार करीत असे. या सुलतानासारखी लहान मुलांची अवस्था असते. त्यांना गोष्ट संपलेली खपतच नाहीं. निदान एक गोष्ट संपली कीं, दुसरी सुरू व्हावी असें त्यांना वाटतें. मुलांच्या दृष्टीनें त्यांचें स्वतःचें वाङ्मय असें एकच प्रकारचें असतें आणि तें म्हणजे कथावाङ्मय.

मराठी बालवाङ्मयांच्या कथाविभागाचा उगम शिळाप्रेसवर छापल्या गेलेल्या 'वेताळपंचविशी' (१८५२) व 'सिंहासनबत्तिशी' (१८५४) या पुस्तकांत सांपडतो. हीं पुस्तकें अठराव्या शतकाच्या अखेरीस जन्मलेल्या कै. सदाशिव काशिनाथ छत्रे या गृहस्थांनीं लिहिलीं. मराठी बालवाङ्मयांतील संकलित केल्या अगदीं पहिल्या बालकथा होत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. य आजच्या दृष्टीनें पाहिल्यास चमत्कारिक वाटतील. पण त्या काळीं ह्या लोकप्रिय होत्या. कै. छत्रे यांनीं मिशनऱ्यांपाशीं इंग्रजी भाषेचा अभ्यास खाजगी

रीतीनें केला आणि 'बाळमित्र' (Children's Friends) हें सुरम्य पुस्तक रचिलें. यांनीं इसापच्या गोष्टींचेंहि भाषांतर केलें. छत्रे हेच बालवाङ्मयांतील आद्य कथालेखक होत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. यानंतर लवकरच थोरल्या चिपळूणकरांनीं 'आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी' हा ग्रंथ लिहिला.

बालोपयोगी कथांत अद्भुतरम्यता ह्या गुणाचें माहात्म्य विशेष आहे. मनोविकासदर्शन किंवा स्वभावपरिपोष यांवर भर देऊन बालकथा रंगत नाहीं. अद्भुताची भुलावण ही बालकथेच्या यशाची गुरुकिल्ली होय. छत्रे व थोरले चिपळूणकर यांनीं हें जाणलें म्हणूनच प्राचीन लोककथा, अरबी गोष्टी किंवा इसापच्या गोष्टी याच सुबोध भाषेंत उतरविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. छत्रे-चिपळूणकरांची ही परंपरा आजतागायत चालत आली आणि रॉबिन्सन क्रूसो, गलिव्हर, सिंदबाद इ. कल्पनासृष्टींतले विख्यात वीर मराठी बालवाचकांच्या परिचयाचे झाले. एका इसापनीतीचींच 'चिमुकली इसापनीति' (कै. रा. ग. गडकरी), 'सचित्र इसापनीति' (किताबखाना), 'सुलभ इसापनीति' (वि. ग. ताम्हणकर), 'चतुर इसाप' (वि. ग. ताम्हणकर) इ. अनेक छोटींमोठीं भाषांतरें बालसृष्टींत वावरत आहेत.

'काल्पनिक गोष्टींत उपदेश वा व्यवहारचातुर्याचे पाठ क्वचितच असतात; आणि इसापच्या गोष्टींप्रमाणें ते असलेच तरी कथाविषय कोल्हीं मांजरेंहि असल्यानें मुलें फक्त गंमत या दृष्टीनें त्याकडे पाहतात. अशीं काल्पनिक चित्रें मुलांपुढें ठेवूंच नयेत, कारण त्यायोगें त्यांचा वास्तवावरचा विश्वास कमी होतो आणि जें असामान्य असें ऐकिलें तें सर्वच खोटें असें मानण्याकडे त्यांची प्रवृत्ति होते' असें प्रतिपादणारा बालमानसशास्त्रज्ञांचा एक पंथ आहे. परंतु बालमनाचे धागेदोरे नीटपणें ओळखणाऱ्या मॉंटेसरीबाईनीं या पंथाला विरोध केला आहे. त्या म्हणतात कीं, 'अद्भुत व काल्पनिक गोष्टींच्या योगें मुलांचें मन संकुचित न राहतां कल्पनेच्या अंतराळांत वावरूं लागतें. मुलांची कल्पनाशक्ति वाढविण्याच्या दृष्टीनें अशा गोष्टी सांगणें आवश्यक आहे.'

पऱ्या व वनदेवतांच्या गोष्टी (Fairy tales) ह्या यांतच येतात. अशा गोष्टींत काव्यमय वातावरण भरपूर असलें पाहिजे. मराठींत कै. वा. गो. आपटे यांचें 'चित्तरंजन' हें पुस्तक (भाग १, २), प्रो. स. बा. हुदलीकर यांचीं 'न हंसणारीं राजकन्या', 'बुटका पंडित', 'प्रेमळ राक्षस' हीं पुस्तकें; श्री. ना. गं. लिमये यांच्या कांहीं गोष्टी, इत्यादि सर्व वाङ्मय या धर्तीचें होय. पऱ्यांच्या गोष्टींतून सुरेल व

मधुर चालींचीं गाणीं घातलीं तर गोष्टींची रंजकता वाढते. असा प्रयत्न प्रस्तुत लेखकानें 'चंद्रशेखर आणि मोहना' व 'सात राजहंस' या दोन कथांतून केला आहे. प्रो. ज. नी. कर्वे यांनीं 'आनंदां'तून प्रसिद्ध केलेल्या कांहीं वनदेवतांच्या गोष्टी 'फेअरी टेल्स'चे उत्कृष्ट नमुने होत.

देशोदेशीं सांगितल्या जाणाऱ्या 'लोककथा' हें एक उत्कृष्ट बालमनोरंजक वाङ्मय आहे. या वाङ्मयांतील मनुष्यस्वभावाचीं चित्रें सर्व देशांस लागू पडतील अशींच असतात, आणि प्रत्येक देशांतलें निराळें सृष्टिवर्णन वाचायला मिळून एक प्रकारचा आल्हाद वाटतो. अशा गोष्टींच्या द्वारां भौगोलिक माहिती, त्या त्या देशांतील चालीरीति व लोकभ्रम वगैरेंचीहि माहिती सहजासहजीं होते. 'बालोद्यान' प्रेसनें 'रशियांतील नवीन सुरस गोष्टी', 'फ्रान्समधील मुलांच्या गोष्टी', 'तुर्कस्थानांतील मुलांच्या अद्‌भुत गोष्टी' अशीं कांहीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. मागें डॉ. केतकर यांच्या 'विद्यासेवक' मासिकांतून 'निरनिराळ्या देशांतील कहाण्या' या सदराखालीं पुष्कळ सुरस गोष्टी प्रसिद्ध झाल्या आहेत. त्या सर्व संकलित करून 'प्राचीन कहाण्या' नांवानें बालवाङ्मयांत एका सुंदर पुस्तकाची भर टाकली आहे. अलीकडे कु. पिरोज आनंदकर यांनीं 'प्राविण्य' मासिकांतून सातत्यानें व 'आनंदां'तून मधून मधून जगांतील कांहीं लोककथा प्रसिद्ध केल्या असून त्या चटकदार आहेत.

अद्‌भुत व काल्पनिक गोष्टींमुळें होणारा कल्पनाविकास साधून मुलांच्या पुढें उच्च नैतिक आदर्श ठेवण्यास पौराणिक कथांचा फार उपयोग होतो. कारण पौराणिक कथांत अद्‌भुतता आणि आदर्शवाद यांचा मनोहर संगम झालेला असतो. मराठी बालवाङ्मयांतलें हें दालन भरगच्च सजविलें गेलें आहे ही समाधानाची गोष्ट होय. 'बालरामायण', 'बालभारत', 'बालभागवत' हीं कै. वा. गो. आपटे यांचीं पुस्तकें आणि 'हितोपदेश' (कै. वा. मा. आंबेकर), 'जातककथा' (दे. ना. टिळक), 'रघुवंशकथा' (नी. शं. नवरे), 'हरवलेली अंगठी' (रा. ज. जोशी) इत्यादि पुस्तकें विशेष उल्लेखनीय वाटतात. रा. नवरे यांनीं 'संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें' हें पुस्तक इंग्रजी 'लँब्स् टेल्स ऑफ् शेक्सपिअर' या पुस्तकाच्या धर्तीवर लिहिलें असून तें चांगलें साधलें आहे. यांखेरीज 'मुलींची द्रौपदी', 'मुलींची सीता', 'वानराचा देव' इत्यादि रा. कृ. गो. किनरे यांचीं पुस्तकें आहेत. आनंदकार्यालय, चित्रशाळा, महाराष्ट्र पब्लिशिंग हाउस, लि.,

पुण्याच्या व केशव भिकाजी ढवळे, तुकाराम पुंडलीक शेट्ये इत्यादि मुंबईच्या प्रकाशकांनीं पौराणिक स्त्रीपुरुषांचीं चरित्रें व कथा अशीं मिळून दोनशेंवर पुस्तकें प्रसिद्ध केलेलीं आहेत. बडोदें येथील 'श्री सयाजी बालज्ञानमालें'तूनहि अशीं सुंदर व सचित्र पुस्तकें बरींच निघालीं आहेत.

स्वभावनिदर्शक सामाजिक गोष्टी मात्र फार अल्प प्रमाणांत निर्माण झाल्या आहेत आणि तें साहजिकच आहे. कारण अद्भुत गोष्टी, पऱ्यांच्या गोष्टी, लोककथा, पौराणिक व ऐतिहासिक कथा इत्यादि वाङ्मय निर्माण करण्यास लागणारी कच्ची सामग्री तयारच असते. फक्त तिचा उपयोग कौशल्यानें केला कीं, वाङ्मय तयार करतां येतें. परंतु स्वभावनिदर्शक सामाजिक गोष्टी लिहावयास सूक्ष्म अवलोकन, बालमानसशास्त्राचें ज्ञान, रचनाचातुर्य इत्यादि अनेक गुणांची जरूरी असते. मराठींत मिसाळ, टिळक, कुलकर्णी यांनीं अशा तऱ्हेचें वाङ्मय प्रसिद्ध केलें आहे हें खरें परंतु त्यांचें स्वभावचित्रण स्थूल आहे. कविश्रेष्ठ रवींद्रनाथ टागोरांच्या गोष्टींतून व कवितांतून बालस्वभावाचे बारकावे, त्यांच्या विचारसरणींतील विरोधाभास, त्यांच्या कोंवळ्या कल्पनाशक्तीच्या लीला हीं इतकीं हुबेहूब दाखविलेलीं असतात कीं, गोष्टींतील गोजिरवाणीं बालकें सदेह होऊन आपल्यापुढें बावरत आहेत असा भास होतो. अशा जिवंत आणि प्रतिभापूर्ण गोष्टी मराठींत निर्माणच झालेल्या नाहींत, असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें !

शास्त्रीय सिद्धांत वा सृष्टिचमत्कार सांगण्याकरितां रूपकाचा आश्रय करून लिहिलेल्या गोष्टीहि मराठींत फारशा झाल्या नाहींत. ' तीन राक्षस ' ही जुन्या मराठी पुस्तकांत आलेली गोष्ट या दृष्टीनें नमुनेदार होती. पूर्ण शास्त्रज्ञान आणि लेखनचातुर्य यांचा संगम झाल्याखेरीज असें वाङ्मय जन्मास येत नाहीं. आतां मात्र असें वाङ्मय निर्माण होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. प्रो. श्री. बा. रानडे, प्रो. ज. नी. कर्वे वगैरे विज्ञानशास्त्रज्ञ रसिक लेखकांनीं आपली लेखणी बालवाङ्मयाकडे वळविली आहे. 'वासूचा दवाखाना' (रानडे), ' मुंग्यांचें वारूळ ' ( कर्वे ) इत्यादि 'आनंदां'-तून प्रसिद्ध झालेल्या शास्त्रीय गोष्टी फारच सुरेख आहेत. रा. ज. शं. मेढेकर यांनीं ' शास्त्रीय सुरस गोष्टी ' नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे.

प्रो. माधवराव पटवर्धन यांनीं आपल्या ' विरह-तरंग ' काव्याच्या प्रस्तावनेंत असें प्रतिपादलें आहे कीं, " शृंगारिक नाटकें व कादंबऱ्या वाचून मुलांचीं मनें बिघडतील असें जर वाटत असेल तर मुलांची जिज्ञासा पोसेल व जिगीषा वाढेल असें

कथावाङ्मय भरपूर निर्माण झालें पाहिजे." पटवर्धनांची ही सूचना आदरणीय नाहीं असें कोण म्हणेल? तथापि असें वाङ्मय कोठें निर्माण होत आहे? मुलांच्या करितां कादंबऱ्या वा बृहत्कथा अगदीं शोधशोधून आढळल्या तरी हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्याच आढळतात. 'सुखाचा मूलमंत्र' आणि 'रत्नगुंफा' या रा. ना. ह. आपटे यांच्या मुलांकरितां लिहिलेल्या कादंबऱ्या सरस आहेत. 'इनामदारांचा बाळू' 'हरि आणि त्रिंबक' हीं पुस्तकें मुलांची करमणूक करतील. 'राणा कोल्हा' ही मुलांच्या करितां म्हणून लिहिलेली लघु कादंबरी आहे. प्रस्तुत लेखकानें 'साराच चमत्कार' नांवाची एक कथा प्रकाशित केली असून उपलब्ध शास्त्रीय माहितीचा उपयोग करून मंगळावर गेलेल्या एका प्रवाश्याची अद्भुत हकिकत त्यांत रेखाटली आहे. परंतु अशा तऱ्हेचें वाङ्मय विपुल प्रमाणांत निर्माण झालें पाहिजे.

जगांतील एकंदर ललित वाङ्मयांत नाट्याइतकी अवघड कला दुसरी कोणतीहि नसेल. काव्य, स्वभावपरिपोष, कथानक, संवाद, विनोद इत्यादि अनेक तंत्रें सांभाळून नाट्यरचना करावी लागते. आणि या सर्वांच्या परिपाकानें तयार झालेलें नाटक रंगभूमीवर कसें परिणामकारक करून दाखवितां येईल याचें चित्र लेखकाच्या मनःचक्षूपुढें उभें राहावें लागतें. बालमासिकांतून संवाद हवे तेवढे येतात, पण त्यांत संस्मरणीय असे फारच थोडे. कै. रा. ग. गडकरी यांनीं लिहिलेला 'सकाळचा अभ्यास' हा संवाद स्वभावपरिपोष, सहज विनोद इत्यादि गुणांनीं सर्वोत्कृष्ट ठरेल. मुलांच्या करितां कांहीं नाटकें प्रथम 'किरात' यांनीं रचिलीं. त्यांचें 'पन्हाळगडचा किल्लेदार' हें नाटक शाळांच्या संमेलनांतून चांगलेंच गरजलें. कै. वा. गो. आपटे यांनीं भारत व रामायण यांतील गोष्टी नाट्यरूपानें मांडून 'नाट्यभारत' व 'नाट्यरामायण' हीं पुस्तकें लिहिलीं. पौराणिक कथांचें मर्म मुलांच्या मनावर ठसण्यास हीं फार उपयुक्त ठरलीं आहेत. 'अस्पृश्योद्धार' (पां. स. साने), 'मित्रभाव' (ना. धों. ताम्हणकर), 'तेजोभंग' (भागवत), 'बालवीर' (ठकार) इ. छोट्या बालनाटिका उल्लेखनीय वाटतात. 'स्त्रीशिक्षणपरिषदेची वाटाघाट' हें रा. श्री. के. क्षीरसागर यांचें प्रहसन अनेक दृष्टींनीं हृद्य आहे. विशेषतः त्यांतील खुबीदार भाषा आणि सूक्ष्म विनोद यांची छाप प्रेक्षकांच्या मनावर तात्काळ बसते. त्यांत जुन्या नव्या स्त्रियांच्या मतांतराच्या छटा गमतीदार रीतीनें दाखविल्या आहेत. शाळा-संमेलनांतून या प्रहसनाची वाढती लोकप्रियता हेंच त्याच्या गुणांचें प्रशस्तिपत्र होय.

बालवाङ्‌मयांतील नाट्यविभागांत प्रि. प्र. के. अत्रे यांची कामगिरी विशेष संस्मरणीय आहे. ' गुरुदक्षिणा ' आणि ' वीरवचन ' अशीं दोन नाटकें त्यांनीं लिहिलीं असून त्यांतलें पहिलें पौराणिक व दुसरें ऐतिहासिक आहे. या नाटकांत इतर अनेक रसांबरोबर विनोदाचा उत्कृष्ट परिपोष केलेला आहे. पदांच्या चाली मोहक व रचना रसाळ आहे. विशेषतः रंगभूमीवरील परिणामाच्या दृष्टीनें त्यांचें यश अपूर्व आहे. बालवाङ्‌मयांतील उत्कृष्ट नाट्यविभाग कोणता, असें कोणीं विचारल्यास या दोन नाटकांकडे अंगुलिनिर्देश करावा लागेल.

ऐतिहासिक कथा व चरित्रें आजवर बहुतेक बालवाङ्‌मयलेखकांनीं लिहिलीं आहेत. कै. वि. कों. ओक आणि कै. धनुर्धारी यांनीं या शाखेचा आरंभ केला. या दोन लेखकांत धनुर्धारींची वाणी मोठी जोरकस आणि चमकदार असल्यानें त्यांच्या ऐतिहासिक गोष्टी फार सुंदर वठल्या आहेत. बडोदें येथील ' श्री. सयाजी बालज्ञानमाले 'त प्रसिद्ध झालेलीं कांहीं ऐतिहासिक चरित्रें फारच रेखीव व उपयुक्त वठलीं आहेत. यांखेरीज निरनिराळ्या प्रकाशकांनीं देशी-विदेशी इतिहासांतील नामांकित स्त्रीपुरुषांचीं अनेक चरित्रें प्रसिद्ध केलीं आहेत. ऐतिहासिक चरित्रें अथवा कथा या इतिहासाच्या अभ्यासाला पोषक होतील अशा असाव्यात. त्यांत विभूतिपूजेचा अतिरेक किंवा अद्‌भुताचें अतिरंजन असतां कामा नये. शिवाय इतिहासांतील प्रसिद्ध अशा गोष्टींच्या आसपास घडलेल्या महत्त्वाच्या पण फारशा प्रसिद्ध नसलेल्या हकिकती उजेडांत आल्या पाहिजेत. या दृष्टीनें नवीन उपलब्ध झालेलें ' पेशवेदप्तर ' किंवा इतर संशोधित सामग्री अभ्यासून ऐतिहासिक कथाचरित्रांच्या विभागांत पुष्कळ मोलाची भर घालतां येणें शक्य आहे.

सद्यःकालीन महापुरुषांचीं लहानमोठीं चरित्रें पुष्कळ प्रसिद्ध झालीं आहेत. तथापि त्यांत, चरित्रलेखनांत जी एक प्रकारची आकर्षकता व चरित्रविषयाच्या खाजगी जीवनाबद्दल जिव्हाळा उत्पन्न करण्याची शैली लागते ती फारच कमी प्रमाणांत आढळून येते. या दृष्टीनें जुगतराम दवे यांनीं गुजराथींत लिहिलेलें ' गांधीजी ' हें चरित्र सोपें व मनोवेधक आहे. या पुस्तकाचें भाषांतर नुकतेंच मराठींत झालें आहे. 'रशियाचे गांधी' हें रा. निरंतर, एम्. ए., यांनीं लिहिलेलें टॉलस्टॉयचें चरित्र, बालवाङ्‌मयांतील चरित्रें कशीं असावीत, याचा सुंदर कित्ताच होय.

## शिशुगीतें

शिशुगीताची रचना ही एक अत्यंत अवघड कला आहे. कवि दुसऱ्याचे भाव वर्णन करतो त्या वेळीं त्याला वर्ण्य विषयाशीं समरस व्हावें लागतें; पण प्रौढांच्या भावनेचें चित्रण करतांना असें समरस होणें कांहींसें सोपें म्हणतां येईल. कारण प्रौढ भावनांना कवि फारसा अपरिचित नसतो. पण शिशुवृत्तींत तल्लीन होणें हें मात्र सुकर नाहीं. शैशवाच्या नंदनवनांतून क्षीणपुण्य होऊन प्रौढपणाच्या भूमीवर उतरलेल्या कवीला पुनः बालभावाशीं समरस होणें महत्प्रयासाचें काम होय.

तथापि एक मात्र गोष्ट सत्य आहे कीं, सामान्य माणसासारखा कवि शैशवाला सर्वस्वीं पारखा होत नाहीं. 'पांडित्य विसरून बाल्यवृत्ति अंगीं बाणवा' (पांडित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासीत्) हा उपनिषदांतील आदेश मुमुक्षूंप्रमाणेंच कवींनाहि लागू आहे. "प्रौढत्वीं निज शैशवास जपणें बाणा कवीचा असे" ही केशवसुतांची उक्ति प्रसिद्धच आहे. अशा रीतीनें जपून ठेवलेलें शैशव कवीच्या प्रतिभेला अक्षय तरुण ठेवितें.

अर्थात् कवीला बाल्यवृत्तींत उतरणें फारसें जड जाऊं नये. परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, आधुनिक मराठी कवितेचा इतका विस्तार झाला पण त्यांत उत्कृष्ट शिशुगीतांची संख्या अत्यंत लहान आहे. आधुनिक वाङ्मयाच्या आरंभीं झालेल्या काव्यरचनेंत मुद्दाम अशीं शिशुगीतें कोणींच लिहिलीं नव्हतीं. कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या 'पद्यरत्नावलीं'त कांहीं कविता अशा आहेत कीं, त्या बालसुबोध होऊं शकतील. भास्कर दामोदर पाळंदे यांच्या कांहीं भक्तिपर कविता मुलांच्या तोंडीं बसल्या हें खरें. पण त्याला कारण त्यांची कलात्मकता नसून त्या क्रमिक पुस्तकांत समाविष्ट झाल्या हें होय. अर्थात् त्यांत थोडा नाद व तालबद्धता होती हें कबूल केलें पाहिजे. मोगरे, लोंढे, लेंभे व वासुदेवशास्त्री खरे यांची कांहीं कविता सुबोध, रसाळ व मुलांना आवडण्यासारखी होती आणि ती क्रमिक पुस्तकांतून बरींच वर्षे येत राहिल्यानें लोकप्रियहि झाली. पण खरीं शिशुगीतें अशीं मात्र यांपैकीं कोणीं लिहिलीं नाहींत.

शिशुगीतांत दोन तीन प्रकार संभवतात. एक, मुलांचा स्वभाव प्रतिबिंबित करणारीं गीतें. मुलांच्या स्वभावांतील बारकावे त्यांच्याच शब्दांत किंवा कवीच्या शब्दांत वर्णन करून परिणामकारक कलाटणी शेवटीं द्यावयाची, हें याचें सर्व सामान्य तंत्र होय. दुसरा प्रकार, मुलांच्या दृष्टीनें सृष्टि किंवा व्यवहार यां

पाहून लिहिलेलीं गीतें. औत्सुक्य, कुतूहल, मानवीकरण या गोष्टी सामान्यपणें त्यांत येतात. तिसरा प्रकार संकीर्ण गीतांचा—त्यांत अभिनव गीतें, राष्ट्रीय गीतें व स्तोत्रें (odes), अंगाई गीतें, प्रबोधन-गीतें इत्यादि अनेक प्रकार येतात.

सुबोधपणा हें एकच शिशुगीतांचें वैशिष्ट्य नाहीं. नाद, ताल आणि अर्थ हे तीनहि गुण असतील तरच शिशुगीत सुंदर ठरेल. मात्र ध्वनि हा जो काव्याचा परमोच्च गुण मानला जातो त्याची शिशुगीताला आवश्यकता नाहीं. कारण सूक्ष्मतेपासून ध्वनि उपलब्ध होतो आणि बालमनाला तर सारें स्थूल, सरळ, प्रत्यक्ष असें कांहींतरी पाहिजे असतें. एकाद्या ओळीवर पूर्णविराम करून ध्वनि शोधीत बसण्याची उसंत त्या खेळत्या बागडत्या धांदरट जीवाला नसते. त्याच्या रसज्ञ कानाला मोहून टाकील असा नाद, त्याच्या खेळकर पायाला गति देईल असा ताल आणि त्याच्या साध्या मनाला संतुष्ट करील असा अर्थ असला तरच तो तल्लीन होतो. ओळींवर साधलेलीं पूर्ण यमकें व ठायीं ठायीं द्विरुक्ति त्याला फार आवडते.

अशा रीतीनें लिहिलेलीं मनोहर व शास्त्रशुद्ध शिशुगीतें कशीं असावींत हें समजून घ्यावयाचें असल्यास कविवर्य तांबे यांनीं लिहिलेल्या शिशुगीतांकडे नजर वळवावी. तांब्यांनीं ४।५ च शिशुगीतें लिहिलीं असतील. परंतु वर वर्णिलेल्या शिशुगीतांच्या प्रकारांचे उत्कृष्ट नमुने म्हणून वाङ्मयांत तीं चिरस्थायी होण्यासारखीं आहेत. 'आतां गडी फू दादाशीं' हा मधुर बंधुभगिनी संवाद पाहा. चेष्टेखोर भाऊ आपल्या बहिणीला चिडवीत असतां तिचा रागाचा पारा 'आतां गडी फू दादाशीं' असें म्हणण्यापर्यंत चढतो. परंतु भाऊ बिलंदर आहे. तिनें 'गडी फू' करतांच 'तर मग गट्टी कोणाशीं?' असा गोड खोडसाळ प्रश्न विचारल्याशिवाय तो राहत नाहीं. 'वारा' हेंहि एक रम्य शिशुगीत तांब्यांनीं लिहिलें आहे. वाऱ्याला अदृश्य पुरुष कल्पून त्या पुरुषाची हालचाल बालदृष्टीला कशी विस्मयकारक वाटते त्याचें सुरेख वर्णन यांत आढळतें. 'चिव चिव चिमणी छतांत—छतांत' हेंहि गीत याच प्रकारचें आहे. खेरीज एकदोन अंगाईगीतें व प्रबोधन-गीतेंहि तांब्यांनीं लिहिलीं आहेत.

जागति बघ चिउ काऊ
लागति घरट्यांत गाऊं
डोलति तरु
लागति करूं
श्रीहरि-भजनाला! ॥

जागति गोठ्यांत गाइ
बाहति वत्सांस पाहिं
ये, रांगें,
कळ लागे
माझिया स्तनांला ! ॥
रुणु झुणु ये रुणु झुणु ये झणकारितं बाळा ! ।
लुटु लुटु लुटु दुडु दुडु दुडु दुमकत ये बाळा ॥

हें प्रबोधनगीत परम रमणीय आहे.

कै. दत्तकवींची 'या बाइ या, बघा बघा कशि माझी बसलि बया !' हें एकच शिशुगीत आकर्षक आहे. सुप्रसिद्ध कवि माधव जूलियन् यांनीं लिहिलेलीं कांहीं शिशुगीतें कल्पना आणि कला या दोनहि दृष्टींनीं सुंदर आहेत.

आमचें घर छान
शेजारीं वाहे ओढा
कागदी होड्या सोडा
दूर जाती ॥

याप्रमाणें त्यांची रचना प्रमाणबद्ध असते. तोकड्या ओळींचे अंतीं उपांत्य स्वरांसह साधलेलीं यमकें हा शिशुगीतांचा एक मोठाच गुण आहे. तो माधव जूलियन् यांच्या कवितांत प्रकर्षानें प्रकट झाला आहे.

डोला बाई डोला
हाताचा घ्या झोला
डोळा कां हो ओला ?
बोळकें हें खोला
गोड गोड बोला
कच्छा हवा नोला
नको काळा, गोळा !

इंग्रजींतील 'नर्सरी ऱ्हाइम' च्या (Nursery Rhyme) धर्तीवरच्या या पद्यपंक्ति रम्य नाहींत असें कोण म्हणेल ? अशा तऱ्हेची रचना आधुनिक बालवाङ्मया काव्यविभागांत फारच कमी प्रमाणांत झालेली आढळते.

तांबे यांचे सच्छिष्य प्रो. मायदेव यांची शिशुगीतांच्या बाबतींतली कामगिरी डोळ्यांत भरण्यासारखी आहे. 'अभिनयगीत' हा त्यांचा चिमुकला काव्यसंग्रह प्रसिद्ध असून त्यांतले 'चला सुटी झाली, आतां खूप खूप खेळायचं' हें अभिनयगीत बालवर्गात फारच मान्यता पावलें आहे. 'आई शाळेमध्यें कसा जाऊं ?', 'अहा माझी बेबी किती आहे तरी गोड', 'नंदीबैल' इत्यादि मायदेवांच्या कविता शिशुगीताचे उत्कृष्ट नमुने होत.

मायदेवांच्याप्रमाणेंच मुद्दाम लक्ष घालून शिशुगीतांची बरीच रचना नागपूरचे प्रसिद्ध कवि श्री. भ. श्री. पंडित यांनीं केली आहे. 'बिजेची कोर' हा त्यांचा शिशुगीतांचा संग्रह पृष्ठसंख्येनें लहान परंतु गुणसंख्येनें मोठा आहे, असेंच कोणीहि म्हणेल. तांबे, माधव ज्यूलियन आणि मायदेव या तिघांच्या शिशुगीतांतल्या गुणांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न पंडितांनीं केलेला दिसतो. वऱ्हाडांतले एक कवि सरंजामे ह्यांनींहि ह्या बाबतींत थोडेंफार कार्य केलें आहे. 'झिम्मा खेळूं ये' ही त्यांची कविता आतां अखिल महाराष्ट्रांतील मुलामुलींच्या दाट परिचयाची आहे. परंतु सरंजामे यांच्या शिशुगीतांत नादावरच अवास्तव भर दिला जातो. विषय आणि कल्पना यांचें नाविन्य फारसें आढळून येत नाहीं. प्रो. ना. के. बेहेरे यांचीं गीतें सोपीं व बालस्वभावनिदर्शक असतात. बेहेऱ्यांनीं मुलांकरितां लिहिलेल्या गाण्यांचा एक स्वतंत्र भागच प्रसिद्ध केला आहे.

श्री. ह. स. गोखले, श्री. अज्ञातवासी, श्री. ना. गं. लिमये यांनाहि शिशुवर्गाला आल्हादकारक वाटतील अशा कविता लिहिणें साधलें आहे. श्री. ना. गं. लिमये यांनीं या बाबतींत विशेष परिश्रम घेतले असून 'बालगीत' हा त्यांचा काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. लिमये यांच्या शिशुगीतांत काव्य फारसें आढळत नाहीं. परंतु त्यांत एक प्रकारची गंमत व सोपेपणा असल्यानें मुलांना तीं आवडतात.

रूक्ष विषय शिकविण्याच्या कामीं काव्याचा उपयोग करूं पाहणारे कांहीं पद्यकार आढळतात. 'काका मला शिकवा' हें कै. अनंततनयांचें पुस्तक किंवा 'हिंदुस्थानचा पद्यात्मक भूगोल' हें 'बालोद्यान' प्रेसनें छापलेलें पुस्तक हीं अशा तऱ्हेचीं पुस्तकें होत. शकुंतलेला बागकाम करतांना पाहिल्यानंतर दुष्यंतानें तिच्या पालनकर्त्या कण्वाला 'असाधुदर्शी' असें विशेषण जोडलें· तेंच काव्याला बाराखड्या-भूगोल यांसारख्या रूक्ष विषयांना जुंपणाऱ्या पद्यकारांना बहाल करावेंसें वाटतें.

कित्येक मुलांमध्यें अगदीं लहान वयांत असाधारण ग्रहणशक्ति दिसून येते. प्रौढांच्या चिंतनाचे किंवा आनंदाचे विषय तीं जाणूं शकतात, इतकेंच नव्हे, तर अनुभवण्याचाहि प्रयत्न करतात. अशा प्रगल्भ मुलांना प्रौढ धर्तीची सोज्ज्वळ व रसाळ कविता संकलित करून द्यावयास पाहिजे. त्या योगें त्यांची रसिकता चांगली वाढीस लागते. 'Words from Poets', 'Children's' Golden Treasury' अशा तऱ्हेचे अनेक उत्कृष्ट काव्यसंग्रह इंग्रजींत असून त्यांत नामांकित कविवर्यांच्या चिरस्मरणीय कृती संग्रहित केलेल्या आहेत. आधुनिक मराठींत असा प्रयत्न रा. वि. स. सुखठणकर यांनीं प्रथम केला. त्यांचें 'वासंती' हें पुस्तक म्हणजे आधुनिक काव्योद्यानांत उमललेल्या कांहीं सुगंधी फुलांचा गुच्छच होय. त्याच धर्तीचें पण थोडें सोपें पुस्तक रा. ग. ह. पाटील यांनीं संपादिलेलें 'बालशारदा' हें होय. चित्रशाळा प्रेसनें 'काव्यसंग्रह' हें एक छोटेखानी पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. तथापि या सर्वच संग्रहांतून कांहीं कांहीं उणीवा राहून गेल्या आहेत. नको असलेलीं कांहीं गीतें त्यांत आलीं असून संकलनीय अशीं पुष्कळच गीतें त्यांतून वगळलीं गेलीं आहेत. 'महाराष्ट्र रसवंती' हें तीन भागांत प्रसिद्ध झालेलें पुस्तक अप्रतिम आहे. उत्कृष्ट कवितांबरोबरच त्यांचा रसास्वाद घेण्याचें तंत्रहि प्रस्तुत पुस्तकांत दिल्यानें तें सर्वथैव निर्दोष झालें आहे.

शिशुगीतांच्या वर्गात मोडणारा एक अलौकिक पद्यप्रकार लोकगीतांचा होय. महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांत फुगडी, भोंडला, उखाणे, कूटप्रश्न, ओंव्या, गाणीं इत्यादि कितीतरी लोकगीतात्मक वाङ्मय पसरलेलें आहे. तंत्राचे नियम त्यांत पाळले गेले नसतील किंवा निरर्थक ओळींची दाटीहि त्यांत खूप असेल. परंतु नाद, ताल, आणि रंजकता या दृष्टींनीं हीं लोकगीतें शिशुवर्गाला अत्यंत प्रिय होणारीं आहेत. भोंडल्याच्या गाण्यांत

साई गेली शेताभाता
पाउस् पड्ला येतां जातां

या ओळी म्हणत रंगून जाणाऱ्या मुली साई कोण होती, ती शेतांत कां गेली, याची चौकशी करीत नाहींत. या ओळींची साधी रचना व आवेश, 'शेताभाता', 'येतांजातां' हे समान नादाचे शब्द यांवर त्या तल्लीन होतात. असें लोकगीतात्मक वाङ्मय संकलित करून छापणें किंवा क्रमिक पुस्तकांतून व 'बालोद्याना'त प्रमाणें मासिकांतून मधून मधून प्रसिद्ध करणें अगत्याचें आहे. रा. शं. ग. दात

यांनीं मागें ‘ लोककथा ’ नांवांची दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं होतीं, त्यांत अशीं लोकगीतें होतीं. अलीकडे बडोद्याचे रा. प्र. बा. देशपांडे यांनीं बरींच लोकगीतें संपादिलीं असून त्यांतलीं कांहीं ‘ आनंदा ’च्या चार पांच अंकांतून गेल्या वर्षदीड-वर्षांत प्रसिद्ध झालीं आहेत. मुंबई विभागाचे एज्यु. इन्स्पेक्टर रा. विठ्ठलराव घाटे यांनीं अशीं विपुल लोकगीतें संकलित केलीं आहेत.

## औद्योगिक, शास्त्रीय व इतर

या लेखाच्या प्रारंभींच सांगितलें आहे कीं, एकंदर मराठी वाङ्मयाच्या विकासाला जें वळण लागलें व ज्या मर्यादा पडल्या त्यांचा परिणाम बालवाङ्मया-वरहि झाला आहे. मराठींत शास्त्रीय व औद्योगिक वाङ्मयाची निपज फारच कमी प्रमाणांत झालेली आढळून येते. भौतिक शास्त्रांची गोडी आपणांस लागावयास पाहिजे तशी लागलेली नाहीं. कल्पनेच्या अंतराळांत विहार करणें आणि सृष्टीच्या जड स्वरूपांत न शिरतां तिच्या चमत्काराकडे काव्यमय दृष्टीनें पाहणें ही आपली वृत्ति. खेरीज साधनांचा अभावहि आपणांला पदोपदीं जाणवतो. अशा स्थितींत शास्त्रीय वाङ्मयांत आपली प्रगति कशी व्हावी ?

कै. वा. गो. आपटे यांनीं रचिलेलें ‘ कां व कसें ? ’ ( भाग ४ ) हें पुस्तक आणि कै. वि. कों. ओक यांचीं २–३ पुस्तकें हीं बालवाङ्मयांतलीं पहिलीं शास्त्रीय पुस्तकें होत. ‘ सयाजी साहित्यमालें ’त कै. र. ब. फळणीकर यांनीं एक दोन पुस्तकें लिहिलीं आहेत. ‘ स्वयंपाकघरांतील शास्त्रीय गोष्टी ’, ‘ चुलीपुढील शास्त्रीय गोष्टी ’, ‘ व्यवहारांतील शास्त्रीय गोष्टी ’ इत्यादि ए. पी. बापट आणि कंपनी आणि महाराष्ट्र पब्लिशिंग हाउस यांनीं प्रकाशित केलेलीं पुस्तकें मुलांची शास्त्रीय ज्ञानाची भूक थोडीफार भागवतील. रा. ठोमरे यांनीं ‘ हवेंतील चमत्कार ’, ‘ तेजोनिधि सूर्य ’ इत्यादि कांहीं चांगलीं पुस्तकें काढलीं आहेत. बालवाङ्मयांतलें आदर्श शास्त्रीय पुस्तक कसें असावें याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे पं. जवाहरलाल नेहरूंनीं लिहिलेलें ‘ इंदिरेस पत्रें ’ हें पुस्तक होय. अमरावतीचे रा. बोडस यांनीं प्रस्तुत पुस्तकाचें भाषांतर केलें आहे. सृष्टीची उत्पत्ति, स्थिति आणि प्रगति यांचा सुबोध व रसाळ इतिहास या पत्रांतून सांगितला असून जगाच्या सांस्कृतिक विकासाचीहि त्यांत चर्चा केली आहे; आणि इतक्या अवघड विषयाचें निवेदन करतांना अवघडपणा कोठेंहि आणलेला नाहीं. बालवाङ्मयांत या पुस्तकाची महती शाश्वत राहील.

'माजघरांतील चर्चा' (ले. लक्ष्मीबाई प्रधान) व 'टापटिपीचा संसार' (कै. वा. गो. आपटे) ह्या लोकप्रिय पुस्तकांचें स्वरूप नांवांवरून ओळखूं येण्यासारखें आहे. 'हसतां खेळतां बुद्धिविकास' (वि. स. सुखठणकर), 'पाढ्यांचे खेळ' (वि. कृ. नेरूरकर) हीं पुस्तकें गणितादि शास्त्रांत मुलांची प्रगति करण्यास साहाय्यकारक होतील.

भूगोल हा विषय मुलांना वर्गांत त्रासदायक वाटतो याचें कारण शिक्षण-पद्धतींतिला रूक्षपणा होय. वास्तविक भूगोलांत हवा तेवढा रस उत्पन्न करून दाखवितां येण्यासारखा आहे. रा. मोडक (हिंगणें) यांचीं 'भूगोलावरील साहसी प्रवासी', 'भारतीय बांधवांचे भूप्रदेश', 'भूगोलावरील कांहीं विचित्र प्राणी' हीं पुस्तकें आणि प्रो. ना. म. पटवर्धन यांचीं 'आमची दिवाळी' व 'जगांतील मौजा' हीं पुस्तकें वाचणारा कोणता बालवाचक भूगोलाचा कंटाळा करील? 'नाना देशचे नाना लोक' हें श्री. विठ्ठलराव घाटे यांचें चटकदार पद्धतीनें लिहिलेलें बहारीचें पुस्तक वाचतांनासुद्धां प्रौढांची बालवृत्ति जागृत होईल. मग मुलें भोंवतालची सृष्टि विसरून पुस्तकांत तल्लीन झालीं तर त्यांत काय नवल! अशा प्रकारचें वाङ्मय जितकें होईल तितकें हवेंच आहे.

खेळ व व्यायाम यांसंबंधींचें वाङ्मय बडोदें येथील 'व्यायामकार्यालया'नें विपुल प्रसिद्ध केलें आहे. श्री. रा. स. शिर्के (ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर, जळगांव) यांचीं शाळेंतील खेळासंबंधींचीं पुस्तकें सर्वमान्य व्हावयास पाहिजेत. सांगलीचे वैद्य परांजपे ह्यांनीं देखील आरोग्यविषयक छोटीं पुस्तकें बऱ्यापैकीं लिहिलीं आहेत. तथापि अशा पुस्तकांतून पुष्कळदां वाङ्मयगुण कमी असतो. व्यायाम व खेळ यांचें महत्त्व व माहिती मुलांच्या मनावर बिंबविण्यास अशा पुस्तकांचा वाङ्मयीन दर्जा श्रेष्ठ असला पाहिजे.

## समारोप

येथवर केलेल्या विवेचनावरून बालवाङ्मयाच्या सर्व शाखांची प्रगति कशी व कोठवर झाली आहे हें समजून येईल. विवेचनाच्या ओघांत दिलेलीं पुस्तकांचीं सर्व नांवें घेतलीं तरी बालवाङ्मयाची पूर्ण यादी तयार होईल, असें मुळींच नाहीं. पुष्कळ पुस्तकांचा उल्लेख करावयाचा राहिला आहे याची जाणीव प्रस्तुत लेखकास पूर्णपणें आहे. तथापि चर्चात्मक लेख म्हणजे त्या विषयावरील पुस्तकांची सूचि नव्हे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. असो.

आतां बालवाङ्मयांत आढळून येणाऱ्या उणीवा व त्या दूर करण्याचे उपाय यांचें थोडें दिग्दर्शन केलें तर तें अप्रस्तुत होईलसें वाटत नाहीं. वेगवेगळ्या शाखांची माहिती देतांना कांहीं विशिष्ट सूचना केलेल्याच आहेत. परंतु एकंदर बालवाङ्मय तेजस्वी, बहुविध, व रसाळ होण्यास काय केलें पाहिजे याचा ऊहापोह होणें जरूर आहे.

प्रथम चित्रकलेचा उपयोग फारच मोठ्या प्रमाणांत करून घेतला पाहिजे. मुलांना कोणतीहि कल्पना शब्दांतून समजावून घेणें आणि तिचें चित्र मनःचक्षूपुढें रंगविणें जड जातें. त्यांना प्रत्यक्ष चित्र डोळ्यांसमोर दिसलें पाहिजे. चित्रें नुसतीं विपुल देऊन उपयोगी नाहीं. तीं सुबक व सार्थ असलीं पाहिजेत. सदोष चित्रें देऊन मुलांची कलादृष्टि बिघडविण्यापेक्षां तीं न दिलेलींच बरीं ! मागें पुणें येथील ‘ वसंतव्याख्यानमालें’त ( १९३३ ) रा. देवदत्त नारायण टिळक यांनीं ‘ चित्रशाळे ’चीं पुस्तकें घेऊन यथादर्शनशास्त्राच्या दृष्टीनें त्यांतील चित्रांत केवढे भयंकर दोष आहेत हें सप्रमाण दाखविलें होतें. कुशल चित्रकार मिळत नाहींत आणि मिळालेच तर त्यांच्या कलेचें मोल देणें आहाराबाहेर जातें; बरें, तें एक वेळ पत्करलें तर पुस्तकाची किंमत भलतीच ठेवावी लागून पुस्तकाचा उठाव व्हावा तसा होत नाहीं, ही आक्षेपपरंपरा आम्हांला मान्य आहे. परंतु संपन्न संस्था व प्रकाशक आणि सुखवस्तु लेखक यांनीं तरी व्यापारी वृत्तीला थोडी मुरड घालून कलेला हात द्यावा. तसेंच चित्ररूप गोष्टींचा आपणांकडे अभाव दिसून येतो. रा. भ. स. भडकमकर यांचीं ‘ चित्रपाठ ’ व ‘ शिशुबोध ’ हीं पुस्तकें सोडल्यास तसा प्रयत्न कोणीं केल्याचें फारसें दिसत नाहीं. असे प्रयत्न मोठ्या प्रमाणावर व उत्कृष्ट रीतीचे झाले पाहिजेत; “ Father Tusk’s Annual ”, “ Tod’s Annual ”, “ Such Fun ” इत्यादि रमणीय इंग्रजी बालवार्षिकें जर आमचीं मासिकें व प्रकाशक अनुकरणाच्या हेतूनें आपल्या डोळ्यांपुढें ठेवतील तर पुष्कळ काम होईल.

निव्वळ सोपेपणा अथवा बिनजोडाक्षरीपणा हा बालवाङ्मयाचा अनन्य गुण आहे असा भ्रामक समज सर्वत्र पसरलेला दिसतो. पण तो सर्वस्वीं खोटा आहे. कल्पनाच मुलांना मुळीं अनाकलनीय असेल तर ती कितीहि सोप्या शब्दांत जोडाक्षरें वगळून मांडली म्हणून मुलांना कशी समजेल ? उद्यां बिनजोडाक्षरी भाषेंत व ठळक टाइपांत कोणीं ‘ बालउपनिषदें ’ प्रसिद्ध केलीं तर किती बालकें त्याचा

आदर करतील ? ‘ बाल ’ शब्द मागें जोडून प्रसिद्ध केलेलीं अशीं अशास्त्रीय व दुर्बोध पुस्तकें सर्वत्र बालवाङ्मयांत बरींच निघत आहेत !

अर्थात् याला कारण बालमानसशास्त्राचें अज्ञान हें होय. अनुकरणापाशीच आपल्या कर्तृत्वाची सरहद्द संपते. परभाषेंतील वाङ्मयकृतींचें अनुकरण करण्यापेक्षां त्या कृतींचें तंत्र व कार्यपद्धति आपण शिकलों तर आपलें वाङ्मय सरस व समृद्ध होईल. वाङ्मय हें मानसशास्त्राच्या आधारावरच उभारलेलें असावें हा सिद्धांत नवा आहे, असें समजण्याचें कारण नाहीं. बालवाङ्मयाची रचना करण्यापूर्वी बालमानसशास्त्राचा अभ्यास झालेला पाहिजे. अभ्यास याचा अर्थ केवळ त्या विषयावरील आदर्श अशीं जुनीं-नवीं देशी-विदेशी पुस्तकें अभ्यासणें असा नाहीं. मुलांच्या मनाची वाढ, त्यांच्या आवडीनिवडी, त्यांच्या आकांक्षा, त्यांचे स्वभावदोष व लहरी, त्यांच्यांतले सद्गुण इत्यादींच्या प्रत्यक्ष अवलोकनाची जोड ग्रंथाभ्यासाला दिली पाहिजे. मुलांबद्दल ज्यांना खरोखरीचा जिव्हाळा आहे त्यांनाच अशी जोड देणें शक्य होईल आणि ती दिली तरच जातिवंत बालवाङ्मय निर्माण होईल.

महिला वर्गाचा संबंध बालसृष्टीशीं विशेष येतो. महिलांना मुलांच्या अंतरंगांत शिरणें ही फारच सोपी गोष्ट आहे. कारण मुलांना आईचा, मावशीचा किंवा बहिणीचा जितका विश्वास वाटेल आणि त्यांच्यापुढें तीं जितकीं निःशंक मनानें वावरतील तितकीं वडिलापुढें किंवा भावापुढें वावरणार नाहींत. पाश्चात्य देशांत प्राथमिक शाळांतून वृद्ध व प्रेमळ शिक्षिका ठेविल्यानें शाळांची उपयुक्तता व बालप्रियता वाढल्याचें दिसून आलें. या दृष्टीनें सुसंस्कृत लेखिकांकडून बालवाङ्मयाला भरपूर मदत होण्यासारखी आहे. सौ. कमलाबाई किबे, सौ. गिरिजाबाई केळकर, श्री. काशीताई हेर्लेकर, श्री. लक्ष्मीबाई प्रधान, श्री. आनंदीबाई जयवंत, कु. पिरोज आनंदकर इत्यादि प्रतिष्ठित स्त्रियांनीं घालून दिलेली बालवाङ्मयाची परंपरा पुढें चालविण्यास उदयोन्मुख व अभ्यासू लेखिकांनीं पुढें आलें पाहिजे.

शेवटीं एकच गोष्ट सांगावयाची. इतर सर्व पुढारलेलीं राष्ट्रें आपल्या मुलांच्या डोळ्यांपुढें लहानपणापासून आदर्श म्हणून सदैव कांहीं तरी ठेवीत असतात. ‘मॅडोना’, ‘मोनालिसा’, ‘हर्क्युलस्’ इत्यादि सौंदर्य व सामर्थ्य यांचे परमोच्च आदर्श असणारीं चित्रें पाश्चात्य मुलांच्या अवलोकनांत लहानपणापासून येतात. इंग्लिश मुलांना शेक्सपियर आणि त्याच्या कृति यांची दाट ओळख किशोरावस्थेंतच होते. अद्वितीय

वीरांच्या कथा, चित्र, काव्य, संगीत इत्यादि अनेक साधनांनीं त्यांना ऐकविल्या जातात. वास्तवांत कांहींहि असो, कशाहि तडजोडी करण्याचे प्रसंग येवोत, परंतु उच्च, उदात्त, परमसुंदर असें ध्येय नेहमीं डोळयांपुढें असलें पाहिजे; तें तसें असेल तर मानसिक अवनतीपासून वेळोवेळीं माणसांचें रक्षण होईल. ही गोष्ट आमच्या बाल-वाङ्मयांत समृद्धि करूं इच्छिणाऱ्या कलावंतांनीं लक्षांत ठेविली पाहिजे. आपल्या देशांतील जुनी शिल्पकला, सृष्टिसौंदर्य, काव्य, उदात्त कथा इत्यादि सर्व कांहीं शब्दांतून, स्वरांतून आणि रंगांतून मुलांपुढें सदैव प्रकट होत राहिलें पाहिजे. त्यांचें मर्म त्यांना कालांतरानें समजेल. परंतु ते आदर्श लहानपणींच त्यांच्या संस्कारक्षम मनावर प्रतिबिंबित होतील आणि त्यायोगें त्यांची मनोवृत्ति नेहमीं उदात्ततेकडे झेपावत राहील.

---

७

# चरित्रवाङ्मय

[ लेखकः—प्रो. श्रीनिवास नारायण बनहट्टी, एम्.ए., एल्एल्.बी. ]

कोणत्याहि भाषेंतील वाङ्मयाचें महत्त्वमापन मधून मधून होत राहणें हें त्या वाङ्मयाच्या उन्नतीच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें असतें. परंतु आपल्याकडे तें कार्य व्हावें तसें होत आहे असें म्हणतां येत नाहीं. जुन्या व नव्या वाङ्मयाचा आढावा घेण्याची प्रवृत्ति वाढत आहे यांत शंका नाहीं. परंतु आढावा म्हणजे विवेचक समालोचन नव्हे, व महत्त्वमापन तर नव्हेच नव्हे. अमुक विषयावर अमुक ग्रंथ झाले आहेत, त्या विषयाच्या पोट विभागांमध्यें ते अशा रीतीनें विभागले गेले आहेत, असें वर्गवारीसहित परिगणन करून, त्यांपैकीं अमुक ग्रंथ चांगला आहे, अमक्याचे प्रयत्न स्तुत्य आहेत, अशा गुळमुळीत शेऱ्यांची खैरात करण्यांत कृतार्थता मानणें हें खरें समालोचन नव्हे. अशा पद्धतीनें लिहिलेले लेखच काय, परंतु पुस्तकेंहि बरींच निर्माण झालीं आहेत. प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांच्या याद्या, त्यांच्या लेखकांची इतस्ततः उपलब्ध झालेली माहिती व मधून मधून त्यांच्या पुस्तकांतील उतारे व फारच झालें तर उद्‌गारचिन्हांसह ठोकून दिलेले थोडेसे स्वतःचे शेरे—इतकें झालें कीं, झालाच वाङ्मयाचा एक इतिहास तयार! लेखक जर योग्य असेल तर निदान त्याच्या शेऱ्यांमधून तरी कांहीं मार्मिकता आढळते; नाहीं तर काय येथून तेथून निर्जीव विधानांचें पोकळ अवडंबर!

अशा परिस्थितीमुळें कोणत्याहि एखाद्या वाङ्मयशाखेचें विवेचक समालोचन व महत्त्वमापन करणें मोठें अडचणीचें झालें आहे. रूढ प्रचारच तसा असल्यामुळें सामान्य वाचक जर ग्रंथ व ग्रंथकार यांच्या याद्यांचीच अपेक्षा करूं लागले आणि कित्येक नांवें गाळलेलीं आढळतांच लेखकावर अपूर्णतेचा व अज्ञानाचा आरोप करूं लागले तर लेखकानें तरी स्वानुभूतीनें उजळलेले असे विचार प्रकट करण्या-साठीं बुद्धीला कां कष्टवावें? सामान्य वाचकांचे असले आरोप एक परी बरे; परंतु निःस्पृहतेनें आणि निरक्षेप रसिकतेनें केलेल्या विवेचनावर व स्तुतिनिंदेवर, उल्लेखांवर व अनुल्लेखांवर, अप्रशस्त हेतूंचा जर आरोप होऊं लागला तर इतकी यातायात केल्याचें खासें चीज झालें म्हणावयाचें!

चरित्रपर वाङ्मयाचें महत्त्वमापन करणें आणखी एका विशिष्ट कारणास्तव अधिकच बिकट होऊन बसतें. चरित्रनायकाच्या विख्यातीमुळेंच कित्येक चरित्रग्रंथ महत्त्वाच्या पदवीस चढलेले आढळतात. विशेषतः सामान्य वाचकांस चरित्राची योग्यता ठरविण्यास हीच कसोटी लावावीसें वाटतें. कादंबरी, नाटक, किंबहुना इतिहास देखील आपल्या स्वयंभू वाङ्मयगुणांमुळेंच महत्त्वास चढेल अगर पडेल. त्यांत वर्णिलेल्या व्यक्तीच्या योगानें त्या वाङ्मयकृतीस आगंतुक महत्त्व प्राप्त झालें आहे, असें आढळणार नाहीं. परंतु मराठींत पुष्कळशीं चरित्रें अशीं आहेत कीं, विशिष्ट व्यक्तींचीं तीं चरित्रें आहेत म्हणून त्यांचा उल्लेख सर्वत्र केला जातो व करावा लागतो. एरवीं चरित्रांत जे वाङ्मयगुण असावयास पाहिजेत त्यांच्या कमताई-मुळें आत्यंतिक उपेक्षा हीच त्यांची योग्य संभावना झाली असती. आपली दृष्टीच खरोखर अद्याप स्थूल आहे, असें म्हटलें पाहिजे. काव्य, नाटक, कादंबरी यांमध्यें कांहीं रचनासौष्ठव व कलात्मकता असली पाहिजे, हें आपण आतां कोठें जाणूं लागलों आहोंत. परंतु इतिहास, चरित्र, वाङ्मयविवेचन, किंबहुना तत्त्वज्ञानसुद्धां, ग्रंथ-रूपांत निविष्ट करतांना, त्यास रचनासौष्ठवाची व कांहीं विशिष्ट वाङ्मयगुणांची अपेक्षा असते याची दखलगिरी अद्यापहि आम्हांस फारशी नाहीं. त्यामुळें इतिहास म्हणजे भारूड, चरित्र म्हणजे गारूड, वाङ्मयविवेचन म्हणजे शेरेबुक, आणि तत्त्वज्ञान म्हणजे गौडबंगाल अशी स्थिति सामान्यतः आपल्याकडे चालत आलेली आहे. अपवाद नाहींत असें नाहीं. परंतु त्यांचें भूषण मानून आपल्या वाङ्मयाचें वैभव मिरवूं लागण्याइतके ते विपुल नाहींत. आणि दुर्दैवाची गोष्ट ही कीं, या दारिद्र्याची सर्वसामान्य वाचकवर्गास व लेखकवर्गासहि जाणीव नाहीं.

जाणीव नाहीं, असें वर म्हटलें खरें, परंतु जाणीव होऊं लागल्याचीं चिन्हें अस्फुट रीतीनें कोठें कोठें दिसूं लागलीं आहेत, हें येथें सांगितलें पाहिजे. चरित्र लिहिणें म्हणजे एक धोपट मार्ग; जितकी म्हणून माहिती सगळीकडून गोळा करतां येईल तितकी करून तिच्या सत्यासत्याची विशेष छाननी न करितां साधारणपणें कालानुक्रम सांभाळून ती पुस्तकांत ठासून भरावयाची, एवढें एक चरित्रकारास ठाऊक. त्या माहितीला काट एवढ्यापुरता बसावयाचा कीं, चरित्रनायकाचे दोष दर्शविणारा जेवढा अंश त्यांत असेल तेवढा मात्र पूर्ण नेस्तनाबूद झाला पाहिजे. कांहीं हाताच्या बोटांवर मोजण्याइतके अपवाद वगळले असतां येथून तेथून सर्व चरित्रकारांनीं या धोपट मार्गाचेंच अवलंबन केलेलें दिसतें. चरित्रलेखनाचा कला या दृष्टीनें विचार करून चरित्रनायकाचें व्यक्तित्व आणि त्याचें जीवनरहस्य हृदयंगम रीतीनें वाचकांच्या मनावर ज्या योगानें ठसवितां येईल अशा पद्धति चरित्रलेखनासाठीं आपण अवलंबिल्या पाहिजेत, अशी जाणीवहि फार काळपर्यंत कोणाच्या मनांत उत्पन्न झाली नव्हती. कोणत्याहि व्यक्तीचें चरित्र निरनिराळ्या अनेक प्रकारांनीं लिहितां येण्याजोगें आहे, अशी जाणीव श्री. न. चिं. केळकर यांनीं, बहुधा प्रथमच, आपल्या टिळकचरित्राच्या प्रस्तावनेंत व्यक्त केलेली आढळते. आणि पुढें टिळकचरित्राच्या अनुकूल वा प्रतिकूल प्रेरणेनेंच बहुधा, कांहीं तरुण लोकांच्या मनामध्यें चरित्रलेखनाचें वास्तविक स्वरूप काय असावें, असा प्रश्न उपस्थित झालेला दिसतो. टिळकचरित्राच्या उत्तरार्धाचे दोन खंड प्रसिद्ध झाले, तेव्हां त्यांवरून विचार मनांत उद्भवून श्री. काटे नांवाच्या तरुण गृहस्थांनीं चरित्र हें वास्तविक कसें असलें पाहिजे या विषयाची आपली कल्पना विशद करण्यास एक वाचनीय निबंध लिहिला ( हा अद्याप अप्रसिद्ध आहे ). १९३२ सालीं लिहिलेल्या रवींद्रनाथ टागोरांच्या चरित्रांत श्री. रा. प्र. कानिटकर यांनीं मराठींत चालू असलेल्या चरित्रलेखनाच्या पद्धतीविषयीं स्पष्ट शब्दांत असमाधान प्रकट केलेलें आढळतें. गेल्या वर्षी 'प्रतिभा' पाक्षिकांतून (वर्ष १, अंक ५, ६, ७) चरित्रलेखनाच्या स्वरूपाविषयीं श्री. वि. ह. कुलकर्णी यांनीं केलेला ऊहापोह हा चरित्रलेखनाच्या पद्धतीविषयीं वाटत असलेल्या कुतूहलाचा निदर्शक आहे. त्यानंतर श्री. अ. म. जोशी यांनीं नोव्हेंबर १९३४ च्या 'पारिजात' मासिकांत लिहिलेल्या 'चरित्रलेखनकला' नांवाच्या लेखांत, मराठींतील कांहीं सुप्रसिद्ध चरित्रांचीं व्यंगें दर्शविलेलीं असून कलापूर्ण चरित्र कसें निर्माण करावें याची दिशा दाखविण्याचा यत्न केला आहे. या खाणाखुणांवरून अगदीं तरुण

पिढींतील लेखकांस मराठींतील चरित्रवाङ्मयाच्या व्यंगपूर्णतेची जाणीव किंचिदंशानें होऊं लागली आहे, असें दिसतें. ही जाणीव व हें असमाधान किती तीव्र झालें म्हणजे मराठींत प्लूटार्कचे, बॉस्वेलचे, लिटन स्ट्राचींचे अवतार होऊं लागतील, हें कोणीं सांगावें ?

असे अवतार आजपर्यंत झाले नाहींत याचें मोठें कारण हें होतें कीं, चरित्र-लेखकाच्या ठायीं ज्या प्रकारची वृत्ति असावयास पाहिजे आणि ज्या तऱ्हेनें त्यानें चरित्रविषयाचें आकलन करावयास पाहिजे ती वृत्ति व ती तऱ्हा आमच्यांतील बहुधा कोणत्याच चरित्रकारानें आपल्या अंगीं आणण्याचा प्रयत्न केलेला दिसत नाहीं. ‘ संसारास व लोकव्यवहारास उपयोगी असा सदुपदेश ’ चरित्रग्रंथापासून प्राप्त झाला पाहिजे, ही अगोदर सर्व चरित्रकारांची मूलभूत कल्पना. तेव्हां निदान कांहींना कांहीं तरी बोध व उपदेश एखाद्या मनुष्याच्या जीवनवृत्तांतापासून निघण्या-जोगा आहे अशी पक्की खात्री झाल्याशिवाय चरित्रलेखनास कोणी प्रवृत्तच होत नाहीं. ‘ कांहीं तरी बोध व उपदेश ’ हें हेतूचें अगदीं स्थूल मानानें वर्णन झालें. त्यांतून मग कोणी आपल्या तरुणांस देशाभिमानाची स्फूर्ति व्हावी म्हणून चरित्रें लिहितो, कोणी धर्मजागृतीच्या उद्देशानें लेखणीस हात घालतो, कोणी हिंदुसंघटनाचे अभिमानी म्हणून संघटन-चळवळीच्या पुरस्कारार्थ पुढाऱ्यांचे जीवनवृत्तांत रेखाटतात, ईशभक्तीचा व भागवतधर्माचा उदो उदो व्हावा म्हणून कोणी संतचरित्रें वर्णितो, तर नास्तिकमताचा प्रसार व्हावा या उद्देशानें कोणी मूर्तिभंजकांचा वृत्तांत सादर करतो; कोणी स्वपक्षाचा गौरव व्हावा म्हणून पक्षनायकाचें जीवन लेखनिविष्ट करतो, तर कोणी प्रतिपक्षावर कोरडे उडवावे याच आकांक्षेनें चरित्रलेखनास प्रवृत्त झालेला दिसतो. अशा कांहीं हेतूंचा पगडा चरित्रकाराच्या मनावर बसला कीं, मग चरित्रनायक हा त्या हेतुभूत तत्त्वाचा एक दाखला किंवा दृष्टान्त बनतो आणि त्याचा जीवनवृत्तांत म्हणजे त्या विशिष्ट तत्त्वाच्या सिद्ध्यर्थ ‘ जैसें चेष्टे सूत्राधीन, दारुयंत्र ’ अशीच स्थिति सरासरीनें होते. याशिवाय निवळ खासगी, व्यक्तिगत हेतूस्तव लिहिलीं जाणारीं चरित्रें आणि जातिनिष्ठतेमुळें निर्माण होणारीं चरित्रें, यांची संख्या बरीच मोठी भरेल, हें उघड आहे. जातिनिष्ठतेचा प्रकार आमच्या-कडील विशिष्ट म्हणून बाजूस ठेवला तर केवळ व्यक्तिगत हेतूस्तव निर्माण होणारीं चरित्रें इतर भाषांतूनहि अतोनात दिसून येतात. आपला बाप, भाऊ, काका, मामा किंवा असाच कोणी नात्याचा पुरुष गौरवान्वित व्हावा यास्तव त्याचें चरित्र लिहून

अगर लिहून प्रसिद्ध करण्याची प्रवृत्ति व्हावी, हें मनुष्यस्वभावास अनुसरूनच आहे. इंग्रजी वाङ्मयांत असे चरित्रग्रंथ किती दृष्टीस पडतात याविषयीं एका लेखकानें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे.—

There, in petrified and meaningless solemnity, stand the biographies of yesterday: long rows of *Lives and Times*, *Lives and Letters*, or unadorned but still intolerable *Lives*, testaments perhaps, to the affection of relatives or the industry of hacks, but not to the intelligence of the biographer.

मराठी वाङ्मयांत सुदैवानें इतकी भयप्रद स्थिति निर्माण झालेली नाहीं. तथापि मनुष्यस्वभाव सगळीकडे सारखाच असल्यामुळें नाना तऱ्हेच्या व्यक्तिगत हेतूंस्तव लिहिलेलीं चरित्रें मराठींतहि बरींच दृष्टीस पडतात, यांत नवल नाहीं.

आतांपर्यंत केलेल्या अति संक्षिप्त पर्यालोचनावरून मराठींतील चरित्रग्रंथ सरसकट रद्दींत काढण्याच्याच योग्यतेचे आहेत, असा कोणाचा ग्रह झाल्यास तो बरोबर नाहीं. चरित्रलेखनाला योग्य दिशा लागलेली नाहीं ही गोष्ट जरी अद्याप खरी असली तरी आतांपर्यंत झालेलीं चरित्रें वाङ्मयदृष्ट्या टाकाऊ आहेत असें कोणाच्यानें म्हणवणार नाहीं. याचें एक मोठें कारण असें आहे कीं, आमच्यांतील मोठमोठ्या वाक्प्रभूंनीं या चरित्रलेखनाच्या प्रांतांत येऊन आपलें कर्तृत्व गाजविलें आहे. चरित्रलेखनाची रीत किंवा पद्धत या दृष्टीनें त्यांनीं लिहिलेल्या चरित्रांमध्यें कितीहि व्यंगें दाखवितां आलीं तरी त्यांच्या अंगभूत प्रतिभेमुळें त्यांच्या हातून निर्माण झालेल्या कृति स्वभावतःच सुंदर वठलेल्या आहेत, ही गोष्ट कोणीहि अमान्य करणार नाहीं. विष्णुशास्त्री चिपळूणकर, वासुदेवशास्त्री खरे, लक्ष्मणराव पांगारकर किंवा तात्यासाहेब केळकर यांच्यासारखे मार्मिक व रसिक भाषाप्रभु ज्या क्षेत्रांत उतरले त्यास आपल्या बहुमोल कृतींनीं अलंकृत केल्याखेरीज कसे राहतील? योग्य दिशेचा व दृष्टीचा अभाव हा आमच्या चरित्रवाङ्मयास साधारण असाच दोष आहे. तो क्षणभर विसरूनच यापुढें चरित्रवाङ्मयाचें समालोचन सामान्य सहृदयाच्या दृष्टीनें केलें आहे.

गेल्या साठ वर्षांच्या कालावधीस जो प्रारंभ झाला तोहि बहारीनेंच झाला. साठ वर्षांपूर्वीचा काळ म्हणजे निबंधमालेच्या प्रारंभाचा काळ होय. निबंधमालारूपी सूर्यानें उजळलेली ती मराठी गद्याची प्रभात वाङ्मयाच्या सर्व शाखांमध्यें चैतन्य ओतणारी झाली असल्यास त्यांत काय नवल? त्यांतल्या त्यांत नि

अवतारानें इतिहाससंशोधन व चरित्रलेखन या दोन गोष्टींना विशेषच चालना दिली. "शास्त्रीबोवांच्या विचारांनीं मराठी वाङ्मयाला अत्यंत इष्ट असें वळण लागलें आहे. चरित्रग्रंथाची प्रवृत्ति, प्राचीन कवींविषयींची आस्था, ऐतिहासिक अभ्यासाची वाढ हीं त्यांचीं दृश्य फळें आहेत," असें श्री. बापूजी अणे यांनीं आपल्या समालोचनांत म्हटलें आहे, तें अगदीं खरें आहे. मालेच्या अवतारानें चरित्रलेखनास चालना मिळणें हें अगदीं साहजिक होतें. कारण निबंधमाला म्हणजे सहृदयता, रसिकता, व जाज्वल्य आपलेपणाची भावना या गुणांचें निधान होय. आणि चरित्र-लेखनाची स्फूर्ति होण्यास याच गुणांचा समुच्चय अंगीं असावा लागतो. निबंध-मालेपासून प्राप्त झालेलें हें चैतन्य कांहीं काळानंतर प्रभावी झालें. खुद्द मालेचीं पुष्पें गुंफिलीं जात असतांना ज्या इतर लेखकांचें लेखन चालू होतें तें सर्व जुन्या चाकोरींतून जाणारें असेंच होतें. या लेखकांमध्यें विनायक कोंडदेव ओक हे प्रमुख होत. किंबहुना १८७० ते १८८० या दशकांत विविध प्रकारचें लेखन करणारे असे चिपळूणकर व ओक हे दोनच उत्साही लेखक विद्यमान होते, असें म्हटलें असतां चालेल.

बालबोधकार विनायक कोंडदेव ओक आणि निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर हीं दोन नांवें उच्चारतांच परस्परविरोधाचा केवढा चमत्कारिक प्रत्यय मनास येतो! ओक हे मालाकारांपेक्षां दहा वर्षांनीं वडील. त्यांच्या लेखनासहि मालेच्या सुरुवातीपूर्वीच आरंभ झाला होता. परंतु मालाकारांचें सर्व कर्तृत्व बिजलीप्रमाणें त्यांच्यासमोर चमकून गेलें तरी ओकांची ठाणवई शांतपणें व स्तिमितपणें पुढें दीर्घकालपर्यंत जळतच होती. त्यांची भाषासेवेची स्फूर्ति उसनी नव्हती व कर्तृत्व परप्रकाशित नव्हतें. परंतु त्यांत स्वतंत्रतेचा तेजाळपणा अगर रसिकतेचा मनोहर विलास दृग्गोचर होत नव्हता. निबंधमालापूर्वकालीन लेखकांमध्यें लोकसुधारणेची कळकळ व स्वभाषेंत ग्रंथरचना करून लोकांस ज्ञान देण्याची इच्छा ज्या प्रकारची दिसून येत असे तशीच ती लोकांमध्येंहि वसत होती. म्हणजे कळकळ व इच्छा अगदीं मनापासूनची, परंतु स्वातंत्र्याची सळसळणारी भावना व नवोन्मेषांनीं स्फुरणारी प्रतिभा यांची जोड तीस नव्हती. त्यामुळें त्यांच्या लेखनास पूर्वकालीन लेखकांप्रमाणें परभृततेची दिशा लागली व त्यांचे मनोधर्महि स्वीकारलेल्या मार्गास अनुकूलच असल्यामुळें जन्मभर ते याच मार्गानें जात राहिले. निबंधमालापूर्वकालीन वाङ्मयसेवकांमध्यें आढळून येणाऱ्या प्रवृत्तींचें लोण मालोत्तर-

कालांत, किंबहुना अगदीं अलीकडच्या काळापर्यंत पोंचविणारे ओक हेच सर्वांत प्रमुख ग्रंथकार होत यांत संशय नाहीं.

शिकंदर बादशहा, पीटर धि ग्रेट आणि ड्यूक ऑफ वेलिंग्टन यांचीं चरित्रें सरकारनें ओकांकडून विकत घेऊन १८७७ पूर्वींच प्रसिद्ध केलीं होतीं. हीं चरित्रें अर्थात् इंग्रजींतील चरित्रांचीं रूपांतरें असून विस्तारानें लहानच आहेत. हीं तीन्ही चरित्रें पाश्चात्य पुरुषांचीं आहेत. त्याचप्रमाणें निबंधमालेंत 'डॉ. जॉन्सन्' या निबंधाच्या प्रारंभीं, तत्पूर्वी प्रसिद्ध झालेल्या ज्या चरित्रांचा उल्लेख केला आहे तीहि, दोन शिवायकरून, बाकीचीं सर्व पाश्चात्य पुरुषांचींच आहेत. मालाकार म्हणतात—"गेल्या वीस पंचवीस वर्षांत साक्रेटीस, कोलंबस, खुसरू, नाना फडणवीस, कॅप्टन कुक व कॅथरैन इतक्यांचीं चरित्रें प्रसिद्ध झालीं. शिवाय दोनतीन वर्षांपूर्वी दक्षिणा प्राइझ कमिटीकडून पसंत झालेलीं वॉशिंग्टन्, फ्रांकलिन, लॉर्ड क्लैव हींहि चरित्रें इंदुप्रकाशांत छापलीं गेलीं." या सर्व चरित्रांचे विषय पाहिले म्हणजे निबंधमालेच्या पूर्वीच्या काळीं आपलेपणाची भावना व योग्यायोग्य पारखण्याची शक्ति यांचा कसा अभाव होता, हें उत्कृष्ट रीतीनें लक्षांत येतें. शिवाजीकडे कोणाचेंच लक्ष न जातां खुसरू व नाना फडणवीस यांचींच चरित्रें गाण्याची बुद्धि व्हावी, हें तत्कालीन लेखकांमध्यें तारतम्य कमी असल्याचेंच चिन्ह होय. ओकांना देखील नेपोलियनच्या ऐवजीं त्याचा पराभव करण्याचें श्रेय दैवयोगानेंच पदरांत पडल्यामुळें ख्यातीस पावलेल्या मुर्दाड ड्यूक ऑफ वेलिंग्टनचें चरित्र गाण्याची इच्छा व्हावी, हें कशाचें द्योतक? चरित्रविषय हे ज्याप्रमाणें वेंचक व आपल्या देशाच्या सद्यःस्थितींत स्फूर्तिदायक होतील असे निवडण्याकडे त्या वेळीं विशेषसें लक्ष नव्हतें, त्याप्रमाणें चरित्रलेखनाची तऱ्हाहि रम्य किंवा कुतूहलजनक नव्हती. नीरस भाषेंत, थंड्या पद्धतीनें चरित्रनायकाच्या जीवनांतील प्रसंग एकामागून एक (इंग्रजी ग्रंथांवरून) कसेबसे कथन करणें यापलीकडे या वेळच्या चरित्रकारांच्या कर्तृत्वाची मर्यादा गेली असल्याचें दिसत नाहीं.

निबंधमालेचा अवतार होण्याच्या सुमारास, म्हणजे इ. स. १८७१ नंतर, ही स्थिति पालटूं लागली. चरित्रलेखकांची दृष्टि स्वकीयांकडे वळत चालली, हें एक या पालटत चाललेल्या स्थितीचेंच प्रमुख निदर्शक होय. स्वकीयांकडे वळूं लागलेली दृष्टि प्रथम साधुसंत व धार्मिक पुरुष (जुने व नवे) यांचा गौरव करण्यास प्रवृत्त झाली, हें आमच्या धर्मप्रवणतेस अनुरूप असेंच झालें.

ज. वि. चौबळ यांचें "रामदास स्वामी" (१८७१), "एकनाथ" (१८७२), "तुकाराम" (१८७७) हीं संतचरित्रें या काळांत झालीं. आणि रामचंद्र पांडुरंग आजरेकर यांनीं लिहिलेलें "विष्णुबुवा ब्रह्मचारी" (१८७३) व भास्कर बल्लाळ निमकर यांनीं लिहिलेलें "भास्कर दामोदर पाळंदे यांचें लघु-चरित्र" (१८७८) या दोन छोट्या चरित्रांच्या योगानें आधुनिक पुरुषांच्या चरित्रांची मुहूर्तमेढ रोंवली गेली.

वरील उपक्रम हा विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं निर्माण केलेल्या स्फूर्तीमुळें होऊं लागला होता, असें म्हणतां येणार नाहीं. खुद्द शास्त्रीबोवा याच सुमारास लेखनप्रविष्ट झाले होते. अर्थात् त्यांच्या स्फूर्तीचा प्रभाव इतरांवर झालेला दिसून येण्यास कांहीं तरी अवकाश लागणें, हें अपरिहार्य होतें. परंतु हा अवकाश फारसा दीर्घ नव्हता, हें वस्तुस्थितीचें निरीक्षण करणारांस तेव्हांच दिसून येईल. निबंधमाला सुरू करण्याच्या पूर्वीं दोन वर्षें शास्त्रीबुवा शालापत्रकांतून 'कविता' या विषयावर एक विस्तृत लेख-मालिका लिहीत होते. त्यांतील इंग्रजी कवितेवरचा भाग प्रारंभीं लिहून संपवून १८७२ च्या मे महिन्यापासून त्यांनीं संस्कृत कवींवर निबंध लिहिण्यास प्रारंभ केला व कालिदास, भवभूति, दण्डी, बाण आणि सुबंधु या पांच कवींवरील आपले निबंध त्यांनीं १८७४ अखेरपर्यंत लिहून संपविले. या निबंधांत चरित्रात्मक भाग कांहीं नाहीं. अर्थात् ते सर्वस्वीं वाङ्मयविवेचनाच्या (literary criticism) सदरांतच जमा होण्याजोगे आहेत. तथापि चरित्रात्मक भाग त्या लेखांत आला नाहीं, याचें कारण मुळांतच तो उपलब्ध नव्हता हें होय. त्या कवींचा जीवन-वृत्तांत माहीत असता तर तो शास्त्रीबोवांनीं आपल्या निबंधांत समाविष्ट केलाच असता असें निश्चित अनुमान, उपोद्घातांत माहितीच्या अभावाबद्दल जे त्यांनीं खेदोद्गार काढले आहेत, त्यांवरून निघतें.

संस्कृत कविपंचकाच्या अशा स्वरूपामुळें तें दोन परस्परसंबंध अशा क्षेत्रांतील लेखकांस प्रेरक व मार्गदर्शक ठरलें. एक क्षेत्र निवळ वाङ्मयविवेचनाचें व दुसरें विवेचनयुक्त चरित्रांचें. पहिल्या क्षेत्रांत विष्णुशास्त्र्यांनीं पाडलेली रसिकावलोकनाची प्रथा 'आधुनिक कविपंचक' लिहिणाऱ्या श्री. माडखोलकरांसारख्या आधुनिक विवेचकांसहि अप्रत्यक्षरीत्या प्रेरक झालेली आढळते. परंतु निवळ विवेचनपर प्रबंधां-विषयीं आपणांस येथें विचार करावयाचा नसल्यामुळें तें क्षेत्र सोडून विवेचनयुक्त अशा चरित्रांची जी प्रथा संस्कृत कविपंचकामुळें पडली तिजकडेच आपण लक्ष

१८७. ही प्रथा पुढें फारच समृद्धिशालिनी झाली. इतकी कीं, पांगारकरांसारख्या अभिजात वाक्प्रभूंचें कर्तृत्व तिजमधूनच प्रकट झालें. ह्या पुढच्या समृद्धीस साजेसा असाच प्रारंभहि या क्षेत्रांत झालेला दिसून येतो, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. हा प्रारंभ इंदूरचे बाळकृष्ण मल्हार हंस यांच्या हातून झाला. हंसांनीं सहा संतकवींवर प्रत्येकीं पृथक् असे सहा निबंध लिहिले अशी माहिती श्री. पांगारकर यांनीं दिली आहे. तथापि त्यांपैकीं " तुकाराम " ( १८८० ), " मोरोपंत ह्यांचें चरित्र व काव्यासंबंधीं गुणदोष ह्यांविषयीं निबंध " ( १८८२ ), " वामन पंडिताचें चरित्र, ग्रंथ व काव्यासंबंधीं गुणदोष आणि त्याची व मोरोपंताची कवितेसंबंधीं तुलना " ( १८८४ ), असे तीनच निबंध प्रसिद्ध झाले. " हंसांचे तीनहि निबंध अत्यंत मार्मिकपणानें, सहृदयतेनें व सद्भावानें लिहिले आहेत. हंसांची भाषा प्रगल्भ व प्रेमळ आहे, विचारसरणी चित्तवेधक व उदात्त आहे व टीकापद्धति बालबोध व शुद्धभावाची आहे, " हा श्री. पांगारकरांनीं या तीन प्रबंधांविषयीं व्यक्त केलेला अभिप्राय आजच्या विवेचकास पूर्णांशानें जरी नाहीं तरी बहुंशानें मान्य होईल यांत कांहीं शंका नाहीं. त्यांच्या निबंधांतील काव्यविवेचन संस्कृत साहित्य-शास्त्रांतील तत्त्वांस धरून केलेलें आहे. त्यांत आधुनिक पद्धतीचें समालोचन अर्थातच दिसून येत नाहीं. खुद्द मालाकारांचें वाङ्मयविवेचन यापेक्षां अधिक हृद्य व व्यापक—मर्माचा ठाव घेणारें असें आहे. हंसांच्या निबंधांतील चरित्रपर माहितीहि संशोधकांच्या प्रयत्नास सुरुवात होण्याच्या पूर्वींची असल्यामुळें सध्यां अगदीं जीर्ण भासते. निबंधाची भाषाहि यद्यपि प्रगल्भ व सरदार असली तरी प्रसंगविशेषीं संस्कृतप्रचुर व बोजड अशी झाली आहे. त्याचप्रमाणें प्रत्यक्ष चरित्रविषयक माहितीच्या अभावीं, कवींच्या काव्यामधून त्यांचें व्यक्तिचित्र निर्माण करावयाचा जो हृद्य प्रयत्न चरित्रकार या नात्यानें करावयास पाहिजे होता, तोहि हंसांनीं केलेला दिसत नाहीं. अशा अनेक दृष्टींनीं हंसांच्या निबंधांतील व्यंगें आज जरी आपणांस सांगतां आलीं तरी ज्या काळीं हे निबंध लिहिले त्या काळीं ते अपूर्व व अनेक गुण-पूर्ण वाटण्याजोगेच होते, यांत संशय नाहीं. शिवाय, मुद्दाम सांगण्याजोगी गोष्ट ही कीं, कवीचें चरित्र सांगतांना कवीला एक सर्वगुणसंपन्न विभूति असें न मानतां सामान्य मानवाप्रमाणेंच हंसांनीं त्याला लेखिलें आहे. भाविकपणाच्या भूमिकेवर ते आरूढ झालेले नसून त्यांची भूमिका विचक्षण रसिकाचीच आहे. मालाकारांप्रमाणेंच ते आपल्या निबंधामधून कवीला उद्देशून सर्रास एकवचनी प्रयोग करतात व

लोकोत्तरतेचें तेजोवलय चरित्रनायकाच्या मूर्तीभोंवतीं एकसारखें प्रकाशत राहावें अशी काळजी घेतांना दिसत नाहींत. त्यांच्या चरित्रांत एक प्रकारचा जिवंतपणा आहे व काव्यविवेचनांत एक प्रकारचा प्रांजळपणा आहे. त्यामुळें त्यांचें लेखन हृदयास जाऊन भिडल्याखेरीज राहत नाहीं.

श्री. पांगारकरांनीं हंसांच्या निबंधांस डॉ. जान्सन्‌च्या कविचरित्रमालेशीं तुळिलें आहे. ही तुलना फारशी योग्य वाटत नाहीं. चरित्र व वाङ्मय या दोन्ही दृष्टींनीं डॉ. जान्सन्‌ची कृति फार निराळ्या प्रकारची व श्रेष्ठ दर्जाची आहे. इंग्रजी वाङ्मयाशीं हंसांचा परिचय कितपत होता हें समजण्यास मार्ग नाहीं. तथापि एवढी गोष्ट निश्चित समजण्यास हरकत नाहीं कीं, जान्सन्‌च्या कविचरित्रमालेचा आदर्श हंसांपुढें स्वतःचे निबंध लिहितांना नसावा. हंसांच्या डोळ्यांपुढें चिपळूण-करांनीं नुकतेच लिहिलेले संस्कृत कवींवरील निबंध होते आणि त्यांनीं आपल्या नजरेसमोर नमुना म्हणून जर कांहीं धरलें असेल तर ते हेच लेख होत, यांत शंका नाहीं. कारण हंस व चिपळूणकर यांच्यामध्यें भाषा व विवेचनाची दिशा या बाबतींत कांहीं साम्य नसलें तरी निबंधांचा सांगाडा व विषयप्रतिपादनाचा क्रम हंसांनीं बऱ्याच अंशीं चिपळूणकरांच्या निबंधांवरून उचललेला दिसतो.

वाङ्मयविवेचन हें ज्यांतील प्रमुख अंग आहे अशा चरित्रांची प्रथा याप्रमाणें चिपळूणकरांच्या संस्कृत कवींवरील लेखांमुळें सुरू झाली. तिचा उत्कर्ष पुढें पांगारकरांदिकांच्या हातून झाला. त्याचा उल्लेख योग्य स्थळीं येईलच. परंतु वाङ्मयविवेचन हें ज्यांतील महत्त्वाचें अंग नाहीं, अशा निर्लेप चरित्रग्रंथाच्या बाबतींतहि चिपळूणकरांची कामगिरी तितकीच संस्मरणीय झाली, हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. मालेच्या पूर्वींच्या काळीं निर्माण झालेलीं चरित्रें पाहावीं—तीं आतां नुसतीं पाहावयास तरी कोठून मिळणार म्हणा !-आणि मालेंतील " डॉ. जान्सन् " हा चरित्रपर निबंध पाहावा, म्हणजे चिपळूणकरांच्या लोकोत्तर रसिकतेनें वाङ्मयाच्या अनेक सत्रांत नवीन युग निर्माण करण्याचा उपक्रम कसा चालविला होता, हें लक्षांत येईल.

" डॉ. जान्सन् " हें आधुनिक दृष्टीनें लिहिलेलें मराठींतील पहिलें खरेंखुरें चरित्र होय. निबंधमालेमधील निबंधांत कित्येकांस हाच सर्वोत्कृष्ट वाटतो तें कांहीं उगीच नव्हे. इतर निबंधांमध्यें रचनेच्या दृष्टीनें व इतर प्रकारें दोष काढावयास जागा आढळते तसें या निबंधासंबंधानें नसून सर्वच बाबतींत श्रेष्ठ दर्जाची

तारतम्यबुद्धि लेखकानें येथें उपयोगांत आणलेली आढळते. अगोदर चरित्र-नायक निवडण्यांत मालाकारांनीं मोठीच योग्यता प्रगट केली आहे. ‘ मालाकारांना आपण स्वतः मराठीचे डॉ. जान्सन् आहोंत असें वाटत होतें, ’ ही मालाकारांच्या दूषकांची कोटी जरी पूर्णपणें निराधार असली तरी त्या ठोकळ व दणकट वाग्वीरा-विषयीं एक प्रकारचा विशिष्ट आदर व जिव्हाळा त्यांस वाटत होता, यांत कांहीं शंका नाहीं. दुसरी मोठी अनुकुल गोष्ट, अव्वल दर्जाची विपुल सामग्री या चरित्र-नायकाच्या बाबतींत उपलब्ध होती, ही होय. परंतु सामग्री इतकी असतांहि, मराठींत लिहितांना फार विस्तार न करतां जान्सन्‌ची व्यक्ति त्याच्या स्वभावगुणां-सह वाचकांच्या मनश्चक्षूंपुढें जिवंत उभी राहील इतक्यापुरताच तपशील मार्मिकपणें निवडून काढून देण्यामध्यें मालाकारांचा संयम व तरतमभाव उत्कृष्ट रीतीनें व्यक्त झाला आहे. परदेशांतील पुरुषाविषयीं—मग तो कितीहि विख्यात व गुणी असो—शेंकडों पानें पाल्हाळीक मजकूर वाचण्यास कोणीहि वाचक झाला तरी कंटाळ-णारच हें जाणून सुमारें ६० पानांतच जान्सन्‌चा जीवनवृत्तांत त्यांनीं आटपून टाकला आहे.

नीतिबोध किंवा सदुपदेश हा चरित्रलेखनाचा उपयोग मानणारांपैकीं शास्त्रीबोवा हे नव्हते असें नाहीं. जान्सन्‌च्या जीवनवृत्तांतास प्रारंभ करण्यापूर्वीं “ संसारास व लोकव्यवहारास उपयोगी असा सदुपदेश ” चरित्रापासून प्राप्त होतो, हा चरित्र-ग्रंथाचा उपयोग त्यांनीं सांगितला असून शिवाय ह्या विशिष्ट चरित्रापासून इंग्लंडची देशस्थिति, तेथील रीतिरिवाज, इंग्रज लोकांचे गुणावगुण वगैरेंचीहि माहिती होईल असाहि निर्वाळा त्यांनीं दिला आहे. अशा रीतीनें उपयुक्ततावाद्याचा आव जरी त्यांनीं प्रारंभीं आणला असला तरी त्यांचें कलाविज्ञान व त्यांची रसिकता हींच पुढें प्रत्यक्ष चरित्र लिहितांना पूर्णपणें प्रभावी झालीं आहेत. चरित्रगत नीतिबोधा-विषयीं मामुली कल्पना ज्याच्या आहेत तो आपल्या चरित्रनायकाविषयीं पुढीलप्रमाणें उद्गार कधीं तरी काढील काय ?

१. “ त्याचा स्वभाव लहानपणापासून पराकाष्ठेचा स्वच्छंदी असे...... शाळेंतील उनाड पोरांत त्याचा पहिला नंबर असून कांहीं दांडगाई किंवा दंगा करणें असल्यास सर्वांचा म्होरक्या हाच होई. या गुणांमुळें व नित्याचे धडे कधीं लक्ष लावून तयार न केल्यामुळें त्यावर चवदाव्या रत्नाचा प्रयोग वारंवार होई. ”

२. " एकदोनदां मात्र त्याचा प्रसिद्ध मित्र साव्हेज याच्या संगतीनें त्याचें ज़रा वांकडें पाऊल पडलें.... दोघेहि फटिंग व दोघेहि सारखेच कफल्लक, तेव्हां दोघांनीं सारी रात्रची रात्र शहरभर हिंडावें व साऱ्या जगाच्या उलाढाली कराव्या."

हाच उपदेश जॉन्सन्च्या चरित्रापासून लोकांनीं घ्यावा, असें तर चरित्रकाराचें म्हणणें खास नसेल. तात्पर्य हेंच कीं, चरित्रग्रंथापासून सदुपदेश प्राप्त होणें हा एक त्याचा अवांतर उपयोग म्हणून शास्त्रीबुवा मानीत असतील, त्यास ते चरित्रग्रंथाचें ध्येय किंवा सारसर्वस्व मानीत होते, असें त्यांच्या रचनाशैलीवरून मुळींच दिसत नाहीं. त्यांनीं आपल्या कुंचल्याचे थोडेसेच फटकारे मारून जॉन्सन्चें चित्र त्यांतील खाचाखोंचा, गुणावगुण यांसहित हुबेहुब आपल्या दृष्टीसमोर निर्माण केलें आहे. आणि याप्रमाणें चार अंकांत संपूर्ण चरित्र वर्णून झाल्यानंतर मग तीन अंकांत स्वतंत्रपणें सदुपदेशाचें प्रवचन केलें आहे.

डॉ. जॉनसन्चें हें छोटें चरित्र इतकें हृदयंगम झालें आहे कीं, त्याच्या लेखकाची जगद्विख्यात चरित्रकारांशीं तुलना करण्याचा मोह आवरत नाहीं. एका बाजूनें प्लुटार्कशीं तर दुसऱ्या बाजूनें लिटन् स्ट्राचीशीं शास्त्रीबोवांची तुलना करावीसें वाटतें. प्लुटार्कनेंहि विख्यात ग्रीक व रोमन पुरुषांवर असेंच 'चरित्र–निबंध' लिहिले आहेत. ते विस्तारानें साधारणपणें " डॉ. जॉन्सन् " एवढेच आहेत, व त्यांतहि चरित्रनायकाचें व्यक्तित्व असेंच अत्यंत कौशल्यानें आविष्कृत केलें आहे. तथापि प्लुटार्क हा प्रामुख्यानें नीतिविवेचक ( moralist ) होता. त्यानें आपल्या चरित्रांत व्यक्तीच्या नैतिक बाजूस प्राधान्य दिलें आहे व प्रत्येक ठिकाणीं हेतूची चिकित्सा करून हेतूच्या शुद्धाशुद्धतेस अनुसरून कृत्यांचें बरेंवाईटपण ठरविण्याचा यत्न केला आहे. चिपळूणकरांनीं शेवटच्या तीन अंकांत यद्यपि चरित्रापासून घेण्याजोगा बोध वर्णन केला असला तरी बोधहि पुष्कळ अंशीं व्यावहारिक व राष्ट्रीय स्वरूपाचाच आहे. प्लुटार्कची उच्च नैतिक भूमिका त्यांत नाहीं. दुसरा एक मोठा फरक वर्णनशैलीचा. प्लुटार्कचें लिहिणें गंभीर तर चिपळूणकरांचें लिहिणें त्यामानानें उथळ व विनोदी, उपहासप्रचुर व खमंग असें आहे.

हा खमंगपणा लिटन स्ट्राचीमध्येंहि भरपूर आहे. त्याचप्रमाणें तोहि " डॉ. जॉन्सन् " सारखीं छोटीं चरित्रें लिहिण्याबद्दलच प्रख्यात असून चिपळूणकरांप्रमाणेंच भाषाप्रभु आहे. परंतु इंग्लंडांतील एकोणिसाव्या शतकामधील अनेक धेंडांच्या उच्च योग्यतेचा फुगा फोडून त्यांचें पोकळ अंतरंग उघडें करण्याकडे त्याचें

विशेष लक्ष असल्यामुळें चरित्रनायकांविषयीं जिव्हाळा व सहानुभूति त्याच्या चरित्रांतून दिसून येत नाहीं. त्यानें आपलें व्याजोक्तीचें हत्यार चरित्रविषयांवरच चालविलें आहे. त्याच्या उलट चिपळूणकरांनीं आपलें उपहासाचें हत्यार दांभिक व अकार्यरत अशा स्वकीय देशबांधवांवर चालविलें असलें तरी चरित्रनायकांविषयीं त्यांच्या मनांत जिव्हाळा व आदर भरपूर वसत होता, हें उघड आहे.

मराठींतील पहिल्या चरित्रकारांचें हें अव्वल दर्जाचें चरित्र सोडल्यानंतर आपणांस पैदाशीचें वैपुल्य परंतु गुणांचें दुर्भिक्ष असलेल्या बऱ्याच दीर्घ कालखंडांतून प्रवास करावा लागतो. चिपळूणकरांचा "डॉ. जॉन्सन्" २५-११-१८७६ रोजीं प्रसिद्ध झालेल्या ३३ व्या अंकापासून ५-१२-१८७७ रोजीं प्रसिद्ध झालेल्या ४३ व्या अंकापर्यंत चालू होता. चरित्रलेखनास येथपासून पुढें मोठी चालना मिळाली, हें पुस्तकाच्या वाढलेल्या पैदाशीवरून सहज दिसून येतें. परंतु जनमनावर परिणाम करणारीं किंवा वाङ्मयगुणांच्या योगानें रमणीय वाटणारीं अशीं त्यांमध्यें थोडींच निपजलीं. स्वकीयांकडे या कालापासून पुढें लेखकांचें लक्ष चांगलेंच लागत चाललें असल्याचा उल्लेख मागें केलाच आहे. भि. धों. निगुडकर यांचें "परशुरामभाऊ पटवर्धन चरित्र" ( १८८२ ), शं. तु. शालिग्राम यांचें "बापू गोखले चरित्र" ( १८७७ ) ह्या चरित्रांचा नामनिर्देश केला नाहीं तरी देखील चालण्याजोगें आहे. त्याचप्रमाणें "खंडोजी महाराज पिंपळनेर" (१८७५) यासारखीं केवळ श्रद्धाळूंस रुचणारीं महाराजांचीं व बुवांचीं चरित्रेंहि या कालापासून होऊं लागलीं होतीं, या गोष्टीकडेहि खऱ्या वाङ्मयरसिकानें लक्ष देण्याचें फारसें कारण नाहीं.

परंतु या कालांत झालेल्या एकदोन चरित्रांविषयीं मात्र असें म्हणतां येत नाहीं. नागेश विनायक बापट यांचें "थोरले बाजीरावसाहेब यांचें चरित्र" (१८७९) हें प्रसिद्ध झालें त्या वेळीं फारच गाजलें. आजच्या घटकेस मागील कालाचें निरीक्षण करणाऱ्याच्या नजरेंतूनहि अनेक कारणांस्तव तें सुटूं शकत नाहीं. ह्या ग्रंथास दक्षिणाप्राइज कमिटीनें बक्षिस दिलें व कमिटीचे सेक्रेटरी रावजीशास्त्री गोडबोले व इतर परीक्षक यांची त्यावर मुरकुंडी वळली. परंतु आधुनिक वाङ्मयविवेचक, चरित्र कसें नसावें हें दाखवावयाचें झाल्यास, निखालस या पुस्तकाकडे बोट दाखवील. हें चरित्र 'केवळ कल्पनादेवीच्या प्रसादाचें फळ' आहे, ग्रँटडफच्या तुटपुंज्या माहितीच्या आधारानें हें रचलेलें आहे, इत्यादि आक्षेप, ऐतिहासिक दृष्टीनें विचार-

करणाऱ्या रा. ब. पारसनीसांनीं या चरित्रासंबंधानें काढले आहेत ते तर खरे आहेतच, परंतु तेवढ्यानेंच भागत नाहीं. अनैतिहासिकता, कल्पनामयत्व या दोषांबरोबरच चरित्रनायकास सर्वगुणसंपन्न अशी दिव्य विभूति कल्पिण्याचा अनुचित प्रकार प्रस्तुत पुस्तकांत केला असल्यामुळें व अवास्तव, कृत्रिम व अलंकारिक वर्णनांच्या अवडंबरांत चरित्रनायकाचा जीवनवृत्तांत गुरफटून टाकला असल्याकारणानें यास चरित्रग्रंथाच्या रांगेंत स्थानहि देऊं नये, असें कोणी म्हटल्यास तें वावगें होणार नाहीं. याच ग्रंथकारांनीं "छत्रपति संभाजी" इत्यादि चरित्रें लिहिलीं आहेत, त्यांजविषयीं येथें अधिक लिहिण्याचें कारण नाहीं.

संतांचीं चरित्रें लिहिण्याची प्रवृत्ति पूर्वींपासून अस्तित्वांत होती, याचा उल्लेख मागें आला आहेच. धोंडो बालकृष्ण सहस्रबुद्धे यांचें "एकनाथमहाराजांचें चरित्र" (१८८३) हा त्याच परंपरेंतील एक उच्च दर्जाचा प्रयत्न होय. हें चरित्र अर्थात् महीपतीच्या आधारें लिहिलेलें आहे व त्यांत नाथांचें चरित्र प्रौढ, भारदस्त वाणीनें व चित्तवेधक रीतीनें सांगितलें आहे. नाथांच्या विभूतिमत्वानें त्यांच्या व्यक्तित्वास गुदमरून टाकलेलें या चरित्रांत दिसत नसून त्यांच्या व्यक्तित्वाचा विकास कसकसा होत गेला, हेंहि बऱ्याच चांगल्या रीतीनें दर्शविलें आहे. श्री. पांगारकरांचें एकनाथचरित्र १९११ सालीं प्रसिद्ध होईपर्यंत नाथांचें हेंच एक गद्यांतील चरित्र सर्वत्र प्रचलित होतें. यावरून यानें मराठी वाचकांची भूक कशा रीतीनें भागविली होती याचा प्रत्यय येईल.

स्वकीय पुरुषांप्रमाणें परकीय पुरुषांकडेहि या कालांत लेखकांचें वाढतें लक्ष लागत चाललें होतें. विनायक कोंडदेव ओक यांची कामगिरी संथपणें पण अव्याहतपणें चालली होतीच. त्यांच्या वाङ्मयसेवेचें सामान्य स्वरूप पूर्वीं वर्णन केलें असलें तरी चरित्रलेखनाच्या क्षेत्रांतील त्यांच्या विशिष्ट महत्त्वाची जाणीव करून देण्यासाठीं येथें पुनः थोडा विस्तार करणें क्रमप्राप्तच होईल. ओकांनीं स्वतंत्र पुस्तकांच्या रूपानें जीं चरित्रें लिहिलीं त्यांतील बहुतेक सर्व पाश्चात्य पुरुषांचीं आहेत. एखाद्या पुरुषाचें 'चांगलेंसें' चरित्र इंग्रजींत दिसलें व मराठींत त्यावर कोणीं लिहिलेलें नाहीं असें आढळून आलें कीं, मराठींत त्या पुरुषाचें चरित्र उतरून ठेवावयाचें, असा बहुतकरून ओकांचा क्रम चालत असावा. कारण इतर कसलेंहि औचित्य त्यांनीं केलेल्या बहुतेक पुरुषांच्या निवडीमध्यें असलेलें दिसून येत नाहीं. अशा रीतीनें मागें उल्लेखिलेल्या तीन चरित्रांशिवाय त्यांनीं पुढील चरित्रें लिहिलीं

असल्याचा दाखला सांपडतोः—" आल्फ्रेड दि ग्रेट ", " सर टॉमस मनरो ", " वॉरन हेस्टिंग्ज् ", " एब्राहाम लिंकन " (१८९०), " ग्लॅडस्टन " (१८९९), " साम्युएल जॉन्सन् ", हीं सर्व चरित्रें इंग्रजी ग्रंथांच्या आधारानें लिहिलेलीं आहेत, हें सांगणें नकोच.

परंतु ओकांचें नांव मराठी वाङ्मयांत चिरस्मरणीय झालें आहे तें या चरित्रांमुळें नव्हे. वर निर्देशिलेलीं त्यांचीं चरित्रें आतां कोणी वाचीत तर नाहींच, परंतु तीं सर्व दृष्टीस पडणेंहि मोठें मुष्किलीचें झालें आहे. परंतु त्यांनीं " बालबोध" मासिकाच्या रूपानें जें एक वाङ्मयसत्र ३४ वर्षें ( १८८१–१९१४ ) अव्याहत चालू ठेवलें होतें त्याची गोष्ट तशी नाहीं. दरमहा २४ पृष्ठांचेंच कां होईना, परंतु केवळ एकहातीं तयार झालेलें मासिक पुस्तक, सूर्यदेखील इतक्या नियमितपणें उगवणार नाहीं, अशा आदर्शभूत वक्तशीरपणानें एकसारखें ३४ वर्षे चालविणें ही कर्तबगारी केवळ अलौकिक होय.

" या गोष्टीस आमच्या देशांत तर काय पण बहुधा पाश्चात्य देशांतहि तोड आढळणार नाहीं " असे उद्गार चिपळूणकरांनीं आपल्या निबंधमालेस अनुलक्षून काढले ते ओकांच्या बालबोधासहि यथार्थतेनें लागू पडतील. सध्यांच्या प्रसंगीं उल्लेख करण्याजोगें " बालबोधां "तील अंग म्हणजे त्यांत दर महिन्यास सुंदर चित्रांसह येणारें कोणातरी विख्यात पुरुषाचें चरित्र, हें होय. अशीं ३४ गुणिले १२, म्हणजे ४०८ निरनिराळ्या पुरुषांचीं चरित्रें, एकट्या ओकांनीं लिहिलेलीं, बालबोधांत आलीं आहेत, असा हिशेब निघतो. ह्या आंकड्यांकडे पाहून मन थक्क होतें.

हीं चरित्रें सरासरीनें " बालबोधा " चीं ५–६ पानें भरतील इतकीं असत. कोणत्याहि देशांतील, कोणत्याहि काळांतील, कसल्याहि प्रकारच्या पुरुषाचें चरित्र यांत येऊं शके. व्यास, बुद्ध, ख्रिस्त इत्यादि प्राचीन धर्मसंस्थापकांपासून तों मिल्ल-स्पेन्सरांसारख्या नास्तिकांपर्यंत, हानिबाल-नेपोलियनांसारख्या दुर्दान्त योद्ध्यांपासून दुसऱ्या बाजीरावासारख्या रणभीरु पळपुट्यांपर्यंत सर्व तऱ्हेच्या व सर्व प्रकारच्या पुरुषांचीं व स्त्रियांचीं चरित्रें यांत येऊन गेलीं आहेत. प्रत्येक पुरुषाच्या आयुष्याचें तात्त्विक महत्त्व थोडक्यांत विशद होईल अशी एक छोटीशी प्रस्तावना करून मग त्या पुरुषाचा जीवनवृत्तांत संपूर्णतया द्यावयाचा. त्या वृत्तांतांत त्या पुरुषानें आपल्या आयुष्यांत जें सर्वांत महत्त्वाचें कार्य केलें असेल तें ठळकपणें वर्णन करावयाचें

करणाऱ्या रा. ब. पारसनीसांनीं या चरित्रासंबंधानें काढले आहेत ते तर खरे आहेतच, परंतु तेवढ्यानेंच भागत नाहीं. अनैतिहासिकता, कल्पनामयत्व या दोषांबरोबरच चरित्रनायकास सर्वगुणसंपन्न अशी दिव्य विभूति कल्पिण्याचा अनुचित प्रकार प्रस्तुत पुस्तकांत केला असल्यामुळें व अवास्तव, कृत्रिम व अलंकारिक वर्णनांच्या अवडंबरांत चरित्रनायकाचा जीवनवृत्तांत गुरफटून टाकला असल्याकारणानें यास चरित्रग्रंथाच्या रांगेंत स्थानहि देऊं नये, असें कोणी म्हटल्यास तें वावगें होणार नाहीं. याच ग्रंथकारांनीं " छत्रपति संभाजी " इत्यादि चरित्रें लिहिलीं आहेत, त्यांजविषयीं येथें अधिक लिहिण्याचें कारण नाहीं.

संतांचीं चरित्रें लिहिण्याची प्रवृत्ति पूर्वीपासून अस्तित्वांत होती, याचा उल्लेख मागें आला आहेच. धोंडो बाळकृष्ण सहस्रबुद्धे यांचें " एकनाथमहाराजांचें चरित्र " ( १८८३ ) हा त्याच परंपरेंतील एक उच्च दर्जाचा प्रयत्न होय. हें चरित्र अर्थात् महीपतीच्या आधारें लिहिलेलें आहे व त्यांत नाथांचें चरित्र प्रौढ, भारदस्त वाणीनें व चित्तवेधक रीतीनें सांगितलें आहे. नाथांच्या विभूतिमत्वानें त्यांच्या व्यक्तित्वास गुदमरून टाकलेलें या चरित्रांत दिसत नसून त्यांच्या व्यक्तित्वाचा विकास कसकसा होत गेला, हेंहि बऱ्याच चांगल्या रीतीनें दर्शविलें आहे. श्री. पांगारकरांचें एकनाथचरित्र १९११ सालीं प्रसिद्ध होईपर्यंत नाथांचें हेंच एक गद्यांतील चरित्र सर्वत्र प्रचलित होतें. यावरून यानें मराठी वाचकांची भूक कशा रीतीनें भागविली होती याचा प्रत्यय येईल.

स्वकीय पुरुषांप्रमाणें परकीय पुरुषांकडेहि या कालांत लेखकांचें वाढतें लक्ष लागत चाललें होतें. विनायक कोंडदेव ओक यांची कामगिरी संथपणें पण अव्याहतपणें चालली होतीच. त्यांच्या वाङ्मयसेवेचें सामान्य स्वरूप पूर्वीं वर्णन केलें असलें तरी चरित्रलेखनाच्या क्षेत्रांतील त्यांच्या विशिष्ट महत्त्वाची जाणीव करून देण्यासाठीं येथें पुनः थोडा विस्तार करणें क्रमप्राप्तच होईल. ओकांनीं स्वतंत्र पुस्तकांच्या रूपानें जीं चरित्रें लिहिलीं त्यांतील बहुतेक सर्व पाश्चात्य पुरुषांचीं आहेत. एखाद्या पुरुषाचें ' चांगलेंसें ' चरित्र इंग्रजींत दिसलें व मराठींत त्यावर कोणीं लिहिलेलें नाहीं असें आढळून आलें कीं, मराठींत त्या पुरुषाचें चरित्र उतरून ठेवावयाचें, असा बहुतकरून ओकांचा क्रम चालत असावा. कारण इतर कसलेंहि औचित्य त्यांनीं केलेल्या बहुतेक पुरुषांच्या निवडीमध्यें असलेलें दिसून येत नाहीं. अशा रीतीनें मागें उल्लेखिलेल्या तीन चरित्रांशिवाय त्यांनीं पुढील चरित्रें लिहिलीं

असल्याचा दाखला सांपडतो:—" आल्फ्रेड दि ग्रेट ", " सर टॉमस मनरो ", " वॉरन हेस्टिंग्ज् ", " एब्राहाम लिंकन " (१८९०), " ग्लॅडस्टन " (१८९९), " साम्युएल जॉन्सन् ". हीं सर्व चरित्रें इंग्रजी ग्रंथांच्या आधारानें लिहिलेलीं आहेत, हें सांगणें नकोच.

परंतु ओकांचें नांव मराठी वाङ्मयांत चिरस्मरणीय झालें आहे तें या चरित्रांमुळें नव्हे. वर निर्देशिलेलीं त्यांचीं चरित्रें आतां कोणी वाचीत तर नाहींच, परंतु तीं सर्व दृष्टीस पडणेंहि मोठें मुष्किलीचें झालें आहे. परंतु त्यांनीं "बालबोध" मासिकाच्या रूपानें जें एक वाङ्मयसत्र ३४ वर्षें ( १८८१–१९१४ ) अव्याहत चालू ठेवलें होतें त्याची गोष्ट तशी नाहीं. दरमहा २४ पृष्ठांचेंच कां होईना, परंतु केवळ एकहातीं तयार झालेलें मासिक पुस्तक, सूर्यदेखील इतक्या नियमितपणें उगवणार नाहीं, अशा आदर्शभूत वक्तशीरपणानें एकसारखें ३४ वर्षें चालविणें ही कर्तबगारी केवळ अलौकिक होय.

" या गोष्टीस आमच्या देशांत तर काय पण बहुधा पाश्चात्य देशांतहि तोड आढळणार नाहीं " असे उद्गार चिपळूणकरांनीं आपल्या निबंधमालेस अनुलक्षून काढले ते ओकांच्या बालबोधासहि यथार्थतेनें लागू पडतील. सध्यांच्या प्रसंगीं उल्लेख करण्याजोगें " बालबोधा "तील अंग म्हणजे त्यांत दर महिन्यास सुंदर चित्रांसह येणारें कोणातरी विख्यात पुरुषाचें चरित्र, हें होय. अशीं ३४ गुणिले १२, म्हणजे ४०८ निरनिराळ्या पुरुषांचीं चरित्रें, एकट्या ओकांनीं लिहिलेलीं, बालबोधांत आलीं आहेत, असा हिशेब निघतो. ह्या आंकड्यांकडे पाहून मन थक्क होतें.

हीं चरित्रें सरासरीनें " बालबोधा " चीं ५–६ पानें भरतील इतकीं असत. कोणत्याहि देशांतील, कोणत्याहि काळांतील, कसल्याहि प्रकारच्या पुरुषाचें चरित्र यांत येऊं शके. व्यास, बुद्ध, खिस्त इत्यादि प्राचीन धर्मसंस्थापकांपासून तों मिल्‌-स्पेन्सरांसारख्या नास्तिकांपर्यंत, हानिबाल-नेपोलियनांसारख्या दुर्दान्त योद्ध्यांपासून दुसऱ्या बाजीरावासारख्या रणभीरु पळपुट्यांपर्यंत सर्व तऱ्हेच्या व सर्व प्रकारच्या पुरुषांचीं व स्त्रियांचीं चरित्रें यांत येऊन गेलीं आहेत. प्रत्येक पुरुषाच्या आयुष्याचें तात्त्विक महत्त्व थोडक्यांत विशद होईल अशी एक छोटीशी प्रस्तावना करून मग त्या पुरुषाचा जीवनवृत्तांत संपूर्णतया द्यावयाचा. त्या वृत्तांतांत त्या पुरुषानें आपल्या आयुष्यांत जें सर्वांत महत्त्वाचें कार्य केलें असेल तें ठळकपणें वर्णन करावयाचें

आणि सरतेशेवटीं गुणवर्णनात्मक उपसंहार करावयाचा, व शक्य तर आपल्या देशाचा त्यांत उल्लेख आणून ' असे पुरुष आपल्या देशांत झाल्यास किती फायदा होणार आहे. ' अशा आशयाचे उद्गार काढावयाचे.

या चरित्रमालिकेंत परकीयांप्रमाणेंच एतद्देशियांचींहि चरित्रें आलीं आहेत, हें जरी खरें असलें तरी एकंदरीनें परदेशीय व्यक्तींकडे ओकांचा कल विशेष असलेला दिसून येतो. कांहीं व्यक्ती केवळ प्रासंगिक व तात्कालिक महत्त्वामुळेंच चरित्र-विषय झालेल्या आढळतात. कांहींचीं चरित्रें दुबार आलेलीं आढळतात. अशा किरकोळ गोष्टी जरी कांहीं आढळल्या, तरी एकंदरीनें हीं चरित्रें रेखीव, प्रमाण-बद्ध, ज्ञानप्रद व बोधप्रद झालेलीं असून त्यांचें वाचन आजमितीसहि आल्हाददायक होतें, यांत कांहीं शंका नाहीं. ज्या व्यक्ति आपल्या दुर्गुणांबद्दल अगर दुष्कार्यांबद्दलच विख्यात आहेत अशा व्यक्ति सोडून दिल्या असतां बाकीच्या सर्व व्यक्तींचीं चरित्रें ओकांनीं केवळ गुणग्रहणपर दृष्टीनेंच कथन केलीं आहेत. दोषांचा उल्लेख बहुधा चुकूनसुद्धां केला नाहीं. तथापि नसत्या गुणांचा आरोप करून अवास्तव रंग व्यक्ति-चित्रांमध्यें भरण्याचा त्यांनीं बहुधा प्रयत्न केला नाहीं. त्यांनीं वर्णिलेलीं चरित्रें खरोखर महत्त्वास चढलेल्या पुरुषांचीं असून अलीकडे ' किर्लोस्कर ' मासिकांत येणाऱ्या चरित्रांप्रमाणें भरमसाट गाजावाजा ( booming ) करण्याचा प्रकार त्यांनीं अवलंबिलेला नाहीं. मात्र चरित्र कोणाचेंहि असो, त्यांतून बोध ग्रहण करण्या-बद्दल त्यांचा मोठा कटाक्ष असलेला, व तो उत्तरोत्तर वाढत गेलेला, दिसून येतो.

ओकांची भाषा अक्षरशः ' बालबोध ' आहे असें म्हणवत नाहीं. तथापि कोणताहि विषय कितीहि बिकट वा शास्त्रीय असो तो स्वतः ग्रहण करून विशद रीतीनें मराठींत मांडण्याची विलक्षण हातोटी त्यांच्या ठायीं असलेली दिसून येते. त्यांच्या भाषेंत कोणत्याहि तऱ्हेची उत्कटता व भावनात्मकता नाहीं. कल्पनाचातुरीसहि ते पारखे होते. विनोदाचें तर नांवच नको. तथापि त्यांच्या सदा स्तिमित अशा भाषा-शैलीचे भारदस्तपणा, गांभीर्य व वैशद्य हे गुण रसिकांस केव्हांहि ग्राह्यच वाटतील.

ओकांनीं पाश्चात्य पुरुषांशिवाय जावजी दादाजी चौधरी ( १८९२ ), रावराजे दिनकरराव राजवाडे ( १८९७ ) व अमीर अबदुल रहिमान ( १९०२ ) यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. पण तीं सामान्य आहेत.

इंग्रजी ग्रंथांच्या आधारानें पाश्चात्य पुरुषांचीं चरित्रें लिहिण्याचा प्रघात १८८० पासून पुढें चांगलाच पडलेला दिसून येतो. विल्यम पिट्, नेपोलियन,

लिंकन, जेम्स गार्फिल्ड, इत्यादि राज्यचालक, रिचर्ड कॉब्डेन, ब्रेलंट, ब्राडला यांसारख्या चळवळ्या व्यक्ति, लॉर्ड बेकन, जोनाथन् स्विफ्ट, गोल्डस्मिथ, वॉल्टर स्कॉट, यांसारखे ग्रंथकार यांचीं चरित्रें चच्चावाईट रीतीनें अनेक लेखकांनी १८९० च्या आगेमागें लिहिलेलीं आपल्या नजरेस येतात.

तथापि १८८० च्या आगेंमागें झालेल्या राजकीय व वाङ्मयात्मक चळवळींचा परिणाम विद्यार्थिदशेंत ज्यांच्या मनावर झाला अशी पिढी १८९० च्या सुमारास जेव्हां कर्तृत्वाच्या भरांत येऊं लागली तेव्हांच वाङ्मयाच्या इतर क्षेत्रांप्रमाणें चरित्र-लेखनाच्या क्षेत्रांतहि जिवंत व जोमदार असा प्रवाह वाहूं लागला. देशाभिमानानें भारलेले व कर्तव्याच्या उज्ज्वल स्फूर्तीनें स्फुरलेले असे अनेक पुरुष या सुमारास वाङ्मयाच्या आखाड्यांत उतरले. हरिभाऊ आपटे, काशीबाई कानिटकर, राजवाडे, विजापूरकर, धनुर्धारी, वासुदेवशास्त्री खरे हे वाङ्मयनभोमंडलांतील तेजोनिधि साधारणपणें याच सुमारास ( १८९० च्या आगेंमागें ) चमकूं लागले हें लक्षांत घेतलें म्हणजे या कालाचें महत्त्व नीटपणें ध्यानांत येईल. जरा पुढें सरकलें म्हणजे द. ब. पारसनीस, ना. गो. चापेकर, ल. कृ. चिपळूणकर, बाळकृष्ण नारायण देव, राजारामशास्त्री भागवत इत्यादि नवे तारे क्षितिजावर येत असलेले दृष्टिपथांत येतात. यांपैकीं कित्येकांनीं चरित्रवाङ्मयांत स्पृहणीय भर टाकलेली असून ज्या काळांत त्यांनीं आपलें लेखन केलें त्या काळांत प्रचलित असलेल्या प्रवृत्तींचें प्रतिबिंब त्यांच्या लेखनांत स्पष्टतया उमटलेलें दिसतें. हें कसें तें पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल.

इ. स. १८९० ते १९१० पर्यंतच्या वीस वर्षांच्या कालांत महाराष्ट्रांत, विशेषतः वाङ्मयक्षेत्रांत, जीं कार्यकर्ती माणसें वावरत होतीं त्यांचें विशिष्ट लक्षण सांगावयाचें झाल्यास तें स्वधर्म-स्वदेश-स्वभाषाभिमान याप्रमाणें सांगतां येईल. याच्या पूर्वींच्या व नंतरच्या काळांत या त्रयींविषयींचा अभिमान जागृत नव्हता, असें अर्थातच कोणास म्हणणें शक्य नाहीं. परंतु या कालांतील कार्यकर्त्यांच्या ठायीं तो अभिमान विशेष जाज्वल्य व एकसारखा उसळी मारून वर येणारा असा होता. जिनसीवाले, टिळक, विजापूरकर, हरिभाऊ आपटे, राजवाडे, शि. म. परांजपे, भिकाजीपंत हर्डीकर, पांगारकर, केळकर, खाडिलकर, सावरकर हीं अगदीं सहजीं जिभेवर येणाऱ्या कार्यकर्त्यांचीं नांवें नुसतीं उच्चारल्यानें वरील विधान किती यथार्थ आहे याचा प्रत्यय येईल. देशाभिमानानें सर्वस्वीं भारलेल्या अशा या कालामध्यें देशाभिमानाच्या भावनेनें प्रेरित होऊन त्याच भावनेचें उद्दीपन

करण्याच्या हेतूनें अनेक चरित्रग्रंथ लिहिले जावे, हें अगदीं साहजिक होय. या देशभक्तिसंप्रदायाचे दोन प्रकार उघड उघड दिसून येतात. एक प्रकार म्हणजे स्वदेशीय व्यक्तींचीं देशाभिमानाच्या भावनेनें प्रेरित होऊन लिहिलेलीं चरित्रें व दुसरा प्रकार देशभक्तीची भावना उद्दीपित करण्याकरितां लिहिलेलीं पाश्चात्य देशभक्तांचीं चरित्रें; या दोन्ही शाखांनीं हा देशभक्तिसंप्रदाय वाढीस लागलेला दृष्टीस पडतो.

१९१० सालानंतर महाराष्ट्रांतील सार्वजनिक वातावरणांत फरक पडलेला दिसतो. देशाभिमानाची भावना ही नंतरच्या काळांतहि कायमच राहिली तरी तिची कल्पनातरलता व जाज्वल्यपणा हा पुढील कालांत तितका अनुभवास येत नाहीं. कारागृहवासाचा व इतर संकटांचा तडाखा बसल्यामुळें ती बरीच संयमित झाली. तथापि वाङ्मयदृष्ट्या पाहतां ज्या कांहीं प्रवृत्तींना अथवा संप्रदायांना या भावनेनें चालना दिली ते सर्व १९१० नंतरहि जवळ जवळ तशाच स्वरूपांत चालू राहिले असल्यामुळें, यापुढें करावयाच्या समालोचनाचा १९१० पर्यंतचा एक निराळा खंड न कल्पितां प्रत्येक उपशाखेचें समालोचन अगदीं आजच्या काळा-पर्यंत आणून भिडविण्याचा विचार आहे.

या देशभक्तिसंप्रदायांतील, स्वदेशीय वीरांचीं चरित्रें लिहिणारे खंदे चरित्रकार रा. वि. टिकेकर ऊर्फ 'धनुर्धारी' होत. 'जवानमर्द मराठेगडी जनकोजी शिंदे', 'जवानमर्द ब्राह्मणभाई हरिपंत फडके', 'राजकार्यधुरंधर फडणीस नाना' इत्यादि चटकदार शब्दांनीं युक्त अशीं नांवें दिलेलीं छोटीं छोटीं १०-१५ चरित्रें धनुर्धारींनीं इतक्या द्रुतगतीनें लिहिलीं कीं, त्यांचें नांव कांहीं काळपर्यंत महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं होऊन बसलें. ठसकेदार व चटकदार भाषा, पूर्वजांच्या पराक्रमांचें व सद्गुणांचें अतिरंजित वर्णन, अलीकडील सुधारकादिकांस मधून मधून व्याजोक्तिपूर्ण भाषेंत दिलेले टोले, इतकी सर्व सामग्री असल्यावर मग खासा खमंग बनाव बनण्यास काय उशीर !

धनुर्धारींचीं चरित्रें म्हणजे बोलूनचालून सामान्य जनतेमध्यें देशाभिमान व पूर्वजाभिमान उत्पन्न करण्याच्या हेतूनें लिहिलेलें चुरचुरीत लिखाण! ऐतिहासिक सत्याची चिकित्सा व माहितीचा बारकावा त्यांत बेताचाच. त्याचप्रमाणें उत्कृष्ट चरित्रांत जे वाङ्मयगुण असावयास पाहिजेत त्यांची अपेक्षा त्यांच्या चरित्रांतून करण्यांतहि फारसा अर्थ नाहीं. तथापि पूर्वकालीन मराठे वीरांचें थोडक्यांत उज्ज्वल व बहारीचें चित्र उठवून देण्यांत त्यांनीं चांगलें यश मिळविलें आहे. त्यांचें

भावनात्मक चुरचुरीत लिखाण खरोखर म्हटलें असतां अत्यंत लोकप्रिय होऊन त्याच्या आवृत्त्यांवर आवृत्त्या निघावयास पाहिजे होत्या. परंतु त्या बाबतींतहि त्यांचा प्रयोग फारसा यशस्वी झाला असल्याचें दिसत नाहीं. तरुण मुलांना व अल्पशिक्षित जनतेला आवडण्याजोगीं व अत्यंत उपयोगी पडण्याजोगीं त्यांचीं चरित्रें असूनहि तीं एकदां प्रसिद्ध होऊन जीं पडलीं तीं पडलीं. अलीकडच्या काळांत त्यांचा प्रचार बंदच पडल्यासारखा झाला आहे. तसेंच त्यांनीं सुरु केलेल्या या पद्धतीला अनुयायीहि कोणी मिळाले असल्याचें दिसत नाहीं. महाराष्ट्रांत फक्त दोन प्रकारच्या लिखाणास मुबलक गिऱ्हाईक लाभतें. एक वैषयिक विकारांना चेतविणारें चटोर लिखाण किंवा दुसरें मोठ्यांच्या नांवांवर प्रसिद्ध होणारें कसलेंहि लिखाण. धनुर्धारींच्या लेखनाचा या दोहोंतहि समावेश होत नसल्यामुळें त्यांचें लेखन व त्या बरोबरच त्यांची विशिष्ट सरणी मागें पडली.

परंतु सुदैवानें ही देशाभिमानाची व पूर्वजाभिमानाची भावना धनुर्धारींचें चुरचुरीत व उद्दीपक लिखाण निर्माण करूनच थांबली नाहीं. सखोल बुद्धीच्या प्रतिभावान् कार्यकर्त्यांना प्रेरणा करून तिनें महाराष्ट्रांत महनीय असें इतिहास-संशोधनाचें कार्य घडवून आणलें. देशाभिमानामुळेंच उत्पन्न झालेली स्वदेशाच्या खऱ्या इतिहासाविषयींची जिज्ञासा याच काळांत साक्षेपी कार्यकर्त्यांस संशोधनाच्या असल्या कार्यास प्रवृत्त करूं लागली होती. आणि पूर्वोपलब्ध व नूतन संशोधित माहितीचा उपयोग करून प्राक्कालीन व्यक्तींचीं चरित्रें ऐतिहासिक दृष्टीनें लिहिण्यास कित्येक व्यासंगी लेखक प्रवृत्त होऊं लागले होते. इतिहासविषयक जिज्ञासा देशभक्तीमुळेंच उत्पन्न झाली असल्याकारणानें हा ऐतिहासिकांचा संप्रदाय देशभक्ति-संप्रदायाच्या बराच जवळ येतो. तथापि इतिहासाचा अभ्यासक पूर्वजाभिमानाच्या भरांत पोकळ बडेजावाचीं विधानें न करतां प्रत्येक लहानसान बाब पुराव्याच्या भट्टींतून तावून सुलाखून घेत असल्यामुळें त्याच्या लिखाणाला एक प्रकारची खंबीरी, भारदस्तपणा व चिरस्थायित्व येतें. या ऐतिहासिकांच्या परंपरेंतील पहिलें चरित्र म्हणजे वासुदेवशास्त्री खरे यांचें "नाना फडणिसाचें चरित्र" (१८९२) हें होय. खरेशास्त्रीबुवांच्या मार्मिक विवेचनशैलीबद्दल येथें फारसें लिहिण्याचें कारण नाहीं. तावत्कालपर्यंत उपलब्ध झालेल्या सर्व साधनांचा कसोशीनें उपयोग करून गाढ्या इतिहासज्ञास शोभेल अशी विवेकदृष्टि वापरून अत्यंत सुसंगत रीतीनें नाना फडणिसाच्या काळचा मराठेशाहीचा इतिहास यांत दिला आहे. बोलूनचालून हें

ऐतिहासिक चरित्र असल्यामुळें त्यांत इतिहासदृष्टीस प्राधान्य व व्यक्तिचित्रणास गौणत्व आलें आहे, हें साहजिक आहे. आजतागायत नाना फडणिसाचें वाचनीय असें चरित्र हेंच एक उपलब्ध असून त्यांत नवीन उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक माहितीची भर घालून शास्त्रीबुवांच्या चिरंजीवांनीं त्याची नवीन आवृत्ति काढिली असल्याकारणानें त्याची उपयुक्तता वाढली आहे.

यानंतर दोनच वर्षांनीं विष्णु रघुनाथ नातु यांचें "महादजीचें चरित्र" प्रसिद्ध झालें. खऱ्यांच्या चरित्रांत नानाची तरफदारी केली होती, त्याच्या उलट या चरित्रांत नातूंनीं नानास कमी दर्जाचा ठरवून महादजीची बाजू उचलून धरण्याचा आवेशानें प्रयत्न केला असल्यामुळें कांहीं काल वादाची धुमाळी माजून राहिली. चिंतामण गंगाधर भानु यांची 'नाना आणि महादजी' ही लेखमालिका १८९५ मध्यें 'केसरी'त अग्रलेखाच्या रूपानें प्रसिद्ध झाली. याशिवाय ह. ना. नवलकर या गृहस्थांनींहि बऱ्याच उशिरां, या दोघां पुरुषांची तुलना करण्यासाठीं एक निबंध लिहिला असल्याचें (१९००) 'वाङ्मयसूची'वरून दृष्टोत्पत्तीस येतें.

१८९४ हें साल महाराष्ट्राच्या वाङ्मयेतिहासांत एकंदरीनें फार महत्त्वाचें आहे. त्यांतल्या त्यांत चरित्रवाङ्मयाच्या दृष्टीनें त्याचें महत्त्व अधिकच भासमान होतें. या सालीं अण्णा विजापूरकरांची ग्रंथमाला सुरू झाली. उपर्युक्त "महादजीचें चरित्र" याच सालीं प्रसिद्ध झालें, हें वर आलेंच आहे. परंतु त्याच्याहिपेक्षां अधिक महत्त्वाचे असे दोन चरित्रग्रंथ याच सालांत प्रसिद्ध झाले. दत्तात्रय बळवंत पारसनीस यांचें "झांशीच्या महाराणी लक्ष्मीबाई" व लक्ष्मण कृष्ण चिपळूणकर यांचें "विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र." या दोन चरित्रग्रंथांनीं मराठी वाङ्मयांत केवढी मोठी भर टाकली, हें आतां कोणास सांगावयास नको आहे. यांपैकीं दुसऱ्या ग्रंथाचें विवेचन यथास्थल येईल. येथें पारसनिसांच्या कृतीचा त्रोटक रीतीनें परामर्श घेतल्यास पुरें आहे.

पारसनिसांचें हें चरित्र म्हणजे एका बाजूनें झांशीचे सरदार नेवाळकर यांच्या घराण्याचा इतिहास व दुसऱ्या बाजूनें सत्तावनच्या बंडाचा इतिहास, अशा दोन्ही इतिहासांचें एकीकरण आहे. चरित्रनायिका लक्ष्मीबाई हिच्या योगानें या दोन्ही भागांचा दुवा जोडला गेला असून तिची भूमिका दोन्हीकडे प्रामुख्यानें वावरतांना दिसते. पारसनिसांनीं अत्यंत कसोशीनें इंग्रजी व मराठी भाषांमधील सर्व आधारभूत सामग्री जमा करून मोठ्या परिश्रमांनीं हा संगतवार इतिहास तयार केला

आहे. त्यांचा उत्कट परंतु योग्य रीतीनें संयमित केलेला देशाभिमान व वंडवाल्यांची बाजू यथार्थ रीतीनें मांडण्याची दक्षता हे गुण या चरित्रामध्यें चांगल्या प्रकारें व्यक्त होतात. लक्ष्मीबाईचें व्यक्तित्व जितकें म्हणून प्रकट होणें शक्य आहे, तितकें या ग्रंथांतून प्रकट झालें असून या लोकोत्तर वीरांगनेच्या योग्यतेची खरी जाणीव महाराष्ट्रियांस करून देण्यास हेंच चरित्र मुख्यत: कारणीभूत झालें आहे, असें म्हणण्यांत अतिशयोक्ति मुळींच नाहीं.

पारसनीस यांचा हा पहिलाच प्रयत्न कल्पनेबाहेर यशस्वी झाला. त्यांचें यापुढील चरित्रात्मक लेखन सामान्य आहे. त्यांतील एक प्रयत्न, म्हणजे १९०० सालीं प्रसिद्ध झालेलें " ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र." हें गाजलें पुष्कळ, पण तें उलट अर्थानें. ब्रह्मेंद्रस्वामींच्या व पहिल्या बाजीरावाच्या कारकीर्दीसंबंधाच्या वादांत येथें शिरण्याचें कांहींच कारण नाहीं. परंतु येथें एवढें मात्र नमूद केलें पाहिजे कीं, राजवाडे यांचा ब्रह्मेंद्रस्वामींस कलिपुरुष भासविण्याचा प्रयत्न जरी फसला असला तरी पारसनीस यांचें ब्रह्मेंद्रांच्या योग्यतेविषयींचें निदान अगदीं चुकलें असून त्यांनीं लिहिलेलें 'ब्रह्मेंद्रचरित्र' म्हणजे चुकीच्या समजुतीवर आधारलेला भ्रमात्मक डोलारा, असेंच आजवर दिसून आलें आहे. "बायजाबाई शिंदे" (१९०२) आणि "परशुराम त्रिंबक" (१९०३) इत्यादि त्यांच्या किरकोळ चरित्रात्मक लिखाणाचा येथें नुसता उल्लेख करणें पुरें आहे.

खरें, पारसनीस यांच्या सारख्यांनीं मुहूर्तमेढ रोंवल्यानंतर ऐतिहासिक चरित्रांची परंपरा चांगल्या रीतीनें चालू झाली. अशा चरित्रांमधील स्वदेशाभिमानाचा व पूर्वजगौरव साधण्याचा हेतु सर्वत्र प्रकट व उत्तान स्वरूपांत दिसून येतोच असें नाहीं. निवळ इतिहास वर्णन करण्याच्या हेतूनेंच कित्येकांनीं ऐतिहासिक पुरुषांचीं चरित्रें लिहिलीं. त्यांतहि नवीन संशोधन करून कागदपत्र व इतर सामग्री कसोशीनें मिळवून चरित्रलेखन करणारे थोडेच दिसतात. "बक्षीबहाद्दर जिवबादादा केरकर" (१९०७) यांचें चरित्र लिहिणारे श्री. नरहर वेंकाजी राजाध्यक्ष हे अशा साक्षेपी चरित्रकारांपैकीं एक होत. त्यांनीं शिंदेशाहीच्या उत्तरार्धाचा इतिहासच आपल्या विस्तीर्ण ग्रंथांत कथन केला आहे. व खुद्द जिवबादादांच्या आणि इतर ऐतिहासिक पुरुषांच्या दप्तरांतील अस्सल कागदपत्र मिळवून ते शेवटीं छापले आहेत. चरित्र या दृष्टीनें पाहतां ऐतिहासिक संप्रदायांतील इतर चरित्रांवर येणारे आक्षेप या चरित्रावर थोडेबहुत येण्याजोगे असले तरी इतिहास या दृष्टीनें हा ग्रंथ परिपूर्ण झाला आहे.

इंदूरचे बा. ना. देव यांचे बंधु विश्वनाथ नारायण देव यांनीं लिहिलेलें "अहल्याबाईचें चरित्र" (१९१३) असेंच कसोशीनें सामग्री जमवून लिहिलें आहे. अहल्याबाईच्या विद्यमान चरित्रांत सर्वांत सरस असें तेंच आहे. राजाराम-शास्त्री भागवत यांनींहि शिवाजी, संभाजी व राजाराम यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. परंतु शास्त्रीबोवांचें नांव चरित्रकार या नात्यापेक्षां इतर नात्यांनींच महाराष्ट्रास विदित आहे व तें रास्तच आहे.

शिवचरित्राचा विषय निघतांच नुकतेच स्वर्गवासी झालेले कृष्णराव अर्जुन केळूसकर यांचें स्मरण होणें अपरिहार्य आहे. इतर पुष्कळच लिखाण केळूसकरांनीं केलें असलें तरी त्यांच्या शिवचरित्रामुळेंच त्यांचें नांव चिरकाल राहील. आधुनिक संशोधनामुळें उपलब्ध झालेली नवीन सामग्री तर राहोच, परंतु जुन्या बखरी व इंग्रज आणि फारसी इतिहासकारांचे ग्रंथ यांच्या मधून उपलब्ध असलेल्या सामग्रीचा समन्वय करून शिवाजीच्या चरित्राचा एक सुसंगत सांगाडा तयार करणें हें काम देखील सोपें नाहीं. अर्थात् तें चांगल्या रीतीनें केल्याबद्दल केळूसकरांस धन्यवाद देणें उचित आहे. शिवाजीस सर्वगुणसंपन्न व निर्दोष अशी विभूति चरित्रकारांनीं बनविली आहे, हें अपेक्षितच आहे. अर्थात् अशा 'न भूतो न भविष्यति' महापुरुषाचा जीवनवृत्तांत रामकृष्णांसारख्या ईश्वरावतारांच्या लीलांसारखाच वाटावा व चरित्रकारांनीं तो तशाच भक्तीनें वर्णन करावा, हें विवेचकाच्या दृष्टीनें इष्ट नसलें तरी एका दृष्टीनें अपरिहार्यच होतें. ऐतिहासिक दृष्ट्या विचार करितां राजवाडे प्रभृति संशोधकांनीं उजेडांत आणलेल्या माहितीचा १९२० मध्यें निघालेल्या दुसऱ्या आवृत्तींतहि चरित्रकारांनीं चिकित्सक दृष्टीनें करावा तसा उपयोग करून घेतला आहे असें दिसत नाहीं. १९२० नंतर प्रसिद्ध झालेल्या, विशेषतः शिवचरित्रकार्यालयानें उजेडांत आणलेल्या व संकलित केलेल्या सामग्रीच्या दृष्टीनें पाहतां हें चरित्र फारच अपूर्ण वाटेल हें उघड आहे. ही अपूर्णता भरून काढण्यासाठीं म्हणून लिहिलेलें श्री. चिं. वि. वैद्य यांचें मूळ इंग्रजींत लिहून मराठींत रूपांतरित केलेलें "शिवाजी महाराजांचें चरित्र" (१९३१) फारसें समाधानकारक वाटत नाहीं. तें कांहींसें टांचणवजा झालें असून त्यांतून चरित्रनायकाचें व्यक्तित्व परिस्फुट होत नाहीं. वैद्यांचा कटाक्ष ज्यावर विशेष त्या सर यदुनाथ सरकारच्या शिवाजीचरित्राचा मराठी तर्जुमा श्री. विनायक सदाशिव वाकसकर यांनीं "शिवाजी आणि शिवकाल"

या नांवानें केला आहे. तो बोलूनचालून तर्जुमाच असला तरी मूळ ग्रंथाच्या सरसत्वामुळें वाङ्मयदृष्ट्या बराच चांगला उतरला आहे.

ऐतिहासिक चरित्रग्रंथांत रियासतकार गोविंद सखाराम सरदेसाई यांचें " नानासाहेब पेशवे यांचें चरित्र " ( १९२६ ) महत्त्वाचें आहे. हें चरित्र म्हणजे पुष्कळ अंशानें रियासतींतील मजकुराचा तर्जुमा असला तरी त्यांत चरित्रनायकाच्या व्यक्तित्वाचें दिग्दर्शन चांगल्या प्रकारें होतें. सरदेसायांची वृत्ति चरित्रनायकाविषयीं प्रेमादर बाळगणारी असली तरी समतोलपणा तिनें सोडला नाहीं. परंतु " पहिले बाजीराव पेशवे " ( १९३० ) या चरित्रग्रंथाचे लेखक श्री. नारायण केशव बेहेरे यांची वृत्ति भावनात्मक असल्यामुळें त्यांचें लेखन ऐतिहासिक संप्रदायाकडून देशभक्तिसंप्रदायाकडे अधिक प्रमाणांत झुकूं पाहतें. या देशभक्ति-संप्रदायांत जमा होतील अशीं आणखीहि कित्येक ऐतिहासिक पुरुषांचीं चरित्रें अगदीं अलीकडच्या काळांत झालीं आहेत. पैकीं श्री. गणेश दामोदर सावरकर यांचें " वीर वैरागी " ( १९२४ ), नारायण दामोदर सावरकर यांचें " तात्या टोपे " ( १९३२ ) यांचा उल्लेख येथें करणें बस होईल. सावरकरबंधूंची जोरदार व आवेशयुक्त भाषाशैली प्रसिद्धच आहे. रजपुतांच्या इतिहासांतील विख्यात व्यक्तींवर कांहीं थोडेंसें चरित्रलेखन झालें आहे. चांदबरदाईच्या " पृथ्वीराज रासा " च्या गुजराथी रूपांतराच्या आधारें लोकहितवादींनीं लिहिलेलें " पृथ्वीराज चव्हाण यांचा इतिहास" (१८८३) हेंच बहुधा या विभागांतील पहिलें चरित्रात्मक पुस्तक असावें. रजपुतांच्या इतिहासांतील व कांहीं इतर प्रख्यात स्त्रियांचीं त्रोटक चरित्रें दिनकर सखाराम वर्दे यांनीं लिहिलीं असून तीं " ऐतिहासिक स्त्रिया " ( १९०७ ) नामक पुस्तकांत एकत्र छापलीं आहेत. तसेंच " रजपूत वीरांगना " या नांवाचें पुस्तक अगदीं अलीकडे ( १९३२ ) श्री. दु. आ. तिवारी यांनीं लिहिलें आहे. वर्दे यांची वर्णनशैली साधी, सरळ आहे तर तिवारी यांची भडक, जोरदार व वीररसानुकूल आहे. सौ. यशोदाबाई भट यांचें " ऐतिहासिक स्त्रीरत्नें " हें पुस्तकहि उल्लेखनीय आहे. श्री. लक्ष्मण नारायण जोशी यांचें " महाराणा प्रतापसिंह " हें ज्ञानमित्रपुस्तकमालेंतून प्रसिद्ध झालेलें ( १९२२ ) चरित्रहि असेंच आवेशयुक्त भाषेंत लिहिलें आहे.

रजपुतांच्या चरित्रलेखनांत देशाभिमान व धर्माभिमान या भावनांचा संचार विशेष, निबळ कुतूहलबुद्धि थोडी. मुसलमान बादशहांच्या व इतर महाराष्ट्रा-

बाहेरच्या ऐतिहासिक पुरुषांच्या चरित्रांत ही भावनात्मकता अर्थातच दिसत नाहीं. हीं लिहिण्यास निवळ कुतूहलबुद्धीच प्रेरक झाली असली पाहिजे. अकबर बादशहाचीं दोन चरित्रें झालीं; एक मा. त्र्यं. लेले यांनीं लिहिलेलें व दुसरें बा. वि. चांदोरकर यांनीं लिहिलेलें. औरंगजेबाचें चरित्र चिं. गं. गोगटे यांनीं दोन भागांत लिहून प्रसिद्ध केलें आहे ( १८९६ ). हे शालोपयोगी इतिहासाचे लेखक असून यांनीं बाळाजी विश्वनाथ ( १८९४ ) व नानासाहेब पेशवे ( १९०८ ) यांचींहि चरित्रें लिहिलीं आहेत. वि. कों. ओक यांनीं " अमीर अबदुल रहिमान " यांचें चरित्र लिहिलें असल्याचें मागें वर्णन केलेंच आहे. भिकोबा अनंत प्रधान यांनीं लिहिलेलें " महाराजा रणजितसिंह चरित्र " ( १९०७ ) वगैरे आणखीहि कांहीं किरकोळ चरित्रें झालीं असल्याचा बोध 'वाङ्मयसूची'वरून होतो. हीं सर्व चरित्रें इंग्रजी पुस्तकांतील माहितीचे तर्जुमे असून वाङ्मयेतिहासांत त्यांचें महत्त्व फारसें नाहीं.

चरित्रवाङ्मयांतील ऐतिहासिक संप्रदायाचें समालोचन याप्रमाणें केलें. मूळ स्फूर्ति देणारी देशाभिमानाची भावना. देशाभिमानाच्या भावनेनें पूर्वजांच्या इतिहासाविषयीं कुतूहल व त्यांचें गौरव करण्याची इच्छा उत्पन्न केली. या इच्छेंतच ऐतिहासिक चरित्रांचें मूळ सांपडतें. सर्वसाधारण ऐतिहासिक चरित्रें याप्रमाणें देशाभिमानमूलक ऐतिहासिक जिज्ञासेनें प्रेरित होऊन, इतिहासांतून कसोशीनें माहिती मिळवून, लिहिलेलीं दिसतात. परंतु या सर्वसाधारण नियमास अपवाद दोन्ही बाजूंनीं आढळतात. म्हणजे कांहीं चरित्रें ऐतिहासिकतेचा आधार सोडून मुख्यतः देशभक्तीच्या भावनेच्या आधीन होऊन लिहिलेलीं दिसतात तर उलट कांहीं चरित्रें निर्मिश्र कुतूहलबुद्धीनें प्रेरित होऊन लिहिलेलीं दिसतात. परंतु अशी निर्भेळ कुतूहलबुद्धि फार विरळा व तिचा आविष्कारहि मोठ्या रम्य स्वरूपांत झालेला दिसत नाहीं. स्वदेशांतील वा नाना देशांतील व्यक्तींच्या जीवनाविषयीं कुतूहल वाटावें, त्यांतील कित्येकांच्या जीवनाशीं सहृदयतेनें समरस होऊन मानवी जीवनाचे चित्रविचित्र व नवलपूर्ण देखावे पाहिल्याचा आनंद स्वतःच्या मनानें अनुभवावा आणि त्याच आनंदाचे अंशभाक् इतरांस करण्यासाठीं स्वतः अनुभविलेला जीवनाचा चित्रपट वाणीनें वर्णावा अशी क्रिया आमच्याकडे घडत असल्याचें फार करून अनुभवास येत नाहीं.

यामुळेंच चरित्रवाङ्मयांतील बहुतेक सर्व महत्त्वाच्या कृति देशभक्तीच्या, पूर्वजगौरवाच्या अगर दुसऱ्या कोणत्या तरी भावनेच्या प्रेरणेनें निर्माण झाल्या आहेत.

स्वदेशीय ऐतिहासिक व्यक्तींच्या संबंधांत हें विधान कसें खरें आहे हें आतापर्यंत आपण पाहिलेंच आहे. परदेशीय व्यक्तींच्या संबंधांतहि तें तितकेंच खरें आहे, असें आपणांस दिसून येईल.

देशाभिमानाच्या प्रेरणेनेंच पाश्चात्य देशभक्तांचीं चरित्रें लिहिण्यास आमच्याकडील वाङ्मयसेवक १८९० नंतर तयार होऊं लागले, हें मागें सांगितलेंच आहे. प्रथम इंग्लंडांतील सामान्य जनतेचे कैवारी व जहाल मतवादी ( radical ) असे जे पुढारी एकूणिसाव्या शतकांत होऊन गेले अगर विद्यमान होते त्यांजकडे मराठी लेखकांचें लक्ष गेलें. चिंतामण गंगाधर भानु यांनीं रिचर्ड कॉबडेनचें (१८९१). रामचंद्र भिकाजी जोशी यांनीं जॉन ब्राइटचें व रावजी भवानराव पावगी यांनीं ब्रॅडलॉ व ॲनी बेझंट यांचें (१८९४) याप्रमाणें चरित्रें लिहिलीं. हीं सर्व त्रोटक आहेत. तथापि त्यांतल्या त्यांत पावगी यांची लिहिण्याची शैली मार्मिक व अर्थगौरवयुक्त असून त्यांत व्यक्तित्वाचें निदर्शन चांगल्या रीतीनें झालेलें आढळतें. यापुढें हळुहळू शिवराम महादेव परांजपे प्रभृति तीव्र मनोवृत्तीच्या जाज्वल्य देशभक्तांचा काळ आला. परांजप्यांनीं 'काळा' तून अनेक आयरिश व युरोपीय स्वातंत्र्यवादी राष्ट्रभक्तांच्या चरित्रकथा उज्ज्वल वाणीनें गाण्याचा क्रम सुरू केला. न. चिं. केळकरांचा " गॅरीबाल्डी " १९०१ मध्यें बाहेर पडला. याच सुमारास ग्रंथमालेंत नारायण गणेश आगाशे यांचें " डॅनिएल ओकॉनेलचें चरित्र" व नारायण गोविंद चापेकर यांचें "एडमंड बर्क" हीं रूपांतरात्मक चरित्रें प्रसिद्ध होत होतीं. १९०७ मध्यें मॅझिनीच्या शतसांवत्सरिक जयंतीचा काळ साधून श्री. विनायक दामोदर सावरकर यांनीं स्वतःची प्रस्तावना व टिपणी यांच्यासह " मॅझिनीचें आत्मचरित्र " प्रसिद्ध केलें. सळसळणाऱ्या अंतःकरणांतून निघालेलें तें जलाल तेजाब होतें. सावरकरांच्या तेजाळ वाणीच्या आविष्कारानें त्या वेळच्या तरुणांचीं मनें कशीं थरारून गेलीं असतील याची कल्पना देखील आज करणें अशक्य आहे. लवकरच तें तेज प्रेस ॲक्टच्या प्रतापानें लुप्त झालें. केळकरांचा " आयर्लंडचा इतिहास " १९२० सालीं प्रसिद्ध झाला. त्यांत अनेक आयरिश देशभक्तांचीं चरित्रें, सुंदर रीतीनें लिहिलेलीं, समाविष्ट केलेलीं आहेत. हीं चरित्रेंच तेवढीं निराळीं काढून तीं १९३० सालीं " आयर्लंडचे राष्ट्रवीर " या नांवानें स्वतंत्रपणानें प्रकाशित करण्यांत आलीं. त्यांस श्री. पां. बा. गाडगीळ यांनीं रेडमंड, कॉलिन्स, ग्रिफिथ व डी व्हॅलेरा यांचीं चरित्रें अधिक जोडलीं असल्याकारणानें एकंदर पुस्तकास आजतागायतपणा आला आहे.

१९१० च्याच सुमारास लक्ष्मण गोविंद धाणेकर नांवाच्या गृहस्थांनीं लिहिलेलें मॅझिनीचें एक चरित्र प्रसिद्ध झालें. परंतु तें अगदीं त्रोटक आहे. त्यापेक्षां सदाशिव आत्माराम जोगळेकर यांचा " मॅझिनी " ( १९२३ ) पुष्कळच सरस आहे. तथापि मॅझिनी-सारख्या धीरोदात्त व ध्येयवादी पुरुषाचा जीवनवृत्तांत यथातथ्य वठविण्यास तशाच वृत्तीचा मनुष्य पाहिजे. सावरकरांसारखा पुरुषच तें काम करूं जाणे. इतरांचें तें काम नव्हे.

पाश्चात्य देशभक्त व राष्ट्रोद्धारक पुरुषांचीं चरित्रें मराठींत आणण्याबाबतींत श्री. वासुदेव दामोदर मुंडले यांनीं केलेली कामगिरी वाखाणण्याजोगी आहे. तरुणांना मार्गदर्शक व्हावीं या हेतूनें नाना ओकांच्या सल्ल्यानें त्यांनीं अनेक पुरुषांचीं चरित्रें लिहिलीं. " विल्यम दि सायलेंट " च्या प्रस्तावनेंत ते म्हणतात— " स्वदेशभक्ताच्या भावनेनें उद्दीपित झालेल्या आणि स्वराज्य व स्वातंत्र्य यांची आकांक्षा बाळगणाऱ्या महाराष्ट्रीय तरुणांचीं विकारवशता व उच्छृंखलपणा कमी करून त्यांस बहुश्रुत, साक्षेपी, विचारवंत व कार्यक्षम बनविण्याच्या हेतूनें निरनिराळ्या देशांतील लोकांनीं आपआपल्या देशोद्धाराचे प्रश्न कशा रीतीनें सोडविले याचें सापेक्ष ज्ञान करून द्यावें असा विचार मनांत आणून हे तीन निरनिराळे नमुने वाचकांपुढें ठेविले." हे तीन नमुने म्हणजे अर्थात् " काव्हूर ऊर्फ इटलीचा रामदास " ( १९१५ ), " प्रिन्स बिस्मार्क " ( १९१७ ) व हॉलंडचा उद्धारक " विल्यम दि सायलेंट " ( १९२४ ) हे होत. यांतील पहिलीं दोन पुस्तकें ज. वि. ओकांच्या राष्ट्रीय-शिक्षणमालेंतून प्रसिद्ध झालीं. तिसरें स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध झालें. ओक वारले व त्यांची राष्ट्रीयशिक्षणमालाहि लुप्त झाली, तेव्हां मुंडले यांनीं स्वतःची ' चैतन्योत्पादक-ग्रंथमाला ' काढून तिजमधून " मॅडम रोलंड ", " टॉमस पेनचें चरित्र " व " नेपोलियन बोनापार्ट ऊर्फ आसुरी महत्त्वाकांक्षा " ( १९१६ ) असे तीन ग्रंथ प्रसिद्ध केले.

प्रस्तावनेंतील वर दिलेला उतारा आमचे चरित्रकार बहुधा देशाभिमानानें प्रेरित झालेले व देशोद्धाराचा हेतु मनांत धरून चरित्रें लिहिणारे कसे असत याचा उत्कृष्ट निदर्शक आहे. मुंडले यांनीं जीं चरित्रें लिहिलीं त्यांचा परिणाम या दृष्टीनें कितपत झाला हें अजमावण्यास साधन नाहीं. वाङ्मयदृष्ट्या हीं चरित्रें मामुली स्वरूपाचीं आहेत इतकें येथें नमूद करणें बस आहे.

नेपोलियनचीं तीन चरित्रें साधारण एकाच काळीं प्रसिद्ध झालीं, आणि तो काळ म्हणजे वाटर्लूच्या लढाईस बरोबर शंभर वर्षे पूर्ण झाल्याच्या सुमारचा होय, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. या क्रमानें पहिलें श्री. केशव नागेश बापट यांचें "चक्रवर्ती नेपोलियन" (१९२४) हें होय. हें निःपक्षपात वृत्तीनें लिहिलें असून घडलेली हकीगत यथातथ्य वर्णन करण्याच्या दृष्टीनें चांगलें आहे. दुसरें श्री. मुंडले यांचें वर उल्लेखिलेलें "नेपोलियन बोनापार्ट ऊर्फ आसुरी महत्त्वाकांक्षा" हें होय. हें प्रतिकूल भावनेनें लिहिलें आहे, हें त्याच्या नांवावरूनच उघड होत आहे. या दोघांपेक्षांहि अधिक विख्यात व सरस, विनायक लक्ष्मण भावे यांचें "चक्रवर्ती नेपोलियन" हें होय. भावे हे नेपोलियनचे कट्टे पक्षपाती. अद्‌भुततेचा व वीररसाचा ध्यास घेणारी त्यांची बुद्धि नेपोलियन, शिवाजी अशा वीरश्रेष्ठांच्या अद्‌भुत कृत्यांमध्यें पूर्णपणें गुंगून जात असे. त्यांचें नेपोलियन–चरित्र अर्थातच रसाळ व चित्तवेधक वठलें आहे, हें सांगणें नलगे.

प्रो. नारायण सीताराम फडके यांनीं "हिम्मत बहाद्दर टेरेन्स मॅकस्विनी" व "आयरिश धुरंधर इमॉन डी व्हॅलेरा" (१९२३) हीं दोन चरित्रें लिहिलीं आहेत. विषय कोणताहि असो, चटकदार व लालित्यपूर्ण भाषेनें खुलवून आकर्षक करण्याची प्रो. फडके यांची हातोटी सुप्रसिद्धच आहे. त्या हातोटीस साजेशींच हीं दोन्ही चरित्रें वठलीं आहेत. आयरिश वीरांची तडफ, त्यांची स्वातंत्र्यप्रियता, त्यांचें शौर्य इत्यादि गुण त्यांतून चांगल्या रीतीनें व्यक्त झाले आहेत.

परंतु मुंडले, भावे व कांहीं अंशीं फडके सुद्धां, पूर्वीच्या जमान्यांतील लेखक झाले. अलीकडे युद्धोत्तरकालापासून आपल्यांतील लेखकांची दृष्टि अधिक व्यापक बनत चालली असल्याचें अनुभवास येतें. युद्धकालामध्यें जर्मनीकडे सर्वांचें लक्ष वेधलें. अर्थात् जर्मनींतील विख्यात पुरुषांचीं चरित्रें होण्याचा काळ आला. हरि रघुनाथ भागवत यांनीं कैसर दुसरा विल्यम यांचें एक छोटें चरित्र लिहिलें. परंतु या बाबतींत वृत्तपत्रें व मासिकें बाजूला ठेवल्यास, वाचकांचें कुतूहल चांगल्या रीतीनें पुरविण्याची कामगिरी भारतगौरव-ग्रंथमालेचे चालक प्रभाकर श्रीपत भसे यांनीं बजाविली. त्यांनीं "कैसरची प्रभावळ" (१९१६), "जर्मनीचें पाताळयंत्र" हीं दोन चरित्रात्मक पुस्तकें लिहिलीं. इतक्यावरच न थांबतां १९१७–१८ सालीं त्यांनीं "प्रिन्स बिस्मार्क" चें एक ६०० पानांचें विस्तृत चरित्र आपल्या मालेमधून प्रसिद्ध केलें. पुढें रशियांत एका पाठोपाठ एक अशा दोन क्रांत्या होऊन

बोल्शेविकांची सत्ता प्रस्थापित झाली तेव्हां रशियाकडे सर्वांचें लक्ष वळलें. हिंदुस्थानांतहि त्याच बेळेस महात्मा गांधी जनतेपुढें प्रामुख्यानें येत होते. तेव्हां विख्यात रशियन तत्त्वज्ञ व गांधींचे समाजशास्त्रीय गुरु टॉलस्टॉय यांजकडे महाराष्ट्रीयांचें लक्ष विशेष रीतीनें लागणें साहजिकच होतें. ही संधि साधून कै. भसे यांनीं १९१९–१९२० सालीं मराठींत टॉलस्टॉयचें एक प्रचंड चरित्र लिहून प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. सुमारें १,००० पृष्ठांचें हें पंचखंडात्मक चरित्र म्हणजे वाचकांच्या सहनशीलतेवर एक मोठा बोजाच होय. त्यांतून भसे यांची चरित्र लिहिण्याची पद्धति मोठी आकर्षक आहे असें नाहीं. त्यांची भाषाशैली सामान्यच असून विस्कळीत पाल्हाळ व अनावश्यक तपशील यांमुळें चरित्रनायकाचें व्यक्तिवैशिष्ट्य आणि त्याचें जीवनरहस्य यांचा वाचकांस थांगपत्ता लागेनासा होतो.

"अनाथ पांडुरंग" इत्यादि भाषांतरात्मक कादंबऱ्या लिहिणारे पूर्वीच्या पिढींतील एक चांगले लेखक कृष्णाजी बल्लाळ गोडबोले यांनीं हिंदुस्थानच्या इतिहासाशीं संबंध असलेले दोन पाश्चात्य मुत्सद्दी मौंट स्टुअर्ट एलफिन्स्टन् (१९११) व डुप्ले (१९१५) यांचीं चरित्रें लिहिलीं असून तीं वाचनीय झालीं आहेत.

अगदीं अलीकडे युद्धोत्तरकालांतील घडामोडींत प्रख्यातीस आलेले निरनिराळ्या राष्ट्रांचे सूत्रधार लोकांच्या नजरेसमोर विशेष असल्याकारणानें त्यांचीं अनेक चरित्रें तयार होत आहेत. लेनिन्‌चें चरित्र श्री. रा. गो. भिडे यांनीं लिहिलें आहे. "रासपुतीनचें चरित्र" (१९२१) श्री. ल. ना. जोशी यांनीं लिहिलें आहे. "मुसोलिनी व त्याचा फासिस्ट संप्रदाय" (१९२७) यावर श्री. द. वि. ताम्हणकर यांनीं एक सुंदर पुस्तक लिहिलें आहे. श्री. धुंडिराज त्र्यंबक गद्रे यांनीं प्रेसिडेंट विल्सन्‌चें चरित्र (१९२६) थोडक्यांत सुंदर भाषेंत लिहिलें आहे. बडोद्याचे म. पां. नेने यांनीं मराठी वाचकांस हिटलरचा (१९३४) परिचय करून दिला आहे.

जुन्या पुरुषांचीं नवीं चरित्रेंहि, नव्या काळांतील गरजानुसार, कित्येक होऊं लागलेलीं दृष्टीस पडतात. यांत प्रमुख म्हणजे विनायक महादेव भुस्कुटे यांचें समाजसत्तावादाचा प्रणेता कार्ल मार्क्स याचें चरित्र होय. हें अर्थात् मतप्रसाराच्या इच्छेनें व गौरव करण्याच्या भावनेनें लिहिलें आहे. परंतु निरपेक्ष कुतूहलबुद्धीनें प्रेरित होऊन लिहिलेलें एक पुस्तकहि उल्लेखनीय आहे तें श्री. श्री. म. माटे यांचें 'पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ' (१९३१) हें होय. श्री. माटे हे विचक्षण बुद्धीचे रसिक गृहस्थ आहेत. त्यांच्या भाषापद्धतींत एक प्रकारचा विशिष्ट ठसकेबाजपणा आहे. त्यामुळें त्यांच्या लिहिण्यांत वास्तविक

जितका मार्मिकपणा आहे त्यापेक्षां जास्त असल्याचा भास होतो. हें जरी खरें, तथापि एकंदरींत त्यांचें लिहिणें वाचनीय व उद्बोधक असतें, यांत शंका नाहीं. प्रस्तुत पुस्तकांत त्यांनीं शिकंदर, हॅनिबाल, ज्यूलियस सीझर, येशू ख्रिस्त, मार्टिन ल्यूथर, कोलंबस, ऑलिव्हर क्रॉमवेल, जॉन सोबेस्की व पीटर धि ग्रेट यांचीं चरित्रें प्रत्येकीं लहानशा निबंधा एवढ्या अवकाशांत वर्णिलीं आहेत. तीं जरी चांगलीं वठलीं असलीं तरी विवेचनपर लेखनांत त्यांच्या लेखणीची चमक जितकी दिसून येते, तितकी चारित्रपर लेखनांत दिसून येत नाहीं, असें म्हणणें भाग पडतें. यांशिवाय वॉशिंग्टन व लिंकन (वा. त्र्यं. आपटे), प्रेसिडेंट गार्फिल्ड ( वा. ह. बारपुरे ) इत्यादि छोटीं व बालोपयोगी चरित्रें पूर्वीप्रमाणें अलीकडेहि कित्येक प्रसिद्ध होत आहेतच. त्या सर्वांचा नामनिर्देश येथें केलाच पाहिजे असें नाहीं.

एकंदरींत पाहतां केवळ राजकारणाचेंच क्षेत्र जरी घेतलें तरी आमच्या चरित्र-लेखनाचा व्याप फारच तोकडा दिसतो. जर्मनी म्हटला कीं बिस्मार्क, फ्रान्स म्हटला कीं नेपोलियन, रशिया म्हटला कीं टॉल्स्टॉय अगर लेनिन्, यांपलीकडे आमच्या चरित्र-लेखकांची दृष्टि पोचूं नये, हें बुद्धीच्या संकुचितत्वाचें दर्शक होय. जर्मनी घेतला तर त्यांत स्ट्रेसमानसारखे राष्ट्राचे भाग्यविधाते, इंग्लंड-फ्रान्स घेतले तरी लॉइड जॉर्ज, क्लेमाँसू यांसारखे जगास हाताच्या बोटांवर चालविणारे चाणक्य, रशिया घेतला तरी स्टॅलिन्, ट्रॉट्स्की, बुखारीनसारखे धुरीण, यांचें जीवनरहस्य कथन करणारीं चरित्रें आमच्यांत कोठें झालीं आहेत? मासिकांतून व वृत्तपत्रांतून देशोदेशींच्या विख्यात पुरुषांविषयीं कांहीं लेख येतात हें खरें. परंतु त्यांची योग्यता तितकीच. विशेष परिश्रमानें लिहून पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलेलीं चरित्रें जनमनावर थोडा तरी परिणाम करूं शकतात. परंतु तसा प्रयत्न आपणाकडे होतांना दिसत नाहीं.

आम्ही महाराष्ट्रीय आपणांस मोठे राजकारणी समजतों. अशा स्थितींत राजकारणी पुरुषांच्या चरित्रांविषयींची जर ही दशा, तर इतर क्षेत्रांतील कर्तबगार पुरुषांचीं चरित्रें आपल्या भाषेंत कितीशीं झालीं असतील हें सहज लक्षांत येण्याजोगें आहे. शास्त्रज्ञ, संशोधक, व्यापारी वगैरे निरनिराळ्या पेशांतल्या पुरुषांचीं चरित्रें केवळ हाताच्या बोटांवर मोजण्याइतकींच झालेलीं नजरेस येतात. अशा पुरुषांचीं कित्येक चरित्रें मासिकांमधून लेखरूपानें आलेलीं नजरेस पडतात, हें खरें. परंतु त्यांचें स्वरूप चिरस्थायी नसतें. पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेल्यांत, पूर्वी चार्लस् डार्विनचें चरित्र ले. कर्नल कान्होबा रणछोडदास कीर्तिकर यांनीं लिहिलेलें दृष्टीस पडतें. त्यानन्तर हर्बर्ट

स्पेन्सरचें चरित्र, त्याच्या ग्रंथांचीं भाषांतरें श्री. दाभोळकरांकरितां करणारे कै. नारायण लक्ष्मण फडके यांनीं १९१६ सालीं लिहिलें. गोविंद विष्णु पेठे यांनीं लिहिलेलीं " कर्मवीर हेनरी फोर्ड " ( १९२९ ) आणि " विद्युत्ज्ञानविधाता टॉमस आल्व्हा एडिसन " ( १९३१ ) व श्री. गुरुनाथराव ओगले यांनीं लिहिलेलें " टॉमस आल्व्हा एडिसन " ( १९३२ ) हीं चरित्रें विशेष उल्लेखनीय आहेत. हीं सर्व बरींच मोठीं असून चरित्रनायकांच्या कर्तबगारीची चांगली जाणीव वाचकांस करून देतात. अलीकडे ' सृष्टिज्ञान ' मासिकामध्यें दर महिन्यास एखाद्या शास्त्रज्ञाचें लहानसें चरित्र येत असतें. तीं सर्व जर एकत्र करून पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलीं तर चरित्र-वाङ्मयांत एक चांगली भर टाकल्याप्रमाणें होईल.

स्वातंत्र्याच्या व देशाभिमानाच्या भावनेचें पोषण करण्याकरितां पाश्चात्य राजकीय पुरुषांचा जीवनवृत्तांत सांगण्याच्या प्रवृत्तीचा आढावा वर घेण्यांत आला. देशनिष्ठेप्रमाणेंच राजनिष्ठेनेंहि बरेच चरित्रग्रंथ मराठींत निर्माण केले आहेत. महाराणी व्हिक्टोरिया, सप्तम एडवर्ड, पंचम जॉर्ज यांपैकीं प्रत्येकाचीं पांच पांच, सात सात चरित्रें मराठींत झालीं आहेत. परंतु वाङ्मयदृष्ट्या त्यांत वर्णन करण्याजोगें विशेष नाहीं.

या ठिकाणीं पुन्हां एकवार मागें जाऊन १८९० पासून उद्भूत झालेल्या आणखी कांहीं प्रवृत्तींचें अवलोकन करून त्या प्रवृत्तींनीं निर्माण केलेल्या वाङ्मयाचा आढावा घेणें जरूर आहे. १८९० पासून पुढें जोरानें फोफावत गेलेल्या देशाभिमानाच्या भावनेचा दुहेरी विलास आपण पाहिला. त्या भावनेनें एका बाजूनें स्वदेशेतिहासाविषयीं बलवत्तर प्रेम लोकांच्या मनांत उत्पन्न करून ऐतिहासिक पुरुषांचीं चरित्रें गाण्यास त्यांना उद्युक्त केलें, तर दुसऱ्या बाजूनें परकीय राष्ट्रोद्धारकांचीं व राजकीय पुरुषांचीं चरित्रें स्वदेशबांधवांपुढें ठेवण्याची दिशा त्यांस दाखविली. आतां आणखी एक प्रवृत्ति त्याच सुमारास निर्माण झाली. तिनें वाङ्मयक्षेत्रांत काय कार्य घडवून आणलें, हें आपणांस पाहावयाचें आहे. कांहीं अंशीं संकलनात्मक व कांहीं अंशीं चिकित्सात्मक असें या प्रवृत्तीचें स्वरूपवर्णन करितां येईल. १८९० च्या सुमारास आधुनिक महाराष्ट्राच्या जीवनास सुरुवात होऊन, एका अर्थी पाऊणशें, तर दुसऱ्या अर्थी निदान चाळीस वर्षें होऊन गेलीं होतीं. ( मुंबापुरीच्या आधुनिक जीवनास १८२० च्या अगोदरच सुरुवात झाली होती, परंतु पुणें व इतर महाराष्ट्र यांत १८५०–६० च्या दशकापर्यंत चळवळीचा जिवंतपणा दिसूं लागला नव्हता. यावरून वर निर्देशिलेली दुहेरी कालमर्यादा

निश्चित केली आहे. ) थोडेसें सिंहावलोकन करून प्रमुख प्रमुख कार्यकर्त्यांच्या कार्यांचा आढावा घ्यावा असें वाटण्याइतपत हा काल दीर्घ होता. त्यांत आणखी देशकार्यापेक्षां पक्षोपपक्ष निर्माण होऊन त्यांचा पीळ वाढत चालल्यामुळें स्वपक्षानुकूल अशा पूर्वी होऊन गेलेल्या कार्यकर्त्यांचें विशेष गौरव करण्याची प्रवृत्तीहि उत्पन्न होऊं लागली होती. अशा सर्व कारणांमुळें आधुनिक महाराष्ट्रांतच जे विख्यात कार्यकर्ते होऊन गेले त्यांजविषयीं बोलण्यालिहिण्याची प्रवृत्ति या कालांत निर्माण होऊन जोमानें वाढीस लागली.

तेव्हां स्वराष्ट्राच्या आधुनिक इतिहासाचें संकलन व स्वजनांचें गौरव या दोन हेतूंचें व्यक्तिस्वभावानुसार कमजास्त प्रमाणांत मिश्रण होऊन त्यांच्या प्रेरणेमुळें आधुनिक महाराष्ट्रांतील कार्यकर्त्या पुरुषांचीं चरित्रें मराठींत लिहिलीं जाऊं लागलीं. यास प्रारंभ बहुधा विष्णुशास्त्री चिपळूणकर या राष्ट्रीय महापुरुषाच्या चरित्रगायनानेंच झाला. शास्त्रीबोवांचे एक मार्मिक व संस्मरणीय भक्त खंडेराव भिकाजी बेलसरे यांनीं १८९१ सालीं " विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या चरित्राचें व लेखांचें साधारण स्वरूप " हा आपला चरित्रात्मक प्रबंध प्रसिद्ध केला. शास्त्रीबोवांच्या चरित्राचें वर्णन व गुणावगुणांचें यथातथ्य विवेचन करण्यास टिळकांसारख्या महारथीपासून प्रस्तुत लेखकासारख्या पदातीपर्यंत पुष्कळच लोक आजपर्यंत लाभले आहेत. परंतु बेलसरे यांनीं प्रस्तुत प्रबंधामध्यें आणि शास्त्रीबोवांच्या १९०२ सालीं प्रसिद्ध केलेल्या किरकोळ लेखसंग्रहाच्या दुसऱ्या भागास लिहिलेल्या उपोद्घातामध्यें शास्त्रीबुवांच्या कर्तृत्वाचें सारग्राही दृष्टीनें जें विवेचन केलें आहे, तें अद्यापिहि अद्वितीयच आहे, असें म्हणणें भाग पडतें.

याच सुमारास एक चरित्रलेखनाचा अपूर्व प्रयत्न झाला. तो एका स्त्रीकडून झाला, हीच त्याची अपूर्वता आहे, असें नव्हे. चरित्रविषयीभूत व्यक्तीची माहिती तिच्याशीं निकट संबंध आलेल्या व्यक्तींकडून मिळवून व तिचीं पत्रें संपादन करून तिचें चरित्र लिहिण्याचा केलेला प्रयत्न, या दृष्टीनेंच त्याची अपूर्वता मुख्यतः आहे. कारण अशा यथाविधि लिहिलेल्या चरित्रांमध्यें श्री. काशीबाई कानिटकर यांनीं लिहिलेलें " डॉ. आनंदीबाई जोशी " हेंच बहुधा पहिलें होय. सहजसुंदर भाषा, हृदयास जाऊन भिडणारीं वर्णनें व चरित्रलेखिकेनें मधून मधून काढलेले भावनात्मक उद्गार यायोगानें हें चरित्र रमणीय झालें आहे. चरित्रनायिकेचीं अनेक प्रेमळ पत्रें त्यांत समाविष्ट केल्याकारणानें त्यास अधिकच शोभा आली आहे. प्रस्तुत चरित्रग्रंथ

प्रसिद्ध झाल्याबरोबर त्याची व त्यामुळें लेखिकेची मोठी ख्याति झाली. मराठींतील संस्मरणीय चरित्रग्रंथांपैकीं तो एक आहे, असा त्याजविषयींचा अभिप्राय आजहि यथार्थच ठरेल.

संकलनाची प्रवृत्ति व स्वजनगौरवाची प्रवृत्ति या दोहोंच्या प्रमाणशीर मिलाफाचा उत्कृष्ट मासला म्हणजे लक्ष्मणराव चिपळूणकरांचें "विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें चरित्र" (१८९४) हा होय. प्रस्तुत ग्रंथाचे टीकाकार व मालाकारांच्या जीवनाचे सुप्रसिद्ध दूषक जे बाळकृष्ण नारायण देव यांनीं या ग्रंथास अनुलक्षून "सध्यांच्या मराठी चरित्रग्रंथांत तर याची बरोबरी, चरित्रदृष्टीनें एकाच्यानेंहि करवणार नाहीं" असा जो अभिप्राय व्यक्त केला होता तो यथार्थ होता असेंच आज कोणीहि म्हणेल. पुण्यांतील परिस्थितीचें व तत्कालीन विद्यालयस्थ व्यक्तींचें या ग्रंथांत जें वेचक व मार्मिक वर्णन दिलें आहे तें ग्रंथकाराच्या संकलन-प्रवृत्तीचें द्योतक होय. ग्रंथकाराची वर्णनशैली जितकी हृद्य व मार्मिक आहे, तितकी त्याची विवेचनशक्ति सूक्ष्म व सखोल नाहीं. त्यामुळें त्यांनीं केलेलें शास्त्री-बोवांच्या कर्तृत्वाचें विवेचन व गुणवर्णन ढोबळ व मामुली स्वरूपाचें वाटतें. शास्त्री-बोवांच्या कृत्यांचें परिस्थितिसापेक्ष महत्त्वमापन करणें व त्यांच्या कर्तृत्वाचें यथोचित गौरव करणें हें कार्य लक्ष्मणरावांपेक्षां बेलसरे, टिळक, पांगारकर, माडखोलकर इत्यादिकांच्या हातूनच अधिक चांगल्या रीतीनें झालें आहे. किंबहुना रा. बाळकृष्ण नारायण देव व श्री. नरहर रघुनाथ फाटक यांनीं शास्त्रीबुवांच्या जीवनावर प्रति-कूल टीका करतांना दर्शविलेली विवेचक शक्ति देखील या चरित्रग्रंथांत दिसून आलेल्या खुद्द चरित्रकाराच्या विवेचक शक्तीपेक्षां श्रेष्ठ ठरेल. तथापि परिस्थितिसापेक्ष गुणावगुणविवेचन हा चरित्रग्रंथाचा अत्यंत महत्त्वाचा भाग नव्हे, त्यामुळें तो विवे-चनाचा भाग जरी कमी दर्जाचा वठलेला असला तरी शास्त्रीबोवांचें व्यक्तिचित्र, अगदीं जिवंत असें, डोळ्यांपुढें उभें राहण्यास त्यामुळें कांहीं बाध येतो असें वाटत नाहीं.

प्रस्तुत चरित्र प्रसिद्ध झाल्यानंतर सहा वर्षांनीं त्याच्यावर जें वादसंगर माजलें त्याचा उल्लेख येथें थोडक्यांत केला पाहिजे. कारण त्यांत मराठींतील एका उच्च दर्जाच्या चरित्रविवेचकाचा संबंध येतो. इंदूरचे बाळकृष्ण नारायण देव यांची प्रसिद्धि विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या चरित्रावरील त्यांचा टीकालेख 'ग्रंथमालें' तून १९०० सालीं प्रसिद्ध झाल्यानंतरच जरी विशेष झालेली असली तरी चरित्रलेखक

म्हणून त्यांचें नांव अगोदरच विचक्षण वाचकांस विदित झालें होतें. बाळ गंगाधर-शास्त्री जांभेकर ( १८९२ ) व नाटककार विनायक जनार्दन कीर्तने (१८९७) यांचीं त्यांनीं लिहिलेलीं चरित्रें लहानशींच परंतु चरित्रनायकाचें महत्त्वमापन योग्य रीतीनें करणारीं अशींच वठलीं आहेत. विवेचक या नात्यानें देव यांचा दर्जा याप्रमाणें मोठा असतां विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या चरित्राचें विवेचन करतांना ते केवळ विकृत व एकांगी विचारसरणीच्या आहारीं कसे गेले हें सकृद्दर्शनीं मोठेंच कोडें वाटतें. परंतु तें सुटणें अवघड नाहीं. देवांना भावनेचें वावडें होतें. भावनेच्या खळबळीबरोबर वर येणारा फेस व तरंगणारा कचरा त्यांस असह्य होई व निर्मल परंतु स्तब्ध जलाशयासच ते आदर्शभूत अवस्था मानीत. विष्णुशास्त्र्यांच्या भावनात्मक प्रेरणेनें १८९० नंतर देशाभिमानास भर येऊन उत्साहलहरींची जी खळबळ महाराष्ट्रभर दिसून येऊं लागली होती ती या वृत्तीमुळेंच देवांस असह्य झाली व या खळबळीचे जनक विष्णुशास्त्री होत, हें सत्य त्यांस उघड उघड दिसत असल्यामुळें ते शास्त्रीबोवांवर केवळ तुटून पडले. एरवीं, ' मालाकारांच्या हयातींत त्यांच्याविषयीं माझ्या मनांत निरतिशय आदर जागृत होता ' अशी कबुली खुद्द त्यांनींच दिली आहे. देव हे अशा रीतीनें भावनेस बुजणारे गृहस्थ असल्या-मुळें, विवेचक शक्ति त्यांच्या अंगीं मोठ्या प्रमाणांत वसत होती तरी त्यांनीं केलेलें कित्येक व्यक्तींच्या जीवनकार्याचें महत्त्वमापन पुष्कळ अंशांनीं चुकीचें ठरलें आहे. यास उदाहरण चिपळूणकरांखेरीज आणखी एका व्यक्तीचें आहे. ती व्यक्ति म्हणजे राजारामशास्त्री भागवत ही होय. राजारामशास्त्री १९०८ मध्यें मरण पावल्यावर लवकरच देवांनीं विविधज्ञानविस्तारामध्यें स्वतंत्र पृष्ठें देऊन त्यांचें विवेचक चरित्र लिहिलें. तें यद्यपि फार परिश्रमानें लिहिलें असलें तरी त्यावरून शास्त्रीबोवांच्या जीवनाचें मर्म देवांस नीटसें आकलन झालें नाहीं, असेंच दिसतें. विशेषतः राजारामशास्त्री व विष्णुशास्त्री यांची जी तुलना त्या प्रबंधांत केली आहे ती तर अगदींच अप्रयोजक आहे.

उपर्युक्त लिखाणाशिवाय देवांनीं नाना फडणीसाच्या चरित्रावर एक विवेचक प्रबंध १९०४ मध्यें लिहिला असून आणखी कित्येक व्यक्तींवर त्रोटक चरित्रात्मक लेखहि लिहिले आहेत.

आधुनिक पुरुषांच्या चरित्ररचनेंत गुंतलेला देवांशिवाय दुसरा कोणी पुरुष त्या काळीं नव्हता. तेव्हां वर वर्णन केलेल्या प्रयत्नांखेरीज संकलनाचे इतर उल्लेखनीय

प्रयत्न या काळांत, म्हणजे १८९० नंतरच्या काळीं फारसे झालेले दिसत नाहींत. न्यायमूर्ति रानडे यांचें एक छोटें चरित्र वामन बाळकृष्ण रानडे यांनीं १८९४ च्या सुमारास लिहिलें होतें. व अशींच कुंटे प्रभृति आणखी ४–५ जणांचीं त्रोटक चरित्रेंहि त्यांनीं लिहिलीं असल्याचा दाखला मिळतो. तेलंगांचें चरित्र व्याख्यानरूपानें १९१० सालीं श्री. श्रीपाद केशव नाईक यांनीं सांगितलें होतें. रावजी भवानराव पावगी यांनीं मंडलिकांचें चरित्र लिहिण्यास विविधज्ञान-विस्तारांतून सुरवात केली होती. हें संपूर्ण झालें असतें तर एका फार चांगल्या चरित्राची भर मराठींत पडली असती. टिळकांचीं चरित्रें निर्माण होण्यास १८९७ सालापासूनच सुरुवात झाली. हीं अर्थात् संकलनाच्या प्रवृत्तीपेक्षां स्वजनगौरवाच्या प्रवृत्तीचींच विशेष द्योतक होत हें सांगावयास नकोच. या सालीं केशव बाळाजी सहस्रबुद्धे नांवाच्या गृहस्थांनीं त्यांचें एक त्रोटक चरित्र लिहिलें. पुढें त्यांच्या ५० व्या वाढदिवसाच्या प्रसंगीं म्हणजे १९०६ सालीं कृष्णाजी आबाजी गुरुजी यांनीं त्यांच्या चरित्राचा पूर्वार्ध लिहून प्रसिद्ध केला. पुढें १९०८ सालीं टिळक कैद झाल्या-नंतर एकदम बरेंच टिळकवाङ्मय प्रसिद्ध झालें. श्री. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर व सीताराम केशव दामले यांनीं त्यांचीं त्रोटक चरित्रें याच सालीं लिहिलीं. परंतु अधिक महत्त्वाचीं पुस्तकें म्हणजे श्री. शंकर गजानन पुरोहित यांचें ‘ टिळकांचा जयजयकार ’ व श्री. आप्पाजी विष्णु कुळकर्णी यांचें ‘ टिळकांचीं गेलीं आठ वर्षें ’ हीं होत. पहिलें पुस्तक टिळकांच्या राजकीय कर्तृत्वाचें रहस्य सांगण्याच्या उद्देशानें लिहिलेलें असून देशभक्तीची जाज्वल्य भावना त्यांत रसरसत असलेली दिसत होती. सरकारच्या रोषास बळी पडून तें जप्त झालें. कुळकर्ण्यांचें ‘ गेलीं आठ वर्षें ’ हें फारच उपयुक्त आहे. १९०१–१९०८ या अवकाशांतील टिळक आपल्या गुणसमुच्चयासह या पुस्तकाच्या योगानें आपल्यापुढें मूर्तिमंत उभे राहतात.

या सर्व चरित्रांमध्यें वर उल्लेखिलेलें कृ. आ. गुरुजींचें टिळकचरित्र हें एका दृष्टीनें अधिक वाचनीय व निखालस अधिक मनोरंजक असें आहे. हरदासी थाटाची पाल्हाळीक परंतु अत्यंत मनोरंजक वर्णनपद्धति, चरित्रनायकाविषयीं जिव्हाळ्याचें व सलगीचें प्रेम, खुद्द टिळकांकडून व त्यांच्या चुलत्यांकडून साक्षेपी-पणानें मिळविलेल्या माहितीचा यथोचित समावेश व उमदेपणाची विनोदी वृत्ति— या सर्व गोष्टींचा मधुर संगम या चरित्रांत झालेला दिसून येतो. म्हणूनच टिळकांच्याविषयीं अलीकडे एवढें अफाट चरित्रपर वाङ्मय निर्माण झालें असतांहि

एक अवश्य अनुभवण्याजोगी मौज म्हणून, हें चरित्र जरूर वाचावें, अशी शिफारस करावीशी वाटते.

केवळ गौरवाच्या बुद्धीनें लिहिलेलें परंतु चित्तवेधक व ठसकेदार वर्णनशैली-मुळें वाचनीय झालेलें मध्यंतरींच्या काळांत लिहिलेलें एक चरित्र वासुदेव बळवंत पटवर्धन यांनीं लिहिलेलें गोपाळराव गोखले यांचें होय. गोखले वारल्यानंतर लगेच मनोरंजनाच्या १९१५ च्या वसंत अंकाकरितां तें लिहिलेलें असल्यामुळें साहजिक रीतीनें त्यास 'गोखले माहात्म्या'चे स्वरूप आलें आहे.

याखेरीज केवळ गौरवबुद्धीनें प्रेरित होऊन लिहिलेलीं स्वतःच्या नाते-वाईकांचीं, ज्ञातिबांधवांचीं अगर वर्गबांधवांचीं चरित्रें अनेक झालेलीं दृष्टीस पडतात. वाङ्मयगुणांच्या दृष्टीनें पाहतां त्यांचा उल्लेख देखील येथें करण्याचें फारसें कारण दिसत नाहीं.

संकलनाच्या प्रवृत्तीचा खरा उत्कर्ष १९२० नंतर झालेला दृष्टीस पडतो. १८९० ते १९०८ पर्यंतचा काळ जाज्वल्य देशाभिमानाचा व धर्माभिमानाचा. त्यानंतर १९०९ ते १९२० पर्यंतचीं बारा वर्षें म्हणजे राजकीयदृष्ट्या अज्ञातवासाचा किंवा अवगुण्ठनाचा काळ होय. त्यांतील पहिलीं सहा वर्षें टिळकांच्या कारागृह-वासांत गेलीं. तर पुढील सहा वर्षें युद्धामुळें निर्माण झालेल्या कृत्रिम परिस्थितीच्या दडपणाखालीं गेलीं. एतावता या काळांत गत वा विद्यमान सार्वजनिक कार्य-कर्त्यांचीं चरित्रें विशेषशीं झालेलीं दृष्टीस पडत नाहींत, हें मात्र खरें.

हरिभाऊ आपटे १९१९ सालीं व टिळक १९२० सालीं वारले. वाङ्मयां-तील व राजकारणांतील दोन महारथी याप्रमाणें दिवंगत झाल्यावर संकलनाच्या व व्यक्तिगौरवाच्या प्रवृत्तीस एकदम विलक्षण चालना मिळाली. श्री. विष्णु विनायक करमरकर यांनीं मुख्यत्वेंकरून मुलांकरितां "महाराष्ट्राचे पंचप्राण" (१९२१) हें रानडे, चिपळूणकर, आगरकर, टिळक व गोखले यांचीं चरित्रें सुटसुटीतपणें कथन करणारें पुस्तक प्रसिद्ध केलें. परंतु खरी सुरुवात १९२३ च्या ऑगस्टमध्यें प्रसिद्ध झालेल्या श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या 'टिळकचरित्रा'च्या पूर्वार्धानें केली. या पुस्तकानें महाराष्ट्रांत जबरदस्त खळबळ उडवून दिली. ग्रंथाच्या दहा हजार प्रती अल्पावकाशांत खपल्या. कित्येक लोक आदरमिश्रित भक्तीमध्यें दंग झाले, तर कित्येकांच्या मनामधील विद्वेषाची खळबळ या प्रसंगानें बाहेर आली. आपल्या दृष्टीनें विशेष महत्वाचे परिणाम म्हणजे, चरित्रलेखनाच्या प्रवृत्तीस या ग्रंथामुळें

जोराची चालना मिळाली व चरित्रलेखनाचें स्वरूप कसें असावें याविषयीं नव्या पिढींतील लेखकांमध्यें कुतूहलबुद्धि जागृत झाली, हे होत.

टिळकचरित्राचा पूर्वार्ध व १९२८ सालीं प्रसिद्ध झालेला उत्तरार्ध ( खंड १, २ ) हे दोन्ही मिळून एकंदर १९४४ पानांचा ग्रंथ होतो. यांत 'टिळकांचें पुण्यस्मरण' या नांवाखालीं पुनर्मुद्रित केलेले लेख जमा धरल्यास केळकरांनीं टिळकांसंबंधानें लिहिलेल्या मजकुराची पृष्ठसंख्या २००० वर सहज जाते. अनुयायानें आपल्या पुढाऱ्याच्या पायांवर वाहिलेला इतका प्रचंड पूजासंभार दुसऱ्या कोणाचा क्वचितच असेल. केळकरांचें हें सर्व लिखाण अनेक दृष्टींनीं चिरस्मरणीय झालें आहे. आपण नशीबवान् असल्याचें ते स्वतः अनेकवार वर्णन करीत असतात. त्यांत टिळकांसारखा चरित्रनायक त्यांना आयता हातारीं, आपल्यासाठीं राखून ठेवलेला असा, मिळाला ही देखील एक त्यांच्या भाग्याचीच गोष्ट होय, असें मानण्यास हरकत नाहीं. परंतु दैवयोगानें लाधलेल्या या संधीचा त्यांनीं महत्तम उपयोग करून घेतला, हें त्यांच्या थोरवीचें खरें लक्षण होय. नाहीं तर आळशावर आलेल्या गंगेप्रमाणें भाग्य हें अनेकांपुढें संधीची खैरात करून हिरमुसलें होऊन परत जातें.

'साधार व भरपूर माहिती प्रकरणवार जुळवून देण्याच्या दृष्टीनेंच' प्रस्तुत ग्रंथ लिहिला असल्याचें त्यांनीं पूर्वार्धाच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे. ही पद्धति निवळ काबाडकष्टाची, व हिला सर्वांत कमी लेखनकौशल्य लागतें असा त्यांनींच प्रस्तावनेंत खुलासा केला आहे. तो जरी कांहींसा खरा असला तथापि प्रासादिक व मनोहर भाषाशैली, गुंतागुंतीचे भानगडीचे प्रसंग व व्यवहार सुसंगत व सुगम करून सांगण्याचें कौशल्य, व्यक्ति आणि घटना यांच्याविषयीं मार्मिक अभिप्राय वर्णनांतच जातां जातां गुंफून देण्याची खुबी, या गुणांचा प्रत्यय वाचकांस या प्रचंड ग्रंथांत पुष्कळच ठिकाणीं येतो, हें कोणाहि सरळ मनाच्या वाचकांस कबूल करणें भाग पडेल. त्याचप्रमाणें, टीकाकारांनीं कितीहि काहूर माजविलें असलें तरी प्रांजळपणा, समतोलपणा व प्रतिपक्षाचे गुणहि मुक्तकंठानें वर्णन करण्याइतकी औदार्यबुद्धि या गुणांचा आढळ या ग्रंथांत सर्वत्र होतो, हें पक्षभेदानें ज्यांचीं मनें ग्रस्त झालेलीं नाहींत अशा वाचकांस सहज मान्य होईल. टिळकपक्षांत इतक्या प्रांजळबुद्धीनें लिहिणारा चरित्रकार दुसरा कोणी क्वचितच आढळला असता. उलट बाजूनें पाहिल्यास टिळकांच्या प्रतिपक्षीयांनीं आपापल्या पूज्यपादांचीं जीं चरित्रें

लिहिलेलीं आहेत त्यांतल्या उदारतम लिखाणांपेक्षां केळकरांचें टिळकचरित्र शतपटीनें अधिक दिलदार व प्रांजल बटलें आहे, असेंहि आपणांस निखालस म्हणतां येईल.

प्रतिपक्षीयांविषयीं दिलदारपणा दाखविण्याप्रमाणेंच चरित्रनायक टिळक यांच्याविषयीं अंधभक्ति व विभूतिमत्वाची भावना यांचें पटल डोळ्यांवर चढूं न देण्यामध्यें चरित्रकारांनीं मोठीच औचित्यबुद्धि दाखविली आहे, यांत शंका नाहीं. तथापि केळकर हे कितीहि समतोल व उदार मनाचे असले तरी, टिळकांच्या नांवावर चालणाऱ्या संप्रदायाचे ते अध्वर्यु झाले असल्यामुळें म्हणा, किंवा खरोखरच त्यांचा ठाम अभिप्राय तसा असल्यामुळें म्हणा, त्यांनीं टिळकांच्या सर्व कृत्यांचें एकजात समर्थनच केलें आहे. नि:पक्षपातीपणाच्या दृष्टीनें पाहतां ही गोष्ट गैर झाली असली व त्यामुळेंच त्यांच्या टीकाकारांस वाजवी तक्रार करण्यास थोडीशी जागा झालेली असली तरी टिळकांना त्यांनीं केवळ दैवी विभूति बनविलें आहे असा मुळींच भास चरित्र वाचतांना होत नाहीं, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. टिळक हे कितीहि असामान्य झाले तरी मनुष्यच होते, त्यांचे व्यवहार सामान्य माणसांप्रमाणेंच चालत, सामान्य माणसांप्रमाणेंच त्यांचे कित्येक बेत फसत, कित्येक अंदाज चुकत, त्यांच्या स्वभावांतहि लालित्याचा व रसिकतेचा अभाव इत्यादि उणीवा होत्या, असाच ठसा चरित्र वाचल्यानंतर सरतेशेवटीं मनुष्याच्या मनावर उठतो.

एवढें वर्णन केल्यावर एक गोष्ट मात्र सांगितलीच पाहिजे कीं, एवढें विस्तीर्ण चरित्र वाचूनहि पुष्कळ विचक्षण वाचकांच्या मनांत बरेंचसें असमाधान शिल्लक राहतें. असें कां व्हावें याचा स्वबुद्ध्यनुसार थोडा खुलासा करणें येथें अवश्य आहे. एक गोष्ट तर प्रथमदर्शनींच प्रत्ययास येते, ती ही कीं, या ग्रंथाचा उत्तरार्ध पूर्वार्धाच्या मानानें कमी सरस झाला आहे. उत्तरार्धाच्या रचनेंत विस्कळीतपणा, सुसंगतेचा व विशदतेचा अभाव, गैरलागू गोष्टींचीं पाल्हाळिक वर्णनें व अप्रस्तुत पत्रांचे उतारे इ. व्यंगांचा आढळ होत असल्याकारणानें त्याचें सौंदर्य बरेंच कमी झालें आहे. हें फक्त उत्तरार्धाविषयीं झालें. एकंदर ग्रंथाविषयीं विचार केला तरी त्यासंबंधानें दोन तीन गोष्टी सांगण्यासारख्या वाटतात. पहिली गोष्ट ही कीं, चरित्रनायक आणि चरित्रलेखक यांच्या वृत्तींमध्यें स्वभावतः बराच फरक आहे. टिळकांसारख्या वैशिष्ट्यपूर्ण अलौकिक व्यक्तीला त्यांच्यासारख्या वृत्तीचा चरित्रकार मिळाला असता तर ‘ समसमां संयोग

कीं जाहला ' असा प्रकार होऊन दुधांत साखर पडली असती. आतां टिळक आणि केळकर यांच्या मनोवृत्ति परस्पर कशा भिन्न आहेत, हें येथें विस्तरशः सांगण्याचें कांहीं कारण नाहीं. महाराष्ट्रीय वाचकांस ही वृत्तिभिन्नता, तिचा उल्लेख करतांच, सहज पटेल अशा तऱ्हेची आहे. तिजमुळेंच दुर्दान्त, मानोन्नत आणि धैर्यमेरु असा टिळकांचें व्यक्तित्व या प्रचंड चरित्रांतहि नीटपणें रेखाटलें गेलें नाहीं असें म्हणावेंसें वाटतें. दुसरी गोष्ट म्हणजे, ' जें घडलें तें सांगितलें ' अशा तऱ्हेचें जें धोरण ग्रंथकारांनीं अंगिकारिलें आहे तें चरित्रनायकाच्या उठावास बाधक झालें आहे. त्यामुळें हें टिळकचरित्र नसून हा एक भला मोठा महाराष्ट्रीय समाजाचा इतिहास झाला आहे असा आक्षेप पुष्कळांनीं आजपर्यंत घेतला आहे. हा आरोप पूर्वार्धासंबंधानें जितका खरा आहे तितका उत्तरार्धासंबंधानें नाहीं. शिवाय या आक्षेपास आधारभूत अशी जी गोष्ट आहे, तिचा उल्लेख कोणींच केलेला दिसत नाहीं. ती गोष्ट म्हणजे हीच कीं, या चरित्रांत बाह्य दृष्टीचा अतिरेक झाला आहे. टिळकांच्या हातून घडलेलीं कृत्यें व तीं ज्या परिस्थितींत घडलीं ती परिस्थिति यांचेंच वर्णन चरित्रकारानें केलें आहे. टिळकांचें मत, त्यांचे हेतु, त्यांच्या जीवनाचा व मनाचा विकास यांचें चित्र या चरित्रांत यथातथ्य वठलें आहे, असें समाधान वाचकाच्या मनास वाटत नाहीं. टिळकांच्या शरीराच्या हालचाली पूर्ण विस्तारानें वर्णिल्या आहेत. परंतु त्यांच्या मनाच्या हालचाली निगूढच राहिल्या आहेत, असें त्यास वाटावयास लागतें. शिवाय चरित्राचा विस्तारहि टिळकांच्या व्यक्तित्वाच्या उठावास बाधकच झाला आहे.

याशिवाय टिळकांचें सर्व जीवनचरित्र सध्यांच्या जाणत्या पिढीला इत्थंभूत माहीत असल्यामुळें केळकरकृत चरित्रांत तीस नवीन असें कांहीं भासत नाहीं. ' यांत हो केळकरांनीं काय विशेष सांगितलें आहे ? ' असें म्हणून तो असमाधान व्यक्त करतो. ही बाब प्रस्तुत लेखकानेंच ' चरित्रकार केळकर ' या लेखांत नमूद केली आहे.

' टिळक चरित्रा ' वर झालेल्या टीकांपैकीं बापूजी मार्तंड आंबेकर यांनीं ' टिळक जीवनरहस्य ' या नांवानें स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेली व श्री. न. र. फाटक यांची ' विविधज्ञानविस्तारां ' त प्रसिद्ध झालेली या दोन वाचनीय आहेत. त्या दोहोंतहि चरित्रनायकाविषयीं दुराग्रहमूल दोषैकदृष्टि व तिरस्कारबुद्धि पदोपदीं प्रतीत होत असली तरीहि त्यांतील माहितीसाठीं व उच्च दर्जाच्या विवेचनशैलीसाठीं त्या कोणासहि वाचनीय वाटतील.

हे दोघेहि टीकाकार स्वतः चरित्रकार आहेत, ही गोष्ट महाराष्ट्रीय वाचकांच्या परिचयाचीच आहे. आंबेकर यांचें 'हरि नारायण आपटे यांचें संक्षिप्त चरित्र' (१९२२) हें प्रामुख्येंकरून संकलनाच्या दृष्टीनें लिहिलें असून वाचनीय झालें आहे. श्री. फाटकांचें 'न्या. मू. रानडे यांचें चरित्र' (१९२४) माहितीनें भरलेलें, चरित्रनायकाच्या व्यक्तित्वाचा चांगला उठाव करणारें, त्याचीं कृत्यें व हेतु यांचें यथास्थित विवेचन करणारें, असें बढलें आहे. मात्र एवंगुणविशिष्ट असूनहि हें चरित्र वाचकाचें समाधान करण्यास असमर्थ ठरतें. यास मुख्य कारण म्हटलें म्हणजे, दुसऱ्या एका लेखकानें म्हटल्याप्रमाणें, हें केवळ एक 'रानडे महिम्नस्तोत्र' बनलें आहे, हेंच होय. चरित्रकारानें रानड्यांना जणूं काय दोषातीत व अनंतकल्याणगुणपरिपूर्ण असा ईश्वरी अवतार बनविलें आहे. याशिवाय वृत्तिभिन्नता, जी टिळकचरित्राच्या बाबतींत दाखविण्यांत आली, ती तर येथें फारच मोठ्या प्रमाणांत दिसून येते. रानड्यांसारख्या धार्मिक वृत्तीच्या, धीरगंभीर व उदारमनस्क पुरुषास तशाच वृत्तीचा चरित्रकार मिळावयास पाहिजे होता. 'स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवीं कवी जन्मती' अशी अपेक्षा वाचक जर कोणाविषयीं कधीं करीत असतील तर ती रानडे, टिळक यांसारख्या महापुरुषांविषयींच. आणि ती अपेक्षा पूर्ण न झाल्याचें शल्य रानडेचरित्राच्या बाबतींत जितकें तीव्रतेनें जाणवतें तितकें इतर कोणाच्याहि चरित्राच्या बाबतींत जाणवत नाहीं.

पक्षपाती व दुराराध्य चरित्रलेखनाचें याहीपेक्षां ठळक उदाहरण प्रो. माधव दामोदर आळतेकर यांच्या आगरकरांवरील 'चरित्रात्मक निबंधा'चें होय. हा 'निबंध' म्हणजे टिळकांची व टिळकपक्षीयांची उच्छृंखल निंदा व आगरकरांची भरमसाट स्तुति यांनीं भरलेलें भारूड होय.

इ. स. १९२० नंतरच्या काळाचें वैशिष्ट्य हें कीं, या काळांत संकलनकार अनेक उदयास आले व येत आहेत. या संकलनकारांपैकीं कांहीं जात्यभिनिविष्ट, कांहीं पक्षाभिनिविष्ट, तर कांहीं संप्रदायाभिनिविष्ट असे आहेत. आनंदाची गोष्ट ही कीं, असा कोणताहि अभिनिवेश नसलेले असे संकलनकारहि या काळांत कित्येक उदयास आले आहेत. व हीच वृत्ति उत्तरोत्तर वाढत जाईल, असा रंगहि दिसत आहे.

श्री. श्रीनिवास नारायण कर्नाटकी यांनीं सारस्वतज्ञातींतील तीन महापुरुषांचीं भरपूर माहितीनें भरलेलीं अशीं तीन चरित्रें लिहून महाराष्ट्रीय वाचकांस

कीं जाहला ' असा प्रकार होऊन दुधांत साखर पडली असती. आतां टिळक आणि केळकर यांच्या मनोवृत्ति परस्पर कशा भिन्न आहेत, हें येथें विस्तरशः सांगण्याचें कांहीं कारण नाहीं. महाराष्ट्रीय वाचकांस ही वृत्तिभिन्नता, तिचा उल्लेख करतांच, सहज पटेल अशा तऱ्हेची आहे. तिजमुळेंच दुर्दान्त, मानोन्नत आणि धैर्यमेरु अशा टिळकांचें व्यक्तित्व या प्रचंड चरित्रांतहि नीटपणें रेखाटलें गेलें नाहीं असें म्हणावेंसें वाटतें. दुसरी गोष्ट म्हणजे, ' जें घडलें तें सांगितलें ' अशा तऱ्हेचें जें धोरण ग्रंथकारांनीं अंगिकारिलें आहे तें चरित्रनायकाच्या उठावास बाधक झालें आहे. त्यामुळें हें टिळकचरित्र नसून हा एक भला मोठा महाराष्ट्रीय समाजाचा इतिहास झाला आहे असा आक्षेप पुष्कळांनीं आजपर्यंत घेतला आहे. हा आरोप पूर्वार्धासंबंधानें जितका खरा आहे तितका उत्तरार्धासंबंधानें नाहीं. शिवाय या आक्षेपास आधारभूत अशी जी गोष्ट आहे, तिचा उल्लेख कोणींच केलेला दिसत नाहीं. ती गोष्ट म्हणजे हीच कीं, या चरित्रांत बाह्य दृष्टीचा अतिरेक झाला आहे. टिळकांच्या हातून घडलेलीं कृत्यें व तीं ज्या परिस्थितींत घडलीं ती परिस्थिति यांचेंच वर्णन चरित्रकारानें केलें आहे. टिळकांचें मत, त्यांचे हेतु, त्यांच्या जीवनाचा व मनाचा विकास यांचें चित्र या चरित्रांत यथातथ्य वठलें आहे, असें समाधान वाचकाच्या मनास वाटत नाहीं. टिळकांच्या शरीराच्या हालचाली पूर्ण विस्तारानें वर्णिल्या आहेत, परंतु त्यांच्या मनाच्या हालचाली निगूढच राहिल्या आहेत, असें त्यास वाटावयास लागतें. शिवाय चरित्राचा विस्तारहि टिळकांच्या व्यक्तित्वाच्या उठावास बाधकच झाला आहे.

याशिवाय टिळकांचें सर्व जीवनचरित्र सध्यांच्या जाणत्या पिढीला इत्थंभूत माहीत असल्यामुळें केळकरकृत चरित्रांत तीस नवीन असें कांहीं भासत नाहीं. ' यांत हो केळकरांनीं काय विशेष सांगितलें आहे ? ' असें म्हणून तो असमाधान व्यक्त करतो. ही बाब प्रस्तुत लेखकानेंच ' चरित्रकार केळकर ' या लेखांत नमूद केली आहे.

' टिळक चरित्रा ' वर झालेल्या टीकांपैकीं बापूजी मार्तंड आंबेकर यांनीं ' टिळक जीवनरहस्य ' या नांवानें स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेली व श्री. न. र. फाटक यांची ' विविधज्ञानविस्तारां ' त प्रसिद्ध झालेली या दोन वाचनीय आहेत. त्या दोहोंतहि चरित्रनायकाविषयीं दुराग्रहमूल दोषैकदृष्टि व तिरस्कारबुद्धि पदोपदीं प्रतीत होत असली तरीहि त्यांतील माहितीसाठीं व उच्च दर्जाच्या विवेचनशैलीसाठीं त्या कोणासहि वाचनीय वाटतील.

हे दोघेहि टीकाकार स्वत: चरित्रकार आहेत, ही गोष्ट महाराष्ट्रीय वाचकांच्या परिचयाचीच आहे. आंबेकर यांचें 'हरि नारायण आपटे यांचें संक्षिप्त चरित्र' (१९२२) हें प्रामुख्येंकरून संकलनाच्या दृष्टीनें लिहिलें असून वाचनीय झालें आहे. श्री. फाटकांचें 'न्या. मू. रानडे यांचें चरित्र' (१९२४) माहितीनें भरलेलें, चरित्रनायकाच्या व्यक्तित्वाचा चांगला उठाव करणारें, त्याचीं कृत्यें व हेतु यांचें यथास्थित विवेचन करणारें, असें बठलें आहे. मात्र एवंगुणविशिष्ट असूनहि हें चरित्र वाचकाचें समाधान करण्यास असमर्थ ठरतें. यास मुख्य कारण म्हटलें म्हणजे, दुसऱ्या एका लेखकानें म्हटल्याप्रमाणें, हें केवळ एक 'रानडे महिम्नस्तोत्र' बनलें आहे, हेंच होय. चरित्रकारानें रानड्यांना जणूं काय दोषातीत व अनंतकल्याणगुणपरिपूर्ण असा ईश्वरी अवतार बनविलें आहे. याशिवाय वृत्तिभिन्नता, जी टिळकचरित्राच्या बाबतींत दाखविण्यांत आली, ती तर येथें फारच मोठ्या प्रमाणांत दिसून येते. रानडयांसारख्या धार्मिक वृत्तीच्या, धीरगंभीर व उदारमनस्क पुरुषास तशाच वृत्तीचा चरित्रकार मिळावयास पाहिजे होता. 'स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कधीं कवी जन्मती' अशी अपेक्षा वाचक जर कोणाविषयीं कधीं करीत असतील तर ती रानडे, टिळक यांसारख्या महापुरुषांविषयींच. आणि ती अपेक्षा पूर्ण न झाल्याचें शल्य रानडेचरित्राच्या बाबतींत जितकें तीव्रतेनें जाणवतें तितकें इतर कोणाच्याहि चरित्राच्या बाबतींत जाणवत नाहीं.

पक्षपाती व दुराराध्य चरित्रलेखनाचें याहीपेक्षां ठळक उदाहरण प्रो. माधव दामोदर आळतेकर यांच्या आगरकरांवरील 'चरित्रात्मक निबंधा'चें होय. हा 'निबंध' म्हणजे टिळकांची व टिळकपक्षीयांची उच्छृंखल निंदा व आगरकरांची भरमसाट स्तुति यांनीं भरलेलें भारूड होय.

इ. स. १९२० नंतरच्या काळाचें वैशिष्टय हें कीं, या काळांत संकलनकार अनेक उदयास आले व येत आहेत. या संकलनकारांपैकीं कांहीं जात्यभिनिविष्ट, कांहीं पक्षाभिनिविष्ट, तर कांहीं संप्रदायाभिनिविष्ट असे आहेत. आनंदाची गोष्ट ही कीं, असा कोणताहि अभिनिवेश नसलेले असे संकलनकारहि या काळांत कित्येक उदयास आले आहेत. व हीच वृत्ति उत्तरोत्तर वाढत जाईल, असा रंगहि दिसत आहे.

श्री. श्रीनिवास नारायण कर्नाटकी यांनीं सारस्वतज्ञातींतील तीन महापुरुषांचीं भरपूर माहितीनें भरलेलीं अशीं तीन चरित्रें लिहून महाराष्ट्रीय वाचकांस

उपकृत केलें आहे. डॉ. भांडारकर (१९२७), न्या. तेलंग (१९२९), व डॉ. भाऊ दाजी लाड (१९३०) हे ते तीन पुरुष होत. भाषाशैली, रचनाकौशल्य किंवा व्यक्तिवैशिष्ट्याचें हुबेहूब दर्शन यांपैकीं कोणत्याच बाबतींत नांव घेण्यासारखें या चरित्रांत फारसें नाहीं. चरित्रनायकांच्या महतीमुळेंच हीं चरित्रें विशेष वाचनीय झालीं आहेत. श्री. कर्नाटकी यांनीं हीं स्वजातीयांचीं चरित्रें जातिविषयक भावनेस वश होऊन लिहिलीं आहेत, असें म्हणणें उचित होणार नाहीं. तथापि सारस्वतज्ञातींतील कित्येक सन्मान्य गृहस्थांस त्यांनीं स्वजातीयांचींच चरित्रें लिहिलीं याबद्दल विशेष अभिमान वाटला असल्याचें दिसून येतें. डॉ. भाऊ दाजींच्या चरित्राच्या प्रस्तावनेचे लेखक श्री. पाणंदीकर यांनीं आपणाला रा. ब. गजेंद्रगडकर यांनीं पुढीलप्रमाणें सूचना केली असल्याचें लिहिलें आहे. " For writing three lives of three Saraswat worthies he ( Mr. Karnataki ) deserves a gold medal and I hope your Bombay Saraswat Samuha does him the honour and honcur itself. " रावबहादुरांनीं मोठ्या भावार्थानें ही सूचना केली व पाणंदीकरांनींहि ती आपल्या पाठिंब्यासह प्रस्तावनेंत नमूद केली. परंतु त्यामुळें कर्नाटकींची मोठी केविलवाणी स्थिति झाली ! ' जातीय बुद्धीनें मीं हीं चरित्रें लिहिलीं नाहींत. ' असें प्रतिपादन करतां करतां त्यांस पुरेवाट झाली आहे !

श्री. द्वा. गो. वैद्य यांनीं लिहिलेलें डॉ. भांडारकरांचें चरित्र हें श्री. कर्नाटकींच्या चरित्रापेक्षां पूर्वीचें असून तें सुश्लिष्ट, सुंदर व रेखीव असें झालें आहे. कर्नाटकींच्या भांडारकरचरित्रांत प्रतिपक्षीयांवर हल्ले करण्याची प्रवृत्ति दिसून येते. ही प्रवृत्ति पुढील दोन चरित्रांत मात्र दिसून येत नाहीं, ही अभिनंदनीय गोष्ट आहे.

तरुण पिढीमध्यें पक्षभेदांपासून अलिप्त राहून केवळ गुणग्रहणपर दृष्टीनें चरित्रलेखन करणारे संकलनकार उदयास येत आहेत, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. अशांपैकीं श्री. पांडुरंग सदाशिव साने, श्री. गंगाधर देवराव खानोलकर व श्री. रामचंद्र गणेश बोरवणकर हे विशेष उल्लेखनीय होत. श्री. साने यांनीं १९२५ सालीं नामदार गोखले यांचें चरित्र लिहिलें. मराठींतील नितान्त रमणीय चरित्रांपैकीं हें एक होय. सान्यांची भाषासरणी मनोवेधक, हृदयास हलवून सोडणारी असून त्यांच्या वर्णनशैलींत त्यांचें प्रेमळ, प्रांजळ व उदात्त मन स्पष्टपणें उमटलेलें दिसतें. गोखल्यांच्या कर्तृत्वाचें वर्णन त्यांनीं तन्मयतेनें केलें असूनहि त्यांच्या टिळकादिक प्रतिपक्षीयांविषयींहि तितकाच आदर व्यक्त केला आहे. ही गोष्ट जितकी

अपवादभूत तितकीच अभिनंदनीय होय. चरित्रनायकाविषयीं पूज्यभाव कायम ठेवूनहि त्याच्या जीवनांतील व्यंगें हलुवार हातानें कशीं दाखवावीं, हें साने यांच्यापासून शिकण्याजोगें आहे. साने यांनीं अलीकडे इतिहाससंशोधक राजवाडे यांचेंहि लहानसें चरित्र लिहिलें आहे.

श्री. खानोलकर यांचें लेखन विशेषतः वाङ्मयसेवकांसच अनुलक्षून झालें आहे. आपले वाङ्मयगुरु कै. श्री. कृ. कोल्हटकर यांचें त्रोटक चरित्र साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षस्थानीं त्यांची निवड झाल्यासमयीं त्यांनीं लिहिलें. त्याशिवाय कोल्हटकर लेखसंग्रहांत समाविष्ट करण्यासाठीं त्यांनीं आणखी एक निराळेंच चरित्र लिहिलें आहे. परंतु या दोन्ही चरित्रांपेक्षां अण्णा विजापूरकरांचें त्यांनीं लिहिलेलें चरित्र ( १९२८ ) अधिक भरदार झालें आहे. त्यांत त्या अविरत उद्योगी पुरुषाच्या अनेकविध व्यापांचें आणि चळवळीचें समर्पक चित्र आदरयुक्त भावनेनें रेखाटण्याचा प्रयत्न केला असून तो चांगलाच यशस्वी झाला आहे. समर्थविद्यालयांत शिक्षक असलेले दुसरे एक साक्षेपी चरित्रकार श्री. रामचंद्र गोविंद कानडे यांनींहि अण्णांचें एक चरित्र त्याच सालीं लिहून प्रसिद्ध केलें. या चरित्रांत अण्णांच्या पूर्वायुष्याची माहिती अधिक आहे, परंतु लेखनशैलीच्या व विवेचक शक्तीच्या दृष्टीनें पाहतां खानोलकरांचें चरित्र सरस आहे. खानोलकर यांचा अधिक व्यापक व महत्त्वाचा उद्योग म्हणजे 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक' (१९३१) हा दिवंगत वाङ्मयसेवकांची माहिती देणारा संदर्भग्रंथ होय. संदर्भग्रंथ या नात्यानें यांत अपूर्णता, प्रमाणबद्धतेचा अभाव, क्वचित् दिसून येणारी विधानांची संशयास्पदता व विवाद्यता, इत्यादि दोष आहेत. तथापि यांतील कांहीं वाङ्मयसेवकांवरील लेख सुंदर वठले आहेत, हें नमूद करणें अवश्य आहे. यांतल्या त्यांत खानोलकरांशिवाय इतरांनीं लिहिलेले लेखच विवेचकाच्या दृष्टीनें अधिक सखोल व सरस वठले आहेत, हें नमूद करणें प्राप्त आहे. अगदीं अलीकडे श्री. खानोलकर यांनीं राजवाडे यांचें चरित्र लिहिलें आहे. तें अगदींच सामान्य आहे. श्री. रा. ग. बोरवणकर यांनीं शक्य ती माहिती मिळवून गणेश वासुदेव जोशी ऊर्फ सार्वजनिक काका ( १९२४ ) व वासुदेव बळवंत फडके ( १९२९ ) यांचीं लहान लहान चरित्रें लिहिलीं आहेत.

श्री. द. ग. येरवडेकर हेहि एक चांगले लेखक आहेत. त्यांनीं गोपाळराव गोखले यांचें, युनिव्हर्सिटीच्या निबंधाच्या बक्षिसाकरितां लहानसें निबंधात्मक चरित्र

लिहिलें असून तें १९२६ सालीं प्रसिद्धहि केलें. तें चांगलें वठलें आहे. श्री. न. र. फाटक यांचेंहि 'गोखले-चरित्र' लवकरच बाहेर येणार म्हणून त्या सुमारास गाजत होतें. परंतु ती वदंता पोकळच ठरली. श्री. येरवडेकर यांनीं मडगांवच्या साहित्यसंमेलनाच्या समयीं श्री. वा. म. जोशी यांजवर एक लेख रत्नाकर मासिकांत लिहिला होता तो चरित्र या दृष्टीनें सुंदर वठला आहे. तसेंच कै. बापूजी मार्तंड आंबेकर यांचे राजवाडे प्रभृति कित्येक व्यक्तींवरील मृत्युलेखहि मासिकांतून आलेले चांगले वठले आहेत. 'अप्रबुद्ध' यांनीं अण्णासाहेब पटवर्धन यांचें विस्तृत चरित्र लिहिलें आहे (१९२६). 'उषाकान्त' यांचें 'रमाबाई रानडे' (१९२४), सदाशिव राजाराम रानडे यांचें 'बॅरिस्टर सावरकर यांचें चरित्र' (१९२४), श्री. रा. प्र. कानिटकर यांचें 'वा. म. जोशी चरित्र' (१९३०), श्री. कृ. मा. बाबर यांचें 'कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे-चरित्र' (१९३०), श्री. उमाकान्त केशव आपटे यांचें हिंदुधर्मसंघटनेच्या अभिमानानें लिहिलेलें 'महाराष्ट्राचा अर्वाचीन स्मृतिकार कृ. वि. वझे' (१९३०), यांचा नुसता उल्लेख करून पुढें गेलें असतां चालणार आहे.

चरित्रें विख्यात पुरुषांचींच परंतु तीं वैयक्तिक हेतूनें किंवा वैयक्तिक संबंधास्तव लिहिलेलीं अशींहि कित्येक झालीं आहेत. श्री. गणेश रामकृष्ण हवालदार यांचें 'विश्वनाथ नारायण मंडलीक यांचें चरित्र' (१९२७) हें अशाच सदरांत घालतां येईल. चरित्रकार हे चरित्रनायकाचे संबंधी असून त्या आप्तत्वामुळें निर्माण झालेल्या जिव्हाळयाच्या आदरबुद्धीमुळेंच त्यांनीं चरित्र लिहावयास घेतलें व त्यामुळेंच त्यांना सर्व सामग्रीहि मिळूं लागली. त्या सामग्रीचें मंथन करून सारभूत नवनीत त्यांनीं वाचकांपुढें ठेवलें असतें तर फार बरें झालें असतें. पाकाध्यक्षाला सामग्री भरपूर दिली असतां त्यानें सर्व पदार्थ साली, फोलपटें, बिया इत्यादिकांसह तसेंच ताटांत घालून वाढावें तसा कांहींसा प्रकार येथें झाला आहे. दोन प्रचंड खंड मिळून १२०० पानांचा हा प्रचंड ग्रंथ त्यांनीं वाचकांच्या माथीं मारला आहे.

सदाशिव कृष्ण फडके यांनीं लिहिलेलें "विष्णु कृष्ण पुराणिक—पनवेलच्या धूतपापेश्वर कारखान्याचे उत्पादक— यांचें चरित्र" (१९३३) वरच्याइतकें वाचकांचा अंत पाहणारें झालेलें नाहीं. हें चरित्रनायकांच्या चिरंजीवांनीं श्री. फडके यांजकडून लिहविलेलें दिसतें. हा यद्यपि ५०० पानांचा जाडजूड ग्रंथ झालेला आहे तथापि चरित्रकाराची भाषा ओघवती व वर्णनशैली चित्तवेधक असल्यामुळें तितका

कंटाळवाणा वाटत नाहीं. असें जरी आहे तरी यापेक्षां ग्रंथ आटपशीर केला असता तर त्याची वाचनीयता वाढली असती, असें वाटल्याखेरीज राहत नाहींच.

दि. ब. अण्णा बाबाजी लठ्ठे यांनीं लिहिलेलें ' छत्रपति शाहू महाराज यांचें चरित्र ' ( १९२५ ) याची गोष्ट अशी नाहीं. या चरित्राचीं पृष्ठें जरी ४७५ असलीं तरी चरित्रनायक हा मोठा प्रतापी व उलाढाल्या पुरुष असल्यामुळें त्याच्या चळवळींच्या वर्णनाला एवढा अवकाश अपुराच वाटतो. शिवाय लठ्ठे यांनीं मूळ इंग्रजी चरित्र कुशलतेनें लिहिलेलें असून त्यांचें मराठी भाषांतरहि सरस वठलेलें आहे. चरित्रनायकाचें व्यक्तिचित्र त्यांत कितपत यथार्थ वठलें आहे, याचा विचार करतांना मात्र ते राजाज्ञेनें लिहिलेलें व एका राजाधिकाऱ्याकडून लिहविलेलें राजाचें चरित्र आहे, ही गोष्ट आपण लक्षांत ठेविली पाहिजे.

विख्यात व्यक्तींच्या गौरवार्थ त्यांच्या साठाव्या अगर अशाच कोणत्या तरी विशिष्ट वाढदिवसाच्या प्रसंगानें अनेक लेखकांनीं लिहिलेल्या लेखांचीं संकलित पुस्तकें काढण्याचा अलीकडे प्रघात पडला आहे. अशा ग्रंथांत " केळकर ग्रंथ " ( १९३२ ) व " सयाजी-गौरवग्रंथ " ( १९३३ ) या दोन ग्रंथांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. केळकर ग्रंथांतील बहुतेक सर्व लेख वाङ्मयविवेचनात्मक आहेत. श्री. स. वि. बापट यांनीं लिहिलेलें ६० पानांचें चरित्र मात्र चांगलें आहे. सयाजी-गौरवग्रंथांत श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्या विविध प्रकारच्या कामगिरीवर उत्तम प्रकाश पाडणारे अनेक लेख असून शिवाय त्यांचें सुसंगत चरित्रहि दिलें आहे. श्री. सयाजीरावांचीं दोन चरित्रेंहि पुस्तकरूपानें मराठींत झालीं आहेत. शिवाय मागें ' नवयुग ' मासिकांत त्यांच्या कर्तृत्वाचें वर्णन करणारी एक लेखमाला प्रसिद्ध झाली होती तीहि वाचनीय आहे.

संकलनाच्या व स्वजनगौरवाच्या प्रवृत्तीनें जें चरित्रवाङ्मय निर्माण झालें त्याचा आराखडा आतांपर्यंत निवेदन केला. अगदीं क्षुल्लक प्रयत्न वगळले असतां बाकी सर्वांचा निर्देश या आढाव्यांत झाला असेल, अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं. या आढाव्यावरून संकलनाची व गौरवाची प्रवृत्ति अलीकडील दहापंधरा वर्षांत फारच वाढली आहे, असें दिसून येईल. ब्रिटिश अमदानीनंतरच्या महाराष्ट्रांतील बहुधा एकहि असा प्रसिद्ध पुरुष राहिला नसेल कीं, ज्याचें चरित्र लहानसें कां होईना, केव्हां तरी कोणाकडून तरी लिहिलें गेलेलें नसेल. आतांपर्यंत जीं चरित्रें उल्लेखिलीं तीं राजकारणी पुढारी, सामाजिक सुधारक, शिक्षक, न्यायाधीश, ग्रंथकार

वगैरे सार्वजनिक कार्यांत वावरणाऱ्या पुरुषांचीं होत. याशिवाय शास्त्र, कला, वैद्यक इत्यादि क्षेत्रांत विशेष प्रख्यातीस आलेल्या अशा पुरुषांचींहि चरित्रें आपल्याकडे झालीं आहेत; परंतु अशा विविध क्षेत्रांत विशिष्ट कर्तृत्व गाजविणाऱ्या पुरुषांची संख्याच अगोदर आपल्याकडे अत्यंत अल्प असते, आणि त्यांतून अशा पुरुषांच्या चरित्रलेखनाची प्रवृत्ति लेखकांना होण्याचा संभव फार कमी असतो. जावजी दादाजींसारखे मुद्रक, बापूसाहेब मेहेंदळ्यांसारखे वैद्य, डॉ. नानासाहेब देशमुखांसारखे डॉक्टर, प्रो. छत्र्यांसारखे सर्कसवाले, अशांचीं चरित्रें पुस्तकरूपानें झालीं असून मासिकांतून लहान निबंधांच्या आकाराचीं चरित्रें तर पुष्कळांचींच झालीं आहेत. लहानापासून मोठ्यापर्यंत हीं सर्व चरित्रें गौरवाच्याच बुद्धीनें लिहिलीं गेलीं असल्यामुळें व्यक्तीचें माहात्म्य असेल नसेल तेवढें वर्णन करण्याकडेच सर्व रोख असलेला त्यांत दृष्टीस पडतो. दोषांचें यथातथ्य दिग्दर्शन व व्यक्तित्वाचें हृदयंगम उद्भावन करण्याचा प्रयत्न फारच क्वचित् आढळांत येतो.

संकलनाची व स्वजनगौरवाची प्रवृत्ति ग्रंथकारांच्या बाबतींत विशेष स्वरूपांत आविर्भूत झालेली दिसते. यांतील विशेष हा कीं, त्यांच्या जीवनवृत्तांताबरोबरच त्यांच्या वाङ्मयकृतींचें विवेचनहि विस्तारानें केलें जातें. अशीं विवेचनपर चरित्रें चरित्रवाङ्मयाच्या सदरांत न पडतां वाङ्मयविवेचनाच्या ( literary criticism ) सदरांत पडावयाचीं. तेथेंच त्यांचें समालोचन होणें रास्त. परंतु त्यांत निव्वळ चरित्रात्मक भागहि बराच असल्यामुळें त्यांचा येथें जातांजातां उल्लेख केला पाहिजे. ज्या चरित्रांमध्यें जीवनवृत्तांतासच प्राधान्य आहे अशा कांहीं ग्रंथकारचरित्रांचा उल्लेख ओघानुसार पूर्वीच येऊन गेलाहि आहे. आतां विवेचनप्रधान अशा चरित्रांचा परामर्श फक्त घेणें आहे.

ग्रंथकारांचीं वाङ्मय-विवेचनपर चरित्रें लिहिण्यास प्रारंभ प्रथम बाळकृष्ण मल्हार हंस यांच्या निबंधाच्या योगानें झाला हें मागें आपण पाहिलेंच आहे. त्यांच्या निबंधांमध्यें कवीचा जीवनवृत्तांत आणि त्याच्या ग्रंथांचें विवेचन या दोन अंगांचें पूर्ण पृथक्करण केलेलें असून पहिल्याच्या मागून दुसरें लेखनासाठीं घेण्यांत येतें. चरित्रलेखनाच्या दृष्टीनें ही पद्धत निकृष्ट प्रतीची होय. कारण कवीच्या वैयक्तिक जीवनाचा व त्याच्या वाङ्मयनिर्मितीचा मेळ चांगलासा घातला जात नाहीं व वाचकांस त्याच्या व्यक्तित्वाचें व त्याचबरोबर ग्रंथकर्तृत्वाचें विकसन कसें झालें यांचें नीट ज्ञान होत नाहीं. ग्रंथकारांच्या चरित्रांचें लेखन खरोखर कसें करावें याचा

घडा जॉन्सननें आपल्या ' कविचरित्रां 'मध्यें (Lives of the Poets) घालून दिला आहे. त्यानें कवीचा व्यक्तिविकास व ग्रंथकर्तृत्वाचा विकास यांचा परामर्श एकदमच घेतला असून चरित्रनायकाचें एकसंधी चित्र सुंदर रीतीनें वाचकांच्या डोळ्यांसमोर उभें केलें आहे. इंग्रजींतील ( Men of Letters Series ) मध्यें देखील अशीच पद्धत अवलंबिलेली आहे. इंग्रजींतील इतके नमुने डोळ्यांसमोर असूनहि आमच्यांतले कित्येक नाणावलेले साहित्यसेवकहि अद्याप जीवनवृत्तांत व वाङ्मयविवेचन यांचें पृथक्करण करण्याच्या अप्रशस्त व जड मार्गांचें अवलंबन करितात ही मोठी आश्चर्याची गोष्ट होय.

सर्वसामान्य संकलनात्मक चरित्रांना १९२० च्या नंतरच्या काळांत विशेष भर आला असें आपण मागें पाहिलें आहे. परंतु ग्रंथकार चरित्रांचे उत्कृष्ट व अधिकारी लेखकांनीं लिहिलेले नमुने १९०० पासूनच आपल्याला आढळूं लागतात ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. त्याच्यापूर्वी मात्र ही प्रवृत्ति विशेष जागृत होती असें दिसत नाहीं. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं ' ग्रंथमाला ' मासिकांत तुकाराम, रामदास व मुक्तेश्वर यांवर निबंध लिहिले. पैकीं तुकाराम व मुक्तेश्वर हे दोन प्रामुख्यानें संशोधनात्मक व कालनिर्णयात्मक असून ' रामदास ' हा विवेचनात्मक आहे. त्यांत रामदासानें देशोद्धारार्थ केलेल्या संघटनेचें भव्य वर्णन केलें असून शिवभूपति-प्रतापाची भूमिका सर्वस्वीं रामदासानें तयार केली या मताचा पुरस्कार केला आहे. अर्थात् रामदासाच्या कर्तृत्वासंबंधीं जो वाद गेलीं तीस वर्षें महाराष्ट्रांत चालू आहे त्याची मुहूर्तमेढ रोवण्याचें महनीय श्रेय या निबंधास आहे. या वादाचा उत्तरपक्ष प्रबळ करण्याचें श्रेय श्री. गोविंद चिमणाजी भाटे व श्री. नरहर रघुनाथ फाटक यांजकडे जातें. भाटे यांचें ' सज्जनगड व समर्थ रामदास ' ( १९१५ ) हें रामदास-शिवाजींच्या प्रथम भेटीचा काल शके १५९४ हा असला पाहिजे असें प्रतिपादन करणारें पुस्तक व श्री. फाटक यांनीं रामदासाच्या जीवनाविषयीं व त्यांनीं वापरलेल्या ' राजकारण ' शब्दाच्या अर्थाविषयीं १९२९ सालीं ' विविधज्ञानविस्तारां'तील लेखांतून केलेलें विवेचन हीं दोन्ही वाङ्मयाच्या प्रांतांत विशेष खळबळ उडविण्यास कारणीभूत झालीं. रामदासांसंबंधीं राजवाडे, श्री. शं. श्री. देव व श्री. भा. वा. भट यांनीं खूपच लिखाण आजवर केलें आहे, तथापि त्यांच्या विस्तृत चरित्राची उणीव अगदीं अलीकडे ( १९३३ ) श्री. सदाशिव खंडो आळतेकर यांनीं ४५० पानांचें विस्तृत ' श्रीसमर्थ-चरित्र ' लिहून भरून काढली आहे.

श्री. आळतेकर यांनीं राजवाडे, देव, पांगारकर प्रभृति संशोधकांनीं व अभ्यासकांनीं लिहून ठेविलेल्या सामग्रीचेंच संकलन मुख्यत: केलें आहे. त्यांचें चरित्र म्हणजे जरी एक मोठें भारूड असलें तरी तें फार उपयुक्त झालें आहे यांत संशय नाहीं.

राजवाड्यांचेच समकालीन बाळकृष्ण अनंत भिडे यांचा विवेचक कवि चरित्रकार म्हणून उल्लेख करणें अवश्य आहे. यांनीं 'श्रीसरस्वतीमंदीर' त्रैमासिकांत तुकाराम, वामन व मुक्तेश्वर या तीन कवींवर निबंध लिहिले असून ते स्वतंत्र रीतीनेंहि प्रकाशित केले आहेत. राजवाड्यांची दृष्टि ऐतिहासिक तर यांची वाङ्मयविवेचनाची. यांची भाषा प्रौढ व भारदस्त असून वाङ्मयमापनाची दृष्टि मार्मिक व समंजसपणाची आहे. वाङ्मयविवेचन या नात्यानें यांचे प्रबंध मराठी वाङ्मयांत चिरकाल टिकून राहण्याजोगे आहेत.

राजवाडे ऐतिहासिक, भिडे विवेचक, तर पांगारकर भाविक. त्यामुळें त्यांचें नांव श्रद्धाळु संतचरित्रकारांमध्यें नमूद करावें कीं, विवेचक कविचरित्रकारांमध्यें समाविष्ट करावें, याचा क्षणभर प्रश्न पडतो. परंतु त्यांची वाङ्मयात्मक कामगिरी इतकी महनीय आहे कीं, हा प्रश्न वाङ्मयविवेचनाच्या बाजूनेंच सोडविणें कोणासहि भाग पडेल. पांगारकरांच्या श्रद्धाळू भाविकपणाच्या लोंढ्यांत वाहून न जातां त्यांच्या भूमिकेचें सूक्ष्म व भेदक दृष्टीनें पृथक्करण केलें तर भाविकपणाच्या जाडजूड कवचाखालीं त्यांच्या हृदयाच्या गाभ्यांतल्या गाभ्यांत रसिकत्वाची वृत्तीच चिवटपणानें ठाण धरून बसली आहे असें दिसून येतें. या रसिकत्वाचें पर्यवसान प्रेमळपणांत व प्रेमळपणाचें भाविकपणांत जरी झालें असलें तरी त्यांची रसिकवृत्ति 'प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्' या न्यायानें स्वतः तेवतच राहिलेली असून तीच त्यांच्या वाङ्मयविषयक कार्यास प्रारंभापासून प्रेरक झाली आहे. ते पहिल्या प्रतीचे देशभक्त आहेत, परंतु त्यांच्या देशाभिमानांत रखरखीतपणा नाहीं. ते अत्यंत भाविक व श्रद्धाळू असूनहि उच्च श्रेणीचे विवेचक आहेत; रसिक असूनहि श्रेष्ठ दर्जाचे इतिहाससंशोधक आहेत; रंगेल असूनहि अत्यंत शुद्ध व सात्त्विक आहेत. त्यांच्याविषयीं हेलनेची भावना जी सध्यांच्या तरुण पिढीच्या मनांत वसत आहे ती सोडून तिनें त्यांच्या ग्रंथांचें आस्थेनें वाचन केलें तर त्यांच्या लोकोत्तर भाषाप्रभुत्वाचा, अलौकिक सहृदयतेचा व उच्च विवेचक शक्तीचा प्रत्यय तिला आल्याखेरीज खचित राहणार नाहीं. "संतचरित्रकार तरी भाविक, रसिक व चिकित्सक किंवा संशोधक असला पाहिजे" अशी त्यांची समजूत आहे व अशा

त्रिवेणी संगमाचा श्रेष्ठ नमुना ते स्वतः आहेत, यांत संशय नाहीं. त्यांच्या विवेचन-शक्तीवर भाविकपणाचें पटल आलें असल्यामुळें परिस्थितिसापेक्ष गुणदोषविवेचन त्यांच्या लेखनामध्यें आढळत नाहीं. तथापि त्यांच्या सोज्वल वृत्तीमुळें ते जुन्या भक्तकवींच्या भूमिकांशीं तेव्हांच तन्मय होऊं शकतात. ही तन्मयता पावण्याची शक्ति त्यांच्याइतकी दुसऱ्या कोणाहि विवेचकाच्या अंगीं नसल्यामुळें ज्ञानेश्वरा-पासून मोरोपंतापर्यंत कोणताहि कवि असो, पांगारकरांचें त्यावरील लिखाण वाचल्यास आपण त्या कवीच्या हृद्गताशीं जाऊन भिडलों असें वाचकांस वाटतें. " मोरोपंत चरित्र व काव्यविवेचन " ( १९०८ ) या आपल्या पहिल्या चरित्रपर ग्रंथांत पांगारकरांनीं एकीकडे चरित्र व एकीकडे काव्यविवेचन अशी पृथक्करणात्मक पद्धतीच अंगिकारिली आहे. 'तुकाराम चरित्रां'त (१९२०) मात्र तुकोबांच्या व्यक्तिविकासाबरोबरच त्यांच्या उक्तींचा परमर्श घेतला आहे. तथापि भाषा व विवेचन यांच्या तजेलदारपणामुळें पंतचरित्र अधिक सरस झालें आहे. " एकनाथ चरित्र " ( १९११ ), " ज्ञानेश्वर चरित्र " ( १९१३ ) हींहि वाचनीय व सुंदर झालीं आहेत हें सांगणें नकोच. " मुक्तेश्वर चरित्र व काव्यविवेचन " ( १९२२ ) यांत चरित्र फारसें नसून काव्यविवेचन सर्वत्र भरलें आहे, हें साहजिकच आहे. शिवाय 'मुमुक्षू'मध्यें अनेक संतांचीं लहान लहान चरित्रें पांगारकरांनीं लिहिलेलीं असून तीं त्यांनीं स्वतंत्र पुस्तकरूपानेंहि प्रसिद्ध केलीं आहेत.

जी गोष्ट पांगारकरांची तीच थोड्याशा खालच्या पायरीवर श्री. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकरांची. हेहि भागवत संप्रदायाचे कट्टे अनुयायी व जुन्या कवींचे कट्टे अभिमानी असे लेखक असून त्यांच्या " महाराष्ट्र कविचरित्रा "चे प्रसिद्ध झालेले आठ भाग त्यांच्या दांडग्या उद्योगाची साक्ष देत आहेत. पांगारकरांच्या अंगचा अभिजात रसिकपणा व प्रेमळपणा यांच्या अंगीं अल्प प्रमाणांतच दृग्गोचर होत असला तरी शोधक बुद्धि व मार्मिकपणा या गुणांच्या बाबतींत ते पुष्कळशा मराठींतील विवेचकांस हार जाणार नाहींत. मराठी भाषेवर त्यांचें प्रभुत्व वाखाणण्याजोगें आहे. शुद्ध, जोरदार व प्रसादपूर्ण अशी यांची भाषा पाहून जुन्या कवींच्या वाणीचा प्रसाद खरोखरच त्यांच्यावर झाला आहे अशी खात्री पटते. साधुसंतांच्या चरित्रांतील चमत्कारांच्या खरेपणाविषयीं त्यांची खात्री असून त्यांचें ते आग्रहानें समर्थन करतात.

जुन्या कवींवर लिहिण्याचा मक्ता जुन्या पिढींतील भाविक अभ्यासकांकडेच दिलेला असून नव्या पिढींतील चिकित्सक अभ्यासकांचेंहि त्यांजकडे लक्ष आहे, ही गोष्ट श्री. रा. ग. हर्षे यांनीं तुकारामावर "चरित्रात्मक व विवेचनात्मक प्रबंध" ( १९३३ ) लिहून सिद्ध केली आहे. श्री. हर्षे यांच्या पुस्तकांत अभिनव असा अंश फारसा नसला तरी तुकारामाच्या व्यक्तित्वाचा विकास कसा होत गेला, हें चांगल्या रीतीनें दाखविलें आहे, यांत शंका नाहीं.

तुकारामाच्या अंतरंगाचा बोध घेण्याचा एक प्रयत्न या दृष्टीनें श्री. केशव सदाशिव केळकर यांचा 'श्री तुकाराममहाराज' हा ग्रंथहि उत्कृष्ट साधला आहे. त्यांतहि तुकारामाच्या अभंगांवरून त्याची आध्यात्मिक अवस्था कोणत्या वेळीं कशी होती याचा निर्णय करण्याचा प्रयत्न थोडया मार्मिक रीतीनें केलेला आहे. याशिवाय कृष्णराव अर्जुन केळुसकर व श्री. धुरंधर यांनींहि तुकारामाचीं चरित्रें लिहिलीं आहेत.

आधुनिक वाङ्मयसेवकांचीं विवेचनपर चरित्रें लिहिण्यास सुरुवात १८९० सालापासूनच झाली. अशा चरित्रांपैकीं बरींचशीं पूर्वीं उल्लेखिलीं आहेत. ग्रंथकर्त्यांच्या वाङ्मयकृतींचें विवेचन हाच ज्यांत प्रमुख अंश आहे अशा कांहीं चरित्रांचा मात्र येथें उल्लेख केला पाहिजे. अशा विवेचनपर चरित्रांची चांगलीशी पद्धति अद्याप आपल्याकडे रूढ झालेली नाहीं हें जें वर सांगितलें त्याचीं उदाहरणें म्हणजे श्री. वि. स. खांडेकर यांनीं लिहिलेलीं गडकरी व आगरकर यांचीं चरित्रें होत. वाङ्मयाच्या इतर शाखांमध्यें श्री. खांडेकर हे कितीहि उच्च स्थानीं तळपत असले तरी लेखनांत त्यांचा हात धरणारे पुष्कळच लेखक निघूं शकतील. त्यांनीं आपल्या गडकऱ्यांवरील ग्रंथांत व आगरकरांवरील प्रबंधांत चरित्र व वाङ्मयविवेचन अशी व्यक्तिचरित्राच्या दोन अंगांची फारकत केलेली असून व्यक्तित्वाचा विकास होत गेल्याचें हृदयंगम दृश्य त्यांस दोन्ही चरित्रांतून चांगल्या रीतीनें दाखवितां आलेलें नाहीं. वाङ्मयविवेचन या नात्यानें गडकऱ्यांवरील पुस्तक उत्तम आहे व मनोहर कल्पनाविलास, मार्मिक अर्थान्तरन्यास व उच्च बोधप्रदता इत्यादि त्यांच्या वर्णनशैलीचे गुण त्यांतहि दिसून येतात हें सांगावयास नकोच.

कु. वेणूबाई पानसे यांचें 'हरि नारायण आपटे यांचें चरित्र' हें १९३१ सालीं प्रसिद्ध झालें. तत्पूर्वींच आंबेकर यांचें संक्षिप्त चरित्र ( १९२२ ) व यांनींच प्रसिद्ध केलेलें 'ह. ना. आपटे यांच्या आठवणी व मनोरंजक प्रसंग' ( १९३१ ) हीं

प्रसिद्ध झालीं असून त्याशिवाय वाग्भट नारायण देशपांडे यांनीं आपलें " हरिभाऊ आपटे यांच्या आठवणी व कादंबऱ्या " हें विवेचनात्मक पुस्तक १९२४ सालीं प्रसिद्ध केलें होतें. या त्रोटक प्रयत्नांच्या मानानें पानशांचा प्रयत्न अर्थातच अधिक भरदार आहे. भाषा घरगुती तऱ्हेची परंतु रमणीय असून वर्णन इतक्या आत्मीयतेनें केलें आहे कीं, ठिकठिकाणीं वाचकाचें हृदय द्रवून गेल्याखेरीज राहत नाहीं. हरिभाऊ ही व्यक्ति खरोखर कशा तऱ्हेची होती याची यथातथ्य व पूर्ण कल्पना याच पुस्तका-वरून वाचकांस येते. या ग्रंथांतहि वाङ्मयविवेचन चरित्रापासून निराळें काढलें आहे व तें इतकें उत्कृष्ट वटलेलेंहि नाहीं.

परप्रांतीय वाङ्मयसेवकाच्या एका चरित्राचा उल्लेख येथेंच करणें उचित होईल. अण्णा विजापूरकरांचे चरित्रकार श्री. रा. गो. कानडे यांनीं " रविन्द्रनाथ टागोर, चरित्र आणि वाङ्मय " नांवाचें पुस्तक १९२६ सालीं प्रसिद्ध केलें. तें फार परिश्रमपूर्वक लिहिलें असून कविसम्राटांची चांगल्या तऱ्हेनें ओळख करून देतें.

वाङ्मयसेवकाचें विवेचनपर समालोचक चरित्र कसें लिहावें याचा उत्कृष्ट नमुना श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांच्या " चिपळूणकरां"वरील (१९२३) प्रबंधांत दिसून येतो. चरित्र व वाङ्मयविवेचन यांची फारकत यांत केलेली नसून चिपळूण-करांच्या व्यक्तित्वाचा विकास कसाकसा होत गेला आणि त्या व्यक्तित्वाचा आविष्कार वाङ्मयनिर्मित व इतर कृत्यें यांमध्यें कसकसा होत गेला हें सुंदर रीतीनें दाखविलें आहे. याची सुधारून वाढविलेली आवृत्ति नुकतीच प्रसिद्ध झाली असून तिच्या योगानें प्रस्तुत निबंधास मराठी विवेचनपर वाङ्मयांत अत्युच्च स्थान प्राप्त झालें आहे.

श्री. गं. दे. खानोलकर यांनीं ग्रंथकारांच्या चरित्रांसंबंधानेंच विशेष प्रशंस-नीय कामगिरी केली आहे. तिचा उल्लेख विवेचनाच्या ओघांत मागें येऊन गेलाच आहे. याखेरीज प्रो. ग. ह. केळकर यांचा 'लोकहितवादी 'वरील निबंध (१९२३), कै. कृ. ना. आठल्ये यांचें भरपूर माहिती उपलब्ध असूनहि असमाधान-कारक वठलेलें " लोकहितवादी चरित्र " (१९२६), श्री. दामोदर मोरेश्वर भट यांनीं भरपूर माहिती मिळवून मोठ्या परिश्रमानिशीं लिहिलेलें " वासुदेव वामनशास्त्री खरे, चरित्र व ग्रंथपरिचय " (१९२९) यांचा उल्लेख केला म्हणजे या विभागांत उल्लेख करण्याजोगे महत्त्वाचे ग्रंथ फारसे राहिले असतील असें वाटत नाहीं.

कोणीहि वाङ्मयसेवक निधन पावला असतां, किंवा महत्त्वाच्या प्रसंगीं अध्यक्ष स्थानापन्न झाला असतां त्याच्यासंबंधानें मासिकांमधून येणारे गौरवपर लेख

कित्येक वेळां चरित्र या नात्यानें वाचनीय असतात. याशिवाय 'प्रतिभा' पाक्षिकांत 'साहित्यकांच्या सान्निध्यांत' या सदराखालीं गेल्याच्या मागील वर्षीं निरनिराळ्या विद्यमान ग्रंथकारांवर लेख येत असत. त्यांपैकीं कित्येक चरित्रदृष्ट्या वाचनीय असत तर कित्येक व्यक्तिचित्रें या नात्यानें रमणीय वठले आहेत.

वाङ्मयाप्रमाणेंच ललितकलांपैकीं संगीत व नाट्य या दोन कलांची जोपासना आधुनिक कालांतील महाराष्ट्रानें बऱ्याच आस्थेनें केली आहे. त्यांपैकीं नाट्यकलेसंबंधाचें बरेंच वाङ्मयहि मराठींत निर्माण झालें असून त्यांत नांव घेण्यासारखीं चरित्रेंहि कित्येक आहेत ही भूषणास्पद गोष्ट आहे. याचें श्रेय नाट्यकलेस सर्वस्वीं वाहून घेतलेल्या श्री. शंकर बापूजी मुजुमदार व कै. अनंत वामन बर्वे या दोन व्यक्तींस आहे. "भाऊराव कोल्हटकर" (१९०१), "अण्णासाहेब किर्लोस्कर" (१९०४), रंगभूमींत प्रथम प्रसिद्ध झालेलीं अनेक महाराष्ट्रीय नाटककारांचीं व नटांचीं चरित्रें ही सर्व मुजुमदारांची कृति होय. हीं सर्व आपापल्यापरी चांगलींच असून मराठी चरित्रवाङ्मयांत यांचा दर्जा बराच वरचा ठरेल. यांखेरीज जोगळेकर, बालगंधर्व इत्यादि नटांचींहि कित्येक चरित्रें झालेलीं आहेत. विशेष विस्तृत असें श्री. लक्ष्मण नारायण जोशी यांनीं लिहिलेलें 'नटसम्राट गणपतराव जोशी यांचें चरित्र' (१९२३) असून तें वाचनीय झालें आहे. मुजुमदारांनीं इंग्रज नटश्रेष्ठ गॅरिक याचेंहि चरित्र लिहिलें आहे.

आधुनिक काळांत निर्भेळ धर्मभावना ही महाराष्ट्रांत कधींच विशेष प्रबळ नव्हती. सामान्य लोकांचा आचारप्रधान धर्म किंवा विचारी लोकांचा तत्त्वप्रधान धर्म या दोहोंपैकीं कोणत्याहि एका अंगाचे प्रभावशाली उपदेष्टे आपणांमध्यें आधुनिक काळांत निपजलेले दिसत नाहींत. अर्थात् व्यक्तिच नाहींत तर तशा प्रकारचीं चरित्रें तरी कशीं निर्माण होणार? कांहीं अंशीं भांडारकर व रानडे या व्यक्ति तशा मानितां येतील, परंतु त्यांच्या चरित्राच्या इतर बाजूहि महत्त्वाच्या असल्याकारणानें त्यांच्या चरित्रांचा उल्लेख यापूर्वी निराळ्या संदर्भांत केला आहे.

खास महाराष्ट्रीयांमधून धर्माचे व तत्त्वज्ञानाचे द्रष्टे किंवा उपदेष्टे निपजले नसले तरी हिंदुस्थानांतील इतर प्रांतांत निर्माण झालेल्या धर्मोपदेष्ट्यांच्या उपदेशाचा व कर्तृत्वाचा कांहींना कांहीं तरी परिणाम महाराष्ट्रीयांच्या मनावर होणें अपरिहार्यच होतें. अशा ज्या ज्या पुरुषांचा प्रभाव महाराष्ट्रीयांच्या मनावर विशेष झाला त्यांचीं त्यांचीं चरित्रें मराठींत निर्माण झालेलीं दिसून येतात. अशा पुरुषांपैकीं राजा

राममोहनराय हे पहिले व प्रमुख होत. त्यांचें चरित्र १८५८ सालीं, पुढें निघालेल्या प्रार्थनासमाजाचे एक अध्वर्यु, भास्कर हरि यांनीं लिहिलें असल्याचा दाखला सांपडतो. याच महापुरुषाचें चरित्र अलिकडे ( १९१५ ) श्री. बी. बी. केसकर यांनीं लिहिलें असून त्यास सुबोधपत्रिकाकार श्री. द्वा. गो. वैद्य यांनीं उपोद्घात लिहिला आहे. ब्राह्मधर्माचे त्यानंतरचे प्रख्यात आचार्य देवेन्द्रनाथ, केशवचंद्र सेन, शिवनाथशास्त्री, प्रतापचंद्र मुजुमदार, यांपैकीं कोणाचींहि म्हणण्यासारखीं चरित्रें मराठींत झालीं असल्याचें दिसत नाहीं. श्री. सदाशिव कृष्ण फडके यांच्या नवयुगधर्ममालेंत ब्राह्मधर्माचा इतिहास मात्र सविस्तर आलेला आहे.

यापेक्षां श्री. रामकृष्ण परमहंसदेव व त्यांचे शिष्य स्वामी विवेकानन्द यांच्या शिकवणुकीचा परिणाम महाराष्ट्रियांच्या मनावर विशेष झालेला दिसतो. श्री. रामकृष्णांसंबंधाचीं श्री. नागेश वासुदेव गुणाजी यांचें "श्रीरामकृष्ण" ( १९१२ ) व श्री. कृष्णाजी गोविंद किनरे यांचें "रामकृष्ण वाक्सुधा" ( १९१५ ) हीं दोन भाषांतरात्मक पुस्तकें त्यांच्या उपदेशामृताचें सिंचन करणारीं आहेत. त्यांचें विस्तृत चरित्र दोन खंडांमध्यें श्री. नरहर रामचंद्र परांजपे यांनीं लिहिलें असून तें वाचनीय आहे. विवेकानंदांचें लहानसें चरित्र ज्ञानमित्रपुस्तकमालेंत कृ. ना. आठल्ये यांनीं लिहिलें आहे. खेरीज कर्नाटक प्रेसनें प्रसिद्ध केलेल्या खंडामध्यें त्यांचें एक सुंदर चरित्र दिलें आहे. स्वामी रामतीर्थ यांचीं दोन चरित्रें झालीं आहेत. एक श्री. गोविंद प्रभाकर भावे यांचें ( १९२२ ) व दुसरें श्री. ना. बा. गुणाजी यांनीं स्वामींच्या लेखांच्या रूपांतरास उपोद्घात म्हणून लिहिलेलें.

श्री. रामकृष्णांच्या अभिनव वेदान्ताप्रमाणें श्रीदयानंदांच्या नववैदिक धर्मानेंहि महाराष्ट्रियांच्या मनांत, विशेषतः अलिकडच्या काळांत, थोडेंबहुत कुतूहल जागृत केलें आहे. हिंदुसंघटनेची कल्पना जोरानें पुढें आल्यापासून आर्यसमाजाच्या या बाबतींतील कार्याकडे पुष्कळांचें लक्ष लागलें व त्यामुळें आर्यसमाजाचे संस्थापक व पुढारी यांच्याविषयींची जिज्ञासा मनामध्यें उत्पन्न होऊन त्यांचीं चरित्रें निर्माण झालीं. श्री. सदाशिव कृष्ण फडके यांनीं आपल्या नवयुगधर्ममालेंत दयानंदांचें एक विवेचक चरित्र लिहिलें असून त्यानंतर त्यांनीं १९३१ सालीं "लाला लजपतराय अथवा नवयुगाचा पूर्वरंग" नांवाचें तितकेंच मोठें लजपतरायांचें चरित्र लिहिलें आहे. त्याच्यापूर्वीं श्री. उमाकान्त केशव आपटे यांचें "पंजाबकेसरी लाला लजपतराय" ( १९२९ ) हें छोटें पुस्तक झालेलें असून १९३१ सालींच भारतगौरवग्रंथमालेनें

लाला लजपतरायांचें आत्मचरित्र, त्यांच्या आयुष्याच्या अखेरपर्यंतची हकीकत त्यास जोडून, प्रसिद्ध केलें. लजपतरायांच्या चरित्राविषयींची जागृति ही जशी त्यांच्या मृत्यूमुळें झाली, तसेंच स्वामी श्रद्धानंदांचें चरित्रहि त्यांच्या भयंकर खुनामुळें जनतेचीं मनें क्षुब्ध झालेलीं असतांना निर्माण झालें. स्वामींचा खून ता. २६ डिसेंबर १९२६ रोजीं झाला व डॉ. रघुनाथ गणेश भोपे यांनीं लिहिलेलें त्यांचें चरित्र ६ मे १९२७ रोजीं प्रसिद्ध झालें. हें चरित्र आवेशयुक्त भाषेंत लिहिलें असून त्यांत स्वामींचा धीरोदात्त व प्रतापी जीवनवृत्तांत चटकदार रीतीनें कथन केला आहे.

आधुनिक धर्मोद्धारकांचीं चरित्रें याप्रमाणें नजरेखालीं घातल्यानंतर प्राचीन धर्मोद्धारक किंवा संप्रदायसंस्थापक यांचीं चरित्रें कितीशीं झालीं आहेत याचें जातां जातां निरीक्षण करणें इष्ट होईल. शंकराचार्यांचीं दोन तीन चरित्रें झालीं आहेत. त्यांपैकीं कृ. ना. आठल्ये यांनीं एक व हरि रघुनाथ भागवत यांनीं दुसरें लिहिलें असून “श्री. शंकराचार्य व त्यांचा संप्रदाय” (१९२३) हा श्री. महादेव राजाराम बोडस यांचा विवेचक प्रबंधहि या बाबतींत उल्लेखनीय आहे. मध्वाचार्यांचीं तीन चरित्रें झालीं असून तीं कृ. आ. गुरुजी, नरसिंहाचार्य गजेंद्रगडकर व श्री. रामचंद्र हयग्रीव व मणूरकर यांनीं लिहिलीं आहेत. श्री. चिं. वि. वैद्य यांनीं लिहिलेलीं श्रीरामचरित्र व श्रीकृष्ण चरित्र हीं आधुनिक अर्थानें चरित्र या सदरांत गणण्याजोगीं नसून पौराणिक ग्रंथांतच त्यांचा समावेश करावा लागेल.

स्वधर्मांतील उद्धारक व उपदेशक यांजविषयींचें चरित्रवाङ्मय जर इतकें अल्प आहे तर परधर्मीयांविषयींचें वाङ्मय कितीसें असणार? बौद्धधर्माविषयीं देखील चांगलीशी माहिती देणारीं पुस्तकें आपल्यांत नाहींत. गोविंद नारायण काणे, केळूसकर व प्रो. चिं. वि. जोशी यांनीं लिहिलेलीं गौतम बुद्धाचीं चरित्रें, वासुदेव गोविंद आपटे यांचें “बौद्धपर्व” व “अशोक”, वि. पां. नेने यांचा “सम्राट् अशोक”, श्री. धर्मानंद कोसंबी यांचें “बुद्धलीलासार-संग्रह” व प्रो. नारायण केशव भागवत यांचें “तेरा भिक्षुणी-रत्नें” एवढींच पुस्तकें या धर्माविषयीं चरित्र या नात्यानें उल्लेखनीय दिसतात. जैन धर्मासंबंधीं गुलाबराव रोडे यांनीं “महावीर-चरित्र” व श्री. तात्या नेमिनाथ पांगळ यांनीं “तीर्थंकर-चरित्रें” यांप्रमाणें कांहीं चरित्रपर वाङ्मय लिहून प्रसिद्ध केलें आहे. मुसलमानी धर्माविषयीं “महमद पैगंबर चरित्र” गोविंद नारायण काणे यांनीं लिहिलेलें, १९०१ सालींच प्रसिद्ध झालें होतें. अलिकडे श्री. एम. व्ही.

प्रधान या नांवाच्या गृहस्थांनीं "हजरत महंमद पैगंबर" (१९२९) नांवाचा विस्तृत ग्रंथ लिहिला असून तो पैगंबराचें चरित्र यथार्थपणें वर्णन करणारा असल्या-बद्दल बऱ्याच मौलवींनीं त्यावर दिलेला अभिप्राय त्यांत छापिला आहे. याच नांवाचें एक पुस्तक चालू सालीं सांगलीचे सय्यद अहंमद अमीन यांनीं लिहून प्रसिद्ध केलें आहे. श्री. मनोहर विष्णु काथवटे यांनीं "हजरत खलीफा उमर यांचें चरित्र" (१९३०) लिहिलें आहे. अशींच आणखी कांहीं तुरळक पुस्तकें झालीं असण्याचा संभव आहे. खिस्ती धर्माविषयीं पाहिलें तर मिशनऱ्यांनीं निर्माण केलेलें वाङ्मय पुष्कळच आहे. परंतु वाङ्मय या नांवाला खरोखर पात्र असा अंश त्यांत फारच थोडा निघेल. वाङ्मयदृष्ट्या वाचनीय असें एखादें देखील खिस्तचरित्र मराठींत नसावें (श्री. माटे यांचा छोटा निबंध वगळून), ही केवढी शोचनीय गोष्ट आहे. मार्टिन ल्यूथरचें एक चरित्र शंकर गोपाळ देशमुख यांनीं लिहिलेलें मराठींत झालेलें दिसतें. बाकी मिशनरी लिखाणखेरीज करून सर्व शुकशुकाट आहे.

एकंदरींत धार्मिक चरित्रांचा हा विभाग अवलोकन केला असतां मराठ्यांच्या धर्मजिज्ञासेचें दारिद्र्य चांगलेंच प्रत्ययास येतें. मोठमोठे शास्त्रज्ञ, कलावंत, लढवय्ये, सेनापति, मुत्सद्दी यांचीं चरित्रें मराठींत होत नाहींत याचें कारण, त्या त्या सदरांत पडणारे पुरुषच मुळांत आपल्या महाराष्ट्रांत—अलिकडच्या काळांत--उत्पन्न होत नाहींत, हें असल्याचें आपण पाहिलें. धर्माविषयीं बऱ्याच अंशीं तशीच स्थिति आहे. आतां, स्वराष्ट्रांतील नसतील, तर इतर राष्ट्रांतील निरनिराळ्या क्षेत्रांत विख्यातीस पावलेल्या पुरुषांचें जीवनवृत्तांत पाहण्याचा तरी हव्यास असावा; परंतु ती जिज्ञासा देखील आमच्यांत वसत नाहीं, असें मोठ्या कष्टानें म्हणणें भाग पडतें. ज्यांच्याविषयींची प्रचंड सामग्री आयती इंग्रजींत उपलब्ध आहे अशा बौद्ध, महंमदी व खिस्ती धर्माविषयीं जर ही कथा, तर ज्या धर्मांचे अनुयायी महाराष्ट्रांत पुष्कळ आहेत, पण ज्यांच्याविषयीं तयार सामग्री मात्र इंग्रजींत फारशी नाहीं अशा जैन, लिंगायत इत्यादि धर्मांची वास्तपुस्त कोण करणार ?

धर्मजिज्ञासेच्या बौद्धिक क्षेत्रांतून भाविकपणाच्या भावनामय क्षेत्रांत उतरा कीं, एकदम यक्षिणीची कांडी फिरल्यासारखा अद्भुत चमत्कार दृष्टोत्पत्तीस येतो. साधु, संत, बुवा, महाराज यांच्या चरित्रांची व लीलामृतांची एकच गर्दी असलेली दिसते. यांतहि दोन भिन्न विभाग कल्पितां येतात. एक पूर्वकालीन साधुसंतांचीं चरित्रें व दुसरा अर्वाचीन बुवामहाराजांचीं चरित्रें. प्रथम विभागांतील साधुसंत

हे बहुधा वाक्प्रभु असतात. त्यांचा उपदेश अमोलिक ग्रंथांच्या द्वारां अजरामर झालेला असतो व त्यांचें चरित्र हें खरोखरच दया, क्षमा, शांति यांचें निधान असतें. अशा पुरुषांचीं चरित्रेंहि पांगारकरांसारख्या भाषाप्रभूंनीं लिहिलीं असून त्यांचा मागें निराळ्या संदर्भात उल्लेखहि केला आहे. त्यांशिवाय माधवराव आप्पाजी मुळे यांचें "नामदेव चरित्र" (१८९३), रा. ब. द. ब. पारसनीस यांचें "नाभाजी" (१९०४), वामन दाजी ओककृत "नानक" व कृष्णाजी नारायण आठल्ये यांचें "समर्थांचें सामर्थ्य ऊर्फ रामदासस्वामींचा लीलानुग्रह" यांचा उल्लेख करावासा वाटतो. शेवटचें पुस्तक हें आठल्यांच्या रसाळ परंतु हरदासी थाटाच्या व तारतम्यहीन अशा लेखनपद्धतीचा एक उत्कृष्ट नमुना आहे.

पूर्वकालीन साधुसंतांकडून अर्वाचीन बुवामहाराजांकडे वळलें असतां काय प्रकार दिसेल याचें वर्णन प्रस्तुत लेखकास अनुभवाभावामुळें करणें शक्य नाहीं. तथापि येथें भाविकांची भीड फारच पडलेली दिसते आणि त्यांतून चरित्रगान करणारे कित्येक लेखकहि अहमहमिकेनें पुढें येतात, असें आढळतें. अशा लेखकांनीं निर्माण केलेल्या लीलामृतांचा परामर्ष येथें घेण्याचा मानस नाहीं. याचा अर्थ, अशा लेखकाचें लिखाण यच्चयावत् टाकाऊ असतें, असा मात्र नव्हे. पारमार्थिकदृष्ट्या बुवामहाराजांची योग्यता काय असेल ती असो. वाङ्मयदृष्ट्या त्यांचीं कांहीं चरित्रें मराठींतील चरित्रांचा मामुली दर्जा लक्षांत घेतां, बऱ्याच उच्च योग्यतेचीं ठरतील हें निःसंशय आहे. प्रस्तुत लेखकाच्या वाचनांत या लेखांपैकीं "रामानंद महाराज बीडकर यांचें चरित्र" (ले. लक्ष्मण गणेश बापट) हें एक या बाबतींत उदाहरण म्हणून देतां येईल. चरित्रनायकाचें व्यक्तित्व सुंदर रीतीनें व्यक्त करणारें अद्भुतरसपूर्ण व कादंबरीपेक्षांहि मनोरंजक असें चरित्र कसें असूं शकतें याचा नमुना चरित्रलेखकांस या पुस्तकावरून मिळण्याजोगा आहे.

कांहीं अंशीं देशाभिमान व स्वजनगौरव, परंतु मुख्यत्वेंकरून जिज्ञासा किंवा कुतूहल या वृत्तीनें प्रेरित होऊन परप्रांतीयांचीं जीं चरित्रें लिहिण्यांत आलीं आहेत, त्यांचा त्रोटक रीतीनें परामर्श घेऊन पुढें जाऊं. धार्मिक भावनेनें निर्माण झालेल्या राममोहन राय, दयानंद, लजपतराय इत्यादिकांच्या चरित्रांचा मागें उल्लेख केला आहेच. त्यांखेरीज निर्भेळ कुतूहलबुद्धीनें निर्माण झालेलीं अशीं परप्रांतीयांचीं चरित्रें अक्षरशः हाताच्या बोटांवर मोजण्याजोगींच आढळतात. यावरून जिज्ञासेचा आमच्या ठिकाणीं कसा शोचनीय अभाव आहे, हें प्रत्ययास येतें. करसनदास

मूळजी—प्रसिद्ध गुजराथी सुधारक, पंडित अयोध्यानाथ—सुप्रसिद्ध संयुक्तप्रांतीय पुढारी, राजा सर टी. माधवराव—मुत्सद्दी, चुनीलाल सरैया—प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ, अशा कांहीं व्यक्तींचीं त्रोटक चरित्रें पंचवीस तीस वर्षांपूर्वी झालेलीं आढळतात. श्री. वामन विश्वनाथ जोशी यांनीं 'ग्रंथमाला' मासिकांत लिहिलेला "पुनर्विवाहप्रवर्तकाचा वृत्तांत" (१९०५) व श्री. पांडुरंग सदाशिव साने यांनीं लिहिलेलें छोटें परंतु सुंदर "ईश्वरचंद्र विद्यासागर" (१९२७) हीं दोन्ही एकाच पुरुषाचीं चरित्रें होत.

प्रो. ना. सी. फडके यांनीं लिहिलेलें "दादाभाई नौरोजी चरित्र" (१९२०) त्यांच्या कामगिरीची यथार्थ कल्पना आणून देणारें आहे. चित्रशाळेनें अलिकडे परप्रांतीय विख्यात पुरुषांचीं कांहीं लहान लहान चरित्रें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांपैकीं श्री. राजाराम प्रल्हाद कानिटकर यांनीं "मोतीलाल नेहरू" (१९३१) व "रवीन्द्रनाथ टागोर" (१९३२) हीं दोन लिहिलेलीं दिसतात व श्री. रामकृष्ण गोपाळ भिडे यांनीं "जवाहिरलाल नेहरू" (१९३०), "सुभाषचंद्र बोस" (१९३१) व "पंडित मदनमोहन मालवीय" (१९३२) हीं तीन चरित्रें लिहिलीं आहेत. त्यांतल्या त्यांत श्री. भिडे यांचीं चरित्रें अधिक सरस वाटतात. श्री. पुरुषोत्तम बाळकृष्ण कुळकर्णी यांनीं चित्तरंजन दास यांचें चरित्र लिहिलें आहे. महात्मा गांधींचीं चरित्रें पुष्कळच झालीं आहेत. परंतु त्यांपैकीं सौ. अवंतिकाबाई गोखले यांचें (१९१९), सीताराम केशव दामले यांचें (१९२४), व सीताकांत यांचें (१९३४), हीं प्रमुख होत. व हीं सर्व चांगल्या रीतीनें लिहिलीं आहेत. अलिकडे गांधींनीं गुजराथींत लिहिलेल्या आत्मचरित्राचें 'सत्याचे प्रयोग अर्थात् आत्मकथा' या नांवानें भाषांतर झालें आहे. तें ज्या काळापर्यंत लिहिलें आहे तेवढ्यापुरतें तें इतर सर्व चरित्रांना मागें सारतें, हें साहजिक आहे.

आणि आत्मचरित्र हाच आपल्या विवेचनांतील शेवटचा गोड घास होय. मराठींत आत्मचरित्रें थोडींच आहेत. परंतु तीं सर्व गोड व मूल्यवान् आहेत. याचें कारण हेंच कीं, तीं सर्व प्रांजळ मनाच्या मनुष्यांनीं आपलें अंतःकरण उघड करून दाखविण्याकरितां लिहिलीं आहेत. पाश्चात्य देशांतील लहानमोठे लोक आत्मचरित्रें पुष्कळ लिहितात, परंतु तीं पुष्कळदां इतकीं निरपेक्ष व शुद्ध हेतूंनीं लिहिलेलीं नसतात. आधुनिक सार्वजनिक आयुष्यांतील, आंत एक बाहेर एक, ही वागण्याची पद्धत आत्मचरित्रास पुष्कळ वेळां बाधते व प्रांजलपणाच्या दृष्टीनें त्याची किंमत कमी

करते. हा सार्वजनिक आयुष्यांत सर्वसामान्य असलेला दुटप्पीपणा आपल्या भाषेंतील आत्मचरित्रांना फार करून बाधलेला नाहीं, ही मोठ्या आनंदाची गोष्ट होय.

विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनीं आपल्या वेदोक्तधर्मप्रकाशाच्या आवृत्तीस जोडलेला स्वतःचा जीवनवृत्तांत ( १८५९ ), हेंच बहुधा आधुनिक मराठींत पहिलें आत्मचरित्र होय. हें अगदीं त्रोटक, जेमतेम ४।५ पानें भरतील इतकें आहे. त्यांत त्यांनीं आपण सप्तशृंगीच्या डोंगरावर जाऊन अध्यात्मचिंतन व तपश्चर्या केल्याची व तदनंतर आपणास साक्षात्कार झाल्याची हकीकत कथन केली आहे. बाबा पदमनजींचा ' अरुणोदय ' हें त्यांचें खिस्ती धर्म स्वीकारीपर्यंतचें आत्मचरित्र असून तें फार वाचनीय आहे, असा सर्वांचा अभिप्राय आहे. सुप्रसिद्ध व्याकरणकार दादोबा पांडुरंग यांनीं लिहिलेलें आत्मचरित्र १९२७-२८ सालीं ' विविधज्ञानविस्तारां'तून अंशतः प्रसिद्ध झालें. हें अत्यंत निष्कपट भावनेनें व प्रेमळ अंतःकरणानें लिहिलेलें असून सहज-सुंदर व नितान्तरमणीय असें बठलेलें आहे. हें दादोबांनीं १८७१-७२ च्या सुमारास लिहिलें असावें असा प्रो. पोतदारांचा तर्क आहे. खिस्तलोकवासी पंडिता रमाबाई यांनीं आपला इंग्लंडचा प्रवास व युनायटेड स्टेट्सचा प्रवास या दोन्ही पुस्तकांत आत्मचरित्रात्मक मजकूर बराच लिहिला आहे.

यानंतर १९०७ सालीं लिहिलेल्या व १९१० सालीं प्रसिद्ध झालेल्या रमाबाई रानडे यांच्या " आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी " ह्या निरुपम ग्रंथापर्यंतचा काळ आपला सुनाच जातो. खुद्द " आठवणीं "ना देखील चरित्र म्हणावें कीं आत्मचरित्र म्हणावें याचा थोडा प्रश्नच पडतो. हें चरित्र न्यायमूर्तींचें कीं रमाबाईंचें ? परंतु या प्रश्नाचा निकाल पुस्तकाच्या नांवानेंच सुंदर रीतीनें केला आहे. या " आमच्या " आयुष्यांतील आठवणी आहेत असें रमाबाई म्हणतात. " आमच्या " दोघांचें आयुष्य एकच. अर्थात् एकरूप झालेल्या आयुष्यांतील या आठवणी असल्यामुळें त्या जितक्या परीनें माधवरावांच्या चरित्राचें कथन करणाऱ्या तितक्याच परीनें रमाबाईंच्या भूमिकेचें दिग्दर्शन करणाऱ्या झाल्या आहेत.

मराठी भाषेंत या पुस्तकाला तोड नाहीं. केव्हांहि, कोठेंहि या पुस्तकांतील कोणतेंहि पान उघडा, त्यांतील मोहक वर्णनशैलीचे पाश आपल्या मनावर पडून आपलें मन त्या ओघानें वाहत जाणार नाहीं असें होणारच नाहीं. आपल्या पतीच्या जीवनांत रमाबाई इतक्या तन्मय झाल्या होत्या कीं, स्वतःचें वेगळें असें व्यक्तित्व त्यांस राहिलेंच नव्हतें. माधवराव हेच

त्यांचे ‘ स्वतः ’ म्हणजे आत्मा झाले होते. माधवरावांच्या चरित्राचें खरें मर्म या पुस्तकाच्या योगानें मनांत ठसतें. त्यांच्या आयुष्याचा विशाल चित्रपट या पुस्तकांत जितक्या हृदयंगम रीतीनें चित्रित केलेला दिसून येतो तितका त्यांच्या मोठ्या चरित्रांतूनहि दिसून येत नाहीं. “ पत्नीनें पतीच्या सेवेस वाहून घेऊन त्यांतच धन्यता मानावी हा जो हिंदुस्थानांतील स्त्रियांचा विशेष मनोधर्म त्याचें अत्यंत मोहक स्वरूप या पुस्तकांत दिसून येत आहे ” असें जें प्रस्तुत ग्रंथाच्या प्रस्तावनेंत गोपाळराव गोखल्यांनीं म्हटलें आहे तें तर यथार्थ आहेच. परंतु तेवढेंच नव्हे, माधवराव-रमाबाई ही पतिपत्नींची जोडी नव्हती, ती देवभक्तांची जोडी होती. भक्तानें आपलें जीवन देवाच्या जीवनांत विरून टाकलें होतें. परंतु देवरूपी असूनहि मानवी व्यक्तीचा जिवंतपणा ‘ आठवणीं’तील माधवरावांच्या अंगीं पूर्णपणें भरलेला दिसतो. यांत प्रत्ययास येत असलेलें रानड्यांचें देवत्व व सर्वगुणसंपन्नत्व दूषणीय वाटत नाहीं, तर उलटें रमणीयतेंत भर घालणारें असेंच वाटतें, अशी कांहीं विलक्षण जादू या पुस्तकांत भरलेली आहे. श्री. लक्ष्मीबाई टिळक यांचीं आजवर प्रसिद्ध झालेलीं स्मृति-चित्रेंहि अशींच सरस वठलीं आहेत.

श्री. धोंडो केशव कर्वे यांचें आत्मवृत्त (१९१५) हेंहि मराठी भाषेंतील एक रत्न आहे. आपल्या स्वतःचें हुबेहूब प्रतिबिंब आत्मवृत्तांत पाडण्यामध्यें अण्णासाहेबांनीं फार चांगलें यश मिळविलें आहे. धर्मानंद कोसंबी यांचें “ निवेदन ” (१९२४) तितकेंच प्रांजळ असून अधिक अद्भुत व चमत्कृतिपूर्ण आहे. त्यांत त्यांनीं बौद्ध-धर्माचें ज्ञान करून घेण्यासाठीं केलेले विलक्षण प्रयत्न व त्यासाठीं हाल सोसून नेपाळ, ब्रह्मदेश व सीलोन यांत केलेला प्रवास यांची अद्भुत हकीकत दिली आहे. भारतीय साम्राज्यकर्ते नारायण भवानराव ऊर्फ नाना पावगी यांचें “ आत्मवृत्त ” (१९२४) हें दुसऱ्या एका दृष्टीनें अद्भुत आहे. स्वतःविषयींचा अभिमान तारतम्यशून्य रीतीनें व्यक्त करण्याची या ग्रंथकारास खोड असल्यामुळें त्यांनीं स्वतःच्या सर्टिफिकेटांनीं व स्वतःच्या ग्रंथांवर आलेल्या अभिप्रायांच्या उताऱ्यांनीं आपल्या आत्मवृत्ताचा बहुतेक भाग भरून टाकला आहे. बाकी त्यांनीं स्वतःच्या खाजगी जीवनक्रमाचें शेवटच्या एका प्रकरणांत जें वर्णन केलें आहे, विशेषतः त्यांत स्वतःच्या पत्नीचें जें चित्र रेखाटलें आहे, तें रम्य व मनास चटका लावणारें आहे. श्रीमती पार्वतीबाई आठ-वले यांची “ माझी कहाणी ” ( १९२६ ) व सीताराम गणेश देवधर यांचा “ जीवनवृत्तांत ” ( १९२७ ) हीं पुस्तकेंहि वाचनीय आहेत. श्री. गोविंद

चिमणाजी भाटे यांची " प्रेम कीं लौकिक " कादंबरी आत्मचरित्रपरच आहे. आत्मचरित्रास कादंबरीचें स्वरूप दिल्यामुळें चरित्रस्वरूपाच्या प्रांजळपणास बाध आणणारी अशी फिरवाफिरव त्यांना सहज करितां आली आहे, व त्यामुळें ज्या खऱ्या नाहींत अशा कित्येक गोष्टी खऱ्याच आहेत असें वाचकांस वाटूं लागतें. कादंबरीच्या बुरख्याआड दडण्याचें श्री. भाटे यांस वस्तुतः कांहींच कारण नव्हतें. उघडपणें आपलें आत्मचरित्र लिहिणें हें त्यांस अधिक श्रेयस्कर झालें असतें.

मराठींत आत्मचरित्रें लिहिणाऱ्यांपैकीं बहुतेकजण सुधारकपंथांतील आहेत, असें वरच्या आढाव्यावरून आपणांस सहज दिसून येईल. आत्मचरित्र म्हणजे अप्रत्यक्षतः केलेलें आत्मसमर्थनच होय, असें म्हणण्यांत येतें. हें जर खरें धरलें तर सुधारकच या खटाटोपांत कां पडले असावे याचें अनुमान सहज होतें. रूढ मताहून वेगळ्या रीतीनें वागणाऱ्यासच " मीं केलें तें किती उत्कृष्ट केलें " असें सांगून आत्मसमर्थन करण्याची पाळी येणार. आणि सुधारक हे अशा कोटींतीलच पुरुष होत, हें कोणास सांगावयास नको.

श्री. विनायक दामोदर सावरकर यांचें " माझी जन्मठेप " (१९२७) हें त्यांच्या कारावासांतील जीवनाचें संकलित वर्णन होय. हें मराठींतील आत्मचरित्रांचा मेरुमणिच होय. अद्भुत, भीषण व रोमांचकारी अशी ती सत्यकथा सावरकरांच्या ओजस्वी व धीरोदात्त वाणींतून आविर्भूत झाल्यामुळें अधिकच परिणामकारक झाली आहे. सावरकरांची प्रतिभा व त्यांचें कर्तृत्व त्या कारागृहांतहि इतकें प्रभावशाली झालेलें पाहून हृदय धन्यतेनें भरून येतें व गात्रें रोमांचित होतात.

परभाषांतील निवडक आत्मचरित्रांचीं कांहीं सुंदर भाषांतरेंहि लक्षांत घेण्याजोगीं आहेत. बेंजामिन फ्रांकलिन याच्या आत्मचरित्राचें भाषांतर फार वर्षांपूर्वीं (१८७१) रामचंद्र गोविंद करंदीकर यांनीं केलें होतें. त्यानंतर चाळीस वर्षें तशींच गेलेलीं दिसतात. सुप्रसिद्ध नीग्रो पुढारी बुकर टी. वाशिंगटन याच्या Up From Slavery या नांवानें प्रसिद्ध झालेल्या आत्मचरित्राचें भाषांतर श्री. नागेश वासुदेव गुणाजी यांनीं केलें व तें " आत्मोद्धार " या नांवानें 'मनोरंजना'-च्या काशीनाथ रघुनाथ मित्रांनीं (१९१३) प्रसिद्ध केलें. आपल्या उत्तर आयुष्याचें निवेदन त्यानें My Larger Education या पुस्तकांत केलें होतें, त्याचेंहि श्री. गुणाजी यांनींच केलेलें भाषांतर 'माझें व्यापक शिक्षण' (१९१६) या नांवानें प्रसिद्ध झालें. हीं दोन्हीं पुस्तकें बोधप्रद म्हणून अत्यंत वाचनीय आहेत.

कविसम्राट् रवीन्द्रनाथ टागोर यांच्या ‘ जीवनस्मृती’चें भाषांतर श्री. गोखले यांनीं केलें आहे. तें अर्थातच काव्यमय आहे. बंगाल्यांतील क्रांतिकारकांच्या कटाचा रोमांचकारी वृत्तान्त देणारें बाबू उपेन्द्रनाथ बंदोपाध्याय यांचें ‘ निर्वासितेर आत्मकहानी ’ या पुस्तकाच्या हिंदी भाषांतरावरून मराठींत श्री. शंकर दिनकर करंदीकर यांनीं भाषांतरित केलेलें “ राजनैतिक कारस्थान ( खंड १, २ )” हें पुस्तकहि अद्‌भुतरसपूर्ण अतएव वाचनीय आहे. लाला लजपतराय यांचें आत्म-चरित्र व गांधीजींचें ‘ सत्याचे प्रयोग ’ यांचा उल्लेख पूर्वी केला आहेच.

आपलें मराठी चरित्रवाङ्मयाचें समालोचन येथें संपलें. या समालोचना-पासून निष्कर्ष काय निघतो याची कल्पना मधून मधून व्यक्त केलेल्या अभिप्रायां-वरून व सामान्य विधानांवरून वाचकांस थोडीबहुत होईलच. तथापि स्पष्टपणें व ठळकपणें लक्षांत येण्यासाठीं तो निष्कर्ष स्वतंत्र रीतीनें सरते शेवटीं कथन करणें इष्टच होईल.

दोन प्रकारच्या दोषांनीं आमचें चरित्रवाङ्मय खुरटविलें आहे. जिज्ञासा किंवा निरपेक्ष कुतूहलबुद्धि या अत्यंत उन्नतिकारक वृत्तीचा आम्हांमध्यें फारसा मागमूस नाहीं. उत्कृष्ट चरित्रनिर्मितीस हीच वृत्ति प्रोत्साहक होत असते. जिज्ञासे-मुळेंच मनुष्याची दृष्टि व्यापक व विशाल होते. तो आपल्यापुरतें पाहण्याचें सोडून चौफेर नजर फिरवूं लागतो. आमच्या वाङ्मयांतील सर्व चरित्रें आमच्या भावना-त्मकतेमुळें निर्माण झालीं आहेत. देशभक्तीची भावना, पूर्वजगौरवाची व स्वजन-गौरवाची भावना, नाहींतर पारमार्थिक भाविकपणा अशा कांहीं विशिष्ट भावना ज्यांच्या बुडाशीं नाहींत अशीं चरित्रें आपल्यांत फारच अल्प आहेत, हें आपण पाहिलेंच आहे. या भावना अनिष्ट आहेत असें नव्हे. त्या इष्ट व मनुष्यस्वभावास अनुसरूनच आहेत. परंतु मनुष्याची, विशेषतः मानवसमाजाची, उन्नति होण्यास नुसत्या भावनाच पुरेशा नाहींत. मनाच्या इतर वृत्तींचाहि यथायोग्य परिपोष झाला पाहिजे. अशा वृत्तींपैकीं जिज्ञासावृत्ति ही प्रमुख होय. ही वृत्ति, खरोखर पाहिलें असतां १८९० च्या पूर्वीच्या काळीं आपल्यांत बऱ्याच प्रमाणांत उदित झाली होती. परंतु १८९० नंतर स्वत्वाभिमानाची वृत्ति जशी बळावत चालली तशी तिच्या दडपणामुळें, जिज्ञासावृत्ति क्षीण होऊं लागली असें दिसतें. अगदीं अलीकडे, गेल्या दहा वर्षांत, ही जिज्ञासावृत्ति वाढीला लागण्याचें थोडेंबहुत चिन्ह दिसत आहे. परंतु यापेक्षां फारच जोरानें ही वृत्ति फोफावली पाहिजे. तरच आपलें

चरित्रवाङ्मय समृद्ध होईल. युरोप-अमेरिकेंतील शास्त्र, कला, इतिहास, राजकारण, समाजकारण, तत्त्वज्ञान, वाङ्मय इत्यादि अनेक क्षेत्रांत प्रसिद्धीस आलेल्या शेंकडों-हजारों पुरुषांचीं चरित्रें तर राहोतच. खुद्द आपल्या हिंदुस्थानांतील परप्रांतीय पुरुषांच्या चरित्रांचें प्रमाण देखील आपल्या वाङ्मयांत किती अल्प आहे, याचें दिग्दर्शन वर केलेंच आहे. ही शोचनीय स्थिति नाहींशी होण्यास निर्मेळ कुतूहलबुद्धीचा आमच्यांत विकास झाला पाहिजे. कोणकोणच्या पुरुषांच्या चरित्रांचा आपल्या समाजास किती व कसा उपयोग होईल, याची चिंता करीत बसणाऱ्यांना खरोखर उपयोग कशाचाच व्हावयाचा नाहीं. स्वतःच्या जिज्ञासेची तीव्र भूक भागविण्याकरितां दिसेल तें जो ओरबाडीत सुटला आहे त्याचा जठराग्नि शक्तिमान् राहून त्याच्या सुदृढतेला जरूर ते पोषक रस त्यांतून पुरविल्याखेरीज तो कधीं राहणार नाहीं.

कुतूहलबुद्धीच्या अभावामुळें आमची दृष्टि संकुचित झाली आहे, हा एक दोष सांगितला. दुसरा दोषहि कुतूहलबुद्धीच्या अभावामुळेंच निर्माण झालेला आहे. निरपेक्ष कुतूहलबुद्धि नसल्यामुळें प्रत्येक मनुष्याच्या जीवनापासून बोध काय घ्यावयाचा, या दृष्टीनें आपण त्याच्याकडे पाहतों. बोध किंवा उपदेश किंवा धडा घेण्याची दृष्टि, यासारखी चरित्रलेखनास अपायकारक दुसरी कोणतीहि दृष्टि नाहीं. अशा दृष्टीनें प्रेरित झालेला मनुष्य चरित्रनायकामध्यें बोध घेण्याजोगें काय आहे, एवढेंच पाहणार व तेवढ्याचेंच वर्णन करणार. म्हणजे तो मनुष्याचें एकांग पाहणार, सर्वांग मनुष्याचें दर्शन त्यास घडणार नाहीं. चरित्रनायकाचे गुण तेवढेच वर्णन करावे, हें मत अशाच एकांगी दृष्टीमुळें निर्माण होतें. परंतु केवळ बोधावरच लक्ष ठेवणाऱ्या दृष्टीचे परिणाम एवढ्यावरच थांबते तरी बरें होतें. बोध किंवा सद्‌गुण तेवढेच पाहावयाचे असा संकल्प करून चालू लागलेल्या दृष्टीला नसतील तेथेंहि गुण दिसूं लागतात व हळूहळू चरित्रनायकाच्या ठायीं सर्वगुणसंपन्नता पाहण्यापर्यंत तिची मजल जाते. म्हणजे, व्यक्तीचे दोष वगळून असलेले सद्‌गुण तेवढेच वर्णन करावयाचे, यानंतर व्यक्तीच्या अंगीं नसलेले सद्‌गुणहि तीस ओढून ताणून चिकटवावयाचे व सरतेशेवटीं तिला सर्वगुणसंपन्न बनवावयाचें, अशा पायऱ्यांनीं चरित्रलेखकाची अधोगति होत जाते.

गौरवबुद्धीनें प्रेरित झालेल्या चरित्रकाराचीहि नेमकी हीच दशा होते. यासाठीं तो दोष झाकून ठेवूं लागतो, पुढें न कळत, वा कळत नसलेल्या

गुणांचा आरोप करूं लागतो व एकदां ही प्रक्रिया सुरू झाल्यावर सर्वगुणसंपन्नते-पर्यंतची मजल गांठण्यास त्यास फारसा अवकाश लागत नाहीं.

खऱ्या चरित्रकाराच्या अंगीं निरपेक्ष कुतूहलबुद्धि बाणली पाहिजे. उच्च दर्जाचा कादंबरीकार ज्याप्रमाणें एखादी जिवंत भूमिका निर्माण करून तिच्याशीं समरस होतो, त्याप्रमाणें चरित्रकाराच्या अंतश्चक्षूसमोर चरित्रनायकाचें जीवन जिवंत-पणानें खेळत राहून त्याची दृष्टि त्या जीवनाशीं तन्मय झाली पाहिजे. असें केव्हां होईल ? तर चरित्रनायकाचें सर्व जीवन त्यांतील गुणदोषांसह व खाचाखोंचांसह जिवंत असें चरित्रनायकाच्या अंतःकरणांत ठसेल तेव्हां. एखाद्या व्यक्तीच्या जीवनाचीं कांहीं अंगें छाटून टाकलेलीं असल्यास खऱ्या कलाविदास त्या भग्न मूर्तीशीं तन्मय होतांच येणार नाहीं.

आणि म्हणूनच आपल्या भाषेंतील चरित्रांत खरा जिवंतपणा बहुतकरून आढळून येत नाहीं. कारण आमच्यांतील बहुतेक चरित्रें बोधग्रहणपर दृष्टीनें किंवा गौरवबुद्धीनें लिहिलीं गेलीं आहेत. ज्या व्यक्तीची व्यसनाधीनता जिवंतपणीं जगजाहीर होती ती चरित्रांत अगदीं प्रतिष्ठित व निर्व्यसनी बनलेली आपल्यास दिसते, उलाढाली व कारस्थानें करण्यांत जिचा जन्म गेला ती व्यक्ति चरित्रांत मोठी साळसूद बनलेली आपणांस आढळते, स्त्रीविषयक अत्याचारांत जो अनेक रोगांचें माहेर होऊन बसला अशाच्या रोगग्रस्ततेबद्दल त्याच्या ( खरोखरी नसलेल्या ) उद्योगीपणास जबाबदार धरण्यांत येतें, असे चमत्कार चरित्रांत जर घडून येत असलेले दृष्टोत्पत्तीस येतात तर तीं त्या व्यक्तींचीं खरीं चरित्रें कशीं म्हणावीं ? खरीं व्यक्तिचित्रें पाहण्याची संवयच नसल्यामुळें आम्ही इतके असहिष्णु बनलों आहों कीं, खरें बोलणाऱ्याच्या पाठीशीं ' लायबेल'च्या फिर्यादीचा धाक नेहमीं असतो. अर्थात् खरें सांगण्याची इच्छा असलेला लेखकहि यामुळें भ्याड बनतो.

मानवी व्यक्तीकडे पाहण्याच्या या आमच्या चुकीच्या दृष्टिकोनामुळें चरित्र-लेखनांत आणखी कित्येक कृत्रिम प्रकार निर्माण होतात. बहुतेक चरित्रांमध्यें स्वभाववर्णनासाठीं किंवा गुणदोषविवेचनासाठीं शेवटीं एक प्रकरण निराळें राखून ठेवण्यांत येतें. पुष्कळशा चरित्रांमध्यें चरित्रनायकाच्या खासगी आयुष्यक्रमाच्या वर्णनाकरितां असेंच एक स्वतंत्र प्रकरण देण्यांत येतें. त्याहूनहि हास्यास्पद प्रकार म्हणजे चरित्रनायकाच्या कर्तृत्वाचे तुकडे पाडून ' वाङ्मयात्मक कामगिरी ', ' राज-कारणांतील कामगिरी ', ' धंद्यांतील कौशल्य ' अशा सदरांखालीं ते निरनिराळ्या

प्रकरणांमधून वर्णन करण्यांत येतात. व्यक्तिजीवनाचे असे निरनिराळे खंड कसे पडूं शकतील, याचा कोणीहि विचार करीत नाहीं. व्यक्तीचें खासगी व निरनिराळ्या क्षेत्रांतील सार्वजनिक जीवन हें क्रियाप्रतिक्रियांनीं परस्परांत इतकें गुंतलेलें असतें, किंबहुना एकजीव झालेलें असतें कीं, त्याचे असे खंड पाडूं पाहणें म्हणजे कृत्रिमतेची पराकाष्ठा होय. व्यक्तीच्या जीवनाचें वर्णन एकजिनसी, एखाद्या कादंबरीप्रमाणें स्वाभाविक ओघानें वाहणारें, असेंच झालें पाहिजे. त्याचप्रमाणें स्वभावाचें व गुणदोषांचें तरी मागाहून स्वतंत्र प्रकरणांत वर्णन करण्याची काय जरूरी आहे? व्यक्तिजीवनाचें, हेतूंच्या व मनोवृत्तींच्या उद्घाटनासह मार्मिक रीतीनें चित्रण केलें म्हणजे त्यावरून त्या व्यक्तीचे गुणदोष आपोआपच व्यक्त होणार नाहींत काय? असें होत असेल तर तें व्यक्तीचें खरें जिवंत चरित्र; बाकीचीं ईजिप्तमध्यें मसाला भरून ठेवलेल्या 'मर्मी' सारखीं 'निर्जीव कलेवरें' होत.

परंतु अशीं जिवंत चरित्रें निर्माण करण्यास कादंबरीकारासारखी कलादृष्टि व व्यक्तींच्या जीवनाशीं समरस होऊन त्यांचें रहस्य ओळखण्याची शक्ति अंगीं पाहिजे. ही बऱ्याच अंशानें अभ्याससाध्य आहे. नुसती सामग्री जमवून लगेंच चरित्रलेखनास सुरुवात न करतां बराच काळ विचारांत, चिंतनांत व व्यक्तिजीवनाचें परिपूर्ण आकलन करण्यांत घालविला पाहिजे. चरित्रनायक आपल्या स्वभावगुणांस अनुरूप अशा रीतीनें आपणाशीं चालत-बोलत आहे, आपण त्याच्या संगतीनेंच वागतों आहों असा भास होईल, इतक्या कोटीला तन्मयता जाऊन पोंचावी म्हणजे मग चरित्रलेखनाचा परिपाक कसा उतरेल हें सांगण्यास भविष्यवादी नको. मग तुम्ही प्लुटार्कसारख्या सारासारविवेचनयुक्त चरित्रकथनाच्या पद्धतीचें अवलंबन करा, बॉस्वेलप्रमाणें नाट्य-सदृश चटकदार प्रसंगांच्या वर्णनांची माळ गुंफा, लिटन-स्ट्राचीप्रमाणें व्यक्तिजीवनाचा धांवता चित्रपट रेखाटा अगर लुडविगप्रमाणें हेतु व परिस्थिति यांच्या विश्लेषणासह जीवनाचें चित्र रेखाटा. पद्धतीची बाब महत्त्वाची नाहीं आणि ती प्रत्येक व्यक्तीच्या उपजत वृत्त्यनुसार आपोआप निर्णित होणारी आहे. मुख्य प्रश्न दिशा व दृष्टिकोन यांच्या संबंधींचा आहे. व्यक्तिजीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन सुधारला व चरित्रलेखनाची दिशा वर वर्णन केलेल्या तत्त्वानुसार बदलली म्हणजे जगाच्या वाङ्मयांत मानास्पद ठरावी अशी हृदयंगम निष्पत्ति चरित्रशाखेमध्येंहि होऊं लागण्यास फारसा उशीर लागणार नाहीं.

---

८

# मराठी इतिहास व इतिहाससंशोधन

## ( विहंगमनिरीक्षण )

[ लेखकः—प्रो. दत्तो वामन पोतदार, बी.ए. ]

एका दृष्टीनें प्रस्तुत विषयाला विशेष महत्त्व आहे. महाराष्ट्रांत गेल्या शतकांत झालेल्या विशेष कामगिरीविषयीं विचार केला तर असें म्हणावें लागेल कीं, महाराष्ट्रांत इतिहास-संशोधनाच्या क्षेत्रांतच कांहीं टिकाऊ स्वरूपाचें व इतरत्र न झालेलें असें काम झालें व होत आहे. ही जी अभिमानास्पद, अखंड आणि महनीय अशी कार्यपरंपरा महाराष्ट्रांत निर्माण झाली तिचा धांवता आढावा या लेखांत घेण्याचें योजिलें आहे.

ज्याला इतिहाससंशोधन असें आपण मराठींत म्हणत असतों तो ज्ञानाचा आणि शोधाचा प्रकार स्थूल रूपानें जरी फार प्राचीन आहे असें म्हणतां येईल तरी त्याचें हल्लींच्या युगांतील जें विकसित स्वरूप दृष्टीस पडत आहे त्या स्वरूपांत त्याचा अवतार पाश्चात्य लोकांच्या संशोधनानेंच हिंदुस्थानांत झाला असें म्हणावयास चिंता नाहीं. एखादा कल्हण किंवा एखादा इब्न-खाल्दून् याच्याकडे बोट दाखवून या विधानांतील सत्य बाधित करतां येण्यासारखें नाहीं. इतिहासाला पांचवा वेद मानण्याची प्रथा फार जुनी आहे. तथापि काळाच्या कोष्टकांत सर्व घटितें ( फॅक्ट्स ) पक्कीं बसवून मानव समाजाच्या कर्तृत्वाचें मंदिर यथार्थ रीत्या पाहणें हें जें इतिहासाचें

मुख्य कार्य तें, कालक्रमाचें अनुसंधान जर सुटलें तर, साधूं शकत नाहीं. पाश्चात्य राष्ट्रांत कित्येक हजार वर्षांपासून आमच्यापेक्षां अधिक सत्यतेनें व निश्चितीनें हें मानवदर्शन तिकडील विद्वान् घेत आले आहेत आणि कालक्रमाचें अनुसंधान सुटल्यामुळें आमचे इकडील विद्वान् व्यर्थ चाचपडत राहून भलतीकडेच वाहवले आहेत. पाश्चात्य व प्राच्य यांच्यामध्यें असलेले इस्लामी विद्वान् पाश्चात्यांपेक्षां कमी परंतु प्राच्यांपेक्षां किंचित् अधिक प्रमाणांत इतिहासदृष्टी आहेत.

## डफूचें युग

आपल्या मराठ्यांचा इतिहास घेतला तर त्याची रचना खुद्द मराठी राज्य भरभराटींत असतांना केवळ व्यापाराच्या मिषानें आलेल्या कित्येक पाश्चात्यांनीं करून ठेवलेली आढळते. ग्रँट् डफ्ला मराठ्यांचा पहिला इतिहासकार समजतात, पण त्याच्याहि पूर्वी मराठ्यांचा इतिहास लिहिणारे, स्प्रेंगेल् (१७९१) हा जर्मन् आणि स्कॉट् वेअरिंग् ( १८१० ) हा इंग्रज, असे इतिहासकार होऊन गेलेले आहेत. अनुषंगानें ज्यांच्या ग्रंथांवरून आपणास मराठ्यांच्या इतिहासाविषयीं कांहीं माहिती मिळवितां येईल असे ग्रंथ तर, मराठी फौजा हिंदुस्थानभर दौडत असतांना, पाश्चात्य देशांतील मुद्रणालयांतून शेकडों बाहेर पडले होते. अनेक पाश्चात्य प्रवासी, व्यापारी व नोकर अशा लोकांनीं हें लिखाण लिहिलेलें आहे. घटितांचें वर्णन कालक्रमानुसार मानवी पद्धतीनें करण्याचे प्रयत्न पुष्कळांनीं या ग्रंथांतून केलेले आहेत. तशा तऱ्हेचे प्रयत्न आमच्याकडे मराठी राज्यांत झालेले नाहींत.

कैफियती, बखरी, करीने, कुळकटें, व महजरें यांतून घराण्यांच्या संबंधानें किंवा इतर घटितांसंबंधानें कालक्रमवार कांहीं टिपणें सांपडतात. पण याहिपेक्षां मोठें आणि संबद्ध असें विरचन बखरींतून आढळतें. बहुतेक मराठी बखरी पेशवाईच्या उत्तरार्धांत लिहिलेल्या ठरतात. शेवटचे सातारचे छत्रपति प्रतापसिंह महाराज यांनीं इंग्रजांची पद्धत उचलून त्या नमुन्यावर पुष्कळ सुधारणा करण्याचें आरंभिलें होतें. खुर्ची-टेबल मांडून नियमितपणें कामकाज करण्याचा हव्यास त्यांनीं धरिला होता; नवीन नवीन नियम व शिरस्ते बांधून देण्याची सुरुवात केली होती; युद्धाचे नवीन व्यूह रचिले होते, व नकाशे तयार केले होते. यांतच माधवराव मुनशीसारख्या पुरुषा-कडून आरायेश-ए-महफील् यासारख्या ग्रंथांचीं सभारंजनीप्रमाणें. मराठींत भाषांतरें करण्याचा उपक्रम त्यांनीं केला होता. मल्हार रामराव चिटणीस हेहि बहुतकरून हें नवीन वारें लागल्यामुळेंच आपल्या बखरी लिहिण्यास प्रवृत्त झाले असावे.

या चिटणीशी बखरी म्हणजे आपले प्रारंभींचे इतिहास म्हणून समजले जात असत. चिटणीसांच्या या बखरींत ऐतिहासिक शास्त्रीय ग्रंथामध्यें जे गुण असावे लागतात, ते नाहींत. तथापि रसाळ कथा या दृष्टीनें कोणतीहि चिटणीशी बखर वाचावीशी वाटते. अर्थात् चिटणीस लिहीत होते त्या वेळीं रावबाजींचें नांव पेशवे या नात्यानें कसेंबसें चालत होतें व छत्रपतीहि आपलीं बिरुदें थोडीं तरी मिरविण्यास समर्थ होते; म्हणून हे सर्व बखरी लिहिण्याचे प्रयत्न इंग्रजी अमलाच्या पूर्वीच्या काळांत जमा धरावे लागतात.

इंग्रजी अमलाच्या सुरुवातीला मराठी इतिहासाला एक इंग्रज इतिहासकार लाभला. त्याचें नांव ग्रँट् डफ्. कैक वर्षेपर्यंत याचा History of the Mahrattas हा ग्रंथ केवळ इंग्रजच नव्हे तर हिंदुस्थानांतील नेटिव्ह सुद्धां प्रमाणभूत मानीत. यामुळें या ग्रंथाची मागणी पुरविण्यासाठीं याच्या कित्येक आवृत्त्या काढाव्या लागल्या आहेत. ग्रँट् डफ्च्या बरोबरीनें प्रिन्सेप्, टॉड् वगैरे इतिहासकर्ते उत्तर हिंदुस्थानांत आपआपल्या विषयांचा इतिहास लिहिण्याविषयीं खटपट करीत होते. ग्रँट् डफ्ला मराठ्यांचा इतिहास लिहिण्यासाठीं निदान सातारचीं तरी साधनें सुलभ होतीं. शिवाय इतर ठिकाणचेहि कागदपत्र ग्रँट् डफ्च्या पाहण्यांत आले होते.

ग्रँट् डफ्नें आपल्याकडून मेहनत चांगली केली आणि जरी त्याचा इतिहास हल्लींच्या मानाला चालण्यासारखा नाहीं, तथापि पहिला प्रयत्न, आणि तोहि मराठ्यांच्या प्रतिपक्षांतील एका लष्करी माणसानें केलेला, म्हणून जर त्याकडे पाहिलें तर ग्रँट् डफ्चें कोणीहि कौतुकच करील. खुद्द महाराष्ट्रांत देखील बरींच वर्षें ग्रँट् डफ्चाच इतिहास प्रमाण मानण्यांत येत असे. ग्रँट् डफ्च्या इतिहासाचीं भाषांतरें व सारांश पुढें लवकरच मराठींत प्रसिद्ध झाले. कप्तान केपिन व बाबा साने यांनीं तयार केलेलीं हीं भाषांतरें शिळा छापावर छापलेलीं (१८२९) अद्याप जुन्या घराण्यांतून संग्रह करून ठेवलेलीं सांपडतात. इंग्रजीवरून भाषांतर केल्याकारणानें अशा पुस्तकांतून बांदल देशमुखाचे 'बंडाळ देशमुख' असे अपभ्रंश केलेले आढळतात. हे अष्टागरांतील भाषांतरकर्ते मावळ व देशभागांतील घराण्यांशीं, त्यांच्या नांवांशीं व इतिहासाशीं अपरिचित होते. डफ्, एल्फिन्स्टन् किंवा माल्कम् यांनीं आपले इतिहास-ग्रंथ इंग्रजीमध्यें लिहिले परंतु आपल्याकडील विद्वानांनीं शाळांसाठीं त्यांचीं नुसतीं भाषांतरें केलीं. यापलीकडे त्यांनीं फारसे श्रम केले नाहींत. प्राचीन इतिहासाचें किंचित् संशोधन बाळशास्त्री जांभेकर व भाऊ दाजी यांनीं केलें, परंतु शिवकाल

किंवा पेशवाईकाल यांकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. पेशवे दप्तराची व्यवस्था प्रथम कमिशनरकडे व नंतर अमानतदारांच्या मार्फत चालत आली होती. परंतु त्या दप्तराचा इतिहासदृष्टीनें कांहीं विशेष उपयोग या वेळीं करून घेण्यांत आला नाहीं.

अशीं कांहीं वर्षे गेलीं. शिक्षणप्रसार वाढत राहिला. इंग्रजी शाळा निघाल्या. महाविद्यालयें निघालीं. विद्यापीठें स्थापण्याचा विचार सरकारनें कायम केला. मुंबई विद्यापीठाच्या पहिल्या पदवीधर मंडळींतील महादेव गोविंद रानडे व त्यांचे सहाध्यायी कीर्तनेबंधू यांनीं मात्र मराठ्यांच्या इतिहासाचें अध्ययन निराळ्याच रीतीनें केलें आणि नीळकंठराव कीर्तने यांनीं आपणांस पंख फुटतात न फुटतात तोंच, ग्रँट् डफ्‌चा ग्रंथ अपुरा व अधुरा आहे असें धीटपणें डेक्कन् कॉलेजांत प्रतिपादन ( १८६७ ) केलें. याचा परिणाम विद्वान् लोकांच्यावर बराच झाला. सामान्य लोक, जुने घरंदाज लोक व विद्वान् शास्त्री वगैरे लोक, यांचें इतिहासाकडे दुर्लक्ष्यच होतें. इंग्रजी शिकलेले सुशिक्षित लोक या ग्रंथाकडे थोडें जास्त लक्ष देत असावे. स्प्रेंगेल्, स्कॉट् वेअरिंग् व ग्रँट् डफ् या तिघांनीं ग्रंथांत आधार देण्याचा प्रशंसनीय प्रयत्न केला आहे. नीलकंठराव कीर्तन्यांच्या पूर्वी एक वर्ष (१८६६) भिडे यांचा शिळेवर छापलेला अष्टप्रधानांचा इतिहास तयार झाला. या लेखकास परंपरागत बरीच माहिती अवगत असावी असें दिसतें. कारण ते पंतसचिव यांच्या निसबतीस होते. विष्णुपंत भिडे यांनीं आपला हा ग्रंथ साताऱ्याच्या दप्तरांतील माहितीवरून लिहिला, असें स्पष्ट म्हटलें आहे. सातारा राज्य खालसा झालें त्या निमित्तानें रंगो बापूजी वगैरे मंडळी विलायतेस गेली होती व त्यांनीं सातारा राज्याच्या विशेषतः या शेवटच्या घालमेलीबद्दल कैफियतीदाखल थोडाफार मराठी मजकूर प्रसिद्ध केलेला आढळतो. याहि पूर्वी सरकारी 'हैंद शिक्षा मंडळी'च्या प्रसिद्धिपत्रकांत शिकंदरनामा, ऑर्मूचा इतिहास, ऐने अकबरी वगैरे ग्रंथांचीं भाषांतरें करून घेण्याचा इरादा प्रकट केलेला होता. परंतु ती उमेद तेथेंच जिरली.

## बखरींचें युग

### काव्येतिहाससंग्रह

या सर्व लिहिण्याचा इत्यर्थ इतकाच कीं, इंग्रजी अंमल सुरू होऊन पांचपन्नास वर्षे लोटलीं तरी सुद्धा ग्रँट् डफच्यापुढें फारशी मजल गेली नाहीं. कीर्तने यांच्या टीकेपासून इतिहासविषयाच्या विचारास मराठींत नवी कलाटणी मिळाली;

आणि दाजीसाहेब सरंजामे यांनीं लिहिलेला अलिजाबहादुर शिंदे यांचा इतिहास किंवा विष्णु गोविंद भिडे यांचा अष्टप्रधानांचा इतिहास असे दोनच ऐतिहासिक ग्रंथ उल्लेख करण्याजोगे असे या काळांत तयार झाले. लोकहितवादी यांना ऐतिहासिक गोष्टी जमा करण्याचा नाद प्रथमपासूनच होता. परंतु इतिहासक्षेत्रांत पहिली जोराची जागृति निबंधमालेंत विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं लिहिलेल्या 'इतिहास' या निबंधावरूनच झाली. त्यापूर्वी विविधज्ञान-विस्तारांत कांहीं ऐतिहासिक माहिती प्रसिद्ध होत असे. भाईसाहेब गुप्ते यांनींहि 'कायस्थ प्रभूंच्या इतिहासाचीं साधनें' प्रसिद्ध केलीं होतीं. चिपळूणकर यांना शालिग्राम, साने आणि मोडक अशा मंडळींचें साहाय्य मिळून "काव्येतिहाससंग्रह" जन्मास आला (१८७८). इतिहास-संशोधनाचा खरा ठसठशीत आरंभ या 'काव्येतिहास-संग्रहा'नेंच झाला. साने यांनीं कसोशीनें संपादन केलेल्या मराठ्यांच्या बखरी या मासिकांत प्रसिद्ध होऊं लागल्या. यामुळें इतिहासाविषयीं पुष्कळ माहिती मिळून गोडीहि लागली. साने यांचें संपादन फार उच्च दर्जाचें झालें आहे. त्यांत चालढकल नाहीं. टीपा, शुद्धाशुद्ध इत्यादि सर्व गोष्टींविषयीं साने यांनीं फारच मेहनत घेतली आहे. त्यांत दोषच काढावयाचे झाले तर मुख्यतः इतिहास-संशोधनाची शास्त्रीय बाजू आणि इतर भाषांतील माहितीची भाषापरिचयाभावीं कोताई असे दोन दाखवितां येतील. पेशव्यांची बखर, भाऊसाहेबांची बखर, चिटणिसांची बखर वगैरे उत्कृष्ट बखरी 'काव्येतिहाससंग्रहां'तच प्रसिद्ध झाल्या. लोकांच्या मनांत निबंधमालेपासून नवीन क्रांति होऊं लागली होती; आणि स्वदेश, स्वभाषा आणि स्वधर्म यांविषयींचा अभिमान वाढूं लागला होता. आपलें तें सर्व वाईट, असें म्हणण्याचा मागचा काळ जाऊन त्याच्या उलट प्रतिक्रिया सुरू झाली होती; आणि आपलें तें आपलें, या अभिमानाची वृत्ति फोफावूं लागली होती. अशा वेळीं आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाचीं रसभरित वर्णनें ज्यांत केलीं आहेत अशा बखरी प्रसिद्ध होऊन वाचण्यांत आल्यामुळें लोकांच्या भावनांना अधिक जोर चढला व व्याख्यानांतून, कीर्तनांतून, पुराणांतून आणि कवनांतून या अभिमानाचें वारें सर्वत्र जोरानें खेळूं लागलें. नाटकांची प्रथा आपल्याकडे याच वेळीं जोरानें वाढीस लागत होती. तेथेंहि शिवाजी किंवा बाजीराव-मस्तानी अशा विषयावर नाटकें व लहानमोठ्या कादंबऱ्या रचण्यांत येऊं लागल्या. एवंच ग्रँट् डफनें इतिहास लिहिल्यानंतर चाळीस वर्षांत जेवढी जागृति झाली नव्हती तेवढी जागृति पौराणिक पद्धतीनें लिहिलेल्या या चटकदार

बखरवाङ्मयाच्या प्रसिद्धीनें अवघ्या दहा पंधरा वर्षांत झाली आणि अद्यापहि त्या वाङ्मयाचा असा परिणाम होतच आहे.

काव्येतिहाससंग्रहामध्यें जरी पुष्कळसें बखर-वाङ्मयच प्रसिद्ध झालें आहे तरी बखरींचें युग संपून कागदपत्रांचें युग जें पुढें सुरू झालें त्याचा किंचित् आरंभ 'काव्येतिहाससंग्रहां'तच झाला. बखरींच्या बरोबरच शोधकांकडून जुने कागदपत्र पुढें येऊं लागले. हळुहळू या पत्रांचें महत्त्व मनांत भरूं लागल्यानें काव्येतिहास-संग्रहकर्त्यांनीं पत्रें, यादी वगैरे नांव देऊन पत्रव्यवहाराचा एक संकीर्ण खंड प्रसिद्ध केला. तेथून सुरुवात होऊन पुढें आज, पत्रव्यवहारांतहि तत्कालीन आणि पश्चात्कालीन असे भेद पडून, तत्कालीन अथवा समकालीन पत्रव्यवहाराचा शोध व प्रसिद्धी या कामांत आपण आतां नुकतेंच कोठें गुंतलों आहोंत !

काव्येतिहाससंग्रहाच्या प्रसिद्धीमुळें कित्येक हौशी व जिज्ञासु शोधक मंडळीस प्रोत्साहन मिळालें. या मंडळीपैकीं सुदैवानें रा. काशिनाथ कृष्ण लेले हे आजहि विद्यमान आहेत आणि धार दरबारच्या इतिहासलेखनाचें काम दरबारच्या प्रोत्साहनानें, ऐशीं वर्षे उलटून शरीर भुईला लागावयास लागलें तरी, करीत आहेत ही खरोखरच फार कौतुक वाटण्याजोगी गोष्ट आहे. पत्रें, यादी वगैरेंतील कित्येक अस्सल पत्रें रा. लेले यांनीं मिळवून पाठविलीं होतीं. रा. लेले यांच्या-प्रमाणेंच कै. कृष्णाजी विष्णु आचार्य या सातारा जिल्ह्यांतील शिक्षकानें बरीच माहिती मिळवून प्रसिद्ध केली. तिसरे पैठणचे कै. भगवंतराव तोडेवाले. चौथे रा. वीरमाडकर. या व इतर अशा मंडळींचें काव्येतिहाससंग्रहाच्या किंबहुना एकंदर शोधकाच्या कार्यांत चांगलें साहाय्य होत असे. कै. शंकर तुकाराम शाळिग्राम हे पोवाडे जमविण्याचें काम करीत. परशुरामपंत तात्या गोडबोले व छुकले यांचा 'सर्वसंग्रह' ( १८६० ) किंवा त्यापूर्वीचा 'ज्ञानचंद्रोदय' ( १८३८ ) यांतून जुन्या मराठी कवींच्या कवितेचें प्रसिद्धीकरण चालू असे. तो उपक्रम कमी अधिक प्रमाणांत चालूच राहिला. 'काव्येतिहाससंग्रह' बंद पडल्यावर मग कित्येक दिवस 'काव्यसंग्रह' या नांवानें जुनी मराठी कविता प्रसिद्ध होत राहिली.

सुमारें बारा वर्षे उत्कृष्ट कार्य करून 'काव्येतिहाससंग्रह' बंद पडला. तथापि त्यानें एकदां पेटविलेली ज्योत कांहीं विझली नाहीं. मिरजेचे वासुदेव-शास्त्री खरे यांच्या ठिकाणीं मूळचीच रसिकता व स्वाभिमान जागृत होता. पुणें सोडून मिरजेस जावें लागल्यावर एक सद्भाग्याचा योगच म्हटला पाहिजे

कीं, त्यांचें लक्ष मळा-दप्तराकडे म्हणजे पटवर्धन दप्तराकडे गेलें. नाना फडणवीस यांच्या चरित्राकडे खरे शास्त्री यांचें लक्ष जाऊन त्यांनीं त्या विषयावर एक नवीन पुस्तक प्रसिद्ध केलें. नवीन म्हणण्याचें कारण यापूर्वीं कॅप्टन् मॅग्डोनल्ड् यानें नानांचें एक सचित्र चरित्र प्रसिद्ध केलें होतें. त्याचा अनुवादहि मराठींत झाला होता (१८५२). शास्त्रीबोवांनीं नानांचें चरित्र लिहितांना मराठी कागदपत्रांचा उपयोग केला हें विशेष होय. नाना फडणवीसांचा विषय हा लोकांचा आवडता व भक्तिरसास पोषक असा विषय होता. चित्रशाळेनें आरंभीं त्यांचें चित्र प्रसिद्ध केलें हेंच त्याचें एक गमक.

मुंबई युनिव्हर्सिटींतून बाहेर पडलेली ग्रॅजुएट लोकांची जी पहिली चौकडी, त्यांपैकीं महादेव गोविंद रानडे व विठ्ठल नारायण पाठक यांना मराठी इतिहासाचा चांगला नाद होता. पैकीं रानडे हे मराठी इतिहासाचे द्रष्टे आचार्य या कोटींत पडण्याजोगे आहेत. रानडे यांच्या सहाध्यायांपैकीं कीर्तने बंधू यांनाहि मराठी इतिहासाचा चांगला नाद होता. पैकीं नीलकंठराव कीर्तने, ज्यांनीं ग्रँट् डफच्या इतिहासावर पहिली मराठी टीका प्रसिद्ध केली, त्यांनींच शिवाजी महाराजांचें सप्तप्रकरणात्मक चरित्र म्हणजे चिटणीशी बखर छापून प्रसिद्ध केली होती. या बखरीप्रमाणें त्यांनीं इतरहि बखरी जमा केल्या होत्या. विनायकराव कीर्तने यांनीं माल्कमच्या Memoirs of Central India च्या आधारें मध्य हिंदुस्थानचा इतिहास मराठींत प्रसिद्ध केला आणि एवढ्यावरच पुढें हा इतिहासविषय जवळ जवळ सोडून दिल्यासारखा केला. माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीवर यांनीं लिहिलेलें सुरस नाटक अद्यापिहि वाचण्यासारखें आहे.

## पेशवे दप्तरांत पहिला प्रवेश

माधवराव रानडे यांचें मात्र इतिहासावरील लक्ष्य केव्हांच उडालें नाहीं किंवा कमी झालें नाहीं. मराठ्यांच्या इतिहासाला अतिशय उपयोगी पडणारी अशी अपरंपार सामग्री पेशवे दप्तरामध्यें अवश्य सांपडली पाहिजे, ही गोष्ट माधवराव यांनीं उत्तम प्रकारें ओळखिली होती. आणि म्हणून पेशवे दप्तरांतील सामग्री तपासण्यास मिळून तिची प्रसिद्धी व्हावी, या प्रयत्नांतहि ते मनापासून लक्ष घालीत असत. पेशवेदप्तर हातीं येतांच त्याची व्यवस्था चॅपलिन् साहेबांच्या कमिशनरींत अगदीं आरंभींच लावण्यांत आली होती. पुढें दप्तर सरकारानें देशी अमानतदारांच्या हवाली केलें. त्यानंतर कर्नाटकांत गाजलेले गॉर्डन्‌साहेब हे येऊन

दप्तरांत नेटिव्हांचा प्रवेश त्यांनीं बंद केला असें म्हणण्यास हरकत नाहीं. इनाम कमिशनचे एक अधिकारी म्हणून लोकहितवादी रावबहादुर गोपाळराव हरी देशमुख यांचा कांहीं संबंध दप्तराशीं राहिला. तथापि एकंदरींनें लोकहितवादी-सारख्या इतिहासप्रिय, जिज्ञासु व परिश्रमी* गृहस्थाचा सरकारी नोकरीच्या निमित्तानें पेशवे दप्तराशीं जो संबंध आला त्याचा म्हणण्यासारखा फायदा संशोधनाच्या कार्यास झाला नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय. या घटनेचा सर्व वृत्तांत आज उपलब्ध नाहीं. तथापि पेशवे दप्तर यानंतर जें लोकदृष्टीआड झालें आणि सरकारी कडीकुलपांत जाऊन बसलें तें परवां परवांपर्यंत तसेंच पक्कें बसून राहिलें !

## कागदपत्रांचें युग

अशा बंदोबस्तांत अडकून राहिलेल्या पेशवे दप्तरांत प्रवेश मिळविण्याची खटपट डेक्कन् व्हर्न्याक्युलर् ट्रान्सलेशन् सोसायटीच्या मार्फत त्या सभेचे अध्यक्ष डॉ. भांडारकर हे असतांना रावबहादुर महादेव गोविंद रानडे यांच्या वजनानें व सूचनेनें करण्यांत आली. काथवटे-साने-प्रभृति विद्वान् सरकारी सेवकांच्या द्वारें तपासणी करण्याची ही जी खटपट सुरू होती ती यशस्वी होण्याच्या वेळीं रोज दप्तरांत जाऊन सूचनेप्रमाणें तपासणी करील असा एक तरुण मनुष्य कै. दादासाहेब करंदीकर यांच्या शिफारशीनें सोसायटीस मिळाला. हेच कै. रावबहादूर दत्तात्रय बळवंत पारसनीस होत. खुद्द सरकारानें दप्तरांतील इतिहासोपयोगी माहिती निवडून काढण्यासाठीं कै. रावबहादुर गणेश चिमणाजी वाड यांची नेमणूक केली होती. या सर्व खटाटोपांतून पेशवे रोजनिशींतील माहितीचे १४।१५ खंड, वाड व पारसनीस यांच्या नांवें प्रसिद्ध झाले. पुढें पारसनीस यांना कै. पुरुषोत्तम विश्राम मावजी शेट या मराठ्यांच्या इतिहासाच्या अभिमानी अशा श्रीमान् भाटिया गृहस्थांचें साहाय्य मिळालें आणि मावजी व पारसनीस यांच्या नांवानें आणखी कांहीं तसले खंड प्रसिद्ध झाले.

## पारसनीस

पेशवे दप्तरामध्यें पारसनीस यांनीं जें एकदां पाऊल टाकलें तें आपल्या अंगच्या अनेक गुणांनीं सरकारी अधिकाऱ्यांची मर्जी सुप्रसन्न ठेवून अखेरपर्यंत कायम ठेविलें. सुमारें पंचवीस तीस वर्षांच्या या अवधींत पारसनीस यांनीं सुमारें आठ दहा हजार पत्रें निवडून नकलवून ठेविलीं. त्यांच्या हाताखालीं कांहीं फारशी

* 'शतपत्रीं'त रावबहादुर लोकहितवादींचा पेशवे दप्तराबाबत एक वाचनीय लेख प्रसिद्ध झालेला आहे.

माणसें नव्हतीं व स्वतः ते पुण्यास सतत राहूं शकत नसत. रोजनिशींतून व इतर कांहीं दप्तरांतून निवडलेले कित्येक कागद मागें सांगितल्याप्रमाणें डेक्कन् व्हर्न्याक्युलर् ट्रान्स्लेशन् सोसायटी व मावजी शेट या उभयतांच्या मेहनतीनें छापून निघाले. तथापि रावबहादुर पारसनीस यांनीं मावजी शेट यांच्या मदतीनें सातारकर राजे आणि नाना फडणवीस यांच्या वंशजांकडून बरेच महत्त्वाचे कागद व वस्तु विकत ( ? ) घेववित्या होत्या. आणखीहि कित्येक ऐतिहासिक घराण्यांतून माहिती जमा केली होती. या माहितीचा उपयोग पुढें पारसनीस यांनीं 'इतिहास-संग्रह' नांवाचें मासिक पुस्तक कित्येक वर्षें चालवून त्यांत केला. 'इतिहास-संग्रह' हें नांवावरून पाहिलें तर 'काव्यसंग्रहा'चें भावंड व 'काव्येतिहाससंग्रहा'चेंच अपत्य ठरतें. सहा सात वर्षांच्या अवधींत या मासिक पुस्तकांतून दिल्ली वगैरे ठिकाणचीं राजकारणें, महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, पेशव्यांच्या धुमे, सेवकराम वगैरे परराष्ट्रीय वकिलांचे पत्रव्यवहार व अनेक प्रकरणांतील लहानमोठीं महत्त्वाचीं पत्रें, स्फुटें, चित्रें वगैरे अशी मनोरंजक माहिती पारसनीस यांनीं प्रसिद्ध केली. अगदीं आरंभीं पारसनीस यांनीं डेक्कन् व्हर्न्याक्युलर् ट्रा. सोसायटीच्या खटपटीनें 'भारतवर्ष' या नांवाचें ऐतिहासिक पुस्तक सुमारें दोनतीन वर्षें चालवून त्यांत कांहीं उपयुक्त कागदपत्रें व कांहीं ऐतिहासिक विवेचनपर लेख प्रसिद्ध केले. तसेंच धावडशीकर ब्रह्मेंद्रस्वामी यांच्या चरित्रासह फार महत्त्वाचा जुना पत्रव्यवहार स्वतंत्रपणें प्रसिद्ध केला. यांत बाजीराव, चिमाजी अप्पा, स्वतः ब्रह्मेंद्रस्वामी, आंग्रे वगैरे अनेक मुत्सद्यांचीं व वीरांचीं शेंकडों अस्सल पत्रें आहेत. असा पत्रव्यवहार आपल्या रसाळ प्रस्तावनेसह प्रसिद्ध करून पारसनीस यांनीं इतिहाससंशोधक म्हणून आपल्या आयुष्याची पहिली कीर्ति केली. याच सुमारास पारसनीस यांनीं झांशीच्या सुप्रसिद्ध लक्ष्मीबाई या संग्रामशूर आणि उज्ज्वलचारित्र्य राणीची जीवनकथा आपल्या प्रौढ भाषेंत वर्णन करून सांगितलेली होती. अद्यापहि हें चरित्र पुनर्मुद्रित करण्यासारखें आहे. पारसनीस साताऱ्यास कांहीं दिवस म्हणजे आपल्या साहित्यिक जीवनाच्या प्रारंभींच्या काळांत 'महाराष्ट्र कोकिळ' नांवाचें मासिक चालवीत असत. त्यांतहि त्यांची इतिहासप्रीति स्पष्ट दिसून येते.

रावबहादुर पारसनीस यांनीं A Note on the Sangli State, Poona in By-gone Days आणि Mahabaleshwar अशीं कांहीं पुस्तकें इंग्रजींतून प्रसिद्ध केलीं होतीं. ग्वाल्हेरचे कै. श्रीमंत माधवराव महाराज यांच्या आज्ञेनें ग्वाल्हेर

रियासतीच्या उपयोगाचे व प्रायशः नाना फडणवीस यांच्या मेणवली दप्तरांतून निवडलेल्या कागदपत्रांचे पांच खंड पारसनीस यांनीं खास महाराजांसाठीं छापून दिले. आतां ते निराळे मिळण्याची सोय झाली आहे. दक्षिणच्या इतिहासाला उपयोगी पडेल असें पुष्कळ मुद्रित परंतु दुर्मिळ ग्रंथसाहित्य रा. ब. पारसनीस यांनीं श्रमपूर्वक आपल्या बहुमोल ग्रंथालयांत एकत्रित केलें होतें. त्यांना विलायतेस जाण्याचा योगहि आला होता. तिकडे दुर्मिळ ऐतिहासिक पुस्तकें विक्रीस निघालीं असतां तीं मिळविण्याचा त्यांचा सतत प्रयत्न असे. त्याचप्रमाणें रावबहादुर यांनीं हातांनीं काढलेल्या जुन्या रंगीत कलमी चित्रांचा अपूर्व संग्रह केला होता. त्यांचें बहुतेक आयुष्य सातान्यास गेलें. सातान्याचा त्यांस फार अभिमान असे आणि मराठ्यांच्या या जुन्या राजधानींत एक मोठें संग्रहालय स्थापून त्यांत आयुष्यभर खटपट करून मिळविलेला आपल्या जवळील संग्रह लोकोपयोगासाठीं लावून ठेवावा अशा प्रकारची योजना आंखून ती सिद्धीस नेण्यासाठीं आपल्या आयुष्याचीं अखेरचीं बरींच वर्षें पारसनीस झगडत होते. त्यांचा हा अखेरचा प्रयत्न बऱ्याच अंशीं सिद्धीस गेला असें म्हणण्यास हरकत नाहीं. रावबहादूर पारसनीस हे सुमारें १० वर्षांपूर्वी वारले. महाराष्ट्रीय इतिहास-संशोधकांत त्यांचें नांव मोठें आहे आणि त्यांनीं जमा केलेली व प्रसिद्ध केलेली सामग्री अफाट आहे. पारसनीस यांची वाणी अत्यंत मधुर असल्यामुळें ते आपल्या वाणीनें लोकांवर ताबडतोब मोहिनी पाडीत. इतिहास-संशोधनाचा रूक्ष व्यवसाय करून रुबाबदारीनें जीवितयात्रा सफल करणारा पारसनीस यांच्यासारखा दुसरा कोणीहि पुरुष महाराष्ट्रांत झाला नाहीं, असें म्हणण्यास चिंता नाहीं. त्यांनीं एका दृष्टीनें आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे.

### खरेशास्त्री

इ. स. १८९५ ते १९०० पर्यंत महाराष्ट्रांतील इतिहाससंशोधनाच्या कार्याला नवीन दिशा लागली आणि बखरींचें युग संपून खतपत्रांचें युग (Age of Documents) सुरू झालें. पारसनीस आणि डेक्कन् व्हर्न्याक्युलर् ट्रान्सलेशन् सोसायटी यांनीं या काळांत या दृष्टीनें केलेल्या कामगिरीविषयीं अन्यत्र उल्लेख केलाच आहे. परंतु व्यक्तिशः पारसनीस किंवा संघशः डेक्कन् व्हर्नाक्युलर् ट्रान्सलेशन् सोसायटी यांच्यापेक्षांहि ज्यांची कामगिरी वरचढ लागेल असे दोन प्रसिद्ध इतिहाससंशोधक याच वेळीं या क्षेत्रांत प्रामुख्यानें चमकूं लागले. पैकीं रा. वासुदेवशास्त्री वयानें पुष्कळ वडील असून आपल्या नाना फडणविसांच्या चरित्राच्यायोगानें

प्रसिद्धीस आले. मिरजेजवळील पटवर्धनांचें मळे-दप्तर हा अमूल्य सांठा त्यांच्या हातीं लागला. मळेदप्तराचा परामर्ष हा वासुदेवशास्त्र्यांना जन्मभराचा व्यासंग म्हणून पुरून उरला. मळेदप्तरांत, साधारणपणें पटवर्धन मंडळी नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दी-पासून राजकारणांत पुढें येऊं लागली तेव्हांपासूनचे, कागद आहेत आणि ते बहुतेक सुरक्षित आहेत. हल्लीं त्यांची व्यवस्थाहि चांगली आहे, अशी ग्वाही रा. यशवंतराव खरे यांनीं दिलेली आहे. पटवर्धन हे पेशव्यांचे विश्वासांतील सरदार, पेशव्यांच्या हालचालींची दक्षिणेकडील बाजू सांभाळणारे हुशार, बुद्धिमान् आणि शूर असे निघाल्यामुळें त्यांनीं साहजिकच पुणें दरबारांत बातमीसाठीं व राजकारणा-साठीं वकील ठेविले. पटवर्धनांच्या ठिकठिकाणच्या वकिलांनीं व कारकुनांनीं लिहिलेलीं हजारों बातमीपत्रें मळे-दप्तरांत आहेत. यांतून कै. वासुदेवशास्त्री यांनीं सुमारें चार लक्ष कागद वाचून पांच सात हजार कागद निवडून व नकलून घेतले. इतकेंच नव्हे, तर त्यांचे सारांश काढून, त्यांवरून निरनिराळया प्रकरणांची हकीकत संगतवार मांडून, निवडक मूळ कागद टीपा देऊन, ठळक ठशानें आणि धांवत्या अनुक्रमांकानें क्रमशः, खंडशः प्रसिद्ध केले. सुमारें तीस चाळीस वर्षे शास्त्रीबोवांनीं या कामांत व्यतीत केलीं. आपला प्रपंच सांभाळून, कोणाजवळहि तोंड न वेंगाडतां, आपला अभिमान व बाणा कायम ठेवून, सतत चिकाटीनें मिरजेहून मळ्यास हेलपाटे घालून, मान मोडून नकला करून आणून, जो हा महदुद्योग खरेशास्त्री यांनीं केला तो एकंदर इतिहास-संशोधक-मंडळींत, जगांतहि फार उच्च दर्जाचा असा समजला जाईल. शके १६८० ते शके १७४० पर्यंतच्या पन्नाससाठ वर्षांतील पेशवाई इतिहासांतील घडामोडी पटवर्धन दप्तरानें पुष्कळच तपशीलवार आणि सुसंगत समजतात. पटवर्धन हे पेशव्यांचे पक्षपाती असल्याकारणानें त्यांच्याकडील दप्तरांत माहितीच्या दृष्टीनें एकच बाजू कळत किंवा नकळत अधिक रंगविलेली सांपडली तर त्यांत विलक्षण असें कांहीं नाहीं. पटवर्धनांच्या विरुद्ध पक्षांतील मंडळीकडील दप्तरेंहि सुसंगत लाविलेलीं सांपडलीं तर सत्यनिर्णय करण्यास त्यांचा पुष्कळ उपयोग झाल्यावांचून राहणार नाहीं. या काळीं दुर्दैवानें तसा योग जुळून आला नाहीं. पटवर्धनांप्रमाणें किंबहुना त्याहून अधिक घरोबा पुरंदरे व पेशवे यांचा होता. हा घरोबा अगदीं प्रथमपासून असल्यामुळें पुरंदरे दप्तरांत फार महत्त्वाची ऐतिहासिक माहिती आढळून येणें अपरिहार्य होईल. परंतु आपल्या दुर्दैवानें तें दप्तर मळेदप्तराप्रमाणें व्यवस्थित व सुरक्षित राहूं शकलें नाहीं.

तथापि आजलाहि त्यांतील जो भाग उपलब्ध झाला आहे, त्यायोगानें आपल्याला पुष्कळच नवीन माहिती समजत आहे. पुरंदरे दप्तराचे तीन खंड प्रसिद्ध झाले असून आणखीहि तितकेच प्रसिद्ध होण्याजोगे आहेत. पुरंदरेदप्तराप्रमाणें दाभाडे, विंचूरकर, शितोळे, प्रतिनिधि वगैरेंचीं दप्तरें शिल्लक राहिलीं असतीं आणि शिल्लक आहेत तीं हातीं आलीं असतीं तर आपल्या माहितींत भर व दृष्टिकोनांत बदल झाल्याशिवाय राहिला नसता.

नाना फडणविसांच्या चरित्राशिवाय शास्त्रीबोवांनीं मोठा असा एखादा इतिहासग्रंथ लिहिला नाहीं. ' अधिकारयोग ' या नांवाचें लहानसें पुस्तक ( १९०८ ) प्रसिद्ध केलें. तेंहि वास्तविक नाना फडविसांच्या चरित्राला दुरुस्तीरूप किंवा पुरवणीरूप असेंच आहे. शास्त्रीबोवांनीं आपल्या 'ऐतिहासिक लेखसंग्रहा'च्या निरनिराळ्या खंडांना लिहिलेल्या प्रस्तावना त्यांच्या चिरंजीवांनीं एकत्र करून छापिल्या आहेत. त्यायोगें मराठी साम्राज्याच्या उत्तरार्धाचा इतिहास पुष्कळ सुसंगत समजून येतो. भारत-इतिहास-संशोधक मंडळाच्या संमेलनांत शास्त्रीबोवांनीं कांहीं महत्वाचे निबंध वाचलेले प्रसिद्ध झाले आहेत. त्यांत मालोजी व शहाजी हा त्यांच्या विवेचन-शक्तीची चांगली साक्ष देणारा असा निबंध आहे. एकंदरींत राजवाड्यांनीं म्हटल्याप्रमाणें वासुदेव शास्त्र्यांसारखीं प्रचंड माहितीचीं माणसें क्वचितच निर्माण होतात. स्वतः त्यांनीं कसूर न करतां आपली शक्ति व बुद्धि सर्वस्वीं आपल्या कार्याला वाहिली, परंतु त्यांचा उपयोग त्यांच्या देशबांधवांनीं म्हणजे आम्हीं जसा करून घ्यावयास पाहिजे तसा करून घेतला असें बिलकुल म्हणतां येणार नाहीं.

## राजवाडे

आतां यानंतर ज्यांचें नांव यावयाचें आहे आणि ज्यांच्या कामगिरीचें वर्णन करावयाचें आहे, त्यांनीं केलेली कामगिरी महाराष्ट्रांतच नव्हे तर एकंदर इतिहास-संशोधकांतहि कांहीं दृष्टीनें अद्वितीय अशी आहे. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनीं आपलें सर्व आयुष्य या एकाच कार्यास निश्चयपूर्वक वाहिलें. इतिहाससंशोधन हाच त्यांनीं आपला प्रपंच केला आणि आपली सर्वगामी बुद्धिमत्ताहि त्यांनीं याच कामीं लाविली. आपल्या स्वार्थत्यागाचें सर्व बळ हें त्यांनीं याच कामीं खर्च केलें. या अपूर्व तपस्येमुळें राजवाडे यांनीं महाराष्ट्रांत इतिहास-संशोधनाची जागती ज्योत लावून सर्व बाजूंनीं मागें पडत चाललेल्या महाराष्ट्रास एक अभिमानाचें आणि विश्वासाचें स्थान निर्माण करून दिलें. समर्थ रामदासस्वामींबद्दल लिहितांना विठोबाअण्णांनीं

लिहिलेला श्लोक राजवाड्यांनाहि उत्तमोत्तम लागू पडतो. 'अकिंचनवरेण्योऽपि समर्थपदवीं गतः ।' आणि कै. प्रो. भानू हे राजवाड्यांस नेहमीं 'रामदास' म्हणत असत.

'भाषांतर' मासिकांत अनेक युरोपीय इतिहासादि ग्रंथांचीं मराठी भाषांतरें प्रसिद्ध करून मराठी लोकांच्या बुद्धीस पौष्टिक खाद्य अर्पण करण्याचा उद्योग दैवी कोपानें बंद पडण्याच्या सुमारास राजवाडे यांनीं मराठ्यांच्या इतिहासाकडे लक्ष पुरविलें. प्रथमतः वाईस त्यांच्या हातीं एरंडे दप्तर आलें. या दप्तरांत फारच महत्त्वाचीं पत्रें इतक्या बंदोबस्तानें कातड्यानें मढविलेल्या पेटाऱ्यांत ठेविलीं होतीं कीं, हीं पत्रें जशीं कांहीं काल लिहिलीं आहेत अशीं दिसावीं. त्यांवरील वाळू, शाई आणि कागदाचा रंग हीं अगदीं लिहिलीं तेव्हां जशीं होतीं तशीं दिसत. हीं पत्रें सर्व मराठी इतिहासांत लोकप्रसिद्ध असा जो पानपताचा विषय त्या वीरसंगराचे नायक जे भाऊसाहेब पेशवे त्यांचा व गोविंदपंत बुंदेले यांचा जो पत्रव्यवहार झाला त्यांतलींच बहुतेक आहेत. या खंडामुळें पानपतच्या प्रकरणावर येथून तेथून नवा प्रकाश पडला! हीं पत्रें राजवाड्यांनीं 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' खंड १ ला म्हणून छापून प्रसिद्ध केलीं (१८९८). राजवाड्यांचा हा खंड जसा क्रमानें पहिला तसा गुणानेंहि पहिला आहे. या खंडांतील पत्रेंच फार महत्त्वाचीं आहेत असें नाहीं, तर या पत्रांचा परामर्ष घेणारी जी पल्लेदार प्रस्तावना राजवाडे यांनीं लिहिली आहे तीहि महत्त्वाची आहे. या प्रस्तावनेंत एकंदर मराठ्यांच्या इतिहासाचें विवेचन करण्याचा नवाच दृष्टिकोन महाराष्ट्रास मिळाला आहे. राजवाडे यांची सूक्ष्म दृष्टि, व्यापक अध्ययन आणि कणखर देशाभिमान हीं सर्व या प्रस्तावनालेखांत ठेंचून भरलेलीं दिसतात. राजवाड्यांच्या भाषेंतील प्रौढी या प्रस्तावनेंत उत्कृष्ट प्रकारें चमकत आहे. निबंधमालाकारांच्या लिहिण्यानें अथवा जिनसीवाले यांच्या बोलण्यानें राजवाडे यांचें लक्ष मराठी इतिहासाच्या विषयाकडे वळलें आणि राजवाडे यांनीं तो विषय आपलासा करून पूर्वीं कधींहि न लाभलेला भारदस्तपणा आणि मोठेपणा या विषयाला आणून दिला. येणेंप्रमाणें आरंभ करून राजवाडे यांनीं आपली अखेरी कशी साधली याचें वर्णन आतां जरा विस्तारानें करूं.

राजवाडे यांनीं आपला आवडता व्यवसाय सुमारें तीस पस्तीस वर्षें केला आणि शके १८४८ त ते दिवंगत झाले. इतक्या अवधींत मागें वर्णन केलेल्या पानिपत प्रकरणावरील पुस्तकापासून त्यांच्या मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें या

मालेला प्रारंभ झाला. या मालेचे एकंदर बावीस खंड राजवाडे यांनीं छापिले. यांतील पहिला खंड त्यांनीं आपल्या अंगावर छापला आणि त्या खटाटोपांत होती नव्हती ती माया ते संपवून बसले ! त्यांचा घरगुती मायापाश यापूर्वींच तुटला होता. तदनंतर आमरण व्रती राहून त्यांनीं आपल्या आयुष्याचा उद्योग आपलें सर्वस्व पणाला लावून जोरानें चालू केला. दुसरी गोष्ट म्हणजे त्यांनीं जवळ जवळ हिंदुस्थानभर प्रवास केला आणि अनेक ठिकाणें जातीनें पाहिलीं. सह्याद्रीची कोंकणपट्टी त्यांनीं तीन वेळ पायानें हिंडून इतिहासाच्या दृष्टीनें तपासून पाहिली. एकदा खलाटीनें, एकदा वलाटीनें आणि एकदा मधून. अनेक किल्ले, गांवें, देवळें, मशिदी, रस्ते, लेणीं, भुयारें त्यांनीं हिंडून पाहिलीं. या पर्यटणांत जुनीं ऐतिहासिक घराणीं शोधून काढिलीं. ज्यांच्या ज्यांच्या जवळ कागदपत्रांचा गळाठा सांपडेल त्यांचें त्यांचें मन वळवून तो तपासणें किंवा मिळविणें हें काम त्यांचें नेहमीं चालू असे. इतिहासासंबंधानें त्यांची कल्पना अत्यंत व्यापक असल्यामुळें त्यांच्या समोर केवळ राजकीय इतिहासच नव्हता. एकंदर महाराष्ट्रीय लोकांचें निरनिराळ्या क्षेत्रांतील जीवन तपासणें हा त्यांचा हव्यास होता. त्यामुळें आर्थिक, कार्षिक, वैयापारिक, सांस्कृतिक, धार्मिक, सारस्वतिक इत्यादि लोकजीवनाचीं विविधांगें तपासणें आणि त्यांतून साहित्य मिळविणें ही त्यांची खटपट असे. बरींचशीं शास्त्रें राजवाडे यांना अवगत होतीं. गणित, प्रमुख भौतिक शास्त्रें, लिपिशास्त्र, व्युत्पत्तिशास्त्र इत्यादि अनेक शास्त्रांचें अवलोकन त्यांनीं चांगल्या तऱ्हेनें केलें होतें. ते मोडी कागदपत्र वाचीत यांत तर नवल नाहींच, पण प्राचीन ताम्रपट व शिलालेखहि लीलेनें वाचीत ! फारसीचाहि प्राथमिक अभ्यास त्यांचा झाला होता आणि पुढें पुढें पाणिन्यादि वैयाकरणांचे ग्रंथ त्यांनीं कसून अभ्यासिले. इतकेंच नव्हे, तर त्यांनीं महाभारत व वेदवेदांगांचाहि अभ्यास बारकाईनें केला होता. किंबहुना निरुक्त शास्त्राच्या आधारें महाराष्ट्राच्या वसाहतकाळाच्या इतिहासाचा छडा लावण्याचा पाया या अभ्यासाच्या बळावर त्यांनीं घातला. ऐतिहासिक मूळ साहित्य जमवितांना त्यांची विविध व व्यापक दृष्टि असल्यामुळें व सतत तोच उद्योग एकचित्तानें चालू असल्यामुळें त्यांचें काम फार भरदार असें झालें. हें सर्व काम त्यांनीं जवळ द्रव्यबळ कांहींहि नसतांना कसें सिद्धीस नेलें ही अचंबा वाटण्यासारखी गोष्ट आहे, एवढेंच येथें सांगितल्यास पुरें होईल !

राजवाडे यांना प्रथमारंभीं मनोभावानें साहाय्य करणारे कै. प्रो. विजापूरकर हे होत. यांनीं आपल्या 'ग्रंथमाले'त राजवाडे यांच्या मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें

या मालेचे खंड क्रमशः देण्यास सुरुवात केली. क्रमांक दोन, तीन, पांच, सहा आणि आठ असे या मालेचे पांच खंड 'ग्रंथमाले'त प्रसिद्ध झाले. हे सर्व खंड फार महत्त्वाचे आहेत. चौथा खंड चित्रशाळेनें कसाबसा गवती कागदावर छापून काढला होता! चित्रशाळेचे रा. वासुदेवराव जोशी यांचा लोभ राजवाडे यांच्यावर प्रथमपासून होता. राजवाडे यांचे 'राधामाधवविलासचंपू' आणि 'महिकावतीची बखर' हे अलीकडील दोन ग्रंथ त्यांनीं आपल्या चित्रशाळेंत प्रसिद्ध केले आहेत. राजवाडे यांच्या पश्चात् त्यांच्या 'ऐतिहासिक प्रस्तावना' आणि इतर लेख यांचे दोन तीन खंड व म. इ. साधनें खंड चवथ्याची द्वितीयावृत्ति हे ग्रंथ चित्रशाळेनेंच प्रसिद्ध केले आहेत. याप्रमाणें चित्रशाळेचा आधार राजवाडे यांस होता. राजवाडे यांचें आणखी एक आश्रयस्थान म्हणजे मुंबईस कांहीं वर्षें चालत असलेलें 'श्रीसरस्वतीमंदिर' नांवाचें द्वैमासिक होय. राजवाडे यांचे 'मराठी छंद' वगैरे विषयांवरील विद्वत्तापूर्ण निबंध व कित्येक शोध-टिपणें हीं यांतून प्रसिद्ध झालीं आहेत. 'केसरी'चा तर राजवाडे यांना सतत पाठिंबा असे. त्यांचे अनेक लेख 'केसरी' नें प्रसिद्ध केलेले आहेत. 'राष्ट्रोद्धार', 'विश्ववृत्त', 'प्राची प्रभा' वगैरे मासिकांनीं राजवाडे यांचे बरेच लेख व शोध प्रसिद्ध केले आहेत. धुळयाच्या 'सत्कार्योत्तेजक सभे' नें जसा दासबोध प्रसिद्ध केला, तशीच तिनें अतिशय जुनी 'ज्ञानेश्वरी'हि प्रसिद्ध केली. ही ज्ञानेश्वरीची फार जुनी प्रत बीडपाटांगण येथील मठांतून राजवाडे यांनीं मिळविली होती व तिला ते मुकुंद-राजी मानीत असत. ही प्रत आणि तिला लिहिलेली विस्तृत, विवेचक व गहन प्रस्तावना राजवाडे यांचा दांडगा उद्योग आणि जाडी विद्वत्ता यांची भव्य साक्ष केव्हांहि देतील. कवीनें मूळ लिहिलेल्या प्रतीवरून किंवा समकालीन प्रतीवरून त्याचे ग्रंथ मुद्रित करण्याच्या शास्त्रशुद्ध संप्रदायाला राजवाडे यांनींच सुरुवात केली असें म्हणावयास हरकत नाहीं. आणि त्याचीं गोड फळें आतां आपणांस सर्वत्र दिसून येत आहेत. राजवाडे यांस या उद्योगाचे महर्षि म्हणण्यास कोणताहि प्रत्यवाय नाहीं.

शके १८३२ सालीं राजवाडे यांनीं इतिहाससंशोधनाच्या निरनिराळ्या द्वारांनीं आणि निरनिराळ्या व्यक्तींच्या मार्फत होणाऱ्या कार्याला संघटित स्वरूप देण्याच्या हेतूनें पुण्यास भारत-इतिहास-संशोधक मंडळ नांवाची संस्था स्थापन केली. याच वेळीं मुख्यतः राजवाडे यांच्या प्रेरणेनेंच धुळयास देव, चांदोरकर व भट या त्रिवर्गाचें संशोधनाचें काम चालू होतें. सत्कार्योत्तेजक सभा हिचा मूळ प्रारंभ

सन १८९३ मध्यें झाला. दासबोधाची समर्थकालीन प्रत या सभेनें प्रथमतः शके १८२५ मध्यें प्रसिद्ध केली. रा. देव प्रभृतींची राजवाडे यांच्याबरील भक्ति अनन्य-साधारण म्हणतां येईल. 'संस्कृत भाषेचा उलगडा' या नांवाचें राजवाडे यांचें पुस्तक सत्कार्योत्तेजक सभेनेंच प्रसिद्ध केलें आहे.

राजवाडे यांच्या म. इ. साधनमालेच्या खंडांपैकीं पहिला, तिसरा, सहावा व आठवा या खंडास त्यांनीं विस्तृत विवेचनपर प्रस्तावना जोडिल्या आहेत. त्यांना प्रस्तावना म्हणण्यापेक्षां स्वतंत्र प्रबंधच म्हणणें योग्य होईल. या प्रबंधांपैकीं सहाव्या खंडाच्या प्रस्तावनेचा प्रबंध हा अत्यंत महत्त्वाचा असून तो वाचतांना आपण एखाद्या महान् परिणतप्रज्ञ इतिहासतत्त्ववेत्त्याचें ठसठशीत विवेचन वाचीत आहोंत असा प्रत्यय मनास येतो. इतिहासाचें खरें स्वरूप आणि विस्तार किती आणि केवढा आहे याचें अत्यंत मार्मिक व सुयुक्तिक विवेचन या प्रबंधांत जसें आढळतें तसें अन्यत्र क्वचितच आढळेल. राजवाडे यांचें मूलगामी पांडित्य आणि पल्लेदार भाषा-पद्धति यांचें उत्कट दर्शन या प्रबंधांत घडून येतें. पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत पानिपत प्रकरणाचा साधार प्रपंच करून राजवाडे यांनीं जो नमुना पुढें ठेविला आहे तो अद्यापिहि मराठींत अनतिक्रांत आहे. त्याच्या जोडीला त्यांच्या आठव्या खंडाच्या प्रस्तावनेचा प्रबंध बरोबरीच्या तोलानें किंबहुना अधिक वरचढ ऐटीनें बसूं शकेल. तिसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेंत ब्रह्मेंद्रस्वामीविषयीं पारसनिसांनीं केलेलें गोडवें व भोळें विवेचन राजवाडे यांनीं भुसाप्रमाणें उडवून दिलें आहे. तें वाचतांना प्रतिपक्षाची दाणादाण करण्याची राजवाड्यांची शक्ति व खोचक भाषाशैली वाचकाला आपल्याबरोबर त्या वेळेपुरती तरी वाहवून नेते. राजवाडे यांच्या या प्रस्तावना आणि उत्तर आयुष्यांत धुळ्याच्या 'इतिहास व ऐतिहासिक' या मासिक-पुस्तकद्वारें त्यांनीं प्रसिद्ध केलेले संशोधनशास्त्राविषयींचे व भाषाशास्त्राविषयींचे लेख यांत राजवाड्यांचें स्वरूप त्यांच्या अंगच्या गुणदोषांच्या उत्कटत्वासुद्धां याथार्थ्यानें प्रतिबिंबित झालें आहे. असीरिया व आपलीं पुराणें, ही त्यांची केसरींतील लेख-माला त्यांची संशोधक दृष्टि किती दूरवर अप्रतिहत संचारत असे याचा उत्कृष्ट पुरावा होय. ऋग्वेदावरून वृत्राविषयीं वगैरे डॉ. प्राणनाथ आज जे सिद्धांत जोरानें पुढें मांडीत आहेत ते वाचणाऱ्यांस राजवाडे यांचे हे लेख वाचून कौतुक वाटल्या-शिवाय राहणार नाहीं. राजवाड्यांच्या या लेखांचें इंग्रजी भाषांतर मराठा पत्रांत १९१२ सालीं आम्हीं प्रसिद्ध केलें होतें.

राजवाड्यांच्या कामगिरीचें यथार्थ वर्णन करावयाचें म्हटलें तर तें या लहानशा प्रबंधांत आटपणार नाहीं. त्याला एक निराळा ग्रंथच लिहावा लागेल. राजवाड्यांच्या गुणांचें वर्णन येथें केलें आहे. पण त्यांचे कित्येक गुण आवकलेल्या आंब्याप्रमाणें दोषरूपाला चढलेले होते. इतर विद्वानांस तुच्छ लेखणें आणि आपल्या आवडत्या कल्पनांना कल्पना न म्हणतां सिद्धांत म्हणणें या दोन खोडी त्यांच्या ठायीं अमूपत्वानें वास करीत होत्या. त्यांचा रसरसलेला देशाभिमान त्यांच्या ठिकाणीं शत्रुमित्रभाव नेहमीं प्रखर स्वरूपांत जागृत ठेवी. आपल्या देशबांधवांनीं आपली योग्य कदर केली नाहीं याविषयींची उद्विग्नता त्यांच्या बोलण्यांत तितकी नाहीं तरी मनांत काचत असली पाहिजे असें त्यांच्या निकट सहवासांत राहून सूक्ष्म नजरेनें पाहणारास पक्केपणीं दिसून येई. राजवाड्यांची कामगिरी फार विविध स्वरूपाची व क्रांतिकारक असल्यामुळें त्याविषयीं एवढा प्रपंच येथें करावा लागला. आतां लेखणी आवरली पाहिजे. तथापि तसें करतांना अलीकडे महानुभाव पंथाचें जें अभिनव दालन महाराष्ट्र सारस्वतांत उघडलें आहे आणि सांकेतिक लिपीचा कोष हस्तगत करून जें महानुभावी वाङ्मय-भांडार हातीं लागलें आहे व लागत आहे त्या प्रयत्नाची पहिली शिडी लावणारे धाडसी, यशस्वी वीर म्हणून राजवाडे यांचेंच नांव सत्यप्रिय लेखक सदैव घेण्यास चुकणार नाहींत हें येथें सांगितलें पाहिजे. भा. इ. सं. मंडळापुढें राजवाडे यांनींच मानभावांचे गुप्त संकेत आपल्या बुद्धिबलानें लावून अपूर्व क्रांति करून दाखविली.

असा राजवाडे यांच्या कर्तृत्वाचा काल शके १८१५ पासून शके १८४८ पर्यंत सुमारें तीस वर्षांचा धरितां येईल. इतिहाससंशोधनाच्या दृष्टीनें या काळास **राजवाडे-युग** म्हणण्यास हरकत नाहीं. राजवाडे यांनीं नुसते लेख लिहिले व शोध लाविले इतकेंच नाहीं तर आपल्या दिव्य प्रतिभा-प्रभावानें आपली जागती परंपरा निर्माण केली. जागोजागीं अनेक लहानमोठी मंडळी संशोधनाच्या कार्यांत राजवाड्यांनीं गुंतविली. ज्यांना मूळचाच थोडा नाद होता त्यांना राजवाड्यांच्या उद्योगानें जोराचें प्रोत्साहन मिळालें. राजवाड्यांच्या प्रस्तावनांतून इतिहाससंबंधानें व इतिहासशास्त्रासंबंधानें जें अभिनव प्रतिपादन झालें आहे तें अनेकांस मार्गदर्शक झालें आहे. वा. दा. मुंडले, पां. न. पटवर्धन, मिया आतार, आबा चांदोरकर, शं. ना. जोशी, कृ. पां. कुलकर्णी, वा. सी. बेंद्रे, य. खु. देशपांडे वगैरे अनेक तरुण संशोधक मंडळी राजवाडे यांना गुरुस्थानीं मानितात.

खुद्द त्यांच्या पिढींतील किंवा वडील पिढींतील इतिहासभक्त राजवाड्यांस फार मोठा मान देत. साने, भानु, मेहेंदळे, भावे, गद्रे प्रभृति मंडळींची राजवाड्यां-विषयीं तीच भावना असे. स्वतः राजवाडे यांनीं भारत-इतिहास-संशोधक-मंडळ स्थापन केलें तर राजवाडे संशोधनमंदिर, शारदाश्रम इत्यादि संस्था त्यांचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवून स्थापन झालेल्या आहेत. ज्या मॉम्सेन्‌चा उच्चार राजवाडे कधीं कधीं आदरानें करीत असत त्याच्यापेक्षां किंबहुना एका दृष्टीनें त्याहून अधिक कार्य राजवाडे यांनीं करून सान्या हिंदुस्थानास उदाहरण घालून दिलें आहे. 'गेल्या तीनशें वर्षांत असा माणूस झाला नाहीं' असें राजवाड्यांचे प्रखर टीकाकार ठाकरे यांनीं त्यांच्या मृत्यूनंतर दिलदारपणानें व प्रांजलपणानें उद्गार काढिले! परवां अखिल भारतीय आधुनिक परिषदेचे अध्यक्ष सर शफाअात यांनीं महाराष्ट्र संशोधकांविषयीं जे प्रांजळ व थोर उद्गार काढले त्याचें पुष्कळसें श्रेय राजवाडे यांच्या प्रयत्नांसच द्यावें लागेल!

भारत-इतिहास-संशोधक-मंडळाची स्थापना करून आणि त्याच्या धोरणाची दीर्घ दृष्टीनें रचना करून राजवाडे यांनीं तें कार्य दुसऱ्यांच्या अंगावर टाकून दिलें. त्यांनीं स्थापिलेल्या या मंडळाची गेल्या पंचवीस वर्षांत क्रमशः अभिवृद्धिच होत गेली आणि केवळ लोकाश्रयावर खुद्द या संस्थेनें व संस्थेच्या पुरस्कारानें सुमारें पाऊणशें ग्रंथ प्रसिद्ध झाले! हे ग्रंथ अनेकविध उपयुक्त माहितीनें खच्चून भरले आहेत आणि महाराष्ट्राच्या भावी इतिहासकारास त्यांचा उपयोग केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. कागदपत्रें, ताम्रपट, शिलालेख, नाणीं, वस्त्रें, पात्रें, शस्त्रें, चित्रें, व्युत्पत्ति, गाणीं, म्हणी, आख्यायिका, स्थलवर्णनें, नकाशे, मूर्ती इत्यादि शेंकडों प्रकारचें साहित्य जमवून, वर्णून, संरक्षून, विभागून इत्यादि षड्विध पद्धतीनें जगापुढें ठेविलें आहे. धुळ्याच्या 'सत्कार्योत्तेजक सभे'चें कार्य असेंच विपुल आहे. परंतु तें रामदास व रामदासी या विषयावरच अधिक केंद्रीभूत झालेलें आहे. असें एकाच विषयावर आपलें लक्ष केंद्रीभूत करणाऱ्या अनेक संस्थांची अद्याप गरज आहे. यवतमाळचा 'शारदाश्रम' आणि नागपूरचें 'मध्यप्रांत-संशोधन मंडळ' साहजिकच महानुभाव व त्यांचें वाङ्मय हे विषय आपलें लक्ष्यकेंद्र बनवीत आहेत. सातारा येथील 'वस्तुसंग्रहालय' आजच्यापेक्षां अधिक उपयुक्त स्वरूपांत महाराष्ट्राची सेवा पुढें करूं लागेल अशी आशा करण्यास हरकत नाहीं.

## राजारामशास्त्री

इतिहासक्षेत्रांत अधूनमधून झालेल्या वैयक्तिक व सांघिक अशा इतर प्रयत्नांकडे आतां येथें वळूं. बडोद्यास नंदुरबारकर आणि मंडळी यांनीं शिवदिग्विजय (१८९५) व शिवाजीप्रताप या दोन बखरी प्रसिद्ध केल्या. पुण्यास व्ही. एस्. यांनीं आपल्या मार्मिक लेखांचे दोन गुच्छ (१८९४–९६) प्रसिद्ध केले. कै. प्रो. भानु यांनीं नाना आणि महादजी यांवर आपलें विवेचन प्रसिद्ध केलें. केसरींत पुष्कळ ऐतिहासिक माहिती, चर्चा वगैरे सारखी प्रसिद्ध होत असे आणि दिवेकर, पारसनीस, राजवाडे, पांगारकर, भावे, आठल्ये, गद्रे प्रभृति मंडळींचीं पुष्कळ पत्रें या वेळीं त्या वर्तमानपत्रांत आलेलीं आढळतात.

मुंबईचे सुप्रसिद्ध विद्वान् कै. प्रो. राजारामशास्त्री भागवत यांचें प्राचीन इतिहासाप्रमाणेंच अर्वाचीन इतिहासाकडेहि विशेष लक्ष असे. मराठ्यांच्या इतिहासासंबंधानें त्यांनीं कित्येक लहानमोठे लेख प्रसिद्ध केले आहेत. त्यांतून त्यांनीं मांडलेली विचारसरणी स्पष्टवक्तेपणाची असून, पटण्याजोगी नसली तरी विचार करण्याजोगी आहे. हें विधान भागवतांच्या पुष्कळ लेखांसंबंधानें सामान्यतः करतां येईल. त्यांची विद्वत्ता, बहुश्रुतता, बुद्धीची सूक्ष्मता, विचारांची स्पष्टता आणि मांडणींतील सडेतोडपणा व बाणेदारपणा हे गुण विशेषतः स्पष्टपणें मनांत भरतात. परंतु आग्रह व एककल्लीपणा या दोषांमुळें, पिसा येथील मनोरे ज्याप्रमाणें झुकलेले आहेत तसे, त्यांचे लेख जरा झुकलेले वाटतात. ‘ब्राह्मण पण हिंदु नव्हे’ अशा सहीनें ते लेख लिहीत. एवढ्या लहानशा अभिधानांत सुद्धां त्यांचे गुणदोष किंवा त्यांचीं मतें सांठविलेलीं आढळतात. एकंदरींत मुरारिमिश्रांप्रमाणें त्यांचा साराच तृतीय पंथ होता यांत शंका नाहीं.

त्यांच्या सर्व पुस्तकांत ‘मऱ्हाठ्यांच्या संबंधानें चार उद्गार’ (१८८७) हें पुस्तक विशेष वाखणण्यासारखें आहे. मऱ्हाटे लोक व मऱ्हाटे राष्ट्र यांसंबंधानें त्यांचा कळवळा या पुस्तकांत सर्वत्र दिसून येतो. राजारामशास्त्र्यांची राजवाड्यांशीं पुष्कळ बाबतींत तुलना करतां येईल. दोघेहि नैरुक्तिक होते. दोघेहि इतिहासपंडित होते. दोघेहि लोकांस विक्षिप्त वाटत. दोघेहि सडेतोड व बाणेदार होते. मऱ्हाटी व मऱ्हाटे यांचा जाज्वल्य अभिमान दोघांच्या ठायीं उत्कट होता. दोघांची भाषासरणी व विचारसरणी स्वतंत्र होती. साधी राहणी व उच्च विचारसरणी या कोटींत दोघेहि पडतात. दोघांचेंहि जगाशीं पटत नसे. असें असतांहि मराठी वाङ्मयाची व महाराष्ट्र

समाजाची दोघांनींहि मनोभावें सेवा करून दाखविली. उलटपक्षीं एकास ब्राह्मण्याचा उत्कट अभिमान होता तर दुसरा ब्राह्मणी काव्याच्या कल्पनांनीं व्यास झाला होता. एकास युरोपियनांचें वावडें असे तर दुसऱ्यास मिशनऱ्यांच्या सहवासांत आणि सेवेंत आयुष्य कंठणें परवडलें. अशी ही रा. रा. भा. व वि. का. रा. यांची विलक्षण जोडी आपल्या वैलक्षण्यानें व वैशिष्ट्यानें महाराष्ट्रांत चमकून गेली! दोघेहि समकालीन असून 'भेटी नाहीं जन्मवरी' असा प्रकार होता. एकाच पर्वताच्या एकाच सोंडेमुळें दोन अंगाला बनलेल्या दोन खोऱ्यांतून दोन स्वतंत्र प्रवाह निघावे आणि दोन्ही एकाच दिशेनें परंतु एकमेकांस स्पर्श न करतां समुद्रास मिळावे तसाच कांहींसा प्रकार या दोन जबरदस्त विद्वानांच्या लेखनप्रवाहांसंबंधानें झाला असें म्हटलें असतां उचित दिसेल.

श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्यांशीं दोघांचाहि संबंध आला. 'भाषांतर' मासिकाच्या द्वारें रोमन पादशहीचा ऱ्हास समग्र प्रसिद्ध करण्याची राजवाड्यांची योजना होती. या कामीं श्रीमंत सयाजीराव यांच्या मनांतून मोठी मदत करण्याचें आलें होतें, परंतु तो योग कांहीं जुळून आला नाहीं. पण राजारामशास्त्री यांच्याकडून श्रीमंत सयाजीराव महाराजांनीं 'कैसरकडून सुलतानाकडे' हें पुस्तक लिहून घेतलें. हा विषय स्वतः श्रीमंतांनीं एका इंग्रजी पुस्तकांत ग्रथित केलेला आहे आणि त्याचा सविस्तर अनुवाद भागवतांच्या कडून करून घेतला आहे. गिबनवर श्रीमंत महाराजांची विशेष भक्ति आहे असें दिसतें. ती या विद्वानांच्या दुकलींतून एकाकडून अंशतः तरी पुरी करून घेतां आली याबद्दल श्रीमंतांस खचित समाधान वाटत असेल.

## घराण्यांचे इतिहास

सरकारी कामकाजाच्या निमित्तानें व क्वचित् हौशीनें जुन्या ऐतिहासिक घराण्यांतून कोठें कोठें घराण्यांच्या इतिहासाच्या कैफियती, बहुधा इंग्रजींत लिहिलेल्या आढळून येतात. जोशी बारामतकर, गोपाळ संभाजी खांडेकर किंवा बडोदेकर शास्त्री पटवर्धन यांचीं उदाहरणें या प्रकरणीं देतां येतील. या कैफियती बहुधा चोपडेवजाच आहेत. शास्त्री पटवर्धन यांच्या घराण्याच्या इतिहासाचें छोटेंसें इंग्रजी पुस्तकच आहे. पुष्कळ घराण्यांचीं स्वतंत्र मराठी पुस्तकेंहि आहेत. हैद्राबादचे सुप्रसिद्ध राजे रायरायान् यांच्या घराण्याचा एक छोटा मराठी इतिहास 'इतिहासादर्श' या नांवानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध आहे. शेंदुर्णीकर

पाटणकर दीक्षित यांचे कांहीं कागद व कैफियत मराठींत छापलेली आहे. अलीकडे या घराण्यांतील श्रीमंत सरदार गंगाधर यज्ञेश्वर दीक्षित जहागिरदार यांनीं, आपल्या कुलांतील मुख्य पुरुष, पेशव्यांना गुरुस्थानीं असलेले नारायण दीक्षित, यांचें चरित्र छापिलें आहे. खरें पाहिलें असतां देशाचा मोठा इतिहास तयार करण्यापूर्वी देशांतील जितक्या घराण्यांचा तपशीलवार इतिहास उपलब्ध होईल तितकें तें मोठ्या इतिहासकाराला फायदेशीर असतें. आवश्यक बाबींचे—व्यक्ति, स्थल आणि प्रसंग यांविषयींचे—साधार उल्लेख अशा घराण्यांच्या इतिहासाच्या द्वारें उपलब्ध होतात. कुलपरंपरा, कुलाचार, देशाचार, वैयक्तिक आणि सामाजिक जीवन म्हणजे खाणें, पिणें, लेणें, देणें, घेणें इत्यादिविषयीं तपशीलवार माहिती घरगुती हिशोबांतून गोळा करतां येते. राष्ट्राच्या दौलतीचा हिशोब आणि समाजांतील निरनिराळ्या थरांतील लहानमोठ्या घराण्यांचे हिशोब हे दोन्हीहि खऱ्या आणि व्यापक इतिहासाच्या रचनेस अभ्यासकास साहाय्यभूत होत असतात. केवळ सरकारी कामकाजानिमित्त किंवा भाऊबंदकीच्या प्रसंगांमुळें लोकांचें लक्ष घरांतील गळाठे चाळून अनुकूल पुराव्याकडे जातें. किंबहुना असेंहि म्हणावयास हरकत नाहीं कीं अभिमानापेक्षां आशेमुळेंच कागदपत्रांचीं पोतीं अथवा रुमाल घराच्या अडगळींतून सांठवून ठेविलेले असतात. अभ्यासाची दृष्टीहि फारच विरळा सांपडते. अशा स्थितींतहि कोठें कोठें कांहीं घराण्यांत कित्येक अभ्यासी, अभिमानी आणि परिश्रमी असे बुद्धिमान् आणि दक्ष गृहस्थ आढळून येतात कीं, जे आपल्या घराण्याचीं कागदपत्रें फेरिस्तवार व्यवस्थेनें लावून, तपासून, नकलून किंवा सारांश लिहून ठेवितात; आणि कित्येक त्यांच्या आधारें व्यवस्थित असा वृत्तान्तहि सजवून तयार करितात. असे तयार इतिहास अजूनहि पुष्कळ शोधावयाचे आहेत.

वाड, मावजी आणि पारसनीस यांच्या प्रयत्नांमुळें पेशवे दप्तरांतील जी माहिती प्रसिद्ध झाली तींत वतनपत्रें व निवाडे, तहनामे व करार आणि सनदापत्रें असे तीन खंड घराण्यांच्या इतिहासाच्या दृष्टीनें उपयुक्त असे प्रसिद्ध झाले आहेत. अलीकडे निघालेल्या पेशवे दप्तराच्या खंडांत घराण्यांच्या इतिहासाचाहि एक खंड निघालेला आहे. राजवाड्यांनींहि शिवकालीन इतिहासाच्या शोधाची तयारी सरकारी दप्तरखान्याच्या अभावीं खाजगी घराण्यांतील कागदपत्रें तपासून, 'शिवकालीन घराणीं' या नांवानें त्यांचे घराणेंवार खंड छापूनच केली आणि अद्यापिहि भारत-इतिहास-संशोधक-मंडळाकडून तें काम चालू आहे.

घराण्यांच्या इतिहासाच्या संबंधांत एका गृहस्थाचा प्रामुख्यानें निर्देश केला पाहिजे; आणि ते म्हणजे कै. गोविंद विनायक आपटे हे होत. विशेष शिक्षण किंवा अंगीं विद्या नसतांना आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धांत या गृहस्थानें घराण्यांचे इतिहास तयार करण्याचा उद्योग आरंभिला. येथें उद्योग हा शब्द दुहेरी अर्थानें वापरला आहे. म्हणजे त्यांत धंद्याचाहि अंतर्भाव होतो. हा अत्यंत उपयुक्त व कांहीं अंशीं स्वतंत्र असा धंदा रा. आपटे यांच्या बाणेदार व सरदारी थाटाला शोभण्यासारखा होता. एकेक घराणें घेऊन त्यांतील विद्यमान व्यक्तींस भेटून त्यांच्यामार्फत त्या घराण्याच्या निरनिराळ्या शाखांचा तपास लावून, त्यांचीं बेटें आणि बुडें शोधून काढून, कागदपत्रांचाहि त्यांच्या व आपल्या समजुतीप्रमाणें आधार घेऊन, चित्रें, फोटो वगैरे मिळवून, जातीनें गांवोगांव जाऊन तपास करून, छपाईचा व आपल्या उदरनिर्वाहाचा भार त्या त्या घराण्यांतील विस्तारलेल्या शाखापल्लवांवर टाकून रा. आपटे यांनीं आपलें काम केलें. प्रथम त्यांनीं आपटे घराण्याचा इतिहास छापला. नंतर बर्वे घराण्याचा छापला. आणि नंतर गोखले-रास्ते घराण्याचा छापला. फडके घराण्याला त्यांनीं सुरुवात केली होती तोंच दुर्दैवानें त्यांचा अंत झाला. आपटे ह्यांनीं पाडलेली प्रथा सांप्रत तरी खंडित झाली आहे. एखाद्या उत्साही संशोधकानें आपटे यांचा हा व्यवसाय अवश्य पुढें चालविण्यासारखा आहे. रा. आपटे ह्यांच्यासारख्यापेक्षां एखाद्या शास्त्रीय ज्ञानसंपन्न इतिहासवेत्त्या पुरुषानें जर हें काम हातीं घेतलें तर तें अतिशय उच्च प्रतीचें व सार्वराष्ट्रीय इतिहासकारास मार्गदर्शक असें होईल. असें काम ‘मुधोळकर घोरपड्यांचा इतिहास’ या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाचे संपादक विद्वद्वर्य दत्तोपंत आपटे यांनीं केलें आहे. त्याचा अधिक विचार अन्यत्र केला आहे.

## संस्थानांचे इतिहास

बहुतेक संस्थानांनीं इंग्रजी सरकारास पेश करण्याकरितां व जिज्ञासु युरोपियन पाहुण्यांच्या समाधानाकरितां आपले इतिहास इंग्रजींतून प्रसिद्ध करविले आहेत. खऱ्याखुऱ्या इतिहाससंशोधकाला आश्रय देऊन आणि त्याचें साहाय्य मिळवून शास्त्रीय दृष्टीनें लिहविलेले ग्रंथ या वर्गांतहि फारसे सांपडत नाहींत. संस्थानांच्या कुवतीप्रमाणें पदरीं असलेल्या विद्वानांच्या साहाय्यानें या वर्गांतील बहुतेक ग्रंथ तयार करविलेले आहेत. घराण्यांचे काय किंवा संस्थानांचे काय आजवर तयार झालेले हे इतिहास असावे तसे शास्त्रीय नसल्यामुळें हें सर्वच काम पुन्हां एकवार करावें लागेल. असें आहे तथापि कित्येक स्वतः सुविद्य व जाणिक असलेल्या

संस्थानाधिपतींनीं या विषयांतहि आदर्शवत् कामगिरी केली आहे. औंध संस्थानचे विद्वान् अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंडित प्रतिनिधी यांनीं आकारानें लहान परंतु परंपरेच्या अधिकारानें उच्च असलेल्या अशा आपल्या संस्थानाचा आणि तद्वारा प्रतिनिधी घराण्याचा सुविस्तृत, साधार व विवेचक असा इतिहास अनेक खंडांत प्रसिद्ध केला आहे. छत्रपतींच्या घराण्याच्या खालोखाल प्रतिनिधींच्या घराण्याचा मान आहे. यामुळें या इतिहासाचें महत्त्व विशेष आहे. तो करवितांना त्याचे लेखक पंतांचे आश्रित रा. वामन परशराम मेहेंदळे यांजला योग्य प्रकारचें मार्गदर्शन श्रीमंतांनीं जातीनें व तज्ज्ञांकडून करविलें आहे. स्वतः श्रीमंत यांनीं मराठ्यांचा इतिहास प्रेमानें व आस्थेनें अभ्यासिला आहे. यामुळें एकंदरींत हें काम पुष्कळ चांगलें उतरलें आहे. इतरांना त्यापासून चांगलें उदाहरण घेतां येण्यासारखें आहे. सांगली संस्थानचे अधिपति हिज हायनेस श्रीमंत राजे आप्पासाहेब सांगलीकर यांनीं कै. रा. ब. पारसनीस यांच्या इतिहास-संशोधनाच्या कार्याला अत्यंत मनोभावें पाठिंबा दिला होता, व पुष्कळ पैसाहि खर्च केला होता. परंतु सांगली संस्थानाचा आम्ही अपेक्षितों असा इतिहास अद्यापि प्रसिद्ध झाला नाहीं ! सांगली, मिरज, मळा, जमखंडी, कुरुंदवाड, तासगांव वगैरे सर्व पटवर्धन मंडळीच्या जहागिरींचा व संस्थानांचा मिळून लिहिलेला इतिहास फारच स्फूर्तिदायक, बोधप्रद व वाचनीय होईल. कै. खरे शास्त्र्यांसारखा खंदा इतिहासवीर कित्येक तपें पदरीं असूनहि इष्ट गोष्ट घडून आली नाहीं, हें महाराष्ट्राच्या इतिहासाचें दुर्दैव समजलें पाहिजे ! पटवर्धन मंडळींचें मूळचें यजमान घराणें म्हणजे इचलकरंजी संस्थानचे विद्वान् अधिपति श्रीमंत बाबासाहेब घोरपडे यांचें घराणें. यांनीं मात्र वासुदेवशास्त्री खरे यांच्या करवीं इचलकरंजी संस्थानचा एक उत्कृष्ट इतिहास तयार करवून प्रसिद्ध केला आहे.

भोंसल्यांपैकीं सातारचे छत्रपती आतां नांवाचेच राजे आहेत, तरी देखील आपल्या घराण्याचा इतिहास प्रसिद्ध करण्याइतकी ऐपत त्यांना आहे. परंतु त्याऐवजीं आपल्याजवळील इतिहासाचीं साधनें मावजी शेट सारख्यांस त्यांनीं विकण्याची परिस्थिति निर्माण व्हावी हें पाहून मन घटकाभर विषण्ण झाल्यावांचून राहत नाहीं. भोंसल्यांची दुसरी शाखा नागपूरची. साताऱ्याप्रमाणेंच नागपूरचीहि कथा ऊर्फ रडकथा आहे. तेथेंहि नांवाचे भोंसले राजे आहेत. अजूनहि वाडेहुडे, बागा, मळे, गांवें, जहागिऱ्या त्यांच्याकडे आहेत आणि जुन्या वैभवाची साक्ष देत आहेत.

सातारकरांकडे प्रतापगडची भवानी आहे तर नागपूरकरांकडे रामटेकचा रामचंद्र आहे. नागपूरकरांजवळील बहुमोल पाचूच्या रामाच्या मूर्ती कलकत्याच्या बाजारांत मांडल्या जाव्या, असा बनाव नागपूरकरांच्या दैवानें घडवून आणिला! होणाराला असला तरी झालेल्यास मात्र खचित उपाय नाहीं असें म्हणण्याशिवाय आपणांस येथें काय करतां येईल? भोंसल्यांची तिसरी शाखा तंजावरची. तेथेंहि तोच प्रकार. ईश्वरकृपेनें भोंसल्यांच्या विद्याविलासाची भरपूर साक्ष देणारा असा तो प्रचंड सरस्वतीमहाल तंजावरास शाबूत असून त्यांतील हजारों ग्रंथ विद्वानांचे धन्यवाद आजहि घेत आहेत. भोंसल्यांची चौथी शाखा म्हणजे कोल्हापूरचे छत्रपती. हें संस्थान अद्यापि कायम असून छत्रपतींची बिरुदावली मिरवीत आहे. या चारी शाखांत इतिहाससंबंधानें जवळजवळ अंधार आहे, म्हटलें तरी चालेल. 'ग्रंथमाले' च्या द्वारें राजवाड्यांनीं केलेला उद्योग कोल्हापुरास झाला. तंजावरच्या ग्रंथालयाची ओळख राजवाडे यांनीं महाराष्ट्रास पहिल्यानें करून दिली. सातार्‍यांतील बादशाही फर्मानें धुळ्याच्या 'प्रभातां'त प्रसिद्ध झालीं. हींहि राजवाड्यांनींच केलीं. भोंसल्यांची जर ही कथा तर करवीर व सातारा येथील राजमान्यांची काय स्थिति असेल हें सांगावयास नको! प्रतिनिधींचा अपवाद मागें सांगितलाच. बावड्याच्या अमात्यांचा छोटासा इतिहास लिहिलेला आहे. तसा मग खुद्द करवीराचा इतिहास कै. बाळाजी प्रभाकर मोडक यांनीं लिहिलेला प्रसिद्ध आहे आणि तो बराच मोठाहि आहे. शेंडगांवकर भोंसल्यांची एक बखर कै. भावे यांनीं प्रसिद्ध केली आहे.

भोर, फलटण, औंध वगैरे संस्थानांतून संस्थानांचे इतिहास लिहीत फिरणारे व नुकतेच कालवश झालेले कै. अनंत नारायण भागवत यांची आठवण केल्यावांचून हा विभाग पुरा होणार नाहीं. कै. भागवत यांची प्रथम इच्छा पारसनिसांच्या मागोमाग पेशवे दप्तरांत शिरावें अशी होती. परंतु सरकारानें त्यांचा प्रवेश तेथें होऊं दिला नाहीं. तथापि चिकाटी न सोडतां रा. भागवत यांनीं वर लिहिलेल्या संस्थानांतून इतिहासलेखनाचें काम वरील दरबारांच्या आश्रयानें करण्याचा उद्योग केला व आपल्या शक्तीप्रमाणें कित्येक इतिहास त्यांनीं पुरे केले. भोर संस्थानचा असा इतिहास छापून झालेला आहे, परंतु तो आतां तितकासा उपयोगी पडणार नाहीं! रा. भागवत यांना अखेरीस इंदुरास नोकरी मिळून आपला इतिहासाचा आवडता व्यवसाय स्वतःच्याच बळावर करावा लागला. 'भवानी बक्षी यांची रोजनिशी' वगैरे

बरेंच उपयुक्त साहित्य 'होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें' या मालेंतून भागवत यांनीं प्रसिद्ध केलें आहे. इंदुरास विलायतेहून कांहीं कागदपत्रांच्या नकलाहि दरबारानें श्री. सर तुकोजीरावांच्या वेळीं आणून ठेविल्या आहेत. परंतु आतां ते कागद पुसट होत चालले आहेत व लवकरच त्यांची नीट व्यवस्था न झाल्यास ते निकामी होतील अशी भीति वाटते असें आम्हांस समजतें. इंदूरदरबारनें इकडे त्वरित लक्ष पोंचवावें व दरबारचें कार्यक्षम असें इतिहासखातेंच स्थापन करून योग्य दिशेनें आपल्या वांट्याचा कार्यभाग उरकावा.

धार संस्थानांत वयोवृद्ध लेले मास्तर यांना संस्थानानें आश्रय देऊन त्यांच्या श्रमाचें चीज केलें आहे. काशिनाथपंतांनीं कै. ओक यांच्या साहाय्यानें संस्थानच्या इतिहासाचा एक खंड छापून प्रसिद्ध केला आहे व त्यांत पेशवे दप्तरांतील माहिती, धार दप्तरांतील माहिती व इतर ठिकाणची माहिती यांचा समावेश केला आहे. लेले यांचें काम व धारचें इतिहासखातें हीं दोन्हीहि पुढें चालू आहेत, ही फार समाधानाची गोष्ट आहे.

ग्वाल्हेरीचें शिंद्यांचें राज्य हें हल्लींच्या सर्व मराठी संस्थानिकांत श्रीमंत आहे. परंतु इतिहासाकडे या संस्थाननें ऐपतीच्या मानानें कांहींच लक्ष पुरविलें नाहीं असें म्हटलें तरी चालेल. अलीकडे कांहीं हालचाल दरबारनें सुरू केली असून श्रीमन्महाराज बालराजे शिंदे यांच्या हातीं अधिकार आल्यावर वाटत असलेली ही वरील उणीव दूर होईल अशी बळकट आशा आम्ही बाळगतों. ग्वाल्हेरीस कै. श्रीमन्माधवराव महाराज शिंदे यांनीं कै. पारसनीस यांच्याकडून पांच खंड छापून घेतले होते ही गोष्ट मागें सांगितलीच आहे. नांवाजण्यासारखा असा एक खाजगी प्रयत्नहि ग्वाल्हेरीस चालू आहे व तो म्हटला म्हणजे ग्वाल्हेरचे इतिहासभक्त सरदार श्रीमंत आनंदराव भाऊसाहेब फाळके यांचा होय. कोटा येथें गुळगुळे घराण्यांत कागदपत्रांचा मोठा संग्रह आहे. त्यांतील कागदपत्र व अन्यत्र मिळालेले कागदपत्र शोधून व निवडून व त्यांवर योग्य प्रकारचे संपादकीय संस्कार करून श्रीमंत फाळके यांनीं आतांपर्यंत तीन साधनग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. भारत-इतिहास-संशोधक-मंडळामार्फत रा. दि. वि. काळे यांस बोलावून नेऊन ग्वाल्हेर दरबारनें गोरखींतील आपला पोथीखाना लावून घेतला, आणि दप्तरखात्यामार्फत जुने कागद जमविण्याचा उपक्रमहि केला आहे. ग्वाल्हेर संस्थानचे एक पिढीजाद सेवक आणि खंडेराव हरींचे वंशज श्रीयुत भास्कर रामचंद्र भालेराव यांनीं सुमारें १०।२० वर्षांत माळवा प्रांतांत

पोथ्यापत्रें जमविण्याचा कांहीं उद्योग केला आहे व पुष्कळ महत्त्वाची सामग्रीहि जमा केली आहे. परंतु स्फुट लेखांतून त्या सामग्रीचा परिचय करून देण्यापलीकडे आणि 'माधव-विलास' वगैरे एक दोन पुस्तकें प्रसिद्ध करण्यापलीकडे रा. भालेराव यांनीं पुढें मजल मारली नाहीं आणि दरबारमार्फत इतिहासखातें चालू करण्याची त्यांची कल्पनाहि सिद्धीला गेली नाहीं. या दोन्ही गोष्टी होऊं नये अशा झाल्या, परंतु आम्हाला उमेद आहे कीं, रा. भालेराव हे आपल्याजवळील संग्रहाच्या संरक्षणाची व प्रकाशनाची यथोचित व्यवस्था करण्यास दिरंगाई करणार नाहींत.

उत्तरेकडील विषय चाललाच आहे, तेव्हां त्या विषयासंबंधानें झालेल्या आणखी कांहीं प्रयत्नांचा परामर्ष येथेंच घेऊं. रा. मुरलीधर मल्हार अत्रे यांनीं बऱ्याच वर्षांपूर्वी (१८९२) मल्हारराव होळकरांचें एक छोटेंसें चरित्र प्रसिद्ध केलें होतें. दुसरें, इंदुरास मुंतझीमबहादुर कै. मुकुंद वामन बरवे यांनीं इंग्रजीमध्यें बरींच चरित्रें प्रसिद्ध केलीं आहेत. प्रमाणग्रंथ या नात्यानें या चरित्रांची मातब्बरी तज्ज्ञ लेखकाच्या कृतीच्या बरोबरीची ठरणार नाहीं. परंतु एक सुबुद्ध, विद्वान् व हौशी लेखक या नात्यानेंच मुकुंदरावजी आपला उद्योग करीत असत. तुकोजीराव होळकर, मराठे आणि मोंगल, अहिल्याबाई होळकर, दुसरे तुकोजीराव होळकर व शाहूचरित्र इत्यादि पुस्तकें त्यांनीं इंग्रजीमध्यें प्रसिद्ध केलीं आहेत. यांतील दुसरे तुकोजीराव यांचें विस्तृत चरित्र बरेंच वाचनीय झालें आहे.

उत्तरेकडील व दक्षिणेकडील दोन्ही संस्थानांच्या सेवेंत राहण्याचा योग येऊन जुन्या पिढींतील ज्या कित्येक व्यासंगी लेखकांनीं ग्रंथरूपानें आपल्या व्यासंगाचीं फळें आपल्या देशबांधवांस सादर करण्याचें व्रत अखंडपणें चालविलें होतें अशा लेखकांत कै. माधव व्यंकशेट लेले यांचें नांव आदरपूर्वक घ्यावें लागेल. ऐने अकबरीचें मराठी भाषांतर आणि रॉबर्ट् सेवेल् याच्या विजयानगरावरील इतिहासग्रंथाचें 'एक नष्टस्मृति साम्राज्य' या नांवाचें भाषांतर आणि Rulers of India मालेंतील ग्रंथाच्या आधारें बक्षिसार्थ लिहिलेलें एक 'अकबर बादशहाचें चरित्र' असे तीन ऐतिहासिक ग्रंथ माधवरावांच्या[१] नांवावर मोडतात. या तीन्ही विषयांवर नवे विस्तृत ग्रंथ होणें अत्यंत आवश्यक आहे, परंतु ते होईपावेतों निवळ मराठी वाचकांस माधवरावजींच्या ग्रंथांवांचून आपली जिज्ञासा भागविण्यास दुसरें कांहींहि साधन नाहीं.

---

१. राजतरंगिणीचें एक मराठी भाषांतरहि त्यांनीं प्रसिद्ध केलें आहे.

सर्व संस्थानी इतिहासांत मुधोळचे राजे नानासाहेब घोरपडे यांनीं आपल्या घराण्याचें जें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे तें अग्रस्थानीं शोभतें. भोंसले-घोरपड्यांचें त्यांतील कागदपत्र सर्व दृष्टींनीं अपूर्व आहेत. कारण त्यायोगें भोंसल्यांचें क्षत्रियत्व आणि शिसोदिये वंशाशीं संबंध हीं निःसंशय रीतीनें सिद्ध होत आहेत. मूळ कागदपत्रें हीं अशीं महत्त्वाचीं आणि त्या सुवर्णकणांचा अलंकार बनविणारा कारागीरहि आपल्या कामांत अत्यंत कसबी असा भाग्याचा योग श्रीमंत नानासाहेब राजे मुधोळकर यांनीं साधला आहे. आपल्याजवळील बहुमोल कागदपत्रांच्या संपादनासाठीं योग्य तज्ज्ञ मिळविण्यांत नानासाहेबांनीं पुष्कळ वर्षें खर्च केलीं आणि अखेरीस भारत-इतिहास-संशोधक-मंडळांतील सुप्रसिद्ध संशोधक दत्तोपंत आपटे यांच्याकडे तें काम सोंपविलें. सविस्तर टीपालेखन, समतोल आणि विद्वत्तापूर्ण विवेचन आणि शास्त्रीय चिकित्सा हे उच्च दर्जाचे संपादकीय गुण आपटे यांनीं केलेल्या व करविलेल्या परिष्कारांत दिसून येतात. ग्रंथांत दिलेलीं चित्रें मुळांत रंगित असावीं असें वाटतें आणि त्यांच्या रंगित प्रतिकृति ग्रंथांत शोभून दिसल्या असत्या. परंतु तसा योग या पुस्तकाला लाभला नाहीं. तथापि आपल्या अंगच्या अपूर्व गुणांमुळेंच हें पुस्तक मराठी इतिहासग्रंथांत मौल्यवान् होऊन बसलें आहे आणि तें प्रसिद्ध करण्याचा योग आणल्याबद्दल श्रीमंत नानासाहेब हे धन्यवादास पात्र आहेत.

फलटणचें निंबाळकर घराणें फार प्राचीन आहे. 'बाठारकर घराण्याचा इतिहास' हा या घराण्याच्या एका शाखेचा त्रोटक इतिहास भा. इ. सं. मं. मालेंत छापलेला आहे. परंतु हल्लींच्या फलटण संस्थानचा विस्तृत असा इतिहास कागदपत्रांच्या साहाय्यानें प्रसिद्ध होणें अवश्य आहे. श्रीमंत नानासाहेब नाईक निंबाळकर हे या कामीं लक्ष घालीत असून थोड्याच वर्षांत ही उणीव फलटण भरून काढतील अशी उमेद आहे.

सोंडूर, गुत्ती, अक्कलकोट, जत, जंजिरा, जव्हार वगैरे अनेक लहानमोठ्या संस्थानांचे विस्तृत इतिहास तयार व्हावयास पाहिजेत. रा. दिमोटे यांनीं जव्हारबद्दल एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे आणि अलीकडे फलटण संस्थानचाहि लहान इतिहास रा. पतके यांनीं छापून प्रसिद्ध केला आहे. भागानगर-हैद्राबादसारख्या मोठ्या संस्थानांत अद्याप या विषयाकडे जावें तसें लक्ष गेलें नाहीं. मात्र दप्तरखाना लावण्याचें काम तेथें चालू झालें आहे. हा दप्तरखाना पुण्यांतील पेशव्यांच्या दप्तरखान्याएवढा प्रचंड आहे. यांत कित्येक कोटी कागद सांपडतील. हा आम्हीं समक्ष पाहिलेला आहे

आणि याचे आस्थेवाईक अधिकारी मेहेरबान सय्यद खुर्शेद अली हे काळजीनें याची जोपासना करीत आहेत. हा दप्तरखाना लावून त्यांतील निवडक कागद प्रसिद्ध झाल्याशिवाय निदान निजामी महाराष्ट्राचा तरी इतिहास यथार्थपणें लिहिणें अशक्य आहे. एवढें या प्रचंड संग्रहाचें महत्त्व आहे. अर्थात् यांत फारसी कागद भरपूर आहेत.

जतच्या डफळे घराण्याचा एक लहानसा इतिहास आमच्या वाचनांत आहे; मोठा इतिहास अदिलशाहीपासूनचा तयार करतां येण्यासारखा आहे. सावंतवाडी संस्थानचा एक सुबोध व सरळ इतिहास रा. पिंगुळकर यांनीं बऱ्याच वर्षांपूर्वी (१९११) लिहून प्रसिद्ध केला आहे. अलीकडे रावबहादुर वासुदेवराव बांबर्डेकर यांनीं या घराण्याच्या इतिहासाबद्दल एक नवा सिद्धान्त ज्यांत प्रतिपादला आहे असा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे, आणि पिंगुळकर यांचा इतिहास चुकला आहे असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. या ग्रंथाचें नांव ' मठगांवचा शिलालेख आणि ब्राह्मण सामंत घराणें ' असें आहे व तो भा. इ. सं. मंडळाच्या पुरस्कृत मालेंत समाविष्ट झालेला आहे. मुंबईचे रा. वालावलकर यांनीं रा. ब. बांबर्डेकरांचें म्हणणें अमान्य करून आपली एक रचना सांगणारा ग्रंथ भा. इ. सं. मंडळाच्याच पु. मालेंत प्रसिद्ध केला आहे. असा हा वाद पडला आहे व तो अधिक विश्वसनीय साधनें हातीं येतील तरच तुटेल, एरवीं नाहीं. विंचूरकर घराण्याचा एक इतिहास बऱ्यापैकीं असा रा. गाडगीळ यांनीं लिहिलेला प्रसिद्ध झालेला आहे. आतां त्यांत बरीच भर घालून चांगला नवा इतिहास सहज तयार करतां येईल.

## दौलती दप्तरें

हैद्राबाद ( दक्षिण ) प्रमाणेंच 'पूर्तकाल' सरकारचें दप्तरहि ऐतिहासिक दृष्टीनें फार मोठें व महत्त्वाचें आहे. त्यांतहि कागदपत्रांचीं सुमारें अठ्ठावीस हजार बांधीव पुस्तकें असून अदिलशाहीपासूनचीं कागदपत्रें, तहनामे, बातमीपत्रें वगैरे शेकडों बाबी त्यांत आहेत. मोठ्या अभिमानाची आणि आनंदाची गोष्ट आहे कीं, पणजीचे गव्हर्नर यांनीं दप्तरखाना सुधारण्याचे कामीं लक्ष देऊन प्रोफेसर पांडुरंग सखाराम पिसुर्लेकर या महाराष्ट्रीय तरुण विद्वानाची दप्तरखान्यावर नेमणूक केली आहे. प्रो. पिसुर्लेकर यांनीं पोर्तुगीज भाषेंतील साधनांचा उत्तम अभ्यास करून शिवाजी, संभाजी, थोरले बाजीराव इत्यादिकांसंबंधानें पोर्तुगीज भाषेंत निबंध व माहिती प्रसिद्ध केली

आहे. माहितीच्या व महत्त्वाच्या दृष्टीनें हे निबंध आणि हें साहित्य अत्यंत आदरणीय आहे. पेशवे-दप्तर, निजामी दप्तर आणि पणजी दप्तर इत्यादि **दौलती दप्तरें** तसेंच पुरंदरे दप्तर, पटवर्धन दप्तर, गुळगुळे दप्तर इत्यादि खाजगी दप्तरें हीं सर्व दप्तरें योग्य रीतीनें परामर्षिलीं जातील तेव्हांच पेशवाईच्या उत्तरकालाचा इतिहास बऱ्याच चांगल्या रीतीनें सजवितां येईल. ही सामुग्री अफाट आहे आणि तसाच तो इतिहासहि मोठा विस्तृतच होईल.

## जातीय इतिहास

यानंतर जातीय इतिहासाकडे वळूं. हिंदुस्थानदेश हा जातीय देश म्हणून असाधारण लक्षणानें वर्णिला जातो. भविष्यकाळामध्यें कांहींहि होवो, पण इतिहासकाराला भूतकाल सोडतां येत नसल्यामुळें आणि भूतकाळांत जाति ह्या सर्वप्रभावी असल्यामुळें त्यांचा इतिहास यथातथ्य समजावून घेणें आणि समजावून देणें हें इतिहासकाराचें आवश्यक कर्तव्य आहे. जातिबद्ध रचनेपासून हिंदुस्थानचें कल्याण झालें असें इतिहासकाराचें मत होवो किंवा जाती ह्याच त्याच्या अवनतीस कारण झाल्या असें उलट मत असो, जातीचा अभ्यास निर्मत्सर बुद्धीनें करणें दोघांसहि आवश्यक आहे. असें असून, जातीचें जणूं कांहीं बाळकडूच येथल्या लोकांना असतांनाहि, इतिहासदृष्टीच नसल्यामुळें या जिव्हाळ्याच्या विषयाचा अभ्यास अद्यापपर्यंत आमच्याकडे जन्मास आला नाहीं असें जरी म्हणतां येत नाहीं तरी आहे तो अगदीं प्राथमिक व बाल्यावस्थेंत आहे, असें म्हणावें लागतें. जातींचा इतिहास असा शब्द उच्चारतांच कित्येक जातपाततोडक ‘बस करा’, ‘पुरे झालें’ म्हणून खवळून उठतील यांत कांहीं शंका नाहीं. नुसत्याच न पाहण्यानें असल्या जाती नाहींशा थोड्याच होतात! रोग्यानें मला कांहींच झालें नाहीं असें मानणें आणि झालेल्या रोगाकडे दुर्लक्ष्य करणें हें जितकें अपायकारक आहे तितकेंच फारसें कांहीं होत नसतांना मला कांहीं तरी असाध्य रोग झाला आहे अशी भावना धरणें हेंहि अपायकारक आहे. तात्पर्य, जातींच्या प्रश्नाला हिंदुस्थानच्या इतिहासकारास डावलून जातां येणार नाहीं. त्याची यथातथ्य परीक्षा करून त्यांतून निघणारीं सत्य प्रमेयें विचारांत घेऊन आपला पुढला मार्ग ठरविला पाहिजे.

जातींच्या जटिल प्रश्नासंबंधानें विशेष विचारपूर्वक लिहिलेलें असें वाङ्मय अलीकडेच निघूं लागलें आहे. जातींवरील लेखकांत डॉ. केतकर हे प्रमुख आहेत.

निरनिराळ्या जातींपोटजातींच्या संघटणा करणारे हिंदु, ब्राह्मण, ब्राह्मणेतर, ज्यू, पारशी वगैरे समाज ज्या खटपटी हल्लीं करीत आहेत त्यांमुळें पूर्वग्रहदूषित असें जरी असलें तरी बरेंचसें जातीय वाङ्मय तयार होत आहे. परंतु शास्त्रीय पद्धतीनें शोध मांडणी करून माहिती देणारें वाङ्मय थोडेंच आहे. निरनिराळ्या जातींच्या व उपजातींसंबंधाच्या ग्रंथांतील इतिहासप्रकरणांत बहुधा कोठल्या तरी पौराणिक आख्यायिका, कांहीं भाकडकथा, थोड्या फार परंपरागत चालत आलेल्या आख्यायिका आणि क्वचित अलीकडील दोनचारशें वर्षांतील अस्सल नक्कल कांहीं चारदोन कागद यांचा समावेश केलेला असतो. अधिक माहिती उपलब्ध नाहीं, याचा दोष एकट्या संपादकांच्याकडे येत नाहीं. परंतु जेवढी माहिती उपलब्ध आहे तेवढीहि काळजीपूर्वक पाहून, तपासून, निःपक्षपातीपणानें पारखून न दिल्याचा दोष पुष्कळ संपादकांना घेणें भाग आहे. जातिविषयक इतिहास शोधणें व तयार करणें या कामाला संपादक विशेष तयारीचा व लायकीचा असला पाहिजे. त्या तयारीचें विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. परंतु थॅर्स्टन् किंवा एन्थोवेन् किंवा रिसले यांचे जे इंग्रजी ग्रंथ पाहण्यांत येतात त्यांवरून या तयारीची कल्पना सहज येईल. आम्हीं उल्लेखिलेले हे इंग्रजी ग्रंथ सरळ मराठींत आणले तरीहि जातीय इतिहासाबाबत मोठी कामगिरी होईल आणि ज्ञानकोश, शब्दकोश, चरित्रकोश मंडळ यांसारख्या एकाद्या मंडळाची स्थापना करून हें काम कोणीं जाणत्यांनीं अंगावर घेतल्यास जातिविषयक प्रश्नांसंबंधाच्या कल्पनेच्या आणि पूर्वग्रहांच्या निवडुंगांतून इतिहासाच्या आणि वास्तवतेच्या पुष्पोद्यानांत आपण येऊं.

शुक्लयजुर्वेदीय ब्राह्मण, पळशे ब्राह्मण, भट्टप्रभू ब्राम्हण, देवरुखे ब्राम्हण, दैवज्ञ ब्राह्मण, सोमवंशीय आर्य क्षत्रिय, चांद्रसेनीय कायस्थ प्रभु, कुमावत क्षत्रिय, सहवासी ब्राह्मण, लेवापाटील इत्यादि लहानमोठ्या अनेक जातीपोटजातींच्या इतिहास-पुस्तकांतून इतिहाससंशोधकाला थोडीफार माहिती मिळण्यासारखी आहे. शहाणव कुळींच्या क्षत्रियांसंबंधानें ‘ क्षत्रियसमाजोन्नतिदर्पण ’ इत्यादि प्रकारचे ग्रंथहि पाहण्यांत येतात. रा. तारकुंडे यांनीं ब्राह्मण व क्षत्रिय ऐतिहासिक घराण्यांसंबंधीं कांहीं छोटीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. ‘ मराठा कुळांच्या कैफियती ’ जमा करून तो इतिहास तीन भागांत रा. गोपाळ दाजीबा दळवी यांनीं बऱ्याच वर्षांपूर्वी ( १९१२ ) प्रसिद्ध केला होता. डॉ. केतकर यांच्या ज्ञानकोशांत जातींविषयीं बरीच माहिती आली असून त्यांनीं व इतर अनेक लेखकांनीं जातीय प्रश्नांची चर्चा केली आहे.

रा. श्री. म. माटे व रा. दिवेकर शास्त्री यांनीं अलीकडे आपल्या समाजसेवेच्या अभ्यासाच्या निमित्तानें कांहीं छोटीं पुस्तकें व लेख प्रसिद्ध केले आहेत. माहितीच्या व मांडणीच्या दृष्टीनें अस्पृश्यांच्या प्रश्नावरील रा. माटे व रा. विठ्ठल रामजी शिंदे यांचे अलीकडे प्रसिद्ध झालेले दोन ग्रंथ उपयुक्त आहेत. परंतु रावसाहेब चापेकर यांनीं लिहिलेल्या 'आमचा गांव ऊर्फ बदलापूर' या अपूर्व ग्रंथांत गांवांतील अनेक जातींची जी पाहणी केली आहे तींत जातींच्याविषयीं पुष्कळ विविध प्रकारची माहिती व्यापक दृष्टीनें संग्रहित केलेली आहे. डॉ. घुर्ये व श्रीयुत करंदीकर इत्यादि महाराष्ट्रीय विद्वानांनीं अलीकडे जातीय प्रश्नाच्या उपयोगीं पडणारीं महत्त्वाचीं पुस्तकें इंग्रजींत प्रसिद्ध केलीं आहेत. स्वकुलसाळी, नामदेव शिंपी, भावसार क्षत्रिय, सांवतामाळी, अशा प्रकारच्या संघटित समाजांसाठीं किंवा पोटसमाजांसाठीं कांहीं मासिकें निघत असतात. त्यांतहि ऐतिहासिक विभाग अलीकडे थोडथोडे येऊं लागले आहेत. त्यांचें स्वरूप साहजिकच अगदीं प्राथमिक असें आहे. राजवाडे यांनींहि जातिविषयक शोधाचे बरेच प्रयत्न केले होते. ठेंगे मत, गोत्रोत्पत्तिविचार, इत्यादि विषयांवर भारत-इतिहास-सं.-मंडळांत त्यांनीं महत्त्वाचे निबंध वाचले होते. भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या मार्फत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांत जातिविषयक इतिहासाला उपयोगी असे कित्येक कागद आहेत. पेशवे दप्तरांत छापलेल्या खंडांतहि या विषयाची बरीच उपयोगी माहिती आढळून येते. कऱ्हाडचे धर्माधिकारी गिजरे यांच्याकडील कागद, राजवाडे व धुळ्याचे रा. भट यांनीं शोधून आणिलेले, कांहीं प्रसिद्ध केले आहेत व कांहीं प्रसिद्ध होत आहेत. जातगंगेनें केलेले शेंकडों निवाडे शोधाअंतीं मिळतील ते जमवून शंकराचार्यादिकांचीं व धर्माधिकाऱ्यांचीं दप्तरें पाहून एतद्विषयक बरीच सामग्री मिळेल. परंतु तो पुढला प्रश्न आहे. काय झालें एवढेंच आपण येथें पाहत आहोंत. आणि फारच थोडें काम—शास्त्रीय दृष्टीनें पाहतां—झालें आहे, एवढा निष्कर्ष नमूद करण्यास हरकत नाहीं. अभिनिवेशी भारूड पुष्कळ निर्माण झालें आहे. परंतु शास्त्रीय जगांत त्याला किंमत कांहीं नाहीं.

हिंदुस्थानांत जातिभावना ही सर्वांच्या रक्तांत भिनली आहे. आपण जाति सोडल्या किंवा सोडल्या पाहिजेत असें कोणीं बुद्धीनें कितीहि म्हटलें तरी, प्रत्यक्ष जातिभावना अजिबात विसरले असें क्वचितच एखाद्याविषयीं निर्बाधपणें म्हणतां येईल. कितीहि संयम केला तरी एखाद्या वेळीं तरी शेंडींतील बट जशी अवचित कोठें बाहेर यावी, त्याप्रमाणें रक्तांत भिनलेली जातिभावना थोडीतरी बाहेर डोकावल्या-

शिवाय राहत नाहीं. असें झालें म्हणून त्यांत निसर्गाला किंवा स्वभावाला कांहीं दोष देतां येत नाहीं. उदाहरणार्थ, राजवाडे यांचा गागाभट्ट व चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंसंबंधींचा लेख भारत-इतिहास-संशोधक-मंडळांतील चतुर्थ-संमेलनवृत्तांत प्रसिद्ध झाल्यावर त्यावर अनेक बाजूंनीं भयंकर मारा झाला हें सांगावयास नकोच. चांद्रसेनीय प्रभु समाजातर्फे मारा करणारे मुख्य वीर रा. केशव सिताराम ठाकरे हे होते. ह्यांनीं 'कोदंडाचा टणत्कार' वगैरे पुस्तकें लिहून आपल्या जोरदार भावना, आपल्या दणकेबाज भाषेमध्यें प्रतिपादन करून राजवाडे यांचें म्हणणें खोडण्याचा प्रयत्न केला. असल्या जातिवादविषयक वाङ्मयाचें परिगणन येथें एवढ्याकरितांच केलें आहे कीं, कधीं कधीं वादांच्या निमित्तानें कांहीं नवीन व अप्रसिद्ध अशी जातिविषयक ऐतिहासिक माहिती व पुरावे नवे शोधले जाऊन अशा ग्रंथांतून प्रसिद्ध होतात. शास्त्रीय इतिहासकाराला त्यामुळें तेवढ्या अंशानें फायदा होतो. एरवीं भावनांच्या पोकळ खणाखणीपलीकडे असल्या ग्रंथांपासून कांहीं निष्पन्न होत नाहीं. जातिविषयक समर्थनपर अथवा विरुद्ध अशा विषयांची सप्रमाण चर्चा आपणांमध्यें अत्यंत आवश्यक आहे. परंतु उभयपक्षांच्या विवेकी विद्वानांनीं, भावनांचा व पूर्वग्रहांचा साज मनावरून काढून ठेवून, केवळ तर्कप्रमाणवश होऊन उघड्या अंगानें वाग्युद्धें करावीं, असें आम्हांस वाटतें. रा. ठाकरे यांच्या वर उल्लेखिलेल्या पुस्तकांत, भारत-इतिहास-संशोधक-मंडळाला सरकार दरसाल ५०० रुपयांचा मलिदा चारतें, अशीं धडधडीत खोटीं विधानें भावनेच्या आधारें, आवेशानें व आक्रोशपूर्वक पुढें मांडिलेलीं पाहून हासूं येतें! रा. चौबळ व रा. के. टी. गुते यांचींहि राजवाड्यांची गागाभट्टी इत्यादि ग्रंथांच्या रूपानें राजवाडे यांस प्रत्युत्तरें प्रसिद्ध झालेलीं आहेत. या ग्रंथांतून शास्त्रीय विवेचन अल्प आहे किंबहुना नाहीं असें म्हटलें तरी चालेल. असाच वाद सारस्वत ब्राह्मणांसंबंधानें कै. गुंजीकर व कै. राजारामशास्त्री भागवत यांच्या दरम्यान बऱ्याच वर्षांपूर्वीं (१८८४) झाला होता. त्या वेळचीं 'सरस्वतीमंडळ' वगैरे पुस्तकें उपलब्ध आहेत. या पुस्तकांतील वाद विद्वानांच्या वाचाबाचीसारखा भासतो.

ब्राह्मणाब्राह्मणांतील जाति-वादापेक्षांहि ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यांतील जाति-वाद फार पुरातन आहे. उपनिषद्कालापासून किंवा त्यापूर्वींपासूनहि त्याचे पुरावे उपलब्ध होतात. 'ब्रह्मक्षत्रं यत्र विरुद्धतीह अन्वग्बलं दस्यवस्तद् भजन्ते।' असा इषारा व्यासांनीं दिला असूनहि असल्या वादाची तीव्रता कमी झाली नाहीं. खऱ्या

इतिहासकाराला जी निरंजन व निर्लेप दृष्टि ठेवण्याबद्दल राजवाड्यांनीं आपल्या सहाव्या खंडाच्या प्रस्तावनेंत शास्त्रशुद्ध प्रतिपादन केलें आहे त्याची आवश्यकता राजवाड्यांसुद्धा सर्वांसच असल्याचें आपणांस दिसून येतें. 'क्षत्रियांची उत्पत्ति,' 'शहाण्णवकुळी' इत्यादि विषयांवर रा. बिरजे प्रभृतींचे कित्येक ग्रंथ आहेत. परंतु ब्राह्मण व क्षत्रिय या दोन जातींचा इतिहास हा विषयच इतका मोठा, व्यापक व अवजड आहे कीं, त्याचें संशोधन व प्रतिपादन करणाऱ्याच्या ठिकाणीं व्यापक बुद्धिमत्ता, विस्तृत ज्ञान व तीव्र चिकित्साशक्ति या तिन्हींची अत्यंत आवश्यकता आहे. या जातींचा इतिहास म्हणजे हिंदुस्थानच्या इतिहासाचा फारच मोठा भाग होय आणि त्याचें संशोधन व विरचन अद्यापि विशेषसें झालेलें नाहीं. जाति-भावनेमुळें—क्वचित् जातिप्रेमानें, क्वचित् अन्यजातिद्वेषामुळें, किंवा मत्सर-क्रोधामुळें, कोणीं कांहीं थोडेंफार लिहिलें आहे, परंतु तें जुजबी म्हणण्यास हरकत नाहीं. युरोपीय भाषांत अर्थातच यासंबंधानें बरीच कामगिरी झाल्याचें आढळून येतें.

## प्रांतिक इतिहास

प्रांतिक इतिहास म्हणून ज्यांना म्हणतां येईल असे दोन चांगले मोठाले इतिहास बुलढाण्याचे श्रीयुत यादव माधव काळे यांनीं लिहून प्रसिद्ध केले आहेत. प्रथम त्यांनीं वऱ्हाडचा इतिहास लिहिला व नंतर त्यांनीं अलीकडे नागपूर प्रांताचा इतिहास लिहून प्रसिद्ध केला आहे. हे दोन्ही इतिहास मोठाले असून सरळ भाषेंत सुबोध रीतीनें लिहिलेले आहेत. इतिहासकाराच्या ठायीं लिहितांना जो सावधपणा असावा लागतो आणि जसें नेमस्त लिहिणें त्यानें लिहावें लागतें तसेंच रा. यादवरावजींनीं लिहिलें आहे. प्रपंचाचा व्यवसाय व हौशीचा व्यवसाय असे दोन व्यवसाय सुसंस्कृत म्हणणाऱ्यास असावेत आणि या दृष्टीनें रा. यादवराव यांनीं दोन्ही व्यवसायांत उच्च दर्जाचें यश संपादन केलें आहे. प्रसिद्ध साधनें जशीं त्यांनीं पाहिलीं तशींच अप्रसिद्ध साधनें पाहण्याची खटपटहि त्यांनीं केलेली आहे.

वऱ्हाडमध्यें संशोधनाच्या कामांत परिश्रम करणारे दुसरे प्रमुख गृहस्थ म्हणजे यवतमाळचे श्रीयुत यशवंत खुशाल देशपांडे हे होत. यांनीं तेथें शारदाश्रम नांवाची संस्था कांहीं मित्रांच्या साहाय्यानें काढली आहे. वऱ्हाड हा हल्लीं देखील नांवानें तरी निजामाचा आहे. जुनेपणाचा रंग महाराष्ट्रांतील इतर भागांपेक्षां वऱ्हाडावर अद्यापि अधिक उरलेला आहे. वऱ्हाड महाराष्ट्राचा अति प्राचीन भाग आहे, किंबहुना मूळ महाराष्ट्र तोच आहे. तेथें संशोधन विशेष झालेलें नाहीं.

अतिप्राचीन कालापासूनचे अनेक अवशेष तिकडे जागजागीं सांपडतात. तसेंच अलीकडील काळांतील कागदपत्र विपुल प्रमाणांत तिकडे विखुरलेले आहेत. पोथ्याहि पुष्कळच असावयास पाहिजेत. त्या सर्वांत एक विशेष असा आहे कीं, महानुभाव पंथ वऱ्हाडांत उदयास आला. या महानुभावपंथाचा इतिहास मोठा अद्भुत आहे. कांहींसे अलीकडील कोड् लँग्वेज्प्रमाणें आणि कांहीं शॉर्टहँड्च्या नमुन्यावर बसविलेले संकेत या पंथांतील लेखक पोथ्या लिहितांना वापरतात. गुजराथी लिपीप्रमाणें हे आपल्या पोथ्या ओळीच्या माथ्यावरील रेघ न काढतां लिहितात. अशा शेंकडों पोथ्या गेल्या सहाशें वर्षांत महानुभावपंथीयांनीं लिहिलेल्या उपलब्ध झाल्या आहेत. या पंथाचा संस्थापक चक्रधर यांचा दंडक असा आहे कीं पृथ्वीवरील सर्व देशांत महाराष्ट्र पवित्र आहे; म्हणून राहावयाचें असेल तर महाराष्ट्रांत रहावें असें ते सांगतात. ' महाराष्ट्रेषु न्यवसेत् ', असें त्यांचें सूत्र आहे. या पंथाचे शेंकडों अनुयायी पंजाब व अफगाणिस्थानांतहि आहेत व तेथले महानुभाव धर्मग्रंथ म्हणून चक्रधराचीं मराठी सूत्रें अद्यापहि पाठ करीत असतात. सूत्रें, भाष्यें, वार्तिकें या प्राचीन व प्रौढ संस्कृत पद्धतीनें महानुभावांच्या तत्त्वज्ञानाचे अनेक ग्रंथ रचिलेले आहेत ! असा या पंथाचा इतिहास आश्चर्यकारक आहे. पंथांतील महंत हे संकेत गुप्त ठेवितात. दुसऱ्या कोणास कळवीत नाहींत. राजवाडे यांनीं भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या सभेंत बऱ्याच वर्षांच्या परिश्रमानें हे संकेत लावून दाखविले आणि तेव्हांपासून महानुभाव पंथाचें गुप्त भांडार सर्वांस खुलें होण्यास प्रारंभ झाला. त्यापूर्वी पंथीयांबाहेर त्याचा प्रसार नव्हता.

नागपूरवऱ्हाडाकडील महानुभाव पंथाच्या वाङ्मयाच्या अभ्यासकांमध्यें यशवंतराव देशपांडे यांच्याखेरीज रा. वामनराव देशपांडे, उमरावतीचे प्रो. कोलते, माहूरचे खुद्द महानुभाव महंत दत्तलक्षराज महानुभाव व ऋद्धिपूरचे महंत गोपीराज व त्यांचे पंजाबी शिष्य पंडित बाळकृष्णशास्त्री, तसेच नागपूरचे श्रीयुत बापूसाहेब भवाळकर व हरिभाऊ नेने यांचीं नांवें सांगण्यासारखीं आहेत. कित्येक महानुभावी ग्रंथ यांनीं जमवून प्रसिद्ध केले आहेत. महाराष्ट्राच्या सामाजिक व वाङ्मयात्मक इतिहासाला महानुभावी वाङ्मय फार उपयोगी पडणारें आहे. त्यांत अनेक प्रकारचे तपशील असे आढळतात कीं, तसे दुसरे कोठेंहि सांपडत नाहींत. या वाङ्मयाच्या शोधाला नुकताच प्रारंभ झाला आहे व पुष्कळ महत्त्वाची माहिती यापुढें बाहेर पडेल अशी खात्री आहे. राजवाडे

यांच्या प्रेरणेनें भा. इ. सं. मंडळांत कै. गो. का. चांदोरकर व त्यांचे पुतणे आबा चांदोरकर आणि धुळ्याचे रा. जावडेकर असे त्रिवर्ग महानुभाव वाङ्मयाचे परिशीलक म्हणून काम करीत असत. 'महाराष्ट्र सारस्वत' ग्रंथाचे कर्ते ठाण्याचे प्रसिद्ध काव्येतिहाससंशोधक कै. विनायक लक्ष्मण भावे यांनीं बराच पैसा खर्चून व बरेच परिश्रम घेऊन महानुभावीय वाङ्मयाचें अज्ञात दालन खुलें केलें. लीळासंवाद, स्थानपोथी, ऋद्धिपूरवर्णन, पूजावसर वगैरे या पंथांतील कित्येक जुने ग्रंथ इतिहासाच्या दृष्टीनेंहि उपयोगी पडण्यासारखे आहेत. रामदेवराव यादवाच्या राज्यांतील घालमेलींचे उल्लेख महानुभावी वाङ्मयांत सांपडतात. तथापि साक्षात् इतिहासोपयोगी असा हा महानुभावी वाङ्मयाचा विषय नसल्यामुळें त्यासंबंधानें अधिक प्रपंच येथें करीत नाहीं.

## अन्यभाषीय साहित्य

मराठीप्रमाणेंच फारसी, ऊर्दु, कानडी, गुजराथी, बंगाली, पोर्तुगीज, इत्यादि भाषांत असलेल्या ऐतिहासिक साहित्यांतून मराठीमध्यें कांहीं भाग आणण्याचा जो प्रयत्न झाला आहे त्याचाहि विचार येथें केला पाहिजे. असें साहित्य फार थोडें आलें आहे आणि ही शाखा सर्वथा बाल्यावस्थेंत आहे. त्यांतल्या त्यांत फारसीसंबंधानें थोडें काम अधिक झालें आहे. पण फारसीमध्यें ऐतिहासिक साधनें अति विपुल असल्याकारणानें तेंहि काम अगदीं बाल्यावस्थेंत आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ग्रँट् डफ् वगैरे इंग्रजी इतिहासकारांनीं फारसी साधनांचा कांहीं उपयोग केलेला आहे. अर्थात् त्याच्या आधारानें झालेल्या ग्रंथांना साहजिकच त्याचा फायदा मिळालेला आहे. स्वतंत्रपणें फारसी तवारिखा वगैरे वाचून त्यांच्या आधारें लिहिलेले ग्रंथ गेल्या शंभर वर्षांत मराठींत होऊं नयेत, ही गोष्ट दुःखदायक असली तरी पुष्कळ सूचक व बोधप्रद आहे. पुण्यांत बंड्रनानांच्या पिढीपावेतों चांगलें फारसी ज्ञान असलेली थोडी तरी महाराष्ट्रीय मंडळी होती. पण एकंदरींत महाराष्ट्रांत फारसीचें पांडित्य नाहींच म्हटलें तरी चालेल. या उणीवेमुळें केवळ मराठी साधनांच्या साहाय्यानें इतिहासक्षेत्रांत मारलेली भरारी एकाच पंखानें उडण्याचा प्रयत्न करण्यासारखी लंगडी भासते. कोल्हापुरास कै. प्रो. बाळाजी प्रभाकर मोडक यांनीं दक्षिणेंतील शाह्यांचे इतिहास मराठींत प्रसिद्ध केले आहेत. त्यांत बुसातिने-सलातिन या फारसी इतिहासग्रंथाचा उपयोग केला आहे. बुसातिने-सलातिन या ग्रंथाचें मराठी भाषांतर जुन्या पिढींतच, बहुतकरून इंग्रजी अमलाच्या प्रारंभींच्या खंडांत,

तयार झालें होतें. बुसातिने ही फार उपयुक्त तवारिख आहे. हिचें ऊर्दू भाषांतर बडोदें सरकारांतून प्रसिद्ध झालेलें होतें. त्याची दाद पुढें बडोदें सरकारांतहि राहिली नाहीं. श्री. सौ. मातुश्री महाराणी चिमणाबाईसाहेब यांनीं रावसाहेब सरदेसाई यांचें लक्ष इकडे वेधलें व मग कांहीं प्रतींचा शोध लावण्यांत आला. हें ऊर्दू भाषांतर संग्राह्य आहे व अर्थातच उपयुक्त आहे. बाबरच्या आत्मचरित्रासारखें जगांत सर्वोत्कृष्ट ठरलेलें पुस्तक मराठींत अद्यापि आलें नाहीं. इतकेंच नाहीं, तर इलियट् व डॉसन् यांनीं अति परिश्रमानें फारसी तवारिखांतील उताऱ्यांनीं रचलेले असे हिंदुस्थानच्या इतिहासाचे आठ विभाग इंग्रजींत निबंधमालेच्या पूर्वीं छापलेले असून आणि भरपूर माहितीनें भरलेले असूनहि या बहुमोल खंडग्रंथांचा व्यासंग महाराष्ट्रीय विद्वानांत अल्पतरच दिसतो. वास्तविक घटकोघटकीं ज्याचा उपयोग लागावा असे हे विभाग आहेत, पण ते सारे इंग्रजींत आहेत. एकंदरींत फारसीकडे आणि त्यांतील साधनांकडे आमचें अतोनात दुर्लक्ष झालें आहे हें उघड होतें.

शिवाजीमहाराजासंबंधानें व एकंदरींत त्यांच्या काळासंबंधानें पुष्कळ अप्रसिद्ध माहिती फारसी तवारिखनाम्यांतून उपलब्ध आहे. विद्वानांचें लक्ष या गोष्टीकडे प्रथम वेधण्याचें खरें श्रेय सर यदुनाथ सरकार यांना आहे. परंतु राजवाडे यांनीं आधीं इतिहास किंवा चरित्रें न लिहितां मूळ साधनें शोधून काढण्याचा व प्रसिद्ध करण्याचा जो पायाशुद्ध आणि सशास्त्र रस्ता महाराष्ट्रास दाखविला तो सर यदुनाथ यांनीं अनुसरिला नाहीं. मूळ साधनें आधीं न छापतां फारशी साधनांच्या आधारें त्यांनीं शिवाजी व औरंगजेब यांचीं चरित्रेंच लिहिण्यास घेतलीं, यामुळें त्यांचा पंथ निराळाच झाला. तवारिखनामे वगैरेपेक्षां अखबारा, फर्मानें, सनदापत्रें वगैरे अस्सल साधनेंच जर मिळतील तर त्यांचें केव्हांहि अधिक महत्त्व आहे. हिंदुस्थानामध्यें कित्येक शतकें राजकीय व दरबारी व्यवहार फारसी भाषेच्या द्वारें होत असल्यामुळें साहजिकच पूर्वींच्या राजवटींतील अस्सल कागदपत्र—विशेषतः बादशाही काळांतलें असें—फारसींत पुष्कळच आहेत. शोधाअंतीं अशा कागदपत्रांची संख्या लाखांनीं मोजण्याइतकी भरेल इतकीं हीं साधनें विपुल आहेत. हीं फर्मानें, महजरनामे, अखबारा, वगैरे स्वरूपाचीं फारसी साधनें जमा करून प्रसिद्ध करण्याकडे भारत-इतिहास-संशोधक-मंडळानें बरेंचसें लक्ष पुरविलें आणि फारसी मुनशी मुद्दाम नेमून आपल्याकडील कांहीं मंडळींनाहि या विषयाचीं गोडी लावली. पैकीं पुण्याचे श्री. सरदार आबासाहेब मुजुमदार यांनीं पुष्कळ जुन्या जुन्या घराण्यांतून

फारसी साधनें मिळविलीं. खुद्द पुणें दरबारांत पेशव्यांचे पारसनीस असलेलें घराणें, जें सांप्रत त्याच आडनांवानें ओळखिलें जातें, त्यांच्या येथें शोधाअंतीं हजारों अस्सल फारसी कागदांचा भरणा आढळून आला. निजाम व पेशवे, पेशवे व ईस्ट् इंडिया कंपनी इत्यादिकांसंबंधानें या संग्रहांत बहुमोल कागदपत्रें आहेत. इंग्रज कंपनीहि आपला व्यवहार पेशव्यांशीं फारसींत करीत असे. हा सर्व पारसनीससंग्रह प्रसिद्ध होणें जरूरीचें आहे. परंतु हें काम अत्यंत श्रमाचें व खर्चाचें असल्यामुळें त्याची प्रगति खुंटून राहिल्यासारखी आहे.

फारसी साधनें शिवकालीन इतिहासास फारच उपयोगी आहेत. एक तर जसा पेशवेकालीन अस्सल राजकारणी पत्रव्यवहार बराच सांपडतो तसा शिवकालीन पत्रव्यवहार अद्याप सांपडत नाहीं आणि त्या काळाविषयीं आपली जिज्ञासा तर वाढली आहे. जुनीं शिवकालीन घराणीं शोधलीं असतां त्यांच्याजवळ साहजिकच फारसी कागद, सनदापत्रें वगैरे बरींच मिळावीं. राजवाडे यांनीं या शिवकालीन घराण्यांच्या शोधाला जोरानें सुरुवात १९१२ च्या नंतर केली आणि सारी नीरथडी व भीमथडी पुनः धांडोळली. मावळांत गरीबांच्या केंबळी झोंपड्यांत त्यांस शेंकडों कुळकटें, करीने, महजर व निवाडपत्रें मिळालीं. यांपैकीं अनेक पत्रांत प्रथम मूळ फारसी व खालीं त्याचा मराठी सारांश किंवा तर्जुमा, असा प्रकार आढळून येई. याप्रमाणें मिळालेले, फारसीची छाया असलेले, शेंकडों कागद अनेक खंडांतून राजवाड्यांनीं छापले आहेत. मूळ शुद्ध फारसी अस्सल कागद छापण्याचा उपक्रम भारत-इतिहास-संशोधक-मंडळानेंच केला. जेधे घराण्यांतील कागदपत्रांचा जो सांठा मंडळांतील एक उत्साही संशोधक श्री. सखाराम गणेश जोशी मावळणकर यांनीं मिळविला तो पाहून ही प्रथा वाढत गेली. कारी, पेडगांव वगैरे स्थळांचें वजन संशोधकांत वाढलें. अलीकडील संशोधक आतां फारसी कागद टाकून देत नाहींत. भा. इ. सं. मंडळांत तर रा. गणेश हरी खरे या तरुण व व्यासंगी संशोधकानें फारसी भाषेचा बराच अभ्यास करून तीं साधनें शास्त्रीय रीतीनें प्रसिद्ध करण्याची आपली तयारी सर्वांच्या निदर्शनास आणिली आहे. रा. खरे यांच्या या तयारीमुळें मंडळाचाहि उत्साह वाढून ऐतिहासिक फारसी साहित्याचे लहानमोठे २।३ खंड मंडळानें प्रसिद्ध केले आहेत आणि तें काम मंडळांत रोज वाढत्या प्रमाणांत चालू आहे. पुढेंमागें फारसी संशोधनाची शाखा फारच विस्तृत होईल याविषयीं शंका नाहीं. मागें सांगितलेल्या पेशव्यांच्या पारसनीस घराण्यांतील

श्री. सरदार बाळासाहेब फारसनीस यांच्या दप्तरांतील साधनांचा एक खंड मूळ व मराठी भाषांतर असें देऊन सरदार मुजुमदार यांच्याकडून संपादन करून घेऊन मंडळानें प्रसिद्ध केला आहे. त्याचप्रमाणें आदिलशाही फर्मानांचा एक मोठा अपूर्व सांठा रा. शं. ग. दाते यांच्या कृपेनें आमच्या हातीं आलेला मंडळाकडून प्रसिद्ध करविण्याचा योग कधीं येईल, त्याची आम्ही वाट पाहत आहोंत. हीं सुमारें सातशें फर्मानें आहेत आणि आदिलशाही इतिहासाच्या उद्बोधनास त्यांचा उपयोग विशेषच होईल. हा संग्रह केवळ अद्वितीय आहे.

शिवकालीन मराठी साधनांत व पेशवेकालीन साधनांत पुष्कळ फारसी शब्द मराठी बनून मराठींत शिरलेले आढळून येतात. या शब्दांचा नेमका अर्थ व यांचें मूळरूप व्यवस्थित तऱ्हेनें शोधून काढून उदाहरणांसह तयार केलेला त्यांचा एक कोश मंडळानें प्रसिद्ध केला आहे. हा कोश फारसी व मराठी दोन्ही वाङ्मयांतील रसिक विद्वान् प्रो. माधव त्रिंबक पटवर्धन यांनीं तयार केला आहे. प्रो. पटवर्धन यांचा हा ग्रंथ त्यांच्या परिश्रमाची व विद्वत्तेची उत्तम साक्ष देणारा आहे. फारसीप्रमाणें ऊर्दूमध्येंहि तवारिखा वगैरे साधनें सांपडतील व त्यांचाहि असाच परामर्ष घ्यावयाला पाहिजे. परंतु फारसीच्या कामाच्या पोटांतच तें काम येतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. उस्मानिया विद्यापीठामुळें निजामशाही मराठवाड्यांतील व्यासंगी मंडळींना या कामीं पुढें येण्यास एक नवी सोय झाली पाहिजे. त्यांच्याकरिता हें काम जणुं वाट पाहत बसलें आहे !

## देवस्थानांचे इतिहास

देवस्थानांचे कांहीं इतिहासहि मराठींत प्रसिद्ध झालेले आहेत व कांहीं क्षेत्रांचीं वर्णनेंहि प्रसिद्ध झालेलीं आहेत. शांतादुर्गा ( गोवें ), पंढरपूर, नाशिक, काशी, करवीर इत्यादि क्षेत्रांची व तेथील देवस्थानांची माहिती असलेलीं पुस्तकें मराठींत आहेत. परंतु तीं सामान्य प्रकारचींच आहेत. इतिहासाच्या शास्त्रीय अभ्यासकास त्यांचा उपयोग अगदीं प्राथमिक स्वरूपाचाच होण्याजोगा आहे. भारत-इतिहास-संशोधक-मंडळांतील रा. खरे यांनीं आळंदीवर एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे, तें शास्त्रीय दृष्टीचें आहे. रा. कुळकर्णीकृत ‘ तुळजापूरचें वर्णन ’ हा ग्रंथ उपयुक्त आहे. नाशिक येथील ‘ बालाजी संस्थान ’चा इतिहास कागदपत्रांसुद्धा श्री. गोसावी बालाजीवाले यांनीं चांगल्या प्रकारें प्रसिद्ध केला आहे. हें त्यांस भूषणावह आहे. पौराणिक पद्धतीचीं क्षेत्रमाहात्म्यें कित्येक प्रसिद्ध

आहेत. परंतु त्यांचा ऐतिहासिक दृष्ट्या उपयोग आज तरी विशेष होत नाहीं. पुढें-मागें रा. विष्णुपंत करंदीकरांसारखा गृहस्थ त्यांतूनहि कांहीं उपयुक्त माहितीचे दुवे उकलून इतिहासास जोडूं शकेल. परंतु या कामीं मोठमोठ्या देवस्थानांच्या पंच मंडळींनीं लक्ष पुरविलें पाहिजे. पैठण, आळंदी, देहू, पंढरपूर, पर्वती, चिंचवड इत्यादि अनेक लहानमोठ्या देवस्थानांची व्यवस्था निरनिराळया प्रकारच्या पंच मंडळींकडे आहे. त्यांनीं आपलीं दप्तरें वगैरे नीट शास्त्रीय रीत्या लावून, तज्ज्ञांकडून शोधून, आपापल्या देवस्थानांचे विस्तृत व विश्वसनीय इतिहास प्रसिद्ध केले पाहिजेत. मोरया देव संस्थान चिंचवडसंबंधीं माहिती (ले. द. वा. पोतदार, भा. इ. सं. मं. त्रै. जून १९२२), नींब—सदानंद (राजवाडेकृत म. इ. सा. खंड १५, पृ. १२१-२६७) असे झालेले फुटकळ प्रयत्न या कामीं अधुरे व अपुरे पडतात. राजकीय संस्थानांप्रमाणेंच धार्मिक संस्थानांचेहि इतिहास महत्त्वाचे आहेत. किंबहुना आमच्या देशाच्या इतिहासांत तर तो विशेषच आहे.

शब्दव्युत्पत्तिसंशोधन हाहि एक इतिहासाचा जरा दूरचा म्हटला तरी महत्त्वाचा भाग आहे. शब्देतिहास हें एक इतिहासाचेंच उपांग आहे. हें कामहि मराठींत फारच थोडें झालेलें आहे. राजवाडे, रा. रा. भागवत, शि. म. परांजपे, वि. रा. शिंदे, गो. कृ. मोडक, निसुरे, चिंतामणराव वैद्य, डॉ. भांडारकर, गुणे, कृ. पां. कुलकर्णी प्रभृति विद्वानांनीं याविषयीं कांहीं शोध केलेले आहेत. राजवाडे यांनीं आपला वसाहतकाळचा इतिहास व्युत्पत्तीच्या बळावरच सजविलेला आहे. रा. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी यांनीं लिहिलेला ‘ मराठी भाषेचा उद्गम व विकास ’ हा संकलनपर ग्रंथ अत्यंत उपयुक्त व उच्च दर्जाचा झालेला आहे. ज्ञानकोशाचे धर्तीवर शब्दकोश-मंडळ स्थापन होऊन मराठीचा बृहत्कोश तयार होत आहे व त्याचे संपादक रा. कर्वे दाते, चांदोरकर इत्यादिकांचें महत्त्वाचें संकलनपर कार्य चालू आहे. यापुढील काळांत शब्देतिहासाचें मोठें कार्य घडून यावयास पाहिजे आहे व तिकडे विद्वानांचें अधिकाधिक लक्ष्य जाईल अशी उमेद आहे.

## स्थलनिश्चय

इतिहासांत स्थलनिश्चयाला अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे; किंबहुना कोणतीच ऐतिहासिक घटना स्थलनिश्चयावांचून निश्चित होणें दुरापास्त आहे. या विद्येंत हिंदुस्थान फारच मागासलेला आहे. देशाची क्षेत्रमोजणी व स्थलांचे दिङ्‌निश्चय व चित्रेरेखन यांविषयीं पूर्वीच्या काळीं राहोच परंतु हल्लींच्या नव्या विद्येच्या

काळांतहि आमच्याकडे कांहींच प्रयत्न होत नाहींत. यामुळें हें सदर कोरें आहे म्हटलें तरी चालेल. इंग्रज सरकारानें व कित्येक इंग्रज प्रवाशांनीं व शोधकांनीं या विभागांत पुष्कळ माहिती प्रसिद्ध केली आहे व नकाशांची आवश्यक जोडहि त्यास दिली आहे. युद्धेतिहासाला तर भूमिचित्रें, नतोन्नत भागांसुद्धां काढलेलीं, अत्यंत आवश्यक असतात. अलीकडे नवीन तऱ्हेचे खडीचे रस्ते आंखून तयार झालेले आहेत आणि लोखंडी मार्गहि बनलेले आहेत. परंतु जुने मार्ग यामुळें पुष्कळ बदलावे लागले आहेत. पूर्वीचे प्रवासमार्ग कसे होते आणि दळणवळण कसें चालत होतें याचें तपशीलवार ज्ञान इतिहासाभ्यासकास जरूर आहे. साध्या कागदावर स्थूलमार्गानें रेघोट्यांच्या रूपानें जुन्या काळांत काढलेले कांहीं नकाशे भा. इ. सं. मंडळाच्या संग्रहीं आहेत. परंतु बारीक मोजणीमापणी करून प्रमाण व दिशा बिनचुक दाखविणारे नकाशे युरोपियनांनींच प्रथम तयार केले आहेत. अद्यापिहि कित्येक देशी संस्थानांत क्षेत्रमोजणी व क्षेत्रचित्रण शास्त्रीय रीत्या न झाल्यानें आपल्या ज्ञानांत फारच उणीव राहिली आहे. मराठींत याबद्दल कांहींच लिखाण नाहीं व या विद्येचे अभ्यासकहि कोणी दिसत नाहींत. पूर्वी कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं एक प्राचीन भारतवर्षीय भूवर्णन लिहिलेलें प्रसिद्ध आहे. रा. शेजवलकर व कॅ. मोडक यांनीं कांहीं काम केलें आहे. परंतु या विद्येचा श्रीगणेशा त्यांनीं आम्हांस शिकविला असें देखील म्हणतां येत नाहीं. भूगोलविषयाच्या शिक्षणास हल्लीं अधिकाधिक महत्त्व देण्यांत येत आहे, तेव्हां आतां त्याची इतिहासाशीं सांगड घालून या विषयाचा भरीव अभ्यास करण्याकडे लक्ष लागण्याचे आशादायक दिवस जवळ येत चालले आहेत असें वाटतें.

## विषयेतिहास

### लष्करी इतिहास

इतिहासाची वास्तविक कल्पना फारच व्यापक असल्यामुळें वाङ्मयिक, आर्थिक वगैरे शाखांचा इतिहासहि त्याच सदरांत येतो. या सर्वांगपरिपूर्ण इतिहासासाठीं लष्करी इतिहास, कलाकौशल्याचा इतिहास वगैरे अनेक प्रकारचे इतिहास व्हावयास पाहिजेत आणि तसें कांहीं वाङ्मय मराठींत झालेंहि आहे. लष्करी इतिहासाची शाखा ग्वाल्हेर आर्मींतील तडफदार विद्वान् कॅप्टन मोडक यांनीं जोरानें हातीं घेतली आहे. 'प्रतापगडचे युद्ध' या नांवाचा त्यांचा मोठा ग्रंथ प्रसिद्ध आहे. यांत मुख्यतः लष्करी शास्त्राच्या दृष्टीनें आणि जुन्या कागदपत्रांच्या आधारानें प्रतापगडचें युद्ध

सविस्तर रीतीनें वर्णन करण्याचा ग्रंथकारानें फार परिश्रमपूर्वक प्रयत्न केला आहे. या दृष्टीनें लिहिलेला दुसरा ग्रंथ मराठींत नाहीं. कॅप्टन् मोडक यांनी खर्डा, तळेगांव, महाराजपुर वगैरे मराठी रणभूमि प्रत्यक्ष जाऊन, निरीक्षून व कागदपत्रांतील वर्णनाचा मेळ प्रत्यक्षाशीं पाहून, मराठ्यांचें युद्धशास्त्र कसें होतें त्याचें चित्र तयार करून आपल्या विषयावरील ग्रंथांची कच्ची सामग्री तयार केली आहे. लष्करी इतिहास हा मराठी इतिहासाचा प्राणभूत असा भाग आहे. हिंदुस्थानांत शेंकडों शूर लोकांनीं आणि वीरांनीं जगांतील कोणत्याहि ठिकाणच्या शूर लोकांस अभिमान वाटेल अशा लढाया मारल्या आहेत. इतर अनेक कलांप्रमाणें युद्धकलाहि प्रत्यक्ष पिढी दरपिढीच्या अनुभवानेंच हिंदुस्थानांत जगविली गेली आहे. दुःखाची गोष्ट मात्र अशी कीं, कलेला मूलभूत जें शास्त्र तें उपपत्तिपूर्वक आमच्यामधून मागेंच लुप्त झालें आणि यांतच हिंदुस्थानच्या अधःपाताचें खरें बीज आहे. पुन्हां जेव्हां हिंदुस्थान आपलीं शस्त्रें आपल्यासाठीं निर्माण करील तेव्हांच हिंदुस्थानची परतंत्र स्थिति नाहींशी होईल.

लष्करी इतिहासासंबंधानें दुसरें घेण्याजोगें नांव म्हणजे बडोद्याचे सेनापति श्री. नानासाहेब शिंदे यांचें होय. नानासाहेबांनीं हिंदुस्थानांतील लढायांसंबंधानें एक व पानिपतच्या युद्धासंबंधानें एक, असे दोन ग्रंथ लिहिले आहेत व अधूनमधून लष्करी दृष्टीनें माहिती देणारे व विवेचन करणारे लेखहि ते लिहीत असतात. असे प्रयत्न हे कितीहि अभिनंदनीय असले तरी लष्करी शाखेच्या इतिहासाची भूक अशा फुटकळ प्रयत्नांनीं भागणार नाहीं. हिंदुस्थानचें राष्ट्र हें बिनलष्करी बनविल्यापासून या विषयाकडे आमची सर्वस्वीं डोळेझांक झाली आहे. उदाहरणाकरितां एकच गोष्ट सांगतों. आमचे पूर्वज युद्धाचीं हत्यारें वापरीत त्यांचीं शेंकडों नांवें ग्रंथांत येतात. परंतु त्या नांवांनीं दर्शविलेल्या वस्तु फारच थोड्यांना माहित असतात. आमच्या संस्थानिकांच्या संग्रहीं शेंकडों हत्यारें कोठें कोठें ठेविलेलीं आहेत. परंतु या हत्यारांची सचित्र माहिती देणारा असा एकहि मराठी ग्रंथ अद्याप प्रसिद्ध झालेला नाहीं. इतकेंच नाहीं, तसा ग्रंथ लिहिण्याची भाषाहि कोणी बोलत नाहीं. असा ग्रंथ तावडतोब तयार करविण्याविषयीं श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्यासारख्यांनीं मनावर घ्यावें, अशी त्यांस आमची आग्रहाची विनंति आहे. बडोद्याचे श्री. माणिकराव यांच्यासारखे या विषयांतील तज्ज्ञ गृहस्थ विद्यमान आहेत. आम्हीं दुर्लक्ष्य केलें तथापि आमचा जणूंकाय सर्व भारच ज्यांनीं आपल्या अंगावर घेतला आहे ते इंग्रज विद्वान् यांनीं ब्रिटिश्

म्युझिअम् नांवाच्या अजबखान्यांतील हिंदी हत्यारांचें एक सचित्र वर्णनपुस्तक प्रसिद्ध केलें आहे आणि आम्हांस लाजविलें आहे. नुसत्या हत्यारांच्या वर्णनाचें पुस्तकच नाहीं, तर लष्करी शास्त्र, युद्धभूमि, नकाशे, हालचाली, व्यूह, जल, स्थल, आणि आकाशयुद्ध इत्यादि अनेक विषयांचाहि कांहींच विचार आमच्याकडे होत नाहीं. हा आमच्या बुद्धिमत्तेसहि मोठा कलंक लागला आहे असें समजलें पाहिजे. स्वतंत्र ग्रंथ राहोत, भाषांतरें तरी करणें अवघड नाहीं. पण कै. प्रो. शिवराम महादेव परांजपे यांनीं लिहिलेलें ' मराठ्यांच्या लढायां'वरील पुस्तक सोडलें तर ब्लॅकरच्या मराठी युद्धावरील इतिहासाचा उपयोग करून लिहिलेलें दुसरें इतकें सविस्तर पुस्तक दाखवितां येणार नाहीं. इंग्रजीमध्यें मराठा युद्धासंबंधानें माहिती शास्त्रीय पद्धतीनें ज्यांत दिली आहे असे कितीतरी सरकारी व बिनसरकारी ग्रंथ मिळण्यासारखे आहेत. लष्करी शिक्षणाचा विषय विद्यापीठांतील अभ्यासक्रमांत दाखल झाल्याशिवाय लोकांचें लक्ष जावें तितकें इकडे जाणार नाहीं आणि लष्करी शिक्षणांत लष्करी इतिहासाशिवाय जिवंतपणा येणार नाहीं. असा हा लष्करी इतिहास हिंदुस्थानच्या रणक्षेत्रांचाच इतिहास असला पाहिजे, हें कोणासहि सहज पटण्यासारखें आहे.

महाराष्ट्राच्या लष्करी इतिहासांत किल्ल्यांचें महत्त्व विशेष आहे. परंतु महाराष्ट्रांतील किल्ल्यांचें फक्त एकच वर्णनपुस्तक कै. गोगटे यांनीं केलेलें प्रसिद्ध आहे. किल्ल्यांची माहिती क्रमवार जमवून देण्याचा आणखी एक प्रयत्न मुंबईच्या श्रीशिवाजी-त्रिशत-सांवत्सरिक ग्रंथावलीच्या ग्रंथांत करण्यांत आला आहे.

## आर्थिक इतिहास

आर्थिक इतिहासाविषयीं वस्तुतः पुष्कळ साहित्य उपलब्ध आहे, परंतु त्याचे अभ्यासकच अजून कोणी पुढें आले नाहींत. राजवाड्यांचे आक्षेपक ज्याला तेलातुपाचीं पत्रें म्हणत ती वास्तविक आर्थिक इतिहाससंशोधनाची साहित्यसामग्री होती. पेशवे दप्तरासारख्या दौलती दप्तरांतून ( State Records) आर्थिक प्रश्नांच्या अभ्यासाला लागणारी सामग्री अफाट पडलेली आहे. युरोप्मध्यें हॉलंड्, इंग्लंड् वगैरे देशांतील ईस्ट् इंडिया कंपन्यांचे दप्तरखानेहि या प्रकरणीं पुष्कळच माहिती पुरवतील. अशी कांहीं माहिती विलायतेंत इतिहास, अर्थशास्त्राच्या पदवीप्रबंधांच्या निमित्तानें आमच्याकडील कांहीं तरुण विद्वानांनीं अभ्यासली आहे; परंतु देशी भाषांतील माहितीशीं तिचा पडताळा कोणीं पाहिलेला नाहीं. महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन झाल्याशिवाय इकडे

पाहिजे तेवढें लक्ष पुरविलें जाण्याची आशा नाहीं. जर्व्हिस्च्या वेळीं वजनामापाच्या ज्या चौकशा झाल्या त्यांचीं कांहीं कोष्टकें मराठींतहि प्रसिद्ध झालीं आहेत. तदनंतर न्या. रानड्यांनीं पेशवेदप्तरची पहाणी करून जीं टिपणें प्रसिद्ध केलीं त्या इंग्रजी टिपणांत पेशवाईंतील आर्थिक प्रश्नांविषयीं कांहीं विचार व माहिती ग्रथित केलेली आहे. डॉ. मॅन् व त्यांचे मदतनीस प्रो. कानिटकर यांनीं कांहीं गांवांची पाहणी करतांना ऐतिहासिक व आर्थिक माहिती व तुलनात्मक विचार इंग्रजींत प्रगट केलेले आहेत. त्यांचा अनुवाद मराठींत सविस्तर व संपूर्ण झालेला नाहीं. अलीकडे रावसाहेब चापेकर यांनीं 'आमचा गांव' ग्रंथांत बदलापूरबद्दल कागदपत्र शोधून ऐतिहासिक व आर्थिक विभागाची माहिती मुद्दाम दिली आहे. खाजगीवाले यांचे जमाखर्च व चिपळुणकर सावकारांचे जमाखर्च भा. इ. सं. मंडळाचे संग्रहीं आहेत. त्यांचा अल्प परामर्ष रावसाहेब चापेकर यांनीं निरनिराळ्या लेखांतून घेतलेला आहे व हे लेख 'पेशवाईच्या सावलींत' या नांवानें संकलित ग्रंथरूपानें स्वतंत्रपणें छापत आहेत. प्रो. वा. गो. काळे, व प्रो. चिं. व. जोशी यांनीं मंडळासमोर आर्थिक विषयावर कांहीं निबंध वाचले आहेत.

आर्थिक विषयाच्याच पोटांत चलनाचा प्रश्न येतो. त्या दृष्टीनें नाण्यांचा विचार आर्थिक विचार करणारास करावाच लागतो. परंतु नाण्यांच्या अभ्यासापासून प्रत्यक्ष इतिहासाला कालस्थलादिकांची जी निश्चिती आणतां येते त्या दृष्टीनें नाण्यांच्या अभ्यासाचें महत्त्व स्वतंत्र आहे. मोठ्या खेदाची गोष्ट आहे कीं, नाणकशास्त्राचा अथवा मुद्राशास्त्राचा अभ्यास महाराष्ट्रीय संशोधकांनीं प्रायः केला नाहीं म्हटलें तरी चालेल. एवढे अनेकविषयपरामर्षी राजवाडे परंतु त्यांनींहि नाण्यांचा अभ्यास दुर्लक्षिला हें आश्चर्य होय. बरींच नाणीं जमा करून त्यांचा संग्रह आपण आपल्या एका मित्राच्या हवालीं केला असें राजवाडे आमच्याजवळ हळहळत असत. पुढें तो संग्रह नाहींसाच झाला म्हटलें तरी चालेल. नाणीं, चित्रें, हत्यारें, वगैरे वस्तूंचा संग्रह राजवाडे, खरे किंवा साने यांनीं केलाच नाहीं म्हटलें तरी चालेल. पारसनीस मात्र इकडे थोडें लक्ष देत असत. मावजीशेट यांनीं दुर्मिळ वस्तूंचा संग्रह बराच केला होता. हरगोविंद पारख यांनीं वस्त्रांचा अपूर्व संग्रह केला होता. जमखंडी येथें नाण्यांचा संग्रह बराच मोठा आहे; अक्कलकोटास हत्यारांचा संग्रह अपूर्व आहे; प्रिन्स ऑफ वेल्स् म्युझियम्, मुंबई, मध्येंहि नाण्यांचा व हत्यारांचा मोठा संग्रह आहे. महाराष्ट्राबाहेर ज्या ऐतिहासिक संग्रहशाळा आहेत त्यांत व तसेंच कलकत्ता, दिल्ली, लाहोर

वगैरे ठिकाणीं, मराठ्यांच्या इतिहासास उपयोगी पडेल असें पुष्कळ साहित्य मिळण्याचा बराच संभव आहे. अनेक युरोपियन लोकांनीं लक्षावधि वस्तु परदेशीं नेल्या आहेत, त्यांचा शोध तिकडील संग्रहालयांतून बारकाईनें केला पाहिजे. परदेशांत जाणाऱ्या हिंदी लोकांनीं विशेषतः विद्यार्थिवर्गानें ही कामगिरी करण्यासारखी आहे.

पुनः भा. इ. सं. मंडळाचेंच नांव घेण्याचा प्रसंग येत आहे त्याला इलाज नाहीं. नाण्यांचा संग्रह मुंबईस रॉयल एशियाटिक सोसायटींत मोठा आहे आणि गुप्तधन-प्राप्ति (Treasure Trove Act) च्या कायद्याअन्वयें सरकारहि या संग्रहास मदत करीत असतें. मुंबईस नाणकसंशोधनमंडळ म्हणजे न्युमिस्मॅटिक ॲसोसिएशन आहे. तिच्या मार्फत नाण्यांचा संग्रह व अभ्यास इंग्रजींतून चालतो. प्रो. होडीवाला-प्रभृति मुंबईकडील तज्ज्ञ विद्वान त्यांत लक्ष घालीत असतात; परंतु मागें सांगितल्या-प्रमाणें मराठी विद्वान् मात्र नाणकशास्त्र[1] अस्तित्वांत तरी आहे किंवा नाहीं इतकें त्यासंबंधानें बेफिकिर दिसतात.

## कै. रामभाऊ गाडगीळ

पण महाराष्ट्राचा असा एक चमत्कारिक पायगुण आहे कीं, येथें एखाद्या विषयाचें वेड घेऊन दारिद्र्यादि आपत्तींस न जुमानतां आपला जन्म त्या वेडाच्या मागें लाग-ण्यांतच घालविणारे लोकविलक्षण पुरुष आढळून येतात. मुंबईस पोष्ट खात्यांत काम करणारे कै. रामभाऊ गाडगीळ हे गृहस्थ अशाच कोटींत पडतील. नाणीं जमा करण्याचा नाद या गृहस्थांस सहज क्षुल्लक कारणानें लागला. पुढें तोच अत्यंत बळावून तांब्याच्या नाण्यांचा एवढा अपूर्व संग्रह त्यांनीं केला कीं, तसा संग्रह साऱ्या हिंदुस्थानांत कोणाजवळहि नसेल. हा संग्रह त्यांनीं मोठ्या व्यवस्थेनें ठेवला होता, परंतु राष्ट्रार्पणबुद्धीनें त्याची व्यवस्था करण्याविषयीं आम्हीं अनेकवार घात-लेली गळ त्यांनीं स्वीकारिली नाहीं आणि त्यामुळें तूर्त तरी आपलें मोठें नुकसान झालें आहे. त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट इतकीच कीं, आपल्या संग्रहांतील नाण्यांच्या सचित्र हस्तरेखित पुस्तकांचे दोन बांधीव बहुमोल खंड त्यांनीं भा. इ. सं. मंडळास अर्पण केले आहेत. तेवढ्यानें त्यांच्या नाण्यांच्या संग्रहाविषयींचें ज्ञान आपल्या पदरांत पडण्याजोगें आहे.

---

१. रा. गोखलेकृत व्यवहारदर्पण यांत नाण्यांविषयीं थोडी सचित्र माहिती आलेली आहे ( सुमारें सन १८५४ ).

## मंडळांतील नाणीं

रा. गाडगीळ यांची माहिती होण्यापूर्वी भा. इ. सं. मंडळांत रा. बा. सी. बेंद्रे यांनीं नाण्यांच्या अभ्यासास प्रारंभ केला होता. परंतु मंडळसंग्रहांतील सर्व नाणीं व्यवस्थित रीतीनें अभ्यासून त्यांच्या शास्त्रीय परामर्षाचें स्वतंत्र पुस्तक तयार करण्याचें महत्त्वाचें कार्य मंडळांतील संशोधक रा. गणेश हरि खरे यांनींच चांगल्या रीतीनें शेवटास नेलें आहे. ‘ मंडळांतील नाणीं ’ हा ग्रंथ या दृष्टीनें अगदीं अपूर्व आहे. नाण्यांच्या सशास्त्र अभ्यासास या ग्रंथामुळें प्रारंभ झाला तरी मोठें कार्य झालें असें म्हणतां येईल.

## शिल्पसंशोधक वझे

जीवनांत शिल्पाचें महत्त्व अपरंपार आहे. शिल्पाची आमच्याकडील प्राचीन व्याख्याहि व्यापक आहे. परंतु मराठीमध्यें शिल्पसंशोधनासंबंधानें विषयाच्या महत्त्वाच्या आणि व्यापाच्या मानानें सांगण्यासारखें असें महत्त्वाचें कांहींच झालें नाहीं. या सामान्य विधानाला एका महनीय नांवाचा अपवाद केला पाहिजे. तें नांव म्हणजे कै. कृष्णाजी विनायक वझे यांचें होय. कै. वझे हे एल्. सी. ई. असून सरकारी नोकर होते. हे नोकरींत असल्यावेळेपासून त्यांना शोधाची आवड होती. प्राचीन शिल्पाचे आश्चर्यजनक नमुने सर्व हिंदुस्तानभर पसरलेले आहेत आणि त्यांची अनेक परकीयांनीं स्तुति केलेली आहे. परंतु आमच्या अक्षम्य दुर्लक्ष्यामुळें आणि परकीय शिल्पाचा झपाट्यानें प्रसार झाल्यामुळें आमचें सर्व शिल्प हळुहळू बुडालें. इतकें कीं, आतां त्याचें पुनरुज्जीवन करणें ही फार खर्चाची व त्रासाची गोष्ट होऊन बसली आहे.

प्राचीन शिल्पांत केवळ प्राचीन कालच्या लोकांनाच सुख देण्याची शक्ति होती असें नाहीं, तर अर्वाचीन कालच्या सुधारलेल्या शिल्पालाहि त्यापासून कांहीं शिकण्यासारखें आहे, असें त्या शिल्पाच्या अभ्यासावरून हळुहळू प्रत्ययास येत आहे. आग्रा, वेरूळ, मदुरा, अजंठा, कार्लें, वगैरे स्थळीं जे हिंदी शिल्पाचे सर्वस्तुत नमुने अद्यापहि उभे आहेत ते त्याच्या वैशिष्ट्याची साक्ष देत आहेत. युरोपियन लोकांनीं त्यांचा अभ्यास करण्यांत आणि आमच्या लोकांनीं त्याचा अभ्यास करण्यांत साहजिकच पुष्कळ अंतर पडणार. काठेवाड, पंजाब वगैरे प्रांतांत अद्यापहि जुनें शिल्प जीव धरून आहे; परंतु त्याचा लक्षपूर्वक अभ्यास आमच्या महाराष्ट्रांत तरी पहिल्या प्रथम रा. वझे यांनींच सुरू केला. कश्यप, मय आणि भृगु यांच्या संहिता शोधून काढून आणि एकंदरीनें जुन्या शिल्पाची सरहस्य

माहिती जनतेपुढें यावी या दृष्टीनें, कै. वझे यांनीं इंग्रजी आणि मराठीमध्यें पुष्कळ लेख प्रसिद्ध केले. एक शिल्प ग्रंथमालाच मराठींत व इंग्रजींत प्रसिद्ध करावी असा त्यांचा विचार होता. पुन्हां भा. इ. सं. मंडळाचा उल्लेख केला पाहिजे. कारण त्या संस्थेनें वझे यांच्या प्रयत्नांचा पुरस्कार करून हिंदी शिल्पशास्त्र खंड १ ला हा ग्रंथ प्रसिद्ध केला. पुढें दुर्दैवानें कै. वझे हे वारल्यामुळें तूर्त तरी शिल्पसंशोधनाचें कार्य महाराष्ट्रांत थांबल्याप्रमाणेंच आहे. खुद्द मराठी अमलांतील शिल्पाविषयीं अद्यापपर्यंत कांहींहि प्रयत्न झाला नाहीं. यादवांच्या वेळेपासून तों आतांपर्यंत मराठी शिल्प कसकसें वाढत, बुडत किंवा बदलत गेलें तें पाहणें उद्बोधक होईल. मंदिरशिल्प, गृहशिल्प, दुर्गशिल्प, नाविकाशिल्प वगैरे अनेक शाखांतील मराठी अमलांतील शिल्पांचे नमुने अजूनहि प्रयत्न केला तर जतन करतां येतील. अभ्यास मागाहून होईल. पण आधीं ते जतन तरी व्हावयास पाहिजेत. आमच्या संस्थानिकांचें याकडे अक्षम्य दुर्लक्ष आहे. ते रक्षण तर करीत नाहींतच, परंतु जुन्या शिल्पाचे नमुने मोडून टाकीत आहेत व मोडून टाकूं देत आहेत. महाराष्ट्रांत, येथल्याच भूमींतील वाढलेलें शिल्प विशेष कुसरीचें नाहीं; पठाणांच्या शिल्पाप्रमाणें तें साधें, भक्कम व ओबडधोबड आहे, विलासी व नाजूक नाहीं. शिल्पाचीं अनेक अंगें आहेत आणि हा विषय फार मोठा आहे. शिल्पाचा व्यवसाय करणारे लोक काव्यादिकांचा व्यवसाय करणाऱ्या लोकांपेक्षां द्रव्यदृष्ट्या अधिक संपन्न आहेत. त्यांच्या कर्तव्याची जाणीव देऊन त्यांस तदुन्मुख करण्याचा प्रयत्न करणारे एक वझे गेले, दुसरे केव्हां पुढें येतील ?

## ज्योतिर्विदग्रणी कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित

ज्योतिषशास्त्राच्या शाखेंत कै. केतकर, कै. श्री. कृ. कोल्हटकर प्रभृतींनीं चांगलें कार्य केलें. परंतु कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं 'भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास' प्रसिद्ध करून चिकित्सक विद्वत्तेचा जो झगझगीत आदर्श पुढें ठेविला त्याला क्वचितच तोड सांपडेल. पाश्चात्य विद्वानांनींहि तो पाहून माना डोलाविल्या. हा ग्रंथ म्हणजे मराठी संशोधकांच्या कर्तृत्वाची एक वंदनीय ध्वजा आहे.

## चित्रकला

चित्रकलेचा अभ्यास हा नाण्यांच्या अभ्यासाप्रमाणें मराठी लेखकांनीं उपेक्षिलेला प्रांत होता. परंतु औंधच्या सुविद्य अधिपतींच्या प्रोत्साहनानें तेथील एक

तरुण श्री. दाभाडे यांनीं भारतीय चित्रकलेवर एक लहानसा परंतु सुंदर सचित्र ग्रंथ तयार केला आहे. आरंभ झाला हें उत्तम झालें.

पद्धतिग्रंथ

इतिहासशास्त्रावर मराठींत विशेष वाङ्मय निर्माण झालें नाहीं. पूर्वी ग्रंथ मालेंत ( १९०५ ) रा. के. मो. पंडित यांनीं ऐतिहासिक पद्धतीवर एक लहानसा ग्रंथ प्रसिद्ध केला होता. तदनंतर रा. बा. सी. बेंद्रे यांनीं 'साधनचिकित्सा' नांवाचा ग्रंथ भा. इ. सं. मंडळ पुरस्कृत ग्रंथमालेंत प्रसिद्ध केला. हा ग्रंथ नवीनांस निःसंशय मार्गदर्शक झाल्याशिवाय राहणार नाहीं.

## लौकिक व प्राकरणिक इतिहास

अव्वल इंग्रजींत झालेलें ग्रँट् डफ्चें मराठी भाषांतर सोडून दिलें तरी बाळशास्त्री जांभेकर आणि रावसाहेब मंडलिक यांच्यासारख्या पहिल्या बुद्धिवान माणसांनीं एल्फिन्स्टन्साहेबांच्या पुस्तकांवरून शालोपयोगी इतिहास रचण्याचेंच कार्य केलें. असे शालोपयोगी ग्रंथ त्या वेळीं नवीन पद्धतींचें शिक्षण सुरू झालें होतें, त्यासाठीं अवश्य होते. पुढें दुर्दैवानें शिक्षणांत इंग्रजी माध्यमाचा अवलंब करण्यांत आला, त्यामुळें बरेच दिवस शालोपयोगी इतिहासहि फारसे कोणीं लिहिले नाहींत. परंतु देशी भाषांचाच माध्यम या नात्यानें पुरस्कार लोकपक्षानें जोरानें केल्यावर अलीकडील पंधरा वीस वर्षांत शालोपयोगी इतिहासाचे बरेच ग्रंथ तयार होत आहेत. या ग्रंथांची रचना अर्थातच शालेय अभ्यासक्रमास अनुसरून केलेली असते. यामुळें हिंदुस्थानच्या इतिहासाबद्दल ठोकळ माहिती देणारे ग्रंथ कित्येकांनीं लिहिले आहेत. परंतु महाराष्ट्राचा इतिहास स्वतंत्रपणें शालेय अभ्यासक्रमांत समाविष्ट नसल्यामुळें तिकडे ग्रंथकारांची दृष्टि वळावी तितकी वळल्याचें दिसून येत नाहीं. शाळांत ज्यांचा इतिहास फार दिवस चालत होता ते कै. चिं ग. गोगटे यांनीं अकबर, औरंगझेब, नानासाहेब पेशवे, शाहू यांचीं चरित्रें प्रसिद्ध केलीं होतीं. त्यांवरून व त्यांच्या किल्ल्यांच्या वर्णन-ग्रंथावरून त्यांस इतिहासव्यासंग प्रिय होता एवढें स्पष्ट म्हणतां येतें. स्वतंत्रपणें जेव्हां राष्ट्रीयशाळा स्थापण्याचा उपक्रम करण्यांत आला तेव्हां आमच्या शिक्षणक्रमांतील हें व्यंगहि दुरुस्त करण्याची साहजिकच खटपट झाली. तळेगांवच्या समर्थविद्यालयांतील रा. गोविंद अनंत मोडक यांनीं महाराष्ट्राचा एक लहानसा पण स्फूर्तिदायक इतिहास प्रसिद्ध केला. त्यांचा हा 'मुलांचा महाराष्ट्र' या

नांवाचा ग्रंथ पुष्कळ लोकप्रिय झाला आहे. हा ग्रंथ लिहून रा. मोडक यांनीं मोठी उपयुक्त कामगिरी केली आहे.

साधारण लोकांच्या ज्ञानांत भर टाकावी आणि त्यांस आपल्या पूर्वजांच्या इतिहासाची गोडी लावावी या दृष्टीनें काम करणाऱ्यांत कै. धनुर्धारी ऊर्फ टिकेकर यांचा येथें उल्लेख केला पाहिजे. ‘ जवानमर्द ब्राह्मणभाई ’ व ‘ जवानमर्द मराठे गडी ’ या मालेंत लहान लहान पुष्कळ पुष्पें गोवून त्यांनीं आपल्या जोरदार लेखणीनें पूर्वजांबद्दल अभिमान जागृत केला. ऐतिहासिक चरित्रग्रंथांचा सविस्तर विचार येथें करावयाचा नसल्यामुळें रा. नागेश जिवाजी बापट प्रभृतींनीं ‘ थोरले बाजीरावसाहेबांचें चरित्र’, ‘ संभाजी चरित्र ’ वगैरे जे ग्रंथ लिहिले त्यांचें ओझरतें स्मरण तरी वाचकांस देणें आमचें कर्तव्य आहे. धनुर्धारींच्याप्रमाणेंच ‘ मराठी आरमार ’, ‘ मराठे सरदार ’ इत्यादि कांहीं लहान लहान पुस्तकें रा. पारसनीस यांनींहि लिहिलीं होतीं. रा. पारसनीस यांस इतिहासाचा विशेष व्यासंग असल्यामुळें त्यांत माहितीचा भरीवपणा अधिक आढळतो. उलटपक्षीं धनुर्धारी व बापट यांच्या पुस्तकांत इतिहासापेक्षां भाषेचेंच सौंदर्य अधिक खुलून दिसतें. ‘ मराठ्यांचे बुंदेल-खंडांतील पराक्रम ’, ‘ अयोध्येचे नबाब ’ अशीं रा. पारसनीस यांनीं लिहिलेलीं दोन पुस्तकें अद्यापहि वाचनीय आहेत. एखादा लहानसा ऐतिहासिक विषय घेऊन त्याचें सांगोपांग विवेचन करण्याचें काम आपल्याकडे जरी फारसें कोणीं केलें नाहीं, तरी ‘ मराठ्यांचा दरारा ’ किंवा ‘ श्रीरंगपट्टणची मोहिम ’, किंवा रा. पारसनीस यांचीं वर उल्लेखलेलीं पुस्तकें हीं ह्या सदरांतच घालावीं लागतील. कै. वासुदेव गोविंद आपटे यांनीं ‘ मराठ्यांच्या बंगालवरील स्वाऱ्या ’ वर्णन करून त्यांचा दरारा बाहेरप्रांतीं कसा बसला होता, त्याचें मनोवेधक चित्र आपल्या पुस्तकांत काढलें आहे. कै. पारसनीस यांचें ‘सवाई माधवराव यांचा दरबार’ हें पुस्तक फार सरस उतरलें आहे. कांहीं नवीन अस्सल पत्रांची जोडहि त्यांनीं या छोट्या पुस्तकास दिली आहे. परंतु अशा प्रकारच्या पुस्तकांत रा. द. वि. आपटे यांनीं लिहिलेलें श्रीरंगपट्टणच्या मोहिमांचें पुस्तक ऐतिहासिक दृष्टीनें सर्वांत वरचढ ठरेल.

मुलांचा महाराष्ट्र प्रसिद्ध होण्यापूर्वी प्रो. विजापूरकर यांच्या ग्रंथमालेंत निबंध-मालाकारांचे धाकटे बंधु कै. लक्ष्मणराव चिपळूणकर यांनीं महाराष्ट्राच्या इतिहासाचा एक भाग लिहून प्रसिद्ध केला होता. ह्या ‘अभ्युदय’ खंडांत ताराबाईच्या कारकीर्दी-पावेतों हकिगत आलेली आहे. आमच्या बखरींच्या प्रसिद्धीमुळें डफच्या कृती-

विषयीं जो असंतोष आमच्या नवीन विद्वानांस वाटूं लागला होता, त्यामुळें या ग्रंथाची रचना झाली. अस्सल कागदपत्रांचें युग सुरू होण्यापूर्वी बखरींच्या युगाच्या अमलांत तयार झालेला हा ग्रंथ लक्ष्मणरावांच्या प्रौढ व रोचक भाषेचा आपणांस प्रत्यय आणून देतो. कै. द. बा. करकरे यांच्याहि मनांत अनेक विभागात्मक असा एक मराठ्यांचा इतिहास लिहिण्याची इच्छा होती. त्यांचा जो खंड प्रसिद्ध झाला आहे तो पाहिला असतां तो अगदींच सुमार उतरला आहे, म्हणून विसरून जाण्यास योग्य आहे. फेरिस्ताच्या आधारें कै. माधवराव लेले यांनीं लिहिलेला एक इतिहासहि प्रसिद्ध आहे. कै. विनायक कोंडदेव ओक यांनीं अनेकविध ग्रंथ लिहिले त्यांत 'हिंदुस्थानकथारस' आणि 'इतिहास-तरंगिणी' कैक पिढ्या विद्यार्थ्यांस अभ्यासार्थी लागत असत. कै. ओक यांची बालबोध लेखनपद्धति हाच या ग्रंथांचा लक्षणीय विशेष होय.

कै. ओकांनीं मुलांच्याकरितां, तर लोकहितवादी कै. देशमुखांनीं प्रौढांकरितां विपुल वाङ्मय निर्माण केलें. दोघेहि दीर्घायुषी असून दोघांसहि लिहिण्याचा कंटाळा नसे. लोकहितवादी यांनीं टॉड्च्या 'ॲनल्स ऑफ राजस्थान' या ग्रंथावरून मराठींत राजस्थानचा एक मध्यम इतिहास लिहून प्रसिद्ध केला. तो अत्यंत वाचनीय झाला आहे. कारण वीर्यशाली रजपूत लोकांचा स्फूर्तिदायक इतिहास टॉड्नें मुळांतच समरसतेनें वर्णिला आहे, आणि लोकहितवादी यांनींहि तो तितक्याच सहृदयतेनें मराठींत उतरला आहे. हें खरें कीं, टॉड्चा इतिहास कथामय आहे; डफ्च्या पद्धतींत ही अद्भुतरम्यता नाहीं. राजस्थानचा नवा इतिहास प्रसिद्ध करण्याचें काम पंडित गौरीशंकर ओझा यांनीं भिम्मेपणानें चालविलें आहे. लोकहितवादींचा ग्रंथ हल्लीं मिळत नाहीं. एक मोठा सविस्तर परंतु 'वास्तविक' पद्धतीनें लिहिलेला राजस्थानचा इतिहास मराठींत व्हावयास हवा आहे.

लोकहितवादींनीं 'गुजराथचा इतिहास', 'लंकेचा इतिहास', 'सुराष्ट्र देशाचा इतिहास' हीं पुस्तकेंहि लिहिलीं आहेत आणि त्यांतील माहिती वाचनीय आहे. गुजराथचा एक इतिहास मॅक्डोनल्ड्च्या पुस्तकावरूनहि मराठींत झालेला आहे. रा. गणेश बळवंत मोडक यांनीं 'सौराष्ट्राचा इतिहास' मराठींत लिहिलेला आहे.

लोकहितवादींच्या ऐतिहासिक पुस्तकांत सर्वांत जास्त प्रसिद्धी त्यांनीं लिहिलेल्या 'ऐतिहासिक गोष्टीं'ची आहे. जातील तेथें लोकहितवादी हे अनेक विषयांवर माहिती गोळा करावयाचे हें ठरलेलेंच होतें. अशी गोळा केलेली

ऐतिहासिक माहिती, 'ऐतिहासिक गोष्टी' या नांवानें तीन खंडांत प्रसिद्ध झालेली आहे. सरळ भाषा आणि सांगण्याची हौस, त्यांतून शेंकडों निरनिराळ्या प्रकारचे विषय—यामुळें ऐतिहासिक गोष्टींचे हे भाग वाचण्यास फार मनोरंजक वाटतात. रा. दामले, भावे, बर्वे, आपटे, वगैरेंनींहि कांहीं ऐतिहासिक गोष्टींचीं बारीकबारीक पुस्तकें लिहिलेलीं आहेत, परंतु लोकहितवादींच्या पंक्तीस यांतल्या कोणासहि बसवितां येत नाहीं. अलीकडे 'भाऊंच्या वीरकथा' या नांवाचें एक पुस्तक रा. जोशी यांनीं प्रसिद्ध केलें आहे. स्वतः हिंडून या उत्तरेकडे प्रचलित असलेल्या आख्यायिका जमा करण्याचा प्रयत्न खरोखर अभिनंदनीय आहे. जुन्या आख्यायिकांचा संग्रह करणें उत्तरोत्तर दुरापास्त होत आहे. जुनीं माणसें बहुतेक मेलीं, त्यामुळें आख्यायिका मिळविण्याचा तो मार्गहि बंद होत चालला आहे, आणि माहिती लिहून ठेवण्याची प्रथा आमच्या लोकांत विरळाच आढळते. अजून कोणी जर नवे लोकहितवादी पुढें येतील तर आम्हांस पाहिजे आहेत.

## महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग

सेवेल्वरून रा. लेले यांनीं लिहिलेल्या विजयानगरच्या इतिहासाचा उल्लेख अन्यत्र केला आहे. विजयानगरच्या इतिहासाकडे महाराष्ट्राच्या दृष्टीनें पाहण्याचा एक अभिनव प्रयत्न कै. नारायण कृष्ण गद्रे यांनीं एका ग्रंथांत केलेला आहे. त्यांच्या ग्रंथाच्या नांवावरूनच त्यांच्या विचारांची दिशा कळून येण्याजोगी आहे. 'महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग' हें नांवच सांगतें कीं, महाराष्ट्रांत जी स्वराज्य-स्थापना झाली तिच्या उदयाची पार्श्वभूमि चित्रित करणें हा रा. गद्रे यांचा उद्देश आहे. विजयानगरचें अस्तंगत साम्राज्य आणि महाराष्ट्रांतील स्वराज्याचा उदय हीं दोन्हीहि अदृश्य कार्यकारणभावानें निगडित असल्याचें प्रतिपादन रा. गद्रे यांनीं केलें आहे, तें सर्वथा समर्थनीय नसलें तरी तसेंच तें सर्वथा उपेक्षणीयहि नाहीं.

## हिंदुपदपादशाही

भिन्नभिन्न मतांचे आणि पंथाचे लोक यांनीं आपल्या मताच्या किंवा पंथाच्या दृष्टीनें गत इतिहासाचें समालोचन करणें, हें मनुष्यस्वभावास धरून आहे. मराठ्यांचा मुसलमानांनी लिहिलेला इतिहास किंवा इंग्रजांचा फ्रेंचांनीं लिहिलेला इतिहास—असे इतिहास साहाजिकच एकांगी असणार. आपला आपण लिहिलेला इतिहासहि एकांगीपणाच्या दोषापासून मुक्त होणें कठिण असतें. इतिहासकाराची निरंजन, निर्मल व निर्लेप दृष्टि ज्यास फुटली आहे असा दिव्यदृष्टि इतिहासकार

महात्मा दुर्मिळच असतो. भिन्न भिन्न दृष्टि स्वीकारून लिहिलेले इतिहास एकांगी असले तरी उपयोगी असतात. 'हिंदुपदपातशाही' या नांवाचा जो ग्रंथ बॅ. सावरकर यांनीं लिहिला आहे, तो त्यांनीं हिंदूंचे एक पुढारी या नात्यानें लिहिला आहे. तो एक पूर्वपक्ष समजला पाहिजे.

## मराठे व इंग्रज

मराठी राज्य गेल्याची शतसांवत्सरिक श्राद्धतिथि पाळण्याच्या निमित्तानें 'मराठे व इंग्रज' या नांवाचा जो विवेचक व 'दार्शनिक' ग्रंथ रा. न. चिं. केळकर यांनीं लिहून प्रसिद्ध केला आहे, तो ज्यानें वाचला नाहीं असा सुशिक्षित महाराष्ट्रीय विरळाच सांपडेल. केव्हांना केव्हां तरी जो मनांत आल्यावांचून राहत नाहीं असा चटका लावून जाणारा विषय, चतुरस्र आणि विवेचक बुद्धि, प्रमाणबद्ध व मार्मिक विवेचनशैली आणि हृदयंगम, प्रौढ परंतु सुबोध भाषापद्धति, असा चोहों-बाजूंनीं मेळ बसल्यामुळें या ग्रंथाचा परिपाक अत्यंत स्वादिष्ट उतरला असल्यास नवल नाहीं. हा ग्रंथ इंग्रजींत लिहिला गेला असता तर अधिक उपयोगी झाला असता.

## राहिलेसाहिले

मागें लिहिलेल्या प्रकरणांतून ज्यांचा उल्लेख केला आहे त्यांखेरीज, ज्यांचा उल्लेख करावयास पाहिजे अशा आणखी कित्येक ग्रंथांचा व ग्रंथकारांचा येथें उल्लेख करतों. इतक्यानेंहि लहानमोठ्या झाडून सर्व ग्रंथांचा व ग्रंथकारांचा उल्लेख केल्याचें श्रेय मिळवितां येणार नाहीं आणि तसा प्रयत्नहि येथें करावयाचा नाहीं. हें काम स्वतंत्र यादीचें आहे. कै. बाळाजी प्रभाकर मोडक यांनीं 'कोल्हापूर आणि कर्नाटकांतील राज्यें आणि संस्थानांचा इतिहास' चार भागांत प्रसिद्ध केला आहे; त्याचप्रमाणें रा. लिमये यांचे 'एतद्देशीय संस्थानांचा इतिहास,' व 'नेटिव्ह राज्यांचा इतिहास' आणि कृ. ब. गोडबोले यांनीं केलेला 'एतद्देशीय विद्यमान राज्यें, संस्थानें व जहागिरी यांचा इतिहास,' अशीं छोटीं छोटीं पुस्तकें मराठींत प्रसिद्ध झालीं आहेत. ती उपयुक्त असलीं तथापि ली वॉर्नर् प्रभृतींचीं इंग्रजी पुस्तकें आणि एचिसन्‌कृत तहनाम्यांचे खंड वगैरे या विषया-वरील उपयुक्त सामग्री इतकी भरगच्च आहे कीं, तिचा उपयोग करून जर कोणी उद्योगी लेखक लिहावयास बसेल तर देशी संस्थानांच्या इतिहासाचे अनेक वाचनीय खंड तो प्रसिद्ध करूं शकेल. हैद्राबादसंस्थानासंबंधानें रा. शर्मा यांनीं प्रसिद्ध केलेलें पुस्तक अलिकडील काळाबद्दलच माहिती देणारें आहे. पण निदान तेवढें तरी पुस्तक निजाम राज्याच्या इतिहासावर व्हावयास पाहिजे आहे. 'भोपाळ संस्थानचा इतिहास'

कै. माधव व्यंकटेश लेले यांनीं लिहिलेला आहे. 'जंजिरा संस्थानचा इतिहास' रा. बाळाजी केशव भोसले यांनीं लिहिल्याला बरींच वर्षें झालीं. जंजिरा संस्थानचे संग्रहीं पुष्कळ महत्त्वाचें कागदपत्र असण्याचा संभव आहे. मुंबई सेक्रेटरियट् आणि पुणें रेसिडेन्सी रेकॉर्ड् यांतील अप्रसिद्ध साहित्य जमेस घेऊन हिंदुस्थानांतील या एकमेव हबसाणी सत्तेचा मनोरम इतिहास तयार करतां येईल. 'बडोदें येथील राज्यकर्ते' या नांवाचें रा. परांजपे यांनीं लिहिलेलें पुस्तक प्रसिद्ध आहे. बडोदें संस्थानचे संग्रहींहि कागदपत्रांचा मोठा सांठा आहे. त्यांतील माहिती तपासून खंड प्रसिद्ध करण्याचें काम चालू आहे. कलकत्ता युनिव्हर्सिटीमार्फत कै. भाईसाहेब गुप्ते यांनीं रावजी आप्पाजीबद्दलची जी माहिती प्रसिद्ध केली आहे, तिचा व इतर माहितीचा उपयोग करून बडोदें राज्याचा नवा व मोठा इतिहास लिहिण्याजोगा आहे.

बडोद्याचे रा. बिनायक सदाशिव वाकसकर यांनीं 'अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रें' या नांवाचें उपयुक्त माहितीचें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. शिवाजीच्या शहाण्णव कलमी बखरीचें सटीक पुनर्मुद्रण रा. वाकसकर यांनीं केलें आहे. रा. वाकसकर हे एक मार्मिक चिकित्सक आहेत आणि जरी सांप्रत शिवकालीन ऐतिहासिक मूल साहित्याच्या प्रामाण्याविषयीं व इतर आनुषंगिक प्रश्नांविषयीं त्यांचा आमचा तीव्र मतभेद आहे तरी त्यांचे परिश्रम केव्हांहि आदरणीयच ठरतील. सर यदुनाथ सरकार यांच्या पुस्तकावरून 'शिवाजी व शिवकाल' या नांवाचें पुस्तक रा. वाकसकर यांनीं लिहिलेलें प्रसिद्ध आहे.

आमच्या मतें जगाच्या इतिहासाकडे दुर्लक्ष्य केल्यामुळें आमचें अपरिमित नुकसान झालें आहे. अद्यापहि नांव घेण्याजोगा असा जगाचा एकहि इतिहास मराठींत कोणीं लिहिला नाहीं, हें आमचें दुर्दैव होय. विंचूरकर घराण्याचा इतिहास लिहिणारे रा. हरि रघुनाथ गाडगीळ यांनीं जगाचा एक संक्षिप्त इतिहास मागें प्रसिद्ध केला होता. रा. जनार्दन बाळाजी मोडक यांच्याहि नांवावर एक जगाचा छोटा इतिहास मोडतो. आमच्या मतें कॉलेज्च्या पहिल्या वर्षांत जगाचा इतिहास सक्तीनें शिकवावा आणि या विषयावर विद्वानांनीं विशेष लक्ष्य पुरवावें. प्राचीन, मध्ययुगीन, व अर्वाचीन असा जगाचा इतिहास समोर असल्याशिवाय त्या त्या काळच्या जगाचा कोणत्याहि भागाचा इतिहास लिहिला तर त्यांत मानवी प्रगतीचें योग्य मोजमाप आपणांस आढळणार नाहीं. मानवी प्रगतीवर एक चिमुकलें परंतु

साध्या, सोप्या आणि सरळ पद्धतीनें लिहिलेलें पुस्तक रा. चिं. ग. कर्वे यांचें झालेलें आहे. मोठ्या पुस्तकाची मोठी जरूरी आहे. 'महाराष्ट्र संस्कृती'चा परिचय करून देणारें प्रो. शं. दा. पेंडसे यांचें पुस्तक वाचकांस अतिशय आवडलें आहे. याहि विषयावर विस्तृत ग्रंथ व्हावयास पाहिजे.

मागें संस्थांचा उल्लेख केला त्यांत श्रीसंभाजी-चरित्र-कार्यालय व श्रीशिव-चरित्र-कार्यालय या संस्थांचा उल्लेख करावयाचें राहिलें. पुण्यश्लोक श्रीछत्रपति शिवाजीमहाराज यांचा त्रिशत सांवत्सरिक उत्सव एकदां जुन्या तिथीप्रमाणें व एकदां नव्या तिथीप्रमाणें असा दोन वेळ महाराष्ट्रानें साजरा केला. या दोन्ही प्रसंगीं ग्रंथप्रसिद्धि हें एक उत्सवाचें प्रधान अंग ठरविलें होतें. मुंबईस रा. सरदेसाई यांनीं संपादकीय काम आपणांवर घेऊन इंग्रजी-मराठी शिवस्मृति ग्रंथ प्रसिद्ध केला. पुढें पुण्यास मागाहून उत्सव झाला त्यासाठीं रा. दत्तोपंत आपटे यांनीं रा. न. चिं. केळकरांच्या साहाय्यानें श्रीशिवचरित्र कार्यालयाची स्वतंत्र स्थापना केली. या कार्यालयाचा संशोधनी व संकलनी कार्याला भारत-इतिहास-संशोधक-मंडळ व रायगड-स्मारक-मंडळ या उभय संस्थांचा आत्मिक पाठिंबा होता. शिवचरित्र कार्यालयानें 'पत्र-सार-संग्रहा'चे दोन खंड प्रसिद्ध करून सर्व विश्वसनीय पत्र-व्यवहारी साहित्य—कीं ज्याचा संबंध शिवाजी व त्याचे पूर्वज यांशीं आहे—त्याचप्रमाणें त्याची कालक्रमवार सारांश जंत्री अभ्यासकांस उपलब्ध करून देऊन शिवचरित्राचा शास्त्रीय व सप्रमाण अभ्यास करण्याचा चोख मार्ग घालून दिला. डॉ. सेन यांचा शिवचरित्रात्मक इंग्रजी खंड, डॉ. बाळकृष्ण यांचें सचित्र इंग्रजी शिवचरित्र श्री. बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांचें सचित्र शिवचरित्र, शिवाय शिवचरित्र निबंधा-वलीचे महत्त्वाच्या संकलनपर निबंधांचे दोन मोठाले खंड आणि शिवचरित्र-साहित्याचे नवे खंड असे फार बहुमोल ग्रंथ प्रसिद्ध केले. पण सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे 'इंग्लिश रेकॉर्ड्स् ऑन् शिवाजी' हा होय. यांत शिवाजी व शिवकाल या बाबतीची इंग्रजी दप्तरांतील समकालीन माहिती विलायतेंतून मुद्दाम आणवून प्रसिद्ध केली आहे. हा बारीक अक्षरांचा हजार पानांचा ग्रंथ प्रत्येक शिवचरित्र-जिज्ञासूच्या संग्रहीं असावयास पाहिजे.

श्रीशिवचरित्र—कार्यालयानंतर रा. वा. सी. बेंद्रे यांनीं 'श्रीछत्रपति संभाजी कार्यालय' हें कंपनीरूपानें स्थापन केलें. कैक वर्षे भा. इ. स. मंडळांत रा. बेंद्रे आपलें संशोधनकार्य मेहनतीनें करीत होते. संभाजी-चरित्रापुरता विशेष अभ्यास

करण्याचें निश्चित करून त्यांनीं सर्व संभाजीविषयक साहित्य कसून अभ्यासण्यास सुरुवात केली. ते त्यांचे परिश्रम आश्चर्यकारक आहेत. केशव पुरोहिताच्या 'राजाराम चरितम्' या समकालीन ग्रंथाचा शोध लावून आणि 'गोवळकोंड्याची कुतुब-शाही'सारखे चिकित्सात्मक सूक्ष्म प्रस्तावनेचे मुख्य ग्रंथ प्रसिद्ध करून रा. बेंद्रे यांनीं आपली सूक्ष्म दृष्टि, प्रमाणपरीक्षणशक्ति आणि विलक्षण परिश्रम यांची भरपूर साक्ष दिली आहे. ते सरकारी नोकरींत विद्याखात्यांत परंतु कारभारी शाखेंत आहेत असें असून त्यांनीं संशोधकांत एवढा दर्जा प्राप्त करून घेतल्याचा सरकारासहि आतां कौतुक व अभिमान वाटत असून रा. बेंद्रे यांस मोठी पगारी रजा मंजूर करून सरकार त्यांस परदेशांत संशोधनाभ्यासासाठीं जाण्यास साहाय्य करण्यास सिद्ध झालें आहे. संशोधनाकडे सरकारची कृपादृष्टि अनुकूल झाली आहे हें पेशवे दप्तर, सातारा संस्था व बेंद्रे यांच्या उदाहरणांवरून व अखिल भारतीय आधुनिक परिषदेस त्यांनीं दाखविलेल्या हार्दिक सहानुभूतीवरून प्रत्ययास येऊं लागलें आहे. हें सुचिन्ह जर असेंच वाढीस लागलें तर भरघोंस सुफळें पदरांत पडतील अशी आशा करण्यास चिंता नाहीं.

'आनंदवन भुवनी-ग्रंथमाला' या नांवानें आमचे मित्र रा. आबा चांदोरकर व श्री. आबासाहेब बावडेकर इनामदार या उभयतांनीं जें कार्य चालविलें आहे तेंहि उपयुक्त आहे. या उभयतांनीं 'लेखनालंकार' नांवाचें एक सुंदर व उपयुक्त पुस्तक काढलें आहे तें प्रत्येक महाराष्ट्रेतिहास-भक्तांत संग्राह्य झालें आहे. यांत आपल्या अनेक संस्मरणीय थोर मराठे पूर्वजांचीं दर्शनें हस्ताक्षररूपानें आपणांस मिळावींत अशी सोय केली आहे. यांतील श्रीशिवाजी महाराजांचें हस्ताक्षर अद्यापि कायम झालें असें मानतां येत नाहीं. आम्हांस तरी कांहीं बाबतींत संपादकांचें मत ग्राह्य नाहीं.

ग्रामसंशोधनाला उपयोगीं असा एक ग्रंथ कै. अत्रे यांनीं 'गांवगाडा' नांवाचा लिहिलेला प्रसिद्ध आहे. तो एक मराठींत अपूर्व नवाईचा ग्रंथ आहे. अत्रे हे एन्थोवेन्चे मदतनीस होते. परंतु हा ग्रंथ म्हणजे मराठी वातावरणाचा शुद्ध नमुना आहे. खाजगी प्रयत्नांत जुनें साहित्य जमविण्यांत महाराष्ट्रीयांत तरी रा. थत्ते व रा. शं. ग. दाते यांचे प्रयत्न कौतुकावह म्हणून नमूद करण्यासारखे आहेत. रा. थत्ते यांचे वडील रा. प. ह. थत्ते यांस संशोधन व ग्रंथलेखन यांचा नाद फार जुना आहे. वेदकालोत्पत्ति हा त्यांचा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. आणखी पुष्कळ ग्रंथ लिहून पडले आहेत. श्री. सरदार आंग्रे यांचे योजनेवरून 'मराठ्याचा

आरमारी इतिहास ' रा. थत्ते यांनीं लिहून ठेवलेला आहे. लेखक इतके वृद्ध व परिश्रमी आहेत तथापि त्यांचा उत्साह वर्णनीय आहे.

पूर्वी कै. त्र्यं. गु. काळे हे एक चांगले संशोधक आमच्यांत होऊन गेले. त्यांचा विषय पुराणसंस्कृति. त्यांनीं लिहिलेले पुराणनिरीक्षण, रामायणनिरीक्षण वगैरे ग्रंथ त्यांच्या विद्वत्तेची व व्यासंगाची साक्ष देतात. आतां ' पुराणें संशोधण्याचें कार्य ' रा. विष्णु रघुनाथ करंदीकर यांनीं अंगावर घेऊन नर्मदासंस्कृतिची उपपत्ति पुढें मांडून नर्मदा व्हॅली रिसर्च संस्थाहि त्यांच्या परिश्रमानें अस्तित्वांत आली आहे. पुराणसंस्कृति शाखेंत रा. चिं. वि. वैद्य यांच्या रामायणाच्या कोड्यावरील ग्रंथ भाषांतरित झाला आहे. कै. काशीनाथशास्त्री लेले यांनीं धर्म-मासिकांतून जे कित्येक लेख लिहिले होते ते संशोधनास कांहीं अंशीं उपयुक्त आहेत. शिवाय ऋग्वेदांत आफ्रिकेचे उल्लेख व नीलनदीचें वर्णन आढळतें, इत्यादि कांहीं महत्त्वाचे शोध कै. लेलेशास्त्री यांनीं केले होते. ते फार बुद्धिवान् व कर्ते होऊन गेले यांत शंका नाहीं.

वेदसंहिता संशोधनाचें कार्यहि पुण्यास वैदिक संशोधक-मंडळामार्फत चालू आहे. विद्वद्वर्गांत या कामाची प्रतिष्ठा चांगली लागेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. टिळकांच्या ' आर्यांचें मूलस्थान ' विषयक शोधांचें पुस्तक मराठींत रा. ओगले यांनीं केलें आहे. पण कुंट्यांचा 'व्हिसिसिट्यूड ऑफ आर्यन सिव्हिलियझेशन'वरील ग्रंथ मात्र मराठींत आला नाहीं. त्यांची ' षट्दर्शनचिंतनिका ' किंवा पंडितांचा 'वेदार्थयत्न' हे लक्षांत ठेवण्यासारखे प्रयत्न झाले. आपल्या पुराणसंस्कृतिभागांत सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनीं केलेलें काम मात्र फार वाखाणण्यासारखें झालें आहे. त्यांनीं ' चरित्रकोशमंडळ ' स्थापून प्राचीन चरित्रकोशाचा खंड प्रसिद्ध केला आहे. असा कोश मराठींत काय परंतु युरोपियन भाषांतहि झाला नाहीं अशी ग्वाही तज्ज्ञ देतात ! आतां चित्रावशास्त्री यांचें लक्ष मध्ययुगीन खंडाकडे वळलें आहे ! मोठें कार्य आहे. परंतु चित्रावशास्त्रींची निष्ठा, उत्साह व प्रयत्न दांडगे आहेत, यश त्यांतच आहे.

पंचांगसंशोधनाचे निमित्तानें मराठी वर्तमानपत्रांतून, मासिकांतून व कांहीं पुस्तक-पुस्तिकांच्या द्वारां पुष्कळच संशोधन झालेलें आहे व नवीन करणग्रंथहि रा. दप्तरींसारख्या नाणावलेल्या अनेक शास्त्रकोविदांकडून करविण्यांत आलेले आहेत. रा. पटवर्धनद्वय, प्रो. नाईक, प्रो. आपटे ( उज्जयिनी ) वगैरे लेखक यांनीं मराठी वाङ्मयांत अनेक लेखद्वारें भर घातली आहे. याच शोधाच्या मार्गांत बियावर येथील मिठ्ठलाल व्यासांच्याकडील जुनाट कुंडलीसंग्रह मिळून श्रीशिव-छत्रपतींची समकालीन जन्मकुंडली मिळाली !

ज्योतिषशास्त्राप्रमाणें आयुर्वेद संशोधनहि महाराष्ट्रांत बरेंच चालू आहे. या विषयाचीं स्वतंत्र मासिकें आहेत. वर्तमानपत्रांतूनहि वादचर्चा होतात. वैद्यक मंडळेंहि आहेत. परंतु पुण्यास वे. नानलशास्त्री यांनीं एक आयुर्वेदीय रुग्णालय व एक औषधी शाळा काढून जे प्रयत्न चालविले आहेत त्यांचें योग्य संवर्धन केल्यास शास्त्रीय दृष्टीची चांगली कामगिरी होईल. वे. गंगाधरशास्त्री जोशी यांनीं 'धमनी संशोधना'चा वाद उपस्थित करून जें कार्य चालविलें आहे तें उपयुक्त व अधिक संशोधनास चालना देणारें आहे.

### जंत्री

इतिहासाचा एक डोळा म्हणजे काळ! त्याच्या निश्चितीच्या पायावर पुढली इमारत. काल-निश्चयासाठीं फार श्रम पडतात. त्याला सूक्ष्म गणिताची आवश्यकता असते. ती सर्व मेहेनत करून जे गाणितिक 'जंत्र्या' वगैरे रचतात त्यांचे समाजावर व विशेषतः संशोधकांवर अगणित उपकार होतात. आपल्याकडे ज्योतिषाचा व्यासंग प्राचीन काळापासून आहे. अव्वल मराठींत घराऊ दप्तरांत कांहीं जंत्र्यांचीं पानें सांपडतात. पुढें इंग्रजींत पटेलची जंत्री वगैरे मराठी इंग्रजी जंत्र्या झालेल्या आहेत. पण सर्वांत प्रसिद्ध जंत्री प्रो. मोडक यांची; पण ती शिवकालीन कालाला उपयोगी पडत नाहीं. कारण ती शके १६५० पासून सुरू होते. म्हणून शके १५५० ते १६५० या शंभर वर्षांचें सूक्ष्म गणित तिथि किंवा पर्वावरून करण्यासाठीं कै. गणेश सखाराम खरे हे सतत दोन हजार तास खपले! जंत्रीचा दीपस्तंभ त्यांनीं उभा केला! रा. ब्रेंदे यांनीं 'तारीख इ इलाही', जी इंग्रजींत प्रसिद्ध केली आहे, ती त्यांच्या परिश्रमाची साक्ष देत आहे. रा. दत्तोपंत आपटे यांची छोटी जंत्री त्यांच्या गणिती डोक्याची व कल्पकतेची साक्ष पटवीत आहे. अलीकडे दि. ब. स्वामिकन्नूपिले यांची एफिमिराज् इंग्रजींत झाल्यापासून जुन्या जंत्र्या मागें पडल्या आहेत. तथापि सेवेल व शं. बा. दीक्षित यांचीं नांवें जंत्री-अभ्यासक केव्हांहि आदरानेंच घेतील.

## सिद्धेतिहास

### घटित व घटना

इतिहासाचें[1] संशोधन झाल्याशिवाय इतिहासाचें विरचन करतां येत नाहीं. ऐतिहासिक घटितें कार्यकारणभाव दाखवून पूर्वापरसंबंधपूर्वक यथातथ्य वर्णन

१. म. सा. संमेलन, बडोदें, इतिहासविभाग, अध्यक्षांचें भाषण पाहा.

करणें हें इतिहासविरचकाचें प्राथमिक काम होय. हें योग्य प्रकारें बजाविण्यास परिश्रमाची अत्यंत आवश्यकता असते. या कार्याला पायाभूत जें संशोधन तें जर उच्च दर्जाचें झालें असेल आणि कालस्थलव्यक्तिविषयक निश्चिती सुदृढ स्वरूपाची तयार झाली असेल तर या निश्चित घटितांचें वृत्तसंकलन करणें बरेंच सुसाध्य होतें. परंतु साधनांच्या आणि संशोधनाच्या अभावीं ती घटित-सामग्री पुष्कळदां अधुरी असते. म्हणून ज्यांच्याविषयीं ही निश्चिती बरीच परिपक्व दशेला गेली असेल अशा घटना निवडून त्यांचें संकलन आधीं करण्याचा संप्रदाय आहे. अनेक घटितें[1] मिळून एक घटना[2] बनत असते व अनेक घटनांचें संकलन करून इतिहास रचावयाचा असतो, असें सामान्यपणें म्हणतां येईल.

व्यवहारांत घटितांची व घटनांची स्थलकालव्यक्तिनिश्चिती एकीकडे चालू असते, त्याच वेळीं सिद्ध निश्चितींच्या साहाय्यानें त्यांचें संकलन करण्याचें कामहि चालू ठेवावें लागतें. निश्चितींचा संग्रह वाढेल तसतसें संकलनहि पुनः पुनः करावें लागतें. येणेंप्रमाणें संशोधन आणि संकलन हीं दोन्ही कार्यें एकसमयावच्छेदेंकरून चालत असतात.

## संकलन

संकलनांतहि स्थूल, सूक्ष्म असे दोन प्रकार असतात. स्थूलाला राजवाड्यांच्या भाषेंत 'भौतिक' आणि सूक्ष्माला 'आत्मिक' अशीं नांवें आहेत. (म. इ. साधनें खं. १, प्रस्तावना, पृ. २८). भौतिक संकलन करणाऱ्यापेक्षां आत्मिक संकलन करणाऱ्याच्या ठायीं तीव्र व कुशाग्र बुद्धीची फारच आवश्यकता असते, किंबहुना आत्मिक संकलन करणारा द्रष्ट्याच्या कोटींतील असावा लागतो. वास्तविक त्याच्या कार्यास संकलन हा शब्द लावण्यापेक्षां दर्शन हा शब्द लावणें अधिक समुचित होईल. सुदृढ अशा भौतिक संकलनाच्या पायावर आत्मिक दर्शनाची उभारणी जेथें आढळते तो इतिहास 'आगम' पदवीप्रत पोहोंचतो आणि असा दार्शनिक इतिहासकार धन्य समजला जातो.

असा सर्ववंद्य द्रष्टा इतिहासकार आपणांमध्यें अजून व्हावयाचा आहे. राजवाडे आणि रानडे यांच्या ठिकाणीं या कोटीची पात्रता स्पष्ट दिसून आली होती. रानड्यांनीं 'मराठी सत्तेचा उत्कर्ष' या आपल्या इंग्रजी प्रबंधांत आपल्या बुद्धीची चुणूक दाखविली होती. ग्रंथमालेमध्यें रानड्यांच्या या प्रबंधाचें मराठी

१. घटितें=Facts. २. घटना=Event.

भाषांतर प्रसिद्ध झालें आहे. राजवाड्यांच्या प्रस्तावनांतून त्यांच्या सामर्थ्याचा प्रत्यय येतो. तथापि महाराष्ट्र इतिहासाच्या भौतिक संकलनाचाच पाया अद्यापि निरुंद व डळमळीत आहे. राजवाड्यांनीं, तोच रुंद, खोल व व्यापक करण्याची कामगिरी आधीं केली पाहिजे, हें ओळखून तसे प्रयत्न केले. तथापि मागें सांगितल्याप्रमाणें तेवढ्याकरितां संकलनाचें काम अगदीं बंद ठेवतां येत नाहीं. आपल्या रोजच्या गरजा 'यथामीलितोपचारैः' भागवून घेतल्या पाहिजेतच. मोठा दगडी बंगला तयार होईपावेतों ज्याप्रमाणें आपणांस उघड्यावर राहतां येत नाहीं, तर कांहीं तरी निवाऱ्याची सोय करावी लागते, तसेंच येथें आहे. नुसतें संशोधनच चाललें आणि संकलन कोणींच केलें नाहीं तर आपली स्थिति फारच अनुकंपनीय होईल. वर्तमान काळावर नजर दिली तर संशोधकापेक्षां संकलनकारच आपल्या रोजच्या सृष्टींत अधिक उपयोगाचा असतो.

## रियासतकार सरदेसाई

महाराष्ट्राच्या समग्र इतिहासाचें संकलन करण्याचें अत्यंत जबाबदारीचें व परिश्रमाचें कार्य हें आपलें जीवितकार्य मानून तदर्थ आज सुमारें चाळीस वर्षें ज्यांनीं आपले प्रयत्न चिकाटीनें चालू ठेवले आहेत ते रावसाहेब गोविंद सखाराम सरदेसाई यांचें नांव साक्षर महाराष्ट्रास सर्वश्रुत आहे. त्यांच्या 'रियासत'मालेवरून 'रियासतकार' ही सार्थ पदवी लोकांनीं स्वयंस्फूर्तीनें त्यांस दिली आहे. मुसलमानी रियासत, मराठी रियासत व ब्रिटिश रियासत यांप्रमाणें आपल्या इतिहासाचे तीन विभाग रा. सरदेसाई यांनीं पाडले आहेत. मुसलमानी विभागांत सर्व मुसलमानशाह्यांचा इतिहास संकलित केला आहे, आणि ब्रिटिश रियासतीचा पूर्वार्धच पुरा झाला आहे. अलीकडे रा. सरदेसाई यांचें लक्ष विशेषेंकरून मराठी रियासतीवरच खिळलेलें आहे. एकीकडे संशोधन अनेक अंगांनीं जोरानें पुढें सरकत आहे व दुसरीकडे सरदेसाई हेहि आपला उद्योग नेटानें पुढें चालवीत आहेत. मध्यंतरीं मराठी कागदपत्रांचा सर्वांत मोठा सांठा असलेलें जें पेशवे दप्तर त्यांत प्रवेश मिळण्याची संधि रा. सरदेसाई यांस मिळाली. तिचा फायदा घेऊन रा. सरदेसाई यांनीं मुंबई सरकारच्या मार्फत पेशवेदप्तरांतून ऐतिहासिक सामग्रीचे पंचेचाळीस खंड प्रसिद्ध करविले आणि सांप्रत रेसिडेन्सी दप्तरांतील साधनांचे खंड सर् यदुनाथ यांच्या पुरस्कारानें प्रसिद्ध करण्याच्या खटपटींत ते व्यग्र आहेत. सत्तरी ओलांडल्यावरहि रा. सरदेसाई यांचा उद्योग प्रत्यहीं वाढतच आहे. सरदेसाई यांच्या रियासतींनीं त्यांचें

नांव महाराष्ट्राबाहेरहि मशहूर झालें आहे. त्यांच्या मराठी रियासतीची नवी आवृत्तिहि तयार होत आहे. महाराष्ट्राचा समग्र इतिहास म्हणून रा. सरदेसाई यांची रिसायत एवढी एकच निर्देशण्यासारखी आहे.

रा. सरदेसाई यांच्या रिसायतींत प्रायः राजकीय घडामोडींचेंच संकलन आहे. हिंदुस्थानच्या इतिहासाबद्दल उपलब्ध सामग्रीच्या मानानें हें संकलन आणखीहि विस्तृत करण्यास पुष्कळ वाव आहे, असें आम्हांस वाटतें आणि तसें स्वास्थ्य लाभलें तर रावसाहेब सरदेसाई हे देखील तसा उद्योग करतील. मागें सुचविल्याप्रमाणें घटितनिश्चिती आणि घटनासंकलन हीं कार्यें आपणाकडे अजून व्हावयाचींच आहेत. यामुळें रावसाहेब सरदेसाई यांच्यासारख्यांस नुसत्या 'भौतिक' घटनांचें संकलन करतांना स्थल-काल-व्यक्ति-निश्चयासाठीं स्वतंत्र परिश्रम करावे लागतात. नुसत्या साधनांच्या प्रसिद्धीनें संकलनाचें काम बरेंच अवघड होतें. लहानलहान संशोधनपर खंडग्रंथ आजहि पुष्कळ व्हावयास पाहिजे आहेत. म्हणजे साधनविचिकित्सा बरीच आकाराला येईल आणि तसें झालें म्हणजे व्यापक इतिहासाचें संकलन कमी त्रासाचें होईल. निरनिराळ्या कालखंडांचें अधिकारी संकलन जर आधीं तयार होईल तर भावी इतिहासकारांस आपलें काम पुष्कळच सोपें जाईल आणि त्यांच्या हातून होणाऱ्या पुष्कळ चुका टळतील.

## डॉ. श्री. व्यं. केतकर

प्राचीन इतिहासाचें संकलन रा. सरदेसाई यांनीं विशेषसें केलें नाहीं. तें काम हल्लीं डॉ. केतकर यांनीं अंगावर घेतलें आहे. भौतिक व आत्मिक दोन्ही पद्धतींनीं इतिहासाचें विरचन करण्यास लागणारें बुद्धिवैभव, चिकाटी, व चिकित्सा डॉ. केतकर यांजपाशीं भरपूर आहेत. त्यांच्या 'प्राचीन महाराष्ट्र'चा एक खंड प्रसिद्धहि झाला आहे, व पुढील खंडांची तयारी चालू आहे. सरदेसाई यांनीं घेतलेल्या कालखंडापेक्षां डॉ. केतकर यांनीं घेतलेल्या कालखंडाच्या इतिहासांत निश्चितीचें प्रमाण अल्पतर आहे. तथापि त्यांचें एकंदर लिहिणें विचारप्रवर्तक आहे. मराठींत ज्ञानकोश रचण्याचा जो प्रचंड उद्योग डॉ. केतकर यांनीं केला त्यांत बरेंच फुटकळ ऐतिहासिक संकलन झालें आहे. जातिविषयक, स्थलविषयक, व्यक्तिविषयक वगैरे पुष्कळ माहिती अनेक ग्रंथांतून संकलित करून ज्ञानकोशांत देण्यांत आली आहे. या ज्ञानकोशाच्या प्रस्तावनाखंडांत बुद्धकालीन व वेदकालीन संस्कृतीचें विस्तृत संकलन करण्यांत आलें आहे.

डॉ. भांडारकरांच्या दख्खनच्या इतिहासाचें एक बटबटीत मराठी भाषांतर रा. बापटशास्त्री यांनीं केलेलें प्रसिद्ध आहे. ' प्राचीन भरतभूमि ' या नांवाचें एक पुस्तक पाहण्यांत आहे. त्याची रचना बहुतेक कै. बाबू रमेशचंद्र दत्त यांच्या ग्रंथास अनुसरून केलेली आहे. प्रो. कोसंबी यांनीं बुद्ध, बुद्धसंघ, व बुद्धकाल यांसंबंधीं छोटे परंतु मननीय ग्रंथ लिहिलेले आहेत. डॉ. आळतेकर यांनीं ' नवभारतमाले'साठीं प्राचीन भारतीय शिक्षण पद्धतीवर एक ग्रंथ मराठींत लिहिला आहे. काथवटे यांचा एक ' भरतखंडाचा प्राचीन इतिहास ' प्रसिद्ध आहे.

## श्री. चिंतामणराव वैद्य

महाराष्ट्राचा मध्ययुगीन इतिहास लिहिण्याचें काम श्री. चिंतामणराव वैद्य यांनीं तीन मोठाल्या खंडांत उत्तम तऱ्हेनें पार पाडलें आहे. बुद्धिमत्ता, विद्वत्ता आणि परिश्रम यांच्या जोडीला चिंतामणरावांच्या ठिकाणीं न्यायनिपुणता हा दुर्लभ गुण असल्यामुळें त्यांच्या मध्ययुगीन इतिहासाची योग्यता बरीच मानण्यांत येते. येणेंप्रमाणें प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन इतिहासाच्या संकलनाची मराठींतील परिणति वर उल्लेखिली आहे; आणि या तिन्ही ग्रंथकारांनीं मिळून केलेली कामगिरी पुष्कळ श्रेष्ठ प्रतीची आणि मराठी भाषेंतील ज्ञानवैभव वाढविणारी अशी आहे.

## भारतीय साम्राज्यकर्ते पावगी

येथेंच कै. रावसाहेब नारायण भवानराव पावगी यांच्या ' भारतीय साम्राज्य ' मालेचा उल्लेख करणें योग्य होईल. रावसाहेब पावगी यांनीं आपलें बहुतेक आयुष्य या मालेचे ग्रंथ रचण्यांत व्यतीत केलें. त्यांचे इंग्रजी ग्रंथ सोडले तरी पूर्वार्ध व उत्तरार्ध मिळून त्यांच्या भारतीय साम्राज्यमालेचे १०।१२ खंड आहेत. आर्यसंस्कृतीचा नितांत अभिमान व ग्रंथकाराची बाणेदार वृत्ती हे या मालेचे विशेष म्हणून सांगतां येतील. वेद, वेदांगें, पुराणें, प्राचीन कला, शास्त्रें, गृहस्थिति वगैरे आर्यसंस्कृतीच्या विविध अंगांविषयीं माहिती देऊन अभिमान उत्पन्न करणें हा या मालेचा उद्देश आहे. शके १८१५ पासून ४० वर्षें श्री. पावगी यांनीं आपला उद्योग एखाद्या वानप्रस्थ ऋषीप्रमाणें शांतपणें व बाणेदारपणें एकट्याच्या हिमतीवर चालविला. वैद्य, सरदेसाई व पावगी या सततोद्योगी वानप्रस्थ मुनींना त्रिवार धन्यवाद असोत.

## संघीकरणाचें युग

### भा. इ. सं. मंडळाची स्थापना

व्यक्तींच्या कामाचें वर्णन येथवर यथामति केलें आहे. या व्यक्तींपैकीं राजवाडे यांचा संशोधन हा केवळ हौशीचा ( hobby ) विषय नसून राष्ट्रसेवेचें आणि राष्ट्रोद्धाराचें एक साधन या दृष्टीनें या कामींच त्यांनीं आपलें आयुष्य वाहिलें होतें. आपल्या राष्ट्राच्या उद्धाराविषयीं ते अहर्निश तळमळत असत आणि उद्धारक उपायांसंबंधानें चिंतन करीत असत. या चिंतनाच्या योगानें आपल्या राष्ट्रास " नियंत्रणेचें " ( organisation ) बळ आपल्या अंगीं आणिलें पाहिजे आणि यास्तव निरनिराळ्या शाखांत देशोद्धाराची खटपट करण्यास संस्था स्थापिल्या पाहिजेत, हें मत कळकळीनें प्रतिपादून त्यांनीं आपल्या विषयासंबंधानें त्यांतील शोधक, धनिक, जिज्ञासु व अभ्यासक या सर्वांची नियंत्रणा करण्यासाठीं पुण्यास कै. श्रीमंत सरदार तात्यासाहेब मेहेंदळे यांच्या मदतीनें आषाढ शु. १ शके १८३२ या दिवशीं भारत-इतिहास-संशोधक-मंडळाची स्थापना पुणें येथें केली. या गोष्टीला आज पंचवीस वर्षें झालीं. इतक्या वर्षांत या संस्थेनें आपल्या मालकीची मोठी इमारत व वस्तुसंग्रहालय बांधून त्यासाठीं आज पंचवीस वर्षांत सुमारें एक लाख रुपये खर्च केले आहेत. एवढा मोठा प्रयत्न केवळ लोकाश्रयावर केला. असें उदाहरण आमच्या माहितींत हिंदुस्थानांत इतिहास-विषयांत दुसरें नाहीं. सरकार, विद्यापीठें व राजेरजवाडे यांच्या उदार मदतीशिवाय अशीं कामें क्वचितच सिद्धीस जातात. राजवाडे यांनीं इतिहासविषयाची जी व्यापक कल्पना महाराष्ट्रसमाजापुढें मांडिली आहे त्या धोरणास अनुसरून महाराष्ट्राच्या पूर्व-जीवनाच्या ज्या ज्या शाखांचें जें जें साहित्य उपलब्ध होईल त्याचा त्याचा संग्रह करून आणि सत्य-मिथ्या-परीक्षण करून तद्वारां काल-स्थलादि निर्णय करणें हा जो संशोधनाचा प्राथमिक पाठ तोच राजवाडे यांनीं केवळ मराठी शिकलेल्या शाळामास्तरांपासून तों तहत चुकूनमाकून इकडे वळलेल्या पाश्चात्य विद्याविभूषितांपर्यंत सर्वांस दिला. हें बीं हळुहळू व चांगलें रुजून वाढीला लागत आहे आणि त्यामुळें पुरावा आणि प्रमाण शोधण्याची हौस आणि पारखण्याची कुवत ही महाराष्ट्रांत उत्पन्न झाली असून या गुणांची दूर दृष्टीनें पुढील जोपासना केल्यास सर्व हिंदुस्थानाला एक आदर्श होईल. आणि इतरांनीं अनुकरण करून दाखविण्याचें एक आदरणीय क्षेत्र महाराष्ट्रांत तयार झालें असें होईल. 'तेलातुपाचीं पत्रें' अशी ज्यांची मोठमोठ्या विद्वानांनींहि हेटाळणी केली तीं छापीत छापीत आणि टीकाकारांचे आघात मुकाट्यानें सोशीत सोशीत

राजवाड्यांनीं आपल्या विद्वत्तेचें आणि प्रतिभेचें खतपाणी घालून त्याच पत्रांचें महत्त्व व उपयुक्तता अप्रत्यक्षपणें लोकांना पटवून देऊन तो अभ्यास वाढीला लाविला. हें त्यांचें जीवनकार्य संस्मरणीय असेंच झालें आहे. खरे, साने, पारसनीस, सर्वांनीं परिश्रम केले, पण इतिहाससंशोधनाची जागती परंपरा निर्माण करण्याचें श्रेय एकट्या राजवाड्यांसच आहे; आणि अखिल हिंदुस्थानापुढें अभिमानानें ठेवण्याजोगा आणि अनुकरणीय असा हा प्रयत्न झाला आहे असेंच विचारांतीं दिसेल. खुद्द हा लेखक या परंपरेंतीलच असल्यामुळें आणि मंडळाच्या कार्याशीं त्याचा निकटचा संबंध असल्यामुळें तिन्हाईत मीमांसकाची भूमिका वठवून दाखविणें त्यास अवघड पडत आहे हें उघड आहे. भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या द्वारां प्रसिद्ध झालेल्या लहान मोठ्या पुस्तकांची संख्या सुमारें पाऊणशें असून पन्नास हजार कागद, चार पांच हजार पोथ्या, एक हजार नाणीं, एक हजार बहुमोल चित्रें आणि पांच सहा हजार पुस्तकें असा संग्रह आज मंडळाजवळ झाला आहे. पटावर सालोसाल प्रेमानें वर्गणीच्या रूपानें साहाय्य पाठविणारे ५०० पावेतों सभासद आहेत.

केवळ मराठी शाळामास्तर असतां ज्यांनीं दृढाभ्यासानें मराठी कागदपत्रांचा सूक्ष्म व्यासंग धरून तज्ज्ञांनींहि पाठ थोपटावी असें यश मिळवून दाखविलें ते रा. कृष्णाजी वासुदेव पुरंदरे हे आज संशोधन क्षेत्रांत चांगली प्रख्याति पावलेले आहेत. ‘ पुरंदरे दप्तर ’ मालेंतील खंड हे त्यांच्या एकट्याच्या श्रमाचें काम असून ‘ शिवचरित्र साहित्य ’हि त्यांनीं पुष्कळ जमविलें आहे. मंडळांतील दुसरे संशोधक रा. शंकर नारायण जोशी वाईकर हेहि कांहीं पदवीधर नाहींत; तथापि यांनींहि आपल्या व्यासंगानें आपली योग्यता सर्वांच्या निदर्शनास आणली आहे. मंडळांत हौसेनें काम करणारे तर पुष्कळच आहेत त्यांत श्री. सरदार आबासाहेब मुजुमदार यांची संग्रह जमा करण्याची कामगिरी केवळ अपूर्व गणली पाहिजे. रावसाहेब बाबासाहेब देशपांडे यांनीं मोठ्या हौसेनें लिहिलेले इतिहासग्रंथ त्यांची दृढ इतिहासभक्ति दर्शवितात. महाराष्ट्रांतील सर्वच संशोधकांचा व इतिहासप्रेमी जनांचा मंडळास पाठिंबा आहे.

याच वर्षी मंडळ आपला पंचविशीचा रौप्यमहोत्सव करीत असून आजवरच्या कार्याचें एका प्रकारें उद्यापन करावें या हेतूनें त्यानें पहिली अखिल-भारत-आधुनिक-इतिहासपरिषद भरविण्याचा महदुद्योग यशस्वी रीतीनें शेवटास नेला आहे. मंडळाच्या स्थापनेनंतर संशोधनार्थ संघटना करण्याच्या दृष्टीनें महाराष्ट्रांत आणखी कित्येक प्रयत्न झाले आहेत, त्यांची माहिती यापुढें देऊं.

## सातारा हिस्टॉरिकल म्युझियम

रावबहादुर पारसनीस यांचे आमरण जे प्रयत्न चालू होते त्यांचें एक फल म्हणजे त्यांनीं सरकारची मदत संपादन करून स्थापन करविलेली सातारा हिस्टॉरिकल म्युझियम ही संस्था होय. यांत पारसनीस यांनीं जमा केलेल्या संग्रहापैकीं, ग्रंथ, चित्रें, कागद, वगैरे बराच बहुमोल साधनसंभार सांठविलेला आहे. दुर्दैवानें पारसनीस व सरकार यांच्यामध्यें चालू असणाऱ्या वाटाघाटी परिपूर्ण व कायम होण्याच्या किंचित् पूर्वी रावबहादुर वारले आणि त्यामुळें त्यांची संपूर्ण कल्पना सिद्धीस गेली नाहीं. प्राचीन चित्रांचा पारसनीस यांनीं श्रमानें जमा केलेला व दरबारी थाटानें जतन करून ठेवलेला महत्त्वाचा चित्रसंग्रह त्यांच्या खाजगीकडेच राहून आज तो त्यांचे चिरंजीव काळजीनें सांभाळीत आहेत. रावबहादुर आणखी कांहीं वर्षे जगते तर महाराष्ट्र इतिहासाचा फारच फायदा झाला असता. पारसनीस-वस्तुसंग्रहालयांतील वस्तू अभ्यासकांस आतां बिनहरकत मिळण्याची सोय झाली आहे. तथापि हा संग्रह सरकारच्या द्वारां विश्वस्त मंडळाच्या देखरेखीखालीं ठेविला असल्यामुळें पूर्णपणें सार्वजनिक संस्थेचें स्वरूप त्याला अर्थातच नाहीं. पण मर्यादित रीत्या तो सार्वजनिक आहे.

ही अडचण दूर व्हावी म्हणून साताऱ्यांतील कित्येक विद्वानांनीं मेहेरबान सातारा कलेक्टर यांस अध्यक्ष करून त्यांच्या पुढाकारानें सातारा हिस्टॉरिकल सोसायटी या नांवाची एक संस्था स्थापन केली आहे, आणि सातारा म्युझिअमच्याच प्रशस्त मंदिरांत या संस्थेची कचेरी ठेवण्यांत आली आहे. नेटानें काम झाल्यास या संस्थेमार्फत सातारा जिल्ह्यांत चांगली जागृति होईल. सातारा-संग्रहालयांतील कागदपत्रांचा एक खंड नुकताच छापून प्रसिद्ध झाला आहे व पुढेंहि इतर महत्त्वाच्या साधनांचे खंड प्रसिद्ध करण्याची खटपट तेथें चालू असल्याचें कळतें. मराठ्यांच्या जुन्या राजधानींत व साताऱ्यासारख्या टुमदार शहरांत रा. ब. पारसनीस यांच्या प्रेमानें, प्रेरणेनें आणि प्रयत्नानें घडून आलेली ही कामगिरी सर्व महाराष्ट्रियांस अभिमानास्पद वाटेल अशीच घडलेली आहे. सातारा हें गांव जरा दूर पडत असल्यामुळें या संग्रहाचा व्हावा तितका उपयोग होत नाहीं ही गोष्ट मात्र कबूल केली पाहिजे.

## धुळ्याच्या जुळ्या संस्था

राजवाडे यांनीं पुण्यास भारत-इतिहास-संशोधक-मंडळाची स्थापना करविली. तथापि त्यानंतर सुमारें पांच वर्षें झाल्यानंतर कामहि वाढीला लागलेलें पाहून

आणि जागजागीं इतिहासमंडळें निघतील तितकीं चांगलींच असें त्यांचें मत असल्यामुळें, राजवाड्यांच्या प्रेरणेनें ज्यांनीं संशोधनाच्या कामास आपणांस लावून घेतलें होतें आणि विम्मेपणानें, चिकाटीनें व व्यवस्थेनें तें चालू ठेविलें होतें अशा कित्येक शिष्यांच्या साहाय्यानें खानदेशांत धुळें मुक्कामीं एक इतिहासाच्या अभ्यासाचें केंद्र निर्माण करण्याचा राजवाड्यांनीं प्रयत्न केला. इ. स. १८९३ पासून रा. शंकर श्रीकृष्ण देव प्रभृति कित्येक तरुण मंडळी धुळ्यास या कामाकडे लक्ष देत होती. रामदासी संशोधन हें आपलें जीवितकार्य ठरवून रा. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं आपले प्रयत्न आज बेचाळीस वर्षें चालविले आहेत. देवांचे एक प्रमुख सहकारी गोविंद काशीनाथ चांदोरकर यांनीं ताम्रपट, प्राचीन ग्रंथ व प्राचीन शिलालेख यांचेंहि संशोधन चालविलें होतें.[1] सत्कार्योत्तेजक सभा या नांवानें प्रारंभिलेला हा या छोट्या मित्रमंडळाचा प्रयत्न हळुहळू वृद्धिंगत होत गेला. सभेला तशी कांहीं घटना नव्हती. तरीपण सर्व भार या मित्रमंडळानें अंगावर घेऊन डोमगांव येथील, कल्याणांनीं लिहिलेली व श्रीरामदासस्वामींनीं स्वत: शुद्ध केलेली म्हणून परंपरेनें पूज्य मानलेली दासबोधाची शुद्ध प्रत प्रसिद्ध केली ( शके १८२५ ). जुने मराठी ग्रंथ शक्य तर मूळ कवींनीं जसे लिहिले असतील तसेच प्रसिद्ध करावे ही जी राजवाडे यांनीं शास्त्रीय संपादनाची घोषणा केली होती आणि जिचा आविष्कार रामदासावरील आपल्या एका निबंधांत त्यांनीं करून दासबोधाच्या प्रचलित पाठांतील अनर्थ दाखवून दिले होते त्या घोषणेला अनुसरून वरील डोमगांवची प्राचीन रामदासी संहिता प्रसिद्ध झाली आणि प्राचीन कवीच्या ग्रंथाभ्यासास त्यामुळें नवें व इष्ट असें वळण लागलें. देव यांनीं दरसाल सुट्टीचे मिळणारे दिवस रामदासी मठांचा शोध करण्यांत व तेथें संचार करून संशोधन करण्यांत नियमानें व्यतीत केले. याप्रमाणें काम अव्याहत बेचाळीस त्रेचाळीस वर्षें त्यांनीं चालविलें व अद्यापहि त्यांचा हा सदुद्योग पुढें चालू आहे. या संचारांत आणि संशोधनांत त्यांनीं अनेक जुने ग्रंथ, बाडें व पोथ्या मिळविल्या; मठ शोधून काढले; मठपतींच्या परंपरा जुळविल्या; कालस्थलनिर्णय केले; आणि सत्कार्योत्तेजक सभेच्या द्वारें त्यांतील निवडक संग्रहाचें प्रकाशनाहि चालू ठेविलें. रामदास आणि रामदासी या नांवाचें स्वतंत्र मासिक आज बरींच वर्षें त्यांनीं चालविलें असून त्यांतून गिरिधर, वेणाबाई, दिनकरस्वामी, राजाराम प्रासादी, मेरुस्वामी प्रभृति अनेकांचे ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. विविध विषयांवर

१. चांदोरकरांचा ' संतकविकाव्यसूचि ' हा एक बहुमोल संदर्भ ग्रंथ आहे.

शोधांचीं टांचणेंहि पुष्कळ लिहिलीं आहेत. श्रीसांप्रदायाच्या कागदपत्रांचे एक दोन महत्त्वाचे खंडहि प्रसिद्ध केले आहेत. यांतील गिरिधरांचा समर्थप्रताप हा फार महत्त्वाचा असून त्याच्यायोगें रामदासस्वामींच्या चरित्रावर पुष्कळच नवीन प्रकाश पडला आहे. किंबहुना समर्थांच्या चरित्राला आज तोच मोठा आधार-ग्रंथ आहे. दिनकरस्वामींची कविता हाहि ग्रंथ महत्त्वाचाच आहे. श्रीसमर्थांची कविता, पदें व पदांतरें हे ग्रंथ तर या लेखकासारख्या कित्येकांस दासबोधापेक्षांहि जास्ती चटका लावणारे असे ठरले आहेत. 'समर्थांचीं दोन जुनीं चरित्रें' हा सत्कार्योत्तेजक सभेचा ग्रंथहि उपयुक्त आहे. 'करुणाष्टकें' हें पुस्तक समर्थांचें अंतरंग उत्तम तऱ्हेनें प्रगट करून दाखवितें. वेणाबाईचें 'सीतास्वयंवर' हें बिरल अशा जुन्या महिला-वाङ्मयांत मुद्दाम नमूद करण्यासारखें आहे.

सत्कार्योत्तेजक सभेच्या इतर ग्रंथांत कै. चांदोरकर यांनीं प्रसिद्ध केलेला त्रिंबक कवीचा 'बालबोध' हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. या शिवपूर्वकालीन ग्रंथांतील विद्वत्तेची चमक, सांप्रदायिक ज्ञान, व ग्रंथकाराचें व्यक्तित्व हीं तिन्हीहि अंगें प्रशंसनीय अशीं आहेत. येणेंप्रमाणें सत्कार्योत्तेजक सभेचें काम प्राचीन मराठी सारस्वताच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें झालेलें आहे. तंजावर येथील बृहदीश्वर प्राकारावरील भोसलेशाहीचा कोरीव इतिहास राजवाडे यांनीं 'प्रभातां'त[1] प्रसिद्ध केला आहे. हा दगडी शिलालेख हिंदुस्थानांत तरी बहुधा सर्वांत मोठा शिलालेख असावा. पुण्याचा संबंध कमी करून राजवाडे अखेरीअखेरीस धुळ्यास गेल्यावर 'इतिहास आणि ऐतिहासिक' या नांवाचें एक मासिक सत्कार्योत्तेजक सभेनें कांहीं वर्षें प्रसिद्ध केलें. राजवाडे यांनीं लिहिलेला 'महाराष्ट्राचा वसाहतकाळचा इतिहास' व राजवाडे यांचे भाषाविषयक व इतर अत्यंत महत्त्वाचे लेख या मासिकांत प्रसिद्ध झाले आहेत. देव व चांदोरकर यांच्या जोडीला धुळ्याच्या वकिलांपैकीं रा. भास्कर वामन भट हेहि राजवाड्यांच्या प्रेरणेनें संशोधन करूं लागले होते. 'महाराष्ट्रधर्म' या विषयावरील रा. भट यांनीं लिहिलेला विस्तृत, चर्चात्मक व महत्त्वाचा ग्रंथ सभेनेंच प्रसिद्ध केला आहे. महाराष्ट्रधर्म हा शब्द व त्यानें दर्शित केलेली बिशिष्ट कल्पना हिचें संशोधन व उपबृंहण हें महाराष्ट्राच्या इतिहासाच्या अभ्यासकास आवश्यक आहे. या अभ्यासास रा. भट यांचा ग्रंथ मार्गदर्शक होईल; यांत शंका

१. 'प्रभात' नांवाचें एक मासिक रा. चांदोरकर कित्येक महिने चालवीत होते. त्यांत ताम्रपट वगैरेंच्या आधारें बरीच ऐतिहासिक माहिती प्रसिद्ध झाली आहे.

नाहीं. रा. देव यांचें रामदासी संशोधन, रा. चांदोरकर यांचें विविध प्रकारचें लिपिवाचनादि संशोधन आणि रा. भट यांचें विशेषेंकरून व्यवहार ऊर्फ लॉ या संबंधाचें संशोधन असें या त्रिवर्गाचें संशोधन स. सभेच्या द्वारां प्रसिद्ध झाल्यामुळें सभेची कामगिरी फार महत्त्वाची झाली आहे. रा. भट यांनीं धर्मशास्त्रविषयक कागदपत्रांवरून व जुने महजर, निवाडे वगैरेंच्या साहाय्यानें मराठेशाहींतील न्यायदानपद्धतीसंबंधानें विस्तृत विवेचन केलेले कित्येक लेख प्रथम भारत-इतिहास-संशोधक-मंडळासमोर वाचले आणि तेव्हांपासून क्रमाक्रमानें संशोधनाच्या विषयास आपणांस अधिक अधिक वाहून घेतलें.

राजवाडे यांच्या पश्चात्, विशेषतः रा. भट यांच्या प्रयत्नामुळें आणि मुख्यतः राजवाडे यांचे शिलकी निबंध व शिलकी साहित्य योग्य तऱ्हेनें जतन करून प्रसिद्ध करण्यासाठीं **राजवाडे-संशोधनमंदिर** स्थापन झालें. या मंडळास व सत्कार्योत्तेजक सभेस श्री. सौ. मातुश्री इंदिराबाई राणीसाहेब होळकर यांचा उदार आश्रय लाभलेला आहे. रा. भट हे राजवाडे-संशोधन-मंदिराचे चिटणीस आहेत. या मंडळानें राजवाडे मंदिर या नांवाची एक सुंदर, अदाह्य अशी इमारत सुमारें १५ हजार रुपये खर्च करून धुळयास मध्यवर्ती ठिकाणीं बांधली आहे व तेथें राजवाड्यांच्या जुन्या कागदपत्रांचा वगैरे संग्रह करून ठेविला आहे. राजवाड्यांनीं रचलेला एक प्रचंड मराठी धातुकोशहि प्रसिद्ध करण्याचें काम सांप्रत रा. सं. मं. नें हातीं घेतलें आहे. या मंडळाच्या योगानें खानदेशांत इतिहासविषयाविषयीं उत्तम जागृति होऊन मोठें नमुनेदार कार्य घडून येईल अशी आशा करण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. एक सहकारी पेढी काढून तिच्या नफ्याचा कांहीं वांटा राजवाडेमंदिरास कायमचा वांटा म्हणून देण्याची एक स्पृहणीय योजनाहि रा. भट प्रभृतींनीं अमलांत आणिली आहे.

रा. शंकरराव देव यांनीं श्रीसमर्थांच्या कार्यासाठीं महाराष्ट्रभर व बाहेरहि दौरे काढून जांब येथें श्रीसमर्थांच्या जन्मस्थळीं त्यांच्या नांवानें मंदिर उभारलें आहे आणि तदनंतर महान् प्रयासानें जमविलेला रामदासी मठांतील जुन्या मराठी बाडांचा व ग्रंथांचा हस्तलिखित संग्रह सुरक्षित ठेवण्यासाठीं **श्रीसमर्थ वाग्देवता-मंदिर** (धुळें) या नांवाचें एक छोटेंसें पण सुबक व प्रेक्षणीय असें दगडी मंदिर उभारून गेल्या ज्येष्ठ शुद्ध १३ स मोठ्या समारंभानें तें सर्व जनतेस खुलें केलें आहे. या मंदिरांत पोलादी कपाटांत जमविलेला सर्व जुन्या लिखितांचा संग्रह व्यवस्थेनें ठेवण्यांत आला असून रा. देव यांनीं तो महाराष्ट्रांतील तेरा विश्वस्थांच्या

ताव्यांत दिला आहे. येणेंप्रमाणें रा. भट व रा. देव यांनीं राजवाडे यांचें कार्य चालवून व त्याला चिरस्थायी स्वरूप देऊन सर्वांस कायमचे ऋणी केलें आहे, यांत शंका नाहीं.

## दोन नव्या संस्था

वऱ्हाडांत यवतमाळ येथें शारदाश्रम स्थापन झाला आहे. व नागपुर मुक्कामीं मध्यप्रांत संशोधन मंडळ स्थापन झालें आहे. शारदाश्रमाचे निष्ठावंत व निरलस कार्यकर्ते श्री. अप्पासाहेब देशपांडे पापळकर व नागपुरांतील प्रो. मिराशी यांच्यासारखे उदयोन्मुख संशोधक यांच्या सारख्यांचा लाभ ज्या संस्थांस झाला आहे त्या संस्था आज लहान दिसत असल्या तरी लवकरच बाळसें धरतील व नांव गाजवितील याविषयीं आम्हांस संदेह नाहीं.

# देशांतराचे इतिहास

मोठ्या उद्वेगानें व लज्जेनें असें कबूल केलें पाहिजे कीं, जरी मराठी भाषेंत पांचशें वर्षें ग्रंथ होत होते तरी हिंदुस्थानच्या पलीकडील देशांविषयीं एक ओळ सुद्धां ब्रिटिश अमलापूर्वींच्या मराठी वाङ्मयांत सांपडत नाहीं. युरोपांत चाललेल्या पेनिन्शुलर युद्धासंबंधानें उल्लेख असलेलीं एक दोन बातमीपत्रें रायरीकर दप्तरांत आम्हीं पाहिलीं होतीं. तथापि अगदीं शपथ वाहण्याला अडचण करण्यापलीकडे त्यांची मातबरी कांहीं नाहीं. बाहेरचें जग हिंदुस्थानकडे डोळे फाडफाडून पाहत होतें, तर हिंदुस्थानानें आपले चर्मचक्षुच नव्हे, तर आपले ज्ञानचक्षुहि गच्च आवळून धरून, बाहेरच्या जगावर एक प्रकारचा बहिष्कारच घातला होता म्हटल्यास चालेल !

अव्वल इंग्रजीच्या आरंभीं मॅडम् वुइल्सन या विदुषीच्या नांवावर ग्रीक, मिसरी, व प्राचीन ख्रिस्ती लोकांचीं वृत्तकथनें आणि मेदी व पार्शी लोकांचें वृत्त अशीं चारपांच पुस्तकें आढळून येतात. धर्मप्रसाराची हौस ही या ग्रंथांच्या मुळाशीं उघड दिसून येते. विद्यावृद्धि करावी आणि ज्ञानसंग्रह वाढवावा, हा हेतु तितकासा प्रबळ नसल्यामुळें या उपयुक्त शाखेंत पुढें पुष्कळ वर्षेंपावेतों भर पडलेली दिसत नाहीं. रा. धोंडसारख्या कांहीं लेखकांनीं ग्रीसचा इतिहास वगैरे ग्रंथ लिहिलेले त्यांच्या नांवावर आढळतात, तरी त्यांची एकूण संख्या कांहीं फार भरणार नाहीं.

श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनीं जीं अनेक संस्मरणीय कृत्यें केलीं, त्यांत राष्ट्रकथामाला या नांवाची ग्रंथमाला काढून तींतून इंग्रजींतील ‘स्टोरी ऑफ् दी नेशन्स’ या ग्रंथमालेच्या धर्तीवर मराठींत वाचनीय ग्रंथ तयार करण्या-

साठीं केलेला प्रयत्न पाहिला असतां फार कौतुक वाटतें. इ. स. १८९२ मध्यें या मालेंतील ' इराण ' वरील रा. पुराणिक यांचें पुस्तक प्रथम प्रसिद्ध झालें आणि तदनंतर क्रमानें ' कार्थेज ' ( कर्ते रा. नागेश आबाजी काथवटे ), ' तुर्कस्थान ' ( कर्ते रा. रावजी भवानराव पावगी ), ' फ्रान्सचा जुना इतिहास ' ( कर्ते रा. कृष्णा अर्जुन केळूसकर ), ' स्पानिश व मूर लोक ' ( कर्ते रा. रामचंद्र सखाराम आठवले ), ' जर्मनी ' (कर्ते रा. हरि सदाशिव बेलवलकर), ' असिरीया ' (कर्ते रा. सीताराम रामचंद्र गायकवाड ), ' रोम ' (कर्ते रा. विनायक कोंडदेव ओक), अशीं सुमारें नऊ दहा पुस्तकें या मालेंत प्रसिद्ध झालीं. मोठ्या आकाराचीं तीनतीनशें चारचारशें पानें या मालेंतील प्रत्येक ग्रंथांत आहेत. त्यांतील कित्येक ग्रंथ मूळ इंग्रजीवरून भाषांतरित केलेले आहेत. तथापि कित्येकांत लेखकांनीं स्वतंत्रपणें संकलन करण्याचा प्रयत्न केला आहे. विपुल टीपा वगैरे देऊन हे ग्रंथ मराठी वाचकांस समजतील असे करण्याविषयीं दक्षता घेतली आहे. छपाई उत्तम आहे. असा हा प्रयत्न अत्यंत योग्य दिशेनें सुरू झाला होता. परंतु पुढें ही माला बंद करण्यांत आली, हें आमचें दुर्दैव होय! त्या वेळीं जर महाराष्ट्र विद्यापीठ स्थापण्याची कल्पना पुढें आली असती तर बहार झाली असती! एका अर्थानें अकालीं झालेले हे ग्रंथ वायां गेलेले पाहून फार हळहळ वाटते! श्री. सयाजीरावांसारखा उदार प्रभुहि या कार्यापासून विमुख झाला, निदान हिरमुसला, हें शल्य हृदयाला खचित टोंचीत राहील!

' राष्ट्रकथामाले'बरोबरच ' महाराष्ट्रग्रंथमाला ' म्हणून एक उद्योग श्री. सयाजीराव महाराज यांनीं या वेळीं चालविला होता. वरील दोन्ही माला चालविण्याच्या कामीं त्यांस पदरीं असलेले रा. गोविंद सखाराम सरदेसाई यांचें साहाय्य बरेंच झालेलें आहे. ' महाराष्ट्र ग्रंथमालें'त, मॅकिएव्हेलीचा ' प्रिन्स् ' ( राजधर्म ) व प्रो. सीलीचा ' एक्स्पॅन्शन ऑफ् इंग्लंड ' यांसारखे इतिहासशास्त्राभ्यासकास उपयोगी असे मोठाले ग्रंथ प्रसिद्ध झाले. ' इंग्लंड देशाचा विस्तार ' या रा. सरदेसाई यांच्या एकाच ग्रंथाचीं पानें सुमारें पांचशें आहेत. मेन्च्या 'ग्रामसंस्थे'वरील सर्वमान्य ग्रंथाचेंहि विस्तृत भाषांतर रा. महादेव राजाराम बोडस यांच्याकडून या मालेंत करून घेण्यांत आलेलें प्रसिद्ध आहे.

राजानें केलेल्या या प्रयत्नांप्रमाणें प्रजाजनांपैकीं एका धाडसी व ज्ञानलोलुप गृहस्थानें केलेला असाच दुसरा प्रयत्नहि कौतुकास्पद गणावयास पाहिजे. पुण्याचे रा. बळवंत गणेश दाभोळकर यांनीं एकट्याच्या हिंमतीवर अनेक सुंदर ग्रंथ मराठींत

प्रसिद्ध केले. त्यांत प्रो. वासुदेवराव पटवर्धन व प्रो. धोंडोपंत कर्वे यांच्याकडून सिज्‌विक्‌च्या एलेमेंट्स ऑफ् पॉलिटिक्सचें भाषांतर करवून 'राजनीतीचीं मूलतत्त्वें' हा राजनीतिशास्त्रावरील एक ग्रंथ प्रसिद्ध केलेला आढळतो! १८९६ त तो प्रसिद्ध झाला. तिसरी उसळी राजवाडे यांनीं या वेळीं मारलेली आढळते. 'भाषांतर' नांवाचें स्वतंत्र मासिकच काढून त्यांतून त्यांनीं प्लेटोचें 'स्वराज्य' (रिपब्लिक्), मॉंट्स्कचें 'एस्प्रित् द् लॉज्', गिबनूचें रोमन पातशाहीचा ऱ्हास, इत्यादि पुस्तकांचीं भाषांतरें प्रसिद्ध करण्याचा उपक्रम केला. परंतु तो त्यांसहि लवकरच सोडून द्यावा लागला व मग ते इतिहाससंशोधनाकडे वळले. राजनीतिशास्त्र, अर्थशास्त्र वगैरे कित्येक शास्त्रें इतिहासाच्या व्यापक अभ्यासास उपकारक होतात. या सुंदर प्रयत्नांचीं रोपटीं वाढीला लावण्यास जर मायेचें महाराष्ट्र विद्यापीठ असतें तर? आजमितीला प्रो. काळे, कर्वे, गाडगीळ, जावडेकर, पुणतांबेकर यांनीं लिहिलेल्या पांच चार ग्रंथांऐवजीं पांचचारशें ग्रंथ मराठीचें वैभव वाढविण्यास सज्ज असते! आगरकर, टिळक, गोळे किंवा गणेश व्यंकटेश जोशी असे खंदे विद्वान् आमच्यांत होते, पण त्यांचा पोशिंदा कोठें होता? आणि अजूनहि कोण आहे? एक समाजाचाच तेवढा अखेरचा आधार आहे!

दाभोळकरांप्रमाणेंच विजापूरकरांनीं स्वार्थत्यागानें चालविलेल्या 'ग्रंथमाले'नेंहि 'युरोपचें संक्षिप्त इतिवृत्त' (विजापूरकर,-फ्रीमन्‌वरून), 'जपान' (गोरे), 'इंग्लंडचा इतिहास' (ना. ल. फडके), 'जगांतील क्रांतिकारक लढाया' (ज. स. करंदीकर, क्रीसीवरून), असे कांहीं गणनीय ग्रंथ प्रसिद्ध केले. हौसेनें करावें व सोसावें एवढेंच त्यांच्या हातीं होतें!

परवाचें महायुद्ध झालें तेव्हां पुनः कांहीं उचल झाली व 'आधुनिक जर्मनीची उत्क्रांति'सारखे ग्रंथ कै. ना. कृ. आगशे वगैरेंनीं प्रसिद्ध केले. शाळांतून वाव मिळाला त्यामुळें, रा. बर्वे, रा. मोडक, रा. मराठे प्रभृतींनीं युरोपचे व इंग्लंडचे इतिहास अलीकडे लिहून प्रसिद्ध केले आहेत. इंग्लंडचा एक मोठा इतिहास रा. बापट यांचाहि यापूर्वीं प्रसिद्ध झालेला होता. 'जर्मन साम्राज्याची पुनःस्थापना' (प्रि. वि. ग. आपटे, मॅलेसन्‌वरून) हा भाषांतरित ग्रंथ गायकवाडांच्या श्रीसयाजीसाहित्यमालेंतून सन १९२८ त प्रसिद्ध झाला आहे.

परंतु या सर्वांत नांवाजण्यासारखा प्रयत्न म्हणजे रा. न. चिं केळकर यांचा 'आयर्लंडाचा इतिहास' हा होय. हा ग्रंथ अनेक इंग्रजी ग्रंथांचा व ग्रंथकारांच्या

दीर्घ राजकारणी अनुभवाचा परिपाक आहे. तथापि ' मराठे व इंग्रज 'इतकी लोकप्रियता त्यास लाभली नाहीं !

पाश्चिमात्य थोरांचीं चरित्रें मात्र मराठींत बरींच झालेलीं आहेत. वॉशिंग्टन् (वाळवेकर), क्लाइव्ह् ( भागवत ), एल्फिन्स्टन् ( नाटेकर ), बर्क् ( चापेकर), ग्लॅड्स्टन् (ओक व वि. पां. नेने), फ्रँक्लीन् ( टिपणीस ) इत्यादि चरित्रें एकएकवार प्रसिद्ध झालेलीं आहेत. तथापि अशा चरित्रग्रंथांत कै. विनायकराव भावे यांनीं लिहिलेलें ' नेपोलियनचें चरित्र ' मुद्दाम वाचण्यासारखें आहे. भावे यांच्या भाषेचा व निरीक्षणाचा एक निराळाच थाट आहे. मराठींत या ग्रंथाची भर हें भूषण आहे. रा. वा. दा. मुंडले यांनीं काव्हूर, थामस् पेन् , मॅडम् रोलंड, वुइल्यम् दि सायलेंट, नेपोलियन् इत्यादि वाचनीय पुस्तकें लिहून या शाखेंत महत्त्वाची भर टाकली आहे. कै. वि. कों. ओक यांचीं बालबोधांतलीं दुपानी, तिपानी तीन चारशें चरित्रें एकत्र केलीं तर चांगला ग्रंथ तयार होईल. परंतु त्यांनीं ग्लॅडस्टन् , अमीर अब्दुर रहिमान् , इत्यादि स्वतंत्र चरित्रें व फ्रान्स्च्या राज्यक्रांतीचा इतिहास असे कांहीं स्वतंत्र ग्रंथहि लिहिलेले आहेत. त्या सर्वांत ग्लॅडस्टन् चरित्र वाचण्यासारखें आहे. ओकांची बालबोध भाषा व सरळ मांडणी सुपरिचित आहे. रा. ताम्हणकरांचा 'मुसोलिनी आणि फाशिस्मो' आणि प्रो. फडके यांचें डी व्हॅलेरा चरित्र हे ग्रंथहि चटकदार उतरले आहेत. रा. वा. कृ. भावे यांनीं लिहिलेला 'तुर्कांचें साम्राज्य' हा ग्रंथहि येथें नमूद केला पाहिजे.

भारत गौरव ग्रंथमालेंत प्रिन्स बिस्मार्कचें प्रसिद्ध झालेलें मोठें चरित्र व नुकताच रा. ना. ह. आपटे यांनीं 'नवभारत ग्रंथमाले'त प्रसिद्ध केलेला अमेरिकेचा इतिहास हे ग्रंथ मराठींत ज्ञानप्रद वाङ्मयाची भर घालणारे आहेत. परंतु एकंदरींत या शाखेची फलश्रुति यथातथाच आहे !

प्राचीन काव्यसंशोधनाच्या ठळक प्रयत्नांचा उल्लेख अन्य निमित्तानें मागें कोठेंकोठें येऊन गेलाच आहे. ज्ञानचंद्रोदय, सर्वसंग्रह, तेंडूलकर, बेळगांवचे सावंत, निर्णयसागर वगैरे अनेकांचे प्रयत्न या कामीं उल्लेखनीय आहेत. सर्वांत 'काव्यसंग्रहा'चा प्रयत्न दांडगा. कै. वामन दाजी ओक व नंतर कै. ना. चिं. केळकर या दोघां संपादकांकडे या कार्याचें मुख्य श्रेय द्यावयास पाहिजे. पुढें भावे यांनीं ' महाराष्ट्र कवी ' मासिकांत दासोपंत, कृष्णदास मुद्गल, सामराज वगैरे अनेक कवींचे ग्रंथ पंचतंत्रासारखा एखादा प्राचीन गद्य प्रबंध असे अनेक ग्रंथ प्रसिद्ध केले; आणि जुन्या ' महाराष्ट्र सारस्वताचा ' एकमेव प्रमाण इतिहास लिहून प्रसिद्ध केला. हा

ग्रंथ भावे यांचें जीवनकार्यंच समजावयास हरकत नाहीं. दोनतीन तपांच्या परिश्रमांचें व संशोधनाचें परिपक्व फळ म्हणजे हें महाराष्ट्र सारस्वत ! भावे यांची भाषापद्धति विशिष्ट ढंगाची परंतु आकर्षक आहे. पदवी परीक्षा देण्यापूर्वीपासूनच हा पोथ्या धुंडण्याचा नाद विनायकरावांस लागला व तो त्यांच्या जीवाचा मुख्य विसावा होऊन राहिला ! पदवी भौतिकशास्त्राची, नाद पाखरें उडविण्याचा, धंदा मीठ विकण्याचा आणि संशोधन प्राचीन मराठी काव्याचें, असा फक्कड मेळ भावे यांच्या चरित्रांत दिसून येतो ! ! ते मोठ्या अभिमानानें याचें वर्णन करीत ! पैशाचें व बुद्धीचें बळ यांस अनुकूल होतें तथापि कळकळ व महत्वाकांक्षा असल्याशिवाय असले श्रम होत नाहींत. आपली प्रकृति खालावली असतांहि मानभाव महंतांस आपल्याकडे खेंचून आणून त्यांनीं महानुभावी वाङ्मयाचें अज्ञात दालन महाराष्ट्रास खुलें केलें तें एरवी कसें घडलें असतें ?

श्री. रा. द. पंत पराडकर यांनीं मोरोपंती कवितेच्या ग्रंथाचे नऊ भाग कविलिखित प्रतींवरून छापले ही त्यांची कामगिरी एका दृष्टीनें अपूर्व झाली. आणखी तीन भाग राहिले आहेत तेवढे हातावेगळे करून रा. पराडकर यांनीं काम तात्रडतोब पुरें केल्याचें श्रेय घ्यावें. नाहीं तर थोड्यासाठीं त्यांनीं पुण्य गमावलें असें होईल !

जनूकाका आठल्यांनीं मागें रत्नागिरीस 'यथार्थदीपिका' छापली, किंवा कृष्णदयार्णवांची हरिवरदा स्वतंत्र पोथीरूपानें प्रसिद्ध झाली, किंवा बेळगांवचे नाईक व आंबेवाडी यांनीं अनेक गीता-टीकांचा एखादाच भाग प्रसिद्ध केला, किंवा कै. गजाननराव देवांनीं अनेक जुने ग्रंथ छापले, किंवा गोंधळेकर, चित्रशाळा, गणपत कृष्णाजी, आवटे, यंदे, ढवळे, गुर्जर इत्यादिकांनीं अनेक ग्रंथ छापले त्या सर्वांचा येथें उल्लेख करण्यास अवकाश नाहीं. व तेवढी येथें आवश्यकताहि नाहीं.

ज्ञानेश्वरी, तुकोबा गाथा वगैरेंच्या अनेक प्रति निघालेल्या आहेत. कित्येक सार्थ आहेत. परंतु संशोधन, किंवा चिकित्सादि दृष्टि पुढें ठेवून होणारे प्रयत्न विरळा. खपतात म्हणून छापा हाच प्रकार फार. नगर वाङ्मयोपासक मंडळातर्फे श्रीज्ञानेश्वरांसंबंधानें संशोधनप्रकाशन करण्याचे उद्योग श्री. सरदार मिरीकर प्रभृति नाथपंथसंशोधक करीत आहेत. 'श्रीज्ञानेश्वरदर्शन' या नांवाचा जो दोन भागांत प्रसिद्ध झालेला या मंडळाचा ग्रंथ आहे त्याचा येथें आदरानें उल्लेख केला पाहिजे.

रा. लक्ष्मणरावजी पांगारकर यांची कामगिरी संतचरित्रकार म्हणून सर्वश्रुत आहे. रा. आजगांवकर यांची कविचरित्रमालाहि उपयुक्त झाली आहे. संतचरित्रांची संख्या पुष्कळच मोठी आहे. तथापि या वाङ्मयांत चिकित्सक वाङ्मय थोडें; भाविक वाङ्मय फार. तरी पण नुसत्या आख्यायिकांच्या दलदलींतून आपण बाहेर पडत चाललों आहोंत यांत शंका नाहीं. रा. पांगारकर यांनीं बरीच संतकविता शोधूनहि काढली आहे व मुमुक्षूंत कांहीं प्रसिद्धहि केली आहे. निरंजन माधवाची बरीच नवी सुंदर कविता त्यांनीं उजेडांत आणली. श्री. गुब्बी यांनीं छापलेला मध्वमुनीश्वर गाथा प्रथम मुमुक्षूंतच प्रसिद्ध झाला होता. सांप्रत पांगारकर मराठी वाङ्मयाचा विस्तृत इतिहास लिहिण्यांत गुंतले असून पहिला विभाग त्यांनीं प्रसिद्धहि केला आहे. दुसरा लवकरच प्रसिद्ध होईल. श्री. पांगारकरांचें लिहिणें बोलणें अतिशय प्रेमळ व रसाळ असतें व त्यांचे ग्रंथ यामुळें लोकप्रिय झाले आहेत.

चिकित्सक काव्य टीकाकार म्हणून कै. बाळकृष्ण अनंत भिडे यांचा यथार्थ लौकिक होता. त्यांनीं म. सा. परिषदेसाठीं लिहिलेला मराठी वाङ्मयाचा इतिहास, एक खंड–महानुभाव अखेर–प्रसिद्ध झाला आहे. त्यांच्या मृत्यूमुळें आपली हानि झाली आहे.

तरुण पिढींत रा. रामचंद्र महादेव आठवले यांचें नांव वामनी चिकित्सक म्हणून चांगलें पुढें आलेलें आहे. नांदेडचे रा. वि. अं. कानोले हेहि शेष घराण्या-बद्दल वगैरे चांगलें संशोधन करीत आहेत. मुंबईचे रा. अ. का. प्रियोळकर यांनीं रघुनाथ पंडिताच्या नलदमयंतिस्वयंवराख्यानाची एक सुंदर दरबारी आवृत्ति औंधच्या श्री. पंतप्रतिनिधींच्या औदार्यमुळें नुकतीच प्रसिद्ध केली आहे. श्रीनाथसंप्रदाय ग्रंथमाला, पुष्प १ लें म्हणून शिवदिन केसरीकृत ज्ञानप्रदीप आम्हीं नुकताच प्रसिद्ध केला आहे; सेलूचे रा. काटे यांनीं भूषणकवीचे समग्र ग्रंथ कांहीं वर्षांमागें प्रसिद्ध केले; श्रीसोहिरोबा आंबिये यांची कविता पुनः प्रकाशित झाली आहे; चांगदेवांचा ‘ तत्त्वसार ’ (शके १२३४)—उज्जनी प्राचीन ग्रंथसंग्रहालयांतलें अनर्घ्य रत्न— लवकरच प्रकाशित होणारें आहे; भा. इ. सं. मंडळाच्या अहवालांतून व ‘रामदास रामदासी’सारख्या मासिकांतील टिपणांतून अनेक लहान मोठे नवे नवे कवी सारखे माहीत होतच आहेत; शेख महंमदाची चटका लावणारी शुद्ध मराठी बाण्याची कविता प्रसिद्धीची वाट पाहत आमच्याजवळ तयार आहे; दासोपंतांची ऐतिहासिक कागदपत्री माहिती आम्हीं छापण्यासाठीं तयार केली आहे; गेल्या महिन्या दोन

महिन्यांत महानुभावी ' महदंबेचे धवळे ' रा. वामनराव देशपांडे यांनीं प्रसिद्ध केले; प्रो. कोल्ते यांनीं ' उद्धवगीता ' प्रसिद्ध केली, व रा. नेने यांनीं ' चक्रधरसूत्रपाठ संहिता ' छापली; विहंगम-विश्ववाणी वगैरे आमचीं नागपूर वऱ्हाडकडील नव्या दमाचीं मासिकें महानुभावांच्याविषयीं नवी माहिती किंवा चर्चा प्रसिद्ध केल्याशिवाय एक अंकहि सुना जाऊं देत नाहींत; मयूरमंडळादि मंडळें चर्चा चालवीत आहेत; शाळिग्रामादिकांनीं पोवाड्यांचें प्रसिद्धीकरण केलें तें कार्य रा. य. न. केळकर, वर्दे प्रभृति नवे विद्वान् पुढें चालवीत आहेत; नागपूर विद्यापीठाला महानुभावी वाङ्मय-प्रकाशनाविषयीं पुढाकार घ्यावा लागेल अशी आशा मनांत पालवूं लागली आहे; किंबहुना पूर्वीच्या काव्यसंग्रहाप्रमाणें किंवा महाराष्ट्र कविप्रमाणें एखादें मासिक काढून त्यांत काव्यसंहिता व काव्यचिकित्सा असे विभाग घालून नवाच उद्योग आरंभिण्याची आवश्यकता क्षणोक्षणीं भासूं लागली आहे; येणेंप्रमाणें महाराष्ट्राचें अभिमानाचें 'जुनें ठेवणें' प्रेमानें जतन करून, त्याच्या अभ्यासानें महाराष्ट्राच्या त्या वेळच्या विचारपरंपरेचें, गृहस्थितीचें, तत्त्वज्ञानाचें आकलन करण्याचा व लाभालाभाचा अढावा काढण्याच्या मार्गाला आम्ही लागण्याचीं सुचिन्हें दृग्गोचर होत आहेत; डॉ. केतकर यांनीं तशा प्रयत्नाचा एक नमुना पुढें ठेवलाहि आहे; असें आशादायक वातावरण तयार होत आहे. पुढें हा अभ्यास वाढणार आणि या प्राचीन वाङ्मयमंथनाचीं अमृतफळें आपणांस चाखावयास मिळत राहणार यांत शंका नाहीं.

## निष्कर्ष

महाराष्ट्रांत इतिहासक्षेत्रांत झालेल्या कामगिरीचें समालोचन या लेखांत साधारण विस्तारानें केलें आहे. याहिपेक्षां अधिक सविस्तर परामर्ष घेणें या लेखाच्या मर्यादेंत शक्य नाहीं. या समालोचनाचा स्थूल मानानें निष्कर्ष असाः—

( १ ) संशोधनाच्या विद्येचें हल्लींचें स्वरूप पाश्चात्य विद्वानांच्या संबंधामुळेंच हिंदुस्थानांत उदित झालें आहे. घटिताच्या वास्तवतेवर आणि त्याचप्रमाणें स्थलकालव्यक्तिनिश्चयावर या पद्धतींत जो भर दिलेला असतो त्यामुळें इतिहास शब्दाचा निश्चित होणारा अर्थ हा त्याच्या मूलार्थाला जुळणारा परंतु पौराणिकपणाकडे जाण्याचा त्याचा रस्ता रोखून टाकणारा असा झाला आहे.

( २ ) आम्ही तद्विद्यासंपन्न होण्यापूर्वी आमच्या गुरुत्वाचा मान पाश्चात्य संशोधकांकडे जातो.

( ३ ) आधुनिक काळांतील मराठ्यांचे पहिले इतिहास हिंदुस्थानांतील इतर लोकांच्या इतिहासांप्रमाणें प्रथमतः पाश्चात्यांनींच लिहिले. स्प्रिंगेल् यानें जर्मन् भाषेंत व स्कॉट् वेअरिंग् व तदनंतर ग्रँट् डफ्, माल्कम्, एल्फिन्स्टन् यांनीं इंग्रजी भाषेंत लिहिलेले इतिहासग्रंथ हे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धापूर्वींच रचून झाले होते.

( ४ ) मराठ्यांच्या इतिहासासंबंधानें संशोधनाला सुरुवात कीर्तने, लोकहितवादी व रानडे यांच्या पिढीनें केली. या संशोधनांत शास्त्रीय भाग विशेष नव्हता. भिडे यांचा अष्टप्रधानांचा इतिहास व सरंजामे यांचा शिंदेशाहीचा इतिहास हे मराठींतील पहिल्या काळांतील नांव घेण्यासारखे इतिहास होत.

( ५ ) कागदपत्र व बखरी यांच्या संशोधनाला व प्रकाशनाला खरी सुरुवात काव्येतिहाससंग्रहापासून झाली.

( ६ ) अस्सल कागदपत्रें शोधण्याचें काम खरे, पारसनीस व राजवाडे यांनीं फार मोठ्या प्रमाणावर केलें. साने, खरे, पारसनीस व राजवाडे यांस याच कारणासाठीं आम्ही महाराष्ट्र-इतिहाससंशोधनाचें **मुनिचतुष्टय** असें संबोधितों. अलीकडे संस्थीकरणाचें युग चालू आहे. त्याचाहि पाया राजवाडे यांनींच घातला, त्यामुळें वरील मुनिचतुष्टयांस त्यांत अग्रस्थान द्यावें लागतें. शके १८३२ मध्यें भारत-इतिहास-संशोधक-मंडळाची स्थापना त्यांनीं घडवून आणली.

( ७ ) राजवाडे यांच्याच प्रेरणेनें सत्कार्योत्तेजक सभा, धुळ्याचें राजवाडे-संशोधनमंदिर व समर्थ-वाग्देवतामंदिर ही जोरदार कार्यपरंपरा व शिष्य-परंपराहि निर्माण झाली. पारसनीसांनीं सरकारचा विश्वास संपादून सातारा वस्तुसंग्रहालय नांवाचें स्वतःचें स्मारक स्वतःच निर्माण केलें.

( ८ ) महानुभावी वाङ्मयाच्या संकेतांचें गुप्त भांडार राजवाडे यांनींच प्रथम फोडलें! आतां वऱ्हाड-नागपुराकडे शारदाश्रम, मध्यप्रांत संशोधन मंडळ या संस्थांच्या द्वारां महानुभावी वाङ्मय प्रकाशनाचें कार्य वाढत्या जोमानें चालत आहे.

( ९ ) रावसाहेब सरदेसाई यांनीं संकलनाचें काम एकनिष्ठेनें करून सुसंबद्ध व वाचनीय असे आपल्या रियासतीचे भाग प्रसिद्ध करून रियासतकार म्हणून सर्व महाराष्ट्राकडून मान्यता मिळविली.

( १० ) शास्त्रीय इतिहासाला पायाभूत असलेले प्रबंध व चर्चात्मक ग्रंथ सांप्रतच्या संशोधनयुगांत अधिक निर्माण होत असून रा. दत्तोपंत आपटे यांनीं या बाबतींत भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या द्वारें उज्ज्वल कामगिरी केली आहे.

( ११ ) अखिल भारतीय आधुनिक इतिहास परिषद यशस्वी रीतीनें पार पाडून भारत-इतिहास-संशोधक-मंडळानें आपलें भारतोपपदधारित्व सार्थ करून मागील सर्व पायऱ्यांच्या पुढील पायरी गांठली आहे.

( १२ ) यापुढील युगांत महाराष्ट्रांतील इतिहाससंशोधनाचें जातिवंत कार्य आपली प्रेरकशक्ति निदर्शनास आणून भारताचा जगन्मान्य व चिरस्थायी असा बृहद् इतिहास निर्माण करण्याची सिद्धता करील, असा कयास आहे.

---

ता. क.–( १ ) स्थलवर्णनांत रा. सी. रा. गायकवाड यांच्या पुणें वर्णनाचे दोन भाग, विजापूर वर्णन, जोशी यांचें जुनें पुणें वर्णन, माडगांवकरांचें जुनें मुंबईवर्णन; भाषांतरित ग्रंथांत लाईलच्या ब्रिटिश डोमिनियन् इन् इंडियाचे करकरे यांनीं केलेलें मराठी भाषांतर; जातिविषयक ग्रंथांत कोल्हापूर दरबारासाठीं प्रो. डोंगरे यांनीं छापलेला सिद्धान्तविजय नांवाचा ग्रंथ व छत्रपतींची वंशावळी; तसेंच बडोद्याचे रा. घाणेकर यांचे 'प्राचीन द्रविड' किंवा आम्हीं लिहिलेलें मराठे व इंग्रज यावरील विस्तृत परीक्षण; रा. काथवटे कृत पारशांचा इतिहास, व रा. कुलकर्णी संपादित चिटणीस घराण्याचे कागदपत्र; अशा कित्येक ग्रंथांचा उल्लेख तरी करणें अवश्य वाटतें. हे सर्व ग्रंथ त्या त्या शाखेंत उपयुक्त वर्गांत राहतील.

( २ ) कै. सदाशिवराव दिवेकर हे एक जुने व अत्यंत परिश्रमी संशोधक होऊन गेले. भर मुंबईत मुळजी जेठा कापडगंजांत स्वावलंबनानें पेढी चालवून हिंदुस्थानभर हिंडतांना फुरसतीच्या वेळांत त्यांनीं पुष्कळ दुर्मिळ साहित्य मिळविलें. सत्यामळनाथांचा अपूर्व गाथा त्यांनीं एलिचपुरास मिळविला होता. पर्णालपर्वतग्रहणाख्यानहि त्यांनींच छापलें. तंजावराहून तामीळ 'शिवभारत' आणवून त्याचें महत्त्व त्यांनींच भा. इ. सं. मंडळाचे द्वारां संशोधकांस विज्ञात केलें व मग मूळ संस्कृत शिवभारताची सुपरिष्कृत आवृत्ति काढली! शिवचरित्रप्रदीप हा ग्रंथहि त्यांनींच प्रसिद्ध करविला. अलीबहाद्दराची पत्रेंहि त्यांनींच मिळविली होती.

भा. इ. सं. मंडळाला लाभलेल्या तरुण संशोधकांत कै. पां. न. पटवर्धन यांनीं थोड्या वेळांत आपल्या अंगची चमक दाखवून चांगलें नांव कमावलें. चाणाक्ष बुद्धि, परिश्रम व धडाडी या गुणांवरून 'पांडोबा' मंडळांत फार प्रिय होते. शाळामास्तर मंडळींत मरहूम मिया शिकंदरलाल आतार यांचें नांव विशेष लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

( ३ ) श्री. अज्ञातवासी कवि–दि. गं. केळकर, पुणें–यांनीं ऐतिहासिक चित्रें व नाणीं जमविण्याचा प्रशंसनीय उद्योग आरंभिला असून, त्यांचा चित्रसंग्रह आज लहान पण पाहण्यासारखा आहे.

९

# भाषाशास्त्रविषयक अभ्यास

[ लेखक:-श्री. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, एम्.ए., बी.टी. ]

भाषा अगोदर आणि भाषेचें व्याकरण नंतर असा हा नेहमींचा क्रम आहे. व त्या क्रमाला अनुसरून मराठी भाषा रूढ झाली. नंतर बऱ्याच दिवसांनीं तिचें व्याकरण बांधलें गेलें. भाषामंदिरांत साफसुफाई करण्याचें काम व्याकरणकाराकडे असतें. प्रत्यक्ष मंदिर बांधणारे, त्यावर कलाकुसर करणारे, सौंदर्य चढविणारे, नाना-प्रकारचीं लेणीं घालून भाषादेवीला शोभायमान करणारे कुशल कारागीर निराळेच असतात. हे लोक आपल्या बुद्धिसामर्थ्याच्या जोरावर जो प्रपंच उभारतात त्यांत किंवा भाषादेवींच्या भोळ्या भक्तसमूहांत किंवा अज्ञानी मुलाबाळांत जो पसारा पड-लेला असतो त्यामध्यें योग्य क्रम लावून, मोठ्या शिस्तीनें, एकसूत्रीपणा आणणें हेंच व्याकरणाचें काम असतें. भाषामंदिराची उभारणी होऊन कळस चढला म्हणजे साफसुफ करणाऱ्याची, क्रम लावणाऱ्याची, सूत्रबद्धता आणणाऱ्याची जरूरी लागते. व्याकरणाची प्रवृत्ति भाषेनंतर.

मराठी भाषेच्या उद्‌गमानंतर बरेच दिवस मराठीचें व्याकरण रचलें गेलें नाहीं. आरंभीं आरंभीं मराठीच्या व्याकरणासंबंधीं बरीच अनास्था दिसून येते. पहिले जे व्याकरणविषयक प्रयत्न दिसतात व ज्यांसंबंधीं ग्रंथरूपानें माहिती उपलब्ध आहे ते मानभावी लोकांनीं केलेले आहेत व ते १३ व्या शतकांतील आहेत; म्हणजे मराठीच्या

उद्गमकालापासून कांहीं नाहीं तरी ५०० वर्षांनंतर झालेले आहेत. ह्यापूर्वींचा प्रयत्न उपलब्ध नाहीं व हें त्या कालाच्या परिस्थितीला धरूनच आहे. त्या काळीं समाजांतील जेवढीं बुद्धीचीं माणसें त्यांचा सर्व ओढा संस्कृतकडे असे. मराठी भाषा म्हणजे केवळ बाह्यव्यवहारासाठीं साधन म्हणून वापरावयाची व बुद्धिसर्वस्व सर्व संस्कृतच्या व्याकरणाच्या अभ्यासाकडे वेंचावयाचें अशी प्रवृत्ति विद्वानांमध्यें होती. संस्कृत व प्राकृत ह्या दोन्ही भाषांच्या अभिमान्यांमध्यें पुष्कळ दिवस उभा दावा होता. ह्याचें उदाहरण एकनाथस्वामी व त्यांचे चिरंजीव हरि पंडित यांच्यामध्यें दिसतें. मराठीमध्यें बुद्धि खर्च करणें म्हणजे अपव्यय करणें अशी समजूत होती. मानभावांनीं आपल्या पंथाविषयींचें ज्ञान सामान्य लोकांना त्यांच्या मातृभाषेंत सांगण्याची जी जैनबुद्धांची परंपरा तीच चालविली म्हणून त्यांना मराठी भाषेचें व्याकरण करणें जरूर पडलें.

## मराठी व्याकरणकार

मराठीचें आद्य व्याकरण भास्कर कविराज व्यास ह्या मानभावानें रचिलें. पंडित भास्कर व्यास हा ज्ञानदेवसमकालीन होता, तेव्हां अर्थातच त्याच्या व्याकरणग्रंथाचा काल इसवी शतक १३०० संभवतो. ह्या व्यासाचार्याचा 'व्याकर्ण' ग्रंथ आज उपलब्ध नाहीं. ग्रंथाचें नांव 'सुभाषानिबंधु' होतें. परंतु त्याच्या या ग्रंथाचा निर्देष पुढीलप्रमाणें आढळतो: "मूळव्याकरणाचेनि आधारें ॥ सुभाषानिबंधु बोलिला कवीश्वरें ॥"... "श्री भास्करें गोपाळा अज्ञापिलें ॥ ते लक्ष्मण रत्नाकर बोलिलें ॥" यावरून मराठीच्या आद्य व्याकरणाचा मान ह्या कवीश्वराचार्य भास्करभटालाच आहे. व म्हणूनच त्याला त्या काळीं 'भाषाघोष' अशी बहुमानाची पदवी होती. दुसरा मानभावी व्याकरणकार आनेराज व्यास हा होय. त्यानें संपादन केलेल्या व्याकरणग्रंथाचें नांव लक्षणरत्नाकर असें आहे. आनेराज हा पूर्वाश्रमीचा गोपाळपंडित म्हणून मोठा विद्वान् होता. ह्यानें मानभावाची दीक्षा नागदेवाचार्यापासून घेतली. देवगिरीच्या रामदेव जाधवाच्या कामाइसा नांवाच्या धाकट्या बहिणीस पुराण सांगण्याचें काम ह्या पंडिताकडे होतें. ह्याची हयात शके ११९० पासून १२६२ पर्यंत होती.

ह्यानंतरचा व्याकरणावरील ज्यांचा ग्रंथ उपलब्ध आहे ते पंडित भीष्माचार्य होत. हे पूर्वाश्रमींचे सारस्वत व काशीचे रहिवासी होते. हेहि तेराव्या शतकांत

होऊन गेले. ह्यांचे गुरु म्हणजे यादवांच्या दरबारांत पंडित, कवि व ग्रंथकार म्हणून नांवाजले गेलेले प्रसिद्ध वोपदेव होत. भीष्माचार्यांची संस्कृत व मराठी ग्रंथरचना विपुल आहे. त्यांचे व्याकरणावर ' नामविभक्ति ' व सामान्य भाषेवर ' पंचवार्तिक ' हे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

पंचवार्तिकाचें स्थूल स्वरूप खालीं दिलें आहे. पंचवार्तिकांत १ सूत्र-लक्षण, २ सूत्रप्रकृति, ३ सूत्रकारक, ४ सूत्राख्यान व ५ सूत्रस्वरूप अशीं पांच प्रकरणें आहेत. सूत्राची व्याख्या त्यांनीं पुढीलप्रमाणें केली आहे. " अध्याहारें कां पूर्वपदानुवृत्ति समवेत अल्पाक्षरें असंदिग्ध पदें असेंतिः तेंहि पदीं करून जेणें प्रयोगें अर्थज्ञान सूत्रिजे म्हणजे मुद्रिजे तथा प्रयोगातें सूत्र म्हणिजे. " सूत्राची अशा रीतीनें व्याख्या करून सूत्राचे १ वचन, २ वाक्य, ३ प्रकरण, ४ महावाक्य, असे चार भेद मानिले आहेत व त्या प्रत्येकाचे अर्थ पुढीलप्रमाणें दिले आहेत.

" वचनापासोनि अर्थ निफन्नला तो वचनार्थ; वचनापासोनि वाक्य निफन्नलें; वाक्यापासौनि प्रकरण निफन्नलें; प्रकरणापासोनि महावाक्य निफन्नलें " अशी सर्वांची परंपरा आहे.

वचनाचें ज्ञान झाल्याशिवाय पदाचें ज्ञान होत नाहीं. पदें सलिंग, अलिंग व क्रिया अशीं तीन प्रकारचीं आहेत. सलिंगांत पुन्हां पुंलिंग, स्त्री, नपुंसक असे तीन प्रकार. अलिंग म्हणजे अव्ययें. नामें, सर्वनामें, विशेषणें हीं सर्व सलिंग पदें होत. ची, की, कीं, गा, आन, जरी इत्यादि अलिंग पदें होत. ' क्रिये ' मध्यें पुन्हां सलिंगा व अलिंगा असे दोन प्रकार पडतात. " गेला, गेली, गेलें " वगैरे कृदन्तांपासून झालेलीं धातुरूपें सलिंगांत मोडतात. " आति, नाहीं, होए, न होए " इत्यादि अलिंगा क्रिया होत. क्रियेचे काल तीनः भूत, भविष्य, वर्तमान असून यावेगळे प्रेरणा, आशंसा, प्रार्थना, आशीर्वाद ह्या अर्थानें प्रयोग असतात ते भविष्यान्तर्गत समजावेत. क्रियेस वचनें तीन, पुरुष तीन, प्रयोग तीन. . . . कर्तरि, कर्मणि, भावे. . .आहेत. वाक्याच्या बाबतींत चारपासून अठरा पदांपर्यंत पदांनीं बनलेलीं वाक्यें. वाक्याचे १५ प्रकार मानलेले आहेत व तीन वाक्यां-पासून बारा वाक्यांपर्यंत वाक्यांनीं बनलेले प्रकरणाचे १० निरनिराळे प्रकार मानलेले आहेत. त्याचप्रमाणें तीच परंपरा पुढें चालवून तीनपासून बारा प्रकरणांचे झालेले निरनिराळे दहा प्रकार ' महावाक्याचे ' मानले आहेत व ह्या सर्वांना उदाहरणें मानभावी धर्मग्रंथांतील वेदान्तपरच आहेत.

तिसरें सूत्रकारक लक्षण आहे तें फार महत्त्वाचें आहे. त्यांत विभक्तींची संख्या सात देऊन त्यांचे प्रत्यय दिले आहेत. विभक्तिप्रत्ययांच्या इतिहासाच्या दृष्टीनें हे प्रत्यय महत्वाचे आहेत. त्यापुढील दोन प्रकरणें सूत्रव्याख्यान व सूत्रस्वरूप हीं असून त्यांचा न्याय व मीमांसा ह्या शास्त्रांच्या दृष्टीनें विचार केला आहे.

मानभावपंथीय लेखकांनीं मराठी व्याकरणाच्या अभिवृद्ध्यर्थ जे कांहीं प्रयत्न केले त्यांचा गोषवारा येथवर सांगितला. त्यांच्या पुढील काळांत ह्या बाजूनें जे कांहीं प्रयत्न झाले असतील त्यांचा इतिहास उपलब्ध नसल्यामुळें आज कांहीं त्यांसंबंधीं जास्त बोलतां येणें शक्य नाहीं. शिवकालांतील स्वराज्याच्या धूमधडाक्यांत किंवा पेशवे काळांतील मुलखगिरीच्या फेरफटक्यांत महाराष्ट्रांतील भाषा किंवा व्याकरण ह्याचे अभिमानी विद्वान् लोक ह्यांनीं त्याबाबत काय प्रयत्न केले किंवा सामान्य साक्षर लोकांत भाषा व तिचें व्याकरण, ह्या विषयांचें शिक्षण कसें दिलें जाई, कशा स्वरूपाचीं क्रमिक पुस्तकें होतीं, ह्याचें दिग्दर्शन करणारें एक देखील साधन उपलब्ध नाहीं. व्याकरण असा निराळा विषय न मानितां भाषेच्या किंवा साधुसंतांनीं निर्माण केलेल्या पद्य-वाङ्मयाच्या आश्रयानेंच मराठी व्याकरणाचें शिक्षण लोकांना मिळत असावें. व्याकरणाबद्दलचें हें दैन्य पेशवाईच्या अखेरपर्यंतच व इंग्रजशाहीच्या अव्वल अमदानीपर्यंत चालू होतें. नाहीं म्हणावयास मद्रास येथील ओरिएण्टल लायब्ररीमध्यें मराठीचें संस्कृतांत लिहिलेलें सूत्रबद्ध असें एक छोटें व्याकरण आहे. तें पेशवाईच्या अखेरीस लिहिलें गेलें.[१] हें दैन्य इंग्रजांनीं नाहींसें केल्याबद्दल मराठीचे आद्य व्याकरणकार दादोबा पांडुरंग त्यांची स्तुतिघोषणा पुढीलप्रमाणें करतात. "इसवी सन १८१८ तला महाराष्ट्र देश शहाण्या इंग्लिश सरकारच्या हातीं आल्यावर पुढें सात आठ वर्षांनीं त्यांणीं आपलें लक्ष इतर लक्षावधि राजकीय विषयांत निमग्न असतां, आजपर्यंत कोणत्याहि सरकारनें ज्याकडे विशेषेंकरून लक्ष दिलें नाहीं त्या देशभाषेकडेस व एतद्देशीय लोकांत सद्विद्येचा प्रसार व्हावा या विचाराकडेस लाविलें. हें या सरकारचें उदारकृत्य परम स्तुत्यार्ह आहे."[२] आंग्लकालाच्या पूर्वीच्या मराठी भाषेला नियमांत आणण्याविषयीं कोणीं प्रयत्नच केला नव्हता. अत्यंत विस्कलित झालेली व व्याकरणरूप फणीनें कोणी न विंचरल्यामुळें अनेक ग्रंथी जमून फारच गुतलेली अशी मराठी भाषेची स्थिति होती. ती तिची दीर्घकाळग्रथित अशी गूत हातीं घेऊन तिचे कांहीं पदर

---

१. राजवाडे–तिङन्त विचार पृ. १. २. दादोबा पांडुरंग–म. भा. व्या. आवृत्ति ३ पृ. ९.

सोडवून कांहीं उकलल्याच्या धोरणांत बसविण्याचें काम दादोबांनीं केलें. मराठी व्याकरणाच्या अध्ययनाकडे लक्ष इंग्रजी अमदानींत लागलें व तेंहि इंग्रजी भाषा जाणणाऱ्या अशा महाराष्ट्री लोकांचें लागलें, हें उघड आहे. पण ह्याचा परिणाम-हि असाच झाला कीं, मराठी व्याकरणास जी एक इंग्रजी व्याकरणाची वळण बसली ती कायमचीच बसली. दादोबांचें व्याकरण बरेंचसें इंग्रजी व्याकरणाच्या धर्तीवर गेलें आहे. "वैदिक व्याकरण दादोबांना मुळींच येत नव्हतें. संस्कृत व प्राकृत व्याकरणाचा गंधहि दादोबांना फारसा असल्याचें दिसत नाहीं." (राजवाडे, ति. वि. २ ). दादोबांनीं आपलें पहिलें व्याकरण १८३६ सालीं लिहिलें. शब्दाचे आठ प्रकार, क्रियापदाचे संयुक्त काल, संयुक्त क्रियापदें, काल व अर्थ ह्यांमध्यें भिन्नत्व त्याचप्रमाणें भेदाचे प्रकार, प्रयोगांत भावकर्तरि म्हणून एक निराळा प्रकार, पुरुषास प्रथम, द्वितीय, तृतीय हीं नांवें, आख्यातांऐवजीं क्रियापदें अशा प्रकारच्या ज्या पुष्कळ सुधारणा दादोबांनीं घडवून आणिल्या त्यांवरून त्यांच्यावर इंग्रजी व्याकरणाची दाट छाया पडली होती हें खास.

मराठीचे आद्य व्याकरणकार म्हणून मान दादोबांस द्यावा किंवा नाहीं, ह्याविषयीं मतभेद आहे. मराठीचे आद्य व्याकरणकार गंगाधरशास्त्री फडके हे होत, असें म्हणतात. १८३८ मध्यें ह्यांच्या 'मराठी भाषेच्या व्याकरणा'ची दुसरी आवृत्ति छापिली. फडकेशास्त्री ह्यांचें व्याकरण संवादरूप असून त्याचा आरंभ संधिप्रकरणानें केला आहे. ज्यांना आपण विभक्तिप्रतिरूपक अव्ययें मानितों त्यांना फडके त्या त्या विभक्तींचे प्रत्यय मानीत असत. ह्या व्याकरणाची पहिली प्रत मराठींतील पहिलें व्याकरण असावें. परंतु त्याला मान्यता न मिळाल्यामुळें तें मागें पडलें असावें. दुसरा असाहि एक आक्षेप खुद्द दादोबांच्या हयातींत होता कीं, "दादोबांनीं आपलें व्याकरण बाळशास्त्री जांभेकर ह्यांनीं जें व्याकरणविषयक साहित्य गोळा केलें होतें त्याच्या आधारावर रचिलें." "ह्या परोत्कर्षासहिष्णु स्वभावाच्या मंडळींनीं जी कंठाळी उठविली" तिजसंबंधीं खुद्द दादोबा लिहितातः—"वस्तुतः ह्या विषयावर त्या गृहस्थाच्या ( जांभेकर ) किंवा कोणाच्याहि हातचा एक कागदाचा चिठोडाहि आम्हीं पाहिला नाहीं." ह्या वादाचा निकाल करणें कठीणच आहे. व्याकरणाची जी एक प्रथा पाडिली ती दादोबांनींच पाडिली व त्या अर्थानें त्यांना जो 'मराठी भाषेचा पाणिनी' म्हणून मान देतात तो यथार्थच आहे, असेंच कोणीहि म्हणेल. पुढें १८७० सालीं त्यांचें व्याकरण

सरकारनें घेऊन आपल्या खात्यांत सर्‌हा उपयोग केला, ह्यामुळें त्याच्या लाखांवर प्रती खपून आवृत्त्याहि तिसांपर्यंत निघाल्या.

बाळशास्त्री जांभेकर ह्यांनीं आपलें संवादरूप व्याकरण ह्याच सुमारास काढिलें. ह्याच काळांतील आणखी व्याकरणाचे ग्रंथ म्हणजे १८४० मध्यें प्रसिद्ध झालेलें बर्जेस ह्याचें व्याकरण व १८५९ मधील गंगाधरशास्त्री टिळक ह्यांचें व्याकरण हे होत. बर्जेस ह्याच्या व्याकरणांतील 'सामान्यरूप प्रकरण' नांवाजण्यासारखें आहे.

दादोबा झाले काय किंवा तत्कालीन इतर शास्त्री झाले काय, ह्यांनीं जीं व्याकरणें लिहिलीं तीं लौकिक स्वरूपाचीं होतीं. व्याकरणाकडे इतिहास, व्युत्पत्ति व इतर भाषांशीं तुलना ह्या तीन दृष्टींनीं पाहण्याचें काम प्रथम कृष्णशास्त्री गोडबोले ह्यांनीं केलें. ह्यांना संस्कृत, मराठी, इंग्रजी, फारसी, अरबी व सिंधी ह्या भाषा चांगल्या अवगत होत्या व त्यामुळें त्यांचें 'मराठी भाषेचें नवीन व्याकरण (१८६७)' हें पुस्तक त्यापूर्वींच्या सर्व व्याकरणांपेक्षां अधिक सरस, आटोपशीर, व्युत्पत्ति, वाक्यपृथक्करण, छंदःशास्त्र आणि संस्कृत-प्राकृत-मराठी यांचा संबंधदर्शक प्रकरणें जोडल्यामुळें अधिक व्यापक असें झालें आहे. परंतु हा ग्रंथ प्रौढ विद्यार्थ्यांसच आकलन होण्याजोगा असल्यामुळें त्याचा शालोपयोगी पुस्तक म्हणून प्रसार झाला नाहीं.

फडके, दादोबा, जांभेकर, टिळक, कृष्णशास्त्री गोडबोले व चिपळूणकर हे सर्व विद्वान् लोक मराठी व्याकरणकारांच्या पहिल्या पिढींतील म्हणावयास हरकत नाहीं. ह्यांचा काल आम्ही साधारणपणें १८३० पासून ते १८७० पर्यंत समजतों. ह्याच्या पुढील काळांत दुसरी पिढी सुरू होते. त्या पिढींत व्याकरणकार म्हणून पुष्कळच विद्वान् पुढें आले. त्यांत मुख्य रा. भि. जोशी, रा. भि. गुंजीकर, खेर, नवलकर, दामले इत्यादि विद्वान् लोक येतात. पैकीं जोशी ह्यांनीं आपलें प्रौढबोध व्याकरण १८८९ सालीं काढलें. त्यावर गुंजीकर ह्यांनीं वि. ज्ञा. विस्तारांत टीका केली व आपलें सुबोधव्याकरण लिहिलें. जोशी ह्यांनीं दादोबांनीं जी एक व्याकरणाची मूस तयार केली होती तिच्यामध्येंच आपलें व्याकरण घालून तयार केलें. आपल्या प्रौढबोध व्याकरणाची रचना कोणत्या तत्त्वावर केली हें तत्त्व जोशी स्वतां पुढीलप्रमाणें देतातः "या सर्व गोष्टी विचारांत घेऊन संस्कृताच्या पायावर शब्दांचीं रूपें वगैरे व्यवस्था कायम ठेवून आणि मराठी ही चालू भाषा इंग्रजीच्या

धर्तीवर गेली पाहिजे हें ध्यानांत घेऊन इंग्रज ग्रंथकारांच्या व्याकरणविषयक पद्धतीस अनुसरून माझ्या प्रौढबोध व्याकरणाची मीं रचना केली. "[1]

डॉ. भाण्डारकर ह्यांच्या सान्निध्याचा फायदा त्यांना मिळाला व त्यांनीं त्याचा उपयोग करून घेण्याचा प्रयत्न केला. परंतु तो यशस्वी झाला नाहीं. जोशी ह्यांच्या व्याकरणास भाषाशास्त्रीय वळण अजीबात नाहीं. संस्कृत, प्राकृत वगैरे मराठीला जन्म देणाऱ्या भाषा, गुजराथी, सिंधी, बंगाली वगैरे मराठीच्या आसन्नवर्ती इतर भारतीय भाषा, भाषाशास्त्र, प्रमाणशास्त्र ह्यांपैकीं कशाचाहि व्यासंग किंवा कामचलाऊ अभ्यासहि रा. भि. जोशी यांच्या जवळ नव्हता. नाहीं म्हणावयास मराठी भाषेचा अभिमान व एक प्रकारची अभ्यासाची शिस्त येवढयाच काय त्या गोष्टी त्यांच्याजवळ होत्या. व त्यांच्या जोरावर त्यांनीं प्रौढ व्याकरण रचिलें. प्रत्यय, प्रयोग, प्रातिपादिकांचीं व क्रियापदांचीं रूपें, त्यांची ऐतिहासिक दृष्टया छाननी करून त्यांचें मूळ ठरविण्याचा प्रयत्न जागोजाग केल्याचें ते सांगतात.[2] परंतु असा प्रयत्न कोठेंहि केलेला दिसत नाहीं. तत्सम शब्द ऱ्हस्व असले तरी दीर्घ लिहिण्याची लेखनसुधारणा करून मराठी भाषेचा स्वतंत्र स्वभाव त्यांनीं प्रस्थापित केला. द्वितीया विभक्ति प्रथमेंत न सामावून तिला स्वतंत्र मानून तिच्यांत पुन्हां सप्रत्यय द्वितीया व अप्रत्यय द्वितीया असे दोन प्रकार केले. आगरकरांच्या वाक्यमीमांसेंतील कल्पना घेऊन वाक्यपरिच्छेदाचें संपूर्ण विवेचन जोशांनींच मराठींत प्रथम आणिलें.

जोशी यांच्या व्याकरणावर शास्त्रशुद्ध अशी टीका रा. भि. गुंजीकर ह्यांनीं वि. विस्तारांत केली व त्यांच्या पुस्तकांतील दोष काढून त्यांनीं 'सुबोध व्याकरण' म्हणून एक व्याकरणविषयक पुस्तक आपलीं मतें मांडण्याकरितां तयार केलें. ह्या पुस्तकांत संधिप्रकरण सर्वांच्या शेवटीं दिलें आहे. द्वितीया व चतुर्थी ह्या विभक्ति दोन भिन्न मानून त्यांचे प्रत्ययहि निराळे दिले आहेत. प्रयोगांतील कर्तरि, कर्मणि, भावे हे भेद गुंजीकर ह्यांना विलक्षण दिसून ह्या संज्ञांऐवजीं कर्त्याचें, कर्माचें व क्रियापदाचें प्राधान्य अशा संज्ञा त्यांनीं दिल्या आहेत. आख्यात हा शब्द त्यांनीं वापरला आहे. त्याचप्रमाणें उत्तम, मध्यम व अन्य ह्या संज्ञा पुरुषांस दिल्या. ह्यावरून गुंजीकर ह्यांचे व्याकरणविषयक विचार संस्कृत व्याकरणास किती धरून होते हें दिसेल.

व्याकरणविषयाला पोषक अशी चर्चा त्या काळीं पुष्कळच झालेली दिसते. चिपळूणकर ( पितापुत्र ), आगरकर, गोडबोले, पाध्ये, थत्ते, हातवळणे, आचार्य,

१. जोशी म. भा. घटना, पृ. ४१३. २. म. भा. घटना, पृ. ४१३.

टिळक, वैद्य, परांजपे, बनहट्टी ( ज्येष्ठ ) हे सर्व विद्वान् लोक त्या चर्चेत भाग घेत असत. ह्या विद्वानांचीं मतें ग्रंथाच्या रूपानें जरी उपलब्ध नसलीं तरी त्यांनीं केलेल्या व्याकरणविषयक चर्चेनें तत्कालीन व्याकरणप्रयत्नांस चांगलें उपकारी असें वळण लागलें. कोणाचें श्रेय किती हें सांगणें मात्र फार कठीण आहे. आगरकरांनीं केलेली वाक्यमीमांसा विशेष महत्त्वाची आहे. भाषेंतील शब्दरूपें कोणतें कार्य करतात हें दाखविणें व्याकरणशास्त्राचें काम, तर भाषेंतील वाक्यांत बोलणारांचे उद्देश काय व त्यांचें त्या उद्देशासंबंधीं बोलणें, सांगणें, म्हणणें किंवा विधान काय हें तंतोतंत रीतीनें दर्शविणें हें न्यायशास्त्राचें काम. व्याकरणाच्या पूर्णतेस न्याय-शास्त्राची व वाक्यमीमांसाशास्त्राची कशी जरूरी आहे, हें आगरकरांनीं आपल्या वाक्यमीमांसेवरील लेखांनीं दाखविलें.

रेव्ह. गणपतराव नवलकर ह्यांनीं आपलें मराठी व्याकरण इंग्रजी भाषेमध्यें १८८० मध्यें लिहिलें ( दुसरी आवृत्ति ). हें पुस्तकहि प्रौढबोध स्वरूपाचें व इंग्रजीमध्यें लिहिलेलें आहे. ह्यांत जातां जातां इतर पाश्चात्य आर्य भाषांतील साम्यें दिलीं आहेत. भाषाशास्त्रांतील व्याकरणविषयक ठोकळ सिद्धान्त जरूर तेथें निर्देशिले आहेत. नवलकरांनीं अर्थावरून शब्दाच्या जाती ठरविल्या आहेत. उभयान्वयी अव्ययास वाक्ययोगी अव्यय असें ते म्हणतात. नामाच्या भेदांत समुदायवाचक (उदा. कळप, सैन्य, मंडळी) असा एक निराळाच भेद ते मानितात. विभक्ति प्रथमा, द्वितीया, तृतीया अशा संख्यावाचक न मानतां त्यांना कर्तृ विभक्ति, कर्म विभक्ति अशीं अर्थयुक्त नांवें द्यावीं असें त्याचें म्हणणें असे. चतुर्थी विभक्तीस 'दानीविभक्ति' असें नांव त्यांनीं सुचविलें आहे. सर्वनामाचे सहा प्रकार कल्पून त्यांत सामान्य पुरुषवाचक ( उदा० आपण ) असा एक निराळा प्रकार ते मानितात. नाम, क्रियापद व कर्तरिप्रयोग वगैरे कांहींच्या त्यांनीं दिलेल्या व्याख्या सदोष आहेत.

आतांपर्यंत व्याकरणविषयक जे ग्रंथ उल्लेखिले त्या सर्वांपेक्षां अत्यंत नांवा-जण्यासारखा व महत्त्वाचा असा ग्रंथ म्हणजे कै. मो. के. दामले ह्यांचा 'शास्त्रीय मराठी व्याकरण' हा होय. मराठी व्याकरणावर एवढा विस्तृत, सांगोपांग व पूर्वकालीन व्याकरणविषयक चर्चेचा परामर्ष घेणारा असा दुसरा ग्रंथ नाहीं. हा १९०० सालीं लिहिला गेला. दामल्यांनीं व्याकरणविषयक सर्व उपलब्ध माहिती एकत्र करून तिची साधक बाधक अशी चर्चा करून स्पष्ट रीतीनें दुसऱ्यांचे दोष त्यांच्या पदरांत टाकून आपल्या मताप्रमाणें शेवटीं निर्णय दिले आहेत. न्यायशास्त्रांत

दामल्यांची गति विशेष असल्यामुळें तिच्या जोरावर त्यांनीं आपल्या ग्रंथांत सर्व विवेचन केलें आहे. विषयाच्या मर्यादा, विषय उकलण्याची पद्धति व विशेषतः कोणत्या विषयास कोणती पद्धति लावावी, ह्याचें मार्मिक ज्ञान ह्या गोष्टी दामल्यांजवळ होत्या. शब्दाचे प्रकार, नामप्रकार, आपण सर्वनाम, धातूंचें वर्गीकरण, सामान्यलिंग, नामविभक्ति व आख्यातविभक्ति, कारक, संयुक्त क्रियापदें वगैरे विषयांवरील केलेले उहापोह तर त्यांच्या बुद्धिमत्तेची साक्ष देतात. त्यांच्या व्याकरणांतील विशेष पुढीलप्रमाणें दिसतातः—'शब्दा'चे विकारी व अविकारी असे दोन प्रकार ते मानतात. २ सामान्यसर्वनामास अनिश्चित सर्वनाम असें म्हणतात. ३ दामल्यांनीं धातूंचें वर्गीकरण व्युत्पत्तीवरून व अर्थावरून केलें आहे. ४ क्रियापदांना आख्यातें समजून त्यांचे निरनिराळे काळ व अर्थ असें न समजतां त्यांना त्यांच्या प्रत्ययांप्रमाणें १ लें ताख्यात, ताख्यात ( २ रें ), लाख्यात, वाख्यात, ई आख्यात, ऊ आख्यात, ईलाख्यात असे सात प्रकार त्यांनीं केले. तसेंच, ५ धातूंच्या रूपांप्रमाणें यांचे आचर व उमज असे गण कल्पिले.

परंतु मराठी व्याकरणकारांचा जो सर्वसामान्य दोष तो ह्यांच्यामध्येंहि दिसून येतो. मराठी भाषा प्राक्कालीन भाषांपासून कशी परिणत होत आली ह्यासंबंधीं त्यांच्या व्याकरणांत थोडें देखील दिग्दर्शन नाहीं. वैदिक, संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, पुराण मराठी, मध्ययुगीन मराठी वगैरे भाषांचें अध्ययन दामल्यांजवळ पण अत्यंत बेताचें होतें. फारशी त्यांना अवगत होतीसें दिसत नाहीं. अशा तऱ्हेनें व्याकरणाची ऐतिहासिक दृष्टि दामल्यांच्या जवळ नव्हती, म्हणून त्यांचें शास्त्रीय व्याकरण हें केवल शिष्ट मराठीचें व तेंहि वर्तमान मराठीचें व्याकरण ठरतें. त्यांतील शास्त्रीयता विशेष कसोटीला उतरेलशी नाहीं. शिवाय उहापोह करतांना कांहीं वेळां विषयरुचीच्या आवेशांत प्रतिपक्षावर ते बेसुमार तुटूनहि पडत असल्यामुळें निःपक्षपातित्व त्यापरीनें कलंकित झालेलें आहे. असे थोडेसे दोष असले तरी सर्व उपलब्ध व्याकरणग्रंथांत दामल्यांचें व्याकरण हें पुस्तक बहुमोल व उच्च दर्जाचें आहे हें खास.

इतर शालोपयोगी व्याकरणकारांसंबंधीं काय जास्त लिहावयाचें? त्यांचें ध्येय काय व कार्य काय? ध्येयाप्रमाणें कार्य! बिचारे बोलूनचालून परोपजीवी, किंवा उच्छिष्टभक्षक! ह्यांजबद्दल न लिहिणें हें चांगलें. ह्या सर्वांमधून डोकें बरेंचसें वर काढणारे व आपलें स्वत्व दाखविणारे असे ना. वि. आपटे हे दिसतात. पडलेल्या चाकोरींतून गाडी हांकण्यास कौशल्य नको असतें. त्या चाकोरींतून गाडी बाहेर

काढून आपण निराळी चाकोरी पाडून तिच्यांतून दुसऱ्यास यावयास लावणें ही खरी धडाडी. द्वितीया लोप, संयुक्त क्रियापदांस विरोध, आख्यातांचा प्रथम, द्वितीय असा क्रम, भावकर्तरिप्रयोगास विरोध, अशा लहानथोर पुष्कळ बाबी आपटे ह्यांनीं स्वतंत्र रीतीनें मांडल्या; परंतु त्या रुजूं शकल्या नाहींत.

## मराठीस भाषाशास्त्राचा पाया

येथवर मराठी भाषेचे व्याकरणकार सांगितले. परंतु व्याकरणाच्या मतांत क्रांति घडवून आणणारे व एकंदर मतांच्या गलबल्यांत एकसूत्रता आणणारे असे व्याकरण-चर्चिक लोक निराळेच आहेत. ह्यांचें महत्व त्यांच्याहून विशेष आहे. ह्या वर्गात डॉ. भांडरकर, राजारामशास्त्री भागवत, राजवाडे, वैद्य, गुणे हे आपल्याकडील व डॉ. बीम्स, डॉ. ग्रियरसन, डॉ. स्टीन कोनो, ज्यूल्स ब्लोश हे तिकडील प्रमुख होत. ह्यांनीं प्रत्यक्ष मराठीचें व्याकरण असें पुस्तक कदाचित् लिहिलें नसेल तरी त्याला लागणारें साहित्य अमूप निर्माण करून ठेविलें आहे हें खास. इतर भाषांत मराठी भाषेचें स्थान, मराठी प्रत्ययप्रयोग वगैरेंची ऐतिहासिक परंपरा, मराठीवर इतर भाषांचा झालेला परिणाम, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे व्याकरणांत जी ध्वनि-वर्ण-शब्द–प्रत्यय–प्रयोग--वाक्य इत्यादि भाषाघटकांची साधनिका आहे, ती ऐतिहासिक व पारंपारिक अशा दोन्ही दृष्टींनीं विशद केली आहे. मराठी भाषेच्या मंदिरास अशा रीतीनें भक्कम असा भाषाशास्त्राचा पाया त्यांनीं घातला. मराठीच्या पूर्वस्थितीचें संस्कृत, प्राकृत, अपभ्रंशविषयींचें स्वरूप दाखवून मराठीमध्यें तें किती उमटलें आहे, इतर आर्योद्भव उत्तर हिंदुस्थानांतील भाषांत आणि मराठींत वर दिलेल्या बाबींत कोठें साम्यविरोध आहे, हें भांडारकर व बीम्स ह्यांनीं दाखविलें. भागवतांनीं पूर्व-वैदिक भाषेचीं चिन्हें थोडींशीं नजरेस आणिलीं; डॉ. ग्रियरसन व स्टीन कोनो ह्यांनीं मराठी भाषेची वर्ण व प्रत्यय ह्यांची प्रक्रिया सांगितली व मराठीच्या प्रांतिक बोलीच्या खाचाखुणा नजरेस आणिल्या. खानदेशी भाषा मराठीचा प्रांतिक भेद नसून गुजराथीचा भेद आहे, हें एक नवीनच तत्त्व त्यांनीं प्रस्थापित केलें. वैद्य व गुणे ह्यांनीं मराठी आणि अपभ्रंश ह्यांचें नातें जोडून मराठीचा उद्गमकाळ निश्चित करण्याचा प्रयत्न केला. ज्यूल्स ब्लोश ह्यांच्या प्रयत्नांचें मोल ह्या सर्वांहून अधिक आहे. मराठीची जी ध्वनिप्रक्रिया–उच्चारांत होणारे फरक–कोणाकडून उलगडली गेली नव्हती ती ह्या फ्रेंच विद्वानानें उकलिली, व त्या त्या उच्चारभेदाची काल-निश्चितीहि त्यानें केली. मराठीच्या उच्चारांवर व प्रयोगांवर कोणत्या भाषेचे,

कोणत्या काळांत व कोणत्या कारणांनीं परिणाम झाले हें त्यांनीं प्रथम सांगितलें. ह्या विद्वानानें मराठीच्या व्याकरणचिकित्सेची जी एक मजल गांठली तिच्याहि पुढें दोन पावलें टाकण्याचें श्रेय राजवाड्यांनीं घेऊन ज्या देशांत यास्क, शाकटायन, पाणिनी, पतंजली, कात्यायन, वररुची, वामन, भर्तृहरी, हेमचंद्र, लक्ष्मीधर, मार्कंडेय हे महान् महान् व्याकरणसूरी उत्पन्न झाले त्याच देशांत ती परंपरा त्यांच्याबरोबर लोपली नसून ती अव्याहत चालू आहे, असें आपल्या व्याकरणविषयक लिखाणावरून सिद्ध केलें. मराठीची जुनाट परंपरा, मराठीच्या सांदीकोपऱ्यांत सांपडणारे पूर्ववैदिक भाषेचे अवशेष, पाणिनीय संस्कृत भाषाच आपण सध्यां मराठीच्या रूपानें कशी बोलत आहों, पूर्ववैदिक भाषा आणि वर्तमान मराठी ह्यांच्यामधील निरनिराळ्या अवस्था व त्यांचे काल, प्रांतपरत्वें कालपरत्वें मराठींत पडणारे भेद, एवंच सर्व मराठीचा भाषिक इतिहास राजवाड्यांनीं सर्वांच्या पुढें मांडला. अशी भाषेची कोणतीहि बाब नाहीं कीं जी राजवाड्यांच्या नजरेंतून राहून गेली. सुबन्त-तिङन्त प्रक्रिया, ज्ञानेश्वरीचें व्याकरण, ज्ञानेश्वरीचें संपादन व प्रस्तावना, मराठी धातुपाठ (अप्रकाशित) व इतर किरकोळ निबंध हें राजवाडे ह्यांचें मराठीसंबंधीं लिखाण आहे. राजवाडे यांच्या ज्ञानेश्वरीच्या प्रकाशनानें तत्कालीन वाङ्मयभक्तांत बरीच खळबळ उडवून दिली. तिच्या अस्सलपणाबद्दल पुष्कळ टीका झाली. ह्या साधकबाधक चर्चेत बडोद्याचे डॉ. वि. गो. चिपळोणकर यांनीं बराच भाग घेतला. त्या वेळचे त्यांचे ज्ञानेश्वरीवरील लेख बरेच मान्यता पावले. मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणाची दिशा प्रथम राजवाडे ह्यांनीं दाखविली. संयुक्त काळ व संयुक्त क्रियापदें मानण्याच्या विरुद्ध ते आहेत.

हे वर निर्देशिलेले सर्व व्याकरणचर्चिक चांगले उत्तम भाषाशास्त्रज्ञ होते. भाषा-शास्त्रज्ञांची ही पहिली पिढी आहे. महाराष्ट्रामध्यें भाषाशास्त्राच्या अभ्यासाची सुरुवात राजवाड्यांनीं केली व सर्व भाषाशास्त्रीय लेखन स्वाभिमानानें मराठींत लिहून ठेविलें.

राजवाड्यांच्या व त्यांच्या लगतच्या पिढींतील आणखी दोन भाषिक ग्रंथकार म्हणजे चिं. वि. वैद्य व डॉ. पां. दा. गुणे हे होत. राजवाड्यांच्या प्रमाणेंच ह्यांचा संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश व मराठी ह्या भाषांचा व्यासंग चांगला असल्यामुळें ह्यांच्या मतालाहि एक प्रकारचें प्रामाण्य आलें आहे. डॉ. गुणे ह्यांना गायकवाड प्राच्य ग्रंथावलींतील अपभ्रंश-भाषेंतील ग्रंथ संपादण्याची संधि मिळाल्यामुळें त्यांचा

त्या भाषेचा अभ्यास सखोल झाला. व त्याच्या बळावर संस्कृत, प्राकृत व मराठी ह्या भाषांच्या दोन अवस्थांमधील दुवा जो दुसऱ्यांना अंधुक व अस्पष्ट असा दिसत होता तो ह्यांनीं चांगल्या स्पष्ट रीतीनें जोडून दाखविला व मराठी भाषेच्या पूर्वीच्या अवस्थांची एक सांखळी जोडून तयार केली. अपभ्रंश-भाषेचा मराठीशीं असलेला संबंध डॉ. गुणे व वैद्य ह्या दोघांनीं विशद केला. ह्यांच्यापूर्वीं राजवाडे ह्यांना त्या संबंधाची कल्पना होती. ती त्यांनीं ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेंत ध्वनित केली होती. परंतु उच्चार, प्रत्यय व प्रयोग अशा निरनिराळ्या बाबींतील साम्य ह्या उपरिनिर्दिष्ट उभय विद्वानांनीं दाखविलें. गुजराथी, सिंधी वगैरे आधुनिक देशी भाषांच्या मुळाशीं ज्याप्रमाणें अपभ्रंश-भाषा आहे, त्याचप्रमाणें मराठी भाषेच्या मुळाशींहि अपभ्रंश-भाषा आहे, असा सिद्धांत त्यांनीं मांडला. समाजाच्या क्रांतीबरोबर भाषेमध्येंहि क्रांति कशी होते, हें त्यांनीं वरील सिद्धांतावरोबर सांगितलें.

ह्यांच्या नंतरची पिढी कृ. पां. कुलकर्णी यांची व त्यांनीं केलेलें कार्य त्यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या "मराठी भाषा-उद्गम व विकास" ह्या व इतर ग्रंथांवरून कळण्यासारखें आहे. त्याचा निर्देश येथें करीत नाहीं. मराठी भाषा कोणत्याहि एका प्राकृत भाषेपासून उत्पन्न झाली नसून ती निरनिराळ्या बऱ्याच प्राकृत भाषांपासून खिस्ती शकाच्या सातव्या शतकाच्या आसपास उत्पन्न झाली, हा सिद्धांत प्रस्थापित करण्याकडे त्यांच्या लिखाणाचा रोख आहे.

मराठी भाषेचा उद्गम, तिची ऐतिहासिक उपपत्ति, मराठी भाषा व मराठी समाज ह्यांचा परस्पर संबंध, मराठीवर इतर भाषांनीं केलेले परिणाम, तिचीं कालवार व प्रांतवार झालेलीं स्थित्यंतरें आणि तिच्या व्याकरणाचा ऐतिहासिक पाया वगैरे गोष्टींचा विचार ह्या वर उल्लेखिलेल्या भाषाशास्त्रज्ञांनीं केला. ह्याशिवाय इतर आणखी कांहीं बाबी आहेत, त्यांचा स्थूल निर्देश खालीं करतों.

## महाराष्ट्र शब्दकोश

इतर बाबींमध्यें विशेष उल्लेखनीय व महत्त्वाचा प्रयत्न म्हटला म्हणजे पुण्याच्या महाराष्ट्र कोशमंडळानें श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्या आश्रयानें चालविलेला शब्दकोश हा होय. पूर्वी ईस्ट इंडिया कंपनी सरकारच्या आश्रयानें व निरनिराळ्या प्रांतांतील पंडितांच्या साहाय्यानें कॅंडी आणि मोल्स्वर्थ ह्या दोघांनीं मराठी कोशाची रचना करून मराठी भाषिकांवर अगणित उपकार करून ठेविले. तो पूर्वींचा काळ, तीं अपुरीं साधनें, त्यांची परकी भाषा, जाणत्यांचा अभाव वगैरे

निरुत्साहकारक गोष्टी पाहिल्या म्हणजे या दोन खिस्ती संपादकांच्या चिकाटीचा, पराकाष्ठेच्या प्रयत्नाचा अचंबा वाटून त्यांना धन्यवाद दिल्यावांचून राहवत नाहीं. त्यांचा प्रयत्न झाला त्याला आज ८० वर वर्षे झालीं. येवढ्या मधल्या काळांत अपरंपार वाङ्मयीन घडामोडी झाल्या, मनस्वी नवीं साधनें उजेडांत आलीं, मराठीचा संसार वाढला, तिची शब्दसंपत्तिहि वाढली, ह्या सर्वांचा ठाव घेऊन परिगणन करण्याची वेळ आली होती, अशा वेळीं ज्ञानकोशासारख्या अंगमोडी कामाच्या तालमींत तयार झालेलीं कामालु माणसें ह्या कामास मिळालीं व त्यांनीं केवळ आपल्या ज्ञानावर-अनुभवावर विसंबून न राहतां महाराष्ट्रांतील नामांकित विद्वानांचें साहाय्य घेऊन हें मोठें जगड्व्याळ काम अर्धेमुर्धे संपवीत आणिलें आहे. थोडक्याच दिवसांत त्याचा गोड शेवट झालेला आपणास दिसेल. यापूर्वी मराठी भाषेचे कोशरचनेचे लहान-सहान प्रयत्न वासुदेवराव आपटे, विद्याधरपंत भिडे, रानडे यांनीं केले. कोशाचें काम मोठ्या कष्टाचें असतें. तें एकाचें काम नव्हे. तसेंच हा कांहीं सुखाचा सौदा नव्हे. ह्याला रक्त आटवावें लागतें व रक्त आटवितां आटवितां कोशाच्या पायीं प्राणहि वेंचल्यांचीं उदाहरणें आहेत. वामनराव आपटे कोशांत गेले, रानडे कोशांतच संपले. तेव्हां या महाराष्ट्रकोशकारांनीं एकट्यावर काम न घेतां सामुदायिक व श्रम-विभागणीच्या तत्वानें हें चालविलें आहे हें बरें आहे.

## व्युत्पत्ति व धातुकोश

कोशासंबंधीं असाच आणखी एक उल्लेखनीय प्रयत्न आहे. तो राजवाडे यांचा धातुकोश हा होय. महाराष्ट्रकोशकारांचें काम संकलनस्वरूपाचें आहे. परंतु हा धातुकोश व्युत्पत्तिशास्त्रज्ञांमध्यें बरीच खळबळ उत्पन्न केल्याशिवाय राहणार नाहीं. ग्रांथिक व बोली अशा दोन्ही मराठींतील झाडून सर्व धातु काढून त्यांची व्युत्पत्ति सांगणें, त्यांचीं मुळें संस्कृत-प्राकृतपर्यंत नेऊन भिडविणें हें कांहीं साध्या बुद्धिमत्तेचें काम नव्हे. राजवाडे ह्यांनीं दिलेल्या व्युत्पत्ति कोणाला पटो वा न पटो-त्यांनीं दिलेली १५,००० मराठी धातूंची नुसती यादी देखील कांहीं कमी महत्त्वाची नाहीं. भाषेच्या शास्त्रीय मांडणींत त्या भाषेंतील धातुपाठाचें विशेष महत्त्व असतें. म्हणूनच पाणिनी, वररुची, हेमचंद्र वगैरे महनीय व्याकरणसूरींनीं आपापल्या व्याकरणाबरोबर धातुपाठ दिला. इतर भाषांमध्यें असेच धातुपाठ देऊन त्या त्या भाषेची संपन्नता वाढविली आहे. मराठीस आजवर भोंवणारें हें दैन्य नाहींसें करण्याचें श्रेय राजवाडे ह्यांनीं संपादिलें.

व्युत्पत्तिशास्त्रामध्यें आणखी त्रुटित परं उल्लेखनीय प्रयत्न म्हणजे शिवराम-पंत परांजपे व गोविंदराव मोडक यांचे होत. ह्यांपैकीं परांजपे ह्यांचा प्रयत्न अधिक शास्त्रीय आहे. संस्कृत प्राकृत भाषांत ज्या व्युत्पत्तीचा धागादोरा सांपडेल तीच व्युत्पत्ति खरी मानावयाची, असा त्यांचा कटाक्ष असे. परांजप्यांचा प्रयत्न इतका जरी इतिहासाला धरून नाहीं तरी त्याहून कमी असा मोडक यांचा प्रयत्न आहे. व्युत्पत्ति, व्याकरणांतील सूक्ष्म विमर्शस्थळें, प्रयोगविशेष, वाक्प्रचार वगैरे मुद्यांवर उत्तरपक्ष करण्यांत मोडक यांचा हातखंडा आहे. पण एकंदर प्रतिपादनांत ऐतिहासिक ठाम पुराव्याच्या ऐवजीं कल्पनेच्या भुसभुसीत पुराव्यावरच त्यांची अधिक भिस्त दिसते. तरीपण व्याकरणांतील निरनिराळ्या प्रश्नांवर साधकबाधक चर्चा करून भाषेच्या शास्त्र-शुद्ध विकासास ह्यांनीं बराच हातभर लाविला आहे, हें खास.

भाषेच्या अभ्यासांतील इतर अंगांची उभारणी त्या त्या अभ्यासकांकडून होत आहे. प्रांतिक भाषांचा अभ्यास डॉ. चव्हाण, आबा चांदोरकर, वांबर्डेकर, साठे ह्यांच्या प्रयत्नांत दिसून येतो. शब्दाच्या अर्थाचें निष्पादन, त्याची शास्त्रीय मांडणी व त्याचे नियम ह्यांचा विचार डॉ. वैद्य, प्रो. पुरंदरे यांनीं चालविला आहे.

गेल्या पन्नाससाठ वर्षांतील मराठी भाषेच्या अभ्यासाची स्थिति ही वर वर्णन केली आहे. तिच्या उभ्या आयुष्यांत निरनिराळ्या काळांत कोणकोणते फेर-फार पडत गेले हें सांगणें जसें भाषाशास्त्राचें काम आहे तसेंच भाषेचें आधुनिक स्वरूप काय आहे हें सांगणेंहि आहे, व तें सांगून हा लेख आटपता घेतों.

## भाषेचें आधुनिक स्वरूप

आधुनिक मराठींत दिसणारे तिचे स्वभावविशेष हे खालीं क्रमानें दिले आहेत.

स्वराच्या उच्चारांत 'अ' चा निभृत किंवा तोकडा उच्चार हा अधिक रूढ होत चालला आहे. हा फारशी भाषेचा परिणाम असो किंवा जुन्या प्राकृत भाषांचा अवशेष असो, परंतु ह्याचा प्रचार जास्त होत चालला आहे. 'गवत' ह्या शब्दांतील तिन्ही उच्चार एकच नाहींत हे उघड आहे; त्यांच्या उच्चारांत कमीअधिकपणा आहे. 'अ' च्या बाबतींत आढळणारें हें निभृतत्व 'अ' पुरतें मर्यादित नसून इतर बाबतींतहि येऊं पाहत आहे. इंग्रजींतील ॲ, ऑ, हे उच्चारहि मराठी भाषिकांच्या परिचयाचे होऊं लागले आहेत.

व्यंजनांपैकीं तालव्य व दन्त्यतालव्य हे उच्चार पूर्वीपासूनच मराठींत रूढ आहेत. मग ते ग्रीकांच्या संपर्कानें आलेले असोत किंवा द्राविडांच्या संपर्कानें आलेले असोत. तालव्य उच्चार कमी होऊन त्यांची जागा हळूहळू दन्त्यतालव्य घेऊं पाहत आहेत. ड ह्या मूर्धन्याचा उच्चार स्पष्ट आणि नरमावलेला असे दोन होतात. आद्य मूर्धन्याचा उच्चार मध्यमूर्धन्य किंवा अन्त्यमूर्धन्य यांच्या उच्चारापेक्षां निराळा असतो.

येथेंच अनुच्चारित अनुस्वारांचा निर्देश करणें प्राप्त आहे. कमी प्रयासाची प्रवृत्ति म्हणून हे अनुस्वार लेखनांत न वापरण्याकडे लोकांची प्रवृत्ति आहे. साने, बनहट्टी, हातवळणे, बडोद्याचे डॉ. चिपळोणकर इत्यादि विद्वानांनीं पूर्वी मराठी शुद्धलेखनासंबंधीं बराच वादविवाद करून कांहीं तत्त्वनिश्चिति केली. केळकर, पावशे, कुळकर्णी वगैरे मंडळी ह्या चळवळीचे पुरस्कर्ते आहेत. त्यांचें प्राचुर्य कमी करून व्याकरण व अर्थसिद्धि ह्यांना जरूर तेवढे अनुस्वार कायम ठेवून बाकीच्या अनुस्वारांना रजा देणें अत्यंत जरूर आहे. ह्याबाबत महाराष्ट्र साहित्यपरिषदेनें नेमलेल्या शुद्धलेखनसमितीचा निर्णय मार्गदर्शी होण्यासारखा आहे.

शब्दांच्या बाबतींत परकी शब्द होतां होईल तो कमी वापरण्याकडे प्रवृत्ति होत आहे. कांहीं ठिकाणीं तर भाषाभिनिवेश पराकोटीला जाऊन भाषेंत रूढ झालेले परकी शब्द खड्यासारखे निवडून काढून टाकण्याकडे कांहीं विद्वानांचा कल होऊं लागला आहे. सावरकर, पटवर्धन हे ह्या चळवळीचे पुरस्कर्ते आहेत. हा त्यांचा प्रयत्न भाषाशास्त्राच्या मूलतत्त्वाशीं विसंगत असल्यामुळें कितपत यशस्वी होईल याची जबर शंका आहे. ज्याप्रमाणें परकी शब्दांचें प्राचुर्य कमी होऊं लागलें आहे, त्याचप्रमाणें संस्कृत शब्दांचेंहि प्राचुर्य कमी होऊं लागलें आहे. भाषिक व लेखक ह्या दोघांची प्रवृत्ति सरळ, शुद्ध देशी मराठी बोलण्याकडे अधिक अधिक होत आहे. जुन्या परंतु अस्सल देशी शब्दांचा पुनरुद्धार करण्याचा सराव अधिक वाढत आहे. त्याचप्रमाणें नवीन नवीन शब्द तयार होत आहेत.

वाक्यरचनेमध्यें तोच सोपेपणा येत चालला आहे. अव्वल इंग्रजींतील मराठी भाषा इतकीशी भारदस्त दिसत नाहीं. चिपळूणकर, गोळे, आगरकर, टिळक, परांजपे वगैरेंनीं तिला संस्कृत लेणें चढवून अलंकृत व सुसंस्कृत केलें. परंतु तो स्वभाव नाहींसा होऊन तिच्या ठिकाणीं साधेपणा व ठसठसीतपणा आला आहे.

दीर्घ वाक्यें नाहींशीं होऊन लहान लहान वाक्यें येऊं लागलीं आहेत. ह्या वाक्यांनीं बुद्धीला व भावनेला ताण पडत नाहीं. सध्यांचे लेखक बुद्धीचा आणि हृदयाचा ठाव तेव्हांच घेऊं शकतात.

लेखनरीतींत तर विशेष क्रांति झाल्याचें दिसून येईल. प्रत्येक काळांत मराठी भाषेच्या लेखनरीतीचें नवें नवें वळण दिसेल. शिवशाहींतील व पेशवेशाहींतील मराठी समाजाचा जोरदारपणा तत्कालीन भाषेंत उतरलेला दिसतो. अव्वल इंग्रजींतील मराठी भाषा तत्कालीन समाजाप्रमाणें अर्भकीसारखी दिसते. ज्या चिपळूणकरी वळणानें तिला वाघिणीचें दूध पाजून प्रत्यक्ष वाघीण बनविली, तेंच चिपळूणकरी वळण १९२० पर्यंत व त्यापुढेंहि फार त्रोटक त्रोटक होत चाललेलें दिसतें. परंतु त्यानंतर मराठीला एक निराळेंच वळण लागलेलें दिसतें. कांहीं कांहीं प्रतिभावान् व बुद्धिमान् लेखकांनीं आपल्या सामर्थ्यानें ' आधुनिक मराठी ' निर्माण केली आहे. आधुनिक मराठीचे निर्माते जे सध्यां महाराष्ट्रांत आहेत त्यांत न. चिं. केळकर हे अग्रेसर होत.

मराठींतील व्याकरण व इतर भाषाशास्त्रविषयक प्रयत्न येथवर थोडक्यांत सांगितले. ह्यांवरून पाहतां विशेष निराश होण्याचें कारण नाहीं. राजवाडे तर सर्व मराठी व्याकरणकारांना अंधाच्या कोटींत काढतात. एका आंधळयानें दुसऱ्या आंधळ्याशीं खऱ्या वाटेसंबंधानें तंडत बसण्यापैकींच स्थिति आहे असें ते म्हणतात. एवढेंच नव्हे तर मराठी भाषा मरणोन्मुख अवस्थेस प्राप्त झाली आहे असें त्यांचें मत होतें. परंतु वर निर्देशिलेल्या व्याकरणक्षेत्रांतील दीपस्तंभाचा प्रकाश येत असतांना व्याकरणविषयक औदासिन्याची तक्रार मानावयास पाहिजेच असें नाहीं. हें औदासिन्य लौकरच नाहींसें होऊन मराठी भाषा ही चांगल्या मानाच्या भूमिकेवर सुप्रतिष्ठित होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

---

१०

# साहित्य-समीक्षण वाङ्मय

[ लेखकः—प्रो. रामचंद्र श्रीपाद जोग, एम.ए. ]

मराठीमधील साहित्यशास्त्राचा उद्गम व विकास गेल्या साठपाऊणशें वर्षांतीलच आहे ही एक सर्वप्रसिद्ध गोष्ट आहे. जुन्या मराठींत टीकावाङ्मय दोनतीन पुस्तकें वजा केल्यास मुळींच नव्हतें, असें म्हणतां येईल. नांवेंच घ्यावयाचीं झाल्यास नागेश व विठ्ठल यांनीं प्रत्येकीं रसमञ्जरी नांवाचीं दोन प्रकरणें लिहिलीं त्यांचीं घेतां येतील; पण त्यांची रचना भानुदत्ताच्या रसतरंगिणीवरून केलेली व संस्कृतमधील माहिती मराठींत आणण्याच्या स्वरूपाचीच आहे, स्वतंत्र विचार नाहीं. साहित्यशास्त्राचा विचार करतांना द्विविध रचना लक्ष्यांत घ्यावयाला पाहिजे. एक तात्त्विक चर्चात्मक व दुसरी त्या तात्त्विक चर्चेचा व्यावहारिक उपयोग करून साहित्यविषयक कृतींचें समीक्षण करणारी. जुन्या संस्कृत साहित्यशास्त्रांत पहिल्या भागावरच विशेष भर दिलेला आढळतो. उदाहरणादाखल साहित्यांतील उत्तम ग्रंथांमधील स्थलांचे निर्देश किंवा श्लोकांचीं अवतरणें यांपलीकडे शास्त्रीय चर्चेचा व्यावहारिक उपयोग केल्याचें उदाहरण आढळत नाहीं. इंग्रजी वाङ्मयाच्या संपर्कानें स्वतंत्र ग्रंथांचें समीक्षण करून शास्त्रांतील आचार व्यवहारांत कसा आणावयाचा हें मराठी साहित्यशास्त्राच्या जवळजवळ जन्माबरोबरच करावयास आम्हीं शिकलों. अर्वाचीन मराठी साहित्यशास्त्रास चालना इंग्रजी वाङ्मयाच्या संबंधानें मिळावी हें

लक्ष्यांत घेण्याजोगें आहे. त्याबरोबरच लक्ष्यांत घ्यावयाची पहिली गोष्ट म्हणजे तात्त्विक रचना मात्र संस्कृत वाङ्मयावरूनच झाली, व 'संस्कृत कविपंचक' हा समीक्षणात्मक प्रबंध संस्कृत वाङ्मयासंबंधींच लिहिला गेला. आणखीहि एक गोष्ट लक्ष्यांत घ्यावी लागते ती ही कीं, सुरुवातीस केवळ काव्यविषयक टीकाशास्त्रच तेवढें डोळ्यांपुढें होतें. साहित्यांतील नाटक-कादंबरी हे प्रकार या टीकाशास्त्र तयार करणारांपुढें नव्हते. याचें कारण संस्कृत ग्रंथांमधूनहि या प्रकारांस फारसा प्रवेश मिळाला नाहीं हें असावें. दण्डीनें आपल्या काव्यादर्शांत कथा व आख्यायिका फारच त्रोटक स्वरूपांत वर्णिल्या आहेत व नाटकाचा नुसता उल्लेखच केला आहे व पुढील लेखकांत एका विश्वनाथानें आपल्या साहित्यदर्पणांत नाटकविचारास स्थान दिलें. याचाच परिणाम पहिल्या मराठी टीकाशास्त्रावर झाला. त्याबरोबर हेंहि खरें कीं, काव्यवाङ्मयाइतकें, किंबहुना त्याहून निराळें असें ललितवाङ्मय मराठींत जवळजवळ झालेंच नसल्यानें त्यासंबंधीं शास्त्रीय वाङ्मयहि निर्माण होऊं शकलें नाहीं.

संस्कृत साहित्यशास्त्रांत अलंकार-चर्चेसच बराच भाग वाहिलेला आहे; तोच प्रकार मराठीमध्यें झाला. बहुतेक ग्रंथांतून ( अलीकडचे कांहीं ग्रंथ सोडून ) या अलंकारांचाच विचार प्रधानत्वानें आढळतो, व त्यांतहि मम्मटाच्या आधारानेंच बरीचशी चर्चा आहे. इतरांचा आधार मधून मधून व कांहीं जणांनींच घेतलेला आहे. यामध्यें पहिल्या ग्रंथरचनेचा मान गणेशशास्त्री लेले यांस जातो. या ग्रंथाचें नांव 'साहित्यशास्त्र' असून हा इ. स. १८७२ मध्यें प्रसिद्ध झाला आहे. साहित्यांतील सार्‍या अंगांचा, त्रोटक कां होईना, विचार आल्यानें तेवढ्यापुरतें त्यास संपूर्णत्व आलें आहे. परंतु १०८ पानांच्या मर्यादेंत हें करणें अशक्य असल्यानें सारें उपपादन सूत्ररूप व अत्यंत अपुरें झालें आहे. ग्रंथहि प्रश्नोत्तररूप असल्यानें त्यास चर्चेचें स्वरूप फारसें राहिलें नसून गुरुशिष्यसंवादाचें रूप आलें आहे. यानंतर ज. वि. दामले यांचा जवळ जवळ तेवढाच म्हणजे ११६ पानांचा 'अलंकारादर्श' हा १८८५ त प्रसिद्ध झाला. आधारास काव्यप्रकाशाखेरीज साहित्यदर्पण, कुवलयानंद, काव्यादर्श इत्यादि ग्रंथ घेतले आहेत. ग्रंथ फक्त अलंकारावरच लिहिला असल्यानें पूर्वोक्त ग्रंथांपेक्षां अलंकारचर्चेस साहजिकच अधिक जागा मिळाली, पण यांतहि सर्व शब्दार्थालंकारांची सविस्तर चर्चा करणें हें अवघडच होतें. याच सुमाराचा ( शके १८०८ ) केमरकरशास्त्री यांचा कुवलयानंदाच्या आधारानें लिहिलेला 'अलंकार-विकास' हा ग्रंथहि केवळ अलंकारावर लिहिलेला आहे. ग्रंथ प्रायः भाषांतररूप

असल्यानें मधून मधून महाराष्ट्रकवींचीं उदाहरणें घेण्यापलीकडे लेखकानें विचारस्वातंत्र्य दाखविलें नाहीं. याच्याच बरोबर प्रसिद्ध झालेल्या तळेकर शास्त्र्यांच्या 'अलंकारदर्पणा'चें स्वरूप कारिका, वृत्ति व उदाहरणें अशा संस्कृत थाटाचें आहे. विषय केवळ अलंकाराचाच आहे, पण विवेचन मात्र अगदीं कमी झाल्यानें विद्यार्थ्यांस त्याचा तादृश फायदा होत नाहीं. यानंतरच्या ( १८९३ ) रा. रा. भागवत यांच्या 'अलंकारमीमांसे'ची गोष्ट मात्र वेगळी आहे. जुन्या संस्कृत वाङ्मयांतून आपली सामग्री जमा करून मांडणी मात्र अगदीं स्वतंत्र व मार्मिक अशा तऱ्हेची केली आहे. विषय यांतहि केवळ अलंकाराचाच, पण विवेचन मात्र अगदीं स्वतःचें. काव्याचे स्वभावोक्त व वक्रोक्त असे भेद केले आहेत. त्यांत स्वभावोक्तीचे सरस, नीरस व कालिक असे पोटभेद केले आहेत. सरस स्वभावोक्तींत भक्तिरसास प्राधान्य दिलें आहे, आणि त्याच्या खालीं वीर व त्याच्याहि खालीं शृंगार येतो. अतिशयोक्तीस ते मसाला असें नांव देतात. संकर संसृष्टीस मिसळ, चटणी व पंचामृत अशीं नांवें दिलीं आहेत; त्यांत मिसळ ही 'उघड' व 'खुबीची' असे भेद केले आहेत. ग्रंथांत अलंकारांच्या संख्येवर व कृत्रिमतेवर फार कटाक्ष आहे. लेखनशैली जोरदार आहे. सारांश, हा ग्रंथ नवीन अभ्यासकास फारसा उपयोगी नसला तरी ज्यांचें अलंकारांचें अध्ययन बरेंच झालें आहे अशांना खास उद्बोधक वाटेल. यानंतर जवळजवळ एक तपानें ( १९०५ ) गणेशशास्त्र्यांचे चिरंजीव लक्ष्मणशास्त्री यांनीं आपला 'अलंकार-प्रकाश' लिहिला. यांत मुख्य विषय अलंकारांचा असला तरी इतर मजकुरालाहि थोडा भाग दिला असल्यानें व सुंदर गद्यपद्य काव्याचे मराठीमधून भरपूर उतारे दिले असल्यानें बराच उपयुक्त झाला आहे. 'अलंकारचंद्रिका' हा गोरे यांचा विद्यार्थ्यांस उपयोगी असा दुसरा ग्रंथ याच वेळीं निर्माण झाला. त्यास मुंबई विश्वविद्यालयानें बी. ए. च्या अभ्यासक्रमांत मान्यताहि दिली आहे. १९१२ मध्यें रा. भि. जोशी यांचा 'सुलभअलंकार' हा अलंकार सुलभ करण्याच्या उद्देशानें लिहिला गेला. यावर भागवतांच्या चर्चेची दाट छाया पडलीशी दिसते; त्यामुळें रचना बहुतेक त्या ग्रंथासारखी झाली आहे. पुस्तकांत मतस्वातंत्र्य भरपूर आहे, पण त्यास मनसोक्तपणाचें स्वरूप आलें आहे आणि त्यामुळें संस्कृतमधील वाङ्मयाची यथार्थ कल्पना न येतां विकृत स्वरूपांतच येण्याचा संभव आहे. यानंतर एक तपानें ( १९२३ ) विद्याधर वामन भिडे यांचा 'अर्थालंकारांचें निरूपण' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला व तो विस्तृत विवेचनामुळें व

इतर उपयुक्त बाबींमुळें विद्यार्थ्यांस चांगला सोईचा झाला आहे. याच ग्रंथकारानें १९२२ सालीं संस्कृत ग्रंथाच्या धर्तीवर कारिका व वृत्ति आणि उदाहरणें अशा स्वरुपांत लिहिलेला 'साहित्य–कौमुदी' या ग्रंथाचा पहिला भाग छापला. यांतहि अलंकार आले आहेतच, पण त्यांशिवाय शब्दशक्ति, ध्वनि, रस यांचें सूत्ररूप विवेचन दिलें आहे. पण नविनांना त्यांचा पहिलाच ग्रंथ उपयुक्त वाटेल. १९२४ सालीं काव्यरत्नावलीच्या मार्फत प्रकाशित झालेल्या रा. समर्थ यांच्या 'साहित्य-चंद्रिका' या पुस्तकांत अलंकारांची चर्चा फार त्रोटक झाल्यानें व उदाहरणें अनेक ठिकाणीं चुकीचीं घातल्यानें तें अविश्वसनीय व म्हणून निरुपयोगी झालेंसें वाटतें. याशिवाय विद्यार्थ्यांकरितां परीक्षेंत मार्गदर्शक म्हणून काढिलेल्या पुस्तकांतून कांहीं ठळक अलंकारांची माहिती दिलेली असते, पण तीस चर्चा म्हणणें योग्य होणार नाहीं. या बाबतींत संस्कृतमधील सर्व ग्रंथकारांच्या मतांचा परामर्ष घेणारें उपपादन करण्याचें महत्त्वाचें व मोठें काम मात्र कु. बाळू-ताई खरे यांनींच आपल्या 'अलंकारमंजूषे'त केलें आहे. संदर्भ ग्रंथ म्हणून त्याचा फार उपयोग व्हावा. निरनिराळ्या अलंकारांसंबंधीं मतें व उपलब्ध चर्चा यांत सांपडत असल्यानें अलंकारविचाराचा हा एक कोशच झाला आहे. परंतु याच्या विस्तृतपणामुळें व अनेक मतांच्या संग्रहामुळें नवीन होतकरु विद्यार्थ्यांस हा गोंधळून टाकणारा वाटल्यास नवल नाहीं. इतक्या खोलांत शिरण्याचें त्यांस प्रयोजन नसल्यानें त्यांच्यापेक्षां शिक्षकांसच तो अधिक उपयोगी आहे.

अलंकारांची सामान्य तात्त्विक चर्चा मात्र अलीकडेच होऊं लागली असें म्हणावें लागतें. तीमध्यें तर शेवटीं उल्लेखिलेला ग्रंथ येतोच, पण त्याहीपेक्षां श्री. द. के. केळकर यांची 'काव्याच्या वेषभूषा' या काव्यालोचनांतील प्रकरणांत केलेली चर्चा अधिक स्वतंत्र व व्यापक स्वरूपाची वाटते. त्यांनीं अलंकारांच्या संख्येस संक्षेप देण्याचा मुद्दा व कांहींचें नामांतर करण्याचा मुद्दा पुढें मांडिला आहे. त्यांतील निदान पहिल्या मुद्यासंबंधीं तरी मतभेद होण्याचा संभव नाहीं. प्रस्तुत लेखकानेंहि त्यांच्या स्वरूपासंबंधानें संस्कृत कल्पनेस धरून, पण एक स्वतंत्र सूचना केली आहे. अलंकारांस इतर शरीरभूषणांप्रमाणें शरीरबाह्य न समजतां शरीरसंबद्ध असे विभ्रम समजावें ही ती सूचना होय. यामुळें संस्कृत तात्त्विक विचारांत त्यांस जें गौण स्थान मिळतें तें जाऊन एकंदर चर्चेंत त्यांचा विस्तार अधिक झाला या गोष्टीचेंहि समर्थन होतें.

ध्वनिचर्चा हा काव्यचर्चेतील दुसरा महत्त्वाचा मुद्दा होय व त्यास जरूर म्हणून शब्दांच्या त्रिविध शक्तींचा विचार येतो. या शब्दशक्तींची माहिती पितापुत्र लेले, भिडे, गोरे इत्यादि मंडळींनीं आपआपल्या ग्रंथांतून दिलेली आहे. लक्ष्मणशास्त्र्यांनीं 'काव्यचर्चे'त स्वतंत्र लेख लिहून त्याचें आणखी विवेचन केलें आहे. त्यानंतर केळकर, प्रस्तुत लेखक, व आगाशे यांनींहि आणखी उपपादन केलें आहे. पण हें सारें एकंदर ग्रंथमर्यादेमुळें अपुरें होणें अपरिहार्य होतें. संस्कृतमधील ध्वन्यालोकासारख्या स्वतंत्र ग्रंथाची मराठींत तरी या विचारापुरती उणीवच आहे असें म्हटलें पाहिजे. ध्वनीच्या अनेक प्रकारांचें जें वर्णन इतरहि संस्कृत ग्रंथांतून आढळतें तसें व तितकें मराठींत अद्याप आलें नाहीं. उपरिनिर्दिष्ट लेलेशास्त्री यांच्या स्वतंत्र लेखांतहि वस्तुध्वनि, अलंकारध्वनि व रसध्वनि याच तीन मुख्य प्रकारांवर समाधान मानिलें आहे. अविवक्षितवाच्य, विवक्षितान्यपरवाच्य इत्यादि, किंवा गुणीभूतव्यंग्याचे अनेक प्रकार या सर्वांचें उपपादन सोदाहरण व तपशीलवार असें मराठींत नाहीं. ध्वनीसंबंधीं कांहीं तात्त्विक विचार मात्र अलीकडे झाला आहे व त्यांतून ध्वनीचें काव्यविचारावरील दडपण हलकें करण्याचा प्रयत्न झाला आहे. ध्वनि हा एक अभिव्यक्तीचा प्रकार असून त्यानें अभिव्यक्त होणारें निराळें कांहीं तरी तत्त्व काव्याचा आत्मा व्हावयास पाहिजे, मग तें रस वा इतर कांहीं असो, असें मत प्रस्तुत लेखकानें पुढें मांडिलें व त्यास केळकर यांनीं आपल्या 'काव्यालोचना'त पुष्टीच दिली. यामुळें काव्यचर्चेतील आत्मपदासंबंधीं ध्वनि व रस यांत आजपर्यंत होणारी ओढाताण व तद्भव घोंटाळा हा कांहींसा तरी कमी होईल अशी आशा आहे.

काव्यविचारांतील तिसरी व सर्वांत महत्त्वाची बाब म्हणजे रसचर्चा. अर्वाचीन मराठींतील पहिला काव्यचर्चेवरील 'रसमाधव' हा ग्रंथ दाजी शिवाजी प्रधान यांनीं लिहिला. नांवावरून त्याचा विषय रसविचाराचा आहे, हें उघडच दिसतें. आधारास भानुदत्ताचा 'रसतरंगिणी' हा ग्रंथ घेतला आहे. संस्कृत श्लोक व टीकाकारासारखें त्याचें मराठींत शब्दशः विवेचन असें या ग्रंथाचें स्वरूप आहे. शांति व भक्ति हे निराळे रस मानिले आहेत, हें अधिक आहे. ग्रंथाचा काल १८६८ हा आहे. यानंतरचा रसाचरचा ग्रंथ म्हणजे माकोडे यांनीं १८९२ सालीं प्रसिद्ध केलेला 'रसप्रबोध' हा होय. मुख्य विषय रस असला तरी ध्वनि, गुण व रीति यांचीहि थोडीशी चर्चा यांत आली आहे. भक्ति व प्रेयान् रसांत अंतर्भूत केले आहेत. याखेरीज रसांचीच

प्रामुख्यानें चर्चा करणारे ग्रंथ झाले नाहींत. वर निर्देश केलेल्या २-४ ग्रंथांतून संस्कृत-मधून घेतलेली कामापुरतीच माहिती सांपडते. मूळ रसांच्या संख्येंत थोडासा फेरबदल करून बहुतेक मुळांतील विचारच जसेच्या तसे मांडिलेले दिसतात. यापेक्षां एकंदर रसोपपत्तीविषयीं अधिक खोल विचार गेल्या दहा वर्षांपर्यंत झाला नव्हता. या विचारास १९२५ मध्यें प्रसिद्ध झालेल्या 'काव्यचर्चा' या ग्रंथांत प्रो. श्री. नी. चापेकर यांनीं तोंड पाडलें. 'एक अभिनव दिग्दर्शन' म्हणून लिहिलेल्या आपल्या लेखांत शृंगार, वीर व करुण असे तीनच मुख्य रस त्यांनीं मानिले आहेत. रौद्र, बीभत्स व भयानक या रसांस वीररसाचे अंगभूत गणिलें आहे व हास्य व अद्‌भुत यांची रसपदवी काढून घेतली आहे. शिवाय भक्ति हा निराळा स्वतंत्र रस मानिला आहे. यामध्यें पहिल्या वर्गीकरणास आधार म्हणून पुढील उपपत्ति मांडिली आहे. जगांतील मानवांचे स्त्री व पुरुष हे जे दोन मुख्य वर्ग यांचे परस्परसंबंध दर्शविणारा म्हणून शृंगार, पुरुषाचा विशेष म्हणून वीर व स्त्रीस्वभावसहज म्हणून करुण असे तीन रस होतात. इतर तीन रस हे वीराचे पोषक किंवा परिणाम म्हणून उत्पन्न होतात. रसाचा उगम उत्कट भावनाविष्कारांत असून या भावनांच्या विषयांस अनुलक्षून त्यांचे भिन्न रस होतात, अशी त्यांची उपपत्ति आहे. भावनांच्या वर्गीकरणाचें कार्य शँडच्या Foundation of Character या मानसशास्त्रावरील ग्रंथामधून घेऊन आपलें रसांचें अष्टविधि वर्गीकरण या पाश्चात्य मानसशास्त्रीय विवेचनाशीं कसें जुळतें आहे हें प्रस्तुत लेखकानें आपल्या 'अभिनव काव्यप्रकाश' या ग्रंथांत दाखवून दिलें आहे. पण यांतहि शँडचेंच मत ग्राह्य मानिल्यानें व शृंगाररसाची उपपत्ति गौण तऱ्हेनें लावावी लागल्यानें उणेपणा राहिला. भावनांचें मूलभूतत्व, व्यापकत्व व परस्परनिरपेक्षता इत्यादि गोष्टींवर रसपदवी अवलंबून असावी अशी प्रस्तुत लेखकाची सूचना अमान्य करून 'उत्कटत्वानें आस्वाद्य-मानता' ही कसोटी रसास योग्य आहे, असें श्री. द. के. केळकर यांनीं प्रति-पादन केलें व अशा तऱ्हेनें भक्तिरसासहि मान्यता मिळवून दिली. पण यांतहि कोणत्याहि गौण भावनेस वाङ्मयांत, ती "उत्कटत्वानें आस्वाद्यमान" असल्यास प्रवेश मिळण्यास मुक्तद्वार झालें व पुढील कालीं ही योजना स्वागतार्ह वाटली तरी आपलें जुनें अष्टविध वर्गीकरण यावर अवलंबून नव्हतें असें झालेंच, व त्याचें समर्थन होणें अशक्य झालें. यानंतर लवकरच प्रसिद्ध झालेल्या 'विदर्भवीणा'

या काव्यसंग्रहास लिहिलेल्या प्रस्तावनेंत श्री. कृ. कोल्हटकर यांनीं अगदींच स्वतंत्र अशी उपपत्ति पुढें मांडिली. "वर्ण्यव्यक्तींचा प्रमुख चिंतनविषय स्वतः अगर स्वेतर असेल, त्याप्रमाणें रसांचे अंतर्दृष्टिमूलक व बहिर्दृष्टिमूलक असे दोन भेद होऊं शकतात. पुनः चिंतनविषय श्रेष्ठ, समान अगर कनिष्ठ असेल त्या मानानें तीन व तो सुखप्रद अगर दुःखप्रद असेल त्या मानानें प्रत्येकाचे दोन, असे बहिर्मुखदृष्टिमूलक रसाचे अनुक्रमें अद्भुत व भयानक, शृंगार व रौद्र, हास्य व बीभत्स असे सहा प्रकार होतात. अंतर्मुखदृष्टिमूलक रसाचेहि, चिंतनविषय श्रेष्ठ व सुखप्रद अगर कनिष्ठ व दुःखप्रद असेल त्या मानानें अनुक्रमें वीर व करुण असे दोन म्हणजे एकंदर ८ प्रकार पडतात," अशी त्यांची उपपत्ति आहे. हीहि उपपत्ति बरवर वाटते तितकी रेखीव आणि ठाकठिकीची नाहीं. यांतील शृंगार, वीर, करुण इत्यादि भावना केवळ स्वेतर किंवा केवळ स्वतः अशा विषयांसच नियत असतात असें नाहीं. वीर व करुण यांतहि स्वेतर आलंबनें असूं शकतात, तसेंच शृंगारांत स्वतःच्या विचार नसतोच असें नाहीं. रौद्रवीरांत मूळ संस्कृत वर्गीकरणांतहि फारसा भेद केला नाहीं व शृंगाराचा एक प्रकार करुणांत सहज रूपांतर पावतो. यावरून हे रस अगदीं निरपेक्ष आहेत असें नाहीं. शिवाय प्राचीनांची या नवीन योजनेस अनुमति असल्याचें कोठें दिसत नाहींच.

रसविचारांतील आणखी एक महत्त्वाचा भाग म्हणजे रसप्रतीतीची प्रक्रिया व काव्यास्वादाची अवस्था हा होय. अर्वाचीन काव्यचर्चेत यासंबंधीं जुन्या संस्कृत ग्रंथांमधील मतांचा उल्लेख वा उपपादन फारसें कोणीं केलें नाहीं. श्री. द. के. केळकर व प्रस्तुत लेखक यांनीं लोल्लटादिकांचीं जीं चार मतें, त्यांचा सारांश दिला आहे. प्रस्तुत लेखकानें पुढें रिचर्ड्स साहेबाचा केवळ हवाला दिला आहे तर केळकरांनीं आपली स्वायत्त तादात्म्याची उपपत्ति पुढें मांडून न. चिं. केळकरांची सविकल्प समाधि व हें तत्त्वतः एकच आहे, असें सांगितलें आहे. शोकरसाचा आस्वाद हा रसास्वादप्रक्रियेंतील मोठा कठिण प्रश्न आहे, व याचें समाधानकारक उत्तर अद्यापिहि मिळावयाचें आहे, असेंच म्हणावें लागतें. तादात्म्य कांहीं थोड्या पात्रांच्या बाबतींत होऊं शकेल; सर्वांचें नाहीं. असें असल्यानें एकतर रसास्वादाच्या वेगवेगळ्या उपपत्ति निरनिराळ्या ठिकाणीं लागतात, असें म्हणावें लागतें, किंवा अजूनहि मानसशास्त्रीय प्रयोगांवरून उपलब्ध होणारी अशी सर्वसामान्य अशी एकच उपपत्ति काढावयाला पाहिजे हें कबूल करावें लागेल.

काव्याचें ध्येय काय असावें, काव्याचे योग्य विषय कोणते, काव्यनिर्मितीस आवश्यक असणारे गुण कोणते किंवा काव्याचें तात्त्विक स्वरूप काय हींहि काव्य-चर्चेंतील आणखी महत्त्वाचे विषय होत. या सर्वांचें सुंदर विवेचन 'काव्यालोचनां'त आपल्या व पाश्चात्यांच्या दृष्टीनें केलेलें आढळतें. केवळ प्राचीनांचीं या बाबतींतील मतें 'अभिनव काव्यप्रकाशां'त पाहावयास मिळतील. काव्याबरोबरच सारस्वतांतील इतर वाङ्मयप्रकारांचा विचार 'सारस्वत-समीक्षें'त आला आहे. वा. ब. पटवर्धन यांचें 'काव्य व काव्योदय' यांतहि या तऱ्हेची तात्त्विक चर्चा नवीन दृष्टीनें केलेली सांपडते. काव्यविषयक सामान्य विचार कोल्हटकरांच्या कविसंमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेल्या दोनहि भाषणांतून आढळून येतो. माडखोलकर व हर्षे यांनीं आपल्या टीकाप्रबंधांस जोडून एकेक काव्यविषयक सामान्य विचारांचा निबंध सादर केला आहे. काव्याच्या गुणदोषरूप अंगांची चर्चा मात्र व्हावी तितकी झाली नाहीं, व गुणसंख्येवर अधिष्ठित असलेल्या रीतींचाहि विचार फार झाला नाहीं. गेल्या शतकांतील ग्रंथांतून गुणाच्या व्याख्या व सामान्य स्वरूप अगदीं थोडक्यांत वर्णन करण्यापलीकडे फारसें कांहीं झालें नाहीं. अलीकडे म्हणजे गोरे यांच्या 'काव्यदोषदीपिका' या पुस्तकांत गुणांचीं नांवें व स्वरूप त्रोटकपणें देऊन, दोष-विषयक विचार विस्तृतपणें दिला आहे. अभिनव-काव्यप्रकाशांत गुणांची चर्चा बरीच विस्तृत अशी व दोषांचा विचारहि आजतागायत असा, आला आहे. पण अद्यापिहि ही चर्चा अपुरीच आहे, असें वाटतें. अलीकडील अभिप्रायात्मक वाङ्म-यांतून या जुन्या सूक्ष्म विचारांचा अभावच दिसून येतो. त्यांमध्यें केवळ कांहीं सामान्य संदिग्धार्थ विधानांवरच भागविलेलें दिसतें. त्यांत अनेक वेळां व्यापक दृष्टि, सहृदय सहानुभूति किंवा मार्मिकता दिसून येते. पण या साऱ्या गोष्टींना शास्त्राचें अधिष्ठान मात्र फार कमी प्रमाणांत आढळतें. केवळ इंग्रजी टीकात्मक वाङ्मय वाचून सामान्य व्यापक विचार येतो, पण सूक्ष्म विचार येत नाहीं व परिभाषेची अडचण पडते, असें दिसून येतें.

एकेका कवीच्या एकेका पुस्तकावर अभिप्राय म्हणा किंवा समीक्षण म्हणा लिहिण्याची पद्धति आपण इंग्रजी वाङ्मयावरून उचलली असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं, व हें मासिकांच्या उत्पत्तीनें व प्रसारानेंच शक्य झालें. त्याचप्रमाणें कवीच्या समग्र काव्यावर टीकात्मक लेख वा प्रबंध यांची गोष्ट आहे. विष्णुशास्त्री चिपळूण-करांनीं संस्कृत कविपंचकावर आपला प्रबंध व मोरोपंतांच्या काव्यावरचे आपले

लेख लिहून अशा प्रकारच्या लेखनास चांगली सुरुवात करून दिली. विविधज्ञान-विस्तारांतून त्यानंतर परीक्षणात्मक लेख येऊं लागले, व त्यानंतर इतर मासिकें व आतां तर साप्ताहिकें व दैनिकें यांतूनहि अशा प्रकारच्या लेखनाची सोय झाली आहे. पण अर्थात् आतां यांत पाहिजे तितका निःपक्षपातीपणा किंवा सत्यकथन त्यामध्यें येऊं शकत नाहीं. भिन्न रुचि लक्षांत घेऊनहि एकाच पुस्तकावर अगदीं विरुद्ध पडलेले अभिप्राय पाहतांच त्यांत विश्वसनीयता उरली नाहीं अशी खात्री होते. अभिप्राय लवकर पाहिजे असतो, अभिप्रायलेकख तज्ज्ञ मिळणें कठीण जातें, कवीची ओळख किंवा ऋणानुबंध असतो अशा अनेक प्रकारच्या अडचणींमुळें या टीकावाङ्मयास व्यापारी किंवा बाजारी स्वरूप आलें आहे. असें असूनहि अनेक चांगले टीकाकार व त्यांचे टीकालेख मराठी वाङ्मयास लाभले हें त्याचें भाग्य समजलें पाहिजे. गेल्या शतकांतील चिपळूणकर, आठल्ये, महाजनी, देव या, शतकांतील केळकर, कोल्हटकर, बा. अ. भिडे हे जुन्या पिढींतील व माडखोलकर, खांडेकर, काळे, कुलकर्णी, हर्षे इत्यादि नवीन पिढींतील अनेक टीकाकार यांचें लेखन वाङ्मयभक्तांस मार्गदर्शक होण्याजोगें आहे.

जुन्या कवींच्या काव्यासंबंधीं स्वतंत्र पुस्तकरचना बरीच झाली आहे. ज्ञानेश्वर-एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास, मोरोपंत इत्यादि कवींवर पांगारकर, बा. अ. भिडे, बनहट्टी इत्यादींची स्वतंत्र ग्रंथरचना आहे. ज्ञानेश्वरासंबंधीं अनेक दृष्टींनीं सूक्ष्म विचार करणारा ' ज्ञानेश्वरदर्शन ' हा ग्रंथ विशेष लक्षांत घेण्याजोगा झाला आहे. नव्या कवींमध्यें हें भाग्य फार थोड्यांच्या वांट्यास आलें आहे. केशवसुतांच्या कवितेवर वर्तकांचा ' सतारीचे पडसाद, ' रहाळकर यांचा ' केशवसुतांची कविता ' व ' गोविंदाग्रज ' हा हर्षे यांचा प्रबंध, यांशिवाय स्वतंत्र ग्रंथरचना इतर कवींवर झालेली दिसत नाहीं, तरी स्वतंत्र लेखात्मक वाङ्मय बरेंच उपलब्ध झालें आहे. आधुनिक कविपंचकांतील पांच कवींवरील माडखोलकर यांचे पांच लेख, ' काव्य-चर्चे'तील लेंभे, केशवसुत, टिळक, बालकवि, गोविंदाग्रज, तांबे, विनायक, दत्त, माधवानुज व चंद्रशेखर आणि मोगरे-रेंदाळकर यांवरील लेख, काव्यविचारांतील केशवसुत व गोविंदाग्रज यांवरील लेख, ' अर्वाचीन वाङ्मयसेवकां'त आलेले केशव-सुत, टिळक यांवरील लेख हे अशा प्रकारचे आहेत.

एकेका काव्यप्रकारावर स्वतंत्र चर्चा अशी फारशी झाली नाहीं व झाली तीहि लेखरूपांतच बहुतेक आहे. काव्यविचार या रविकिरणमंडळाच्या वेगवेगळ्या

सभासदांनीं लिहिलेल्या पुस्तकांतील भावगीत, नाट्यगीत, सुनीत, ऐतिहासिक शाहिरी काव्य या प्रकारांवरील एकत्रित केलेली चर्चा ही अशा प्रकारची होय. अशाच तऱ्हेची पण यापेक्षां त्रोटक अशी चर्चा 'अभिनव-काव्यप्रकाशां'त आढळेल. विलापिका या काव्यप्रकारावर श्री. माडखोलकर यांनीं लिहिलेलें पुस्तक एका काव्यप्रकारावरचें स्वतंत्र पुस्तक म्हणतां येईल. पण यांत संस्कृत व इंग्रजी विलापिका व त्यांवरील चर्चा यांचें प्राधान्य झाल्यानें मराठीच्या घरीं पाहुण्यांनींच आपला पसारा मांडिला असें एक चित्र दिसतें, हें एका परीनें अपरिहार्यच होतें. या काव्यप्रकारास स्वतंत्र अस्तित्व असतें ही कल्पनाच मुळीं मराठी व संस्कृत टीकाशास्त्रास अज्ञान होती. तेव्हां त्यासंबंधीं सामग्री त्यांत फारशी नसावी यांत आश्चर्य नाहीं. 'सुभाषित व विनोद' या ग्रंथांत गौणत्वें करून सुभाषित या काव्यप्रकाराची चर्चा झाली आहे. त्यांत सुद्धां विषयानुरोधानें विनोदालाच प्राधान्य मिळालें आहे. अगदीं अलीकडे विडंबनविषयक चर्चा झालेली दिसते. काव्यचर्चेंत सुनीत व गजल यांवर आलेल्या लेखांचाहि उल्लेख करणें जरूर आहे.

काव्यास आवश्यक असणाऱ्या पद्यरचनेवर झालेल्या पुस्तकांचा उल्लेख केल्यावांचून या लेखास संपूर्णता येणार नाहीं. पहिल्या प्रथम गोडबोले यांच्या वृत्त-दर्पणाचा साहजिकच निर्देश होतो व बरेच दिवस तेंच पुस्तक अधिकृत म्हणून मानलें गेलें. यांत संस्कृत वृत्तांचा प्राधान्येंकरून समावेश झाला. पण त्यानंतरच्या मराठी काव्यरचनेंत जातिरचनेचें प्राबल्य झालें व जुनें वृत्तदर्पण साहजिकच उपयुक्ततेच्या दृष्टीनें मागें पडलें. दरम्यान वि. का. राजवाडे यांनीं शुद्ध मराठी छंदाची तात्त्विक स्वरूपाची चर्चा एकत्र अशी एका लहान प्रबंधांत प्रसिद्ध केली, व वृत्तविचाराची एक नवीन दिशा दाखविली. यानंतर पुढील ग्रंथ म्हणजे 'छंदो-रचना' होय. यांत गणविचाराचा एक नवीन मार्ग सुचवून वृत्तें, छंद व जाति या सर्वांचा समावेश केला आहे. गजल या फारसी वृत्तप्रकाराचाहि विचार आला आहे. नवीन तऱ्हेनें काव्यरचना करणाऱ्यांची याप्रमाणें सोय झाली. अलीकडे पद्याचें बंधन शक्य तों कमी करण्याकडे प्रवृत्ति उत्पन्न झाली त्याबाबत मुक्त-छंद या नांवा-खालीं चर्चा चालू आहे. तींत आ. रा. देशपांडे व वामन ना. देशपांडे हे विदर्भांतील कवि विशेष लक्ष घालीत आहेत. पण अद्यापि अशी रचना लोकप्रिय होण्याचीं चिन्हें दिसत नाहींत व तिच्या नांवाबद्दल व स्वरूपाबद्दल तिच्या पुरस्कर्त्यांतच मतभेद दिसत आहे.

काव्यविषयक टीकावाङ्मयाच्या बाबतींत आपण संस्कृत वाङ्मयाचे जेवढे ऋणी आहोंत, त्या मानानें नाट्यशास्त्राच्या बाबतींत नाहीं. संस्कृतमध्येंहि नाट्यतंत्रावर दोनचारच ग्रंथ उपलब्ध आहेत, त्यामुळें त्याचा परिणाम मराठीवर फारसा झालाच नाहीं. मराठीमधील नाट्यशास्त्रविषयक पहिलें वाङ्मय म्हणजे केरळकोकिळ, नाट्यकथार्णव, नाट्यकला, रंगभूमि, विविधज्ञानविस्तार, मनोरंजन व अलीकडे चित्रमयजगत्, नवयुग, प्रभात, रत्नाकर इत्यादि मासिकांतून आलेले लेख होत. अर्थात् ही चर्चा बऱ्याच अंशीं नवीन इंग्रजी नाट्यवाङ्मयाच्या आधारानें, किंवा परिशीलनानें व स्वतंत्र विचारानें केलेली होती. यामध्यें पुष्कळसा भरणा नाटकांच्या परीक्षणांचाच आहे. त्याच्याखालीं नाट्यतंत्रविषयक कांहीं लेख, नटांचीं चरित्रें, नाट्यशिक्षणविषयक व नाट्यसंस्थाविषयक लेख इत्यादि सामग्री आढळते. तंत्रविषयक स्फुट लेखांत नाटकाचा विषय, घटना, कायदे, नाट्यकार्य, नाट्यरस, वस्तु, स्थल इत्यादि सामान्य व रंगभूमीवरील चुंबन यांसारखे तपशीलाची चर्चा करणारे लेख आढळतात. शिवाय भरताच्या नाट्यशास्त्रासंबंधीं १-२ लेख व भारतीय नाट्यकलेचा इतिहास म्हणून एक लेख दिसतो. तंत्रविषयक विचार जेवढ्या प्रमाणांत व जितका सूक्ष्म व्हावयास पाहिजे होता तितका तो झाला नाहीं. प्रथमतःच नांव घेण्याजोगी चर्चा श्री. कृ. कोल्हटकर यांनीं तोतयाचे बंडावर टीका लिहिण्याच्या निमित्तानें मनोरंजनाच्या द्वारां केली. ती सर्वस्वीं स्वतंत्र अशीच झाली. तींत संस्कृतपेक्षां इंग्रजी वाङ्मयाचें अध्ययनच त्यांस अधिक उपयोगी पडलें. ही चर्चा अत्यंत क्लिष्ट व रूक्ष झाल्यानें विद्वत्तापूर्ण असूनहि किंवा यामुळेंच, स्वतः लेखकाखेरीज इतरांस तिचा उपयोग झाला नसावा. जुन्या नाट्यतंत्राची ओळख करून देणारा आपला ग्रंथ कु. गोदूबाई केतकर यांनीं यानंतर जवळ जवळ एक तपानंतर प्रसिद्ध केला. त्याचाहि परिणाम मराठी नाट्यतंत्रावर झाला असें म्हणवत नाहीं. अलीकडील बहुतेक नाट्यचर्चा इंग्रजी ग्रंथांतील नाट्यचर्चेच्या आधारें परंतु वैयक्तिक विचारानुरोधानेंच झाली. तंत्रविषयक स्वतंत्र ग्रंथांत कांहींशी चर्चा 'लेखनकले'त व कांहीं 'प्रतिभासाधन' या ग्रंथांत आढळते. केवळ नाट्यविषयास वाहिलेला स्वतंत्र ग्रंथ अद्यापिहि व्हावयास पाहिजे असें म्हणतां येईल; तथापि नाट्यविषयक वाङ्मय मराठींत उपलब्ध करून देण्याकरितां अ. वा. वरवे व शं. वा. मुजुमदार यांच्या परिश्रमाचा उल्लेख अवश्य केला पाहिजे.

तंत्रविषयक स्वतंत्र ग्रंथांची उणीव असली तरी एकेक नाटककाराच्या रचनेवर २-४ स्वतंत्र ग्रंथ झालेले दिसतात. श्री. खाडिलकर यांच्या नाट्यसृष्टीवरील घारपुरे यांचा प्रबंध, केळकरांच्या सहा नाटकांवरील प्रो. दांडेकर यांचा ग्रंथ, किर्लोस्कर व गडकऱ्यांवरील साठे, जोशी यांचीं पुस्तकें, व गोविंदाग्रजांच्या नाटकावरील खांडेकर यांची ग्रंथनिविष्ट टीका या वरील विधानाचीं उदाहरणें

होत. असाच प्रयत्न कोल्हटकर यांच्या नाटकांसंबंधीं व्हावयास हवा. उपरिनिर्दिष्ट नाटककारांच्या नाटकांवर लेखहि मासिकांतून वेळोवेळीं आलेले आहेत.

नाट्यतंत्रविषयक सामग्री एवढी तरी उपलब्ध आहे, पण कादंबरीसंबंधाची स्थिति अधिक निराशाजनक आहे. आपटे व फडके यांच्या 'लेखनकला' व 'प्रतिभा-साधन' या ग्रंथांतून इतर वाङ्मयप्रकारांबरोबर याहि प्रकारासंबंधीं तात्त्विक विचार आला आहे, तो केवळ पाश्चात्य कादंबरी-तंत्रास धरून झाला आहे व अर्थातच स्वतंत्र ग्रंथाइतका विस्तृत होऊं शकला नाहीं. या बाबतींत केवळ परी-क्षणात्मक लेखांतून आलेलीं विधानें व चर्चा गोळा करावी तेव्हां कादंबरीचा तंत्रविषयक अभ्यास करणारास कांहीं सांपडूं शकेल. हरिभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्यांवर लिहिलेला वा. ना. देशपांडे यांचा प्रबंध हाच एक एका कादंबरी-कारावरील स्वतंत्र ग्रंथ म्हणावयाचा. जी स्थिति कादंबरीची तीच लघुकथा, निबंध या प्रकारांची. आपल्या जुन्या वाङ्मयांत सध्यांच्या त्याच्या स्वरूपांत त्यांचा अभावच असल्यानें त्यासंबंधीं वाङ्मय पूर्वी होणें शक्य नव्हतें. व आतांच स्वतंत्र ग्रंथ होण्याइतका कालहि लोटला नाहीं.

पण या सर्वांपेक्षां आणखी एक प्रकारच्या ग्रंथांची उणीव भासते. ते म्हणजे इतिहासग्रंथ. वाङ्मयेतिहासांची गरज इतिहासाच्या दृष्टीनें जितकी तितकीच टीकाचर्चा वा तंत्रप्रणयन यांच्या दृष्टीनें आहे, हें वाङ्मयसेवकांस सांगावयास नको. कोणतेंहि वाङ्मयतंत्र त्या वाङ्मयाच्या इतिहासास धरून असल्याखेरीज त्यांतील सिद्धांतांचा प्रत्यय आपणांस येत नाहीं; किंबहुना त्या त्या वाङ्मयांतील त्या त्या विषयाचें तंत्रच या इतिहासावरून बनविणें इष्ट असतें. असें असल्यानें आमच्या टीकाशास्त्राचा बराच भाग परकीय वाटतो. तंत्रविषयक सिद्धांत पुढें मांडतांना संस्कृत वा इंग्रजी उतारे केव्हां केव्हां पुढें मांडावे लागतात, हेंहि या टीकाशास्त्राच्या उसनवारीमुळेंच. आमचें टीकाशास्त्र खरेंखुरें आमचें बनावयास त्यांतील सिद्धांत आमच्या वाङ्मयाच्या परिशीलनानेंच बनवावयास हवेत व असें करण्यास आपल्या वाङ्मयाचा शक्य तितका संपूर्ण व अधिकृत असा इतिहास उपलब्ध पाहिजे. आज उपलब्ध असलेले किंवा होत असलेले इतिहास ( त्यांच्यासंबंधीं आदर असूनहि ) आपली संपूर्ण गरज भागविणारे नाहींत. हें कार्य फार मोठें आहे व एकट्यादुकट्यानें होणारें नाहीं. अनेक विद्वानांनीं यांतील थोडथोडा बोजा उचलल्यासच तें शक्य होईल. तें तसें होवो, अशी इच्छा प्रदर्शित करून हा लेख संपवितों.

---

११

# अर्वाचीन कोशवाङ्मय

[ लेखकः—श्री. चिंतामण गणेश कर्वे, बी.ए. ]

## कोशयुगाला प्रारंभ

जगाला कोशाचें महत्त्व कळूं लागल्याला दोन हजार वर्षें झालीं असलीं तरी त्यानंतर दीड हजार वर्षांत कोशरचनेच्या बाबतींत नांव घेण्यासारखें कांहींच झालें नाहीं असें मोठ्या खेदानें म्हणावें लागेल. अमरकोशानंतर प्रसिद्ध असे कोश ११।१२ व्या शतकांतील हेमचंद्राचेच होत. त्यावर गेल्या शतकापावेतों सगळी सामसूम. पाश्चात्य देशांतूनहि, जॉन्सनचा काळ सोडल्यास व फ्रेंचांची सर्वज्ञानसंग्राहक ज्ञानकोशाची कच्ची आंखणी कोशयुगाच्या व्यापक दृष्टींत न ठेविल्यास, या सुदीर्घ काळांत कोशवाङ्मयांत विशेष भर पडलीच नाहीं, असें ठासून म्हणतां येईल. पण एकोणिसावें शतक उजाडतें न उजाडतें तोंच सर्वच वाङ्मयक्षेत्रांतून नावीन्य खेळूं लागलें. नवे विचार, नवीन मांडणी, नवीन भाषासरणी, नवीन शास्त्रीय परिभाषा, नवीन प्रचार-कल्पना वगैरे सर्वच अभिनव. कांहीं जुनीं साहित्यक्षेत्रें ओसाड पडून दुसरीं नवीनच पुढें आलीं. शास्त्रीय पद्धतीचा अवलंब न केल्यास असंस्कृत म्हणून मागें पडण्याची भीति सर्व विचारवंतांना वाटूं लागली. तेव्हां समाजाला नवीन ज्ञानदृष्टि देण्याचीं सर्व साधनें संशोधित होऊन त्यांना शक्य तितकें कार्यक्षम करण्याचे प्रयत्न सुरू झाले. त्यामुळें साहजिकच कोशरचनेकडेहि कांहींचें लक्ष ती सुधारण्याच्या उद्देशानें वेधलें; व त्याचें परिणत फळ म्हणजे जर्मनींतील ग्रिम

बंधूंचा शब्दकोश व इंग्लंडमधील नवीन ऑक्सफोर्ड कोश. भाषोपभाषांतील एकूण एक शब्दांची सर्वांगीण व शास्त्रशुद्ध माहिती देऊन भाषा आणि भाषक यांची हळूहळू होत गेलेली वाढ दिग्दर्शित करण्याचें ध्येय वरील कोशकारांपुढें होतें. शब्दकोशाला एवढी व्यापकता या वेळीं प्रथमच आली, असें म्हणणें सत्याला सोडून होणार नाहीं.

## मिशनऱ्यांची आघाडी

आपल्याकडे पाहिलें तर स्वभाषा शिकण्यास बहुधा कोशाची जरूरी वाटत नसे व अद्यापिहि ती फार थोड्या लोकांस वाटते. कारण स्वभाषेचा सूक्ष्म अभ्यास करण्याची प्रवृत्ति वाढलेली नाहीं. परभाषा शिकण्यास मात्र कोश हवाच हवा. तेव्हां मराठी-मराठी कोशापेक्षां इंग्रजी-इंग्रजी किंवा इंग्रजी-मराठी कोशाची मागणी फार. तथापि ती सुद्धां विद्यार्थी-अध्यापकवर्गांतच असते. इतर वर्ग समजण्यास कठीण पडेल तें वाचीतच नाहींत! असो. तेव्हां इंग्रजी अमदानी सुरू झाल्यापासून राज्यकर्ते व लोक यांना एकमेकांच्या भाषा समजण्यास कोश लागूं लागावे, हें क्रमप्राप्तच झालें. तथापि प्रत्यक्ष देशी विद्वानांनीं किंवा राज्याधिकाऱ्यांनीं असे कोश रचण्यास प्रथम आरंभ केला नाहीं हें चमत्कारिक वाटलें तरी अगदीं खरें आहे. सरकारनें जसजशी जरूरी पडली तसतशी देशी शब्द इंग्रजींत समजावून घेण्याची आपल्यापुरती तात्पुरती सोय केली. पण जेव्हां मिशनरी लोकांनाच येशूचा 'पवित्र धर्म' सामान्य अज्ञानी जनांना त्यांच्याच भाषेंत समजावून देण्याची वेळ आली तेव्हां त्यांच्यांतील विद्वानांनीं मोठ्या परिश्रमानें देशी भाषांचा व्याकरणशास्त्रीय दृष्ट्या प्रथम अभ्यास केला व आपल्या इतर मिशनरी बांधवांना त्यांचा उपयोग करतां यावा या दृष्टीनेंच केवळ देशी भाषांचीं व्याकरणें आणि कोश तयार केले. याची प्रचीति पाहावयाची झाल्यास, हिंदुस्थानच्या सर्व भाषांतील आद्य कोश कोणीं केले याची माहिती करून घ्यावी. देशी-इंग्रजी व इंग्रजी-देशी असे उलट सुलटहि कोश त्यांनीं देशी पंडितांचें पगारी साहाय्य मिळवून रचिले; त्यांच्या सुधारून आवृत्ती काढल्या व आजपर्यंत त्यांचें ' अद्वितीयत्व ' टिकविलेंहि ! परधर्मियांनीं आणि परभाषकांनीं आपले कोश तयार करावेत व आपण त्यांच्यापुढें अद्याप एकहि पाऊल टाकूं नये, ही कोण प्रज्ञाहत स्थिति! सुदैवानें स्वभाषेचे कोश स्वतःच विस्तृत प्रमाणावर रचण्याची सुबुद्धि आपल्यांत बळावत आहे. ' हिंदी शब्दसागर ' झाला, 'महाराष्ट्र शब्दकोश' अर्धा अधिक पार पडला, कानडी आणि उडिया कोश निघण्याच्या मार्गांत आहेत, गोंडलला गुजराथी कोश राजाश्रयाखालीं रचला जात आहे.

## मराठी बृहत्कोशार्थ प्रयत्न

मराठी भाषेचाच येथें विचार करतां, पहिला कोशस्वरूपी प्रयत्न इ. स. १८१० त श्रीरामपूरच्या रेव्ह. क्यारेनें केला. हा प्रत्यक्ष कोश नसून मराठी-इंग्रजी शब्दांची एक यादी म्हणतां येईल. एक मराठी व्याकरणहि यानें रचिलें. पहिला मराठी-मराठी कोश १८२९ सालीं मुंबईसरकारच्या आज्ञेवरून ' बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी 'नें एक शास्त्रीमंडळ नेमून तयार केला. हाच मराठी कोशाचा पहिला मोठा प्रयत्न म्हणतां येईल. यानंतर याच्यावरून बरेच कोश इंग्रजी-मराठी व उलट, सरकारी व खासगी प्रयत्नांनीं निघाले. त्यांची सविस्तर माहिती महाराष्ट्र शब्दकोशाच्या पहिल्या विभागाच्या प्रस्तावनेंत दिलीच आहे. गेल्या साठ वर्षांतीलच कोशवाङ्मयाचा येथें विचार कर्तव्य असल्यानें व त्रोटक आणि किरकोळ स्वरूपाच्या प्रयत्नांवर विशेष भर द्यावयाचा नसल्यानें, आपण एकदम कै. मा. ब. नामजोशी यांनीं केलेल्या मोठ्या परिश्रमाकडे वळूं. यापूर्वीं रावसाहेब मंडलीक यांचा उल्लेख करणें कर्तव्य ठरतें; कारण त्यांनीं मराठी भाषेचा एक सांगोपांग विस्तृत कोश तयार करण्याची उमेद धरून सरकारकडे एक योजनाहि पाठविली होती. सुप्रसिद्ध कोशकार मेजर कँडी, संस्कृत-प्राकृत-भाषाकोविद डॉ. भांडारकर आणि मराठी वाङ्मयाचे दीर्घव्यासंगी कृष्णशास्त्री चिपळूणकर यांची एक समितीहि सरकारनें रावसाहेबांच्या मदतीला दिली होती. या कोशाच्या रचनेसंबंधींच्या उपलब्ध असणाऱ्या आंखणीवरून हा कोश तयार झाला असता तर ' महाराष्ट्र शब्दकोशा 'चें कारणच उरलें नसतें, अशी खात्री होते. पण दुर्दैवानें हा कोश गर्भावस्थेंतच जिरला. लो. टिळकांच्याहि मनांत मोठ्या कोशाची कल्पना घोळत होती. त्यांच्याच उत्तेजनानें त्यांचे परम मित्र माधवराव नामजोशी यांनीं बृहन्मराठी कोशास प्रारंभ केला व कच्चा खर्डा म्हणून मोलस्वर्थ-कँडीच्या मराठी-इंग्रजी कोशांतील मराठी शब्दांना दिलेल्या इंग्रजी अर्थांचें अथपासून इतिपर्यंत सुमारें १००० पृष्ठांचें भाषांतर करून घेतलें; व मूळ शब्दांत आणि अवतरणांत भर म्हणून वेळोवेळीं वाचलेल्या व वाचविलेल्या पुस्तकांतील नवीन शब्द आणि अवतरणें संदर्भांकांसहित या हस्तलिखित कोशाच्या पृष्ठांवरील समासामध्यें दिलीं. यावर आणखी कित्येक संपादकीय संस्कार करण्याचें त्यांनीं योजिलें असावेंसें दिसतें. हा कोश असाचा असा जरी कोणीं त्या वेळीं प्रसिद्ध केला असता तरी मोठें कार्य झालें असतें. कारण मूळ मोलस्वर्थ कोशाच्या या दुसऱ्या आवृत्तींत ६००००वर शब्दसंख्या

असून आज त्याच्याइतकाहि विस्तृत कोश, महाराष्ट्र शब्दकोश निघेपर्यंत तरी नाहीं, हें निर्विवाद आहे. यामागून ( १९२२ सालीं ) श्री. वासुदेव गोविंद आपटे यांनीं घाईघाईनें जो ' शब्दरत्नाकर ' केला तरी बाहेर काढला त्यापेक्षां हा नामजोशी कोश जर ते लो. टिळकांच्या साहाय्यानें—ते हयात असता—प्रसिद्ध करते तर दुबार श्रम झाले नसते व महाराष्ट्र जनतेला एका बृहत्कोशाचा लाभ यापूर्वींच झाला असता.

## शब्दरत्नाकर

आपट्यांचा हा छोटा कोश म्हणजे विद्यार्थ्यांस जुनीं मराठी काव्यें बी. ए., एम्. ए. च्या परीक्षांसाठीं वाचण्यास उपयोगी पडावा व 'आनंदा'लाहि अर्थसाहाय्य लाभावें या हेतूनें, जुने गोडबोलेकृत 'हंसकोश' व ' मराठी भाषेचा नवीन कोश ' यांवरून केवळ उतरून घेतलेला व त्यांत मधून मधून ज्ञानेश्वरी, तुकाराम-गाथा, इतर संतगाथा यांच्या कांहीं प्रतींतून दिलेले शब्दार्थ समाविष्ट केलेला, तसेंच थोडे प्रांतिक आणि आधुनिक शब्द घुसडून ' आजतागायत ' बनविलेला असा हा गुजबी कोश होय. संतवाङ्मय वाचण्यास उपयुक्त असा दुसरा कोश त्या वेळीं बाजा-रांत नसल्यानें भारी किंमत असतांहि हां हां म्हणतां हा खपला. '**शब्दार्थचंद्रिका**' नांवाची याची शालोपयोगी छोटी व स्वस्त आवृत्ति मात्र फारशी खपली नाहीं. कशी खपणार ? शाळेंतील पुस्तकांतूनच शेवटीं कठीण शब्दांचे अर्थ दिलेले अस-तात. तेवढ्यावरच विद्यार्थ्यांचेंच नव्हे तर शिक्षकांचेंहि भागतें ! शब्दरत्नाकराची दुसरी आवृत्ति १९३२ सालीं कै. लेलेशास्त्री यांच्या नजरेखालीं निघाली, पण अधिक शब्दांची भर न पडतां उलट तींतून पहिल्या आवृत्तींत दिलेले वऱ्हाडी-नाग-पुरीसारखे प्रांतिक शब्द गळले ! १९३० सालीं निघालेल्या चित्रशाळेच्या ' सर-स्वती कोशामुळें ' ' शब्दरत्नाकरा ' ची महती कमी झाली असावी.

## सरस्वतीकोश

शब्दरत्नाकराप्रमाणेंच हा सरस्वतीकोशहि एकाच माणसाच्या मगदुरीनें यार झाला असल्यानें साहजिक एकांगी आहे. जुन्या गद्यपद्यांतील अवतरणें, प्रांतिक बोलींतील व धंद्यांतील परिभाषा, व्युत्पत्तीची चिकित्सा, अर्थाच्या एकुणएक छटा इत्यादि गोष्टी या कोशांत नाममात्रच आहेत. मोलस्वर्थकोश ओरबाडून काढावा अशाप्रमाणें याचें काम झालेलें पाहून वाईट वाटतें. नुसता तो मराठी-इंग्रजी कोश नामजोशी कोशाप्रमाणें भाषांतर करून दिला असता तरी चाललें असतें. याचे संपादक श्री. विद्याधर वामन भिडे हे जुन्या पंडिती वळणाचे

असल्यानें संस्कृत शब्दार्थविरल यांचा फार भर दिसतो. ऐतिहासिक कागदपत्रांतील शब्दांना तर थाराच नाहीं. खरें, या वेळीं प्रो. पटवर्धनांचा फारसी-मराठी कोश आयता तयार होता; पण घरीं बसून चित्रशाळेसारख्या प्रकाशकाच्या आज्ञेप्रमाणें 'कॉपी' पुरवावयाची असल्यानें बयातीत व असहाय्य संपादकाकडे याचा फारसा दोष येत नाहीं. तांतडीनें भलाबुरा माल काढवून स्वस्त विकावयाचा व भरमसाट नफा मिळवावयाचा या प्रकाशकाच्या नेहमींच्या दृष्टीमुळें या कोशावर पूर्व तयारी व पूर्णतेचे संस्कार घडूं शकले नाहींत. यामुळें हजार पानांचा मराठी-मराठी कोश निघूनहि बृहत्कोशाची जरूरी नाहींशी झाली असें दुर्दैवानें घडूं शकलें नाहीं.

## बृहत्कोशाची तीव्र अपेक्षा

बृहत् कोशासाठीं तळमळ रावसाहेब मंडलीक, श्रीमंत सयाजीराव गायकवाड, लो. टिळक, नामजोशी, महाराष्ट्रसाहित्य परिषद, भारत–इतिहास–संशोधक–मंडळ, वगैरे थोर व्यक्ती व संस्था यांना फार दिवसांपासून लागून राहिली होती. मंडलीक आणि नामजोशी यांचे प्रयत्न वर उल्लेखिलेच आहेत. श्रीमंत सयाजीराव महाराजांनीं विविध स्वरूपांचे कोश तयार करण्यासाठीं आपल्या राज्यांत सरकारी व निम-सरकारी रीतीनें मोठी खटपट सुरू केलीच होती. त्यांच्या सांगण्यावरून एकीकडे प्रो. गज्जर हे एक बहुभाषाकोश ( Polyglot Dictionary ) तयार करण्याचें साहित्य जुळवीत होते, तर दुसरीकडे बडोदें राज्यांतील वेगवेगळया खात्यांतील प्रचलित इंग्रजी शब्दांऐवजीं सर्वमान्य होतील अशा देशी संज्ञा बनविण्यासाटीं सरकारनियुक्त मंडळें बारंवार बसतच होतीं. पुण्यास १९०६ सालीं महाराष्ट्रसाहित्यसंमेलन भरल्यावेळीं एक मराठी भाषेचा कोश व विश्वकोश (सायक्लोपीडिया) रचण्यासंबंधीं चर्चा होऊन ठराव झाले. नंतर १९१२ मध्यें अकोला-संमेलनाच्या वेळीं साहित्यपरिषदेची जी नवीन घटना करण्यांत आली; तिच्या उद्देश-साधनांत मराठी भाषेचा कोश तयार करण्यासंबंधीं एक कलम घालण्यांत आलें. १९२७ त पुण्यास भरलेल्या संमेलनांत 'मराठी भाषेचा एक सर्वांगीण बृहत्कोश व्हावा व हें काम ज्ञानकोशांतील मंडळीनें हातीं घ्यावें व महाराष्ट्रसाहित्यपरिषदेनें ह्या कार्यास सर्व प्रकारें साहाय्य द्यावें.' असा एक ठरावहि करण्यांत आला. त्याच सालीं भा. इ. सं. मंडळांतील कांहीं प्रमुख विद्वानांनीं ज्ञानकोशाचें काम आटोपत आल्याचें पाहून मराठी बृहत्कोशाचें काम याच संपादकमंडळानें अगत्य सुरू करावें, अशी केसरींतून जाहीर शिफारस केली. या

सर्वांचा परिणाम होऊन १९२८ च्या एप्रिलमध्यें ज्ञानकोशांतील श्री. दाते, कर्वे, चांदोरकर व दातार ही प्रमुख संपादकमंडळी ज्ञानकोश पुरा करून बाहेर पडली व या शब्दकोशाच्या कामास एक लिमिटेड कंपनी स्थापून नेटानें लागली. सर्व महाराष्ट्र-बृहन्महाराष्ट्रांतील विद्वानांचा त्यांना पाठिंबा होताच. या कोशाचें नवीन ऑक्स-फोर्ड कोशाच्या धर्तीवर आंखलेलें व्यापक स्वरूप व त्याप्रमाणें चार विभागांपर्यंत झालेलें आजवरचें महाराष्ट्र कोशमंडळाचें कार्य सर्वांना विदितच आहे. तेव्हां येथें पुन्हां त्याची आवृत्ति करण्याचें कारण नाहीं. पांच वर्षांपूर्वी श्रीमंत सयाजी-रावांना त्यांच्या आज्ञेवरून या कोशाची नियोजित मांडणी प्रस्तुत लेखकानें जेव्हां निवेदन केली व ज्ञानकोशाप्रमाणेंच केवळ सामान्य जनतेच्या साहाय्यानें या कोशाचेंहि संपूर्ण संपादन-प्रकाशन पांचसहा वर्षांत पुरें होईल असें साधनांसह दाखवून दिलें, तेव्हां त्यांना अत्यानंद वाटला व या बाबतींतील लोककल्याणाचे आपले जुने मनोरथ कोणाकडून कां होईना पण सफल होण्याच्या मार्गांत आहेत, या जाणिवेनें त्यांना फार समाधान वाटल्याचें दिसलें. त्यांची या कोशास आर्थिक मदत आतांपर्यंत कोशास मिळालेल्या कोणत्याही मदतीपेक्षां फारच मोठी आहे व महाराजांना हा कोश अर्पण करण्यांत संपादकांना त्यांचें थोडें तरी उतराई झाल्यासारखें वाटणें अगदीं स्वाभाविक आहे.

## महाराष्ट्र शब्दकोश

या महाराष्ट्र शब्दकोशार्थ शब्दसंशोधनाकरितां संपादकांनीं मराठी वाङ्मयाचे पुढील विभाग पाडले होतेः— १ शिलालेख-ताम्रपट, २ महानुभावी, ३ मुकुंद-ज्ञानेश्वर, ४ एकनाथ-मुक्तेश्वर, ५ रामदासी, ६ अभंग व स्फुटकाव्य, ७ आर्या-गीति, ८ जुनें शाहिरी, ९ ऐतिहासिक, १० निबंधमालाकालीन गद्य, ११ आधुनिक काव्य, १२ नाट्य-नृत्य, १३ साहित्य (अलंकार), १४ शास्त्रीय, १५ परीक्षणात्मक, १६ निबंधात्मक, १७ वृत्तपत्रीय, १८ प्रांतिक भाषिक, १९ कारागिरी व २० स्त्रीवाङ्मय. या विभागांतील वाङ्मय आणि इतर साहित्य जमा करण्यासाठीं प्रथम त्यांनीं बृहन्महाराष्ट्रांत हिंडून ठिकठिकाणीं पूर्वी असलेल्या वाङ्मयसंस्थांचें व विद्वानांचें या शब्दसंकलनाच्या कामीं साहाय्य मिळविलें. ज्या ठिकाणीं अशा संस्था नव्हत्या तेथें त्या स्थापन करविल्या. या प्रचारांत शब्दसंकलन करणें व ग्राहक मिळविणें हीं दोन्ही कामें होत असत. वर वाङ्मयाचे जे विभाग पाडलेले आहेत, त्या प्रत्येक विभागांतील कालखंडनिदर्शक असे महत्वाचे ग्रंथ निवडून ते संपादक-

मंडळीनें वाचले व वाचविले आणि त्यांतील विशिष्ट शब्दांचें लेखन निरनिराळ्या लेखकांकडून करवून घेऊन तें स्वतः तपासलें. तसेंच त्यांनीं एकंदर ५० निरनिराळ्या ग्रंथांतील सुमारें २००० संज्ञा-शब्दांचा संग्रह केला आहे. त्याचप्रमाणें प्रांतिक भाषांतील ५००० शब्दांची निवड केली. पूर्वी प्रसिद्ध झालेले सर्व कोश कचेरींत उतरून घेण्याचें व त्यावर नजर ठेवण्याचें कामहि होतेंच. यांखेरीज संपादकांना अनेक प्रकारचीं निरनिराळीं कामें करावीं लागत. कचेरींत व बाहेरच्या ठिकाणीं जें शब्दसंकलन होई तें सर्व पत्रिकांवर लिहिलें जाई. अशा कच्च्या शब्दपत्रिका ( कार्डें ) सुमारें १० लाख तयार झाल्या होत्या. या जमलेल्या शब्दांपैकीं ज्या शब्दांची व्युत्पत्ति बिकट वाटत असे त्यांची निरुक्ति-चर्चा करण्यासाठीं मंडळानें एक व्युत्पत्तिचर्चा-मंडळ स्थापन केलें.

या कोशाचे बहुधा सात विभाग होतील. परिशिष्टें, पुरवण्या व दुरुस्त्या यांचाहि एक विभाग करतां येईल.

याहि कोशांत त्याच्या व्यापक धोरणामुळेंच अपूर्णता केव्हांहि राहणारच. अशा संदर्भग्रंथांच्या वारंवार आवृत्ति निघाल्याखेरीज त्यांत ताजेपणा व तात्कालिक कार्यक्षमतेचा दर्जा राहत नाहीं. शिवाय जितके सामुदायिक परिश्रम आणि पैसे अधिक खर्चावेत तितकी अधिकाधिक योग्यता अशा ग्रंथांना निःसंशय लाभते. तेव्हां गरीब महाराष्ट्रांतल्या बहुंशीं गरीब ग्राहकांकडून पांचसहा वर्षांत सोयीसोयीनें घेतलेल्या अल्प द्रव्यावर लहान संपादकमंडळाला अखिल महान् ब्रिटिश साम्राज्य पाठीशीं असलेल्या आंग्लकोश-संपादकांबरोबर कशी टक्कर देतां येणार? त्या कोशाला ४०००० लेखक-स्वयंसेवकांची विनामूल्य मदत, तर या महाराष्ट्र शब्द-कोशाला मोठ्या खटपटीनेंहि शेंदीडशेंच्या वर संपादकीय मदतनीस मिळाले नाहींत ! फावल्या वेळीं समाजहिताच्या कामांत गुंतून राहण्याची प्रवृत्ति आपल्यामध्यें अजून नाहीं. तसेंच इकडील संस्थानिक-धनिकवर्गाला आपल्या ' पडित ' द्रव्याचा थोडासा अंश राष्ट्रकार्याला लावण्याची बुद्धि अद्याप होत नाहीं. तेव्हां मिळतील तीं साधनें हातांशीं घेऊन काम करणाऱ्या संपादकांकडून ऑक्सफोर्डच्या तोडीचा अव्वल दर्जाचा कोश पांच वर्षांत निघावा, अशी अपेक्षा कोणीं विचारी माणसानें करूं नये. पुढल्या पिढ्या पुढल्या आवृत्तींत राहिलेल्या सुधारणा करतील व शंभर वर्षांनीं तरी ऑक्सफोर्डसारखा मराठी कोश महाराष्ट्राला मिळेल. सर्वच सुधारणांत आपण पाश्चात्यांच्या मागें १०० वर्षें नाहीं का ?

## द्वैभाषिक कोश

### रानडे कोश

आतां या पद्धतींतील द्वैभाषिक ( म्हणजे मराठींतील शब्दांचे अर्थ अन्य भाषेंत, किंवा अन्य भाषेंतील शब्दांचे अर्थ मराठींत देणाऱ्या ) कोशांकडे वळूं. इंग्रजी, फारसी, बंगाली, हिंदी या भाषांचे कांहीं कोश मराठींत आहेत. प्रो. एन्. बी. रानडे यांनीं इंग्रजी-मराठी कोश तयार करण्यासंबंधीं फारच मेहनत घेतली. यांत पारिभाषिक, कारागिरी व वाङ्मयीन शब्दांचा संग्रह करून त्यांची फोड जुने नवे मराठी प्रतिशब्द योजून सुरेख केली आहे. १८४७ त मेजर कँडीनें केलेला इंग्रजी-मराठी कोश यांत समाविष्ट केला असल्यानें मराठी ग्रामिक शब्द यांत संख्याबाहुल्यानें आढळतात. तसेंच रसायन, गणित, ज्योतिष इ. शास्त्रांतील इंग्रजी संज्ञांना मराठी प्रतिशब्द संस्कृतला धरून दिले आहेत व ते रूढ होण्याजोगे आहेत. १९०३-१६ इतकीं वर्षें एकट्या विद्वानानें सारा खटाटोप करून याचा आटोप केला हें पाहून रानड्यांच्या कर्तबगारीची धन्यता वाटते. प्रो. आपटे यांच्या संस्कृत-इंग्रजी कोशाप्रमाणेंच हा संपादकाची गाढ विद्वत्ता आणि परिश्रम दर्शवितो. हा आतां दुर्मिळ झाल्यानें याची दुसरी आवृत्ति निघणें जरूर झालें आहे. दुसरे अनेक इंग्रजी-मराठी कोश बाजारांत आहेत, पण ते केवळ शालोपयोगी असल्यानें येथें उल्लेखिले नाहींत.

### फारसी कोश

मराठी भाषेंत ज्ञानेश्वरोत्तरकालीं फारसी शब्द शिरण्यास सुरुवात झाली व तिचा कडेलोट पेशवाईंत झाला. जुन्या कागदपत्रांतून शेंकडा ५० वर शब्द फारसी व आज ते ज्ञानेश्वरींतील शब्दांप्रमाणेंच दुर्बोध झालेले. तेव्हां प्रो. माधवराव पटवर्धन यांनीं १९२५ सालीं फारसी-मराठी कोश एकट्यानेंच रचून भा. इ. सं. मंडळाकडून प्रसिद्ध करविला, हे त्यांचे आपल्यावर मोठे उपकार झाले म्हणण्यास हरकत नाहीं. त्यामुळें फारसी भाषेचें सामान्य ज्ञान सुलभ होऊन जुनें लिखाण सर्वांना कळूं लागलें. माधवरावांनीं ऐतिहासिक ग्रंथांतील उतारे शब्दार्थ समजण्या-साठीं जे भरपूर दिले आहेत ते नुसतेसुद्धां वाचण्यास उद्बोधक व मनोरंजक आहेत. या कोशांत शास्त्रीय दृष्ट्या थोडें वैगुण्य जें वाटतें तें म्हणजे आपलें नवीन शुद्धलेखन जुन्या ग्रंथांतील अवतरणांतून सर्रहा वापरणें. हें शुद्धीकरण (!) भावी संशोधकांना दिशाभूल करणारें आहे; तथापि शब्दव्युत्पत्ति देण्याची पद्धत नवी व अनुकरणीय

आहे. याचा पुरापूर उपयोग महाराष्ट्र शब्दकोशांत केल्यानें त्याची उपयुक्तता अनायासें वाढली. या कोशाची सुधारून वाढविलेली आवृत्ति लवकरच प्रो. मजकुरांनीं काढावी अशी त्यांस विनंति आहे.

## बंगाली व हिंदी कोश

श्री. वासुदेवराव आपटे यांचा 'बंगाली-मराठी कोश' फार लहान आहे. वरील फारसी कोशाच्या सालींच हा प्रसिद्ध झाला. यापूर्वी बंगाली कादंबऱ्यांचीं भाषांतरें-रूपांतरें करण्याची लाट महाराष्ट्रांत उसळली होती व मासिक मनोरंजनकर्त्यांनीं तींत बराच भाग घेतला होता. बंगाली भाषा महाराष्ट्रियांनीं जरूर शिकावी अशी आहे व त्या हेतूस अनुसरून हा कोश रचला आहे. पण तो फार अपुरा वाटेल. मिरजेच्या कातगड्यांनींहि एक लहान 'हिंदी-मराठी कोश' १९२८ त प्रसिद्ध केला. तोहि उपयुक्त आहे. तरी पण या राष्ट्रभाषेचे मोठाले कोश ( उलट सुलट ) झाले पाहिजेत; व ते सुद्धां लवकरच. कारण हिंदीचा प्रसार आज फार झपाट्यानें सुरू आहे व अर्ध्या शतकाच्या आंत ती सर्व हिंदुस्थानवासियांची मातृभाषा नाहीं तरी उप-मातृभाषा बनेल असा संभव वाटतो आहे.

## कोंकणी-मराठी कोश

मराठी (कोंकणी) भाषा गोंव्यांत राजव्यवहारांत सुद्धां आहे. तेव्हां राजभाषा जी पोर्तुगीज तींत मराठी शब्दांचे अर्थ देणारा कोश, मोलस्वर्थसारखा अवश्य होता. तो गोवेंसरकारनें करवून घेण्याचा जो अर्धवट प्रयत्न केला, त्याचें फळ म्हणजेच 'महाराष्ट्र-पोर्तुगेझ कोश' (१८७९ भाग १ ला). याचे संपादक सूर्याजी आनंदराव राजाध्यक्ष दळवी असून याचें काम १५ वर्षें त्यांना पुरलें. हा पहिला भाग थ अक्षरापर्यंत आहे. तथापि यावरून संपादकांची दक्षता चांगली दिसून येते. हा कोश पुरा होता तर मराठी भाषेच्या दृष्टीनें तें फार फायद्याचें असतें. गोंव्यांतील प्रमुख जी कोंकणी भाषा तिचे कोश पोर्तुगीज भाषेंत आहेतच; पण ते फार लहान आहेत. इंग्रजी आणि कानडी या भाषांतूनहि कोंकणीचे शब्दार्थ देणारे कोश मिशनऱ्यांनीं छापले आहेत.

## संस्कृत-मराठी कोश

संस्कृत-मराठी कोश कै. ओक यांनीं जो 'गीर्वाणकोश' नांवानें १९१५ त प्रसिद्ध केला तो मोठा नसला तरी फार महत्त्वाचा वाटेल. माधवचंद्रोबाच्या 'शब्दरत्नाकरा' नंतरचा उल्लेखण्याजोगा कोश हाच आहे.

## विविध शब्देतर कोश

### व्युत्पत्तिकोश

येथवर फक्त शब्दकोशांचीच पाहणी केली. शब्दांचे अर्थ सांगणारे जसे कोश तसेच शब्दांची व्युत्पत्ति, व्यक्तींचे इतिहास व ज्या विषयांचा बोध त्या त्या शब्दांनीं होतो, ते ते विषय सांगणारे इत्यादि प्रकारचेहि कोश आहेत. 'विग्रहकोशा'नंतर मोठा व्युत्पत्तिकोश अद्याप झाला नाहीं. तो धुळ्याचें राजवाडे संशोधनमंडळ प्रसिद्ध करीत आहे. कै. वि. का. राजवाडे यांनीं कच्च्या स्वरूपांत रचलेल्या या धातुकोशांत १५००० वर मराठी धातू दिलेले आहेत. याच्या शास्त्रीय रचनेविषयीं व प्रकाशनार्हतेविषयीं कांहीं दिवसांपूर्वी विद्वानांत कडाक्याचा वाद चालू होता. तथापि या कोशावरून राजवाड्यांच्या अचाट कल्पकतेच्या भराऱ्याखालील शब्दव्युत्पत्तिसंशोधनाचे नवीन मार्ग आपल्याला दिसून, पुढील भाषाशास्त्रीय कार्यास मोठी मदत होईल यांत शंका नाहीं. आठल्ये-आगाशे यांचा 'शब्दसिद्धिनिबंध' (१८७५), प्र. रा. पंडितकृत 'अपभ्रष्टचंद्रिका' (१८७८) व अनेक आवृत्त्यांचा लाभ मिळालेला गोविंद शंकर बापट यांचा 'व्युत्पत्तिप्रदीप' हींच काय तीं पुस्तकें व्युत्पत्तीसंबंधीं सांगतां येतील. पण त्यांचा अभ्यास आज कोणी करतांना आढळत मात्र नाहीं.

### चरित्रकोश

चरित्रकोशाचा प्रकारहि फार महत्त्वाचा आहे. वाङ्मय, इतिहास इत्यादींतून माहिती हुडकून एखाद्याचें चरित्र उभें करण्याची यातायात या कोशानें थांबते. थोर व्यक्तींची ओळख सुलभपणें करून घेतां येते. आपल्याकडे चरित्रकोश रचण्याची प्रथा कै. रघुनाथ भास्कर गोडबोले यांनीं पाडली. त्यांचे पौराणिक आणि ऐतिहासिक कोश भरतखंडाचा प्राचीन आणि अर्वाचीन इतिहास अभ्यासून मोठ्या परिश्रमानें रचिले आहेत, यांत शंकाच नाहीं. मागील शतकांत या गोडबोले यांच्याइतका मोठा मराठी कोशकार कोणी झाला नाहीं. त्यांनीं दोन शब्दकोश व दोन चरित्रकोश रचिले. 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश' मुंबईत सन १८७६ त प्रसिद्ध झाला. याचीं ७०० वर पृष्ठें आहेत. पौराणिक व्यक्तींची सविस्तर माहिती ग्रंथाधारांसह दिलेली असल्यानें याचें फार महत्त्व आहे. याची दुसरी आवृत्ति थोड्या वर्षांपूर्वी चित्रशाळेनें काढिली. 'भरतखंडाचा अर्वाचीन कोश' तितका शुद्ध नाहीं. तुलनात्मक अभ्यास आणि व्यापक निर्विकार दृष्टि त्या वेळीं नसल्यानें

हे कोश आज मागें पडले. तथापि वेदशास्त्रसंपन्न चित्रावशास्त्री यांनीं जो 'प्राचीन चरित्रकोश' १९३२ त प्रसिद्ध केला, त्यांत गोडबोले यांच्या प्राचीन कोशांतील चरित्रें समाविष्ट झालेलीं आहेतच; शिवाय, वेदकालीन व्यक्तींचीं चरित्रें त्यांत नवीन आलीं आहेत. या चरित्रकोशाचें काम महाराष्ट्राला निःसंशय भूषणावह आहे. त्यामुळें वैदिक-पौराणिक अभ्यास सुलभ झाला आहे. 'मध्ययुगीन चरित्रकोश' (ख्रि. पू. ५०० ते इ. स. १८१८ पर्यंतचा) चित्रावशास्त्री जो संपादित आहेत तोहि उपयुक्त असाच होईल, यांत शंका नाहीं. वाङ्मयसेवकांचीं चरित्रें देण्याचें कार्य असेंच आवश्यक असून, मुंबईचे श्री. गं. दे. खानोलकर यांनीं तें पत्करिलें आहे. 'अर्वाचीन वाङ्मयसेवका' चा पहिला भाग प्रसिद्ध होऊन दुसरा लवकर निघण्याच्या बेतांत आहे.

## महाराष्ट्रीय ज्ञानकोश

आतां जगांतील सर्व ज्ञान संदर्भासाठीं सुलभ करण्याच्या हेतूनें विषयवार किंवा अकारविल्हानें 'एन्सायक्लोपीडिया'सारखे जे विश्वकोश पाश्चात्य देशांत तयार झाले, त्यांचें अनुकरण करण्याचे प्रयत्न महाराष्ट्रीय ज्ञानकोशापूर्वीहि ५० वर्षें झालेले दिसतात. 'विद्यामाला' हें अन्वर्थक नांव घेऊन श्री. जनार्दन हरि आठल्ये यांनीं १८७८ त असा कोश अक्षरवार छापण्यास सुरुवातहि केली होती; पण २०० पानांपुढें त्याची प्रगति झाल्याचें आढळत नाहीं. बडोद्यासहि 'विद्याकल्पतरु' मोड फुटून बाहेर पडत होता, पण तोहि लवकर खुरटला. पण विदर्भपंडित डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर हे जेव्हां १९१४ सालीं विलायतेहून नवी दृष्टि, अनावर तडफ व दांडगा आत्मविश्वास तिकडील विद्येबरोबरच घेऊन इकडे आले व दोन वर्षें अखिल हिंदुस्थानची आपल्या पुढील उद्योगाच्या दृष्टीनें पाहणी करून शेवटीं ज्ञानकोशासाठीं एक लिमिटेड कंपनी नागपूरला उभारली तेव्हां मराठी विश्वकोशाची किंचित् आशा लोकांना वाटूं लागली. व्यापारी पद्धतीवर वाङ्मय-प्रकाशन करणें त्या वेळीं लोकांना अशक्यप्राय किंबहुना वेडेपणाचें वाटणें अगदीं साहजिक होतें. पण ही नवी दिशा ज्ञानकोशानें दाखवून दिल्यावर आतां भराभर [वा]ङ्मयप्रकाशनाच्या लिमिटेड कंपन्या निघाल्या व निघत आहेत. २३ भागांत [झा]लेल्या या ज्ञानकोशाचें एक तप चाललेलें कार्य हिंदुस्थानांत अपूर्व आहे. त्यामुळें [लोकां]नी बरेच पैसे खर्चून भरीव वाङ्मय संग्रहित करण्याची इच्छा व कुवत वाढली. आतां पुढील कंपन्यांना काम सुलभ झालें आहे. हा 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' अगदीं

पुरा व व्यवस्थित मांडणीचा नाहीं, या गोष्टी संपादकांनासुद्धां कबूल आहेत. पण तो कां असा निघाला, याची कोणी वस्तुस्थितिज्ञापक मीमांसा करील तर त्याला, आहे असा निघाला हेंच प्राप्त परिस्थितींत विशेष भाग्याचें, असें म्हणावें लागेल. अशा संदर्भग्रंथाच्या दर दहा वर्षांनीं पुरवण्या निघावयास पाहिजेत व त्यासाठीं मूळ संपादकमंडळ अभंग राहणें अत्यावश्य असतें. येथें मूळचें मंडळच फुटलें. असो. या ज्ञानकोशानें महाराष्ट्रांत एक नवीन युग निर्माण केलें. तें म्हणजे संदर्भग्रंथांचें युग होय. महाराष्ट्र शब्दकोश आणि चरित्रकोशयांचे संपादक ज्ञानकोश–संपादकांपैकींच आहेत, तेव्हां त्यांनीं ज्ञानकोशाच्या धर्तीवर कार्यें चालविणें यांत मोठेंसें नाहीं. पण इतरांनींसुद्धां ज्ञानकोशापासून स्फूर्ति घेऊन कोशस्वरूपी ग्रंथ तयार केले व करीत आहेत, हें पुढील माहितीवरून दिसेलच.

## व्यावहारिक ज्ञानकोश

महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या धर्तीवर कोल्हापुरास एक 'व्यावहारिक ज्ञानकोश' काढण्यासाठीं लिमिटेड मंडळ स्थापन झालें आहे. दैनिक आणि नैमित्तिक व्यवहारांत ज्या ज्या गोष्टींचा संबंध येतो त्या सर्व गोष्टींची माहिती या कोशांत देण्याचा संपादकांचा विचार आहे. हा कोश संकल्पिल्याप्रमाणें निघाला तर प्रत्येक कुटुंबास फारच उपयुक्त होईल, हें निःसंशय. पण कोल्हापूरच्या दरबारी वातावरणांत संपादकांना पाहिजे तें स्वातंत्र्य मिळून मूळ ध्येय कितपत गांठतां येईल याबद्दल शंका वाटते. याचा पहिला खंड नुकताच प्रसिद्ध झाल्याचें ऐकतों.

## सूचीकोश

भाषेंत वाङ्मय वाढून त्याचा व्याप दृष्टींत ठरेनासा झाला म्हणजे त्यांतील विशिष्ट ग्रंथ, विषय, व्यक्ति, स्थळें इत्यादि चट्दिशीं समजून घेण्यास सूचींची फार जरूरी भासते. एखाद्या मोठ्या ग्रंथाला शेवटीं जोडलेली सूची जशी बहुमोल वाटते त्याचप्रमाणें साहित्य, इतिहास, भूगोल इत्यादि क्षेत्रांतील ग्रंथ-ग्रंथकारांची सूची असेल तर लेखकांची फार सोय होते. या दृष्टीनें १८१०-१९१६ या कालांतील ग्रंथ, मासिकें, नियतकालिकें, त्यांतील लेख व कविता या सर्वांची नोंद विषयवार करणारी '**महाराष्ट्रीय वाङ्मयसूची**' ज्ञानकोशमंडळानें १९१९त प्रसिद्ध केली. एवढी मोठी साहित्यसूची इतर कोणत्याहि भारतीय भाषेंत नाहीं, हें आपल्या भाषेला भूषणावह आहे. १९१६ पासून आजतागायत ग्रंथांची पुरवणी सूची–कांहीं सालांच्या किरकोळ सूची ( बडोद्याचे दंडवते, डेक्कन व्ह. ट्रा.

सोसायटी यांनीं केलेल्या ) वगळल्यास—अद्याप झाली नाहीं, असें म्हणणें भाग पडतें. आतां वाङ्मयसूचीहि दुर्मिळ झाली आहे. तेव्हां १८१० पासून १९३५ अखेर एक मोठी सूची होणें जरूर आहे. तिच्यासाठीं बडोद्यास श्री. वि. पां. नेने व पुण्यास श्री. शं. ग. दाते प्रयत्न करीत आहेत, असें ऐकतों. हे प्रयत्न सिद्धीस जावोत, अशी सर्व महाराष्ट्राची सदिच्छा असणार. धुळ्याचे कै. गो. का. चांदोरकर यांनीं '**संतकवि-काव्यसूचि**' प्रसिद्ध करून मराठी काव्यावर फार उपकार केले आहेत. या सूचींत मुद्रित काव्याबरोबर प्राचीन काळापासून उपलब्ध झालेल्या अमुद्रित काव्यांचाहि जो निर्देश केला आहे तो संशोधकांना तरी चांगला मार्ग-दर्शक होईल. याच चांदोरकरांनीं कांहीं राजवाडे खंडांतील स्थलांची एक सूची रचिली आहे. १८९६ तील करकरे-वैद्य यांचा '**स्थलनामकोश**' छोटा असूनहि ग्रंथरचनेची नवीन दिशा दाखवितो. पण यापेक्षांहि मोठे भौगोलिक कोश व्हावयास पाहिजेत. याप्रमाणेंच ऐतिहासिक ग्रंथांतील स्थळें, प्रसंग आणि व्यक्ती यांचे कोश आज जाणिवेच्या उणीवा होऊन बसले आहेत. कारण नवीन ऐतिहासिक साधनें शेंकडोंवारीनें निघाल्यानें जाड्या इतिहासकारालाहि त्यांना डोक्यांत ठेवून वेळेवर बाहेर काढण्याचें साधत नाहीं. यासाठीं या साधनांच्या सूची पद्धतशीर केलेल्या पाहिजेत. भा. इ. सं. मंडळ किंवा इतर संस्था यांनीं हें काम अंगावर घेण्यासारखें आहे.

## वाक्प्रचार म्हणी-कोश

वरील कोशांखेरीज कांहीं विशिष्ट तऱ्हेचे कोश दिसतात. भाषेंतील वाक्प्रचार, संप्रदाय, लकबा, म्हणी, उखाणे, इत्यादि देणारे कोश कांहीं शालोपयोगी तर कांहीं स्त्रियांसाठीं केलेले आहेत. या क्षेत्रांत मोठा उल्लेखिण्या-सारखा ग्रंथ म्हणजे कॅ. मॅनवरिंग यांनीं इंग्रजींत केलेला ( १८९९ ) होय. यांत मराठी म्हणींचें विषयवार वर्गीकरण केलें असून, आपटे आणि भिडे यांनीं आपलीं पुस्तकें याच धर्तीवर रचलीं आहेत. मोठा सर्वसंग्राहक ( निरनिराळ्या मराठी बोलींतील म्हणी घेऊन ) म्हणींचा कोश महाराष्ट्र शब्दकोश मंडळास करणें आतां फार सुलभ आहे. त्यांच्याकडे प्रांतिक भाषांतील म्हणी आल्या असून इतर म्हणीं-संबंधींचीं पुस्तकें संग्रहीं आहेत. महाराष्ट्र शब्दकोशाची पुरवणी म्हणून म्हणींचा कोश काढणें वावगें तर होणार नाहींच पण आवश्यक ठरेल.

इंदूरचे कै. काळेले यांनीं रॉजेटच्या थेसॉरसच्या धर्तीवर '**राजकोश**' रचण्यास आरंभ केला होता. यांत समानार्थक शब्दांची एकत्र गुंफणी असून तो

पुरा होता तर लेखक, कवी व यथार्थशब्दचिकित्सक यांना त्याची फार मदत झाली असती. पण दोन भाग निघून संपादकाच्या मृत्यूमुळें तो बंद पडला.

धर्मकोश

वांई येथें 'धर्मकोश' संपादण्याचें मोठें क्लिष्ट काम (पूर्वाश्रमींचे) वे. शा. सं. नारायणशास्त्री मराठे यांच्या प्रेरणेनें चालू झालें आहे. यांत गेल्या सहा हजार वर्षांचा धर्मेतिहास अवलोकून धर्मविषयक वचनांचा संग्रह करणें आहे. समाजशास्त्रीय आणि धार्मिक प्रश्नांचा निकाल करण्याच्या कामीं या कोशाचा फार उपयोग होईल.

## परिभाषाकोश

### शासनकल्पतरु

बडोद्यास विविध कोशरचना श्रीमंत सयाजीरावांनीं राजधुरा वाहण्यास घेतल्यापासून चालू आहे, हें मागें सांगितलेंच. डॉ. गज्जरांच्या बहुभाषा-कोशाच्या प्रयत्नानंतर खुद्द दरबारकडूनच राजशासनोपयोगी शब्दनिर्मिति व आधुनिक राजव्यवहार-कोशार्थ योजना होऊं लागल्या. राज्यकारभारांत विशेषतः न्यायखात्यांत नेहमीं वापरल्या जाणाऱ्या रूढ संज्ञा अचूक अर्थ दर्शवितात असें नसून रूढीनें त्यांना विशिष्ट अर्थ प्राप्त झाला आहे; तेव्हां संस्कृत आणि देशी भाषांच्या साहाय्यानें सर्वत्र समजतील व प्रचलित होतील अशा नवीन संज्ञा बनविण्यासाठीं एक समिति महाराजांनीं १९२७ सालीं नेमली. या समितीनें अनेक भाषाकोविद आणि तज्ज्ञ यांच्या मदतीनें 'श्रीसयाजीशासनकल्पतरु' निर्माण केला. प्रस्तुत कोशांत एका इंग्रजी शब्दाला गुजराथी, मराठी, संस्कृत, ऊर्दू, पर्शियन, हिंदी व बंगाली अशा सात भाषांतील एकापुढें एक प्रतिशब्द देऊन त्यापुढें गुजराथेंतील प्रचलित शब्द ठेविला आहे व शेवटीं सर्वमान्य होईल असा नवा शब्द सुचविला आहे. या कोशाचा मूल हेतु अखिल भारतांत एक परिभाषा व्हावी हा आहे. या कोशापूर्वी महाराजांनीं एक वैज्ञानिक शब्दकोश तयार करविला व शास्त्रीय परिभाषा एक व्हावी, या सर्वमान्य मताला प्रत्यक्ष चालना दिली. शास्त्रीय परिभाषा सर्व प्रांतांतून एक असावी, यासंबंधीं फुटकळ प्रयत्न चालले आहेत. पण त्याबरोबरच प्रत्येक प्रांतांतून निरनिराळीं परिभाषामंडळें निघून, स्वतंत्रपणें परिभाषाटंकशाळा जोरानें सुरू आहेत! हिंदी व बंगाली परिभाषांचे कोश प्रसिद्ध झालेच आहेत. पुण्याच्या परिभाषामंडळानें भूपृष्ठ व भूगर्भ, रसायन, गणित, वैद्यक,

इ. शास्त्रांतील संज्ञा बनवून प्रसिद्ध केल्या आहेत. पण त्यांना महाराष्ट्रीय विद्वानांकडून आणि साहित्यसंस्थांकडून मान्यता घेण्याचा प्रयत्न व्हावयाचा आहे. घरीं बसून एखाद्यानें टांकसाळ चालवावी व तींतील नाणीं बाजारांत देवघेवीस न्यावींत म्हणजे जो अनुभव येतो तोच या मंडळाला येईल, अशी साधार भीति वाटते.

## महाराष्ट्र सांवत्सरिकें

आणखी एका कोशस्वरूपी कामाचा उल्लेख करणें जरूर आहे. तो म्हणजे 'महाराष्ट्र सांवत्सरिक' मालेचा. दरसाल घडणाऱ्या विविध गोष्टींचा परामर्ष एकत्र ज्यांत घेतला आहे असे सांवत्सरिक कोश पाश्चात्य देशांत कितीतरी निघतात; व त्यांचा सर्वांना फार उपयोग होतो. मतप्रदर्शन न करतां नुसती जगांतील किंवा विशिष्ट राष्ट्रांतील सर्व व्यवहारक्षेत्रांतील माहिती साधार देणें हें अशा वार्षिकांचें ध्येय असतें. पक्षोपपक्षांचीं व विशिष्ट व्यवसायांचीं सांवत्सरिकेंहि निघतात. हिंदुस्थानांत टाइम्स ऑफ इंडिया कचेरी 'इंडियन इअर बुक' नांवाचें एक जाडें व खच्चून माहितीनें भरलेलें सांवत्सरिक काढते. मराठींतहि असें निघावें, या स्तुत्य हेतूनें. सामाजिक चळवळींचे सुप्रसिद्ध पुरस्कर्ते श्री. श्रीपाद महादेव माटे यांच्याच बहुंशीं चिकाटीनें महाराष्ट्रसांवत्सरिकमंडळ निघून १९३३ सालीं सुमारें १००० पृष्ठांचा ग्रंथ बाहेर पडला; व १९३४ आणि १९३५ सालीं त्या त्या वर्षांचे पुरवणी-अंक निघाले. दरसाल त्या त्या सालापुरता व पांच वर्षांनीं विस्तृत संकलित स्वरूपाचा सांवत्सरिक ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें या मंडळानें योजिलें आहे. अशा रीतीनें मंडळाला स्थैर्य येऊन त्याची योजना मूर्त स्वरूपाला येईल, याबद्दल खात्री वाटूं लागली आहे.

## शास्त्रकोश

### विज्ञानबोध

श्री. माटे यांनीं या सालारंभीं 'विज्ञानबोध' नांवाचा सर्व भौतिक शास्त्रांचा सुबोध इतिहास, त्या त्या विज्ञानशाखेंतील निरनिराळ्या तज्ज्ञांकडून लिहविलेला, प्रसिद्ध करून वाङ्मयांत मोठी अपूर्व भर टाकली, यांत शंका नाहीं. इतके शास्त्रज्ञ लेखक मिळवून ठराविक वेळेंत असा शास्त्रकोश प्रसिद्ध करण्याचें अवघड कार्य त्यांनीं संकल्पिल्याप्रमाणें पार पाडलें, यांत त्यांची लोकसंग्राहक कर्तबगारी व्यक्त होते. ज्ञानकोशाचा पांचवा खंड 'विज्ञानेतिहास' हाहि अशा प्रकारचा शास्त्रकोश म्हणतां येईल. यापुढें अशाच संदर्भग्रंथांबाबत बऱ्याच उणीवा श्री. माटे भरून

काढतील व ज्ञानकोशाची परंपरा चरित्रकोश, शब्दकोश प्रभृति संस्थांप्रमाणेंच अखंड जागवितील, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

## संदर्भग्रंथांची मागणी

आज विविध प्रकारचे संदर्भग्रंथ काढण्याकडे अनेकांचें लक्ष जात आहे, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. व्यायामविषयाकडे ओढा असणारीं माणसें व्यायामकोश हवा म्हणतात ( बडोद्यास सरदार मुजुमदार हे असा कोश तयार करीत आहेत हें येथें निदर्शनास आणणें योग्य होईल ); शिक्षक-पेशाचे लोक अध्यापनकोशाची मागणी करतात; व्यापारी लोक आयातनिर्गतमाल-कारखानदार-दुकानदार यांची माहिती पुरविणारी सूची करावयास सांगतात; परभाषा शिकूं चाहणारे अभ्यासू परभाषांचीं व्याकरणें आणि शब्दकोश मराठींत आणूं बघतात. पाश्चात्यसंवर्धित ज्ञानाचीं सर्व द्वारें खुलीं झाल्याकारणानें आंतील साहित्याच्या प्रचंड राशी पाहून नवशिका साहित्यसेवक एकदम भांबावून जातो व इष्ट स्थलीं कसें पोहोंचावें, हें त्याला कळेनासें होतें. पण कोश—सूची—संदर्भग्रंथांच्या मार्गदर्शिका त्याच्या दृष्टीस पडल्यावर त्याची चिंता दूर होते. कारण त्या त्याला हातानें धरून निर्धोक नेमक्या जागीं चट्कन नेतात. तेव्हां आपल्याकडील साहित्यासाठींहि अशाच मार्गदर्शिका तयार ठेवण्याची जरूरी आतां साहित्यकांना भासून तशी व्यवस्था करण्यांत येत आहे व थोड्याच काळांत साहित्याचे सर्व मार्ग सुगम होतील अशी आशा वाटत आहे.

## अद्याप वाटणाऱ्या उणीवा

अद्याप बरेच कोश तयार व्हावयास पाहिजेत. विद्यार्थ्यांसाठीं लहान ज्ञानकोश होणें जरूर आहे. प्रत्येकाला आपल्या घरीं मोठा ज्ञानकोश ठेवतां येत नाहीं व त्या मोठ्या कोशांत त्याला अभ्यासाच्या कामीं चांगली उपयोगी पडणारी विशिष्ट विषयांवरची माहिती नसते. तेव्हां केवळ विद्यार्थ्यांच्याच उपयोगी पडेल अशी शालेय आवृत्ति निघावी व 'चिल्ड्रेन्स बुक् ऑफ नॉलेज' या धर्तीवर ती असावी. तसेंच प्रवाशांना उपयोगी पडेल असा स्थलकोश आज नाहीं. प्रसिद्ध प्रेक्षणीय स्थलांची वाटाड्या ('गाइड') प्रमाणें सचित्र माहिती देणारा कोश व्यापारी आणि प्रवासी यांना तर मोठा उपयुक्त वाटेलच, पण भूगोल शिकण्यालाहि त्याची मदत होईल. 'पीयर्स सायक्लोपीडिया' प्रमाणें कुटुंबकोश किंवा 'संसारचोपडी' विशेषतः स्त्रियांना व्यवहाराच्या दृष्टीनें

फार उपयुक्त वाटेल. कोल्हापूरचा 'व्यावहारिक ज्ञानकोश' चांगला निघाल्यास ही उणीव राहणार नाहीं. 'घरचा कायदा' या पुस्तकाप्रमाणें कोर्टकचेऱ्यांची पद्धती व त्यांचे कायदेकानू सुबोध रीतीनें विवेचणारा एक चांगला न्यायव्यवहार कोश पाहिजे, असें गरिबांना जाचक अशा वकिलांच्या वागणुकीवरून वाटूं लागणें साहाजिक आहे. सुवचनांचा कोश–सूक्तकोश तयार करणें कठीण जाणार नाहीं. निर्णयसागरनें केलेल्या 'सुभाषितरत्नभांडारा' प्रमाणें विद्यार्थी आणि लेखक यांना तो बहुमोल होईल. ललितकला शिकणाऱ्यांस आज कलाविषयांची आणि कलावंतांची माहिती देणारा कलाकोश नाहीं. प्राचीन कालापासून आजवर झालेल्या संस्मरणीय गोष्टी व त्यांचे काल देणारा, थोर व्यक्तींचीं चरित्रें आणि त्यांच्या कृती सांगणारा, व शोधांची माहिती आणि शोधकांची ओळख करून देणारा असे कोश जरूरीचे वाटतात. निरनिराळ्या पुस्तकांतून अशा गोष्टी दिलेल्या असल्या तरी त्या पाहण्यास अवधी लागतो; व अशीं सारीं पुस्तकें जवळ नसतात. कवींना उपयोगी असे यमककोश, वृत्तकोश, काव्यगुणकोश, अलंकारकोश, कविकोश इ. ग्रंथ अद्याप तयार व्हावयाचे आहेत. सर्व धर्मांतील संस्कार, संत, विधि, मंत्र, क्षेत्रें, आचारविचार वगैरे माहिती ग्रथित करणारा एखादा धार्मिक कोश असेल तर पाहिजे त्या धर्माची लवकर माहिती करून घेतां येईल. याप्रमाणें, पाश्चात्य राष्ट्रांत प्रचलित असलेल्या अनेक कोशांच्या आपल्याकडे भासणाऱ्या उणीवा सांगतां येतील. आजचें युग कोशयुग आहे, असें वारंवार म्हणण्यांत येतें, तेव्हां या युगांत अशा प्रकारचे विविध कोश तयार होतील तर जनतेला केवढा लाभ होणार आहे !

१८७५–१९३५ या षष्ठ्यब्दींतील साधारणपणें निम्मा भाग १९ व्या शतकांत व निम्मा २० व्या शतकांत पडतो. पहिल्या भागांतल्यापेक्षां दुसऱ्या भागांत कोश जास्त झाले, हें सुधारणेच्या आजच्या भरधांव प्रगतीला अनुसरूनच आहे. यापुढल्या साठ वर्षांत याच्या चौपटीनें कोशसंख्या वाढेल, असेंहि त्यावरून अनुमान करण्यास हरकत नाहीं. तेव्हां मागें दुर्लक्षिलेला संदर्भग्रंथांचा साहित्यप्रांत यापुढें चांगला समृद्ध होईल, अशी आशा करणें वावगें होणार नाहीं.

१२

# तत्त्वज्ञान–वाङ्मय आणि विचार

[ लेखक–डॉ. दामोदर गणेश लोंढे, एम्.ए., पीएच्.डी. ]

'तत्त्वज्ञान' हा शब्द हल्लीं आपण इंग्रजींतील 'फिलॉसफी' (Philosophy) ह्या शब्दाला समानार्थक म्हणून वापरतों; परंतु पूर्वीं आपल्याकडे तत्त्वज्ञान म्हणजे अध्यात्मशास्त्र असें समजत असत. अध्यात्मशास्त्राचा धर्मांत अंतर्भाव होत असल्या-मुळें, तत्त्वज्ञानाचा वेगळा वाङ्मयविभाग करण्याची पद्धति अगदीं अलीकडील आहे. ज्या साहित्याचा आज आपण तत्त्वज्ञानाच्या सदरांत समावेश करतों तें सामा-न्यतः धार्मिक वाङ्मय म्हणून समजलें जात असे, याला कारण भारतीय तत्त्वज्ञानाचें धर्माशीं असणारें साहचर्य हेंच होय. महाराष्ट्राच्या ऐतिहासिक कालांत ज्ञानेश्वर व नामदेव, तुकाराम व रामदास, मोरोपंत व वामन पंडित ह्या संतकवींनीं आणि पंडित कवींनीं निर्माण केलेलें अमोल वाङ्मय मुख्यतः धार्मिक आणि सांस्कृतिक स्वरूपांचें असलें तरी त्यांत ओघाओघानें आलेल्या आध्यात्मिक विषयांवर तात्त्विक विवेचन केलेलें आढळून येतेंच. आतां हें खरें कीं, अध्यात्मविषयाच्या सहजसिद्ध काठिण्यामुळें पौराणिक किंवा भक्तिमार्गांतील विषयांचें विवेचन करतांना तात्त्विक मुद्द्यांना आवश्यक प्रासंगिकतेपेक्षां अधिक महत्त्व देण्यांत येत नाहीं. तरी सुद्धां भक्तिवाङ्मयाचा खोल अभ्यास करण्याच्या संवयीनें अंतर्मुख झालेल्या मनाचाच अध्यात्मविषयाकडे कल होणें साहजिक आहे. भक्ति हा अंतःशुद्धिद्वारां आध्यात्मिक ध्येयप्राप्तीचा मार्ग व तत्त्वज्ञान हें बौद्धिक उन्नतीनें निःश्रेयस साध्य करण्याचें साधन,

हा भक्ति आणि ज्ञान ह्यांतील भेद कांहीं विशेष कक्षेपर्यंतच शक्य असतो. त्याच्या पुढें गेल्यावर भक्ति सज्ञान होते व ज्ञान न कळत अंतःकरणाची शुद्धि करतें. भक्तिमार्ग आणि ज्ञानमार्ग यांतील, या मानसशास्त्रीय अंतर्गत संबंधाचें वाङ्मयेतिहासांत प्रतीत होणाऱ्या आविष्करणाचें उत्तम उदाहरण ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभव ग्रंथांत आपणांस पाहावयास मिळतें. अमृतानुभव ग्रंथाला भक्ति आणि तत्त्वज्ञान ह्या दोहोंच्या सरहद्दीवर स्थान आहे. सुमारें पन्नास वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत भक्तिमार्गांतील लोकांत जी कांहीं थोडीशी तत्त्वज्ञानविषयक जिज्ञासा व अभिरुचि दिसून येत होती, ती बव्हंशीं अमृतानुभवासारख्या भक्तिमार्गांतील तात्त्विक ग्रंथावर केंद्रीभूत झाली होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं. जगाचें अंतिम तत्त्व द्वैत कां अद्वैत या प्रश्नाचें ह्या ग्रंथाच्या प्रथम प्रकरणांत शिवशक्तिस्वरूपनिर्णयाच्या रूपानें केलेलें विवेचन, तसेंच अज्ञानखंडन इत्यादि विषय अत्यंत उद्बोधक आहेत. अमृतानुभवाचा सांप्रदायिक रीतीनें अर्थ देऊन विषयविवरण करणारे दोन चार ग्रंथ मराठींत आहेत. परंतु केवल तात्त्विक, चिकित्सक आणि तौलनिक पद्धतीनें स्वतंत्र पुस्तकरूपानें अमृतानुभवांतील तत्त्वज्ञान सुसंगत रीतीनें मांडण्याचा प्रयत्न अजून झालेला दिसत नाहीं. प्रस्तुत लेखकानें “ ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान ” या इंग्रजी निबंधांत (Proceedings, Indian Philosophical Congress, Second Session, 1926, Benares) अशा तऱ्हेचा स्थूल प्रयत्न केला आहे. “ज्ञानेश्वर-दर्शन” म्हणून जो एक मोठा निबंधसंग्रह नुकताच प्रसिद्ध झाला आहे, त्यांतहि या दृष्टीनें लिहिलेले कांहीं निबंध वाचनीय आहेत.

सुमारें १८८०–१९०० या काळांत सुप्रसिद्ध पाश्चात्य ग्रंथकारांच्या ग्रंथांचीं भाषांतरें अगर रूपांतरें करून तद्द्वारां मराठी भाषेच्या ज्ञानभांडारांत भरीव भर घालण्याची एक प्रवृत्ति दिसून येत होती. या प्रवृत्तीचें प्रत्यक्ष फल म्हणजे हक्सले, स्पेन्सर इत्यादि विद्वानांच्या ग्रंथांचीं मराठींत झालेलीं रूपान्तरें होत.

१८९१ सालीं कै. प्रो. चिंतामण गंगाधर भानु यांनीं स्पेन्सरच्या “ Data of Ethics ” या ग्रंथाच्या आधारानें “ नीतिमीमांसा ” अथवा “ नीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें ” हें पुस्तक लिहिलें. १८९४ सालांतील प्रो. धोंडो केशव कर्वे यांचें “ नीतिसिद्धांत ” व त्यांचेंच १८९६ मध्यें प्रसिद्ध झालेलें “ राजनीतीचीं मूलतत्त्वें ” हीं पुस्तकें याच सदरांत घातलीं पाहिजेत. १८९६ सालांत नारायण लक्ष्मण फडके यांनीं हर्बर्ट स्पेन्सरच्या “ First Principles ” या ग्रंथामध्यें पुरस्कृत

केलेला अज्ञेयवाद "अज्ञेयमीमांसा" या पुस्तकाच्या रूपानें मराठींत वाचकांस उपलब्ध करून दिला. त्याचप्रमाणें शंकर बाळकृष्ण दीक्षितकृत "धर्ममीमांसा" या पुस्तकांत मॅक्समुलरच्या धर्मांवरील व्याख्यानांना मराठी पेहेराव देण्यांत आलेला आहे. नवीन विचार, अपरिचित शब्द आणि दुर्बोध वाक्यरचना ह्यांमुळें हीं अनेक शास्त्रांचीं "मूलतत्त्वें" आणि "मीमांसा" वाचतांना आजच्या वाचकांस, आपल्या अंगाला न येणारा कोट घालतांना जशी अडचणीची भावना होते, तशा तऱ्हेची मानसिक अडचण भासते. तें कसेंहि असलें तरी, हीं आणि अशा तऱ्हेचीं पुस्तकें मराठींत प्रसिद्ध करण्याचें सर्व श्रेय, श्री. गणेश बळवंत दाभोळकर यांना दिलें पाहिजे.

यानंतरच्या काळांत स्वतंत्र रीतीनेंहि लिहिलेले कांहीं ग्रंथ आढळून येतात. १९०२ सालीं मोरो केशव दामले यांनीं "न्यायशास्त्र-विगमनें" हें Inductive logic वर लिहिलेलें पुस्तक कोणत्याहि पुस्तकाचें भाषांतर नसून अनेक पुस्तकांच्या आधारें लिहिलें. यांतील प्रदिपादनपद्धति, परिभाषा वगैरे अलीकडील लॉजिकच्या एखाद्या मराठींतील टेक्स्टबुकाला शोभण्यासारखी आहे. यापुढें १९१५ पर्यंत क्वचित् एखाद्या-दुसऱ्या पुस्तकापलीकडे मराठींत चांगल्या वाङ्मयाची निर्मिति झालेली दिसत नाहीं. अर्थात् हें विधान तत्त्वज्ञान व वाङ्मयविभागापुरतेंच सत्य आहे हें विसरतां कामा नये. सन १९१५ च्या सुमाराचा आणि त्याच्या नंतरचा काळ मात्र तात्त्विक वाङ्मय-निष्पत्तीच्या दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे, असें म्हटलें पाहिजे. याचें कारण म्हटलें म्हणजे लो. टिळकांचा "भगवद्गीता-रहस्य" हा अपूर्व ग्रंथ १९१५ सालींच प्रसिद्ध झाला.

श्रीमद्भगवद्गीतेला भारतीय सांस्कृतिक साहित्यांत प्रमुख स्थान दिलें आहे. कारण भगवद्गीता धर्म आणि तत्त्वज्ञान, सत्यज्ञान आणि व्यवहार, ज्ञान आणि कर्म यांची सांगड घालते. विश्वोत्पत्ति आणि विश्वस्वरूप ह्या अतीत विचारांपेक्षां प्रत्यक्ष जीवनांत उत्पन्न होणाऱ्या प्रश्नाचा–म्हणजे कर्म काय आणि अकर्म काय?–ह्याचा निर्णय लावण्याकरितां गीता उपस्थित झाली आहे. भगवद्गीतेच्या ह्या भारतीय संस्कृतिसाहित्यांतील उच्च स्थानामुळें महाराष्ट्रांतील तत्त्वज्ञानविषयक वाङ्मयांत आणि विचारांत भगवद्गीता-वाङ्मयाला श्रेष्ठ स्थान प्राप्त व्हावें, हें साहजिकच आहे. गीतावाङ्मयांत "गीतारहस्य" हा एक अपूर्व शतकग्रंथ आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा ग्रंथ अनेक कारणांनीं अलौकिक आहे. एक कारण म्हटलें

म्हणजे हा एका थोर राजकारणी पुरुषानें तुरुंगवासांत लिहिलेला ग्रंथ आहे. परंतु ह्या बाह्य कारणापेक्षां त्याच्या अलौकिकतेचें खरें कारण म्हटलें म्हणजे ह्या ग्रंथांत गीतेवर आजपर्यंत झालेल्या सर्व टीकांतून आणि भाषांतून प्रतिपादित केलेल्या गीतेच्या अर्थापेक्षां अगदीं नवीन असा गीतार्थ सांगितला आहे. गीता निवृत्तिपर संन्यासमार्गोपदेशक नसून, प्रवृत्तिपर निष्काम कर्मयोग शिकवणारी आहे; कर्म या शब्दाचा अर्थ वैदिक विहित कर्म असा नसून, लौकिक, सामाजिक व राष्ट्रीय कर्तव्यांचाहि त्यांत अन्तर्भाव होतो; आणि विशेषतः कर्म हें ज्ञानाला नसून कर्मयोग हा स्वतंत्र मोक्षमार्ग आहे, हा गीतारहस्याचा सिद्धांत आहे. शिवाय आपलें मत साधार मांडण्याची शैली, परमतखंडनांत उपयोगांत आणलेले भेदक युक्तिवाद, साधी परंतु मुद्देसूद भाषा, तर्कशुद्ध विवेचनकौशल्य, ह्या दृष्टीनेंहि गीतारहस्य हा अपूर्व ग्रंथ झाला आहे. सरतेशेवटीं, पाश्चात्य तत्त्वज्ञानांतील सिद्धांतांची स्वभाषेंत उत्तम सजावट करून त्यांच्याशीं आपल्याकडील सिद्धांतांची तुलना करून त्यांचें श्रेष्ठत्व दाखविण्याचा तौलानिक पद्धतीचा नवीन उपक्रम हा मराठींतील तत्त्वज्ञान वाङ्मयांत नवयुगप्रवर्तक आहे, असें निःसंशय म्हणतां येतें.

लो. टिळकांनीं "गीतारहस्या" मध्यें सर्व सांप्रदायिक मताविरुद्ध जो गीतेचा नवीन कर्मयोगपर अर्थ लाविला, त्यामुळें सांप्रदायिक विद्वद्वर्गांत जोराची वैचारिक खळबळ उत्पन्न झाली. व अशा रीतीनें गीतेवर विचिकित्सक पद्धतीचें अफाट वाङ्मय निर्माण होण्यास गीतारहस्यामुळें चांगलेंच प्रोत्साहन मिळालें.

गीतारहस्यानंतर "रहस्य खंडन", "रहस्यपरीक्षण" अशा स्वरूपाचीं पुस्तकें झालीं; त्यांत आचार्य बापट यांनीं लिहिलेलें "गीताभाष्यार्थ"—रहस्य-खंडन यास अग्रस्थान दिलें पाहिजे. या व्यासंगी विद्वान् गृहस्थांनीं शंकराचार्यांचीं उपनिषद्भाष्यें, वेदान्तसूत्रभाष्य, व गीताभाष्य, शिवाय, इतर दर्शनें इत्यादि सुमारें ४ हजारांवर पृष्ठसंख्या जाईल इतकें प्राचीन पंडितपद्धतीचें भाषांतरात्मक व विवारणात्मक असें दांडगें लिखाण मराठींत प्रसिद्ध केलें आहे. "गीताभाष्यार्थ" हा जवळ जवळ १३०० पृष्ठांचा मोठा ग्रंथ आहे. आचार्य बापटांच्या मतें, लो. टिळकांनीं प्रतिपादिलेले—गीता हें स्वतंत्र कर्मयोगशास्त्र आहे, केवळ अर्जुनाकडून युद्ध करविण्यासाठीं त्याची प्रवृत्ति झाली आहे, आत्मज्ञानानंतर प्रत्येक ज्ञानी पुरुषानें जगांतील व्यवहार कसा करावा या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं गीता आहे, गीतेंतील निष्काम कर्मयोग ही प्रवृत्ति आहे, कर्मयोग हें ज्ञाननिष्ठेचें साधन नसून

स्वतंत्र मोक्षमार्ग आहे, कर्म म्हणजे खाणेंपिणें, सर्व हालचाल, योग म्हणजे कर्मयोग, ज्ञान व कर्म यांचा समुच्चय, गीतेंत सांख्य व वेदांत यांची जोड घातली आहे पण योग मात्र गीतेंत नाहीं,–वगैरे पक्ष "सर्वथा असमर्थनीय" असे आहेत.

गीतारहस्याच्या सिद्धांताचें समर्थनहि कांहीं विद्वान् पंडितांनीं केलें आहे, त्यांत सदाशिवशास्त्री भिडे, "रहस्य-दीपिका" कर्ते, यांचा उल्लेख केला पाहिजे.

गीतारहस्यामुळें गीताग्रंथाविषयींच्या अभ्यासाला सर्वसाधारणच प्रोत्साहन मिळालें, हें वर सांगितलेंच आहे. त्याचेंच एक दृश्य फळ म्हणून अहिताग्नि शंकरराव राजवाडे यांच्या "गीता-भाष्या"चा उल्लेख केला पाहिजे. या गीताभाष्यांत राजवाड्यांनीं अगदींच नवीन शास्त्रीय पद्धतीचा उपक्रम केला आहे. नीतिशास्त्र, व विशेषत: समाजशास्त्र ह्या शास्त्रांतील पद्धतीनें त्यांनीं गीतेंतील विषयांचें विवरण केलें आहे. त्यांत अनुषंगानें इतर अनेक शास्त्रांतील सिद्धांतांचें त्यांनीं विवेचनाकरितां साहाय्य घेतलें आहे. ही शास्त्रीय पद्धती स्वीकारून राजवाडे यांनीं "नासदीय सूक्त" हाहि एक ग्रंथ लिहिला आहे.

भगवद्गीतेप्रमाणें वेदांत हेंहि एक महाराष्ट्रांतील तात्त्विक वाङ्मयाचें प्रमुख क्षेत्र आहे. केवळ महाराष्ट्रांतीलच नव्हे तर अखिल हिंदुस्थानांतील सामान्य लोकसमजुतीप्रमाणें वेदांत म्हणजे तत्त्वज्ञान व तत्त्वज्ञान म्हणजे वेदांत, असें समीकरण घातलेलें आढळून येतें. वास्तविक ही समजूत चुकीची आहे, हें निराळें सांगावयास नकोच. ही अशी समजूत होण्याला कारण उपनिषत्कालापासून तों आधुनिक कालापर्यंत इतर दर्शनांपेक्षां वेदांतदर्शनाचाच भारतीय मनावर अतिशय मोठा प्रभाव पडला हेंच होय. महाराष्ट्रांतील वेदांतवाङ्मयांत उपनिषदें, शंकराचार्यांचीं उपनिषदांवरील भाष्यें व वेदांतसूत्रावरील शारीरभाष्य यांचीं भाषांतरें यांचा प्रामुख्यानें अंतर्भाव होतो. चिंतामण गंगाधर भानु व आचार्य विष्णुशास्त्री बापट यांनीं विशेषतः वेदांतग्रंथांचीं सविवरण भाषांतरें करण्याच्या बाबतींत फार मोठी कामगिरी केली आहे. बाबा गर्दे यांनीं पंचदशीचें मराठी भाषांतर केलें आहे. या प्राचीन पंडितपद्धतीनें म्हणजे एखादा ग्रंथ घेऊन त्यांतील मूळ श्लोक अगर वाक्य घेऊन, त्याचें सरळ मराठींत भाषांतर करावयाचें व नंतर थोडेंसें विवरण करावयाचें. ह्या विवरणानें पुष्कळ वेळां मुळांतील अर्थ स्पष्ट होण्याऐवजीं अधिक दुर्बोध मात्र होतो. विवरणपद्धतीनें लिहिलेल्या अशा मूळ भाषांतर-ग्रंथांशिवाय आधुनिक प्रबंधपद्धतीनें वेदांतावर लिहिलेले ग्रंथ मराठींत मुळींच नाहींत

असें म्हटलें तरी चालेल. प्रबंधपद्धतीमध्यें एक एक विषय घेऊन त्यावर निरनिराळ्या ग्रंथांतील आधार देऊन त्या त्या विषयाचें साधकबाधक विवेचन केलें असल्यामुळें तो विषय विशद होतो. इतकेंच नव्हे, तर त्या विषयाचा इतर विषयांशीं असलेला संबंध स्पष्ट होऊन त्या सर्व पोट-विषयांचें सामान्य स्वरूप साकल्यानें प्रबंधांत पाहावयास मिळतें. अशा रीतीनें केवळ तात्त्विक पद्धतीनें व तौलनिकदृष्ट्या शांकरमताची मांडणी करण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखकानें "तत्त्वज्ञानमंदिर" मासिकांत क्रमशः प्रसिद्ध झालेल्या शास्त्र व तत्त्वज्ञान, आत्मस्वरूप, अज्ञान, ज्ञान आणि विषय, विश्वविचार, इत्यादि लेखांच्या द्वारें केला आहे. महादेव मल्हार जोशी यांचें "आधुनिक सुशिक्षिताचा वेदान्त" हेंहि पुस्तक ह्याच दृष्टीनें वाचनीय आहे. सीताराम महादेव फडके यांच्या "वेदान्तनिदर्शनां"त (१९१३) वेदांत या शब्दाचा अर्थ फार व्यापक घेतला असून आर्यधर्माचें स्वरूप व त्याची ऐतिहासिक माहिती देऊन नंतर कर्म, ज्ञान व भक्ति यांचा मिलाफ करण्याचा त्यांत प्रयत्न केला आहे. काथवटे यांच्या "अद्वैतसिद्धान्ताचा युक्तायुक्त विचार" (१९१९) या छोट्या पुस्तकांत अद्वैतमतांतील कांहीं सिद्धांतांची विशेषतः मायावादाची अयुक्तता दाखविण्याचा प्रयत्न केला असून सरतेशेवटीं मध्वसिद्धांतांतील तत्त्वांचा सारांश दिला आहे.

महाराष्ट्रांतील तत्त्वज्ञानविचारेतिहासांत "भारतीय तत्त्वज्ञान संस्था" (इन्डियन इन्स्टिटयूट ऑफ फिलॉसफी), अमळनेर, या संस्थेच्या कार्याचा निर्देश करणें आवश्यक आहे. ही संस्था १९१६ च्या सुमारास कै. श्री. सावळाराम मास्तर यांच्या आध्यात्मिक प्रेरणेनें व श्रीमंत प्रतापशेट यांच्या आर्थिक दातृत्वानें स्थापन झाली. चोपड्यास पूर्वी ज्ञानसत्र भरत असे त्यांतून ह्या संस्थेच्या कल्पनेचा उगम झाला आहे. सावळाराम मास्तर यांचें शिक्षण फार झालेलें नसतांहि व त्यांना इंग्रजी व संस्कृत या भाषा फारशा अवगत नसतांहि केवळ अत्यंत तीव्र तत्त्वजिज्ञासेनें प्रेरित होऊन त्यांनीं वेदांतांतील अति कठिण परंतु अत्यंत महत्त्वाच्या ग्रांवर कित्येक वर्षे सतत विचार केला व कांहीं विचारार्ह उपपत्ति आणि सिद्धांत . आत्मसरणी आणि विषयसरणी ह्यांतील वैलक्षण्य, विषयाला ज्ञानाहून अस्तित्व नाहीं, विषयाच्या ह्या ज्ञानसंलग्नतेवरून जगन्मिथ्यात्वसिद्धि हच आत्मस्वरूपाचें खरें लक्षण म्हणून मोक्षांतहि अहंची अपरोक्षता कायम राहते, ह्या मुद्यांवर त्यांच्या प्रक्रियेंत विशेष भर दिलेला आहे. सावळाराम

मास्तरांचें लिखाण पुस्तकरूपानें आज उपलब्ध नसलें तरी "तत्त्वज्ञान मंदिर" मासिकांतून आजवर क्रमशः बरेंच प्रसिद्ध झालें आहे. भारतीय तत्त्वज्ञानाचा व विशेषतः शांकरवेदांताचा तुलनात्मक पद्धतीनें अभ्यास व संशोधन करण्यास उत्तेजन देणें हा या संस्थेचा उद्देश आहे. संस्थेनें चालविलेलें "तत्त्वज्ञान मंदिर" हें तत्त्वज्ञान व तत्संबंधीं विषयांना वाहिलेलें असें एकच मराठी (त्रैमासिक) आहे व तें सतत १६–१७ वर्षें चाललें आहे.

स्वामी विवेकानंद यांनीं शिकागो येथील सर्वधर्मपरिषदेपुढें व्याख्यानें देऊन हिंदुधर्म आणि तत्त्वज्ञान यांचा पाश्चात्य जगाला परिचय करून दिला. त्यांनीं वेदांत प्रतिपादन करण्याची एक विशेष पद्धति काढली. ह्या पद्धतीप्रमाणें वेदांतांतील सिद्धांत नव्या मनूला साजेल व आधुनिक लोकांना समजेल व पटेल अशा किंचित् शास्त्रीय पण अधिक लोकप्रिय परिभाषेंत मांडतां येतात. ह्या पद्धतीचा पाश्चात्य लोकांमध्यें आपल्या धार्मिक व सांस्कृतिक कल्पना व ध्येयें ह्यांच्याबद्दल अभिरुचि उत्पन्न करण्याकडे चांगला उपयोग झाला हें खरें. परंतु ह्या विवेचन-पद्धतीनें वेदांततत्त्वज्ञान पाश्चात्य देशांतील कॉलेजें, विश्वविद्यालयें व त्यांतील विद्वान् प्रोफेसर इत्यादिकांच्या विद्यालयीन वातावरणांत शिरकाव होण्यास कमी दर्जाचें आहे अशी कांहीं लोकांची समजूत झाली. याकरितां केवल तार्किक व तात्त्विक परिभाषेंत वेदांत मांडून त्याच्या सिद्धांतांची कांट, हेगेल, ब्रॅडले वगैरे पाश्चात्य तत्त्वज्ञांच्या मतांशीं तुलना करून त्यांचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करावयाचें काम अत्यंत आवश्यक झालें. या दिशेनें प्रस्तुत लेखकानें 'डॉक्टर' पदवीकरितां लिहिलेल्या 'The Absolute" या विषयावरील जर्मन निबंधांत प्रयत्न केला आहे. स्वामी विवेकानंदांचे समग्र ग्रंथ १२ खंडांत आज मराठींत उपलब्ध आहेत, याचें श्रेय श्री. फडके व बर्वे यांना दिलें पाहिजे. त्याचप्रमाणें स्वामी रामतीर्थ यांचेहि ग्रंथ १२ विभागांत श्री. फडके आणि बर्वे यांनीं प्रसिद्ध केले आहेत. बाबु अरविंद घोष या तत्त्वज्ञान्याचे ग्रंथ मराठींत अद्याप उपलब्ध नाहींत असें वाटतें.

शांकर वेदांताच्या मानानें रामानुज, वल्लभ, मध्व या आचार्यांच्या सिद्धांतां-वरील मराठी वाङ्मय अगदींच अल्प आहे, असें म्हणावें लागतें. त्याचप्रमाणें वेदांत-दर्शनाशीं तुलना केली असतां मीमांसा, सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, जैन व बौद्ध ह्या दर्शनांवर स्वतंत्र प्रबंधपद्धतीनें लिहिलेले ग्रंथ मराठींत तुरळकच आढळून

येतात. मीमांसेंत किंजवडेकर शास्त्र्यांची "मीमांसापरिभाषा" ( १९३३ ) व पां. वा. काणे यांचा "पूर्वमीमांसापद्धतीचा इतिहास" हीं वाचनीय पुस्तकें आहेत.

अगदीं पाश्चात्य तत्त्वज्ञानाशीं मराठी वाचकांचा परिचय करण्याच्या दृष्टीनें जें थोडेंसें वाङ्मय निर्माण झालें आहे त्यांत प्रथम श्रीसयाजीसाहित्यमालेंत प्रसिद्ध झालेल्या श्री. दत्तात्रय गोविंद केतकर यांच्या "पाश्चात्य तत्त्वज्ञान" ( १९३१ ) या पुस्तकाचा निर्देश करणें आवश्यक आहे. त्यांत ऐतिहासिक पद्धतीनें प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्त्यांच्या मतांचा आढावा सुलभ रीतीनें व चांगल्या परिभाषेंत दिला असून सॉक्रेटिसाच्या तत्त्वविचारांचें विशेष विवेचन केलें आहे. याच पद्धतीनें पाश्चात्य व आधुनिक तत्त्वज्ञानावर पुस्तकें लिहिलीं जाण्याची आवश्यकता आहे. याच ठिकाणीं प्रो. गोविंद चिमणाजी भाटे यांच्या "तीन तत्त्वज्ञानी", "कँट व शंकराचार्य" ह्या पुस्तकांचा उल्लेख केला पाहिजे. तत्त्वज्ञानाच्या सामान्य इतिहासांत एखाद्या तत्त्वज्ञाच्या सिद्धांतास फारच थोडा अवकाश मिळणार म्हणून सविस्तर विवेचनाकरितां एकेका तत्त्वज्ञानावर एकेक स्वतंत्र पुस्तक पाहिजे. या दृष्टीनें श्री. गोपाळ शिवराम जोगळेकर यांनीं "नीत्शे व त्याचें तत्त्वज्ञान" (१९२९) हें पुस्तक लिहिण्याचा जो प्रयत्न केला आहे तो स्तुत्य आहे.

तत्त्वज्ञानावरील अगदीं अलीकडे प्रसिद्ध झालेला मोठा ग्रंथ म्हटला म्हणजे श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांचें "भारतीय तत्त्वज्ञान" हा होय. हा ग्रंथ श्री. केळकरांच्या अभिरुचीची व्यापकता व बुद्धीचा अष्टपैलूपणा दाखवितो. कारण त्यांच्या राजकीय व्यवसायलेखनाशिवाय त्यांचें ललितवाङ्मयावरील लेखनहि बरेंच झालें आहे, व त्यांतहि भारतीय तत्त्वज्ञानासारख्या विषयावर एक मोठा ग्रंथ लिहून त्यांनीं मराठींतील तत्त्वज्ञानविषयक वाङ्मयांत चांगलीच भर घातली आहे. ह्यांत वेद, उपनिषदें, ब्रह्मसूत्रें यांतील तत्त्वज्ञान, तसेंच गीता, शांकरभाष्य, न्याय, जैन, बुद्ध, पातंजल, पांचरात्र, पाशूपत, . इत्यादि दर्शनें टिपणीवजा सारांशरूपानें दिलीं आहेत. तात्त्विक प्रश्न पद्धतशीर रीतीनें मांडून त्यांची केवळ तार्किक छाननी करून ते प्रश्न सोडविण्यास कायकाय भूमिका उत्पन्न होतात व त्यांत कशाकशा अड-चणी येतात व म्हणून एका मताहून दुसरें मत कां व कसें ग्राह्य ठरतें अशा तऱ्हेची पद्धत ह्यांत स्वीकारलेली नसून केवळ ऐतिहासिक पद्धतीनें भिन्न मतमतांतराचा केवळ संग्रहच या ग्रंथांत केलेला दिसतो. संग्राहकतेच्या दृष्टीनें जरी या ग्रंथाची किंमत मोठी असली तरी वाचकांच्या समजुतीच्या दृष्टीनें ह्याची किंमत कमीच

करते. तरीहि मराठींत भारतीय तत्त्वज्ञानावर अजून फारशीं पुस्तकें झालीं नसल्या-मुळें भारतीय तत्त्वज्ञानाशीं परिचय करून देण्याच्या दृष्टीनें हा ग्रंथ उपयुक्त आहे यांत शंका नाहीं.

पाश्चात्य विचारसरणीप्रमाणें अंतिम तत्त्व, सत्य, साधुत्व, आणि सौंदर्य या तीन स्वरूपांत आविष्कृत होतें म्हणून तत्त्वज्ञानांत, सत्याचा विचार करणारें तर्कशास्त्र ( Logic ), साधुत्वाचें विवेचन करणारें नीतिशास्त्र ( Ethics ) व सौंदर्यस्वरूपाचा निर्णय करणारें सौंदर्यशास्त्र ( Aesthetics ) या तीन ध्येयनिर्णयी ( normative ) ज्ञानशाखांचा प्रामुख्यानें अंतर्भाव होतो. आपल्याकडे तर्कशास्त्रावर जीं पुस्तकें आहेत, त्यांत कांहीं तर्कसंग्रहाच्या आधारानें लिहिलेलीं आहेत व कांहीं इंग्रजींतील Deductive आणि Conductive Logic ह्यांवरील पुस्तकांच्या आधारानें लिहि-लेलीं आहेत. ह्यांत का. बा. मराठे यांनीं लिहिलेलें न्यायशास्त्र ( १८८२ ) व गो. रा. ओक यांनीं लिहिलेले " तर्कशास्त्र " ( १९०४ ) यांचा निर्देश केला पाहिजे. परंतु अद्यापि भारतीय तर्कशास्त्र आणि युरोपीय तर्कशास्त्र यांची तुलना करून प्रमाणभूत होईल अशा दर्जाचा ग्रंथ मराठींत झालेला नाहीं, असें म्हणावें लागतें. तर्कशास्त्रावरील वाङ्मयापेक्षां नीतिशास्त्रावरील वाङ्मयाची परिस्थिति समाधानकारक आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कालतः आणि योग्यतेच्या मानानेंहि प्रथम स्थान लाभलेला असा प्रो. वामन मल्हार जोशी यांचा " नीतिशास्त्र-प्रवेश " ( १९१९ ) हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. कारण तत्त्वज्ञानांतील ज्ञानशाखेवर स्वतंत्ररीत्या प्रबंधपद्धतीनें लिहिलेला हाच मराठींतील पहिला ग्रंथ आहे. ज्या वेळीं नीतिशास्त्र व पारिभाषिक तत्त्वज्ञान यांतील प्रश्नांचा चिकित्सक रीतीनें खल कर-तांना इंग्रजी शब्दांना मराठींत योग्य प्रतिशब्द सांपडतील कीं नाहीं, याविषयीं लोक बरेच साशंक होते, त्या वेळीं प्रो. वामन मल्हार जोशी यांनीं बसविलेली सुट-सुटीत आणि अर्थपूर्ण परिभाषा पाहून तत्त्वज्ञानाभ्यासकांना साश्चर्य समाधान वाटलें व मराठींत गहन विषयावर शाळा, कॉलेजांत नेमतां येतील इतक्या दर्जाचीं पुस्तकें लिहितां येणें शक्य आहे, अशी लोकांची खात्री झाली. एखाद्या प्रश्नावर दोन्ही बाजूंच्या साधकबाधक प्रमाणांची मर्मज्ञपणें उठावणी करण्याची प्रो. जोशी यांची हातोटी इतरत्र विरळाच आढळून येते. शिवाय, ते तात्त्विक प्रश्नांशीं आत्मसात् होऊन त्यांचा विचार करतात. अंतिम प्रश्नांवर हमखास एकेरी उत्तर देतां येणार नाहीं, अशा वृत्तीचा संशयवाद त्यांच्या ठिकाणीं क्वचित् प्रत्ययास येतो, अविचारी विधान-

बाजीपेक्षां बौद्धिक सावधगिरीचा संशयवाद सत्यप्रीतीच्या दृष्टीनें श्रेयस्करच म्हणावयाचा. परंतु जगत् आणि जीवित यांसंबंधीं कोणती तरी एक निश्चित धारणा आपल्या मनांत स्थिर केल्याशिवायहि भागत नाहीं. " नीतिशास्त्रप्रवेश " प्रथमपासून शेवटपर्यंत अभ्यसनीय आहेच, पण त्यांतल्या त्यांत, आत्मस्वातंत्र्य कार्याकार्य ठरविण्याची कसोटी, सदसद्विवेकबुद्धीचा उदय व विकास, आणि आत्म्याचें अमरत्व हीं प्रकरणें विशेष बहारीचीं उतरलीं आहेत. प्रो. बा. म. जोशी यांचें " सॉक्रेटिसाचे संवाद " हें पुस्तक जरी भाषांतर असलें तरी अन्तर्गत विचाराच्या दृष्टीनें फारच समृद्ध आणि उद्बोधक आहे. श्री. बि. स. गोगटे यांचें " नीतिशास्त्रविचार " नीतिशास्त्रावरील प्रश्नांशीं व विषयांशीं प्रथम परिचय करून देण्याच्या कामीं फार उपयुक्त होईल यांत शंका नाहीं. श्री. दाजी नागेश आपटे यांचा " नीतिशास्त्रप्रबोध " हा ग्रंथ ऐतिहासिक पद्धतीनें लिहिला आहे हा ह्यांतील विशेष आहे. प्रथम त्यांनीं हिंदूंच्या नीतिविषयक विचारांचा व ध्येयांचा कसा विकास होत गेला, हें ऐतिहासिक रीतीनें दाखविलें आहे. नंतर त्यांनीं पाश्चात्य नीतिशास्त्राचा इतिहास दिला आहे. व शेवटीं तिसऱ्या विभागांत प्राच्य व पाश्चात्य नीतिसिद्धांतांची तुलना केली आहे. प्रो. जोशी यांच्या प्रश्नप्रधान " प्रवेशा "ला श्री. आपटे यांच्या ऐतिहासिक आणि तुलनात्मक " प्रबोधा "ची योग्य जोड मिळाल्यामुळें मराठींतील नीतिशास्त्रविषयक वाङ्मय चांगलेंच संपन्न झालें आहे.

सौंदर्यशास्त्रावर मात्र मराठींत चांगल्या पुस्तकांची फार मोठी उणीव आहे. या विषयावर मराठींत कांहींच वाङ्मय उपलब्ध नाहीं, असेंच म्हणावें लागतें. भारतीय सौंदर्यशास्त्राची विचारसामुग्री नाट्यशास्त्र, काव्य, शिल्पशास्त्र, प्रतिमाविद्या, चित्रविद्या इत्यादिकांवरील संस्कृत ग्रंथांत सांपडण्यासारखी आहे. परंतु ती सर्व एकत्र करून भारतीयांचे सौंदर्यविषयक सिद्धांत व ध्येयें काय आहेत याची मुद्देसूद मांडणी करावयास पाहिजे व नंतर त्या सिद्धांतांचीहि पाश्चात्यांच्या सौंदर्यसिद्धांतांशीं तुलना करावयास पाहिजे. अशा तऱ्हेच्या एखाद्या सौंदर्यशास्त्रावरील

ची फार आवश्यकता आहे. आनंदकर्ते वासुदेव गोविंद आपटे यांचें या

लक्ष गेलें होतें, असें त्यांनीं लिहिलेल्या " सौंदर्य आणि कला " ह्या

— दिसन येतें.

तर्कशास्त्र, नीतिशास्त्र व सौंदर्यशास्त्र ह्या तीन ज्ञानशाखांप्रमाणें धर्माचें तत्त्वज्ञान, मानसशास्त्र व राजनैतिक तत्त्वज्ञान ह्या ज्ञानशाखांचाहि तत्त्वज्ञानाच्या व्यापक क्षेत्रामध्येंच समावेश करण्याची पद्धत रूढ आहे.

धर्माच्या तत्त्वज्ञानासंबंधीं विशेष उल्लेखनीय असें वाङ्मय मराठींत नाहीं, असेंच म्हणणें भाग आहे. मात्र, शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं मॅक्सम्यूल्लरच्या "Natural Religion" ह्या ग्रंथाच्या आधारानें "धर्ममीमांसा" हें पुस्तक लिहून या विषयाचा मराठींत प्रस्ताव केला आहे, हें नाकबूल करतां यावयाचें नाहीं- परंतु श्री. दप्तरी यांचें "धर्मरहस्य" (१९२६) ह्यासंबंधांत विशेष नांव घेण्या-सारखें झालें आहे. ह्या पुस्तकानें धर्मासंबंधींच्या तात्त्विक प्रश्नांकडे योग्य लक्ष वेधलें आहे, म्हणून श्री. दप्तरी यांचा प्रयत्न विशेष स्तुत्य व अभिनंदनीय आहे.

पाश्चात्य तत्त्वज्ञानवाङ्मयांत मानसशास्त्रविषयक ग्रंथांस अलीकडे विशेष महत्त्व प्राप्त होऊं लागलें आहे. मानसशास्त्राच्या अन्तर्निरीक्षणाच्या युगानंतर प्रत्यक्ष-निष्ठ व प्रायोगिक पद्धतीचें युग सुरू झालें व त्यामुळें प्रत्यक्षनिष्ठ (positive) शास्त्रांत मानसशास्त्राचा अन्तर्भाव होऊं लागला, हें जरी खरें असलें तरी मानस-शास्त्रांत असे कांहीं प्रश्न आहेत कीं, ज्यांमुळें मानसशास्त्राला सर्वस्वीं तत्त्वज्ञानाच्या व्यापक क्षेत्राच्या बाहेर केव्हांहि जातां येणार नाहीं. मराठींत तत्त्वज्ञानांतर्गत इतर ज्ञानशाखांपेक्षां मानसशास्त्रांतच योग्य ग्रंथांची उणीव विशेष तीव्रतेनें भासते. ना. ल. फडके यांचीं "मानसशास्त्राचीं तत्त्वें" (१९१२) व "मानसशास्त्राचें विवरण" (१९१७) हीं पुस्तकें स्पेन्सरच्या "Principles of Psychology" सारख्या ग्रंथांचीं भाषांतरवजा रूपांतरें असून तीं मानसशास्त्रावरील मराठींतील अगदीं पहिलींच पुस्तकें असावींत असें दिसतें. बोजड भाषा आणि क्लिष्ट व अपरिचित विचारसरणी ह्या दोन्ही कारणांनीं तीं आजच्या वाचकांस जवळ जवळ दुर्बोधच झालीं आहेत. डॉ. गोपाळ भास्कर गणपुले यांच्या प्रो. ना. सि. फडके यांच्या साहाय्यानें लिहिलेल्या "मानसोपचारशास्त्र व पद्धति" या ग्रंथास खुद्द मानसशास्त्रावरील ग्रंथ असें म्हणतां येणार नाहीं; तो फक्त मानसशास्त्राच्या एका व्यवहारोपयोगी उपांगावरील ग्रंथ आहे. तरीहि त्यांत विषयप्रवेशाकरितां व प्रासंगिक रीतीनें, मनाचें स्वरूप व कार्य, अन्तर्मन व बहिर्मन (Subjective and Objective mind) यांतील भेद व त्यांचे गुणधर्म व त्यांचीं लक्षणें, सूचनांचें स्वरूप व कार्यकारित्व, स्वयंसूचना व परसूचना यांचीं लक्षणें इत्यादि मानसशास्त्रीय विषयांवर

उपयुक्त विवेचन आलेलें आहे. अर्थात् येथें हेंहि नमूद केलें पाहिजे कीं, अन्तर्मन व बहिर्मन अशीं दोन तऱ्हेचीं मनें मनुष्याला असतात, हें जें मानसोपचारांतील मूलभूत तत्त्व, तें उपयुक्त असलें तरी तें शास्त्रशुद्ध रीतीनें प्रस्थापित झालेलें नाहीं, म्हणून तें मानसशास्त्रज्ञांनीं अजून स्वीकारलेलें नाहीं.

प्रस्तुत लेखकानें "मानसशास्त्र" या सदराखालीं ज्ञानकोशाच्या १८ व्या विभागांत जो लेख लिहिला आहे, तो मानसशास्त्रावरील आधुनिक शास्त्रीय पद्धतीनें लिहिलेला पहिलाच प्रबंध आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांत मानसशास्त्राचें स्वरूप व तत्प्रतिपाद्य विषय, भारतीय मानसशास्त्राचें ऐतिहासिक समालोचन, भारतीय मानसशास्त्र व पाश्चात्य मानसशास्त्र यांच्या दृष्टिकोनांतील फरक, मानसशास्त्राच्या पद्धती, संवेदना, प्रज्ञा, संज्ञा, स्मरण, विस्मरण, अवधान, प्रवृत्ति व भावना, बुद्धिमापन (Measurement of Intelligence), औद्योगिक मानसशास्त्र, फ्रॉइडची स्वप्नमीमांसा इत्यादि विषयांचें थोडक्यांत परंतु स्पष्ट व पद्धतशीर विवेचन आलें आहे; त्यामुळें मानसशास्त्राशीं प्रथम परिचय करून घेण्यास तें फार उपयुक्त आहे.

शिक्षणविषयक मानसशास्त्राच्या क्षेत्रांतील श्री. नेने यांचें "शिक्षणकला व मानसशास्त्र", कु. मैनाबाई शाहाणे यांचें "बालशिक्षण व मानसशास्त्र" हीं पुस्तकें विशेष उल्लेखनीय आहेत.

राजनैतिक तत्त्वज्ञानासंबंधीं मराठींत नांव घेण्यासारखें वाङ्मय नसावें ही मोठी खेदाची गोष्ट आहे. ही उणीव विशेष भासण्याचें कारण म्हटलें म्हणजे महाराष्ट्रियांचा राजकारणाकडील नैसर्गिक कल आणि राजकारणपटुत्वाबद्दलचा त्यांचा मोठा लौकिक आहे, हेंच होय. दासबोधांत रामदासांच्या राजनैतिक तत्त्वज्ञानासंबंधीं जीं विधानें विखुरलेलीं आहेत तीं महाराष्ट्राच्या राजनीतीला आधारभूत आहेत, असें म्हणतां येईल. लोकमान्यांनीं सतत ४० वर्षें खंदें राजकारण केलें, परंतु त्यांनीं राजकारणाच्या मूलभूत तत्त्वांवर शास्त्रीय स्वरूपाचा ग्रंथ लिहिला नाहीं व विशेष म्हणजे लिहविलाहि नाहीं, याचें पुष्कळ विचारी लोकांना सखेदाश्चर्य वाटतें. "शठं प्रति शाठ्यम्" ह्या अत्यंत सामान्य व स्थूल सूत्रापलीकडे लो. टिळकांच्या राजनैतिक तत्त्वज्ञानाची शास्त्रीय भूमिका तत्संबंधीं ग्रंथाच्या अभावीं आपणांस सर्वस्वीं अज्ञात आहे असें दुःखानें म्हणावें लागतें. लो. टिळकांच्या राजनैतिक युगानंतर महात्मा गांधींचें राजनैतिक युग सुरू झालें. महात्मा गांधींचें राजकीय तत्त्वज्ञान 'सत्याचे प्रयोग' ह्या आत्मचरित्रांत उपलब्ध आहे. गांधींचें राजकीय तत्त्वज्ञान सत्याच्या आधारावर उभारलेलें

आहे. त्यांच्या राजकारणाला सत्यधर्माचा जबरदस्त दंडय आहे. त्यांच्या मताप्रमाणें अहिंसा हीच खरी राजकीय वृत्ति. द्वेषास येथें वाव नाहीं. परकीय प्रतिपक्षावरहि प्रेम केलें पाहिजे; तरीहि स्वकीयांच्या हक्कांबद्दल योग्य आग्रह धरून त्याकरितां झगडणें व प्रसंगीं सर्वस्वाचें बलिदान करण्यास तयार होणें हीच राजकीय कर्तव्यबुद्धीची पराकाष्ठा समजली पाहिजे. राजकारण हें सत्याकरितां आहे. सत्य हें ध्येय व राजकारण त्याचें केवळ साधन आहे. राजकारण हें ध्येय नाहीं, म्हणून राजकारणांत सत्याचा अव्हेर करतां येत नाहीं.

गांधींच्या तत्त्वज्ञानांत सत्य आणि अहिंसा ह्या तत्त्वांप्रमाणेंच स्वावलंबनावरहि विशेष भर दिलेला आहे. स्वावलंबन हें सत्याचेंच एक आवश्यक आणि अनिवार्य आविष्करण आहे. वैयक्तिक स्वावलंबन व राष्ट्रीय स्वयंनिर्णय हीं एकाच व्यापक तत्त्वाचीं, स्वयंपूर्णतेच्या नियमाचीं दोन, व्यष्टिसमष्टिरूप अंगें आहेत. म. गांधींच्या विरोधाचें रहस्य स्वावलंबनाच्या तत्त्वांतच अंतिमतः सांपडण्यासारखें आहे. आधुनिक पाश्चात्य संस्कृतीचा यंत्र हा आत्मा आहे व एकनिष्ठ व अविरत यंत्रदेवाची पूजा हा एक पाश्चात्य जगांत सार्वत्रिक प्रकार आहे. परंतु बेकारीसारखे भयंकर स्वरूपाचे सामाजिक व राष्ट्रीय अनर्थ यंत्रपूजेपासूनच उद्भवत असल्यामुळें यंत्रनिषेधाचा उपाय गांधींनीं सुचविला आहे. परंतु या यंत्रनिषेधमोहिमेंत यंत्र शब्दाची व्याख्या व व्याप्ति अगदीं बिनचूक व कांटेकोर रीतीनें निश्चित केली नसल्यामुळें त्यांत पुष्कळ संदिग्धपणा व गैरसमजुतीस जागा राहिली आहे.

मराठींतील राजनैतिक वाङ्मयांत श्री. शंकर दत्तात्रय जावडेकर यांच्या "राजनीतिशास्त्र परिचय" ( १९२६ ) ह्या ग्रंथाचा विशेष उल्लेख केला पाहिजे. ह्या ग्रंथाचे प्राथमिक व ऐतिहासिक वर्णनात्मक व औपपत्तिक असे तीन भाग आहेत. राजनैतिक तत्त्वज्ञानांतील कांहीं सामान्य प्रश्नांशीं परिचय करून घ्यावयाच्या दृष्टीनें तिसऱ्या भागांतील राज्ययंत्राची आवश्यकता, राज्ययंत्राचें कार्यक्षेत्र, संरक्षण, सक्ति, स्वतंत्रता, लोकसत्तेचें स्वरूप, राज्यशासन व धर्मनिर्णय इत्यादि विषयांचें विवेचन फारच उपयुक्त आहे. ह्याशिवाय अलीकडे समाजसत्तावाद, कार्ल मार्क्स ह्याची शिकवण अशा तऱ्हेच्या ग्रंथांचाहि मराठींत उदय होत आहे. राजनैतिक तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांतील "इतिहासाचें तत्त्वज्ञान ( Philosophy of history ) ह्या अत्यंत महत्त्वाच्या विषयावर स्वतंत्र नसला तरी परिचयरूप प्रबंधहि अद्यापि मराठींत उपलब्ध नाहीं. ह्याकडे एखाद्या तज्ज्ञाचें लक्ष वेधण्याची जरूरी आहे.

आधुनिक तत्त्वज्ञानवाङ्मयाचें समावलोकन समाप्त करण्यापूर्वी पुढील वाङ्मयाचें दिशादिग्दर्शन करणें जरूर आहे. भाषांतरें, रूपांतरें, टीका व उपटीका यांचें युग संपलें आहे असें ओळखून निरनिराळ्या प्रश्नांवर स्वतःचे विचार प्रगट करणारे स्वतंत्र प्रबंधरूप तात्त्विक ग्रंथ मराठींत निर्माण करण्याकडे व्यासंगी लोकांनीं लक्ष पुरविलें पाहिजे. तत्त्वदृष्टि ही सम्यक्दृष्टि, समष्टिदृष्टि आहे. जग आणि जीवित यांच्याकडे पाहण्याची दृष्टि हेंच तत्त्वज्ञानाचें उगमस्थान आहे. ही दृष्टि सर्वस्वीं वैयक्तिक म्हणजे प्रत्येकामध्यें विशेष स्वरूपाची असते. हिला योग्य तार्किक स्वरूपांत व्यक्त केलें म्हणजे तेंच एक तत्त्वज्ञान म्हणजे एक दर्शन अथवा पद्धति होते. ह्या दृष्टीनें स्वतंत्र तत्त्वप्रबंधाची मराठींत निर्मिति होणें अवश्य आहे. स्वतंत्र दार्शनिक ग्रंथ निर्माण होण्यास ठराविक वैयक्तिक पूर्वपरंपरेंतून बाहेर पडून पदार्थविज्ञान, ज्योतिष, जीवशास्त्र इत्यादि शास्त्रांतर्गत विश्वाची रचना व स्वरूप, मनुष्य व त्याचें विश्वांतील स्थान इत्यादि विषयांची माहिती मिळविली पाहिजे. केवळ सांप्रदायिक विचारविच्छेदनाचें युग आतां संपलें आहे. तत्त्वज्ञान-क्षेत्रांत पूर्वीप्रमाणें आतां भाषाविदांचें आणि मीमांसकांचें प्राबल्य राहिलेलें नाहीं. प्रात्यक्षिक शास्त्रज्ञानास तत्त्वज्ञानांत वाढतें महत्त्व प्राप्त होऊं लागलें आहे. हें व्हाइटहेड, रसेल, ड्रीश यांच्या ग्रंथांवरून सहज ध्यानांत येईल. म्हणून, तत्त्वज्ञानावर लिहूं लागतांच वेदांत किंवा इतर पुराणदर्शनांच्या चाकोऱ्यांतून विचार करण्याचा मोह सोडून, विश्वस्वरूप व मानवी जीविताचें स्थान व ध्येय इत्यादि विषयां-संबंधीं लेखकाचीं स्वतःचीं मतें काय आहेत, व तीं तशीं बनण्यास त्याला कोणत्या विचारपद्धतींनीं जावें लागलें याचें स्पष्ट विवेचन करणारें स्वतंत्र तत्त्वप्रबंध मराठींत निर्माण झाले पाहिजेत. ह्या दिशेनें पुढें प्रयत्न झाल्यास मराठींत नमुनेदार तात्त्विक वाङ्मय तयार होईल अशी आशा करण्यास हरकत नाहीं.

१३

# अर्थशास्त्र—वाङ्मय व विचार

[ लेखकः—प्रो. राजाराम विनायक ओतुरकर, एम्.ए. ]

'ही विद्या शिकणारास अवघड दिसती पण सोपी आहे'—देशव्यवहारव्यवस्था.

## मिल-फॉसेटचा काल

"सुमारें ४० वर्षांपूर्वी एका विद्वान् गृहस्थानें या शास्त्रावर एक लहानसें पुस्तक लिहिलें होतें त्या वेळेस त्यानें त्या शास्त्रास 'लक्ष्मीशास्त्र' असें नांव दिल्याचें माझ्या ऐकिवांत आहे. कै. चिपळूणकर यांचें पुस्तक प्रसिद्ध झाल्यापासून 'अर्थशास्त्र' हेंच नांव रूढ झालें आहे व तें मला संमत आहे.." असें श्री. गणेश जनार्दन आगाशे यांनीं मिसेस् फॉसेटच्या १८७० सालीं प्रसिद्ध झालेल्या पुस्तकाचें भाषांतर 'अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें' या नांवानें १८९१ सालीं प्रसिद्ध करतांना पृ. १ च्या तळटीपेंत म्हटलें आहे. त्याच टीपेंत Wealth शब्दाला कै. चिपळूणकर यांनीं धन व संपत्ति हे दोन्ही पर्याय उपयोगांत असून 'माझ्या अल्प मतीला संपत्ति हा शब्द विशेष व्यापक वाटल्यावरून हा शब्द कायम केला आहे' असें म्हटलें आहे.

कै. चिपळूणकर म्हणजे कृष्णशास्त्री चिपळूणकर व त्यांचें पुस्तक १८५५ सालीं प्रसिद्ध झालेलें 'अर्थशास्त्रपरिभाषा' हें होय. ज्या

अर्थशास्त्रास लक्ष्मीशास्त्र म्हटलें आहे तें कोणतें त्याचा उल्लेख सांपडत नाहीं. अर्थशास्त्रीय विषयावर लिहिलें गेलेलें व मला सापडूं शकलेलें पहिल्यांतलें पहिलें पुस्तक १८४६ सालीं प्रसिद्ध झालेलें 'शेती व घरगुती व्यवस्था' हें होय. हें अलेक्झांडर गिब्सन यांनीं केलें असून परशुरामपंत गोडबोले यांनीं तें छापलें. याची पृष्ठसंख्या ५४ आहे. ग्रंथांत अर्थशास्त्राची विशेष चर्चा नाहीं. शेती कशी सुधारावी याचें फक्त विवेचन आहे. *यानंतरचा ग्रंथ इ. स. १८५३ मध्यें प्रसिद्ध झालेला 'मनी

*१९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत मराठी भाषेंत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांपैकीं कमी अधिक २०१२२ पुस्तकांचा मला शोध लागला. यांतील कित्येक शिळा प्रेसवर छापलेलीं व आतां बहुंशीं दुर्मिळ असांपैकीं आहेत. म्हणून त्या पुस्तकांचीं नांवें येथें नमूद करून ठेवल्यास या वाङ्मयाचा पुढें अधिक अभ्यास करणारास उपयोग होईल असें वाटल्यावरून तीं खालीं देत आहें:—

| प्रसिद्धिकाल. | विषयाचें नांव. | लेखक. |
|---|---|---|
| १८४६ | शेती व घरगुती व्यवस्था. | श्री. परशुरामपंत गोडबोले. |
| १८५३ | मनी माटरस. | श्री. ना. बा. पटवर्धन. |
| १८५४ | देशव्यवहारव्यवस्था. | श्री. हरि केशवजी. |
| १८५५ | अर्थशास्त्रपरिभाषा. | श्री. कृष्णशास्त्री चिपळूणकर. |
| १८७१ | व्यवहारदर्पण. | श्री. शंकरशास्त्री गोखले. |
| १८७३ | व्यापारासंबंधीं न्या. मू. रानडे यांचीं व्याख्यानें. | |
| १८७६ | हिंदुस्थानास दारिद्र्य येण्याचीं कारणें. | |
| १८८८ | दुष्काळादर्श. | श्री. राघो गणेश तानपाठक. |
| १८८८ | अर्थशास्त्रतत्वादर्श. | श्री. गुंडो नारायण मुजुमदार. |
| १८८९ | हिंदुस्थान देशांतील कारागिरीचें वर्णन. | श्री. बा. आ. गुप्ते |
| १८९० | विचारसाधन. | श्री. तुकाराम. |
| १८९१ | अर्थशास्त्र ( फॉसेटचें भाषांतर ). | श्री. आ. ना. फणसळकर. |
| १८९१ | अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें ( फॉसेटचें भाषांतर ). | श्री. ग. ज. आगाशे. |
| १८९२ | मुंबईचा व्यापार. | श्री. भीमराव सीतारामशास्त्री. |
| १८९३ | हिंदुस्थानांतील सांपत्तिक द्रव्यें- ( वॉटचें भाषांतर. ) | श्री. मल्हार रामचंद्र मुळे. |
| १८९६ | खोती प्रश्नासंबंधीं विचार. | श्री. मो. स. चितळे. |
| १८९६ | बंगाल्यांतील जमिनदारीची वहिवाट. | श्री. वि. मो. महाजनी. |

माटरस' (Money Matters) ऊर्फ संपत्ति-विवेचन हा होय. हें पुस्तक श्री. नारायण बाळकृष्ण पटवर्धन यांनीं केलें व 'दक्षिणी भाषेंत पुस्तकें प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीच्या आज्ञेवरून ज्ञानदर्पण छापखान्यांत छापलें' (पृष्ठसंख्या ११९). प्रस्तावनेंत ग्रंथकार लिहितातः—'मूळ इंग्रजी ग्रंथांत प्रतिपादित जो विषय त्याची भाषा पाहिली असतां केवळ ८ वर्षांच्या मुलासहि समजायाजोगी आहे, परंतु मराठी भाषा अगदींच कोती...तेव्हां हा ग्रंथ मूळ इंग्रजी ग्रंथाप्रमाणें उतरला नसेल हें काय सांगायचें आहे?' पुस्तकांत शास्त्रीय विषय शिकवावे कसे याचें जें विवेचन आहे त्यांत 'ज्ञातावरून अज्ञाताचा परिचय' करून देण्याचें शैक्षणिक तत्त्व उदाहरण देऊन पटविलें आहे व तें शिक्षणशास्त्रज्ञांनीं एकवार पाहाण्यालायक आहे. पृ. २३ वर संपत्तीचें विवेचन करतांना म्हटलें आहे कीं, 'हा विषय ज्यांना नवा आहे त्यांनीं हे खालीं लिहिलेले प्रश्न स्वतःसच करावे म्हणजे त्यापासून फायदा होईल. निरोगी शरीरप्रकृति ही कां मूल्यवान् नाहीं? कां कीं, जरी तिजविषयीं सर्वांस इच्छा आहे व ती सर्वांस मिळतहि नाहीं तरी ती अदेय आहे, म्हणजे ती एकापासून घेऊन दुसऱ्यास देतां येत नाहीं म्हणून ती मूल्यवान् नाहीं.' पृ. २५ वर 'नोट ही पैसा देण्याविषयीं खात्री-चिठ्ठी होय,' असें म्हटलें आहे. यावरून नोटेचें चलनांत परिवर्तन होण्यावर तिचें मूल्य अवलंबून आहे, असा ग्रह भाषांतरकाराच्या मनांत दृढमूल असावा असें वाटतें. ग्रंथांत 'पुरावा' हा शब्द 'पुरवठा' या अर्थीं वापरला आहे व ट्रेड युनियनिझम किंवा संप हे शब्द न वापरतां 'कटवाल्यांचें' व त्यांच्या 'बखेड्या'चें वर्णन केलें आहे. एकंदरींत ही बखेड्याची वृत्ति त्याला संमत नाहीं. मिलच्या मतानें ट्रेड युनियनिझमनें मजुरांच्या मजुरीवर संपत्ति-विभागणीच्या वेळीं फायदा झाला तरी संपत्युपादनास त्याचा उपयोग असल्याचें त्यास मान्य नव्हतेंच.

---

[ मागील पानावरून चालू ]

| | | |
|---|---|---|
| १८९७ | सांपत्तिक कथावलि. | श्री. शं. वि. पुराणिक. |
| १८९७ | अर्थशास्त्र. | श्री. वि. ल. कवठेकर. |
| १८९७ | हिंदुस्थानचें व्यापारी भूवर्णन. | श्री. धनुर्धारी. |
| १८९९ | हिंदुस्थानच्या सद्यःस्थितीचें चित्र. | श्री. अं. दा. काळे. |

खेरीज 'शिल्पकलाविज्ञान' नांवाचें मासिक श्री. माधवराव नामजोशी यांनीं चालविलें होतें. त्यांत 'हिंदुस्थानचीं सांपत्तिक द्रव्यें' या पुस्तकाचा कांहीं भाग प्रसिद्ध झाला होता. 'सुविचार समागम' मासिकांतहि अर्थशास्त्रीय लेख येत.

## अर्थशास्त्र–परिभाषा

श्री. पटवर्धन यांचें फक्त ' मनी मॅटरस ' कडे तेवढें विशेष कां लक्ष जावें तें कळत नाहीं. त्यांच्या ग्रंथाचा तदुत्तर वाङ्मयांत फारसा उल्लेख नाहीं. परंतु ज्या ग्रंथांचा विशेष उल्लेख पुढील ग्रंथांतून वारंवार झाला आहे तो म्हणजे थोरल्या शास्त्रीबुवांचा ' अर्थशास्त्रपरिभाषा ' हा ग्रंथ होय. वर सांगितलेल्या श्री. आगाशे यांच्या पुस्तकाखेरीज श्री. कवठेकर यांच्या अर्थशास्त्रपुस्तकाच्या उपोद्घातांतहि याचा उल्लेख आहे. शास्त्रीबोवा हे स्वतः ' पूना कॉलेज ' चे प्रोफेसर व श्रुतकीर्ति असे विद्वान् गृहस्थ होते. त्यांचें हें पुस्तक एकंदर २९५ पृष्ठांचें असून प्रारंभ-पृष्ठावर मिलसाहेबाच्या ग्रंथांच्या आधारें (Vol. I ' Lithographed for the Board of Education at the Press of Poona College ' इ. स. १८५५ ) असें म्हटलें आहे. प्रस्तावनेंत शास्त्रीबोवा लिहितात, ' हा संपूर्ण ग्रंथ नव्हे तर ग्रंथकर्त्यांनें अर्थशास्त्राविषयीं जो ग्रंथ करण्याचें योजिलें आहे, त्यांतील हें एकच प्रकरण आहे. बाकीचीं प्रकरणें लवकरच प्रसिद्ध करावीं अशी इच्छा आहे.' तरी पण हा ग्रंथ संपूर्ण झाला नाहीं. किंबहुना पुढील एखादा भागहि बाहेर आल्याचें दिसत नाहीं. ग्रंथ निव्वळ भाषांतर नाहीं. पृ. ६ वर शास्त्रीबुवा लिहितात, ' प्राचीन काळच्या बहुतेक ग्रंथकारांचे असे लेख आहेत कीं, संपत्ति ही जगांत मोठ्या अनर्थास कारण आहे. परंतु वास्तविक पाहतां असे अनर्थ होतात म्हणून धन उत्पन्न करूं नये असा उपदेश करणें हें अजीर्ण होऊन पुष्कळ लोक मेलेत व पुष्कळ लोक घरास आग लागून त्यांत जळाले म्हणून शहाण्यानें जेऊं नये व घरांत राहूं नये असा उपदेश करण्यासारखें होय.' पुस्तकांतील विवेचन शास्त्रीय रेखीव शब्दांत केलेलें नाहीं. प्रजावृद्धीच्या प्रश्नाचें विवेचन करतांना माल्थसच्या नांवाचा उल्लेख नाहीं. राष्ट्रांतील संपत्ति व राष्ट्रांतील लोकसंख्या यांच्या भागाकारावर लोकांचें उत्पन्न अवलंबून आहे, अशी कल्पना लेखकानें करून घेतलेली दिसते. कारण पृ. २९२ वर तो लिहितो, ' श्रमाचें उत्पादकत्व कमी होऊं नये असें जर कोणत्याहि देशांतल्या लोकांच्या मनांत आहे तर त्यास प्रजातिवृद्धीचा प्रतिबंध होण्याचे योग्य उपाय योजण्याची आवश्यकता आहे. ' क्वचित् deductive (निगमन) विचारपद्धतीचा पगडा मनावर असलेलीं वाक्यें दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, ' धनोत्पादक कारणांचा संयोग धनोत्पत्तीस कारणीभूत आहे. ' याच्या उलट संपत्तिरूप वस्तूचा खप अमर्याद वाढवितां येईल, ही प्रगमनशील कल्पना पुढील

कल्यांत व्यक्त होते. ' संपत्ति उत्पन्न होण्यास जो प्रतिबंध होतो तो स्थलाच्या कमताईमुळें कदापि होत नाहीं, तर उत्पादकांच्या किंवा उत्पादक साधनांच्या कमताईमुळे होतो. ' तर मग उत्पादकांची संख्या मर्यादित केल्यानें संपत्तीच्या उत्पादनास प्रतिबंध होईल कीं नाहीं, हा प्रश्न लोकसंख्येच्या प्रश्नाबद्दल विचार करतांना लेखकाच्या लक्षांत आलेला दिसत नाहीं.

## अर्थशास्त्रावरील पहिलें स्वतंत्र पुस्तक

शास्त्रीबुवांच्या ग्रंथाचा त्या वेळीं व नंतरहि बोलबाला बराच झाला. पण त्या ग्रंथाचा शास्त्रीबुवांच्या ग्रंथाइतका बोलबाला झाला नाहीं, पण जो विशेष स्तुतीस पात्र आहे तो ग्रंथ ' देशव्यवहारव्यवस्था ' हा होय. वास्तविक हा ग्रंथ मराठी वाचकांनीं विस्मृतिसंग्रहांत टाकण्याजोगा नाहीं. ग्रंथ इ. स. १८५४ मध्यें हरि केशवजी यांनीं लिहिला. हा मिलच्या तत्त्वावर उभारलेला संवाद आहे. ' गोपाळ नामेंकरून कोणीएक स्वदेशहिताची इच्छा धरून गुरूस नम्रतेनें पुसतो,' अशी ग्रंथाची सुरुवात असून हा ' गुरु-गोपाळांचा ' उद्‌बोधक संवाद २८० पृष्ठें चालू आहे व त्यांत अर्थशास्त्राचे अनेक विषय आले आहेत. अर्थातच Political Economy चें ' Political ' स्वरूप लेखकास विशेष भासमान होत होतें, असें एकंदर ग्रंथावरून दिसून येतें. " संपत्तिविषयक जें शास्त्र त्यास 'देशव्यवहारव्यवस्था' असें म्हणतात. " ही या शास्त्राची व्याख्या. ऐश्वर्याचे प्रधान पांच-- १ सुदेश, २ ज्ञान, ३ व्यवस्था, ४ सत्य, ५ व्यापार. दारिद्र्याचे प्रधान पांच-- १ कुदेश, २ अज्ञान, ३ अव्यवस्था, ४ असत्य, ५ अव्यापार. अशा रीतीनें 'अ'काराच्या साहाय्यानें दारिद्र्याचे पांच प्रधान उभे केलेले पाहून गंमत वाटते. उपोद्‌घातांत लिहिलें आहे कीं, ' देशव्यवहारव्यवस्था अगदींच माहीत नसली तर धोरण न राहतां हानि होईल. देशव्यवहारव्यवस्थेचीं मूलतत्त्वें माहीत असलीं तर लाभ होतील. ही विद्या शिकणारास अवघड दिसती पण सोपी आहे. ' पृष्ठ ६ वर गुरुगोपाळांचा मनोरंजक संवाद पुढीलप्रमाणें आहे:--

गुरुः--एका दिवशीं पोषाखाच्या गोष्टी चालल्या होत्या तेव्हां या शास्त्राविषयींचें अज्ञान बरेंच बाहेर पडलें. एक स्त्री बोलूं लागली, चोळ्याचे अहमदाबादी खण, साड्या, किनखाप हे फार महाग झाले, त्याजवर कांहीं जकात वाढविली असेल. तो माल छपवून कां उतरत नाहींत. जकातदारास फसविलें तर फार चांगलें. '

ऐकून दुसरी जी बसली होती ती म्हणाली—हें काय बोलतां? चोरून माल उतरविणें हें बरें काम काय? परमुलखी कोणता जिन्नस असो इकडे येऊं देऊंच नये आणि तो जरी फार चांगला असला तरी वापरूं नये. त्यावाटचा गोरगरीबांस खर्च करावा. आपल्या देशींचे लोक भुकेनें मरतात, हें डोळ्यानें पहावें आणि परक्या देशींचा व्यापार वाढवावा हें बरें नव्हे.

गोपाळः—हें असें जें ती दुसरी स्त्री बोलली तें खोटें कीं काय? त्या बोलण्यांत तर दया व स्वदेशाविषयीं प्रीति हेंच दिसतें. आपल्याकडे तरी विलायती कापड फार घेतात, तसें न घेतां कापडें तयार करण्याचीं यंत्रें इंग्लंड देशीं असतात तीं आपल्या देशीं आणून चालू करावी, यांत आपल्या देशाचें हित आहे.*

पृ. ११५ वर Wage Fund Theory चें प्रतिपादन ओघांत आलें आहे. 'कामकरी लोकांस कामावर ठेवणें हें पुंजीच्या आधीन असतें. जें काम करावयाचें त्याआधीन असत नाहीं. ऐर्लंडास द्रव्यमंदीपुंजीचें दरिद्र आहे. त्याचें कारण त्या देशास नीतिरूप व बुद्धिरूप शिक्षा प्राप्त झाली नाहीं. व तो देश शिक्षेवांचून राहिला आहे. आणि अज्ञान व बलात्कार यायोगें तेथील लोकांचें व त्यांच्या मालाचें रक्षण होत नाहीं. आणि पुंजीच्या संग्रहास अटकाव होऊन तिची चाल होऊं नये असें होत आहे.'

खुल्या व्यापाराच्या तत्त्वाचें पुढील वाक्यांत केलेलें प्रतिपादन वाचतांना ॲडम स्मिथच्या लेखनाची आठवण होते. 'आपल्याजवळचा देश संपत्तिमान असला तर त्यांत आपलें हित आहे... व्यापार करते देशांनीं आपले जवळील देश संपत्तिमान् होण्याची इच्छा धरावी.' पण पृ. २७८ वर पुढील गमतीदार वाक्यें नजरेस पडतात. 'अशिक्षितांस संपत्ति मिळाली म्हणजे ते उन्मत्त होतात...रोमन लोकांचें राज्य चाललें होतें तेव्हां कोणे एका स्त्रीचे अंगावर जीं भूषणें होतीं तीं तीन कोट रुपयांचीं होतीं. हा केवढा अकटोविकट खर्च. तसेंच इकडे नागपूरकर भोसले यांचा अंगरखा ६० लक्ष रुपयांचा व टिपु सुलतानाचा पलंग ३ लक्ष रुपयांचा होता व हिंगण्यास रोज तीनशें रुपयांची कस्तुरीमय खिचडी लागे.'

विस्तारभयास्तव अधिक उतारे देत नाहीं. एकंदर ग्रंथ पाहतां त्यास अर्थशास्त्रावरील मराठी भाषेंतील पहिला स्वतंत्र ग्रंथ म्हणण्यास हरकत नाहीं.

---

* पहिली कापडाची गिरणी मुंबईस १८५१ सालीं निघाली.

## अर्थशास्त्राच्या मूलतत्त्वांची ओळख

सर्वसाधारण 'अर्थशास्त्र' विषयावर लिहिलेलीं अशीं याखेरीज पुस्तकें म्हटलीं म्हणजे फॉसेटच्या ग्रंथाचीं दोन भाषांतरें होत. एक श्री. आ. ना. फणसळकर यांचें व दुसरें श्री. गणेश जनार्दन आगाशेकृत. फॉसेटचें पुस्तक बहुधा त्या काळीं कॉलेजांतून क्रमिक पुस्तक म्हणून असावें. याचें भाषांतर करण्यास दक्षिणा प्रैज कमिटीकडून रु. २०० चें बक्षिस प्रसिद्ध झालें होतें तें श्री. आगाशे यांना मिळालें. भाषांतर करण्याची परवानगी मिसेस् फॉसेट यांच्याकडून डेरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांनीं आणविली होती ! श्री. आगाशे प्रस्तावनेंत लिहितात:– 'प्रस्तुत कालीं ज्याविषयीं वाद जारीनें चालू आहे अशा कांहीं विषयांचें विवेचन ( बहुधा हा विषय चांदीचा उतरता भाव व त्यामुळें होमचार्जेसचा वाढणारा खर्च हा असला पाहिजे ) या पुस्तकांत व्हावें, अशाविषयीं दक्षिणा प्रैझ कमिटीच्या एका सभासदाची व चिटणीसांचीहि सूचना होती. परंतु वादात्मक विषयाचा यथार्थ निर्णय करण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य नाहीं, हें मी निष्प्रांजळपणें (!) कबूल करतों...' हें पुस्तक बोलूनचालून विद्यार्थी लोकांसाठीं लिहिलें आहे. अर्थशास्त्रीय परिभाषेबद्दल विशेष काळजी घेण्याचें काम या पुस्तकांत प्रथमच विशेष झालें असल्याचें दिसून येतें. या दृष्टीनें या पुस्तकास महत्त्व आहे.

अर्थशास्त्राच्या मूलतत्त्वावर पहिला स्वतंत्र ग्रंथ रा. ब. वि. ल. कवठेकर, बी. ए., यांचा होय. रा. ब. कवठेकर हे 'माजी व्हर्नाक्युलर कॉलेज' मधील प्रो. होते. त्यांचें अर्थशास्त्र हें पुस्तक बडोद्याच्या सहविचारिणी सभेच्या ग्रंथमालेंतून १३ वें पुस्तक म्हणून १८९७ सालीं प्रसिद्ध झालें आहे ( पृष्ठसंख्या १४२, किं १॥ रु. ). उपोद्घातांत म्हटलें आहे कीं, "रुपयाचा भाव उतरला, हुंडणावळींत फेरफार झाला, सुतावर जकात बसविली, 'अन्याय झाला' अशी ओरड झाली. सरकारनें कमिशनची नेमणूक केली. विलायती कापड घेण्याचें बंद करावें, असे ठराव झाले. जो तो आपला पक्ष सिद्ध करण्याची खटपट करीत आहे अशा वेळीं खरें काय तें अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें समजल्यावांचून कळणें कठीण आहे.... अर्थशास्त्राचा व्यासंग केल्यावांचून आपलें गाडें चांगलें निभेल असा संभव नाहीं." एक तत्कालीन छोटें अर्थशास्त्रीय प्रायमर म्हणून या पुस्तकास मराठी भाषेंत स्थान आहे, यांत शंका नाहीं. अर्थशास्त्राच्या नियमाचें स्वरूप सांगतांना ग्रंथकार पृ. २ वर लिहितातः हे नियम "अनुभवावरून सिद्ध झालेले आहेत असें

वर सांगितलें. हे नियम शास्त्रीय दृष्ट्या जरी खरे असले तथापि विशेष प्रसंगीं विशेष स्थितीस ते लागू करावयाचे असल्यास व्यवहारांतील दुसऱ्या अनेक गोष्टीं-कडे लक्ष पुरविलें पाहिजे. " संपत्तीचें विवेचन करितांना 'जो पदार्थ दिला असतां ऐवजीं दुसरा कांहीं पदार्थ मिळेल त्यास संपत्ति म्हणावें;' तसेंच 'पैसा ही संपत्ति नसून सर्वानुमतें ठरविलेल्या संपत्तीचें दर्शक चिन्ह आहे,' असें म्हटलें आहे. आपल्या सर्वांच्या खिशांतील पैसे एकदम दुप्पट झाले तर आपण कोणीच श्रीमंत होणार नाहीं, फक्त पदार्थांच्या किंमती चढतील, या कल्पनेनें Quantity Theory of Loney थोडक्यांत सांगितली आहे. खुला विरुद्ध प्रतिबंधक व्यापार याचें विवेचन करतांना खुल्या व्यापारांत मागासलेल्या देशांचें अनहित होतें, परंतु प्रागतिक देशास तो हितकारक होतो, असें म्हटलें आहे व ३१ जानेवारी सन १८८०रोजीं मि. वर्डस्वर्थ यांनीं टाइम्स ऑफ इंडियामध्यें इटली व हिंदुस्थान या देशाची तुलना करून इटलीप्रमाणेंच हिंदुस्थानाचें संरक्षित व्यापारपद्धतीनें हित होईल, असें जें सुचविलें होतें त्याचा बऱ्याच अंशीं अनुवाद केला आहे.

कोल्हापूरचे बाजूस असेंच एक स्वतंत्र पुस्तक यापूर्वी ९ वर्षें लिहिण्यांत आलें होतें, तें अर्थशास्त्रतत्त्वादर्श हें होय. या पुस्तकाचे लेखक गुंडो नारायण मुजुम-दार, हेडमास्तर, ट्रेनिंग स्कूल, कोल्हापूर, हे असून तें खानबहादूर कुवरजी, दिवाण ऑफ कोल्हापूर, यांस अर्पण केलें आहे. पुस्तक तयार करतांना राजाराम कॉलेजांतील अर्थशास्त्राचे प्रोफेसर हरिपंत आण्णा गोडबोले यांचीं मदत झाली. 'फॉसेट, मिल, चिपळूणकर, गणपुले (?) इत्यादींच्या पुस्तकांतून माहिती घेतली त्याबद्दल ग्रंथकार त्यांचा आभारी आहे.' (पृष्ठसंख्या १२६. प्रसिद्धि सन १८८८). ग्रंथ भाषांतर नाहीं. प्रश्न उत्पन्न करून त्यांचीं उत्तरें दिलीं आहेत. उदाहरणार्थ, परिमित म्हणजे काय, उप-योगी म्हणजे काय, विनिमयार्ह म्हणजे काय ? इत्यादि. संपत्तीची व्याख्या सांगतांना 'पैका म्हणजे संपत्ती नव्हे. जमीन, श्रम व भांडवल यांच्या संयोगानें संपत्युत्पादन होतें, असें प्रतिपादिलें आहे. खुल्या व्यापाराचा आग्रह येथें विशेष दिसून येतो. पृ. ९१ वर 'व्यापारास प्रतिबंध करणें कोणत्याहि अर्थानें योग्य ठरत नाहीं. परंतु युनायटेड स्टेटस्मध्यें व्यापारास प्रतिबंध असल्यानें मनुष्याच्या निर्वाहास या देशांत जितका खर्च येतो तितका कोणत्याहि अन्य देशांत येत नाहीं,' असें म्हटलें आहे. पुस्तकांत Public Finance वर प्रकरणें असून अर्थशास्त्राचे पाठ कसे शिकवा-वेत याबद्दल उपयुक्त सूचना आहेत.

सांपत्तिक कथावलि भाग १ ला, हें सद्विचारिणी सभेच्या ग्रंथमालेंतें १ वें पुस्तक फारच मौजेचें आहे. सदरहु पुस्तक मिस हेरिएट मार्टिनो यांच्या पुस्तकाचा तर्जुमा असून त्याचे लेखक श्री. स. वि. पुराणिक हे होत ( पृष्ठसंख्या ३२०. प्रसिद्धिकाल १८९७). पुस्तक ठाणें जगत्समाचार छापखान्यांत छापलें. पुस्तकांत ' जंगलची वस्ती व दरी व डोंगर ' अशा २ गोष्टी असून त्यांत गोष्टीच्या मिषानें अर्थशास्त्रीय तत्त्वें सांगितलीं आहेत. पहिल्या गोष्टींत मिस्टर स्टोन नांवाच्या एका मिशनऱ्यानें चामखेडें नांवाचें एक खेडें बाटविलें. तेव्हां त्यावर बहिष्कार पडला. अशा स्थितींत तेथील, मिस्टर स्टोन व ॲडॅम्स व पत्नी ॲना मेरी हे खेड्यांतील सटवाजी चक्रपा वगैरे पुढारी मंडळीसह आफ्रिकेंतील केप कॉलनींत वसाहतीस गेले असतां तेथील रानटी टोळ्यांनीं त्यांस सपशेल लुटलें. अशा वेळीं सर्वांस श्रमविभागानें पुढील उद्योग करण्याचा प्रसंग आला. सारांश, रॉबिन्सन क्रूसोच्या जगांत अर्थशास्त्राचा कसा उदय होतो, तें यांत दाखविलें आहे. पुस्तकांत पृ. ६ वरील पुढील वाक्य बोधप्रद आहे: ' युरोपियन लोकांस......रानटी आयुष्यक्रमाचीं दुःखें अनुभवावीं लागलीं तर त्यांचा बांधा खुजा होऊन ते केवळ रानटी होतील व सूड उगविण्यांतहि असेच तरबेज होतील. ' सृष्ट पदार्थांवर श्रम लाविल्यानें संपत्ति कशी उत्पन्न होते तें प्रत्यक्षच दाखविलें आहे. ही गोष्ट ९ प्रकरणें चालली असून शेवटीं श्रमानें व सहकार्यानें वसाहतवाल्यास ऊर्जितदशा कशी आली, तें दाखविलें आहे. दुसरी गोष्ट वाडिया बरजोरजी, बचुबाई फ्रामजी अशीं पारशी नांवें देऊन लिहिली आहे. यांत सहकार्यानें कारखाना कसा उदयास येतो, परंतु त्यांत पुढें भांडणें व संप झाल्यास कसें नुकसान होतें तें दर्शविलें आहे.

एकंदरींत या ५० वर्षांच्या कालांत उपयुक्त पुस्तकांचीं भाषांतरें व्हावीं म्हणून दक्षिणा प्रैझ कमिटी व दैरेक्तर यांनीं सहकार्यानें प्रयत्न केले आहेत. ट्रेनिंगस्कूलच्या प्रिन्सिपालनें अर्थशास्त्रविषय कसा शिकवावा, तें मांडलें आहे. संभाषणस्वरूपानें विषय मांडून हरि केशवजींनीं विषय आकर्षक केला आहे. गोष्टीरूपानें अर्थशास्त्र शिकविण्याचाहि यत्न झाला आहे व अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें स्वतंत्रपणें प्रायमर प्रमाणें मांडण्याचे व या शास्त्राची परिभाषा तयार करण्याचेहि यत्न नमूद आहेत. सारांश, भाषांतर, स्वतंत्र पुस्तक, परिभाषा, संभाषण पद्धति, गोष्टीरूप विवेचन व विषय शिकविण्याची पद्धत या सर्व बाजूंनीं अर्थशास्त्राच्या मूलतत्त्वाबाबत यत्न झालेला दिसून येतो.

## समकालीन आर्थिक विचारांकडे दुर्लक्ष

अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें व चलन या विषयावरील भाषांतरित व स्वतंत्र अशा ठळक ग्रंथांचा हा ओझरता परिचय वाचणारास दिसून येईल कीं, तत्कालीन अर्थशास्त्रीय विचारांवर मिलफॉसेटच्या विचारांचा पगडा असल्याचा हा काळ आहे. तत्कालीन युरोपांत मात्र अर्थशास्त्र किती तरी पुढें गेलें होतें. इ. स. १८७५ नंतर त्या लेखकांना मिल हा जुना अर्थशास्त्रज्ञ वाटे. ते प्रूढाँ रॉडबर्टस, कार्ल मार्क्स यांच्या तत्त्वांची ओळख करून घेत होते. मार्क्सचा कम्युनिस्ट मॅनिफेस्टो १८४८ सालीं प्रसिद्ध झाला असून त्याची आमच्या लेखकांस ओझरतीदेखील ओळख नव्हती. कोठून असणार? कॉलेजांत शिकणारे व शिकवणारे पडले मिलफॉसेटचे अभ्यासक. त्यांत फॉसेट यास अर्थशास्त्राच्या एखाद्या तत्त्वाचा पुरस्कर्ता म्हणून महत्त्वाचें असें स्थानहि नाहीं. सारांश, मिल हाच काय तो सर्वांचा आधारस्तंभ. तत्कालीन अर्थशास्त्रलेखकांत कै. न्या. मू. रानडे मात्र नुसत्या मिलवर विसंबून नव्हते. त्यांनीं फेडरिक लिस्टचीं तत्त्वें आत्मसात केलीं व कांहीं नवा विचार लोकांपुढें मांडला. पण त्यांचें लिखाण इंग्रजींत. त्यांनाहि कार्ल मार्क्सच्या समाजसत्तावादी तत्त्वांची ओळख नसावी, असें म्हणावें लागतें. हिस्ट्री ऑफ पोलिटिकल इकॉनमी हें इन्ग्रॅमचें पुस्तक कै. रानडे यांनीं निःसंशय पाहिलें होतें, असें त्यांच्या लेखनावरून वाटतें. पण त्यांतील मार्क्सच्या उल्लेखाचें त्यांना महत्त्व वाटल्याचें दिसत नाहीं. विलायतेंत जें एक पिढीपूर्वी शिकविलें जाई, तें शिकून मोठे झालेले प्रोफेसर हिंदुस्थानांत येत व तोच विषय ताजा म्हणून हिंदुस्थानांत शिकवीत आणि तेवढ्यानेंच आमचे लोक स्वतःस विद्वान् समजत! या योगानें युरोप व हिंदुस्थान येथील विद्वत्तेंत एक पिढीचें अंतर पडत गेलें तें अलीकडे मात्र तुटत चाललें आहे.

युरोपांत तत्कालीन चालू असलेले प्रागतिक समाजसत्तावादी विचार मराठींत व्यक्त झाल्याचें किंवा त्या विचारांचें कलम कुशलतेनें आपल्या परंपरेंत रोंवल्याचें केसरींतील लो. टिळक यांच्या 'दत्तकाची आवश्यकता' या विषयावरील लेखांतून ओझरतें दिसून येतें. ते लेख वाचले म्हणजे वाटतें कीं, टिळकांना इ. स. १८८१मध्यें समाजसत्तावादी विचाराची कल्पना असावी. पुढील वाक्यें स्पष्टच आहेत:—

'समाजाची अति उत्कर्षावस्था म्हटली म्हणजे व्यक्तिमात्रास सारखें काम व सारखें सुख असावें ही होय, व असें होण्यास सुखप्राप्तीचें साधन जें द्रव्य तें समाजांत एक तर सारखें वांटून गेलें पाहिजे किंवा एकत्र असल्यास समाजाच्या सामा-

यिक ताब्यांत असावें. एऱ्हवीं सर्वांस सारखें सुख कधींच प्राप्त होणार नाहीं. वरील विचार मनांत येऊनच कांहीं इंग्रज व फ्रेंच अर्थशास्त्रवेत्त्यांनीं समाजांत द्रव्यसंचयाची अविभक्तावस्था पसंत करून त्याप्रमाणें समाजरचनेंत फेरफार करण्याबद्दल शिफारस केली आहे. त्यांच्या मतें समाजांतील सर्व मनुष्यांनीं एका अविभक्त कुटुंबाप्रमाणें राहून आपल्या योग्यतेप्रमाणें सारखें काम करावें व त्यापासून होणारा जो द्रव्यसंचय तो सर्वांची सामुदायिक प्राप्ति समजून सर्वत्रांस सारखें सुख प्राप्त होईल अशी तजवीज ठेवावी. एकीकडे समाजांतील हजारों लोकांस सकाळपासून संध्याकाळपर्यंत काबाडकष्ट करून पोटभर भाकर देखील मिळत नाहीं व दुसरीकडे आजापणजांनीं तरवार गाजवून हजारों लोकांस यमलोक दाखविला, म्हणून कांहीं लोकांस कवडीचाहि श्रम न करतां सगळ्या आयुष्यभर चैन भोगण्यास सांपडते, हें मनांत आलें म्हणजे वरील अर्थशास्त्रज्ञ ऋषींच्या वचनास मान डोलावल्याखेरीज राहवत नाहीं.' ( टिळकांचे केसरींतील लेख, भाग ५, पृ. २३ ).

एकंदरींत युरोपांतील तत्कालीन सर्वांत ताजें तत्त्वज्ञान लोकांस शिकविण्याचें काम कॉलेजांतील प्रोफेसरांनीं न करतां लो. टिळकांसारख्या वर्तमानपत्र चालविणारांनीं तें करावें व प्रोफेसरांनीं जुनींच पुस्तकें व त्यांचे सारांश चाळीत बसावें हा प्रकार लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. आज ५० वर्षांनंतर ही स्थिति कितपत पालटली आहे तें तुलना करून ज्याचें त्यानें पाहावें.

## शास्त्र व व्यवहार यांचा संयोग

अर्थशास्त्राच्या मूलतत्त्वावर आधारलेल्या पुस्तकांचें याप्रमाणें समालोचन झाल्यावर आपण इ. स. १९०० पर्यंतच्या इतर पुस्तकांकडे वळूं. न्या. मू. रानडे यांचीं व्यापारावरील व्याख्यानें, मुंबईचा व्यापार व व्यापारी भूगोल, हीं तीन पुस्तकें हिंदी व्यापाराबाबत लक्षांत घेण्यासारखीं आहेत. पुणें येथील व्यापाऱ्यांची पूर्वी ' व्यापार कंपनीची सभा ' होती. या सभेनें व्यापाराबाबत गणेश वासुदेव जोशी यांजकडे पाहणी करून रिपोर्ट करण्याचें काम दिलें. तो रिपोर्ट त्यांनीं केल्यावर न्या. मू. रानडे यांनीं व्यापारोत्तेजक मंडळीपुढें दोन व्याख्यानें दिलीं. तीं विनायक बाळकृष्ण दामले यांनीं छापलीं ( पृष्ठसंख्या ५९, किं. ४ आणे, इ. स. १८७३ ). या व्याख्यानांत रानडे यांनीं मितव्यय करावा व शिल्लक ठेवावी, आणि ही शिल्लक देशांतील कलाकौशल्यास उत्तेजन देण्यासाठीं त्या प्रकारच्या भारी किंमतीच्या वस्तू विकत घेण्यांत खर्च करावी, असें

प्रतिपादन केलें आहे. याच व्याख्यानांत रानडे यांनीं इ. स. १८१३-१४ त हिंदुस्थानांत १० हजार रुपयांचें कापड परदेशाहून आलें, परंतु इ. स. १८७१-७२ सालीं हीच आयात ९॥ कोट रुपयांची झाली, असें म्हटलें आहे. माझ्या मतें या पुस्तकास विशेष महत्त्व असण्यापेक्षां यांत नमूद केलेलें व्यापारोत्तेजक मंडळ, त्यांनीं करविलेली चौकशी व श्री. गणेश वासुदेव जोशी यांच्याकडून मागविलेला रिपोर्ट या गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या आहेत व त्याचें संशोधन व्हावयास पाहिजे. अर्थ-शास्त्राच्या मूलतत्त्वांची ओळख करून घेण्याची ज्याप्रमाणें आमच्या मंडळींनीं आस्था दाखविली त्याप्रमाणेंच व्यापारी महाजनसभा स्थापन करून व्यापाराची सहकार्यानें व चौकशीपूर्वक उन्नति करण्याचें व रोजच्या व्यवहारास तज्ज्ञांची सल्ला घेण्या-साठीं रानडे यांच्यासारख्यांचीं व्याख्यानें करविण्याचें काम केलें, तें पाहून समाधान वाटतें व हा शास्त्र व व्यवहार यांचा संयोग पुढें तुटल्याबद्दल खेद होतो. आज कॉलेजांतील अर्थशास्त्राच्या प्रोफेसराची व बाजारांत लाखानें उलाढाल करणाऱ्या व्यापाऱ्याची मध्यें कोठेंच गांठ पडत नाहीं, ही इष्ट गोष्ट नाहीं. उपरोक्त उपक्रमाचें पुनरुज्जीवन होणें जरूर आहे.

## एक अस्सल मराठी पुस्तक

'मुंबईचा व्यापार' हें एक अस्सल मराठी पुस्तक आहे. याचा अर्थ यांतील शब्दरचना तर भाषांतरित नाहींच, पण विचारहि पाश्चात्य मूलतत्त्वांची उचल करणारे नाहींत. व्यापार करीत असतांना महाराष्ट्रीय गरजेंतून हें पुस्तक निर्माण झालें. पुस्तकाचें सबंध नांव 'मुंबईचा व्यापार आणि मल्लाप्पा बसाप्पा वारद सोलापूर यांच्या चनबसाप्पा मल्लाप्पा वारद, मांडवी खांडबजार, या नांवाच्या मुंबई येथील दुकानांतील, अडत मजुरीचे नियम' असें ओबडधोबड व लांबलचक आहे. पण नांवा-वरून पुस्तकाची कल्पना येत नाहीं. हें पुस्तक भीमराव सीताराम शाळिग्राम समशेरपूरकर, मुंबई, यांचेकडून करविलें ( पृ. सं. २६७, प्रसिद्धी सन १८९२ ). 'कोणत्याहि ठिकाणचा कोणीहि व्यापारी आमच्या मुंबई दुकानीं व्यवहार करण्याचें इच्छील तर त्यांनीं हें पुस्तक पाहिल्याबरोबर त्याचा हेतु सफल होईल यांत शंका नाहीं,' असें प्रस्तावनेंत म्हटलें आहे. देशावरून आमच्या मुंबई दुकानास येणारा माल—"धान्यें, तूप, तेल, तीळ, मिरची, गूळ, सुपारी, वेलदोडे, हळद, चंदन, रुई (कापूस). खरीद होऊन जाणारा माल—लोखंड, तांबें, पितळ, सोनें, चांदी, स्टेशनरी इ. ही माहिती देऊन शिवाय मिरच्या, मीठ, सूत वगैरे जिन्नस पाठवितांना

माल—धान्यें, तूप, तेल, नीळ, मिरची, गूळ, सुपारी, वेलदोडे, हळद, चंदन, रुई ( कापूस ). खरीद होऊन जाणारा माल--लोखंड, तांबें, पितळ, सोनें, चांदी, स्टेशनरी इ. ही माहिती देऊन शिवाय मिरच्या, मीठ, सूत वगैरे जिन्नस पाठवितांना कसे पॅक करावे, किती माल मागवावा, पत्र पाठविल्यावर वाट किती दिवस पाहावी, व्यापारी पत्रें कशीं लिहावीं, तारीख—व संदर्भ नंबर लिहावा; पत्रें ओळीनें शुद्ध लेखनाप्रमाणें लिहूं नये; दर मुद्यागणिक परिच्छेद करावे; पत्र लिहून झाल्यावर टपालाची वेळ पाहून त्याच्या आंत तें पोस्टांत टाकावें—रसिदी रजिस्टर करतांना कोणती काळजी घ्यावी वगैरे बारीक पण महत्त्वाचा तपशील, कंटाळा न करतां दिला आहे. पुस्तकांत म्हटलेंच आहे कीं, दुकानांत नित्य येणाऱ्या अनुभवांचें टांचण करून हें पुस्तक तयार केलें आहे. असें पुस्तक इंग्रजींतहि माझ्या पाहण्यांत नाहीं.

## व्यापारी भूगोल

सन १८९७ मध्यें धनुर्धारी यांनीं लिहिलेलें हिंदुस्थानचें व्यापारी भूवर्णन हें एक मौल्यवान् पुस्तक आहे. याची पृष्ठसंख्या ८१४ आहे. श्रीसयाजीराव गायकवाड यांच्या आज्ञेवरून सयाजी ज्ञानमंजूषा प्रसिद्ध होत असे, तिचे टी. के. गज्जर हे संपादक होते. तींत हें पुस्तक प्रसिद्ध झालें. वॅटच्या सांपत्तिक कोश व हंटरचीं गॅझेटियर्स यांचा हें पुस्तक लिहितांना फार उपयोग झाला. पुस्तकांतील आंकडे १८९४ च्या सरासरीवरून घेतले आहेत. ‘ मराठी भाषेंत लष्करी शब्दांचा भरणा विपुल आहे, तसा व्यापारी शब्दांचा नाहीं ’ असें म्हटलें आहे. व्यापारी भूवर्णनांत भिन्न भिन्न देशांतील, प्रांतांतील व शहरचे औद्योगिक धंदे व कलाकौशल्याचे जिन्नस यांची माहिती आहे.

नुसतें कोठें काय होतें एवढेंच या पुस्तकांत नाहीं. हिंदुस्थानचा ज्या ज्या परदेशांशीं व्यापार होतो त्या ‘ आमच्या परदेशांतील पेठां’ची माहिती सविस्तर दिली आहे. औद्योगिक प्रगतीस आवश्यक अशा राजकीय बात्री ज्या आयात-निर्यात जकात, राज्यव्यवस्था व जुनाट वहिवाट त्यांचें विवेचन केलें आहे. जकातीबद्दल लिहितांना पृष्ठ ११ वर लेखक तळटीपेंत लिहितातः ‘ जकात कायदा निघाला तेव्हां रंग द्रव्यांवर शें. ५ टक्के जकात बसली आणि रंगीत कापड वगैरेवर कांहींच नाहीं. याचा अर्थ यूरोपांतून रंग द्रव्यें आणवून काम करणाऱ्यांना पोट भरण्याच्या सवलती मिळूं नयेत हा होय. इंग्रज सरकारचें हें प्रजावात्सल्य ! ’ याखेरीज पुस्तकांत हवापाणी, जमीन, मजूर, कौशल्य, कोळसा, लोखंड, वाहतुक, बँका, व्यापार, सभा

व शिक्षण या बाबींचेंहि विवेचन आलें आहे. सारांश, पुस्तकाची रचना एखाद्या इंग्रजी व्यापारी भूगोलाच्या धर्तीवर केलेली दिसत असली तरी लेखकाची कळकळ व दीर्घोद्योग यायोगें त्या इंग्रजी मॉडेलला पूर्ण स्वदेशी पोषाख घालण्यांत आलेला आहे.

"व्यवहारदर्पण" हा ग्रंथ श्री. शंकरशास्त्री गोखले यांनीं केला व 'दैरेक्तर ऑफ पब्लिक इन्स्त्रक्शन दक्षिणा प्रैज कमिटीचे अध्यक्ष यांच्या आज्ञेवरून तो विष्णु परशुराम पंडित यांनीं तपासला (इ. स. १८७१).' लेखक आपला उद्देश लिहितात: 'लोकांत जो व्यवहार आजपर्यंत चालत आला आहे तो व जो कितीएक कारागीर फार गुप्त ठेवितात त्यांचा मोठ्या प्रयासानें शोध करून तो मी यथामति वर्णिला आहे.' या पुस्तकांत नाण्यांचे १२५ प्रकार त्यांच्या ठशांसह दिले आहेत. व सोनाराच्या विद्येंतील कांहीं गोष्टी—उदाहरणार्थ, महाराष्ट्र देशांत नीरस तांबें चांगलें करण्याचा प्रकार वगैरे—सांगितल्या आहेत. नाण्यांत ३२ होन, १६ फान, ७१ मोहरा, ८ परदेशी, २५६ रुपये, ६७ तांब्यांचीं नाणीं असे प्रत्येकाचे प्रकार दिले आहेत, व सोन्यारुप्याच्या नाण्यांबाबत वजन गुंजबार देऊन शुद्ध धातूचें प्रमाण 'कस'वार दिलें आहे. ऐतिहासिक ग्रंथांत उल्लेख होत असलेल्या विविध नाण्यांचा उलगडा होण्यास या पुस्तकाची मदत होईल.

" हिंदुस्थानचीं सांपत्तिक द्रव्यें " हें पुस्तक १८९३ सालीं मल्हार रामचंद्र मुळे यांनीं लिहिलें व तें आर्यभूषण व शेतकरी छापखान्यांत छापलें. तें थोडें ज्ञानप्रकाशांत व बाकीचें श्री. माधवराव बल्लाळ नामजोशी यांच्या शिल्पकला-विज्ञान मासिकांत क्रमशः प्रसिद्ध झालें. असे सहा भाग प्रसिद्ध होणार म्हणून म्हटलें आहे, पण ते झाले नाहींत. हें वॉटसाहेबांच्या 'इकॉनॉमिक प्रॉडक्ट्स ऑफ इंडिया' या पुस्तकाचें भाषांतर आहे. १८८६ सालीं लंडनच्या प्रदर्शनास पदार्थसंग्रह पाठविण्याची आवश्यकता उत्पन्न झाली तेव्हां वॉटसाहेबांकडे हें पुस्तक लिहिण्याची कामगिरी देण्यांत आली. श्री. मुळे यांच्या या पुस्तकांत चिनी गवत, मध, तंबाखू, अडुळसा, शिकेकाई, वंशलोचन, सोमल, तुरटी, वाळा इत्यादि ६० पदार्थांची, दर पदार्थास १३ पृष्ठें, अशी माहिती आहे.

## जमीनमहसुलाचे प्रश्न

या रीतीनें व्यापार व उद्योगधंदे यांसंबंधींच्या ठळक पुस्तकांचें समालोचन झालें. यांत माधवराव नामजोशी यांनीं तयार करविलेल्या 'हिंदुस्थान

देशांतील कारागिरीचें वर्णन ' या पुस्तकाचा फक्त आठवणीपुरता उल्लेख करतों. जमीनमहसुलाच्या व दुष्काळाच्या प्रश्नाबाबत, तसेंच डेक्कन ॲग्रिकल्चरल रिलीफ ॲक्टाच्या चर्चेबाबत असें म्हणतां येईल कीं, या विषयांची बरीच चर्चा वर्तमानपत्रांत-विशेषतः केसरींत वेळोवेळीं झाली. शेतकऱ्याचा कायदा (२-२-१८९२), शेतकऱ्यांच्या कमिशननें काय केलें (२०-१२-१८९२), शेतकऱ्यांच्या कमिशननें सुचविलेले उपाय (२७-१२-१८९२), दुष्काळ (१७-११-१८९६), दुष्काळ-निवारणाची तयारी (२४-११-१८९६), साऱ्याच्या तहकुबीची हकिकत (२६-१-१८९७) वगैरे लेख केसरींतील लेख भाग १ मध्यें पाहावयास सांपडतील. किंबहुना या प्रसंगानें सर्वसामान्य असें एक विधान या ठिकाणीं करणें जरूर आहे तें हें कीं, आर्थिक विषयांपैकीं चलन, व्यापार, उद्योगधंदे, राष्ट्रीय जमाखर्च, राष्ट्रीय कर्ज, जमीनमहसूल, दुष्काळ इत्यादि प्रश्नांवर लोकजागृति व लोकशिक्षणाचें खरें कार्य ग्रांथिक वाङ्मयापेक्षां वर्तमानपत्रांनीं विशेष केल्याचें आढळून येतें व त्यांत केसरीच्या कामगिरीस अग्रस्थान दिलें पाहिजे. आर्थिक वाङ्मयाचें समालोचन करतांना तें वाङ्मय महत्त्वाचें असलें तरी लक्ष्यांत घेतलेलें नाहीं. ग्रांथिक वाङ्मयाचाच तेवढा आढावा घेतला आहे. कारण वृत्तपत्रीय वाङ्मयाचें समालोचन करावयाचें तर याच्या दुप्पट पृष्ठें सहज खर्ची पडतील. एका अर्थानें केसरी-प्रबोध व टिळकांचे केसरींतील लेख (४ भाग) यांनीं हें समालोचनाचें काम एकवार झालेंहि आहे. म्हणून तिकडे दुर्लक्ष करणें बावगें होणार नाहीं.

जमीनमहसुलाच्या प्रश्नाबाबत झालेलीं २ पुस्तकें विशेष महत्त्वाचीं आहेत. एक श्री. वि. मो. महाजनी यांचें जमीनधाऱ्याची वहिवाट व दुसरें चितळे यांचें खोती प्रश्नासंबंधीं विचार. सुमारें एक पिढीपूर्वी हिंदुस्थानांतील आर्थिक तज्ज्ञांना हिंदुस्थानांत कायम जमीनधाऱ्याची पद्धत सुरू करावी, हा मुद्दा अगदीं मतभेदातीत वाटत होता व अजूनहि जुन्या मताचे कांहीं अर्थशास्त्रज्ञ यास चिकटून बसलेले आढळतातच. बंगाल्यांतील जमीनदारी या विषयावर डॉ. फील्ड व बेडनपॉवेल यांच्या ग्रंथांच्या आधारें हें पुस्तक केलें आहे. या पुस्तकावर न्या. मू. रानडे यांचा अभिप्राय पुढीलप्रमाणें आहे:—' येथील सारापद्धतीचा बंगाल्यांतील सारापद्धतीशीं काय परिणाम होतो तें ताडून पाहण्यासारखें आहे. शाळांतून याचा उपयोग करण्यांत यावा, अशा योग्यतेचा हा ग्रंथ आहे. Permanent Settlement याला 'कायम दर ठरोती ' असा शब्द दिला आहे. शेतकरी सरकारला देतात तो सारा व जमीनदाराला

देतात तो धारा = rent, असा सारा व धारा या दोन शब्दांत फरक दर्शविला आहे पुस्तकांत बंगालच्या कायम जमीनदार पद्धतीचें विवेचन करून निष्कर्ष काढला आहे कीं, ' कायम दर ठरोतीनें सरकारचें वाटतें तितकें नुकसान झालें नाहीं. '*

दुष्काळाच्या प्रश्नावरील एका मनोरंजक काव्याचा उल्लेख करून हें जमीन-महसूल व दुष्काळ प्रकरण आवरतों. या पुस्तकाचें नांव " दुष्काळादर्श " ( लेखक राघो गणेश तानपाठक, त्र्यंबककर. प्रसिद्धी सन १८८५ ). कविराज सावकारावर टीका करतांना म्हणतात:—

एकेकाचे चौपट केले पैसे वाण्यांनीं ।
शेतकऱ्यांचें धैर्य उडविलें वरच्या पाण्यांनीं ॥

## विचारसाधन

या ( १८५०-१९०० ) कालांतील आणखी एका छोट्या पण अतिशय महत्त्वाच्या ग्रंथाचा परिचय करून देऊन या कालाचें विवेचन संपवितों. या पुस्तकाचें नांव " विचारसाधन " (लेखक तुकाराम). यांत ' हिंदुस्थानच्या सांप्रतच्या स्थितीचें मनन करण्यास साहित्य ' कितीएक पुस्तकांच्या आधारानें दिलेलें आहे. ' माहिती हेंच विचारास साधन ' असें अतिशय सुंदर सूत्र लेखकानें प्रस्तावनेंत सांगितलें आहे. सदरहु पुस्तकांत हिंदुस्थानचें क्षेत्रफळ, लोकसंख्या, धर्म, राज्यकारभार, जमाखर्च, जमीनमहसुल, लष्कर, कर्ज, व्यापार, आयातनिर्यात, माणशीं उत्पन्न, दारिद्य, शिक्षणाला पैसे पडतात

*या पुस्तकाखेरीज श्री. महाजनी यांनीं सीनियरच्या पोलिटिकल इकॉनमीचें भाषांतर केलें होतें, पण तें छापलें गेल्याचें दिसत नाहीं. जमीनधाऱ्याच्या प्रश्नावरील दुसरें पुस्तक चिपळूणकरकृत ' खोती प्रश्नासंबंधीं विचार ' हें होय. इ. स. १८९१ मध्यें रत्नागिरी खोतस् ॲसोसिएशनच्या मॅनेजिंग कमिटीच्या सूचनेवरून सभेचे जनरल सेक्रेटरी गणेश कृष्ण देशमुख यांनीं Notes on Khoti हें पुस्तक इंग्रजींत लिहिलें. त्याची मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड रे यांनीं प्रशंसा केली होती. त्यांचें हें भाषांतर मोरेश्वर सखाराम चितळे यांनीं केलें ( इ. स. १८९६ ). खोतावर पाटीलकुळकर्ण्यांचीं कामें लादण्याचा सरकारचा विचार होता, पण या इंग्रजी पुस्तकाचा योग्य परिणाम होऊन सरकारनें तो सोडून दिला. यांत खोतीच्या प्रश्नाचें कायद्याच्या व जमीनदारीच्या व वहिवाटीच्या दृष्टीनें अतिशय बारकाईनें विवेचन केलें आहे. असे गुंतागुंतीचे विषय लेखनास घेण्याची त्या कालीं लोकांची तयारी होती, हें विशेष होय. अलीकडेच त्या मानानें अशा रूक्ष गुंतागुंतीच्या परंतु लोकांस महत्त्वाच्या विषयावर फारशीं पुस्तकें होत नाहींत, असें म्हटलें पाहिजे.

व सक्तीचा अभाव आहे, इतर देशांत शिक्षणाला सक्ती आहे व पैसे पडत नाहींत, सरकारी नोकऱ्या, रेल्वे, ब्रिटिश वसाहती, हिंदी राष्ट्रीयसभा-तिचे ठराव, आमचें चुकलें कोठें, इंग्रजी राज्यापासून फायदे व तोटे हे विषय आहेत. तोटे सांगतांना त्यांत पुढील गोष्टी आल्या आहेत: खर्चाची राज्यपद्धत, परदेशी मालाची आयात, महाग न्यायदान पद्धत, व मोठें राष्ट्रीय कर्ज. शिवाय म्हटलें आहे कीं, सरकारला लोकांना काय हवें आहे तें कळत नाहीं. आमचें दुखत असावें कपाळ व आम्हांस औषध द्यावें पोटशूळावरचें, तसा प्रकार झाला आहे ( पृ. ८२ ). "लोकांत दोष—करणें थोडें, बडबड फार, युरोपियनांचें अनुकरण, व्यर्थ वितंडवाद, हातांत बाटली आणि सटार-हें वळण फार" (पृ. ८३). खेरीज 'साहेबांचे बूट बरे पण रावसाहेबांची शालजोडी नको' (पृ. ८३). असें आणखी पुष्कळ सांगतां येतील. पण कोळसा उगाळावा तितका काळाच." या दोषकथनानंतर काय करावें तेंहि सांगितलें आहे. लेखक म्हणतो, 'आमच्या देशाची उन्नति ही एक मोठी इमारत बांधावयास अनेक प्रकारचे कारागीर पाहिजे आहेत, ते तयार व्हा. कोणी कोलंबस व्हा, कोणी लूथर व्हा, कोणी शिवाजी, कोणी बेकन, जॉर्ज वॉशिंग्टन, हॉवर्ड, विष्णूशास्त्री चिपळूणकर, हेस्टिंग्ज, कोणी कांहीं व्हा, कोणी कांहीं व्हा, आपल्या उद्योगाचें फल आपल्यास न आलें तर आपल्या नातबापंतबास किंवा १० व्या पिढीस येईल. न आलें तरी आपलें कर्तव्य आपणांस जितकें करवेल तितकें आपलें अंतःकरण समाधान पावेल, हेंच जन्माचें सार्थक होय.' पुस्तक वाचून झाल्यावर ग्रंथकर्त्याच्या उद्योगाबद्दल आदर, कळकळीबद्दल आनंदाश्रु यावे, असें हें छोटें पुस्तक आहे. यांत हिंदी अर्थशास्त्र, नागरशास्त्र, व अलीकडील 'सांवत्सरिक' पद्धतीवर निघणारें वार्षिक पुस्तक यांचा मोठा गोड संगम झाला आहे. एकोणिसाव्या शतकांत आर्थिक प्रश्नावर विचार करून 'एष पन्थाः एतत्कर्म' असें इतकें ठासून कोणीं ग्रंथरूपानें सांगितल्याचें दिसत नाहीं.

## अर्धशतकांतील साहित्याचें समालोचन

इ. स. १८५०—१९०० हा काल मिल-फॉसेट यांच्या लेखनप्रभावाचा होय, म्हणून वर म्हटलें आहे. पण या ५० वर्षांतील अर्थशास्त्रीय विचार केवळ भाषांतररूप व उसनवारीचा आहे असें कदापि म्हणतां यावयाचें नाहीं, हें वर दिलेल्या अनेक ग्रंथांच्या परिचयावरून स्पष्ट होईल. मुंबईचा व्यापार हें अस्सल मराठी पुस्तक आहे. विचारसाधन हें राष्ट्रीय विचाराचें पुस्तक आहे. व्यापारासंबंधीं रानडे यांचीं व्याख्यानें व व्यवहारदर्पण हें नाण्यांसंबंधींचें पुस्तक कोणत्याहि इंग्रजी पुस्तकाच्या बळावर

लिहिलेलें पुस्तक नाहीं. किंबहुना तत्कालीन आर्थिक वाङ्मयाचा साकल्येंकरून आढावा घेणारास असें दिसून येईल कीं, महाराष्ट्राचे आर्थिक प्रश्न काय आहेत व ते कसे सोडविले पाहिजेत याची त्यांना चिंता लागलेली दिसते व ते त्यांनीं यथाशक्ति सोडविलेले आहेत. त्यांचें सामर्थ्य अल्प होतें, पण त्यांची तळमळ निःसंशय मोठी होती. अर्थशास्त्राच्या मूलतत्त्वांची ओळख, जमीनमहसुलाच्या प्रश्नाचा विचार, उद्योगधंद्याच्या वृद्धीसाठीं सांपत्तिक द्रव्यांची मोजदाद व कोठें काय होतें या माहितीची जमवाजमव, व्यापारवृद्धीसाठीं एतद्देशीय व्यापाऱ्यांस उपयुक्त सूचना, व्यापारोत्तेजक मंडळीची स्थापना व लोकांत जागृति होण्यासाठीं स्वदेशीचा पुरस्कार या सर्व गोष्टी या काळीं करण्यांत आलेल्या होत्या. तत्कालीन ग्रंथरचना लक्षांत घेतल्यास लेखकांची उद्योगप्रवृत्ति व एतद्देशीय वळण प्रशंसनीय आहे. अर्थशास्त्र हा विषय त्या पिढीस अगदीं नवा होता. हिंदुस्थानांत कौटिल्याचें अर्थशास्त्र इ. स. ३२० च्या सुमारास लिहिलें गेलें व त्यांत 'मनुष्याणां वृत्तिः अर्थः, मनुष्यवती भूमिः इत्यर्थः, तस्याः पृथिव्याः लाभपालनोपायः, शास्त्रं अर्थशास्त्रम् इति,' अशी त्यानें जी अर्थशास्त्राची व्याख्या दिली आहे ती १८ व्या शतकांतील युरोपांतील Political Economy या कल्पनेशीं निःसंशय जुळती आहे. पण अर्थशास्त्राचा स्वतंत्र अभ्यास या देशांत पुढें केव्हांच चालू राहिला नाहीं. महाराष्ट्रांत १८ व्या शतकाच्या प्रारंभीं (इ. स. १७१६) रामचंद्रपंत अमात्य बावडेकर यांनीं लिहिलेलें आज्ञापत्र आहे. त्यांतील ९ राजकीय प्रकरणांपैकीं फक्त ५ व्या प्रकरणांत व्यापारवृद्धीबद्दलचा विचार आहे. पण हें प्रकरण अवघें उणेंपुरें ४० ओळी आहे. त्यांत 'साहुकार म्हणजे राज्याची शोभा, टोपीकर मात्र वरकड सावकारासारखे नव्हत.' या वाक्यावर प्रपंच केलेला आहे. तरी पण अर्थशास्त्राचा अभ्यास या देशांत वाढला नाहीं, हें खरें. एकंदरींत जेव्हां चिपळूणकर, हरि केशवजी आदिकरून मंडळी मिलचे ग्रंथ वाचूं लागली तेव्हां त्यांना तें शास्त्र अगदीं नवें असें भासलें असेल यांत शंका नाहीं. असें असूनहि या नव्या शास्त्रांत गेल्या पिढीनें केलेली प्रगति माझ्या मतें वर सांगितल्याप्रमाणें प्रशंसनीय आहे.

## अर्वाचीन हिंदी अर्थशास्त्राचे प्रणेते

१९ व्या शतकाच्या उत्तरार्धांतील अर्थशास्त्रीय विचाराचें विवेचन न्या. मू. रानडे यांच्या उल्लेखावांचून अपुरें राहील. अर्थशास्त्रीय विचारांत न्या. मू. रानडे यांचें स्थान अखिल भारतीय महत्त्वाचें आहे. त्यांना 'अर्वाचीन हिंदी अर्थशास्त्राचे

प्रणेते' म्हणतात व ही त्यांची पदवी अगदीं यथार्थ गौरव करणारी आहे. महाराष्ट्रास त्यांच्या अखिल भारतीय महत्त्वाखेरीज त्यांच्यापासून आणखीहि एक लाभ झाला. अनेक अर्थशास्त्रीय उद्योगांची प्रेरक शक्ति रानडे होते. स्वत: दीर्घोद्योगी असून या कामीं मिळालेली एवढीशी संधिसुद्धां त्यांनीं वायां घालविली नाहीं. डेक्कन ॲग्रिकल्चर रिलीफ ॲक्टच्या अंमलबजावणीच्या प्रसंगीं इ. स. १८८१ मध्यें शेतकऱ्यांच्या खटल्यांवर देखरेख करण्यासाठीं त्यांची डॉ. पोलन् यांच्या हाताखालीं ॲसिस्टंट स्पेशल जज्ज म्हणून नेमणूक झाली. तिचा त्यांनीं फायदा घेऊन शेतकऱ्यांच्या परिस्थितीचा अभ्यास केला. १८८६ सालीं वरिष्ठ सरकारनें सरकारी खर्चांत काटकसर सुचविण्यासाठीं फिनॅन्स कमिटी नेमली होती. त्या कमिटींत रानडे यांना नेमलें होतें. तेव्हां त्या संधीचा त्यांनीं सरकारी कागदपत्रांचा अभ्यास करण्याचे कामीं उपयोग करून घेतला असें त्यांनीं कै. गणेश व्यंकटेश जोशी यांना लिहिलेल्या पत्रावरून दिसतें. १८८५ सालीं मुंबई कायदे कौन्सिलचे ते सभासद असतांना त्यांनीं वतन ॲक्टचा अभ्यास केला. १८८९ सालीं Industrial Association of Western India ही संस्था स्थापन करून पुढील वर्षी औद्योगिक परिषद भरविण्याचा उपक्रम केला. १८९२ सालीं शेतकरी कमिशनपुढें साक्ष दिली, व पुढें निघणाऱ्या सहकारी चळवळीची आगाऊ सूचना देऊन ठेविली. १८९३ सालीं पेशवा डायरीच्या संशोधनाच्या उद्योगांत असतांना त्यांनीं पेशव्यांच्या डायऱ्यांना प्रस्तावना व 'मराठ्यांच्या अमदानींतील टांकसाळी' हा लेख लिहिला. यांखेरीज मराठी भाषेंत उपयुक्त पुस्तकें भाषांतरित किंवा नवीन तयार व्हावींत, यासाठीं ते वेळोवेळीं अनेक होतकरू लेखकांस उत्तेजन देत असत. १८९४ सालीं पदवीधर अकालीं कां मरतात, हा डॉ. भांडारकरांनीं उपस्थित केलेले प्रश्न हातीं घेऊन १८९३ अखेरचे पदवीधरांचे आंकडे जमवून त्याचा वर्गवारीनें निघणारा निष्कर्ष त्यांनीं जनतेस सादर केला. माहिती जमवून चौकशीपूर्व अनुमान Inductive पद्धतीनें एखाद्या विषयाचा अभ्यास करण्याचा हा माझ्या मतें अर्वाचीन महाराष्ट्रांतील पहिलाच उपक्रम होय. या उपक्रमास पुढें कित्येक वर्षेपर्यंत खंड पडला असें म्हटलें पाहिजे. ही चौकशीपूर्वक अनुमाननिर्णयपद्धती पुढें डॉ. मॅन यांनीं लँड अँड लेबर ऑफ दि डेक्कन् व्हिलेज या पाहणीच्या वेळीं उपयोगांत आणली व तेव्हांपासून तिचा उपयोग वाढत्या प्रमाणावर होत असून प्रि. गाडगीळ यांच्या नेतृत्वाखालीं चालू असलेली गोखले इकॉनॉमिक इन्स्टिटयूट

हेंच उपयुक्त काय करीत आहे. असो. रानडे यांच्या बहुविध अर्थशास्त्रीय उद्योगाचें स्वरूप थोडक्यांत वर दिल्याप्रमाणें आहे.

## अर्थशास्त्रविचारास रानडे यांची देणगी

परंतु 'हिंदी अर्थशास्त्राचे प्रणेते' ही रानडे यांची पदवी त्यांच्या बहुविध उद्योगांपेक्षांहि त्यांनीं या देशांत उत्पन्न केलेल्या प्रबळ आर्थिक विचारांमुळें मिळालेली आहे. अर्थशास्त्राचे तात्त्विक नियम अबाधित नाहींत. ते देशकालपरिस्थितिसापेक्ष असतात. त्या नियमांची हिंदुस्थानांत अंमलबजावणी करतांना हिंदी परिस्थिति विचारांत घेणें इष्ट आहे. किंबहुना हिंदी परिस्थिति युरोपियन राष्ट्रांपेक्षां भिन्न आहे. म्हणून पाश्चात्य देशांतील गृहीत गोष्टींच्या आधारावर उभारलेले सिद्धांत येथें लागू पडणार नाहींत. हा विचार त्यांनीं १८९२ सालीं Indian Political Economy या डेक्कन कॉलेजांत झालेल्या व्याख्यानांत निबंधरूपानें मांडला. हिंदी अर्थशास्त्रीय वाङ्मयांत त्या निबंधास classic महत्त्वाचें स्थान आहे. जुन्या अर्थशास्त्रज्ञांच्या मतें ( १ ) प्रत्येक व्यक्तीच्या धडपडीचा स्वहितसाधन हा बलवत्तर हेतु असतो. ( २ ) मानवी जीवनकलहांत अनिर्बंध चढाओढी परिणामी गुणकारक ठरत असतात. ( ३ ) सरकारनें कायदे करून बरीं वाईट बंधनें घातल्यानें खुल्या चढाओढीस अडथळा मात्र होतो. ( ४ ) प्रत्येक व्यक्तीस स्वतःचें हित चांगलें कळतें व तें साध्य करून घेण्याची त्यास पात्रता आहे. ( ५ ) म्हणून व्यक्तीव्यक्तींना एकमेकांत करार करूं देण्याची पूर्ण मुभा असावी. या व अशांसारख्या सिद्धांतांकडे हिंदी चष्म्यांतून पाहून त्यांवर आक्षेप घेण्याचें काम प्रथम रानडे यांनीं केलें; व सांगितलें कीं, सामान्य हिंदी मनुष्य हा कित्येक वेळां आर्थिक हेतु बलवत्तर असणाऱ्या मानवी वृत्तीच्या अगदीं उलट दिशेनें वागतांना आढळतो. हिंदी मनुष्याचें लक्ष द्रव्यसंचयानें मोठेपणा मिळविण्यापेक्षां परलोकहितसाधनाकडे अधिक असलेलें आढळून येतें. त्याला चढाओढीपेक्षां चालरीत व परंपरा अधिक प्रिय आहे. म्हणून या देशांत मजूरमालकांचे संबंध चढाओढीच्या करारमदारांपेक्षां सर्वसंमत चालीरीतीवर अधिष्ठित असतात, व ही सर्वसंमत चालरीत एकाद्या पक्षास अन्याय करणारी असली तरी तिचा प्रतिकार करण्याची बुद्धि त्यामध्यें प्रबळ नसते.

रानडे यांच्या पूर्वी, जुन्या अर्थशास्त्रज्ञांच्या मतांना आक्षेप घेण्याचें कार्य यूरोपांत सिस्मांडी, सेंट सायमन वगैरेंनीं केलें होतें. परंतु इंग्लंडमध्यें ॲडम स्मिथ,

रिकार्डो व मिल यांच्या विचारांचें विशेष प्राबल्य एकोणिसाव्या शतकाच्या मध्या-नंतरहि टिकून राहिलें होतें. त्यांतून, पहिल्या दर्जाची नाविक सत्ता व वाढतें साम्राज्य यांच्या जोरावर ॲडॅम स्मिथ आदिकरून अर्थशास्त्रज्ञांनीं अनुसरलेली खुला व्यापार, अनिर्बंध चढाओढ, व्यक्तिस्वातंत्र्य, सरकारी नियंत्रणाचा अभाव, खाजगी धाडस, साहसावर भर हींच तत्त्वें इंग्लंडांत विजयी झालीं. आपले तात्त्विक विचार व्यवहारांत यशस्वी झाल्याचा दाखला इंग्लंडला पटला, यामुळें स्मिथ-रिकार्डोंच्या आक्षेपकांपेक्षां स्मिथ-रिकार्डो यांचेच विचार इंग्रजांना बरोबर वाटले असल्यास नवल नाहीं. याच विचारांच्या शाळेंत शिकून तयार झालेले हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्यकर्ते आपलीं खुला व्यापार, तटस्थवृत्ति वगैरेसारखीं तत्त्वें सहजासहजीं बाजूला सारण्यास तयार होईनात. तेव्हां त्यांचें चुकतें कोठें, हें सांगणारा पुरुष रानडे होय. त्यांनीं अर्थ-शास्त्राच्या प्रांतांत क्लॅसिकल विरुद्ध हिस्टॉरिकल स्कूलच्या मतास हिंदुस्थानच्या अनुभवा-वरून पुष्टि दिली व राज्यकर्त्यांना हिंदुस्थानच्या औद्योगिक उन्नतीबाबत तटस्थ राहून चालणार नाहीं, असा इषारा दिला. कै. रानडे यांनीं या द्विविध कामगिरीपेक्षां आणखीहि एक महत्त्वाची कामगिरी केली. ती म्हणजे अर्थशास्त्रीय विचारावर उभारलेलें, धर्म-जाति-पंथनिरपेक्ष असें एकराष्ट्रीयत्वाचें अधिष्ठान हिंदुस्थानास दिलें. या कामीं जर्मन अर्थ-शास्त्रज्ञ फ्रेड्रिक लिस्ट याच्या विचाराचा रानडे यांनीं पुरस्कार केला. तत्कालीन इंग्रजी वाङ्मयांत फ्रेड्रिक लिस्टचा विशेष बोलबोला नसतांहि व रानडे यांच्या काळीं हिंदु-स्थानांतील कॉलेजांतून मिलफॉसेटवर भर असतांहि त्या वाङ्मयानें भारून न जातां विविध अर्थशास्त्रीय मतांतील स्वदेशास अनुकूल असलेल्या मतांची निवड कर-ण्याचें अवघड काम रानडे यांनीं केलें. 'खुला व्यापार अगर व्यक्तिस्वातंत्र्य ह्या तात्त्विक विचारांची कास धरून राष्ट्राच्या आर्थिक व राजकीय स्वातंत्र्यास मुक-ण्याचा वेडेपणा कोणीं करूं नये,' असें लिस्ट याचें प्रतिपादन होतें. विवक्षित समा-जाचे घटक या नात्यानेंच व्यक्तीस महत्त्व येत असतें. अर्थशास्त्रांत आर्थिक प्रगति व आर्थिक हित यांचें विवेचन करावयाचें झाल्यास तेंहि विवक्षित समाजाची विशिष्ट परिस्थिति पुढें ठेवून केलें पाहिजे. व्यक्तीस समाजाशिवाय अस्तित्व नाहीं व एकंदर राष्ट्राची व समाजाची प्रगति घडवून आणणें हेंच इतर सामाजिक शास्त्रांप्रमाणें अर्थशास्त्राचेंहि उद्दिष्ट असलें पाहिजे, अशी लिस्ट याची विचार-सरणी होती. रानडे व त्यांचे समकालीन विद्वान् यांनीं त्याच मताचा विशेष पुर-स्कार केला. राजकीय बाबतींत हिंदी लोकांत राष्ट्रीयत्वाची भावना जागृत झाल्या-

पासून तर वरील मतास विशेष पाठिंबा मिळूं लागला. धर्म, जात, भाषा, स्थानिक हित, चालीरीती, इत्यादि अनेक महत्त्वाच्या बाबतींत हिंदी लोक एकमेकांत भिन्न असले तरी परराष्ट्रीय व्यापार, प्रचंड प्रमाणावर चालणारे नवीन उद्योगधंदे, सरकारचें वाढतें कर्ज, चलनपद्धति व हुंडणावळ, आगगाड्यांचा प्रसार, सरकारचें लष्करी धोरण, मजूरवर्गाच्या उन्नतीचा प्रश्न इत्यादि औद्योगिक, व्यापारविषयक व आर्थिक बाबतींत ते एकच आहेत. हें एकराष्ट्रीयत्वाचें आर्थिक अधिष्ठान कै. रानड्यांनीं हिंदुस्थानला प्रथम प्राप्त करून दिलें, हें रानडे यांचें सर्वांत महत्त्वाचें कार्य होय. सारांश, हिंदी अर्थशास्त्राचे प्रणेते ही पदवी रानडे यांस त्यांच्या त्रिविध कामगिरीवरून मिळाली. त्यांनीं ( १ ) स्मिथ-रिकार्डोचे विचार हिंदी परिस्थितीच्या दृष्टीनें तपासले, ( २ ) राज्यकर्त्यांस त्यांच्या उद्योगधंद्याबाबतच्या तटस्थ वृत्तीविरुद्ध इषारा दिला व ( ३ ) हिंदी राष्ट्रास आर्थिक पायावर उभारलेला एकराष्ट्रीयत्वाचा विचार दाखवून दिला.

कै. रानडे यांच्या मतप्रतिपादनाचा आणखी एक विशेष असा कीं, त्यांचीं राष्ट्रीय मतें आत्मपरीक्षणात्मक होतीं म्हणून, त्यांचें प्रतिपादन ते प्रतिपक्षास न दुखवितां करूं शकत असत. स्वदेशीविरुद्ध परदेशी यांच्या चढाओढीचें मर्म सांगतांना, तो एक अज्ञान व आळस यांचेविरुद्ध संघटना, कौशल्य व शास्त्रीय प्रगति यांचा झगडा आहे, अशा स्वरूपांत ते प्रश्न मांडीत असत; यामुळें स्वदेशी वि. परदेशी या दोन शब्दांतील 'देश' विषयक आपपरभाव मागें पडून दोषास प्रामुख्य दिलें जाई. दुसऱ्या एका प्रसंगानें त्यांनीं कारखाने सुधारतील तेव्हांच स्वदेशी परिणामकारक होईल, असा इषारा स्वदेशीच्या पुरस्कर्त्यांस दिला. हिंदुस्थानच्या औद्योगिक उन्नतीचा विचार चालू असतां त्या मार्गांतील अडचणीबरोबरच त्याबद्दलचा उज्ज्वल भविष्यकाल दाखवून आशावादी विचारसरणी जोरदार रीतीनें मांडण्यांत त्यांचा हातखंडा असे. हिंदी लोकांस उपलब्ध असलेला व अद्याप कोणीं हात न लावलेला असा सृष्ट पदार्थांचा अमर्याद सांठा, उद्योगधंद्याच्या वाढीस आवश्यक अशी देशांतील शांतता व सुव्यवस्था, सर्व जगाशीं विकास पावलेले बाजारसंबंध, आशियाखंडांत हिंदुस्थानास असलेलें महत्त्वाचें भौगोलिक स्थान ह्या सर्वांचा हिंदुस्थानला फायदा झाल्याशिवाय राहणार नाहीं, असें ते प्रतिपादीत असत. असो. रानडे यांच्या सर्व आर्थिक विचारांचा संग्रह करण्याचें हें स्थळ नव्हे. किंवा ४० वर्षांपूर्वी त्यांनीं व्यक्त केलेलीं मतें आजहि त्याच पद्धतीनें कोणाच्या मनोवृत्तीस धक्का

न लावतां व्यक्त करतां येतील असेंहि नाहीं. पण हायकोर्ट न्यायाधिशाच्या जागे-सारख्या अवघड सरकारी जागीं काम करीत असतां कै. रानडे यांनीं केलेली काम-गिरी पाहिली म्हणजे त्यांच्याबद्दलचा आदर अधिकच दुणावतो, यांत शंका नाहीं.

## महाराष्ट्राचे रमेशचंद्र दत्त

रानडे यांचे जवळ जवळ समकालीन असे महाराष्ट्रांतील दुसरे नामांकित अर्थशास्त्रज्ञ रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी हे होत. हे आपल्या आयुष्यभर ( इ. स. १८५१–१९११ ) शिक्षक व हेडमास्तर म्हणून होते व आयुष्याच्या अखेरीस त्यांना मुंबई कायदेमंडळाचा सभासद होण्याचा योग आलेला होता. स्वतः अर्थशास्त्राचे प्रोफेसर म्हणून काम करण्याचा प्रसंग नसतां किंवा वृत्तपत्रीय व्यवसायामुळें या विषयाचा अभ्यास जागृत ठेवण्याची विशेष निकड नसतांहि कै. जोशी यांचा या विषयावरील व्यासंग इतका खोल होता कीं, कित्येक त्या विषयाचे प्रोफेसर म्हण-विणारांना स्वतःस तें उपपद लावून घेतांना संकोच वाटावा. सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांत त्यांनीं अनेक प्रचलित प्रश्नांवर लेख लिहिले. धुळें येथें १९०८ सालीं भरलेल्या १९ व्या मुंबई प्रांतिक परिषदेच्या अध्यक्षत्वाचा मानहि त्यांना मिळालेला होता. त्यांच्या सर्व लेखनाचा व भाषणांचा एक बाराशें पृष्ठांचा ग्रंथ आर्यभूषण प्रेसनें १९१२ सालीं Writings and Speeches of R. B. G. V. Joshi या नांवानें प्रसिद्ध केला आहे. सरकारी नोकरींत राहून आपल्या अभ्यासी वृत्तीनें निर्भीड लेखन करणाऱ्या रा. ब. जोशी यांस ‘ महाराष्ट्राचे रमेशचंद्र दत्त ’ असें अभिमानानें म्हणतां येईल.

रा. ब. जोशी यांचीं अर्थशास्त्रीय मतें कै. रानडे यांच्या विचारांहून भिन्न नव्हती. त्यांच्या लेखनांत रानडे यांची कल्पनेची विशालता त्या प्रमाणांत आढळत नाहीं, पण त्यांचा श्रेष्ठतर दीर्घ व्यासंग मात्र निःसंशय प्रत्ययास येतो. कै. रानडे यांचेप्रमाणेंच त्यांनाहि ( जमिन महसुलाची ) कायम धाऱ्याची पद्धत पसंत होती. कै. रानडे यांच्या मतें एकंदर पिकाचा अमुक एक हिस्सा हें वसुलाचें प्रमाण कायद्यानें कायमचें पक्कें करावें व त्याचें द्रव्यांत रूपांतर दर ३० वर्षांनीं किंमतीचें मान पाहून ठरवावें. पण रा. ब. जोशी यांच्या मतें जमीनमहसुल पैशांत देखील कायमचा ठरवून टाकण्याची जरूर होती. सरकारनें आपली तटस्थ वृत्ति सोडून उद्योगधंद्यांस मदत करण्याचें धोरण स्वीकारलें पाहिजे, असें रा. ब. जोशी हे आपल्या लेखांतून प्रतिपादीत पण त्याबरोबरच सरकारनें मदत केली तरी उद्योगधंदे सुरू करणें हें लोकांचें काम

आहे, स्वावलंबनाखेरीज ऊर्जितावस्था येणार नाहीं, असें ते लोकांसहि बजावीत असत. इतकेंच काय पण सरकारनें दिलेल्या संधीचा फायदा घेण्यास लोक पुढें न आल्यास, सरकारानें उद्योगधंद्यांचें संरक्षण करण्यास संरक्षक जकाती बसविल्या तरी त्याचा कांहीं उपयोग नाहीं, असें त्यांचें मत होतें. खुला व संरक्षक व्यापार यांत त्यांचा एकंदर कल खुल्या व्यापाराकडेच विशेष असे. 'मी मिल-ग्लॅडस्टनइतका खुल्या व्यापाराचा पुरस्कर्ता नाहीं, पण संरक्षक व्यापाराची मोहीम माझ्या कार्यक्रमांत बसूं शकत नाहीं. एखाद्या धंद्यास तात्पुरतें संरक्षण देणें जरूर असेल पण संरक्षक जकातींच्या चिनी भिंतीच्या आड त्या धंद्याची उन्नती करण्याची पूर्वतयारी जय्यत नसेल तर संरक्षणाचा उपयोग नाहीं.' (R. B. G V. Joshis' Writings and Speeches, पृ. ८२२). सरकारनें उद्योगधंद्यांस मदत करावी, पण स्वतःच उद्योगधंद्यांचें क्षेत्र व्यापूं नये, असें त्यांना वाटे. समाजसत्तावादा(State Socialism)च्या ते विरुद्ध होते. आजचा आर्थिक प्रश्न नैतिक गुणवृद्धीचा किंवा समाजसत्तावादी कायदे करून आपली आर्थिक स्थिति सुधारण्याचा नाहीं. आपल्या आर्थिक प्रश्नाचें स्वरूप औद्योगिक आहे. (कित्ता पृ. ७५३). आपल्यापुढें वर्गकलहाचा किंवा मजूर वि. भांडवल असाहि प्रश्न नाहीं, असें मत त्यांनीं एके ठिकाणीं व्यक्त केलें आहे. १७ वर्षानंतर म्हणजे १९०७ सालीं लिहिलेल्या लेखनांत त्यांच्या मतांत सूक्ष्म फरक झालेला दिसून येतो. संरक्षणाच्या प्रश्नावर ते पूर्वीपेक्षां अधिक अनुकूल झालेले दिसतात. Industrial Problem in India या निबंधांत ते म्हणतात, "Lord Curzon cherished no free trade illusions. With him, as with Prince Bismark, Free Trade and Protection were but categories of time and place." (पृ. ९०७). लॉर्ड कर्झन यांनीं कॉमर्स व इंडस्ट्रीचें स्वतंत्र खातें निर्माण केलें व उद्योगधंद्यांबाबतचें सरकारी तटस्थ धोरण सोडून दिलें, याबद्दल समाधान व्यक्त करून त्यांनीं सुधारलेल्या देशांतून सरकारनें औद्योगिक उन्नतीसाठीं काय केलें आहे त्याची माहिती देऊन सरकारनें हिंदुस्थानांत Economic Council for India स्थापन करावें व तज्ज्ञ संशोधकांच्या साहाय्यानें आर्थिक प्रश्नांचें संशोधन करावें असें सुचविलें आहे. पण त्याबरोबरच एक महत्त्वाचा इषारा दिला आहे तो असा कीं, सरकार आपली तटस्थ वृत्ति सोडून उद्योगधंद्यांस उत्तेजन देत असतांना त्यांत हिंदी लोकांचें प्राधान्य पाहिजे, नाहींपेक्षां सरकारी उत्तेजनानें परकीय धंदेवाईकास मदत होईल व हिंदी लोकांना नुसतें मजुराप्रमाणें राबण्याचा प्रसंग येईल तर तें "A Scheme fo State-

aided foreign exploitation" ( सरकारी आश्रयाखालचें परकीयांनीं केलेलें द्रव्यशोषण ) होईल, असा इषारा देण्यासहि ते चुकले नाहींत. स्वदेशीकडे पाहण्याची त्यांची दृष्टि कांहींशी तात्त्विक स्वरूपाची होती. स्वदेशीच्या चळवळीनें देशांतील उद्योगधंद्यांस मिळणारें उत्तेजन प्रत्यक्षापेक्षां नैतिक स्वरूपाचें अधिक आहे, असें त्यांचें मत होतें ( पृ० ९३१ ). सारांश, रा. ब. जोशी यांनीं एका बाजूस सरकारला उद्योगधंद्याबाबत तटस्थ वृत्ति सोडण्याचा आग्रह केला व दुसऱ्या बाजूस लोकांस स्वावलंबनाचा उपदेश केला. समाजसत्तावादी वर्गकलहाच्या प्रश्नापासून या देशाचा आर्थिक प्रश्न कसा भिन्न आहे, तें दाखविलें. लॉर्ड कर्झनच्या अमदानींत सरकारनें तटस्थ वृत्ति सोडल्याबद्दल समाधान व्यक्त केलें. सरकारला उद्योगधंद्यांबाबत काय करतां येईल तें दाखवून दिलें व सरकारी आश्रयाचा फायदा परकीयांस मिळूं न देण्याबद्दल महत्त्वाचा इषारा दिला. जनतेंतील स्वदेशी चळवळीच्या जागृतीस संमति दिली, पण नुसत्या संरक्षक जकाती किंवा स्वदेशीचा अभिमान औद्योगिक उन्नतीस पुरा पडणार नाहीं, अशीहि त्याबरोबरच सूचना देऊन ठेवली. आजपर्यंत हिंदुस्थाननें स्वदेशीच्या अभिमानाच्या २ चळवळी पाहिल्या आहेत व संरक्षक जकातीचीं १० वर्षे अनुभवलीं आहेत. अशा वेळीं रा. ब. जोशी यांनीं २५ वर्षांपूर्वी वेळोवेळीं दिलेल्या इषाऱ्यांचें महत्त्व अधिकच प्रचीतीस येतें, यांत शंका नाहीं.

## इंग्रजी लेखनाची मीमांसा

न्या. मू. रानडे काय किंवा रा. ब. जोशी काय, या दोघांचेंहि अर्थशास्त्रीय लेखन केवळ बहुंशींच नव्हे तर सर्वांशीं इंग्रजींतून झालेलें आहे. म्हटलें तर चमत्कारिक वाटेल, पण हें खरें आहे कीं, महाराष्ट्रांत एतद्देशीय अर्थशास्त्र-वाङ्मय व अर्थशास्त्रविचार यांचे प्रवाह भिन्न दिशेनें व आपआपल्यापरी स्वतंत्रपणें वाहत आहेत. याचें कारण रानडे, जोशी व त्यांनंतरचेहि नामांकित अर्थशास्त्रज्ञ यांनीं आपलें लेखन प्रायः इंग्रजींतून केलें आहे व बहुजनसमाजास अर्थशास्त्रीय तत्त्वांची ओळख करून देण्याचें काम त्या समाजांतील हें शास्त्र अंमळ कमी शिकलेल्या पण आस्थेवाईक व दीर्घोद्योगी लोकांनीं केलेलें आहे. नामांकित अर्थशास्त्रज्ञांची दृष्टि अशा रीतीनें बहिर्मुख असण्याचीं कांहीं कारणें उघड आहेत. इंग्रजींतून केलेल्या लेखनाला विस्तृत प्रसिद्धी मिळते, व त्याच्या गुणदोषाची चिकित्सक चर्चा होण्याचा विशेष संभव असतो. म्हणून इंग्रजी लेखनाचा मोह साहजिक होतो. खेरीज इंग्रजींतून शिक्षण घेऊन तयार झाल्यावर, इंग्रजी परिभाषा मनांत ठसल्यावर

व शिक्षणोत्तर पुनः कॉलेजांतून शिकवितांना त्याच इंग्रजींतून तें शिक्षण मागें मिळालें तसें पुढें देण्याची जरूरी उत्पन्न झाल्यावर, सामान्य महत्त्वाचें व कॉलेजोपयोगी आर्थिक वाङ्मयहि इंग्रजींतून लिहिलें गेल्यास आश्चर्य नाहीं. इंग्रजी लेखनाचें तिसरें व विशेष महत्त्वाचें कारण म्हणजे अर्थशास्त्रीय प्रश्नासंबंधीं राज्यकर्त्यांच्या धोरणावर टीका करतांना ती राज्यकर्त्यांना समजणाऱ्या भाषेंत व्यक्त करावी, असा हेतु असे. स्वतःच्या भाषेंत ते विचार व्यक्त केले असते तर राज्यकर्त्यांना ते ओरिएंटल ट्रान्सलेटरकडून भाषांतर करवून समजून घेणें आवश्यक होतें कीं नाहीं व अशा रीतीनें मराठींतून त्या विचाराचा प्रसार झाल्यानें जनसमुदायाचें साहजिकच शिक्षण या तज्ज्ञांकडून झालें असतें कीं नाहीं या गोष्टींचा आमच्या अर्थपंडितांनीं विचार केलेला दिसत नाहीं.

## विसाव्या शतकाचीं ३५ वर्षें

१९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत व अखेरीअखेरीस रानडे व जोशी यांनीं फ्रेड्रिक लिस्ट या जर्मन अर्थशास्त्रज्ञाची शिकवण हिंदुस्थानास दिल्याचें मागें सांगितलेंच आहे. लिस्ट-रानडे यांच्या इंग्रजींतून प्रगट झालेल्या राष्ट्रीय दृष्टीच्या आर्थिक विचाराचें प्रतिबिंब मराठींतून विसाव्या शतकाच्या प्रारंभीं दिसूं लागलें. १९००-१९३५ या ३५ वर्षांच्या काळाचे अर्थशास्त्रीय वाङ्मयाच्या दृष्टीनें दोन भाग पाडतां येतील:-(१) इ. स. १९००-१९२०, (२) १९२०-३५. पहिल्या २० वर्षांत स्वदेशीचा पुरस्कार, सरकारी चलन व जकातविषयक धोरणावर सडकून टीका, इंग्रजी अमदानींत वारंवार पडलेल्या दुष्काळाची मीमांसा, बँका बुडण्याचीं कारणें, इत्यादि विषयांवर राष्ट्रीय दृष्टीनें विचार करणारें वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे. थोडें आत्मपरीक्षणाच्या दृष्टीनें बोलावयाचें तर या काळांत लोकांनीं काय करावयास हवें होतें यापेक्षां सरकारनें काय करावयास नको होतें व क्वचित् हवें होतें, याचेंच प्रतिपादन अधिक झालेलें दृष्टीस पडतें. युद्धानंतर व मॉंड-फर्ड सुधारणेचा हप्ता अमलांत आल्यावर अधिक विधायक तऱ्हेचें वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे. (१) ग्रामसंघटना, ग्रामोन्नति व सहकारी चळवळ यांसंबंधींचें वाङ्मय, (२) उद्योग, कला, व्यापार यांच्या उन्नतीबाबत विचार करणारीं मासिकें, व कांहीं पुस्तकें, (३) सामान्य वाचकांसाठीं आर्थिक विषयाची सोपी समजूत करून देणारे ग्रंथ व अभ्यासकाच्या सोयीसाठीं झालेलीं संकलन पुस्तकें, (४) समाजनिरीक्षणानंतर लिहिलेले लहान मोठे संशोधनपर प्रबंध व (५) मोठमोठ्या धंद्यांत मालक-मजुरांच्या तंट्यावरून

समाजसत्तावादी विचारास चालना मिळून समाजसत्तावादाचा प्रसार करणारें वाङ्मय, अशा ५ प्रकारांनीं १९२० नंतरच्या अलीकडील १५ वर्षांच्या वाङ्मयाचें वर्गीकरण करतां येईल. एका वाक्यांत सांगावयाचें तर पहिल्या वीस वर्षांतील वाङ्मय टीका-प्रधान होतें तर १९२० नंतरच्या १५ वर्षांतील आर्थिक वाङ्मय विविध विधायक पद्धतीचें आहे व त्या दोन्हींवर लिस्ट-रानडे यांच्या विचारांची छाप आहे. फक्त समाजसत्तावादी वाङ्मय मात्र यास अपवाद म्हणून म्हणतां येईल; कारण तें मुख्यतः टीकाप्रधान असून त्यावर लिस्ट-रानडे यांच्यापेक्षां कार्ल मार्क्सच्या विचारांची छाप आहे.

## दुष्काळ व दारिद्र्य यांची मीमांसा

पहिल्या वीस वर्षांत प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयांत हिंदुस्थानच्या दारिद्र्याची व दुष्काळाची मीमांसा करणारीं पुस्तकें महत्त्वाचीं आहेत. पैसाफंडाचे प्रचारक श्री. अं. दा. काळे ' यांनीं हिंदुस्थानच्या सद्यःस्थितीचें चित्र ' हें अंदाजें १२० पानांचें पुस्तक लिहिलें असून त्याची दुसरी आवृत्ति १९०९ सालीं प्रसिद्ध झाली आहे. पुस्कांत लेखकाची तळमळ प्रत्ययास येते. ' नादिरशहा वगैरे सर्व मेले, पण कापडशहा जिवंत असून दरसाल २५ कोट रु. नेत आहे' ( पृ. २८ ). औद्योगिक उन्नतीचे मार्ग दाखवितांना १६ रु. च्या कच्च्या लोखंडाच्या ८ लक्ष रु. च्या कमानी होतात, असें सुचविलें आहे ( पृ. २७ ). सरकारनें कर्ज काढून रेल्वेचा प्रसार केला, हा व्यापारी कावा होय, अशी टीका केली आहे; व हिंदुस्थानास बरे दिवस येण्यास शेतकऱ्यांना कायम धाऱ्याची पद्धत लागू करावी, मेसर्स टाटा, लखमीदास खिमजी, चतुर्भुज मुरारजी वगैरे गृहस्थांनीं एक होऊन बँक काढावी, व्यापारी माहिती देणारें वृत्तपत्र काढावें, औद्योगिक फंड काढून फंडाच्या व्याजांतून औद्योगिक शिक्षणासाठीं परदेशांत जाण्यास विद्यार्थ्यांस स्कॉलरशिपा द्याव्यात, असें म्हटलें आहे.

' हिंदुस्थानांतील दुष्काळ ' या गोविंद गोपाळ टिपणीस यांनीं १९०५ सालीं लिहिलेल्या निबंधांत, इ. स. १७७० ते १८७८ पर्यंतच्या सुमारें १०० वर्षांत एकंदर २२ दुष्काळ पडले, त्यांपैकीं १७ दुष्काळांत मिळून १ कोट २७ लक्ष लोक अन्नावांचून मेले, असें लिहिलें आहे. कै. गणेश व्यंकटेश जोशी यांनीं सोनखताचा स्वानुभव औद्योगिक सभेपुढें मांडल्याचें नमूद आहे. खत न घातल्यास ज्या एक एकर जमिनींत ९०० पौंड ज्वारी येते त्याच एकरांत खताच्या जोरावर १०४८ पौंड येते, असें प्रयोगानें त्यांनीं पडताळून पाहिलें असल्याचें नमूद

आहे. दुष्काळनिवारणार्थ धंदेशिक्षण, शेतकी शिक्षण, पैसा-फंड, खतांचे प्रयोग, गुरांची जोपासना, सहकारी चळवळ, पाटबंधाऱ्यांची वाढ वगैरे अनेकविध उपाय सुचविलेले आहेत.

'औद्योगिक सहकारिता,' अथवा 'दारिद्र्य नाहींसें करण्याचे सोपे उपाय' या 'सहकारी कृष्ण' ऊर्फ एकनाथ अनंत एकबोटे यांनीं लिहिलेल्या छोटेखानी पुस्तकांत (१९१३) सहकारी तत्त्वाची व त्या तत्त्वावर चाललेल्या रॉकडेल पायोनियर संस्थेची मोठ्या आकर्षक पद्धतीनें माहिती दिलेली आहे. सदरहु पुस्तकांतील माहिती खेड्यापाड्यांतून, देवळांतून व चावड्यांतून रात्रीचे वर्ग भरवून देण्यांत यावी म्हणजे शेतकऱ्यांना स्वावलंबनाचे मार्ग सुचतील, असें प्रतिपादन केलें आहे. सरकारनें इ. स. १९०४ पासून सुरु केलेल्या सहकारी चळवळीचा पुरस्कार करणारें बिनसरकारी व स्वतंत्रपणें लिहिलेलें असें दुसरें पुस्तक क्वचितच या काळांत आढळून येईल.

## सरकारी चलनविषयक धोरणावर टीका

सरकारच्या चलनविषयक धोरणावर टीका करणारें व तदनुरोधानें चलन-विषय थोडाबहुत समजावून देणारें जें वाङ्मय या काळांत निर्माण झालें त्यांत 'इंग्लंडला पडलेला पेंच ऊर्फ चलनी नाण्याचा वाद' व 'हिंदुस्थानांतील चलन-पद्धति' हीं दोन पुस्तकें १९१३ सालीं प्रसिद्ध झालीं. त्यांतील पहिलें वेबच्या पुस्तकाचें भाषांतर श्री. पी. व्ही. दाते यांनीं केलें आहे. दुसरें मुतालिकांचें पुस्तक चेंबरलेन कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध होण्यापूर्वीं झालेलें आहे. त्यांत गोल्ड एक्सचेंज स्टँडर्ड ही चलनपद्धति धोक्याची असून हिचें जीवित सर्वस्वीं हिंदुस्थानांतून बाहेर जाणारा माल आंत येणाऱ्या मालाहून अधिक असण्यावर अवलंबून आहे, असें म्हटलें आहे. गो. ए. स्टँडर्ड पद्धतीचे गुणदोष १९१३ सालीं प्रसिद्ध इंग्लिश अर्थशास्त्रज्ञ कीन्स यांच्याहि पुरतेपणीं लक्ष्यांत आले नव्हते, मग सरदार मुतालिकांची गोष्टच बोलावयास नको! पण या पुस्तकांत हिंदी चलनाचा इ. स. १८०६ पासूनचा संगत-वार इतिहास व हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें सुरू करण्याविरुद्ध येणाऱ्या आक्षेपांचें खंडण चांगल्या प्रकारें केलें आहे. या दोन पुस्तकांखेरीज इ. स. १९२१ व इ. स. १९२२ या दोन वर्षीं लागोपाठ प्रसिद्ध झालेल्या दुसऱ्या २ पुस्तकांचा याच प्रसंगानें उल्लेख करावयास पाहिजे. पहिलें श्री. शं. ग. खांडेकर यांचें 'भारतीय चलन पद्धति' हें व दुसरें प्रो. वा. ना. गोडबोले व श्री. वि. ह. घोरपडे यांचें 'रुपया अर्थात् आमचें चलन' हें होय. पहिल्या पुस्तकाचें परीक्षण करतांना श्री. ना. गो.

चापेकर यांनीं त्याच्या वाईट व अशुद्ध छपाईबद्दल जोराचा आक्षेप घेतला आहे व पुस्तकांतील सैल शब्दयोजना व कांहीं आक्षेपार्ह सिद्धांत यांवर टीका केली आहे. तरी 'चालू चलन पद्धतीसंबंधानें रा. खांडेकर यांनीं सरकारास ज्या महत्त्वाच्या सूचना केल्या आहेत....त्या विवेचनाशीं अगर काढलेल्या अनुमानाशीं कोणाचा मतभेद होईलसें वाटत नाहीं', असा निष्कर्ष काढलेला आहे. दुसऱ्या पुस्तकाचें परीक्षण करतांना प्रो. गोडबोले व श्री. घोरपडे यांचें 'हें पुस्तक विश्वविद्यालयांतील विद्यार्थ्यांनाहि उपयुक्त झाल्यावांचून राहणार नाहीं, असा आम्हांस पूर्ण भरंवसा वाटतो' असें मत रा. सा. चापेकर यांनीं दिलें आहे. खेरीज ते म्हणतातः—विद्वत्तेचा ठसा उठलेलें असें दुसरें या विषयावरील पुस्तक पाहावयास मिळावयाचें नाहीं.

चलनविषयावर यानंतर पुस्तकरूपानें निघालेलें वाङ्मय मुख्यतः स. १९२६।२७ सालीं प्रसिद्ध झालेलीं करन्सी लीगचीं 'हुंडणावळीच्या दरासंबंधींचीं पत्रकें' होत.

इ. स. १९१३ मध्यें देशांत बँकांचीं एकामागून एक दिवाळीं निघालीं असतां 'दिवाळखोरीची खरी व खोटी मीमांसा' ही लेखमाला श्री. केळकर यांनीं केसरींतून जी लिहिली ती उपयुक्त होती. पण या सर्वांपेक्षां इ. स. १९०० ते १९२० या काळांतील अत्यंत नमुनेदार पुस्तक म्हणजे इ. स. १९१५ सालीं प्रसिद्ध झालेलें श्री. त्रिं. ना. अत्रे यांचें 'गांवगाडा' हें पुस्तक होय. हें पुस्तक हल्लीं दुर्मिळ आहे. इंग्रजी अमलांत खेड्यांतील शेतकरी कसा व किती प्रकारांनीं नागवला जातो, याचें रसभरित व अस्सल जानपद मराठी भाषेंत केलेलें वर्णन या पुस्तकांत वाचावयास सांपडेल. पुस्तकांत पृष्ठागणिक न ऐकलेली माहिती व शहरवासियानें सहसा न ऐकलेला पण अस्सल मराठी शब्द सांपडेल असें हें सुंदर पुस्तक आहे.

## ना. गोखले यांची आर्थिक कामगिरी

या २० वर्षांतील वाङ्मयाबरोबरच या काळांतील अर्थशास्त्रज्ञांचाहि थोडक्यांत परिचय करून देतों. विसाव्या शतकाच्या प्रारंभींचे महाराष्ट्रांतील नांव घेण्याजोगे अर्थशास्त्रज्ञ ना. गो. कृ. गोखले हे होत. यांचेहि बहुतेक लेख व भाषणें इंग्रजींतूनच आहेत. ना. गोखले हे स्वतःस राजकीय बाबतींत न्या. रानडे यांचे शिष्य म्हणवीत असत. आर्थिक बाबतींतहि गोखल्यांचीं मतें त्यांच्याहून फारशीं भिन्न नव्हतीं. रानडे यांच्याप्रमाणेंच त्यांच्याहि मतावर लिस्टच्या शिकवणीचा परिणाम झालेला होता ( Gokhale's Speeches, पृ. ९६३ पाहा ). पण ना. गोखले यांच्या वेळचे आर्थिक प्रश्न भिन्न स्वरूपाचे असल्यानें न्या. रानडे यांनीं ज्या

प्रश्नांना आपल्या लेखनांतून स्पर्शहि केला नसेल अशा कित्येक स्वतंत्र विषयांवर ना. गोखले यांचीं भाषणें पहिल्या प्रतीचीं आहेत. ना. गोखले यांच्या भाषणांत मुख्यतः मिठावरील कर, दरसाल अंदाजपत्रकांत दाखविली जाणारी शिल्लक व लष्करी खर्च, यांवर टीका असे. चलनाच्या प्रश्नावरहि ना. गोखले यांनीं कौन्सिलांत प्रसंगोपात केलेल्या भाषणांवरून, त्यांनीं या विषयाचा किती खोल अभ्यास केला होता तें दिसून येतें. सर विठ्ठलदास ठाकरसी यांनीं १९१२ सालीं वरिष्ठ कायदे-मंडळांत, हिंदुस्थानांत सोन्याच्या खुल्या चलनासाठीं टांकसाळी उघडाव्यात असा ठराव आणला असतां, त्याला पाठिंबा देण्यासाठीं ना. गोखले यांनीं जें भाषण केलें त्यांत गोल्ड एक्स्चेंज स्टँडर्डचे दोष समर्पक दाखविले होते. या चलनामुळें देशांत जरूरीपेक्षां जास्त असें फुगलेलें चलन परत खजिन्याकडे येण्यास वाव नसल्यानें सांचलेल्या पाण्यानें उत्पन्न होणाऱ्या रोगट दलदलीप्रमाणें 'फुगलेलें चलन निष्कारण पदार्थांच्या किंमती वाढविण्यास मात्र कारणीभूत होतें' असा अभिप्राय त्यांनीं व्यक्त केला होता. ना. गोखले यांचे काळांत स्वदेशी चळवळ जोरांत होती तेव्हां त्यांनीं त्याहि विषयावर आपले विचार लोकांपुढें मांडले होते. या विषयावरील त्यांचें विवेचन व्यापक व सूक्ष्म असे. हिंदुस्थानांत जो कोणी जगांतील उद्योग-धंद्यांसंबंधींचें ज्ञान करून देतो, परदेशीं जाऊन औद्योगिक शिक्षण घेण्यासाठीं स्कॉलरशिप देतो, किंवा जो कोणी स्वदेशी धंद्यास भांडवल पुरवितो ते सर्व स्वदेशीचे उपासक आहेत, अशा व्यापक बुद्धीनें स्वदेशीकडे पाहण्याबद्दल त्यांनीं आपल्या देशबांधवांस विनंति केली आहे.

## विद्यमान नामांकित अर्थशास्त्रज्ञ प्रो. काळे

महाराष्ट्रांतील अर्थशास्त्रज्ञांच्या पंक्तींत ना. गोखले यांच्यानंतर प्रो. वा. गो. काळे यांचें नांव चटकन् सुचतें. रानडे, जोशी, गोखले या तिघांचाहि व्यवसाय भिन्न असून ते प्रसंगोपात अर्थशास्त्राकडे वळत. पण प्रो. काळे हे आजन्म अर्थ-शास्त्राचे व्यासंगी आहेत. हिंदुस्थानांतील ज्या निवडक शास्त्रज्ञांचीं नांवें युरोपांतील विद्वानांस माहीत आहेत त्यांत प्रो. काळे यांची गणना होते व आजहि प्रमुख अर्थशास्त्रज्ञ म्हणून मोठ्या गौरवानें त्यांचा उल्लेख केला जातो. प्रचलित स्वदेशी चळवळीसारख्या विषयावर त्यांनीं आपले विचार व्यक्त करतांना स्वदेशी व बहिष्कार यांतील फरक ओळखून लोकांस स्वदेशीवर भर देण्याचा आग्रह धरला आहे. चलनाच्या धोरणाबाबत सरकारनें लोकमतास मान न दिल्याबद्दल सरकारवर

त्यांनीं कडक टीका केली आहे. राष्ट्रीय अर्थशास्त्राची त्यांनीं महती गायिलेली असून ते अर्थशास्त्राच्या तात्त्विक विचारांत महत्त्वाची भर टाकणारे आहेत. मद्रास विद्यापीठाची सर विल्यम मेयर व्याख्यानमाला गुंफतांना त्यांनीं जागतिक आर्थिक परिस्थितीचा आढावा घेऊन असा विचार पुढें मांडला कीं, जग सध्यां एका बाजूस आर्थिक सहकार्याची आवश्यकता व दुसऱ्या बाजूस राष्ट्रीय संरक्षणाची सावधगिरी या परस्परविरुद्ध विचाराच्या पेंचांत आहे. पुण्याच्या भारत-इतिहास-संशोधक-मंडळांत त्यांनीं जुन्या आर्थिक वाङ्मयाचा अभ्यास करून 'टक्का' वगैरेसारख्या वारंवार येणाऱ्या शब्दांचे अर्थ निश्चित केले आहेत. ते महाराष्ट्रांतील अनेकविध विधायक चळवळींत उत्साहानें भाग घेत असतात. इन्शुअरन्स कंपनी, साखरेचा धंदा, सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक, मराठा चेंबर ऑफ कॉमर्स, नवी होऊं घातलेली महाराष्ट्रीय बँक व त्यांनीं संपादलेलें 'अर्थ' हें वृत्तपत्र यांपैकीं बहुतेक चळवळींत त्यांचा विचार हा त्या त्या चळवळीला मोठा आधार आहे. अलीकडील ५।६ वर्षांत त्यांनीं भारतीय अर्थशास्त्र, बँका व त्यांचे व्यवहार, रिझर्व बँक, व्यापारी उलाढाली अशीं सामान्य वाचकांच्या शिक्षणासाठीं उपयुक्त मराठी पुस्तकें लिहून प्रसिद्ध केलीं आहेत. अर्थशास्त्राचा प्रोफेसर महाराष्ट्रीय असून व्यासंगी असला तर तो आपल्या प्रांताची कोणत्या प्रकारें सेवा करूं शकतो याचें प्रो. काळे हें आदर्श उदाहरण आहे.

## इतर अर्थशास्त्रज्ञ

प्रो. काळे यांच्याखेरीज मुख्यतः १९२० नंतर प्रसिद्धीस आलेल्या इतर महाराष्ट्रीय अर्थशास्त्रज्ञांची त्रोटक माहिती येथेंच पुरी केल्यास वावगें होणार नाहीं. अशा ठळक विद्वानांत, मुंबई कॉमर्स कॉलेजचे एक वेळचे प्रोफेसर के. आर. एम्. जोशी, डॉ. अंबेडकर, सांगलीचे विलिंग्डन कॉलेजचे एक वेळचे प्रिन्सिपॉल के. बी. जी. सप्रे, एल्फिन्स्टन कॉलेजचे डॉ. पाणंदीकर, कलकत्त्याचे प्रो. जुन्नरकर व पुणें गोखले इकॉनॉमिक इन्स्टिटयूटचे प्रिन्सिपॉल ध. रा. गाडगीळ यांची गणना होते. डॉ. श्री. व्यं. केतकर यांनीं 'Indian Economics' नांवाच्या आपल्या पुस्तकांत मुख्यतः हिंदी संस्कृति व परंपरा लक्षांत घेतल्यावांचून विलायतेंत निर्माण झालेलीं अर्थशास्त्रीय तत्त्वें हिंदुस्थानास लागू करतां येणार नाहींत असा सिद्धांत मांडला आहे. हा विचार मुख्यतः कै. रानडे यांच्या विचारासारखाच असला तरी मांडणीची पद्धत अगदीं नवी आहे. म्हणून हिंदी अर्थशास्त्र या विषयाचा विचार करणारांनीं हें पुस्तक नजरेखालून घालणें आवश्यक आहे.

## समाजसत्तावादी वाङ्मय

या सर्व लहानमोठ्या अर्थशास्त्रज्ञांचें बहुतेक लेखन इंग्रजींतून आहे. त्याला फक्त प्रो. काळे व डॉ. गाडगीळ हे अपवाद म्हणतां येतील. यांच्याखेरीज जे सामान्यतः अर्थशास्त्रज्ञ म्हणून ओळखले जात नाहींत पण ज्यांनीं अर्थशास्त्रीय विचारावर निःसंशय परिणाम केला आहे व सुदैवानें ज्यांचें बरेंच वाङ्मय मराठींतून आहे असा एक लहानसा पण उदयोन्मुख वर्ग आहे व तो म्हणजे मजूर पुढारी व समाजसत्तावादी मंडळींचा. या मंडळींत मुख्यतः तीन वर्ग दिसून येतात. श्री. ना. म. जोशी, श्री. बखले, श्री. परुळेकर इत्यादिसारखे सुधारणावादी मजूर पुढारी हे पहिल्या वर्गांत मोडतात. यांच्या मतें मजुरांचीं गाऱ्हाणीं प्रसंगीं संप वगैरे उपायांनीं वेशीवर टांगावीं लागतात हें खरें असलें तरी मालक व मजूर यांचें अंतिम हित एकच असल्यानें उभयतांनीं वेळोवेळीं तडजोडीच्या व सामोपचाराच्या पद्धतीनें आपले तंटे मोडले पाहिजेत. मुंबई-परळ भागांतील सोशल सर्व्हिस लीग वेळोवेळीं मजुरांच्या हितासाठीं व कल्याणासाठीं काय काय करतां येईल हें दाखविण्यासाठीं पत्रकरूपानें बरेंच वाङ्मय प्रसिद्ध करीत असते. दुसरा वर्ग कॉंग्रेसपक्षांतील समाजसत्तावादी मताच्या पं. नेहरूसारख्या लोकांचा. कम्यूनिस्टांप्रमाणें खाजगी मालमत्तेच्या उच्चाटनाची किंवा वर्गकलहाची भाषा ते बोलत नाहींत, किंवा जोशी-बखले यांच्याप्रमाणें मजुरांच्या श्रमपरिहाराच्या किंवा अन्यायनिवारणाच्या चळवळीकडे त्यांचें लक्ष नाहीं. जमिनदार किंवा भांडवलवाला हा आपल्या ताब्यांतील संपत्तीचा ट्रस्टी आहे व त्यानें त्या उच्च भूमिकेनें आपल्या संपत्तीचा उपयोग केला पाहिजे, अशा प्रकारची गांधीजींची विचारसरणी असून त्या विचारसरणीशीं ते आपलें कसेंबसें जुळतें करून घेऊन कॉंग्रेसमध्यें राहतात. महाराष्ट्रांत या विचारसरणीचें निदर्शक असें वाङ्मय फारसें निर्माण झालें नाहीं. तिसरा व शेवटचा वर्ग कम्यूनिस्ट विचारसरणीच्या लोकांचा. त्यांना मार्क्सची शिकवण अर्थातच पसंत आहे. मार्क्सपंथीय विचाराची ओळख करून देणारीं मराठीं भाषेंतील पुस्तकें म्हटलीं म्हणजे पां. वा. गाडगीळ यांचें 'सोशॅलिझम्' ( १९३५ ), वि. म. भुस्कुटे यांचें 'कार्ल मार्क्स याचें चरित्र व शिकवण '(१९३४), मा. खं. बागल यांचें 'बेकारी व तीवर उपाय '(१९३३) जांभेकर यांनीं अनुवादलेलें 'मोल, मजुरी व भांडवल' ( १९३२ ) हीं होत. पण या सर्वांपेक्षांहि श्री. राजशेखर यांनीं लिहिलेलें अवघें ४४ पृष्ठांचें 'नवमतवाद' हें पुस्तक विशेष वाचनीय आहे ( १९३५ ). कारण

कम्यूनिस्ट हा मतपंथ ज्या तत्त्वज्ञानावर उभारलेला आहे त्या 'विरोधजन्य विकासवादा'ची फोड या निबंधांत फारच आवेशानें, पण शास्त्रीय पद्धतीनें, केलेली आहे. कम्यूनिस्ट अर्थशास्त्रीय परिभाषेंत वारंवार येणाऱ्या १३ निवडक इंग्रजी शब्दांस सुंदर मराठी पर्याय या पुस्तकांत प्रारंभीं सुद्धां दिले आहेत. याच्या पूर्वी इ. स. १९२१ मध्यें श्री. विनायक सखाराम सरवटे यांनीं 'सामाजिक वाद' हें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. त्यांत निरनिराळ्या समाजसत्तावादी लेखकांच्या प्रसिद्ध ग्रंथांच्या निवडक भागांचें भाषांतर देऊन त्या पद्धतीनें सोशॅलिझम, बोलशेव्हिझम, सिंडिकॅलिझम, वगैरे पंथांचें स्वरूप स्पष्ट करण्याचा यत्न केला आहे व अखेरीस 'वर्णव्यवस्था' शुद्ध स्वरूपांत पुनरुज्जीवित केल्यास या सर्व वादांना हिंदुस्थानांत स्थान राहणार नाहीं असा निष्कर्ष काढला आहे. सामाजिक वादावरील पहिलें पुस्तक या दृष्टीनें या पुस्तकास महत्त्व आहे. 'समाजसत्तावाद' या व्यापक प्रश्नांतील स्टेट-सोशॅलिझम, सिंडिकॅलिझम, कम्यूनिझम, बोल्शेव्हिझम, गिल्ड-सोशॅलिझम वगैरे विषयांची शास्त्रीय फोड करून त्यांवर सामान्य मराठी वाचकांस समजेल असें एकहि पुस्तक अजून झालें नाहीं. वर दिलेल्या समाजसत्तावादी वाङ्मयाचा दिला आहे याहून अधिक परिचय विस्तारभयास्तव देतां येत नाहीं. पण जातां जातां इतकें म्हणतां येईल कीं, ज्यांना मराठींतून समाजसत्तावादाची समजूत करून घ्यावयाची असेल त्यांनीं राजशेखर यांच्या छोट्या पुस्तकाखेरीज, श्री. पां. वा. गाडगीळ व श्री. वि. म. भुस्कुटे यांचीं पुस्तकें वाचावींत. खेरीज १९३३ च्या महाराष्ट्र सांवत्सरिकांतील राजकीय मतपंथ व नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या व्यावहारिक ज्ञानकोशाच्या १ ल्या भागांतील कम्यूनिझम हा लेख हेहि पाहावेत.

## ग्रामसंघटना व सहकार

समाजसत्तावादी वाङ्मयाखेरीज १९२०-३५ या १५ वर्षांतील महत्त्वाचें वाङ्मय ग्रामोद्धार, ग्रामसंघटना व सहकारप्रचार या प्रकारचें होय. ग्रामसंघटनेच्या कार्यांत सरकारपासून कॉंग्रेसवाल्यांपर्यंत सर्व प्रकारचे लोक असल्यानें त्यांत जेवढे प्रचारक तेवढे प्रकार आहेत असें म्हटल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. पण त्या सर्वांच्या बुडाशीं खेड्यांत दारिद्र्य आहे, खेड्यांतील लोकांना पुरेसें काम व जोडधंदे नाहींत, त्यांच्यांत राहून समाजसेवेचें कार्य करण्याची आवश्यकता आहे, या कल्पना निश्चित आहेत. या कल्पना अधिक विस्तृतपणें समजून घेण्यासाठीं पुढील पुस्तकें वाचनीय आहेत. (१) बाळूभाई मेहता यांनीं केलेली 'खादी-

मीमांसा' ( १९३० ) निव्वळ प्रचारस्वरूपाची नाहीं. खादीबद्दलचें त्यांचें विवेचन अर्थशास्त्र दृष्टीनें विचार करणाऱ्या चिकित्सक मनालाहि इतकें पटणारें आहे कीं, खादीच्या उपयुक्ततेच्या त्यांनीं दिलेल्या मर्यादा लक्षांत घेऊन खादीचा प्रचार होईल तर अनेक गैरसमज टळतील. ( २ ) 'खेडेगांवविषयक व्याख्यानें' ( १९३० ) या पुस्तकांत महाराष्ट्रांतील प्रो. भागवत, श्री. नागपूरकर, श्री. बाबासाहेब परांजपे, प्रो. कानिटकर, नानलशास्त्री अशा २३ निवडक लोकांनीं खेडेगांवच्या अनेकविध अंगांचें आपापल्यापरी विवेचन केलें आहे. ( ३ ) 'ग्रामसंघटनेचें कार्य' ( १९३२ ) या प्रो. भागवत यांच्या पुस्तकांतील अत्यंत रेखीव व कार्यकारण-अनुमान स्वरूपाची विचारसरणी ग्रामसंघटनेच्या संदिग्ध कल्पनांस एकदम निश्चित स्वरूप देईल.

सहकारी चळवळीचा प्रसार झाल्यापासून व विद्यमान सोसायट्यांत असलेल्या दोषांकडे लोकांचें व सरकारचें लक्ष वेधल्यापासून सहकारी चळवळीची शास्त्रशुद्ध माहिती देणारीं चांगलीं पुस्तकें अलीकडे प्रसिद्ध झालीं आहेत. वऱ्हाड सहकारी संघाच्या विद्यमानें प्रसिद्ध झालेल्या 'सहकारी-पद्धति' ऊर्फ मॅन्युअल या पुस्तकांत ( १९२८ ) सहकारी चळवळीचा इतिहास, सहकारी कायदा व पेढी व्यवहार यांची एकत्र माहिती दिली आहे. या पुस्तकाखेरीज 'सहकारीसंस्थांचे जमाखर्च' ( लेखक श्रीधर गणेश देवरुखकर, १९३१ ) या पुस्तकांत पतपेढ्यांचा जमाखर्च कसा ठेवावा व झालेली चूक कशी शोधून काढावी त्याचें विवेचन आहे. 'शेतकी पतपेढी' या ल. के. भागवत यांच्या पुस्तकांत ( १९३० ) सहकारी चळवळीचें सर्वसामान्य पण त्रोटक विवेचन आहे. या तीन पुस्तकांखेरीज 'सहकारी पतपेढी' हें नारायण गणेश देशमुख, शेतकी हेडमास्तर, यांचें पुस्तक आहे ( १९३० ). 'पतपेढ्या' ( ले. ना. धों. कदम ) हा एक २५ पृष्ठांचा निबंधहि याच विषयावर उपलब्ध आहे.

## स्वदेशी, व्यापार व उद्योगधंदे

गेल्या १५ वर्षांत व्यापार व उद्योगधंदे यांच्या उन्नतीसाठीं निघालेलें वाङ्मय विशेष लक्षांत घेण्याजोगें नाहीं. पण त्यासाठीं निघालेल्या मासिकांचा मात्र अभिनंदनपर उल्लेख करणें जरूर आहे. नागपूर येथील श्री. पाध्ये व श्री. वाडेगांवकर यांनीं चालविलेलें 'उद्यम', मुंबईस श्री. का. म. ताम्हनकर यांनीं चालविलेलें 'प्राविण्य', किर्लोस्करवाडीचें 'किर्लोस्कर', खानापूरच्या सडेकरांचें 'लोकमित्र', सोलापूरचा एके

काळचा श्री. टिकेकर यांचा ' दूत ' हीं मासिकें व यंदा पुण्यास सुरु झालेलें प्रो. काळे यांचें साप्ताहिक ' अर्थ ' या सर्वांची कामगिरी प्रशंसनीय आहे. यांखेरीज केसरीनें १९३४ सालीं काढलेला व्यापारी अंक व साप्ताहिक सकाळचा दरसालचा निघणारा औद्योगिक अंक यांचाहि उल्लेख करणें जरूर आहे. ' उद्यम 'कारांनीं साखर, जाहिरात वगैरे संबंधाचे विशेष अंक काढलेले आहेत. पण व्यापारापेक्षां उद्योगधंद्यांचें विवेचन यांत अधिक असतें, प्राविण्याचा भर व्यापारावर आहे. किर्लोस्करचाहि व्यापारावरच. पण विशेषतः उत्साही, आशावादी व कार्योन्मुख वृत्ति निर्माण करण्यावर भर असतो. ' अर्थ ' हें या सर्व प्रश्नांकडे लक्ष देऊन खेरीज प्रचलित आर्थिक प्रश्नांवर भारदस्त चर्चा करतें. लोकमित्र व दूत यांचें ' उद्यम 'प्रमाणें उद्योगप्रधान धोरण आहे. श्री. किर्लोस्कर यांनीं किर्लोस्कर मासिकाखेरीज ' उत्कर्ष—माला ' नांवाची पुस्तकमाला काढून त्यांत विक्रीचीं १२ सूत्रें, व्यापाराचें व्याकरण, यशस्वी धंद्याचा मार्ग अशीं छोटीं छोटीं पुस्तकें लिहिलीं आहेत. पुस्तकांची सोपी भाषा, व उपयुक्त व व्यावहारिक सिद्धांत ठसठशीत भाषेंत मांडण्याची हातोटी या गुणांत हीं पुस्तकें कोणालाहि हार जाणार नाहींत. हीं पुस्तकें लघुकथेप्रमाणें वाचावींशीं वाटतात.

इ. स. १९२० पासून स्वदेशी प्रचाराच्या २ लाटा येऊन गेल्या. तेव्हांपासून स्वदेशी प्रदर्शन भरविण्याचें काम ठिकठिकाणीं व्यवस्थित होऊं लागलें आहे. त्या अनुषंगानें ' उद्यम'मार्फत स्वदेशी मालाचे पत्ते, महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्सनें काढलेली मालाची डिरेक्टरी, हीं पुस्तकें निघालीं आहेत. पण या दोन्हींपेक्षां ' स्वदेशी उद्यमसूचिका ' हें हिंदी वस्तुप्रचार-मंडळ, मुंबई, यांनीं काढलेलें पुस्तक ( १९३३ ) विशेष उपयुक्त आहे. कारण यांत १॥ ते २ हजार देशी मालाचे पत्ते दिले असून त्यांचें ४ प्रकारांनीं अनुक्रमणिकेंत वर्गीकरण केलें आहे. कारखानदारांची, वस्तूंची व जाहिरातदारांची अकारविल्हे यादी दिली आहे. खेरीज वस्तूंचें वर्गीकरण करून प्रत्येक वर्गास खुणेचें अक्षर देऊन तें अक्षर पुस्तकाच्या प्रत्येक पृष्ठावर ठळकपणें छापलें आहे. पैसाफंड रौप्यमहोत्सव ग्रंथ हा एका अस्सल महाराष्ट्रीय औद्योगिक चळवळीचा उगमापासूनचा इतिहास, मराठी व्यापारी वाङ्मयांत एक महत्त्वाची भर आहे. श्री. हरीभाऊ फाटक यांचा ' स्वदेशीची मीमांसा ' हा निबंध ( १९२७ ) वाचनीय आहे.

## अर्थशास्त्राच्या मूलतत्त्वांची ओळख

अर्थशास्त्राच्या किंवा अर्थशास्त्राच्या एखाद्या विभागाच्या मूलतत्त्वांची सोपी समजूत करून देणारीं अनेक लहान मोठीं पुस्तकें मराठींत उपलब्ध आहेत व त्यांतील कित्येकांचा दर्जा निःसंशय उच्च दर्जाचा आहे. प्रो. गो. चि. भाटे यांचें 'अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें', (आवृत्ति दुसरी, इ. स. १९२२) या पुस्तकाच्या १९१० सालीं निघालेल्या पहिल्या आवृत्तीला डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीकडून ५०० रु. चें बक्षिस मिळालें होतें. श्री. पु. वा. साठे यांचें 'सुलभ अर्थशास्त्र' ( १९२५ ), प्रो. वा. गो. काळे व प्रो. द. गो. कर्वे यांचें 'अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें' ( १९२७ ) हीं पुस्तकें अर्थशास्त्राच्या मूलतत्त्वांचें क्रमिक पुस्तकाच्या पद्धतीनें पद्धतशीर विवेचन करणारीं आहेत. हीं पुस्तकें समोर ठेविल्यास अर्थशास्त्राचा विषय मराठींतून शिकविण्याचा प्रसंग आल्यास चांगलीं पुस्तकें मराठींत नसल्याची सबब सांगतां येणार नाहीं. यांखेरीज चलन विषयावर श्री. ना. गो. चापेकर यांचें 'पैसा', ( दुसरी आवृत्ति १९३१ ), श्री. अ. श्री. देशपांडे यांचें सरकारी उत्तेजनावरून लिहिलेलें पुस्तक 'विनिमय व पैसा' ( १९३२ ) व श्री. भा. त्रिं. काळे यांचें श्री-सयाजीबालज्ञानमालेंतील 'संपत्ति व भांडवल' ( १९२७ ) हीं पुस्तकें आहेत. बँका व बँकांचे व्यवहार, या विषयावर प्रो. वा. गो. काळे यांचीं (१) 'बँका व त्यांचे व्यवहार' ( १९३४ ) व 'हिंदुस्थानची रिझर्व बँक' ( १९३५ ) हीं पुस्तकें वाचनीय आहेत. पण या सर्वांपेक्षां काळे व कर्वे या प्रोफेसरद्वयांचा 'भारतीय अर्थशास्त्र' हा ग्रंथ ( १९२९ ) मराठी वाङ्मयांत पहिल्या प्रतीची भर टाकणारा व विद्वानांच्या आदरास पात्र झालेला असा आहे. या पुस्तकांत अर्थशास्त्राच्या मूलतत्त्वांची ओळख करून दिली असून शेतकी, चलन, व्यापार, उद्योगधंदे, हुजूर दौलत, परदेशांशी व्यापार, रेल्वे, बँका, समाजसत्तावाद वगैरे अनेक हिंदी अर्थशास्त्रीय प्रश्नांची विद्वत्तापूर्ण, राष्ट्रीय दृष्टीनें, साधकबाधक चर्चा केली आहे. रा. सा. ना. गो. चापेकर यांच्या वर उल्लेखिलेल्या 'पैसा' या पुस्तकांत त्या विषयावर पाश्चात्य ग्रंथांतून आढळून येणाऱ्या मूलभूत तत्त्वांचें विवेचन आहेत; पण त्यांत Quantity Theory of Money या सिद्धांतास लेखकानें स्पर्श न केल्यानें तें अपुरें राहिलें आहे. पण त्याच पुस्तकांत 'प्राक्कालीन अधातुरूप विनिमय-सामान्यें' हा संस्कृत वाङ्मय वाचून लिहिलेला संशोधनपर निबंध, तसेंच 'ब्रिटिश अमलापूर्वीच्या चलना-

संबंधानें थोडी माहिती ' हा मराठी कागदपत्रांच्या संशोधनानें लिहिलेला निबंध, हे दोन्हीहि निबंध अव्वल दर्जाचे व अस्सल मराठी पेहेरावाचे आहेत. कौटिलीय अर्थशास्त्राचीं मराठींत २ भाषांतरें झालीं आहेतः एक श्री. गो. गो. टिपणीस यांचें व दुसरें श्री. ज. स. करंदीकर व श्री. हिवरगांवकर यांचें. पैकीं दुसरें पुस्तक शब्दशः भाषांतर असून खेरीज त्यास विद्वत्ताप्रचुर व विस्तृत प्रस्तावना जोडलेली आहे.

वर दिलेल्या अर्थशास्त्राच्या मूलतत्त्वावरील अनेक ग्रंथांनीं जशी सामान्य मराठी वाचकांची सोय झाली आहे तशी दरसाल निघणाऱ्या महाराष्ट्र सांवत्सरिक व कोल्हापुरास निघूं लागलेला व्यावहारिक ज्ञानकोश, व मराठींत डॉ. केतकरांच्या परिश्रमानें पुरा झालेला ज्ञानकोश या ग्रंथांनीं अभ्यासकांची मोठी सोय झाली आहे. हे सर्व ग्रंथ निव्वळ अर्थशास्त्रविषयक नाहींत हें खरें, पण अर्थशास्त्राचा अभ्यासहि सार्वजनिक प्रश्नांचा अभ्यास करणारास व त्यावर बोलणारास भरीव साधकबाधकपणा आणून देतात. म्हणून सार्वजनिक प्रश्नांचा अभ्यास करणारासाठीं निर्माण झालेलीं पुस्तकें अर्थशास्त्राच्या अभ्यासकास साहजिकच विशेष उपयोगी पडतात.

## संशोधनसाहित्य

आतां मराठी आर्थिक वाङ्मयांत नवीनच उदय पावत चाललेल्या एका महत्त्वाच्या शाखेचा उल्लेख करून हें १५ वर्षांचें साहित्यसमालोचन पुरें करूं. अर्थशास्त्रांत आंकडेवार माहिती गोळा करून तीवरून संशोधन करण्याची केवढी आवश्यकता असते हें सांगावयास नकोच. किंबहुना संशोधन, सूक्ष्मावलोकन व चिकित्सा यांच्या अभावीं निर्माण झालेलें वाङ्मय भाषेच्या दृष्टीनें भाषांतररूप नसलें तरी त्यांतील विचाराची उसनवारी झांकून ठेवतां येतच नाहीं. आतांपर्यंत उल्लेखिलेलीं सर्व पुस्तकें म्हणजे विचाराच्या दृष्टीनें उसनवारीचींच आहेत, असें म्हणण्याचा हेतु नाहीं. पण अंमळ चौकस बुद्धीच्या वाचकांस परकीय विचारांची उसनवारी कोणती व स्वतःच्या परिस्थितीच्या अवलोकनानें सुचून जन्मास आलेला अस्सल विचार कोणता, हें सहज ओळखतां येतें. असो; या संशोधनस्वरूप उद्योगास व साहित्यास नुकताच कोठें प्रारंभ झाला आहे. रा. सा. ना. गो. चापेकर यांचें ' आमचा गांव ' ( १९३३ ) हें अशा वाङ्मयाचें उत्कृष्ट उदाहरण म्हणून सांगतां येईल. प्रि. ध. रा. गाडगीळ यांचें ' हिंदुस्थानचा आर्थिक इतिहास, ' ( १९३२ ), श्री. का. न. पटवर्धन यांचें ' शेतीवाडीची आर्थिक परीक्षा '

(१९३५), श्री. वि. ग. पटवर्धन यांचें 'ब्राह्मणांतील बेकारी, तिचीं कारणें व उपाय,' (१९३४), श्री. परचुरे यांचें 'खेड्यांतील यात्रा,' (१९२९), कांहीं वर्षांपूर्वी मुंबईस ब्राह्मणसमाजानें केलेली मुंबईतील दक्षिणी ब्राह्मणसमाजाची पाहणी, प्रस्तुत लेखकानें इ. स. १९३०-३१ सालीं अनुक्रमें संगमनेर व येवलें येथील विणकर वर्गाची पाहणी करून 'लोकशिक्षण' मासिकांत प्रसिद्ध केलेले निबंध, हे या दृष्टीनें झालेले कांहीं बरे वाईट यत्न होत. 'आमचा गांव' हा आर्थिक दृष्टीपेक्षां समाजशास्त्राच्या दृष्टीनें लिहिलेला ग्रंथ आहे, पण त्यांतील आर्थिक भागहि बारकाईच्या दृष्टीनें लिहिलेला आहे, व संशोधन किती परिश्रमपूर्वक करावयास हवें याचें तें उदाहरण आहे. ज्या त्या अभ्यासकाच्या लहरीप्रमाणें हें थोडेंबहुत संशोधन झालें आहे. याला कांहीं संघटना असती तर हें थोडें संशोधनहि बहुफलदायी झालें असतें यात शंका नाहीं.

## गुणदोषमीमांसा व समारोप

इ. स. १८५०-१९३५ या ८५ वर्षांत मराठींत प्रसिद्ध झालेल्या आर्थिक वाङ्मयाचा साकल्येंकरून आढावा घेणारास अगदीं निराशा न वाटली तरी त्याच्या तुजबीपणाचा व उसनवारीचा प्रत्यय आल्याखेरीज राहणार नाहीं. इ. स. १९०० पूर्वी आमच्या प्रोफेसरांनीं मिल-फॉसेटची उसनवारी व भाषांतरवारी केली. तर अलीकडील २० वर्षांत आमचे कॉम्रेड्स मार्क्स-लेनिनची उसनवारी करीत आहेत. एकूण उसनवारीच! या उभयतांची विचारसरणी उसनवारीची म्हणूनच चुकीची, असा कार्यकारणभाव दाखविण्याचा हेतु नाहीं. उसना विचार कदाचित् प्रचलित परिस्थितीस गैरलागू नसेल, पण एतद्देशीय विचारपरंपरा व परिस्थिति यांची माहिती देऊन तीवरून अमुक एका अर्थपंडिताचा विचार आजच्या परिस्थितींत कां ग्राह्य आहे या दृष्टीनें विचार होणें जरूर आहे, हें या ठिकाणीं प्रतिपाद्य आहे. आर्थिक वाङ्मयाच्या तुजबीपणाचीं कारणें पूर्वी वेळोवेळीं दिलेलींच आहेत. आमच्या अर्थशास्त्रज्ञांची इंग्रजींतून लेखन करण्याची प्रवृत्ति हें मराठी साहित्यांतील आर्थिक वाङ्मयाच्या दुष्काळाचें एक कारण आहे. आणखीहि एक विचार बारकाईनें पाहिल्यास लक्षांत येतो. अर्थशास्त्र व राजकारण यांचा इतका निकट संबंध आहे व हिंदुस्थानच्या आजच्या राजकीय परिस्थितींत निर्भीड आर्थिक राजकीय मतें बोलून दाखविणें इतकें कठीण आहे, कीं आमचे प्रोफेसर वर्गाबाहेर तोंड उघडण्यास सहसा धजत नाहींत. प्रातिनिधिक लोकशाहीपेक्षां मुसोलिनीचा फॅसिझम्

कोणास मनापासून पसंत वाटला किंवा रशियांत चाललेल्या कम्यूनिझमच्या आर्थिक प्रयोगांत हिंदुस्थानला कांहीं अनुकरणीय आहे असें वाटलें तरी वर्गाबाहेर त्या गोष्टींचा उच्चार करणें त्यांना गैरसोयीचें होतें. खेरीज उच्च शिक्षणांत परीक्षेचा अभ्यास व परिस्थिति यांची इतकी फारकत झाली आहे कीं, परीक्षेचे अभ्यास हें कृत्रिम शब्दप्रयोगांचें लोढणें होऊन बसलें आहे. बिल ऑफ एक्सचेंज डोळ्यांनीं न पाहतां बँकिंगचा विषय शिकतां येतो व एकदांहि धान्य किंवा सोन्यानाण्याच्या बाजारांत न जातां किंवा तेथें वेळोवेळीं घडणाऱ्या किंमतीच्या उतारचढाची परीक्षा न करतां Theory of Prices शिकतां येते व परीक्षेंत त्यांवर विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देतां येतात. पुणें बाजारांत बटाटा एकाएकीं स्वस्त झाला किंवा सांगली येथें धान्याचे व्यापारी व सरकार यांच्यांत वाद झाला तर तेथें अर्थशास्त्रज्ञास कांहीं उपयुक्त समाजसेवा करतां येईल, याची त्या अर्थशास्त्रज्ञास व सामान्य जनतेस दोघांसहि नीटशी कल्पना नाहीं. दुसरें असें कीं, उच्च जबाबदार जागांवर अजूनहि युरोपियनांचीच वर्णी लागत असल्यानें विविध माहिती जमवून शास्त्र रचण्याची क्रिया एतद्देशीयांकडून होणें कठीणच आहे. उदाहरणार्थ, 'दर वर्षास रुपयाची झीज किती होते, हें ठरविण्यास कोटयवधि रुपये तोलून पाहिले पाहिजे; पण इतके जुने रुपये व निर्दोष कांटे, वजनें इत्यादि त्या मनुष्यास मिळणें संभवनीय नसतें, तथापि तेंच काम टंकाध्यक्ष सहज करूं शकेल. परंतु असल्या सर्व महत्त्वाच्या कामावर युरोपियन असल्यामुळें एतद्देशियाला रुपयाची वार्षिक झीज कशी ठरवितां यावी?'*

जी गोष्ट शास्त्रीय संशोधन व उच्च शिक्षण यांसंबंधीं, तीच सामान्य उद्योगधंद्यांबाबत होय. मराठींत अर्थ, उद्यम, प्राविण्य हीं वृत्तपत्रें व मासिकें आहेत. पण गुजराथी 'मुंबईसमाचार'ची सर त्यांला येत नाहीं. महाराष्ट्रांत धान्य वाणी किंवा मारवाडी विकणार, स्टेशनरी वोहरी विकणार, बँका गुजराथी चालविणार, इन्शुअरन्स कंपन्या पारशी चालविणार व ते आपापले व्यवहार आपल्या भाषेंत किंवा इंग्रजींतून करणार, तोंपर्यंत उद्योगधंद्यांबाबत निघालेलें वाङ्मय सत्प्रवृत्त पण अनुभव नसलेल्या व्यापाऱ्यांनीं व धंदेवाईकांनीं लिहिलेलें व तशाच भोळसट व स्वतःस देशाभिमानी समजणाऱ्या लोकांनीं वाचलेलें राहणार. एकंदरींत कागदी घोडे नाचविण्याचाच प्रकार. अलीकडे शिकून तयार झालेल्या १० पैकीं ९ जणांस नोकरी मिळत नसेल, या, ना त्या धंद्यांत पडावें लागत असेल, पण व्यापारशिक्षणाचा ओनामा शिकविणारीं

* ना. गो. चापेकर कृत 'पैसा', प्रस्तावना, पृ. ३।४.

शाळा, कॉलेजें किंवा खाजगी वर्ग महाराष्ट्रांत पुण्याबाहेर तरी प्राय: दुर्मिळच आहेत. एकंदरींत आर्थिक वाङ्मय व आर्थिक व्यवहार यांची आज दिसत असलेली फारकत दूर होण्यास महाराष्ट्रांत राहून धंदा करणारांनीं मराठींतून लेखनवाचन केलें पाहिजे, मराठींतून बोललें पाहिजे, या समंजस मागणीबद्दल आग्रह धरणें व तशा प्रकारच्या व्यवहारास महाराष्ट्रीयांनीं इतर तयार असल्याचें दाखविणें जरूर आहे.

पूर्वी आढळून न येणारा एक स्पृहणीय प्रकार गेल्या १० वर्षांत दिसून येत आहे. तो म्हणजे हिंदुस्थानचा जागतिक राजकारणांत निकट संबंध आल्यानें युरोपांत उदयास आलेल्या अर्थशास्त्रीय सिद्धांतांवर हिंदुस्थानांतहि लवकरच चर्चा झालेली ऐकावयास सांपडते. पूर्वी युरोपांत प्रूढॉ, रॉडबर्टस्, कार्ल मार्क्स यांचा उदय झालेला असतां हिंदुस्थानांत त्यांचें नांवहि ऐकूं येत नसे, मिल--फॉसेटच्या विचारावरच भूक भागवून घेणें भाग पडत असे. तसा प्रकार हल्लीं होत नाहीं. इटलींतील फॉसिझम, जर्मनींतील हिट्लरिझम किंवा रशियांतील कम्यूनिझम या विषयांची चर्चा व तेथील प्रयोगांची माहिती हिंदुस्थानांत फारसा काल न लोटतां हल्लीं होत असते. जागतिक विचाराच्या दृष्टीनें महाराष्ट्र मागासलेला राहण्याची पूर्वीसारखी हल्लीं आतां फारशी भीति उरलेली नाहीं.

महाराष्ट्रांतील आजचा आर्थिक विचारप्रवाह पुढील मार्ग चांचपडत असतां तो दोन ठिकाणीं विभागलेला दिसतो. प्रि. गाडगीळ हे महाराष्ट्राचे उदयोन्मुख अर्थशास्त्रज्ञ असून त्यांनीं संशोधनाच्याद्वारें महाराष्ट्राच्या आर्थिक प्रश्नाची सेवा करण्याचें व्रत घेतलें आहे व त्यासाठीं महाराष्ट्राबाहेर द. म. ५०० रु. पगाराच्या प्रिन्सिपालशिपवर पाणी सोडून ते महाराष्ट्रांत आले आहेत. तेव्हां नजीकच्या काळांत अर्थशास्त्रीय संशोधनास उत्तेजन मिळणार यांत शंका नाहीं. मुंबई-पुण्यांत समाज-सत्तावाद बोलणारे व त्यासाठीं प्रसंगीं कायिक व मानसिक हालअपेष्टा सोसण्यास तयार असणारे तरुण हे महाराष्ट्रांत समाजसत्तावादाचा प्रचार करीत आहेत. अशा रीतीनें स्वार्थत्याग व अभ्यास या बळावर शास्त्र व समाज यांची सेवा करण्याचें महाराष्ट्राचें धोरण इतर ठिकाणाप्रमाणें याहि अर्थशास्त्राच्या प्रांतांत व्यक्त होते. आजचा महाराष्ट्रीय आर्थिक विचारसंशोधन व समाजसत्तावाद या दोन दिशांनीं प्रगती करीत आहे. याचा संगम भावी कालांत प्लॅन्ड इकॉनमीच्या तत्त्वावर उभारलेल्या राष्ट्रीय समाजसत्तावादांत होणार कीं काय तें भविष्यकाळास माहीत.

---

१४

# शास्त्रीय वाङ्मय

[ लेखकः-प्रो. जनार्दन नीलकंठ कर्वे, एम्.एस्सी. ]

मराठी भाषेमध्यें गद्यरचनेला नक्की केव्हां सुरुवात झाली हा मुद्दा जरी थोडा वादग्रस्त असला तरी एकोणिसाव्या शतकापर्यंत एखादी स्वतंत्र गद्यरचना झालेली आढळत नाहीं. युरोपिअन लोकांशीं आमचा संबंध आल्यानंतरच ग्रंथ-कर्तृत्वाला विशेष चालना मिळाली व आमच्यामधील विद्वानांना आपण कांहीं तरी ग्रंथरचना करून ती लोकांपुढें ठेवून त्यांना सुविद्य करावें, असें वाटूं लागलें. विद्या-दानाच्या बाबतींत अगर विद्याग्रहण करण्यासंबंधांत आमचा विशेष जर कोणाशीं संबंध आला असेल तर तो मिशनरी लोकांशीं. या लोकांनीं बऱ्याच ठिकाणीं शाळा उघडून युरोपखंडांत त्या वेळीं प्रचलित असलेली शिक्षण-पद्धति येथें सुरू केली. या कालांत तिकडील विद्वान् लोकांच्या परिश्रमामुळें नवीं भौतिक शास्त्रें उदयाला येत होतीं व अस्तित्वांत असलेलीं झपाट्यानें वाढत होतीं. यांपैकीं कित्येक शास्त्रांचा आम्हांला गंध देखील नव्हता. आम्हांला विशेष अवगत असलेलीं शास्त्रें म्हणजे दोनच. एक ज्योतिष आणि दुसरें वैद्यक. या दोन्ही शास्त्रांत आमची बरीच प्रगति झालेली होती. त्यांतल्या त्यांत आमच्या ज्योतिषशास्त्रानें जगांत आपलें नांव चिरस्मरणीय करून ठेविलेलें आहे. रसायनशास्त्र, वनस्पतिशास्त्र, गणितशास्त्र वगैरे शास्त्रें देखील आम्हांला अवगत होतीं, परंतु वर दिलेल्या दोन प्रमुख शास्त्रांना पोषक अशीं तीं दुय्यम दर्जाचीं मानलीं जात असत. या व इतर शास्त्रांवरील

सगळे ग्रंथ संस्कृत भाषेंत व तेहि पद्यरूपांत असत. हीं शास्त्रें किंवा आम्हांला माहित नसलेलीं युरोपीय शास्त्रें उपरिनिर्दिष्ट शाळांतून सामान्य जनतेला थोड्या प्रमाणांत कां होईना शिकवावयाचीं म्हटल्यानंतर तीं मराठींतून म्हणजे व्यवहारभाषेंतूनच शिकविणें प्राप्त होतें व त्याकरितां पुस्तकांची जरूर भासूं लागली होती. ही गरज भागविण्याकरितां मराठी ग्रंथ तयार होऊं लागले. अशा रीतीनें मराठी शास्त्रीय वाङ्मयाचा उगम या शालेय पुस्तकांतून झाला. सुरुवातीला जे ग्रंथ निर्माण झाले ते सगळे इंग्रजींतील त्या त्या शास्त्रांवरील क्रमिक पुस्तकांचीं भाषांतरें होत. परंतु तेवढ्यानें त्यांची किंमत कमी लेखितां येत नाहीं. शास्त्रीय विषयांची गोडी लावण्याच्या कामीं या किंवा अशा पुस्तकांचा, तीं सुबोध असतील तर, निःसंशय उपयोग होतो.

प्रस्तुत लेखांत गेल्या साठ वर्षांत म्हणजे १८७५ पासून १९३५ पर्यंत प्रसिद्ध झालेल्या मराठी शास्त्रीय वाङ्मयाचा विचार कर्तव्य असल्यामुळें सुरुवातीच्या काळापासून तों १८७५ पर्यंत जें कांहीं स्वतंत्र अगर भाषांतरित शास्त्रीय वाङ्मय निर्माण झालें त्याचा येथें निर्देश केलेला नाहीं. परंतु हा काल एका दृष्टीनें विशेष महत्त्वाचा वाटतो. कारण १८४७ सालापासून मराठी भाषेंत शास्त्रीय विषयांवर स्वतंत्रपणें ग्रंथरचना व्हावयास सुरुवात झाली. यानंतरच्या वीस वर्षांत जीं कांहीं स्वतंत्र शास्त्रीय पुस्तकें निर्माण झालीं त्यांत रा. फडके यांचें 'यंत्रशास्त्र', कृष्णशास्त्री भाटवडेकरांचें 'विद्युत्', डॉ. चोभे यांचें 'शारीरशास्त्र', डॉ. नारायण दाजी यांचें 'रसायनशास्त्र' आणि रा. हरिश्चंद्र चिंतामण यांचें 'प्रकाश-लेखन' हीं विशेष उल्लेखनीय होत. या कालांत वैद्यकविषयक इंग्रजी ग्रंथांचीं मराठींत भाषांतरें झालेलीं आढळून येतात. याचें मुख्य कारण म्हणजे मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें वैद्यकविषय मराठींतून शिकविण्याची सोय केलेली होती; व त्याकरितां जितकीं पुस्तकें मराठी भाषेंत उतरतां येतील तितकीं पाहिजेच होतीं.

सन १८७५ पासून पुढच्या काळांत निरनिराळ्या शास्त्रीय विषयांवर पुस्तकें प्रसिद्ध होण्यास सुरुवात झाली. किरकोळ पुस्तकें जमेस धरून या काळांत किती पुस्तकें प्रसिद्ध झालीं याचा जर विचार केला तर शास्त्रीय पुस्तकांची संख्या बरीच फुगलेली दिसते. परंतु त्यांतील खरोखर शास्त्रीय व उपयुक्त अशीं पुस्तकें फारच थोडीं आहेत असें आढळून येईल.

मराठी भाषेंत शास्त्रीय वाङ्मय निर्माण व्हावयाला मिशनरी लोकांनीं सुरू केलेल्या शाळा कारणीभूत झाल्या, हें वर सांगितलेंच आहे. या शाळांमधून शिक्षणाचें माध्यम मराठी होतें व बहुतेक सगळे विषय मराठींतूनच शिकविले जात असत. ही स्थिति जोंपर्यंत कायम होती तोंपर्यंत भाषांतरित म्हणा अगर स्वतंत्र म्हणा पण मराठींत शास्त्रीय वाङ्मयाची निपज मोठ्या प्रमाणावर सुरू होती. कालांतरानें ही स्थिति पालटली. शाळांमधील शिक्षणाचें माध्यम बदलून मराठीच्या जागीं इंग्रजी भाषेचा शिरकाव होऊं लागला. कांहीं वर्षांनीं संस्कृत व भाषाविषय हे देखील इंग्रजींतून शिकण्याची पाळी आली. या बदललेल्या परिस्थितीचा परिणाम असा झाला कीं, मातृभाषेपेक्षां इंग्रजी भाषेकडेच आमचें लक्ष जास्त वेधलें जाऊं लागलें. शास्त्रीय वाङ्मयाची निपज कमी कमी होऊं लागली. कारण इंग्रजी भाषेंत निरनिराळ्या शास्त्रीय विषयांवर मुबलक ग्रंथसंपत्ति असल्यामुळें तीं पुस्तकें वाचण्या-कडेच लोकांचा कल झुकूं लागला. परंतु या कारणांमुळें उत्पन्न झालेली ही उदासीनता फार वर्षे टिकली नाहीं. कोणताहि विषय आपल्या भाषेंतून न शिकतां परकी भाषेंतून शिकावा लागल्यामुळें वेळ आणि शक्ति यांचा व्यर्थ अपव्यय होतो, हें लोकांच्या लवकरच ध्यानांत आलें. एकंदर वाङ्मयाचीच पिच्छेहाट जेथें झाली तेथें शास्त्रीय वाङ्मयासंबंधानें तर बोलावयासच नको. आपल्या वाङ्मयाचें पुनरुज्जीवन अवश्य केलें पाहिजे, अशी लोकांची प्रवृत्ति होऊं लागली. परंतु एकदां बंद पडलेला वाङ्मय-प्रवाह पुन्हां सुरू करावयाला फार अडचणी येऊं लागल्या. शाळांमधून पुन्हां मराठीं-तून शिक्षण द्यावयाची अडचण भासूं लागली. आणि त्याचें कारण म्हणजे योग्य ग्रंथांचा अभाव. शास्त्रीय विषयांवरील ग्रंथनिर्मिति जरी या काळांत थांबलेली होती तरी वर्तमानपत्रें, मासिकें वगैरेंमधून शास्त्रीय विषयांवर थोडेंबहुत लिखाण येत असे. या लेखांमुळेंच एकदां पाजळलेली मशाल मिणमिणित कां होईना पण टिकाव धरून राहिली होती. एखाद्या शास्त्रावरील ग्रंथ व नियतकालिकांतील त्याविषयींचे लेख यांत फार अंतर पडतें. कारण नियतकालिकांमधून येणारे लेख शाश्वत नसतात. एखाद्या विषयावर क्रमशः प्रसिद्ध होणारे लेख पुस्तकरूपानें प्रसिद्ध कराव-याचे झाल्यास त्यांना टिकाऊपणा आणण्याच्या दृष्टीनें चांगला उजळा देऊन मगच ते संग्रहित करावे लागतात. शास्त्रीय वाङ्मय त्या काळीं विशेष प्रसृत न होण्याचें आणखी एक कारण आहे. प्रत्यक्ष ज्ञानदानाचें कार्य करणारे शिक्षक आणि अशा तऱ्हेच्या वाङ्मयाची आवड असणारे कांहीं विद्वान् लोक यांखेरीज बहुजनसमाज

शास्त्रीय ज्ञानाविषयीं उत्सुक नव्हता. त्यामुळें पुस्तकें लिहिणारांनीं तीं लिहून प्रसिद्ध केलीं तरी त्यांना गिन्हाईक फारच मर्यादित असे. त्या वेळच्या स्थितींत आणि आज जरी थोडासा इष्ट असा फेरबदल झालेला असला तरी बहुजनसमाजाच्या एकंदर शास्त्रीय वाङ्मयविषयक मनःस्थितींत विशेषसा फरक पडलेला नाहीं.

हल्लींच्या परिस्थितीवरून मराठी भाषेचें दैन्य लवकरच संपून तिला चांगले दिवस पुन्हां दिसणार, अशी आशा करावयास जागा आहे. दुय्यम शिक्षणक्रमांत मराठी भाषेच्या माध्यमांतूनच शिक्षण देण्यांत यावें अशाबद्दल प्रयत्न सुरू असून त्यांना जवळजवळ यश आलेलें आहे. इतकेंच नव्हे, तर उच्च शिक्षणक्रमांत देखील मराठी भाषेची हेळसांड होऊं नये अशाबद्दल प्रयत्न सुरू आहेत. या बाबतींत नागपूरविश्वविद्यालयाला धन्यवाद द्यावेसे वाटतात. देशी भाषांचा पुरस्कार करण्याच्या बाबतींत या विश्वविद्यालयानें हिंदुस्थानांतील दुसऱ्या विश्वविद्यालयांना निःसंशय मार्ग टाकलें आहे.

आतां निरनिराळ्या शास्त्रांवर गेल्या साठ वर्षांत जें वाङ्मय निर्माण झालें त्याचा साकल्यानें पण विषयवार विचार करूं. सोईकरितां खालील मुख्य शास्त्रेंच घेतलीं आहेत. १ शिल्पशास्त्र, २ भूस्तरशास्त्र, ३ पदार्थविज्ञानशास्त्र, ४ रसायनशास्त्र, ५ मानवशास्त्र, ६ प्राणिशास्त्र, ७ वनस्पतिशास्त्र, ८ जीवशास्त्र, ९ ज्योतिःशास्त्र, १० गणितशास्त्र आणि ११ वैद्यकशास्त्र.

## शिल्पशास्त्र

शिल्पशास्त्रावर आमच्या वाङ्मयांत चांगलासा ग्रंथ नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. जे ग्रंथ आहेत ते शिल्पशास्त्रासंबंधीं आमच्या पूर्वजांना किती ज्ञान होतें, हें दाखविणारे आहेत, परंतु हल्लींच्या सुधारणायुगांत शिल्पशास्त्रांत किती वाढ झालेली आहे हें दाखविणारा सुबोध भाषेंत लिहिलेला असा एकहि ग्रंथ नाहीं. तें राहो, पण शिल्पशास्त्राशीं ज्यांचें आयुष्य निगडित झालेलें आहे अशा इंजिनियर लोकांना त्यांच्या व्यवसायांत उपयोगी पडेल असें एकहि पुस्तक एखाद्या इंजिनियरानें आजपर्यंत लिहूं नये, याचें आश्चर्य वाटतें. शिल्पशास्त्रावर जीं पुस्तकें आहेत त्यांत नाशिकचे रा. वझे यांच्या हिंदी शिल्पशास्त्रावरील पुस्तकाचा ( १९२८ ) उल्लेख अवश्य केला पाहिजे. त्यांच्या ‘ शिल्पशिक्षण ’ या लहान पुस्तकांत शिल्पशिक्षण हें किती महत्त्वाचें आहे, व त्यांत कोणत्या गोष्टींचा अंतर्भाव होतो, हें दाखविलें आहे. दुसरें नेहमीं उपयोगी पडणारें शिल्पशास्त्रावरील पुस्तक म्हणजे देशपांडे इंजिनियर

यांचें 'सुलभवास्तुशास्त्र' ( १९३० ), हें होय. या पुस्तकांत इमारत बांधण्यासंबंधीं सांगोपांग माहिती दिली आहे. या सदरांतील आणखी एक उल्लेखनीय पुस्तक म्हणजे रा. शिंत्रे यांचें 'निरीक्षकाचें निरीक्षण' ( १९२८ ), हें होय. या पुस्तकांत लेव्हल दाखविण्याऱ्या यंत्राचें वर्णन व त्याचा उपयोग यासंबंधीं संपूर्ण माहिती दिली आहे.

शिल्पशास्त्रांतच ज्याचा अंतर्भाव होतो त्या नौकानयनशास्त्रावर दोनच ग्रंथ आढळतात. पहिला बापटशास्त्री यांचा 'नौकानयनाचा इतिहास' हा होय. या पुस्तकाची पहिली आवृत्ति १८७९ मध्यें निघाली व दुसरी १८८८ मध्यें प्रसिद्ध झाली. सदरहू छोट्या पुस्तकांत प्राचीन युरोपांत नौकानयनाची स्थिति काय होती, तें सांगितलें आहे. शिवाय कोलंबसानें अमेरिकेचा शोध कसा लावला आणि वास्को द गामा जलमार्गानें हिंदुस्थानांत कसा आला, यासंबंधीं हकीकत दिली आहे. ही सर्व माहिती मनोरंजक आहे, परंतु तीबरोबरच हिंदु लोकांच्या नौकानयनाचा इतिहास जर या पुस्तकांत समाविष्ट केला असता तर तो खात्रीनें अधिक बोधप्रद व मनोरंजक झाला असता. हिंदु लोक दर्यावर्दीपणांत फार निपुण होते व त्याच्या जोरावर ते व्यापाराकरितां दूर देशीं जात असत, इतकेंच नव्हे, तर आफ्रिकाखंडासारख्या फार दूरच्या प्रदेशांत जाऊन त्यांनीं वसाहती केल्या होत्या, यासंबंधींचा पुरावा उपलब्ध आहे. हा सगळा इतिहास या पुस्तकांत किंवा स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध होणें अवश्य आहे. नौकानयनावरील दुसरें पुस्तक पोरबंदर संस्थानचे इंजिनियर रा. भोसेकर यांचें 'नौकानयन' ( १९१२ ), हें होय. हें पुस्तक जहाजावरील कप्तान, इंजिनियर वगैरे लोकांच्या विशेष उपयोगी आहे. यांत नौकानयनाला लागणाऱ्या सर्व उपकरणांची चांगली माहिती दिली असून त्यासंबंधीं लागणाऱ्या गणिताचीहि फोड करून सांगितली असल्यामुळें हें पुस्तक फार उपयुक्त झालें आहे.

## भूस्तरशास्त्र

जी गत शिल्पशास्त्रासंबंधींच्या पुस्तकांची तीच भूस्तरशास्त्रासंबंधीं. या शास्त्रावर मराठी वाङ्मयामध्यें प्रमाणग्रंथ एकहि नाहीं. सामान्य जनतेला या विषयासंबंधानें ज्यांतून माहिती मिळूं शकेल असें पुस्तक देखील आढळांत नाहीं. विकासवादासंबंधीं माहिती देणाऱ्या पुस्तकांमधून जी काय आवश्यक म्हणून माहिती द्यावी लागली असेल तेवढीच मराठी वाचकांच्या समोर आहे. या विषयावरील जीं काय दोन चार पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत तीं अगदींच किरकोळ आहेत. रा. का. बा. मराठे यांनीं

एका इंग्रजी शालेय पुस्तकाचें भाषांतर १८७५ मध्यें प्रसिद्ध केलें. याच लेखकाचें दगडी कोळशाच्या खाणींसंबंधीं दिलेलें व्याख्यान १८८३ त प्रसिद्ध झालें आहे. प्रो. बा. प्र. मोडक यांनीं आपल्या 'पदार्थवर्णन' या पुस्तकाचा पहिला भाग १८९१ मध्यें प्रसिद्ध केला. या भागांत खनिज पदार्थांसंबंधीं माहिती दिलेली आहे. खरें पाहिलें तर हा भूस्तरशास्त्रविषयक ग्रंथ आहे, असें म्हणतां येणार नाहीं. पुस्तकांत माहिती चांगली दिली असून ती 'विशेषेंकरून शिक्षकांच्या व साधारण गृहस्थांच्या माहितीकरितां' आहे असें प्रस्तावनेंत ग्रंथकर्त्यानें नमूद केलें आहे. या पुस्तकाची दुसरी आवृत्ति १९०५ मध्यें प्रसिद्ध झाली. रा. हुदलीकर यांनीं भूस्तरशास्त्रावर एक पुस्तक लिहिलें आहे, परंतु मला तें पाहावयास मिळालें नाहीं. कदाचित् 'सृष्टि-ज्ञान' मासिकांत हुदलीकरांची या शास्त्रावर जी लेखमाला प्रसिद्ध होत होती तीच पुस्तकरूपानें त्यांनीं प्रसिद्ध केली असण्याचा संभव आहे. 'वेदकालीन भूस्तरशास्त्र' या नांवाचें पुस्तक रा. ना. भ. पावगी यांनीं १९२२ मध्यें प्रसिद्ध केलेलें आहे. पुस्तकाच्या नांवावरूनच आंतील विषयाची कल्पना येण्यासारखी असल्यामुळें जास्त माहिती देण्याची जरूरी दिसत नाहीं.

## पदार्थविज्ञानशास्त्र

पदार्थविज्ञानशास्त्राविषयीं मराठीमध्यें बरेच ग्रंथ झालेले आढळतात. परंतु या ग्रंथांपैकीं आजच्या घटकेला कितीकांचा उपयोग खरोखर होऊं शकेल, याबद्दल जबरदस्त शंका वाटते. ज्या पुस्तकांमधून निव्वळ या शास्त्राच्या मूलभूत कल्पनांचेंच विवरण केलेलें आहे तीं कोणत्याहि काळांत उपयोगी होऊं शकतात. परंतु पुष्कळ वेळां नवीन शोधांमुळें जुन्या कल्पना टाकून द्याव्या लागतात व ज्या पुस्तकांमधून ह्या कल्पना मांडलेल्या असतात त्यांना केवळ ऐतिहासिक महत्त्व उरतें. प्रचलित शास्त्रीय सिद्धांतांचें विवरण ज्यांत केलेलें आहे अशीं पुस्तकें वारंवार तयार व्हावयास पाहिजेत व अशा पुस्तकांनाच प्रचलित शास्त्रीय वाङ्मयांत महत्व असतें.

प्रो. बाळाजी प्रभाकर मोडक यांनीं पदार्थविज्ञानशास्त्रावर पुष्कळच पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं स्वतंत्र तर कांहीं सुप्रसिद्ध इंग्रजी पुस्तकांचीं भाषांतरें आहेत. ग्यानोच्या सुप्रसिद्ध पुस्तकाचें त्यांनीं चार भागांत भाषांतर केलेलें आहे. भाषांतर चांगलें असून हल्लींच्या काळांत देखील ज्या शाळांमधून मराठी माध्यम आहे तेथें तें पुस्तक वापरण्यासारखें आहे. याशिवाय पदार्थविज्ञानशास्त्राचा उपोद्घात, सृष्टिशास्त्राचीं मूलतत्त्वें, सृष्टिशास्त्र (तीन भाग), उष्णता, ध्वनिशास्त्रावरील

व्याख्यानें वगैरे त्यांचीं पुस्तकें चांगलीं आहेत. रा. खोत यांनीं पदार्थविज्ञान-शास्त्रावर १८७८ मध्यें व रा. व्यवहारे यांनीं एका इंग्रजी प्रायमरचें भाषांतर १८९१ मध्यें प्रसिद्ध केलें. 'हवा' ( १८९१ ) या विषयावर रा. गोळे यांनीं लिहून प्रसिद्ध केलेलें पुस्तक चांगलें आहे. पुणें येथील म्युनिसिपल प्राथमिक शाळांमधील शिक्षकांना दिलेलीं सप्रयोग व्याख्यानें या पुस्तकांत आकृतींसहित छापून काढलेलीं आहेत. रा. बा. शं. करंदीकर यांनीं 'वातावरण' ( १९०५ ) नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध केलेलें आहे. वातावरणाची आज जी स्थिति आहे त्या स्थितींतील निरनिराळ्या गोष्टी—हवेचा भार, हवेंतील ओलावा, वारा, वीज, वाताभिसरण, हवामान, हवा—यांचा या पुस्तकांत थोडक्यांत विचार केला आहे. अशा विषयांवरील इंग्रजी भाषेंतील पुस्तकें ज्यांना वाचणें शक्य नसेल त्यांनीं हें पुस्तक अवश्य वाचावें.

अलीकडे प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांमध्यें पदार्थविज्ञानशास्त्रावर बरींच चांगलीं पुस्तकें आहेत. त्या सगळ्यांचा येथें सविस्तर परामर्ष घेणें शक्य नाहीं. त्यांचा थोडक्यांत निर्देश करणेंच सोईचें होईल. डॉ. आपटे यांनीं लिहिलेलीं, 'सामान्य पदार्थविज्ञान' ( १९२७ ) व 'पडत्या फळाचा संदेश' ( १९३० ) हीं दोन पुस्तकें अत्यंत उपयुक्त असून शाळांमधील वरच्या इयत्तांमधील विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां म्हणून लिहिलेलीं आहेत, पण सामान्य वाचकांना देखील तीं सहज समजतील अशीं आहेत. व्यावहारिक उदाहरणें देऊन विषय सुगम करण्याची कला लेखकाला चांगली साधली आहे. याच लेखकाचें 'रंग आणि तरंग' भाग १ ला हें पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. हल्लींच्या काळीं लहरींना—मग त्या उष्णतेच्या असोत, प्रकाशाच्या असोत, ध्वनीच्या असोत किंवा विजेच्या असोत—इतकें महत्त्व आलें आहे कीं, प्रत्येकाला त्यांसंबंधीं थोडीबहुत माहिती असणें इष्ट आहे. सोप्या भाषेंत ही माहिती देण्याच्या हेतूनें हें पुस्तक लिहिलेलें आहे. प्रो. स. वि. आपटे यांनीं 'वाहती वीज' व 'यामिकप्रदीप' ( १९२४ ) हीं पुस्तकें लिहिलीं आहेत. दोन्हीहि पुस्तकें उपयुक्त आहेत. यामिकप्रदीप हें पुस्तक कॉलेजच्या विद्यार्थ्यांकरितां आहे. इंग्रजी भाषेंतून ज्ञानसंपादनाची संवय झालेल्या विद्यार्थ्यांना या पुस्तकांतील भाषा बोजड व क्लिष्ट वाटेल. 'हवेंतील चमत्कार' हें रा. वि. अ. ठोंबरे यांनीं लिहिलेलें पुस्तक सुबोध असून मुलांकरितां आहे. विजेवरील पुस्तकांमध्यें रा. धर्माधिकारी यांचीं 'तडित्' व 'विजेचा इतिहास' (१९२५) हीं दोन्ही पुस्तकें अत्यंत वाचनीय आहेत. विजेसंबंधीं माहिती मिळविणाराला हीं वगळून चालणार नाहीं.

बडोद्याचे प्रो. ना. का. आपटे यांनींहि विद्युत् ( १९३३ ) नांवाचें एक पुस्तक श्रीसयाजीसाहित्यमालेसाठीं लिहिलें आहे. याशिवाय रा. दाते यांनीं 'विद्युत् व विद्युत् क्रेन' 'विद्युत् तारांची रचना', 'विद्युत् स्वावलंबन' 'विद्युत् व लोहचुंबक' वगैरे पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. या पुस्तकांत माहिती प्रश्नोत्तररूपानें दिली आहे. 'मोटार कशी हांकावी' ( १९३२ ) व 'मोटार कशी चालते' (१९३३) हीं रा. देशपांडे यांनीं लिहिलेलीं दोन पुस्तकें या विद्युत् सदरांत घालावयास हरकत नाहीं. रा. वैद्य यांनीं 'मुलांकरितां प्रकाश' ( १९३३ ) नांवाचें एक छोटें पुस्तक लिहिलेलें आहे. प्रो. आइनस्टाइन यांच्या 'रिलेटिव्हिटी' वर जबलपूरचे प्रो. मटंगे यांनीं 'अपेक्षावाद' ( १९३४ ) हें पुस्तक लिहिलेलें आहे. प्रस्तुत पुस्तक उत्कृष्ट आहे. पुस्तकांत आवश्यक तेवढाच गणिताचा जरी उपयोग केलेला असला तरी तेवढ्या गणितामुळेंच पुष्कळ सामान्य वाचकांना तें अवघड वाटण्याचा संभव आहे. रा. भालेराव यांनीं या विषयावर लिहिलेलें एक पुस्तक सध्यां छापत आहे. आइनस्टाइनच्या मताप्रमाणें सापेक्षतेची कल्पना देणारें अत्यंत सुलभ भाषेंत लिहिलेलें पुस्तक अवश्य प्रसिद्ध व्हावयास पाहिजे. वरील पुस्तकांखेरीज आणखीहि या शास्त्रावरील पुस्तकें झालेलीं आहेत, पण तीं बहुतेक क्रमिक पुस्तकें आहेत.

## रसायनशास्त्र

रसायनशास्त्रावर म्हणण्यासारखीं पुस्तकें नाहींतच. जीं कांहीं आहेत त्यांपैकीं बरींचशीं शाळांमधून उपयोगांत आणण्याकरितां लिहिलेलीं क्रमिक पुस्तकें आहेत. रा. मराठे यांनीं जीं भाषांतरित क्रमिक पुस्तकें लिहिलीं त्यांत 'रसायनशास्त्र प्रायमर' ( १८७९ ) हें रसायनशास्त्रावरचें पुस्तक होतें. त्यानंतर जीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं त्यांत प्रो. मोडक यांनीं 'निरिंद्रिय रसायनशास्त्र', भाग १ ( १८७६ ) व भाग २ ( १८९० ) लिहून प्रसिद्ध केला. सन १९०० व १९०६ मध्यें सेंद्रिय रसायनशास्त्रावरचीं त्यांचीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं. हीं चारहि पुस्तकें उपयुक्त असून यांपेक्षां चांगलीं पुस्तकें सेंद्रिय व निरिंद्रिय रसायनशास्त्रावर मराठींत नाहींत. वैद्य त्र्यं. गु. काळे यांनीं 'भारतीय रसायनशास्त्र' ( १९१२ ) नांवाचें एक पुस्तक लिहिलेलें आहे. सदरहू पुस्तकांत वैद्यांना विशेष उपयोगी अशीच माहिती असल्यामुळें त्याला रसायनशास्त्रावरचें पुस्तक म्हणतां येत नाहीं. किमयेसंबंधीं माहितीहि या पुस्तकांत दिलेली आहे. डॉ. आपटे यांनीं 'रसायनभूमिका' ( १९२५ ) नांवाचें पुस्तक लिहिलें आहे, परंतु तें विद्यार्थ्यांच्या उपयोगा-

करितां आहे. याच ग्रंथकर्त्याचें ' इंद्रियरसायन ' ( १९३२ ) नांवाचें एक लहानसें पण चांगलें पुस्तक प्रसिद्ध झालेलें आहे.

### मानवशास्त्र

मानवशास्त्रावर शास्त्रीय वाङ्मयांत चांगलें पुस्तक नाहीं. प्रो. धों. के. कर्वे यांच्या दाभोळकरांनीं प्रकाशित केलेल्या ' शास्त्ररहस्य ' ( १८९४ ) या पुस्तकांत ' मनुष्यप्राण्याची मूळपीठिका ' हा ४२ पानांचा या विषयावरील निबंध प्रसिद्ध झाला होता. तोच पुढें लहानसा पुस्तकरूपानें स्वतंत्रपणें प्रसिद्ध झाला. या पुस्तकाखेरीज या विषयावर लिहिलें गेलेलें पुस्तक आमच्या पाहण्यांत आलेलें नाहीं.

## जीवशास्त्र, प्राणिशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र

एकमेकांशीं विशेष संबंध असल्यामुळें या तीन शास्त्रांवरील पुस्तकांचा एके ठिकाणीच आढावा घेणें सोईस्कर होईल. या तिन्ही शास्त्रांवर मराठींत बरींच पुस्तकें निर्माण झालेलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं खरोखरच भाषेंत कायम टिकणारीं अशीं आहेत, तर कांहीं जुनीं झाल्यामुळें निरुपयोगी झालेलीं आहेत.

जीवशास्त्र, प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्र यांना सारखींच लागू पडणारीं अशीं सर्वसाधारण पुस्तकें पांच सात आहेत. दाभोळकर यांच्या पुस्तकमालेंतून प्रसिद्ध झालेलें ' जीवनशास्त्राचीं तत्त्वें ' ( १८९७ ) हें रा. वि. बा. भाटे यांचें पुस्तक विवेचनाच्या व भाषेच्या दृष्टीनें चांगलें आहे. त्यांत श्वासोच्छ्वास, शरीररचना, पोषण वगैरे जीवक्रियांची चांगली माहिती दिली आहे. परंतु हें पुस्तक आतां फार जुनें झाल्यामुळें त्याचा हल्लींच्या काळीं फारसा उपयोग नाहीं. या विषयावर झालेलें नवीन संशोधन संकलित करून या पुस्तकाची सुधारून वाढविलेली आवृत्ति काढणें अगर याच विषयावर स्वतंत्र पुस्तक काढणें जरूर आहे. रा. भाटे यांच्या त्याच मालेंतील ' जननमरणमीमांसा ' ( १९०७ ) या पुस्तकासंबंधीं वरच्याप्रमाणेंच म्हणावें लागेल. सदरहू पुस्तकांत जननमरणासंबंधींच्या पाश्चात्य आणि पौर्वात्य कल्पनांचा विचार केलेला आहे. निवळ शास्त्रीय दृष्टि ठेवून सदर पुस्तक जर लिहिलें गेलें असतें तर तें कमी बोजड झालें असतें. सजीवसृष्टीची उत्क्रांति ( १९२४ ) हें रा. दातार यांचें पुस्तक श्रीसयाजीसाहित्यमालेंतून प्रसिद्ध झालें आहे. पृथ्वीच्या पाठीवर प्राणी आणि वनस्पति यांचा कसकसा विकास होत गेला, हें या पुस्तकांत फार चांगल्या रीतीनें दिग्दर्शित केलें आहे. पुस्तकाची भाषा कोठेंहि कठिण वाटत नाहीं.

एकंदर पुस्तक सामान्य वाचकाला मनोरंजक वाटेल असेंच आहे. श्रीसयाजीबालज्ञानमालेंत प्रसिद्ध झालेल्या 'कोषाचें वर्णन' (१९३५) या रा. फळणीकर यांच्या भाषांतरित पुस्तकाची स्थिति रा. दातार यांच्या पुस्तकाच्या अगदीं उलट आहे. 'कोषाचें वर्णन' हें पुस्तक बालांना ज्ञान देण्याकरितां म्हणून तयार केलेलें आहे. परंतु आंतील भाषेवरून व एकंदर विवेचनावरून तें बालवाचकांच्या आवांक्यावाहेरचें आहे, असें आम्हांला वाटतें. सामान्य वाचकालाच झाला तर त्याचा थोडाबहुत उपयोग होईल. 'शरीरांतील आश्चर्यकारक भाता' (१९२१) हें रा. टोंबरे यांचें पुस्तक सुबोध असून श्वसनक्रियेविषयीं चांगल्या तऱ्हेनें समजूत पटविणारें आहे. प्रजननशास्त्रावर दोन पुस्तकें आहेत: एक मोडक यांचें 'सुप्रजाजननशास्त्र' (१९२७) व दुसरें रानडे यांचें 'सुप्रजानिर्माणशास्त्र' (१९०७). दोन्ही पुस्तकें बरीं आहेत.

प्राणिशास्त्रावरील पुस्तकांत 'हिंदुस्थानांतील सर्प' (१८९३) हें डॉ. चिपळूणकर यांचें पुस्तक फारच चांगलें आहे. याच विषयावर कर्नल घारपुरे यांनीं 'महाराष्ट्रांतील साप' (१९२८) हें पुस्तक लिहिलें आहे. घारपुरे यांनीं 'प्राणी व आरोग्य' या नांवाचें आणखी एक पुस्तक लिहिलें आहे. यांत चापट कृमि, उधई, माशा, डांस, विंचू, साप, उंदीर, घुशी वगैरे मनुष्याला उपद्रव देणाऱ्या प्राण्यांविषयीं सुलभ माहिती दिली आहे. प्राणिशास्त्राच्या मूलतत्त्वांविषयीं माहिती देणारे दोन ग्रंथ मराठींत १९२३ मध्यें प्रसिद्ध झाले आहेत. पहिला प्रो. बा. प्र. मोडक यांचा व दुसरा रा. बा. श्री. कोल्हटकर यांचा. तुलनात्मक दृष्टीनें पाहतां मोडक यांचा ग्रंथ कोल्हटकरांच्या ग्रंथापेक्षां जास्त चांगला आहे. दोन्ही पुस्तकांत निरनिराळ्या वर्गांतील प्राण्यांच्या संबंधीं माहिती दिलेली आहे. परंतु मोडकांच्या पुस्तकांतील माहिती जास्त पद्धतशीर आहे. कीटकशास्त्रावर बरींच पुस्तकें आहेत. पण त्या सगळ्यांत देशपांडे यांचें 'कीटकशास्त्र' (१९२५) हें पुस्तक उत्कृष्ट आहे. रा. देशपांडे व रा. गोखले यांनीं 'पशू, पक्षी व इतर प्राणी' (१९२७) हें प्राणिशास्त्रावरचें पुस्तक लिहिलेलें आहे. पुस्तक सुबोध आहे, पण त्याचा उपयोग विशेषत: शाळेंतील विद्यार्थ्यांना जास्त होईल. कारण पुस्तकाची रचना त्या दृष्टीनें केलेली आहे. रा. कोल्हटकर यांनीं निरनिराळ्या विषयांवर जीं बरींच पुस्तकें लिहिलीं आहेत त्यांत 'हिंदुस्थानांतील पक्षी' (१९२९) हें एक आहे. पुस्तक जवळजवळ भाषांतरितच असून त्यांत चुकाहि पुष्कळच आहेत. 'मासे व देवमासे' (१८९८), या लहान पुस्तकांत माश्यांचे निरनिराळे प्रकार वर्णन केले आहेत व त्यांविषयीं

रोटक माहिती दिली आहे. रा. जोशी यांचा 'हस्तिविज्ञान' ( १९१० ) हा हत्ती-विषयीं समग्र माहिती देणारा ग्रंथ चांगला आहे. याखेरीज ग्रंथमालेंतील 'प्राणी' हा निबंध नंतर पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाला. मनुष्य आणि इतर प्राणी यांच्या शरीर-रचनेविषयीं तुलनात्मक माहिती देणारा एक उत्कृष्ट ग्रंथ 'तुलनादर्शक शारीरशास्त्र' ( १९०१ ) ब्रूस व वॅलेंटाइन या मिशनऱ्यांनीं प्रसिद्ध केला.

वनस्पतिशास्त्रावर फारशीं चांगलीं पुस्तकें नाहींत. डॉ. भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांनीं 'वनस्पतिशास्त्राचीं मूलतत्त्वें' ( १८८२ ) हें पुस्तक प्रसिद्ध केलें. असाच तऱ्हेचें दुसरें पुस्तक का. बा. मराठे यांनीं 'वनस्पतिशास्त्र प्रायमर' १८८७ मध्यें लिहिलें. मुंबई येथें डॉ. सांबारे यांनीं हेमंतोत्सवव्याख्यानमालेंत वनस्पतींवर एक व्याख्यान दिलें होतें. तेंच व्याख्यान त्यांनीं 'वनस्पतींचा संसार' ( १९०१ ) या नांवाखालीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें. वनस्पतिशास्त्रावर इतकें मनोरंजक व सुबोध असें पुस्तक मराठींत नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. सामान्य जनांकरितां सोप्या भाषेंत पण मनोरंजक होऊन विषयाचें ज्ञान देणारें पुस्तक कसें लिहावें हें डॉ. सांबारे यांच्या पुस्तकावरून कळून येईल. अशा तऱ्हेच्या पुस्तकांची आमच्या शास्त्रीय वाङ्मयांत जरूरी आहे. वनस्पतिशास्त्रावर 'वनस्पतिविचार' (१९१३) नांवाचें पुस्तक रा. दामले यांनीं लिहिलेलें आहे. पुस्तक बरें असलें तरी त्यांत एक मोठी उणीव आहे व ती म्हणजे सदरहू ग्रंथांत कोठेंहि चित्रें अगर आकृति दिल्या नाहींत. 'सुलभ वनस्पतिशास्त्र' भाग १ ( १९२५ ) हें रा. ताम्हने व कान्हे यांनीं लिहिलेलें पुस्तक नुकतेंच ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसनें प्रसिद्ध केलें आहे. सदरहू पुस्तकांत विषय नीट समजावा म्हणून भरपूर चित्रें दिलीं आहेत. विवेचनदेखील बरें आहे, पण लेखकांना तें यापेक्षांहि जास्त चांगलें करतां आलें असतें. डॉ. वा. गं. देसाई यांच्या 'औषधीसंग्रह' (१९२७) या पुस्तकाचा वनस्पतिशास्त्रावरील पुस्तकांबरोबरच उल्लेख करणें योग्य होईल असें वाटतें. हा ग्रंथ वैद्य व डॉक्टर यांना अत्यंत उपयोगी तर आहेच, पण वनस्पतिशास्त्राचा अभ्यास करणारांनादेखील तो उपयुक्त वाटेल. यांत हिंदुस्थानांतील औषधी-वनस्पतींची माहिती फारच चांगली दिली आहे. वनस्पतींचें वर्गीकरण, त्यांचें वर्णन, वनस्पतींचे शरीरावर होणारे परिणाम, वनस्पतींची रोगांवर योजना, वनस्पतींचें रसशास्त्र वगैरे माहिती बहुमोल आहे. पदेशास्त्री यांचें 'वनौषधि-गुणादर्श' या नांवाचें एक पुस्तक आहे तें वैद्यांनाच विशेष उपयोगी पडणारें आहे. कारण त्यांत वनस्पतींची विशेष माहिती दिली आहे. 'वनस्पतिजीवन' ( १९३२ ) नांवाचें रा. गोखले यांचेंहि एक पुस्तक आहे.

## ज्योतिःशास्त्र

ज्योतिःशास्त्राचे ज्योतिःशास्त्र ( खगोलशास्त्र ) व फलज्योतिष हे दोन भाग सोईकरितां पाडतां येतील. प्रस्तुत लेखांत फक्त पहिल्याच भागावरील ग्रंथाचा विचार केला आहे. फलज्योतिषावर मराठींत इतकीं पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत व दररोज होत आहेत कीं, त्या सगळ्यांचा विचार करावयाचा झाला तर एक स्वतंत्र लेखच लिहावा लागेल.

ज्योतिःशास्त्रावर अत्यंत सुबोध आणि मनोरंजक रीतीनें लिहिलेलीं दोन तीन पुस्तकें मराठी भाषेंत आहेत. यांपैकीं रा. शं. बा. दीक्षित यांचें 'ज्योतिर्विलास अथवा रात्रीची दोन घटका मौज' हें पहिलें होय. हें पुस्तक १८९२ सालीं प्रसिद्ध झालें. तेव्हां-पासून आजपर्यंत या पुस्तकाच्या पांच आवृत्त्या निघालेल्या आहेत. इतक्या आवृत्त्या निघण्याचें भाग्य या पुस्तकाखेरीज ज्योतिःशास्त्रांतील दुसऱ्या कोणत्याहि पुस्तकाला लाभलेलें दिसत नाहीं. या पुस्तकाचे गुण दाखविण्याकरितां पानेंच्या पानें खर्ची घातलीं तरी तीं अपुरींच पडतील इतकें तें उत्कृष्ट आहे. मराठी साहित्यसंमेलनाच्या १९ व्या अधिवेशनांतील शास्त्रीय विभागाचे अध्यक्ष प्रो. परांजपे यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत या पुस्तकाविषयीं "ज्योतिर्विलास या नांवाच्या विश्ववर्णनात्मक शास्त्रीय ग्रंथाच्या तोडीचें दुसरें पुस्तक अद्यापि निर्माण झालें नाहीं, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं," असे उद्गार काढले आहेत. सामान्य वाचकांकरितां लिहिलेलें या विषयावरील दुसरें पुस्तक म्हणजे रा. चिटणीस यांचें 'अंतरिक्षांतील चमत्कार' ( १८९६ ) हें होय. या पुस्तकाची एकंदर ठेवण ज्योतिर्विलास या पुस्तकासारखीच आहे. हें पुस्तक चागलें असूनहि महाराष्ट्रीय वाचकांचें त्याकडे जितकें लक्ष जावयास पाहिजे तितकें गेलेलें दिसत नाहीं. याच पद्धतीनें लिहिलेलीं दुसरीं पुस्तकें रा. पेठे यांचे 'विश्वचमत्कार' ( १८९४ ), रा. स. बा. देशपांडे यांचें 'तेजोनिधिसूर्य' (१९२२), हीं होत. रा. केळकर यांनीं 'आकाशाचे देखावे' (१८९१) हें पुस्तक खगोलशास्त्राचा अभ्यास करणारांकरितां लिहिलें आहे. या पुस्तकांत आकाशाचे १२ नकाशे दिले असून त्यांची माहिती दिलेली आहे. रा. ढवळे यांनीं 'विश्वाची रचना आणि उत्क्रांति' हें पुस्तक १९३२ मध्यें प्रसिद्ध केलें. रा. दीक्षित यांच्या स्मरणार्थ हा निबंध लिहिण्यांत आलेला आहे. विश्वाच्या रचनेसंबंधीं नवीन शोधांमुळें जी कांहीं माहिती उपलब्ध झालेली आहे तिचा उपयोग करून हें पुस्तक लिहिलेलें असल्यामुळें रा. शं. बा. दीक्षित यांच्या ज्योतिर्विलास पुस्तकां-

तील ' विश्वाची रचना ' या शेवटच्या प्रकरणाची सदरहू पुस्तक ही एक पुरवणीच होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्योतिःशास्त्राच्या इतिहासावर रा. दीक्षित यांनीं ' भारतीय ज्योतिःशास्त्र ' (१८९६) नांवाचें पुस्तक लिहिलेलें आहे. या पुस्तकाची द्वितीयावृत्ति आर्यभूषण छापखान्यानें १९३१ मध्यें प्रसिद्ध केलेली आहे. परंतु पहिल्या आवृत्तींत आणि दुसरींत मजकुराच्या दृष्टीनें कांहींहि फरक केलेला नाहीं. पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाल्यापासून दुसरी प्रसिद्ध होईपर्यंत एतद्विषयक ज्ञानांत जी कांहीं भर पडली असेल तिचा दुसऱ्या आवृत्तींत उपयोग करून घ्यावयास पाहिजे होता; परंतु तसें केलेलें दिसत नाहीं. हें काम नागपूरचे वकील, एक विख्यात ज्योतिःशास्त्रज्ञ व करणग्रंथाचे कर्ते रा. दप्तरी यांनीं केलें आहे. रा. दप्तरी यांनीं ' भारतीय ज्योतिःशास्त्र निरीक्षण ' नांवाचें पुस्तक लिहून रा. दीक्षित यांच्या भारतीय ज्योतिःशास्त्रांत राहून गेलेल्या उणीवा दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. ज्योतिर्गणितावर प्रसिद्ध साहित्यसेवक श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचें 'भारतीय ज्योतिर्गणित' (१९१३) नांवाचें चांगलें पुस्तक प्रसिद्ध झालेलें आहे. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत रा. केतकर यांचें ' गोलद्वयप्रश्नविमर्श ' नांवाचें पुस्तक आहे. यांत मुख्यत्वेंकरून सूर्य आणि इतर ग्रह यांच्या परस्पर आकर्षणाचा गणितदृष्ट्या विचार केलेला आहे. परंतु गणिताची अंगिकारलेली पद्धति न्यूटोनियन म्हणजे अगदीं जुनी आहे. हल्लींच्या काळांत या पद्धतीचा कोणी सहसा अवलंब करीत नाहीं.

फलज्योतिषावर अनेक पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत व होत आहेत, असें वर म्हटलें आहेच. या पुस्तकांची मोजदाद न करणेंच बरें. हीं सगळीं पुस्तकें गतानुगतिकत्व दाखविणारीं आहेत, नवीन संशोधनाला चालना देणारीं पुस्तकें यांत नाहींत. नाहीं म्हणावयाला चिकित्सक बुद्धीनें लिहिलेलें असें एकच पुस्तक आम्हांला आढळलें व तें म्हणजे रा. गोखले यांचें ' फलज्योतिषचिकित्सा ' ( १९३५ ) हें होय. अर्थातच फलज्योतिषावर ज्याचा विश्वास नाहीं अशा गृहस्थानें हें पुस्तक लिहिलें आहे.

## गणितशास्त्र

गणितशास्त्रावर फारच थोडीं पुस्तकें आहेत. जीं आहेत तीं बहुतेक शाळेंत वापरलीं जाणारीं क्रमिक पुस्तकें आहेत. कॉलेजांतून गणितशास्त्र इंग्रजी ग्रंथांच्या आधारानेंच शिकविलें जात असल्यामुळें उच्च गणितावर अलीकडे पुस्तकें निर्माण झालेलीं नाहींत. जीं काय आहेत तीं जुनीं आहेत व त्यांपैकीं बहुतेक इंग्रजी अगर

संस्कृत पुस्तकांचीं भाषांतरें आहेत. या शास्त्रावरील पुस्तकांत एका इंग्रजी पुस्तकावरून भाषांतरित असें कुलकर्णी यांचें 'क्षेत्र शंकुच्छेद' हें 'कॉनिक सेक्शन्स' वरील पुस्तक आहे. विनायकशास्त्री खानापूरकर यांनीं 'लीलावतीचें भाषांतर' ( १८९७ ) व 'भास्कराचार्यांचें बीजगणित' ( १९१३ ) हीं आमच्या गणितशास्त्राची माहिती देणारीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. याशिवाय 'गोलाध्याय' नांवाचें एक पुस्तक त्यांनीं प्रसिद्ध केलें आहे. त्रिकोणमितीवर दोन तीन पुस्तकें आढळतात.

## वैद्यकशास्त्र

वैद्यकशास्त्रावरील ग्रंथांचे सर्वसाधारणपणें दोन भाग पाडतां येतील. निव्वळ शास्त्रीय चिकित्सक दृष्टीनें लिहिलेले ग्रंथ आणि व्यवहारांत पदोपदीं ज्याचा उपयोग होतो अशा आरोग्यशास्त्रावरील ( हायजीन ) ग्रंथ. पहिल्या विभागांत शारीरशास्त्र, इंद्रियविज्ञान, शस्त्रवैद्यक वगैरेंचा समावेश होतो, तर दुसऱ्यांत आरोग्य, सार्वजनिक आरोग्य, व्यायाम, आहारविहारादिकांचा समावेश होतो. आमच्याकडे आर्यवैद्यकाची वाढ बरीच झाली असल्यामुळें वैद्यकविषयींच्या ग्रंथांत त्यावर बरींच पुस्तकें लिहिलीं गेलेलीं आढळतात. परंतु वैद्यकावर अलीकडे प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत इतर वैद्यक पद्धतीवर बरेच ग्रंथ प्रसिद्ध झालेले आहेत. होमिओपाथीवर प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत डॉ. पळसुले, डॉ. बाड, खरे, बुलेल, घारपुरे, कुलकर्णी यांचीं पुस्तकें चांगलीं आहेत. त्याचप्रमाणें क्रोमोपाथीवर ज्ञानमित्रमालेंत प्रसिद्ध झालेलें 'वर्णजल चिकित्सासार' ( १९२१ ), कुलकर्णी यांचें 'किरणचिकित्सक' ( १९३३ ), व रा. टोंगू यांचें 'सूर्यकिरणचिकित्सा' ( १९३४ ) हीं पुस्तकें चांगलीं आहेत.

वर सांगितलेल्या पहिल्या भागांत समाविष्ट होऊं शकतील अशा ग्रंथांचा निर्देश करावयाचा म्हणजे एक मोठी थोरली यादीच द्यावी लागेल. परंतु या ठिकाणीं तसें करण्यास सवड नसल्यामुळें कांहीं थोड्या ग्रंथांचींच नांवें दिलीं आहेत. कृष्णशास्त्री भाटवडेकर यांनीं 'वैद्यावतंस' नांवाच्या एका लहान वैद्यकीय पुस्तकाचें भाषांतर ( १८८९ ) मध्यें प्रसिद्ध केलें. यानंतर प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत रंगनाथ यांचें 'पथ्यापथ्यनिघंटु' (१९००), पदेशास्त्री यांचें 'मराठी वाग्भट' ( १९०५ ), 'त्रिदोषपद्धति' (१९०८), वैद्य यांचें 'शार्ङ्गधर' ( १९१७ ) वगैरे पुस्तकें आहेत. रा. प्रभाकर बाळाजी ओगले यांचें 'चिकित्साप्रभाकर' नांवाचें उत्कृष्ट पुस्तक १९३१ सालीं प्रसिद्ध झालेलें आहे. याशिवाय त्यांची निंबप्रभाव, बिल्वमाहात्म्य, कोरफडीचा उपयोग वगैरे पुस्तकें आहेत. लंघनचिकित्सेवर दोन

चांगलीं पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत. एक रा. किनरे यांचें ( १९२० ) व दुसरें जोशी यांचें ( १९२४ ). बालरोगचिकित्सेवर जवळ जवळ चाळीस पुस्तकें आहेत. त्यांत मंत्री यांचें 'बालरोगचिकित्सा' (१८७९), परुळकर यांचें 'बालशुश्रूषा' (१८९९), डॉ. टेंबे यांचें 'शिशुसंवर्धन' (१९२६), डॉ. सांझू यांचें 'बालसंगोपन' ( १९३३ ), हीं पुस्तकें चांगलीं आहेत. स्त्रीरोगचिकित्सेवर देखील सुमारें पसतीस पुस्तकें आहेत. त्यांत सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांचें 'अबला-संजीवन' ( १८८४ ), शिंगणे यांचें 'सुलभप्रसूति' ( १८९१ ), गायकवाड यांचें 'बाळ-बाळंतीण' (१८८८), टेंबे यांचें 'मातृपद' (१९२७), डॉ. सांझू यांचें 'जगाच्या वातावरणांत' ( १९३० ) वगैरे पुस्तकें आहेत. प्लेग, पटकी, इन्फ्लुएंझा वगैरे सांथीच्या रोगांवर बरींच पुस्तकें आहेत. त्यांमध्यें पदे यांचें 'ग्रांथिक सन्निपात' (१८९९), बाळ यांचें 'इन्फ्लुएंझा' (१९१९), खरे यांचें 'महामारी' (१८८३), काळे यांचें 'पटकी' ( १८९० ) वगैरे पुस्तकें आहेत. डॉ. काळोखे यांनीं 'अग्नि-मांद्य' ( १९११ ), 'भिषग्वर' भाग १।२ ( १९३० )व भाग ३ ( १९३४ ) हीं पुस्तकें लिहिलीं असून तीं फार चांगलीं आहेत.

शारीरशास्त्रावरील पुस्तकांत संस्कृत ग्रंथांवरून भाषांतर केलेल्या पुस्तकांचाच भरणा जास्त आहे. अगदीं अलीकडे नागपूर येथील डॉ. सहस्रबुद्धे यांनीं ' आपलें शरीर ' या नावांचें शारीरशास्त्रावर एक उत्कृष्ट पुस्तक लिहिलेलें आहे. पाश्चात्य पद्धतीप्रमाणें शारीरशास्त्रावर कांहीं चांगलीं पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. इंद्रिय-विज्ञानशास्त्रावर मराठे यांचें 'जीवनेंद्रियशास्त्र' ( १८७९ ) आणि कीर्तिकर यांचें १८९२ मध्यें प्रसिद्ध झालेलें पुस्तक, हीं दोनच विशेष उल्लेखनीय होत.

आरोग्यशास्त्रविषयक अशीं पुस्तकें सुमारें शंभर आढळतात. पण त्यांमध्यें खरोखर उपयुक्त अशीं फार थोडीं आहेत. वासुदेवशास्त्री कडेगांवकर यांनीं आरोग्य-शास्त्रावर तुलनात्मक आर्यांग्ल स्वस्थवृत्त ( १९२७ ) नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. तुलनात्मक पद्धतीनें लिहिलेलें असें हें येवढेंच पुस्तक आहे. आहारशास्त्रविषयक पुस्तकांत रा. देशमुख व कर्वे यांचें 'काय शिजवावें काय खावें' (१९३१), 'नैसर्गिक आहारपद्धति' ( १९३५ ), परांजपे यांचें 'ताक व आरोग्य' ( १९३५ ), नवलकर यांचें 'मांसाहार,' डॉ. सांझू यांचें 'आहारशास्त्र' ( १९३४ ), हीं पुस्तकें चांगलीं आहेत. सार्वजनिक आरोग्याबरील पुस्तकांत 'स्वच्छता' ( १८८४ ), गांगनाईक यांचें ' घर आणि घराभोंवतालची जागा ' ( १८९५ ), टेंबे यांचें 'आरोग्यशास्त्र'

( १९१७ ), कर्नल कुकडे यांचें 'आपलें आरोग्य' ( सांसर्गिक रोग व जंतुनाश ) ( १९३१ ) हीं पुस्तकें विशेष उल्लेखनीय होत. व्यक्तिविषयक आरोग्यशास्त्रावर डॉ. काळोखे यांचें 'दांतांचें आरोग्य' (१९२८), गुप्ते यांचें 'जीवन्तिक' (१९०४), परांजपे यांचें ' रोग्याची शुश्रूषा ' ( १९०१ ) हीं पुस्तकें उपयुक्त आहेत. व्यायाम-विषयक पुष्कळच पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत. रा. ल. ब. भोपटकर यांनीं 'कुस्ती' ( १९३० ), 'माझी व्यायामपद्धति' ( १९३१ ), 'स्त्रियांचे व्यायाम' ( १९३२ ) आणि 'दांडपट्टा' (१९३३) हीं पुस्तकें लिहून व्यायामविषयक पुस्तकांत महत्त्वाची भर घातली आहे. याशिवाय श्री. बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांचें 'सूर्य-नमस्कार' परांजपे यांचें 'नमस्कार' ( १९२५ ), सप्रे यांचे 'जुजुत्सु' ( १९१४ ), खाजगीवाले यांचें 'वेत आणि कुस्ती' ( १९२९ ) हीं पुस्तकें चांगलीं आहेत. बडोद्याच्या व्यायाम कार्यालयानें कुस्ती, मल्लखांब, दांडपट्टा, लेजीम, लाठी वगैरे विषयांवर सचित्र पुस्तकें प्रसिद्ध केलीं असून व्यायाम-ज्ञानकोशहि तयार होत आहे. आरोग्य साधनाकरितां योगासनांची माहिती देणारीं कांहीं पुस्तकें आहेत. त्यांत बाळ महाजन यांचीं 'व्यावहारिक योग' ( १९१९ ) व 'रोग्यांना अपूर्व योग' ( १९३२ ), हीं पुस्तकें आणि पंडित सातवळेकर यांचें 'आरोग्यासाठीं योगसाधन' ४ भाग ( १९२८ ), हीं अत्यंत उपयुक्त आहेत. श्री. बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांनीं लिहिलेलें ' नेत्रबल संवर्धन ' ( १९२८ ) हें पुस्तकहि उल्लेखनीय आहे.

आरोग्यशास्त्राच्या सदराखालीं येणारीं आणखी कांहीं पुस्तकें म्हणजे प्रा. फडके यांचें ' संततिनियमन, ' डॉ. राईरकर यांचीं त्याच विषयावरील दोन पुस्तकें आणि प्रो. र. धों. कर्वे यांचीं ' आधुनिक कामशास्त्र, ' ' संततिनियमन, ' ' गुप्त रोगांपासून बचाव,' समाजस्वास्थ्यामधील लेख ( भाग १-२ ), हीं होत.

## कृषिशास्त्र

शेतकी खात्यामार्फत प्रसिद्ध होणाऱ्या इंग्रजी भाषेंतील पत्रकांचीं मराठी भाषांतरें ( त्याच खात्यामार्फत प्रसिद्ध होणारीं ) जर सोडून दिलीं तर कृषिशास्त्रावर फार थोडीं उपयुक्त पुस्तकें लिहिलेलीं आढळतात. या पुस्तकांपैकींच कांहीं पुस्तकें खालीं दिलीं आहेत. कोगेकर व पटवर्धन यांचें 'फळझाडांची लागवड' (१९००), याच विषयावर परांजपे यांचें 'फळझाडांची बाग' ( १९३० ), हें पुस्तक विशेष चांगलें आहे. कृष्णराव देशमुख यांचें 'शेतकरी' ( १९०३ ), 'शेतकी सुधारणा व उपयुक्त माहिती' ( १९१२ ), पिसाळ यांचें 'माझा शेतकीचा अनुभव' (१९११),

महाजन यांचें 'वनस्पतिसंवर्धन-शिक्षक' ( १९११ ), काळे यांचें 'शेतकी व बागाइत' ( १९१४ ), गुते व राजे यांचें 'कृषिकर्मविद्या' ( १९०१ ), (हें पुस्तक सुमारें एक हजार पानांचें असून बागाइत, जिराइत वगैरेची सांगोपांग चर्चा करणारें असल्यामुळें संदर्भग्रंथ म्हणून त्याचा चांगला उपयोग होईल ), कुळकर्णी यांचें 'आमची शेती' ( १९३२ ), जोशी यांचें 'कोंकणची नवी भातशेती' ( १९३३ ), साठे यांचें 'बागाइत' ( १९२३ ), कोगेकर यांचें 'टोमॅटोची लागवड', पुंडे यांचें 'आंबा', गाडगीळ यांचें 'आम्रसंवर्धन', प्रो. पटवर्धन यांचें 'गुलाबाची लागवड' ( १९१६ ), देशमुख यांचें 'बंगलावगीचा व बंगला फळबाग' घारे यांचें 'दुभतें व दुभतीं जनावरें' ( १९१६ ) पाळंदे यांचें 'दुग्ध व दुग्ध-व्यवसाय' हीं सर्व पुस्तकें माहितीपूर्ण असून चांगलीं आहेत.

वर निरनिराळ्या शास्त्रांवरील पुस्तकांचा जो आढावा घेतला आहे त्यांत ज्यांचा उल्लेख केला नाहीं, पण जीं वाचनीय आहेत, अशा पुस्तकांबद्दल येथें थोडीशी माहिती देणें इष्ट वाटतें. या पुस्तकांचा मागें उल्लेख केला नाहीं याचें कारण हेंच कीं, त्यांपैकीं कांहीं निबंधसंग्रह आहेत तर कांहीं दोन सदराखालीं येऊं शकतात. यामुळेंच अशा पुस्तकांना कोणत्या एका विषयाखालीं न गोंवतां त्यांचा स्वतंत्रपणें विचार केला आहे.

विनायक कोंडदेव ओक यांनीं १८९३ मध्यें 'कठिण शास्त्रांतील सोप्या गोष्टी' म्हणून एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्यांत पदार्थविज्ञान व रसायन-शास्त्र, प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, खगोलशास्त्र इत्यादि शास्त्रांवर लहान लहान निबंध आहेत. हें पुस्तक विशेषेंकरून शाळेंतील विद्यार्थिवर्गाकरितांच लिहिलेलें दिसतें.

रा. दाभोळकर यांनीं आपल्या पुस्तकमालेंत 'शास्त्ररहस्य' ( १८९४ ) व 'निबंधरत्नमाला' ( १९०९ ) हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं. हे दोन्ही निबंधसंग्रह आहेत. पहिल्या पुस्तकांत दीक्षित यांचा विश्व, गोळे यांचा दगडी कोळसा, कर्वे यांचा मनुष्यप्राण्याची मूळपीठिका आणि भाटे यांचा सजीव सृष्टींतील चमत्कार इतके शास्त्रीय विषयांवरील निबंध प्रसिद्ध झाले आहेत. दुसऱ्या पुस्तकांत कीर्तिकर यांचा उद्भिज्ज आणि प्राणिज यांचा संबंध, प्रो. कानिटकर यांचा लहरीमीमांसा आणि रँग्लर परांजपे यांचा संख्येची कल्पना, हे शास्त्रीय विषयांवरील निबंध प्रसिद्ध झाले आहेत. वर दिलेले सगळे निबंध शास्त्रविषयक कल्पना सुलभतेनें समजावून

देणारे असेच आहेत; परंतु ते आतां जुने झाले असल्यामुळें नवीन शोधांची त्यांत भर घालून त्यांना उजळा दिला पाहिजे.

महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या प्रस्तावनाखंडाचा पांचवा भाग विज्ञानेतिहास हा डॉ. केतकर यांनीं १९२२ सालीं प्रसिद्ध केला. यांत निरनिराळ्या शास्त्रांबद्दलचा इतिहास विस्तृतपणें दिला असल्यामुळें हें पुस्तक अत्यंत महत्त्वाचें झालें आहे. ज्ञानकोशाच्या इतर भागांमधून योग्य ठिकाणीं शास्त्रीय विषयांसंबंधीं माहिती दिलेली आहेच.

रा. माटे यांनीं विज्ञानबोध ( १९३५ ) नांवाचा एक अत्युत्कृष्ट ग्रंथ संपादून प्रसिद्ध केला आहे. या ग्रंथाचे चार खंड केलेले आहेत. पहिला प्रस्तावना-खंड असून त्यांत श्री. माटे यांची सुमारें दोनशें पानांची विद्वत्तापूर्ण प्रस्तावना आलेली आहे. दुसरा शास्त्रखंड आहे. यांत शिल्पशास्त्र, भूस्तरशास्त्र, पदार्थविज्ञान-शास्त्र, रसायनशास्त्र, मानवशास्त्र, शरीरविज्ञानशास्त्र, अर्थशास्त्र, जीवशास्त्र, मानव, शारीर, वानस्पतिक, शस्त्रवैद्यक आणि खगोलशास्त्र इतक्या शास्त्रांवर तज्ज्ञांकडून लिहवून घेतलेले निबंध आले आहेत. या निबंधांत त्या त्या शास्त्राची थोडक्यांत शक्य तितकी पूर्ण माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे. हे सर्व निबंध भाषेच्या त्याचप्रमाणें विषयप्रतिपादनाच्या दृष्टीनें चांगले आहेत. तिसरा चमत्कार-खंड आहे. यांत 'आपण अन्न कां शिजवितों?' 'पतंग दिव्याभोंवतीं कां फिरतात?' 'थंडी नाहींशी कां करतां येत नाहीं?' अशा कुतूहल उत्पन्न करणाऱ्या गोष्टींचीं कारणें दिलेलीं आहेत. चवथा चरित्रखंड आहे. यांत मोठमोठ्या शास्त्रज्ञांचीं थोडक्यांत चरित्रें देऊन त्यांनीं काय काय केलें, याविषयीं माहिती दिली आहे. शास्त्रीय वाङ्मयांत विज्ञानबोधानें एका उत्कृष्ट पुस्तकाची भर घातली आहे, यांत संशय नाहीं.

मौल्यवान् रत्नांविषयीं संपूर्ण माहिती देणारीं तीन चांगलीं पुस्तकें मराठी शास्त्रीय वाङ्मयांत आहेत. पहिलें पुस्तक बिडकर यांचें 'रत्नपरीक्षा' ( १९०४ ) हें होय. हें पुस्तक जरी लहान असलें तरी यांतील माहिती व्यवस्थितपणें दिलेली आहे. दुसरें पुस्तक 'रत्नप्रदीप' (१९३१) हें खांबेटे यांनीं लिहिलेलें असून त्याचा पहिलाच खंड प्रसिद्ध झालेला आहे. या पुस्तकांत अनेक रत्नांबद्दल शास्त्रशुद्ध माहिती दिली असून ती अतिशय मनोरंजक भाषेंत लिहिलेली आहे. जगांतील कांहीं अत्युत्कृष्ट रत्नांशीं निगडित असलेला इतिहासहि या पुस्तकांत आलेला आहे.

मोत्यांविषयीं यांत माहिती दिलेली आहे. याच लेखकानें 'मौक्तिकप्रकाश' (१९२५) नांवाचें निव्वळ मोत्यांविषयीं माहिती देणारें एक पुस्तक लिहिलें आहे. गायकवाड सरकारच्या जवाहीरखान्याच्या नियमांतहि रत्नादिकांच्या अलंकारांविषयींची माहिती सांपडते.

शास्त्रीय ग्रंथांचा विषयवार आढावा घेण्याचा वर यथामति प्रयत्न केलेला आहे. प्रसिद्ध झालेले असून आमच्या पाहण्यांत न आल्यामुळें कांहीं ग्रंथ वगळले गेले असल्याचा संभव आहे. असे कांहीं महत्त्वाचे ग्रंथ असलेच तर ते बुद्धिपुरस्सर वगळलेले नाहींत, येवढेंच याबद्दल सांगावयाचें आहे. ग्रंथांचा जरी आढावा घेतला तरी त्यामुळें शास्त्रीय वाङ्मयाच्या आढाव्याला पूर्णत्व येत नाहीं. त्याकरितां नियतकालिकांमधून शास्त्रीय विषयांवर वेळोवेळीं जे लेख प्रसिद्ध झाले आहेत त्यांचा आढावा घेतला पाहिजे. परंतु स्थलसंकोचास्तव या लेखांत तसें करतां येत नाहीं. या लेखांचा आढावा घ्यावयाचा म्हणजे नियतकालिकाचें नांव, प्रसिद्धिवर्ष, लेखाचें व लेखकाचें नांव आणि विषयप्रतिपादन कसें केलें आहे, त्याबद्दल माहिती, इतक्या सगळ्या गोष्टी दिल्या पाहिजेत, तरच त्यांचा कांहीं तरी उपयोग. प्रस्तुत लेखांत मधून मधून शास्त्रीय वाङ्मय प्रसिद्ध करणारीं कांहीं प्रमुख नियतकालिकें आणि निवळ शास्त्रीय विषयांनाच वाहिलेलीं नियतकालिकें यांचा फक्त नामनिर्देश करण्यापलीकडे दुसरें कांहींच करतां येत नाहीं. रा.य.रा. दाते आणि रा. त्र्यं. देशमुख यांनीं महाराष्ट्रीय वाङ्मयसूचींत १८१० पासून १९१७ पर्यंत कोणत्या नियतकालिकांत कोणत्या शास्त्रावर कोणीं लेख लिहिला आहे याची माहिती दिली आहे. ती जिज्ञासु वाचकांनीं अवश्य वाचावी.

मराठी भाषेंत प्रसिद्ध होणाऱ्या नियतकालिकांत 'बालबोध', 'बालबोध मेवा', 'मराठी शालापत्रक', 'आनंद व खेळगडी' व 'मुलांचें मासिक' हीं मुलांकरितां प्रसिद्ध होणारीं मासिकें आहेत. वरील सर्व मासिकांमधून शास्त्रीय विषयांवर लेख येत असतात. अर्थात् त्यांचें स्वरूप मुलांना समजेल असेंच असतें. आनंदाला प्रौढ वाचकांकरिता एक पुरवणी जोडलेली असते. तींत 'मधाचें पोळें' या सदरांत कधीं कधीं मनोरंजक शास्त्रीय माहितीविषयक उतारे देण्याचा उपक्रम रा. गो. ग. तळवलकर यांनीं सुरू केलेला आहे.

किर्लोस्करांच्या स्त्रीमासिकांत स्त्रियांना उपयुक्त अशी शास्त्रीय माहिती मधून-मधून दिलेली आढळते. स्त्रीमासिकाखेरीज केवळ स्त्रियांकरितां स्त्रियांनींच चाल-

विलेलीं एक दोन मासिकें मराठींत आहेत. परंतु पुरुषवर्गावर खोट्या व काल्पनिक कारणांकरितां हल्ला चढविणें, गचाळ लघुकथा प्रसिद्ध करणें, स्त्रियांच्यासंबंधीं बातम्या देणें आणि ग्रमोफोन रेकार्डस्‌चें परीक्षण दुसऱ्यांकडून लिहवून निनांवी प्रसिद्ध करणें यांखेरीज स्त्रियांकरितां इतर कांहीं गोष्टी करणें आवश्यक असतें, याची त्यांना दादच नाहीं. अशा मासिकांमधून कितीतरी सुबोध शास्त्रीय माहिती ( केवळ स्त्रियांकरितां देखील ) देतां येण्यासारखी आहे.

'केरळकोकिळ,' 'ग्रंथमाला,' 'नवयुग' इत्यादि हल्लीं बंद पडलेल्या मासिकांत शास्त्रीय विषयांवर बरेच लेख येऊन गेलेले आहेत. केरळकोकिळांतील लेख अत्यंत मनोरंजक तऱ्हेनें लिहिलेले असून ते बहुधा 'लोकोत्तर चमत्कार' या सदराखालीं प्रसिद्ध होत असत. हयात असलेल्या मासिकांत 'लोकमित्र,' 'शेतकी आणि शेतकरी,' 'विविधज्ञानविस्तार,' 'चित्रमय जगत्,' 'सहविचार,' 'मासिक मनोरंजन,' 'लोक-शिक्षण,' 'सह्याद्रि' व 'आयुर्वेद' हीं उल्लेखनीय होत. यांपैकीं शेतकी आणि शेतकरी हें फार जुनें असून त्यांत केवळ कृषिशास्त्रावर व शेतकीला उपयोगी पडणाऱ्या विषयांवर लेख येत असतात. आयुर्वेद मासिकांत वैद्यकविषयक लेख येतात. 'घरगुती औषधें' हें उपयोगी पुस्तक स्वतंत्रपणें प्रसिद्ध होण्यापूर्वी क्रमशः याच मासिकांतून प्रसिद्ध होत होतें. शेतकी आणि शेतकरी व आयुर्वेद यांशिवाय वर दिलेलीं जीं दुसरीं मासिकें आहेत, त्यांत प्रौढ वाचकांकरितां शास्त्रीय विषयांवर पुष्कळच लेख प्रसिद्ध झालेले आहेत व हल्लींहि होतात. चित्रमयजगतांतून प्रसिद्ध झालेले मान आणि विमान हे लेख, वैकुंठराय व प्रो. खानखोजे यांचे लेख आणि मनोरंजनांतून प्रसिद्ध झालेले प्रो. कानिटकर यांचे लेख, यांचा या ठिकाणीं विशेष उल्लेख करावासा वाटतो. कारण सदर लेख माहितीपूर्ण तर आहेतच, परंतु त्यांतील विवेचन इतक्या सोप्या भाषेंत केलेलें आहे कीं, सर्वांना ते सहज कळूं शकेल.

वर एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, नियतकालिकांतील लेख चिरस्थायी स्वरूपाचे नसतात. पण हें विधान शास्त्रीय नियतकालिकांसंबंधीं खरें नाहीं. शास्त्रीय नियतकालिकांना शास्त्रीय वाङ्मयांत महत्त्वाचें स्थान आहे. शास्त्रीय जगतांत लागणारे नवे नवे शोध, निरनिराळ्या शास्त्रांत होणारी तत्कालीन प्रगति, एखाद्या शास्त्रांतील वादग्रस्त मुद्यासंबंधान शास्त्रज्ञांनीं वेळोवेळीं केलेलें विवेचन आणि चर्चा या सर्व गोष्टी लोकांपुढें मांडण्याकरितां नियतकालिक हेंच उत्कृष्ट साधन होय. या गोष्टीकरितां पुस्तकें प्रसिद्ध करण्याच्या भानगडींत कोणी पडत नाहीं.

शास्त्रीय जगतांतील विचारप्रवाह कसे वाहत आहेत हें चटकन् कळण्याचें साधन नियतकालिक होय. ज्यांना शास्त्रीय नियतकालिकें असें नांव देतां येईल, अशीं मराठींत दोनच आहेत. एक नागपूरला प्रसिद्ध होणारें ' उद्यम ' मासिक व दुसरें पुण्याहून प्रसिद्ध होणारें 'सृष्टिज्ञान.' उद्यम मासिकांत शास्त्रीय विषयांबरोबरच औद्योगिक विषयांसंबंधीं लेख प्रसिद्ध करण्यांत येतात. सृष्टिज्ञान हें मराठी भाषेंतील अतिशय चांगलें मासिक असून त्याला पुरेसे वर्गणीदार मिळूं नयेत व त्याचा फारसा खप नसावा, हें आमच्या शास्त्रीय ज्ञानाबद्दलच्या उदासीनतेचें लक्षण नव्हे, तर दुसरें कशाचें म्हणावयाचें ?

## उपसंहार

गेल्या साठ वर्षांतील शास्त्रीय मराठी वाङ्मयाचा वर जो थोडाबहुत आढावा घेतला आहे त्यानें जागा बरीच व्यापिली असली तरी, तें वाङ्मय तयार व्हावयाला जो साठ वर्षांचा काळ लागला त्या मानानें तें कांहींच नाहीं, असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें. या कालांत आहे यापेक्षां किती तरी पटीनें अधिक वाङ्मय निर्माण व्हावयास पाहिजे होतें. पण तें निर्माण होऊं शकलें नाहीं. शास्त्रीय वाङ्मयाचें महत्त्व शिक्षित लोकांना पटून सुद्धां त्याची अभिवृद्धि कां होत नाहीं, त्यांतील खरोखर अडचणी काय आहेत, हें आतां थोडक्यांत पाहावयाचें आहे.

मराठी साहित्यसंमेलनाच्या बडोदें येथें भरलेल्या १९ व्या अधिवेशनांतील शास्त्रीय विभागाचे अध्यक्ष प्रो. गो. रा. परांजपे यांनीं या सगळ्या अडचणींचा विशेष विचार आपल्या अध्यक्षीय भाषणांत केलेला आहे. या ऊहापोहाचा थोडक्यांत निष्कर्ष काढून तोच जर या ठिकाणीं दिला तर तें अप्रस्तुत होणार नाहीं.

शास्त्रीय वाङ्मयाच्या प्रगतींतील पहिली अडचण जर कोणती असेल तर ती माध्यमाविषयीं. शाळा व कॉलेजें यांमधून हल्लीं सर्व विषय इंग्रजींतून शिकविले जातात. ही स्थिति बदलून शिक्षणाचें माध्यम मराठी करणें अतिशय आवश्यक आहे. त्याचप्रमाणें " विश्वविद्यालयांत मराठीला बोधभाषेचा मान मिळाला पाहिजे. तोंपर्यंत शास्त्रीय विषयांतील प्रगतीच्या कल्पना नुसतीं मनोराज्यें ठरतील. " मराठींतून शास्त्रीय वाङ्मयावर चांगलीं पुस्तकें लिहितां येणें शक्य नाहीं, असा आरोप पुष्कळांकडून करण्यांत येतो. परंतु आजपर्यंत मराठींत प्रसिद्ध झालेल्या शास्त्रीय वाङ्मयाचें निरीक्षण केल्यावर हा आरोप फोल ठरतो. मराठींत शालोपयोगी व क्रमिक पुस्तकांची वाण नाहीं. वाण जर कशाची असेल तर शास्त्रीय परिभाषेंत

लिहिलेल्या प्रमाणग्रंथांची व सामान्य लोकांकरितां लिहिलेल्या सुबोध ग्रंथांची. शास्त्रीय वाङ्मयाच्या प्रसाराला या सुबोध ग्रंथांची फार मदत होईल, जनतेमध्यें शास्त्रांबद्दल अभिरुचि वाढेल व त्याचा परिणाम जास्त वाङ्मयनिर्मिती हा होईल. नियतकालिकांची संख्या देखील वाढली पाहिजे.

दुसरी अडचण आहे ती परिभाषेची. सुबोध ग्रंथ लिहितांना परिभाषेची आवश्यकता भासणार नाहीं. परंतु प्रमाणग्रंथाला तिची जरुरी आहे. त्याचप्रमाणें उत्तमोत्तम पाश्चात्य प्रमाणग्रंथ मराठींत आणावयाचे झाल्यास तिची आवश्यकता आहे. तेव्हां परिभाषा नक्की केली पाहिजे व त्यासाठीं प्रयत्न चालले आहेतच; परंतु त्याकरितां अडून बसण्याचें कारण नाहीं.

तिसरी अडचण म्हणजे शास्त्रीय विषयांसंबंधीं वाचकांचें औदासिन्य. एखाद्या अनुभवी व हौशी लेखकानें शास्त्रीय विषयांवर सुबोध पुस्तक लिहिलें, पण त्याला वाचकवर्गच जर मिळाला नाहीं तर अशा लेखकाची हौस व उत्साह गार-ठल्याशिवाय राहणार नाहीं. मराठी ही बोधभाषा केल्यानें ही अडचण दूर होण्यास मदत होईल असें वाटतें. सामान्य जनतेला शास्त्रीय विषयांची गोडी लावण्याची जबाबदारी वृत्तपत्रांवर पडते. ती तत्कालीन फायद्याकडे नजर न देतां पार पाड-ण्याचा प्रयत्न होणें इष्ट आहे. " तरुण पिढीची लेखन-वाचनाची सध्यांची दिशा बदलली पाहिजे. तींत गंभीरपणा मुळींच राहिला नाहीं. तात्पुरत्या सुखाकरितां तरुण पिढी सर्व शास्त्रीय प्रगतीला हरताळ फाशीत आहे. हा मार्ग सोडला तरच शास्त्रीय वाङ्मय वाढीला लागेल व देशाची खरी औद्योगिक आणि सांपत्तिक सुधारणा होईल. केवळ ललितकलात्मक एकांगी वाङ्मय या कामीं खास उपयोगी पडणार नाहीं. "

---

१५

# बंगालीची मराठीस देणगी

[ लेखक:—श्री. विनायक अंबादास गिजरे, बी.ए. ]

गेल्या एका तपांतील मराठी वाङ्मयाकडे दृष्टिक्षेप टाकिला असतां, या काल-खंडांत भाषांतरित ग्रंथांची निपज फारच थोडी झाल्याचें कोणाच्याहि सहज लक्ष्यांत येईल. भाषांतरित वाङ्मयासंबंधीं अशा प्रकारची अनास्था जरी अलीकडे उत्कटतेनें प्रतीत होत असली तरी, परभाषांतील ग्रंथांमधील विचारांची उसनवारी करून, स्वतंत्र लेख, कथा किंवा कादंबरी लिहिण्याकडे मात्र बऱ्याच लेखकांची प्रवृत्ति होत आहे. या प्रवृत्तीची इष्टानिष्टता प्रस्तुत लेखाच्या कक्षेंत येत नाहीं. पण तिच्यावरून दोन गोष्टी स्पष्ट होतात. एक म्हणजे स्वतंत्र वाङ्मयनिर्मितीविषयींची तरुण पिढीची उत्सुकता, आणि भाषांतरासंबंधीं तज्जन्य उपेक्षाबुद्धि, ही दुसरी होय. भाषांतरावर आक्षेप घेणाऱ्यांचा दुसराहि एक वर्ग आहे. त्याच्या मतें परभाषांतील ग्रंथांमुळें राष्ट्राचें चैतन्य नष्ट होऊन, आपलेपणाची जाणीवहि त्याच्या ठिकाणीं उरत नाहीं. इंग्रजी अमलाच्या प्रारंभावस्थेंतील भाषांतरयुगासंबंधीं हे उद्गार कदा-चित् खरे असतील. कारण तत्कालीन साहित्यसेवकांनीं जीं भाषांतरें केलीं तीं भाषां-तरांनींच मराठी वाङ्मय संपन्न करण्याचें ध्येय आपल्या डोळ्यांपुढें ठेवून. पण पर-कीय ग्रंथांनीं कोणत्याहि राष्ट्राचें वाङ्मय संपन्न होऊं शकत नाहीं. समाजांत नवीन नवीन विचार आणि कलाकृतींत नावीन्य उत्पन्न करण्याचें साधन म्हणूनच भाषांत-राचा किंवा रूपांतराचा उपयोग केला पाहिजे. इंग्लंडादि पाश्चात्य देशांत आणि

आपल्या इकडे बंगाल्यांतहि भाषांतरांना याच दृष्टीनें महत्त्व आहे, व तें लक्ष्यांत आणून अजितकुमार सेनगुप्त यांच्यासारखे बंगाली वाङ्मयांत नवयुगाचा झेंडा फडकविणारे कथालेखकहि कधीं कधीं भाषांतर करतांना दृष्टीस पडतात.

इंग्रजांच्या संनिकर्षानें आधुनिक मराठी वाङ्मयाचा अभ्युदय झाल्याकारणानें इंग्रजी वाङ्मयांतील किती तरी ग्रंथांची भर मराठींत पडलेली आहे. इंग्रजी साहित्याचें हें एकमेव वर्चस्व मराठी वाङ्मयावर कमींत कमी पन्नास साठ वर्षें तरी अबाधित कायम होतें, असें म्हटलें तरी चालेल. त्यानंतर या शतकाच्या प्रारंभीं मराठी वाचकांचें चित्त देशी वाङ्मयाकडे, विशेषतः बंगालीकडे वेधलें गेलें. बंगाली वाङ्मयाची एतत्कालीन स्थिति फारच समाधानकारक होती. बंकिमचंद्रांसारखा स्वतंत्र कथालेखक नुकताच चमकून गेला होता; आणि त्यांच्या रसगर्भ ओजस्वी कादंबऱ्यांनीं बंगाली जनता वेडावून गेली होती. इतकेंच नव्हे तर त्यांच्या कित्येक कादंबऱ्यांचीं इंग्रजी आणि फ्रेंच भाषांमध्यें भाषांतरें होऊन, इंग्रज आणि फ्रेंच वाचकांस त्या फार प्रिय झाल्या आहेत, असेंहि मराठी वाचकांच्या कानांवर आलें होतें. शिवाय याच सुमारास रमेशचंद्र दत्त, दामोदर मुखोपाध्याय, ननिलाल बंदोपाध्याय, प्रभातकुमार मुखोपाध्याय, रविन्द्रनाथ टागोर प्रभृति साहित्यिकांचीं नांवें बंगाली वाङ्मयांत प्रामुख्यानें वाचकांच्या नजरेस पडत. मराठी वाचकांवर या वेळीं स्कॉटच्या अद्‌भुतरम्य कादंबऱ्यांचा बिलक्षण पगडा बसलेला होता. त्यांच्या अभिरुचीला उतरेल अशीच उपरिनिर्दिष्ट वंगसाहित्यसेवकांपैकीं बहुतेकांची कथासृष्टि असल्यामुळें, त्यांना मराठी पेहेराव ताबडतोब चढविण्याचें काम सुरू झालें. हें काम जवळजवळ पंधरावीस वर्षें चालू होतें, असें दिसतें. या अवधींत हिंदी वाङ्मयाकडे मराठी वाचकांचें लक्ष गेलें नाहीं यांत आश्चर्यकारक असें कांहींच नाहीं. कारण हिंदी वाङ्मय या वेळीं अगदीं बाल्यावस्थेंत असून हातालां येईल त्या बंगाली पुस्तकाचें भाषांतर करण्याचा हिंदी लेखकांनीं जणूं कांहीं विडाच उचललेला होता. यामुळें हिंदी भाषेंतून जरी कांहीं बंगाली कादंबऱ्या मराठींत आलेल्या असल्या, तरी स्वतंत्र हिंदी पुस्तकांना मात्र बरेच दिवसपर्यंत तो मान मिळण्याचा प्रसंगच आला नाहीं.

बंगाली कादंबऱ्यांना मराठी वेष देण्याचा पहिला आणि नेटाचा प्रयत्न जर कोणीं केला असेल तर, तो कै० काशिनाथ रघुनाथ मित्र यांनींच होय. "ग्रंथसंपादक आणि प्रसारक मंडळी "नें मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीस जसा हातभार लावला, तसाच कै. मित्र यांच्या " मनोरंजक ग्रंथप्रसारक

मंडळी "नें आणि कै. भटे यांच्या "भारत गौरवग्रंथमाले" नें लावलेला आहे. विशेषतः कै. मित्र यांनीं केलेली कामगिरी तर अनन्य होय. वस्तुतः त्यांची स्थिति अत्यंत हलाखीची, पण त्यांचें वाङ्मयप्रेम इतकें उत्कट कीं, स्वतःच्या गैरसोई सहन करून, त्यांनीं "मनोरंजन" हें प्रसिद्ध मासिक सुरू केलें; आणि आपल्या संपादन-चातुर्यानें मराठी वाङ्मयांत क्रांति घडवून आणली. मराठी कथेला नवीन सुटसुटीत आणि चित्ताकर्षक वळण कै. काशिनाथपंत मित्र यांनींच लावलें. पण इतकेंहि करून न थांबतां, त्यांनीं मासिकाबरोबरच "मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी" काढून एक ग्रंथमालाहि सुरू केली. या ग्रंथमालेंतून बहुतेक बंगाली पुस्तकांचीं भाषांतरें प्रसिद्ध झालेलीं असून स्वतः मित्र यांनीं त्यांपैकीं कांहीं भाषांतरें केलीं आहेत. पण प्रत्यक्ष साहित्यसेवेपेक्षां, अप्रत्यक्ष पण अपूर्व अशी जी ही साहित्यसेवा त्यांनीं केली, तिच्यांतच त्यांचा खरा मोठेपणा आहे. कारण स्वतः फारशी ग्रंथरचना न करतां त्यांनीं शांताराम रघुनाथ नाईक, अनंत केशव चितळे, सहस्रबुद्धे, जगन्नाथ धोंडू भांगले, जानकीबाई देसाई, विठ्ठल सीताराम गुर्जर प्रभृति परभाषा-भिज्ञांना पुढें आणून मराठी वाचकांना त्यांचा परिचय करून दिला व 'धाकट्या सूनबाई', 'बकुलमाला', 'राधाराणी', 'जीवनसंध्या', 'संसार असार', वगैरे सुंदर कादंबऱ्या प्रसिद्ध करून मराठी कथासाहित्यांत रमणीय भर टाकली. मित्रांच्या या कामगिरीमुळें आधुनिक मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत त्यांचा उल्लेख जर अवश्यमेव वाटला तर काय नवल ?

वर उल्लेखिलेल्या अनुवादकांशिवाय विष्णु सीताराम देव, शिवराम गोविंद फाळके आणि वासुदेव गोविंद आपटे यांनीं भाषांतरित वाङ्मयांत टाकलेली भर चिरस्थायी स्वरूपाची आहे. कै. आपटे यांचें नांव बंगालीशीं बरेंचसें संबद्ध असून त्यांचें 'मराठी बंगाली शिक्षक' आणि भारत-गौरवग्रंथमालेनें प्रसिद्ध केलेलें 'संपूर्ण बंकिमचंद्र' ही पुस्तकावलि पुष्कळांच्या लक्ष्यांत असेल. कै. आपटे यांनीं बंकिमचंद्रांच्या ग्रंथांचें भाषांतर ज्याप्रमाणें केलेलें आहे त्याचप्रमाणें देव यांनीं विषवृक्ष, फाळके यांनीं मृणालिनी व दुर्गेशनंदिनी, पेशवे यांनीं राधाराणी आणि भांगले यांनीं कृष्णकान्ताचें मृत्युपत्र व आनंदमठ यांचा मराठी अनुवाद केलेला आहे. त्याच्याशीं आपटे यांचें भाषांतर ताडून पाहिलें असतां, आपटे यांच्या ठिकाणीं रसिकतेचा कसा अभाव होता, हें स्पष्ट दिसतें. आपटे यांना बंगालीच मुळी येत

नव्हती असा प्रवादहि क्वचित् कोठें कोठें ऐकूं येतो. या प्रवादांत फारसें तथ्य नसलें तरी, इतकें मात्र खरें कीं, बंकिमचंद्र यांच्या कलाकृतींतील लालित्य आणि रंजकता यांचा अभाव आपटे यांच्या प्रतिकृतींत पदोपदीं जाणवतो. उदाहरणार्थ 'विषवृक्ष' ही पुनर्विवाहावरील कादंबरीच घेऊं या. ती वाचून नगेन्द्र, सूर्यमुखी आणि तिची सवत कुंदा या तीन्ही पात्रांविषयीं वाचकांच्या मनांत निरनिराळ्या विरोधी भावना उत्पन्न होणें साहजिक आहे. पण आपटे यांच्या भाषांतरावरून अशा प्रकारचा कोणताच परिणाम होत नाहीं. उलट देवांचें भाषांतर इतकें आत्मीयतेनें केलेलें आहे कीं, त्याचा हृदयावर एकदां उमटलेला ठसा तीव्रतेनें आपल्या अस्तित्वाची जाणीव पुन्हां पुन्हां करून देतो. तल्लीनता हा भाषांतरकाराचा प्रमुख गुण. पण त्याची उणीव आपटे यांच्या ठिकाणीं असल्यामुळें त्यांचें भाषांतर कसें नीरस उतरलें आहे, हें पुढील त्यांच्या उताऱ्याची कै. मित्र यांनीं केलेल्या भाषांतरांतील उताऱ्याशीं तुलना करून पाहिलें असतां सहज लक्ष्यांत येईल: —

'एके दिवशीं प्रयागतीर्थीं, गंगायमुनांच्या संगमाच्या ठिकाणीं वर्षाऋतूंतल्या संध्याकाळची अपूर्व शोभा दिसत होती. पावसाळ्याचे दिवस होते; पण मेघांचें नांव नव्हतें; अथवा जे कांहीं थोडेसे ढग होते, ते सोनेरी रंगाच्या लाटांप्रमाणें शोभायमान दिसत होते. सूर्य अस्ताला गेला होता. पावसाच्या पाण्यानें गंगा व यमुना या दोन्ही नद्यांचीं पात्रें तुडुंब भरलीं होतीं. तारुण्याच्या भरानें मस्त झालेल्या त्या दोघी बहिणींनीं जणूं काय खेळण्याच्या मिषानें परस्परांना आलिंगन दिलें होतें! वायूच्या झपाट्यानें अंगावरचा पदर जसा फडफडतो, त्याप्रमाणें त्यांच्या लाटा तीरावर ताड्ताड् आपटत होत्या.' आपटे—मृणालिनी, (प्र. खं. प्र. १)

'पर्जन्यकाळाचे दिवस. सायंकाळ झाला होता. पावसानें मोठी बहार केल्यामुळें जिकडे तिकडे जलमय होऊन गंगा आणि यमुना या उभय नद्यांना मोठमोठे पूर येऊन त्यांचीं पात्रें तुडुंब भरून गेलीं होतीं. यौवनमदानें धुंद झालेल्या सख्या बहिणीच जणूं प्रेमभावानें एकमेकींना आलिंगन देण्यास धांवत आहेत, अशा या उभय नद्या दिसत होत्या. वाऱ्याच्या योगानें मधूनमधून उचंबळणाऱ्या लाटा जणूं एखाद्या नवयौवना तरुणीच्या चंचल अंचलाप्रमाणें नदीच्या वक्षस्थलावर आदळत होत्या. प्रयाग तीर्थावरील या वेळचा देखावा एकंदरींत मोठा रम्य आणि प्रेक्षणीय होता.'

कै. मित्र—मृणालिनी, (पृ. १)

कै. मित्र यांचा वरील उतारा वाचला असता त्यांच्या लेखनांतील सहजता आणि समरसता हे दोन गुण उत्कटतेनें प्रतीत होतात. मित्र यांच्याप्रमाणेंच भांगले यांची ‘ आनंदाश्रम ’ ही कादंबरी उत्कृष्ट असून, ती वाचली असतां, ‘ वंदे मातरम् । ’ या गीतामधील आर्तता आणि त्याच्या पार्श्वभागीं असलेली ज्वालोद्ग्राही उत्कटता यांची जाणीव सहज होईल. त्याचप्रमाणें ना. गो. पेशवे यांनीं भाषांतरलेलीं “ मृण्मयी ” आणि “ आयेषा ” हीं दोन्ही पुस्तकें उत्कृष्ट असून, बंकिमबाबूंच्या कलाकृतींना पूर्णता आणणारीं आहेत. दामोदर मुखोपाध्याय हे या कादंबऱ्यांचे लेखक असून, एका कादंबरींत ‘ दुर्गेशनंदिनी ’ तील अयेषेचें जीवनचित्र जसें त्यांनीं रेखांकित केलें आहे, त्याप्रमाणें कपालकुंडलेचें उपसंहारस्वरूप म्हणून ‘ मृण्मयी ’ ही लिहिलेली आहे.

बंकिमचंद्र यांच्या भावनेचा परिचय मराठी वाचकांना देव-फाळके-भांगले या त्रिमूर्तींनीं जसा करून दिला, तद्वत् प्रभातकुमार मुखोपाध्याय यांचा नर्मगर्भ विनोद मराठींत मूर्तिमंत उभा करण्याचें श्रेय विठ्ठल सीताराम गुर्जर यांनाच सर्वस्वीं देणें इष्ट होईल. किंबहुना बंगाली भाषेंतील पुस्तकांच्या अनुवादासंबंधीं बोलतांना, गुर्जर यांचें नांव चटकन् तोंडांत यावें इतकें विलक्षण प्रभुत्व त्यांनीं या वाङ्मयशाखेंत गाजविलें आहे; व अजूनहि त्यांच्या तोडीचा अनुवादक कोणी झालेला नाहीं असें म्हटलें तरी चालेल. गुर्जर यांनीं या प्रांतांत जें पद प्राप्त करून घेतलें आहे, तें केवळ बंगाली भाषेचे ते मर्मज्ञ आहेत म्हणून नव्हे, किंवा मराठीवरहि त्यांचें तितकेंच प्रभुत्व आहे म्हणूनहि नव्हे. बंगाली मनोवृत्तीशीं ते तल्लीन होऊं शकतात, हेंच तें कारण होय. यामुळेंच रमेशचंद्र दत्त, उपेन्द्रनाथ गांगुली, कालिप्रसन्न दासगुप्त प्रभृति भिन्न भिन्न लेखकांशीं समरस होऊन, ‘ जीवनसंध्या, ’ ‘ गुणगौरव, ’ ‘कुलकलंक ’ वगैरे सौंदर्यपूर्ण कादंबऱ्या ते लिहूं शकले. तथापि गुर्जर यांचा हा गुण निकषावर घांसून पाहावयाला, प्रभातकुमारांची कथासृष्टीच अधिक योग्य आहे. कारण प्रभातबाबूंच्या वाङ्मयांत अंतर्बाह्य बंगालीपणा प्रतिबिंबित झालेला दिसतो. खुसखुशीत विनोद, तरल शब्दचित्रें आणि नाजुक भावना हे प्रभातबाबूंचे विशेष होत, आणि गुर्जर यांनीं पण हे गुण तितक्याच नाजुक रीतीनें मराठींत चित्रित केले आहेत. प्रभातबाबूंच्या ‘ संन्यासी ’ या कादंबरीचें ‘ संसार असार ’ हें भाषांतरच केवळ आज पुस्तकरूपानें प्रसिद्ध असलें, तरी गुर्जरांनीं त्यांच्या बहुतेक लघुकथा अनुवादिलेल्या असून, त्यांचा संग्रह प्रसिद्ध केल्यास एका नितांतरम्य

कथाकलापाची मराठी वाङ्मयांत भर पडेल. श्री. गुर्जर हे सध्यां कविवर्य रवींद्रनाथ यांच्या तीन दोन कादंबऱ्यांचें भाषांतर करीत असून, मराठी वाचकांस लवकरच त्या वाचावयास मिळतील अशी आशा आहे.

गुर्जर यांच्यानंतर भारत-गौरव ग्रंथमालेचे संस्थापक कै. प्रभाकर श्रीपत भसे यांची आठवण होणें साहजिकच आहे. किंबहुना कै. मित्र यांच्यानंतर त्यांचा नंबर लावणें अधिक इष्ट होईल. कारण मित्र यांच्याप्रमाणेंच वि. सी. गुर्जर, नागपूर येथील विश्वनाथराव केळकर, शंकरराव शास्त्रीप्रभृति वंगभाषा-भिज्ञांना हाताशीं धरून, मित्र यांचीच परंपरा त्यांनीं पुढें चालविली. इतकेंच नव्हे तर मित्रांच्याप्रमाणें स्वतः अनुवाद करून मराठी वाङ्मयांत त्यांनीं मानाची जागा मिळविलेली आहे. कै. वासुदेवराव आपटे यांच्याकडून बंकिमचंद्रांचें संपूर्ण वाङ्मय मराठींत आणविण्यांत त्यांनीं औचित्य तर प्रगट केलेंच; पण बंकिमनंतर वंगसाहित्यांत उदयास आलेल्या क्रांतिकारक शरद्‌चंद्रांची पण आपल्या हातांत लेखणी धरून ओळख करून देण्यांत त्यांची प्रगतिप्रियता स्पष्टत्वानें प्रतीत होते. शरद्‌चंद्रांनीं रवींद्रनाथांच्या ' घरे बाइरे ' (Home and the World) या कादंबरीला प्रत्युत्तर म्हणून लिहिलेली ' दत्ता ' आणि समाजाच्या प्रचलित ढोंगी नैतिक कल्पनांना कोपरखळ्या देण्याकरितां लिहिलेली ' चरित्रहीन ' या दोन कांदबऱ्यांचा कै. भसे यांनीं ' विजया ' आणि ' प्रणयपंक ' या नांवांनीं अनुवाद प्रसिद्ध केलेला आहे. ' प्रणयपंक ' वाचीत असतांना तर शरद्‌चंद्रच आपण वाचीत तर नाहींना, अशी पदोपदीं शंका येते; व श्री. गुर्जर यांच्याशीं त्यांची तुलना करण्याचा मोह पुष्कळदां पडतो. भसे यांची ही प्रथा पुढें श्री. शंकर बाळाजी शास्त्री यांनीं तशीच चालू ठेवून, १९२७ सालीं ' प्रपंचकथे'चा पहिला भाग भारतगौरवग्रंथमालेचें पुष्प म्हणूनच प्रसिद्ध केला. या कथांत शरद्‌चंद्रांच्या ' बिंदूर छेले ', ' पथनिर्देश, ' वगैरे उत्कृष्ट कथांचा प्रपंच केलेला आहे. याशिवाय ' गृहदाह ' या कादंबरीवरून ' अनलज्वाला ' नांवाची एक स्वतंत्र कादंबरीहि श्री. शास्त्री यांनीं लिहिलेली असून, त्यांच्या लेखनांतील सहजता, समरसता आणि चित्ताकर्षता या तीन्ही गुणांचा तिच्यांत आविष्कार झालेला आहे.

श्री. शास्त्री यांनीं केवळ बंगाली कथासम्राटाची ओळख मराठी वाचकांना करून देऊन न थांबतां, हिंदी वाङ्मयांतील प्रख्यात कादंबरीकार श्री. प्रेमचंद

यांच्या ‘ कायाकल्प ’ या कलाकृतीला मराठींत ‘ चिरजीवन ’ प्राप्त करून दिलें. हिंदी पुस्तकांना मराठी पेहराव चढविण्याचा हा पहिलाच यशस्वी प्रयत्न असावा. या बाबतींत श्री. ह. वा. अत्रे आणि नागपूर येथील श्री. आनंदराव जोशी यांनीं केलेलें कार्यहि तितकेंच महत्त्वाचें आहे. कारण कादंबरीकार म्हणून श्री. प्रेमचंद हे जितके प्रसिद्ध आहेत, तितकाच लघुकथालेखक म्हणूनहि त्यांचा लौकिक आहे. श्री. जोशी यांनीं अनुवादिलेल्या त्यांच्या कथा निरनिराळ्या मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या असून, चारपांच वर्षांपूर्वी चित्रशाळेनें त्यांचा संग्रह प्रसिद्ध केला. त्यावरून प्रेमचंद यांच्या कथनकौशल्याची यथार्थ कल्पना जरी येत नसली, तरी श्री. जोशी यांना प्रेमचंदाविषयीं वाटणारा आदर मात्र योग्य व्यक्त होतो. तथापि ‘ नवयुग ’ मासिकांतून श्री. अत्रे यांनीं प्रेमचंदाच्या ‘ प्रेमपच्चिसी ’ या कथाकलापांतील गोष्टींचा केलेला अनुवाद सरस असून, या हिंदी कथासम्राटाच्या कलाकौशल्याचें प्रत्यंतर, अल्पांशानें कां होईना, पहावयास मिळतें.

याशिवाय कै. माधवानुज यांनीं मधुसूदन दत्त यांच्या ‘ मेघनाद वध ’ यांतील आणि कै. रेंदाळकर यांनीं रवींद्रनाथांच्या काव्यसंभारांतील कांहीं चुटक्यांचें रमणीय भाषांतर केलेलें असून, त्यांचा विसर मराठी वाचकांना अजूनहि पडला नसेल. टागोर यांच्या ‘ मधुराणी ’ आणि ‘ पोस्ट ऑफिस ’ या लघुकलाकृतींचें भाषांतर श्री. भावे व कुंटे यांनीं केलेलें असून, श्री. मराठे यांनीं अनुवादिलेला एक निवडक कथांचा संग्रहहि गेल्या वर्षीं बाहेर पडला. याशिवाय मराठे यांची ‘ परिणीता ’ आणि करंदीकर यांची ‘ पुष्पराणी ’ व ‘ राजनैतिक कारस्थान ’ आणि श्री. आठवले यांचें ‘ प्राचीन साहित्य ’ हीं नुकतींच अनुवादिलेलीं पुस्तकें विशेष उल्लेखनीय होत. श्री. करंदीकर यांनीं ‘ राजनैतिक कारस्थान ’ला मराठी पेहराव देण्यांत औचित्य दाखवून महाराष्ट्राला एका रोमांचकारी प्रसंगाची यथार्थ जाणीव तत्संबद्ध व्यक्तींकडूनच जशी करवून दिली, त्याचप्रमाणें श्री. आठवले यांनीं रवींद्रनाथांच्या ‘ प्राचीन साहित्या ’ला अर्वाचीन मराठींत आणून, बंगाली साहित्यांतील एका अज्ञात दालनाकडे महाराष्ट्राचें चित्त वेधिलें आहे. नुकतेंच गुर्जरांनीं रवींद्रांच्या ‘ योगायोगा ’चें भाषांतर ‘ संगम ’ या नांवाखालीं प्रसिद्ध केलें आहे. रवींद्रनाथांच्या आत्मचरित्राचें व गीतांजली या प्रसिद्ध काव्याचें पण मराठी भाषांतर झालें आहे. टागोर यांच्याप्रमाणेंच विचार आणि कल्पना यांनीं संपन्न असलेलें बरेंचसें निबंधवाङ्मय बंगालींत असून,

त्यांचा परिचय मराठी वाचकांना उद्बोधक झाल्याशिवाय राहणार नाहीं. विशेषतः 'बिरबल' या टोपण नांवानें प्रसिद्ध असलेले टीकाकार श्री. प्रमद चतर्जी यांच्या लेखसंग्रहाकडे अनुवादकांचें लक्ष जाणें इष्ट आहे.

हिंदींतील फारच कमी पुस्तकें मराठींत अनुवादिलेलीं आहेत. प्रेमचंदांच्या मागोमाग हिंदी वाङ्मयहि एक एक पाऊल आतां पुढें पुढें येत आहे. अशा वेळीं राष्ट्रीय एकीकरणाच्या दृष्टीनें आपल्या बांधवांचे विचार समजावून घेण्यास भाषांतरासारखें दुसरें साधन नाहीं. पण कथा-कादंबऱ्यांबरोबरच निबंध, टीका, नाटक वगैरे वाङ्मयांतील इतर शाखांचा परिचय करून घेतला, तरच हें ध्येय साध्य होऊं शकेल.

कन्हय्यालाल मुनशी प्रभृति कांहीं गुजराथी साहित्यिकांच्या कृतींचा अनुवाद मराठींत आहे. पण या लेखांत फक्त बंगालीपुरतीच मर्यादा आंखून घेतली असल्यानें इतर देशी भाषांच्या देणगीचा विचार केला नाहीं. बंगाली वाङ्मयांतून मराठींत अवतीर्ण झालेल्या साहित्याचें हें केवळ धांवतें समालोचन आहे. त्यांत एखादा महत्त्वाचा उल्लेख राहून जाण्याचाहि संभव आहे.

---

१६

# साहित्यसंमेलनें आणि मराठी वाङ्मय

[ लेखक:—श्री. नारायण गोविंद चापेकर, बी.ए., एल्‌एल्.बी. ]

विरोधिवचसो मूकान्वागीशानपि कुर्वते ।
जडानप्यनुलोमार्थान्प्रवाचः कृतिनां गिरः ॥–शिशुपालवध, २.२५.

सालोसाल साहित्य-संमेलनें भरवून हजारों रुपयांची राखरांगोळी व्यर्थ केली जाते, अशी हाकाटी एवढयांतच होऊं लागली आहे. ह्यांत आमचा उतावळा स्वभाव व अदूरदृष्टि हीं व्यक्त होतात. मनांत जन्म पावलेली कल्पना वाणीच्या रूपानें बाहेर पडते आणि वाणी काय करूं शकते, हें कवीनें वरील श्लोकांत वर्णिलें आहे.

संमेलन वर्षांतून तीन दिवसच भरतें; तथापि ह्या तीन दिवसांत जें कांहीं बोललें जातें त्याचाच परिणाम बाकीच्या दिवसांत प्रत्यक्षास येणारी वाङ्मयीन चळवळ ही होय. संमेलनाच्या कल्पनेचे उत्पादक माधवराव रानडे होत. १८७८ सालीं ह्या कल्पनेचें बीं पेरलें गेलें असलें तरी तें रुजण्यास १९०६ सालपर्यंत वाट पाहावी लागली. पुढें १५ वर्षांत १० संमेलनें भरलीं. १९२६ पासून मात्र सालोसाल संमेलन भरत आहे. आजपर्यंत १९ संमेलनें झालीं. तत्प्रीत्यर्थ सुमारें ५०,००० रुपये जनतेनें वायां खर्च केले, असा किंतु कित्येकांच्या मनांत येतो; परंतु प्रत्यक्ष परिणाम पाहिला असतां अशी शंका घेण्याचें कारण नाहीं, अशी कोणाचीहि खात्री होईल.

अगदीं पहिल्या संमेलनाच्या वेळीं ( १८७८ सालीं ) रानडे, कीर्तने, कुंटे, आगरकर इत्यादिकांच्या सह्यांनीं निघालेल्या पत्रकांत ग्रंथकारांची परस्पर ओळख

व्हावी हा एक संमेलन भरविण्याचा उद्देश ग्रथित केला होता. अलीकडे संमेलन दरसाल भरूं लागल्यामुळें परस्परपरिचयाचें महत्त्व सर्वांच्या प्रत्ययास आलें आहे. एकत्र जमल्यानें ग्रंथलेखनाच्या बाबतींत उद्भवणाऱ्या अडचणींचा विचार करतां येतोच, पण मुख्यतः लेखकांचे स्नेहसंबंध जडतात; एकमेकांच्या बौद्धिक शक्तीची ओळख पटते, त्यामुळें ग्रंथकारांचें–लेखकांचें–विद्वानांचें एक स्वतंत्र जग निर्माण होतें; परस्परांविषयीं सहानुभूति उत्पन्न होते. ह्याचा परिणाम ग्रंथपरीक्षणावर होतो. पूर्वींचीं परीक्षणें स्वतःच्या विद्वत्तेच्या घमेंडखोरपणानें केलेलीं असत. मत्सराच्या विषारी नांगीचा दंश बिचाऱ्या ग्रंथकाराला विव्हळ करून सोडी. हल्लीचे टीकाकार दोषैकदृष्टि न ठेवतां गुणग्रहणपूर्वक टीका करतात; त्यामुळें सध्यांच्या परीक्षणांना एक प्रकारची प्रगल्भता आली आहे. ह्याशिवाय संमेलनांतील ओळखीमुळें कोण मनुष्य कोणत्या विषयाचा व्यासंगी आहे हें समजल्याकारणानें लेखनकार्यांत सह-कार्य करतां येतें. आपल्या वाचनांत आलेल्या परंतु आपणांस उपयोगी न पडणाऱ्या गोष्टी त्यांचा अभ्यास करणाराला कळविल्यास त्या अभ्यासकाला फार मदत होते. अशा रीतीनें निरनिराळ्या विषयांचा परिपक्व अभ्यास होऊं शकतो, हा सर्वांत मोठा फायदा होय.

संमेलनें भरण्याच्या पूर्वीं मराठी भाषेला कमीपणा होता. मराठी वर्तमानपत्र अगर मराठी पुस्तक विश्वविद्यालयाच्या पदवीधरानें वाचणें म्हणजे गांवढळपणाचें प्रदर्शन करणें होय, अशी समजूत असे. तो काल आतां बदलला आहे. नामांकित मराठी लेखक म्हणून म्हणवून घेण्यांत विद्यमान पिढीस भूषण वाटत असतें. मोठ-मोठे पदवीधर मराठींत लिहूं लागले, एवढेंच नव्हे, तर आय. सी. एस्. लोकहि मराठी लेखकांत अंतर्भूत होत आहेत, हें मराठीच्या वाढत्या वैभवाचें निखालस द्योतक समजलें पाहिजे. सुशिक्षित पुरुषाची निष्ठा इंग्रजी व मराठी ह्या दोहोंमध्यें विभागलेली क्वचित् दृष्टीस पडेल, परंतु सुशिक्षित स्त्री मात्र अभंग पातिव्रत्याप्रमाणें मराठीसंबंधानेंच एकनिष्ठ असलेली दिसून येते. मराठी लेखकांमध्यें स्त्रीलेखकांची संख्या भरतीच्या पाण्याप्रमाणें वाढत आहे.

ह्या जन्मभाषेच्या अभिमानाचा लोट सामान्य स्त्रीपुरुषांना ओढून घेत

'स्थानिक तेवढे कोरडे कोठून राहणार? मराठी लिहिण्यावाचण्याची हौस संस्थानकांत उत्पन्न झाली आहेच, पण साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद मिळविण्याची महत्त्वाकांक्षाहि त्यांनीं धरली आहे. राजे ह्या नात्यानेंहि मराठी भाषेसंबंधानें त्यांचें

असलेलें कर्तव्य आमच्या संस्थानिकांकडून बजावलें जात आहे, त्याचें श्रेय संमेलनांना दिल्यावांचून चालणार नाहीं. ग्वाल्हेर, इंदूर, इचलकरंजी, भोर, देवास ह्या संस्थानिकांचा ग्रंथकारांना मिळत असलेला आश्रय सर्वश्रुत आहे. यामध्यें श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांचें नांव वगळून कसें चालणार? महाराजांच्या औदार्यावर माझा हक्कच आहे, अशी भावना प्रत्येक मराठी लेखकांत उद्भूत होण्यास महाराजांची कृति कारणीभूत झाली आहे. मराठी ग्रंथांना आश्रय त्यांच्याकडून भरपूर मिळतोच, पण ग्रंथकारांना सन्मानपूर्वक पारितोषिक देण्याची त्यांनीं केलेली योजना कळसासारखी आहे, यांत शंका नाहीं. संस्थानांत संमेलनें भरतात, हें संस्थानिकांच्या मराठी भाषेवरील प्रेमाचेंच चिन्ह नव्हे काय?

"मुंबई विश्वविद्यालयामध्यें मराठी भाषेचा प्रवेश करविणें, ऐतिहासिक व वाङ्मयात्मक लेखांचा संग्रह करणें, इतिहास-संशोधनास व्यवस्थित स्वरूप देणें, शिलालेखांचें वाचन करणें, आधुनिक कवींचा परामर्श घेणें, मराठी भाषेचा कोश, विश्वकोश यांसारखे प्रचंड ग्रंथ निर्माण करणें," हे उद्देश १९०६ सालीं पुण्यास भरलेल्या साहित्यसंमेलनानें आपल्यापुढें ठेविले होते. अभिमानानें सांगण्यासारखी गोष्ट ही कीं, वरील सर्व उद्देश आज सिद्धीस गेलेले दिसत आहेत. ज्ञानकोशाचा प्रचंड ग्रंथ निर्माण झाला आहे, इतकेंच नव्हे तर चरित्रकोश, व्यायामकोश, व्यवहारकोश ह्यांसारखे अनेक कोश तयार झाले आहेत व होत आहेत. महाराष्ट्र सांवत्सरिकासारखे संदर्भ ग्रंथ होऊं लागले; शब्दकोशाचे चार भाग लोकांच्या हातींहि पडले. "प्राचीन महाराष्ट्र"सारखा ग्रंथ—शिलालेख, प्राचीन ग्रंथ ह्यांवर आधारलेला—कोणत्याहि भाषेला भूषणावह होईल असा निर्माण झाला आहे; ठाणें, मुंबई, पुणें वगैरे ठिकाणीं ग्रंथालयें स्थापित होऊन तेथें मराठी भाषेंत प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांचा संग्रह करण्यांत येत असतो. हीं संग्रहालयें लोकांत वाचनाची अभिरुची निर्माण करतात ह्यांत शंका नाहीं.

मराठीचा प्रवेश विश्वविद्यालयांत आज पूर्णपणें झाला आहेच, आणखी शिवाय तेथें तिला सन्मानीय स्थान प्राप्त झालें आहे. ह्याप्रमाणें मराठीचा शिरकाव विद्यापीठांत होतांच सर्व महाशालांतून मराठीचे प्राध्यापक नेमले गेले. ह्यामुळें वाङ्मयाचा चिकित्सापूर्वक अभ्यास होऊं लागला. बहुतेक सर्व महाशालांत वाङ्मय-चर्चा-मंडळें अस्तित्वांत आलीं. सर्व विद्या पुरी होऊन बाहेर पडलेल्या ह्या विद्याविलासी तरुणांनीं ठिकठिकाणीं वाङ्मयपोषक मंडळें स्थापन केलीं ह्यांत नवल नाहीं. ह्या

मंडळांकडून निरनिराळ्या ग्रंथांचा अभ्यास होऊं लागला. कोणी किर्लोस्कर घेतला तर कोणी ज्ञानेश्वर घेतला. तसेंच तुकाराम व मोरोपंत ह्यांचें चर्चात्मक वाचन होऊं लागलें.

जुन्या कवींच्या अभ्यासामुळें नवीन कवि उपेक्षिले गेले नाहींत. नवीन कवींच्या उदयाला व उत्कर्षाला संमेलनें प्रत्यक्ष कारणीभूत झालीं आहेत ह्यांत तर शंकाच नाहीं. संमेलनांनीं कवींचा पुरस्कार केला, त्यांना प्रोत्साहन दिलें. संमेलनांनीं अर्वाचीन काव्याला प्रतिष्ठित स्थान प्राप्त करून दिलें. संमेलनांत एखादें लहानसें एकांकी नाटक प्रयोगानें लोकांपुढें आणण्याची प्रथा पडली असती तर नाटकेंहि अधिक भरभराटीस आलीं असतीं. संमेलनांमुळें स्त्रियांनाहि पुढें येण्याला वाव मिळाला.

पुण्याचें भारत-इतिहास-संशोधक मंडळ व धुळ्याचें राजवाडे संशोधन-मंडळ यांच्याकडून "इतिहासाच्या संशोधनास व्यवस्थित स्वरूप" दिलें जात आहे. ह्या प्रसंगीं पारसनिसांचा सातारा येथील संग्रह व पेशवे दप्तरांत रावसाहेब सरदेसाई यांनीं केलेले परिश्रम ह्यांचें विस्मरण कसें व्हावें? त्याचप्रमाणें वासुदेव शास्त्र्यांची कामगिरीहि दृष्टिआड करण्यासारखी नाहीं. ग्रंथसंग्रहालयाप्रमाणें संशोधनमंदिर प्रत्येक जिल्ह्यांत एक तरी व्हावयास पाहिजे. पुण्यास शब्दकोश मंडळाच्या चालनेनें भाषाशास्त्रमंडळ निघालें होतें, पण त्याचें काम बंद पडल्यासारखें दिसतें. भाषामंडळांची आवश्यकता लोकांना अद्यापि भासत नाहीं, हें कशाचें लक्षण आहे समजत नाहीं. त्यांतल्या त्यांत समाधानाला जागा म्हणजे परिभाषामंडळें होत. भाषामंडळाबरोबर समाजशास्त्रमंडळें ह्यांचीहि उणीव भरून काढणें अवश्य आहे. पंधरा वर्षांपूर्वी कै. राजवाडे, डॉ. केतकर इत्यादि विद्वानांनीं एक समाजशास्त्रमंडळ चालविलेलें ऐकतों. आहिताग्नि राजवाडे यांच्या प्रेरणेनें सध्यां असेंच एक मंडळ कार्य करीत आहे. संमेलनाचें लक्ष ह्या विषयाकडे अद्यापि कोणीं वेधलें नाहीं ह्याचें आश्चर्य वाटतें. शास्त्रविषयक संस्था जागजागीं स्थापन झाल्यास मराठी वाङ्मयाची विद्युद्वेगानें वाढ झाल्याशिवाय राहणार नाहीं. अशा नवीन विषयांकडे लोकांचें लक्ष लावण्यास संमेलनांसारखें दुसरें साधन नाहीं.

संमेलनांचा उपयोग नसता तर प्रांतिक संमेलनें भरलीं नसतीं; पण प्रांतिक संमेलनांना सध्यां भरती आली आहे. वर्षांतून दूर कोठें तरी एकदां भरणाऱ्या संमेलनानें लोकांचें समाधान होत नाहीं. ह्यावरून संमेलनांची लोकप्रियता व्यक्त होते. प्रांतिक

संमेलनांप्रमाणें कविसंमेलनें व नाट्यसंमेलनेंहि आज कित्येक वर्षे भरत आहेत. एक संपादकसंमेलनहि भरलें आहे. कथा-कादंबरीलेखकांनीं मात्र अद्यापि आपलें स्वतंत्र संमेलन भरविण्याचें मनांत आणलें नाहीं, असें दिसतें. ह्या निरनिराळ्या संमेलनां-मुळें वाङ्मयावर इष्ट असाच परिणाम घडेल, ही गोष्ट निर्विवाद आहे.

ग्रंथ करण्याच्या कामीं येणाऱ्या अडचणी दूर करण्याचे उपाय शोधणें, हें काम अनेक माणसें एकत्र जमल्यानेंच होत असतें. १८७८ सालच्या पत्रकांत संमे-लन भरविण्याचा हा एक हेतु प्रदर्शित करण्यांत आला होता. कित्येक कामें संघ-शक्तीनेंच होऊं शकतात. वेगवेगळ्या माणसांचे अनुभव उपयोगी पडतात. उदा-हरणार्थ पोस्टाचे दर वाढविल्यामुळें ग्रंथनिर्मितीची पिछेहाट होते, ही गोष्ट अधि-काऱ्यांच्या कानावर घालावयाची तर त्याकरितां एकत्र जमून खल करणें जरूर आहे. गैरसमजुतीनें कित्येक नामांकित ग्रंथ सरकारच्या रोषास पात्र होतात. होतकरू तरुण पिढी अशा ग्रंथांतील वैशिष्ट्याला—भाषाशैली, विषयाची मांडणी, परिणामकारकता इत्यादीला—आंचवते. तेव्हां अशा विविध वाङ्मयाविषयीं लोकमत प्रकट करण्यास संमेलनावांचून दुसरें स्थळ कोठें मिळणार? संमेलनांत सर्व वादविवाद सुसंघटित व केंद्रिभूत होतो. वर्तमानपत्रांतील चर्चा ओढ्याच्या पसरलेल्या पाण्याप्रमाणें असते.

प्रचलित वाङ्मयांतील अनिष्ट प्रवृत्तींना आळा घालण्यास संमेलनेंच समर्थ आहेत, ह्याचा अनुभव आपणांस नुकताच आला आहे. संमेलनाच्या हातांत अधि-कारदंड नसतांहि केवळ मतप्रदर्शन किती प्रभावी होऊं शकतें, हें अश्लील वाङ्मया-वरील ठरावाच्या बाबतींत बडोद्याच्या संमेलनानें सिद्ध केलें आहे. प्रतिभासाधन-वाद संमेलनापर्यंत येऊन पोहोंचला नाहीं हें खरें, तथापि लोकक्षोभ व्यक्त होण्या-पुरतें प्रतिभासाधनसमिति हें एक संमेलनच होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. ह्या समितीचें कार्य परिणामकारक झालें नाहीं असें कोण म्हणेल?

संमेलनाची उपयुक्तता शुद्धलेखनाच्या प्रश्नावरून निःसंदिग्ध रीतीनें सिद्ध होते. शुद्धलेखनाचा वाद पूर्वींहि निघाला होता; परंतु कांहीं थोड्या व्यक्तींनींच चळवळ केल्याकारणानें त्यांच्या प्रयत्नांना अपयश आलें. आज संमेलनानें पसंत केलेलें शुद्धलेखन विद्याखात्याला मान्य करावें लागणार आहे. ह्या एका कामगिरीनें सुद्धां मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत संमेलनाचें नांव चिरस्थायी होण्यासारखें आहे.

सर्व विद्या मराठींत बद्धमूल होऊन महाराष्ट्र वाङ्मयाला सुसंपन्नता आणावी यासाठीं स्वतंत्र महाराष्ट्र विद्यापीठ असावें अशी इच्छा धरून तिच्या पूर्तीसाठीं थोडेसे प्रयत्न संमेलनानें १९२१ सालापासून चालविले आहेत. १९२८ सालीं महाराष्ट्र युनिव्हर्सिटी असोसिएशन स्थापन झाली व तिचें काम चालू आहेच. असें विद्यापीठ सुदैवानें लवकर निघाल्यास मराठीला केवढा दर्जा प्राप्त होईल हें कोणास सांगावयास नकोच.

बृहन्महाराष्ट्राचें एकीकरण व तद्द्वारां मराठीचा हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं प्रसार करणें, हा उद्देश संमेलनानें बाळगिला असून ग्वाल्हेर, गोवें, हैद्राबाद, बेळगांव, बडोदें इ. दूरच्या प्रांतांतून संमेलनें भरलीं गेलीं आहेत व त्यांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष बराच उपयोगहि झाला आहे. अशा संमेलनाभावीं या मराठी वसाहती महाराष्ट्रापासून तुटल्या जात्या व त्याचा परिणाम भाषासंवर्धनावर फार अनिष्ट होता. आज बृहन्महाराष्ट्रांतून वाङ्मयाला चांगला हातभार लाविला जात आहे.

मराठीच्या उपभाषा ऊर्फ प्रांतिक भाषा यांकडे विद्वानांचें लक्ष ओढून घेऊन त्या बोलींना वाङ्मयीन महत्त्व देण्याचा उपक्रम संमेलनांनीं चालविला आहेच. गोमांतकी, अहिराणी इ. बोली अभ्यासास घेऊन त्यांची शास्त्रीयता सिद्ध करण्यासाठीं व मराठी भाषेंत त्यांना योग्य स्थान देण्यासाटीं महाराष्ट्र साहित्य परिषदेमार्फत प्रयत्न चालले आहेत, हें सर्वांना विदितच आहे.

महाराष्ट्र विद्यापीठ केव्हां अस्तित्वांत येईल तेव्हां येवो, पण तोंपर्यंत मराठी भाषा आणि वाङ्मय याच फक्त विषयांच्या स्वतंत्र परीक्षा घेऊन भाषाभ्यासकांना उत्तेजन द्यावें व गौरवावें अशा उदार हेतूनें संमेलनाची संचालक संस्था जी महाराष्ट्र-साहित्यपरिषद् तिनें कांहीं उपक्रम करण्याची तयारी केली आहे व तिचें मूर्त स्वरूप लवकरच जनतेला दिसेल.

या व अशा कितीतरी गोष्टी मराठीच्या विकासासाटीं संमेलनांनीं केल्या आहेत व पुढेंहि कित्येक करतील. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, मराठी साहित्यास महाराष्ट्र-साहित्य संमेलनाकडून बरीच चालना मिळाली आहे व तें ऋण कबूल करणें आपलें कर्तव्य ठरतें.

---

१७

# मराठी नियतकालिकें

[ लेखकः—श्री. रामचंद्र गोविंद कानडे, वाङ्मयविशारद ]

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात *हिंदुस्थानांत प्रथम बंगाल प्रांतांत मुद्रण-कलेचा प्रवेश होऊन कालांतरानें तिचा हिंदुस्थानांतील इतर भागांत प्रसार झाला. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं मुंबई इलाख्यांत पहिला मराठी छापखाना निघाला व त्याच्या मागोमाग मराठी नियतकालिकें महाराष्ट्रांत अवतीर्ण झालीं. १८३२ सालीं मराठींतील पहिलें नियतकालिक "दर्पण" निघालें. तेव्हांपासून आजपर्यंतच्या एकशेंतीन वर्षांच्या दीर्घ काळांत जवळजवळ हजार दीडहजार नियत-कालिकें निघालीं असतील; त्यांपैकीं आज फार तर शेंदीडशेंच वृत्तपत्रें व मासिकें नीट चालू आहेत. या सर्व नियतकालिकांपैकीं सन १८७४-१९३५ या काळांतीलच नियतकालिकांचा संक्षिप्त इतिहास व वाङ्मयाभिवृद्धीस त्यांनीं केलेली मदत, यांचें या लेखांत उपलब्ध साधनांच्या आधारें थोडेंसें विवेचन करण्याचें योजिलें आहे. लेखन-सुलभतेसाठीं लेखाचे दोन भाग केले असून पहिल्या भागांत मासिकांची व दुसऱ्या भागांत वृत्तपत्रांची माहिती दिली आहे.

---

* ब्रिटिश हिंदुस्थानांत डॉ. केरे यांनीं जरी पहिला छापखाना काढला असला, तरी त्यापूर्वीं बरींच वर्षे पोर्तुगीज लोकांनीं गोमंतकांत पहिला छापखाना उघडल्याचा उल्लेख सांपडतो. १५५७ सालीं 'ख्रिस्तीमत' कोंकणी भाषेंत पण रोमन लिपींत छापलें गेलें आहे.—नवयुग १९१६

## ( १ ) मासिकें

१८७४ सालीं निबंधमालेचा जन्म झाला. त्यामुळें मराठी साहित्याच्या इतिहासांत या सालास विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. निबंधमालेपूर्वी मराठींत ५० नियतकालिकें प्रसिद्ध झालीं होतीं, त्यांपैकीं "विविधज्ञानविस्तार" व "मराठी शाला-पत्रक" हीं दोन मासिकेंच काय तीं गाजलीं. विविधज्ञानविस्तारास आपल्या पन्नाशीचा आनंदमहोत्सव साजरा करण्याचें भाग्य लाभलें व थोरल्या मोरमकरांच्या हयातीपर्यंत त्याचा विशेष बोलबाला झाला. हल्लीं हें मासिक जेमतेम जीव धरून आहे. तरी पण त्याच्या आजवरील साहित्यसेवेमुळें त्याचें नांव साहित्येतिहासांत चिरकाल राहील. मराठी शालापत्रकास चिपळूणकर पितापुत्रांच्या लेखनाची जोड मिळाल्यामुळें कांहीं काळ लोकप्रियता लाभली. आज हें मासिक नवीन स्वरूपांत लहान मुलांमुलींकरितां म्हणून पुण्याच्या चित्रशाळेमार्फत निघत आहे.

वरील दोन मासिकांशिवाय 'दंभहारक' ( १८७१-७५ ) व 'ज्ञानसंग्रह' ( १८७२-७४ ) या दोन मासिकांचा येथें उल्लेख केला पाहिजे. हीं मासिकें जरी अल्पजीवी ठरलीं तरी त्यांनीं आपल्या काळीं बऱ्यापैकीं वाङ्मयसेवा केली. दंभहारकांतील निबंध चांगल्यापैकीं असत. रा. ब. गोपाळ हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांचीं दोन रूपकात्मक स्वप्नें या मासिकांत प्रसिद्ध झालीं होतीं. युरोपियन लोकांस मराठीचे परीक्षक नेमूं नये, असा एकदां स्पष्ट अभिप्रायहि या मासिकानें एका लेखांत दिला होता. ज्ञानसंग्रह मासिक रा. ब. वि. मो. महाजनी प्रभृति मंडळींनीं वऱ्हाडांत काढलें होतें व त्याची त्या वेळीं प्रौढ मासिकांत गणना होत असे.

### निबंधमाला

वरील मासिकांस आपली जीवितयात्रा हलाखींतच काढावी लागली. कारण हल्लींप्रमाणें तेव्हां साक्षरतेचा विशेष प्रसार झाला नव्हता व जी मंडळी साक्षर झाली होती त्यांच्यांत स्वधर्म, स्वदेश व स्वभाषा यांच्याबद्दल मुळींच आदर नव्हता. "आमच्या नूतन पंडितमंडळीनें करावें काय, तर सरकारी हुद्दे मिळवावे, जन्मभाषेची व आपल्या देशाची ओळख विसरून जाऊन पाश्चात्य भाषेंत निरंतर अद्वातद्वा प्रलाप करावे व आपल्या राज्यकर्त्यांचें सर्व प्रकारें अनुकरण करून मोरांचीं पिसें लावून आयता थोरपणा मिळवूं पाहणाऱ्यांच्या पंक्तीला बसावें!" तसेंच "ज्यांनीं स्वभाषेच्या अभिवृद्ध्यर्थ निरंतर उत्साहानें झटावें, त्यांच्यांत सुस्ती, कृतकृत्यताबुद्धि, पंडितंमन्यता वगैरे दोष अखंड वसल्यामुळें तिची मोठी हानि होऊन

ती क्षयाच्याच पंथास दिवसेंदिवस लागत चालली आहे." चिपळूणकरांनीं या शब्दांत तत्कालीन स्थितीचें यथार्थ वर्णन केलें आहे. ही स्थिति घालविण्यासाठीं निबंधमालेचा जन्म झाला व आपल्या अवघ्या सात वर्षांच्या आयुष्यांत तिनें जनमनांत अभूतपूर्व क्रांति घडवून आणली.

१८७४ सालच्या प्रारंभीं निबंधमालेचा पहिला अंक प्रसिद्ध झाला. त्याचा आकार क्राउन षोडशपत्री असून ग्रेट प्रायमर टाइपांत छापलेलीं त्यांत ३६ पानें असत. मालेच्या पहिल्या २४ अंकांपर्यंत तिच्या सांच्यांत बदल झाला नाहीं. पंचविसाव्या अंकापासून माला डेमी अष्टपत्री सांच्यांत निघूं लागली. पानांची संख्या मात्र ३२ वर उतरली. मालेचा हा आकार तिच्या अखेरीपर्यंत कायम राहिला.

शाळेची नोकरी सांभाळून शास्त्रीबुवा निबंधमाला काढीत असल्यानें ती वक्तशीर निघत नसे. तिचे अनेक अंक मागासत. तिच्या ४ थ्या वर्षांत ६ व पांचव्यांत ८ अंक मागासले. तेव्हां ६० अंक निघाल्यावर १२ अंक मागें पडल्याचें पाहून सबंध वर्ष त्यांनीं गडप केलें! अंकांचा नियमितपणा तेव्हांप्रमाणें आतांहि पुष्कळ संपादकांस सांभाळवत नाहीं. त्यांना अनेक अडचणी असतात, हें खरें आहे.

मालेच्या ८४ अंकांत पुढील निबंध प्रसिद्ध झाले:—१ मराठी भाषेची सांप्रतची स्थिति, २ प्रस्तुत मालेचा उद्देश, ३ विद्वत्त्व आणि कवित्व, ४ संपत्तीचा उपभोग, ५ इतिहास, ६ भाषादूषण, ७ लेखनशुद्धि, ८ वाचन, ९ भाषांतर, १० लोकभ्रम, ११ ग्रंथांवर टीका, १२ गर्व, १३ वक्तृत्व, १४ भाषापद्धति, १५ इंग्रजी भाषा, १६ डॉ. जानसन्, १७ मोरोपंताची कविता, १८ लोकहितवादी व १९ आमच्या देशाची स्थिति. या निबंधांशिवाय मालेंत टेंपेस्ट, वेदार्थयत्न, फुल्यांची गुलामगिरी, महाजनींचें तारानाटक, काव्येतिहाससंग्रह, अपभ्रष्ट-शब्द-चंद्रिका व ज्ञानेश्वरी परिभाषा वगैरे पुस्तकांचीं मार्मिक परीक्षणें आलीं होतीं. पत्रव्यवहार, चमत्कारिक माहिती, भाषा-परिज्ञान, सुभाषितें, उत्कृष्ट उतारे, विनोदमहदाख्यायिका या सदरांखालीं मालेंत इतर वाचनीय मजकूर आला होता तो निराळाच.

निबंधमालेनें महाराष्ट्रांत अभूतपूर्व क्रांति घडवून आणल्याचें वर सांगितलेंच आहे. "मराठी भाषेविषयींचें सुशिक्षितांतलें अप्रेम तिनें नाहींसें केलें, मिशनऱ्यांच्या धर्मध्वंसनाच्या चळवळीस आळा घातला, ब्रिटिश राज्यनीतीच्या विदारक स्वरूपाचें आविष्करण केलें, समाजांत आत्मप्रत्ययाची स्फूर्ति उत्पन्न केली व देशसेवेला वाहून

घेण्याचा गुरुमंत्र महाराष्ट्रास दिला...म्हणून, क्रांतिकारक पुरुषाचा क्रांतिकारक ग्रंथ, असेंच तिचें वर्णन महाराष्ट्राचे भावी इतिहासकार करितील."

## सन १८७५ ते १८००

निबंधमालेनंतर पुढील सोळा वर्षांत जन्मास आलेल्या मासिकांची यादी खालीं दिली आहे, तीपैकीं वर उल्लेखिलेलें मराठी शालापत्रक व श्री. वि. ग. ताम्हणकर यांनीं पुनश्च सुरू केलेला कै० वि. कों. ओक यांचा 'बालबोध' यांशिवाय आज एकहि मासिक चालू नाहीं, ही खेदाची गोष्ट होय.

१८७६—वेदार्थयत्न ( मुंबई ); मनुस्मृति, मराठी भाषांतर ( मुंबई ); अबला-मित्र ( अलीबाग ); शिल्पकलासंग्रह ( पुणें ); ज्ञानसागर ( पुणें ); सर्वसंग्रह ( पुणें ); शेतकी सुधारणा ( पुणें ); काव्येतिहाससंग्रह ( पुणें ); कौमुदी महोत्सव ( मुंबई ); याज्ञवल्क्यस्मृति भाषांतर ( मुंबई ). १८७८—षड्दर्शन-चिंतनिका ( पुणें ); विद्यामाला ( रत्नागिरी ); नाट्यकथार्णव ( मुंबई ). १८८०—शिवतत्वप्रकाश ( मुंबई ); व्यवहारदर्पण ( मुंबई ); पुष्पगुच्छ ( मुंबई ); हुन्नरसंग्रह ( मुंबई ). १८८१—कायस्थ प्रभूंच्या इतिहासाचीं साधनें ( मुंबई ); बालबोध ( मुंबई ); स्त्रीसद्बोधचिंतामणी ( मुंबई ). १८८२—पुणें सार्वजनिक सभेचें मासिक ( पुणें ); राजहंस ( पुणें ); तरुणमित्र ( मालवण ); काव्यनाटकादर्श ( धारवाड ). १८८३—गुलजारगुलहौशी ( मुंबई ); मालिका ( पुणें ); शेतकरी ( उमरावती ); भारतकथासंग्रह ( मुंबई ); समूल-पुराणार्थ-प्रकाश ( मुंबई ); संगीतदर्पण ( मुंबई ); निबंधचंद्रिका ( पुणें ); तत्त्वविवेचक ( पुणें ); कुटुंब-करमणूक ( मुंबई ); सरलार्थ-बोधिनी-गीता ( मुंबई ). १८८४—कुटुंबमित्र ( मुंबई ); चित्र-दर्शन ( मालवण ); भारतीय कथाकलाप ( मुंबई ); बालसुमित्र ( मुंबई ); कादंबरी-कलाप ( पुणें ); ज्ञानदीप ( मुंबई ); वाग्विलास ( मुंबई ); विबुधप्रिया ( मुंबई ); ऐतिहासिक नाट्यकथावली ( पुणें ); आर्यमित्र ( पुणें ); काव्यार्थप्रकाश ( पुणें ); विद्यानंद ( पुणें ). १८८५—जैनबोधक ( सोलापूर ); नीत्युपदेश ( मुंबई ); विविध-कलाविस्तार ( बडोदें ); धन्वंतरी ( पुणें ); विषयतरंगिणी ( नासिक ); हिंदुधर्म-विवेचक ( मुंबई ); सृष्टिज्ञान ( मुंबई ). १८८६—तरुणांस उपदेश ( मुंबई ); सद्धर्मदीप ( अलिबाग ); संगीत-मीमांसक ( पुणें ); कुमुदिनी ( पुणें ); इस्रायली ज्ञानसंग्रह ( मुंबई ); कथाकलाप ( अहमदनगर ); ज्योतिषप्रकाश ( पुणें ); काव्यें-दुशेखर ( पुणें ); ज्ञानादर्श ( गोवें ); मनोरंजक ( पुणें ); केरळकोकिळ ( कोचीन );

श्रीखंड ( गोवें ); विविधग्रंथसंग्रह ( मुंबई ); तरुणशिक्षक ( भुसावळ ). १८८७—सच्चिदानंद ( सांवतवाडी ); ज्योतिषविद्याप्रसारक ( रत्नागिरी ); महाराष्ट्र कोकिळ ( सातारा ); धनुर्ध्य ( बडोदें ); शिल्पकलाविज्ञान ( पुणें ); कारागीर ( नागपूर ); गृहिणी ( मुंबई ); नाट्यकथामाला ( पेण ); सुभाष्यचंद्रिका ( सातारा ). १८८८—दीनमित्र ( पुणें ); काव्यरत्नावली ( जळगांव ); पथ्यबोध ( गोवें ); सार्वजनिक ( मुंबई ). १८८९—कुटुंबशिक्षक ( मुंबई ); काव्यसुमनांजली ( नागपूर ); साध्वी ( मुंबई ); आर्यभिषक् ( मुंबई ); आर्यभगिनी ( मुंबई ); भारतविजय ( मुंबई ); वामनीग्रंथ ( मुंबई ); श्रीमयूरकवी ( मुंबई ). १८९०—काव्यसंग्रह ( मुंबई ); मराठीशालापत्रक ( पुणें ).

वरील यादीवरून तत्कालीन समाजाचें प्राचीन साहित्याच्या पुनरुज्जीवनाकडे विशेष लक्ष लागल्याचें दिसतें. त्यामुळें साहजिकपणेंच वाल्मिकी रामायणकथा-महोदय, काव्यार्थदीपिका, मनुस्मृति-भाषांतर, याज्ञवल्क्यस्मृति-भाषांतर, कौमुदी-महोत्साह, षड्दर्शनचिंतनिका, काव्यनाटकादर्श, समूलपुरुषार्थप्रकाश, सरलार्थ-बोधिनी गीता, वामनी ग्रंथ, काव्यसंग्रह, वगैरे मासिकांनीं संस्कृत ग्रंथांचीं मराठींत भाषांतरें करण्यावर व प्राचीन कवींचीं काव्यें छापण्यावर भर दिला होता. या मासि-कांनीं मराठी साहित्यांत इष्ट ती भर घालून बहुजनसमाजास प्राचीन भारतीय संस्कृ-तीचें ज्ञान करून दिलें, यांत शंका नाहीं.

नाट्यकथार्णवाच्याद्वारें शंकर मोरो रानडे यांनीं पाश्चात्य नाटकांचीं भाषांतरें प्रसिद्ध करून तिकडील नाट्यवाङ्मयाचा मराठी वाचकांस परिचय करून दिला. त्यांत प्रसिद्ध होणाऱ्या ललित कृतींमुळें हें मासिक तेव्हां बरेंच लोकप्रिय झालें होतें. ज्ञान-संग्रह, वाग्विलास, विबुधप्रिया, केरळकोकीळ, महाराष्ट्र कोकीळ, मनोरंजन वगैरे मासि-कांनीं या काळीं ललित वाङ्मयांत बऱ्यापैकीं भर घातली. वर उल्लेखलेलें मनोरंजन व सध्यां चालू असलेलें मनोरंजन यांचा नामसादृश्यापलीकडे कांहींचाहि संबंध नाहीं, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. सध्यां चालू असलेलें मनोरंजन कै. काशिनाथ रघुनाथ मित्र यांनीं १८९५ सालीं काढलें व वर उल्लेखिलेलें मनोरंजन त्याच्या पूर्वीं म्हणजे १८८६ सालीं निघालें. या जुन्या मनोरंजनाची मालकी कानिटकर आणि मंडळीकडे होती, व कै. हरिभाऊ आपटे तें संपादित असत. कै. मित्रांनीं आपल्या जुन्या मासिकाचें नांव स्वतःच्या मासिकास दिल्यामुळें हरिभाऊंना साहजिकपणेंच राग आला होता व त्यांनीं बरींच वर्षेंपर्यंत मित्रांना लेखनसाहाय्य केलें नाहीं. हरि-

भाऊंच्या मनोरंजनांत श्री. काशीताई कानिटकर यांची ' रंगराव ' व हरिभाऊंची ' गणपतराव ' ह्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें वाङ्मय स्मारक म्हणून सन १८८३ मध्यें कांहीं गृहस्थांनीं ' निबंधचंद्रिका ' नांवाचें मासिक सुरू केलें होतें, पण त्याची सांपत्तिक स्थिति खालावल्यामुळें १८८७ सालीं तें मनोरंजनांत सामील करण्यांत येऊन ' मनोरंजन व निबंधचंद्रिका ' या जोड नांवानें हीं मासिकें पुढें आपल्या आश्रयदात्यांच्या भेटीस येत. पण याहि जोड मासिकानें १८९२ सालीं राम म्हटला. लोकांना स्वेतिहासाची जाणीवहि या कालांत झाल्याचें दिसतें. कारण विविधज्ञानविस्तारानें इतिहाससंशोधनपर लेख छापण्यास प्रथम सुरुवात केली. पुढें ऐतिहासिक साधनें प्रसिद्ध करण्यासाठीं काव्येतिहाससंग्रह अवतरला. पण त्यास लोकाश्रयाभावीं ११ वर्षांनंतर आपला ग्रंथ आटोपणें भाग पडलें. तरी त्यानें सुरू केलेली प्रथा, भारतवर्ष, इतिहाससंग्रह, सरस्वतीमंदिर, ग्रंथमाला वगैरे मासिकांनीं पुढें बरींच वर्षें चालविली. ग्रंथमालेला कै. वि. का. राजवाडे, र. न. आपटे, सरदार माधवराव किबे, रा. सा. ना. गो. चापेकर, टिल्लू वगैरे विद्वानांचें बरेंच लेखनसाहाय्य झालें. प्रो. विजापूरकर यांच्या हातीं तिची संपादकीय सूत्रें होतीं. पुण्याच्या सार्वजनिक सभेनें याच कालांत केवळ ' राजकीय व लौकिक विषयांचें ' मासिक काढलें होतें. ब्रिटिश हिंदुस्थानाप्रमाणें देशी संस्थानांतहि या कालांत नियतकालिकें निघूं लागलीं होतीं, ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे.

## सन १८९१ ते १९२०

या तीस वर्षांच्या काळांत प्रसिद्ध झालेल्या कांहीं मासिकांचीं नांवें खालीं दिलीं आहेत. त्यावरून मासिकांच्या प्रगतीची वाचकांस साधारण तरी कल्पना येईल.

१८९४—भाषांतर. १८९८—ग्रंथरत्नाकर. १९०२—सरस्वतीप्रकाश ( उमरावती ); सत्संग ( गोवें ); भूत ( प्रथम सचित्र वर्तमानपत्र ). १९०३—तुफान. १९०४—महाराष्ट्र इतिहास ( मुंबई ); आर्यधर्म; राष्ट्रमुख व्यापारउद्योग. १९०६—महाराष्ट्र वाग्विलास ( मुंबई ); चित्ताकर्षक ( मुंबई ). १९०७—विद्यार्थी ( इंदूर ); समालोचक ( हुबळी ); प्रभात ( धुळें ); रंगभूमी ( कि. सं. ना. मंडळी ); नाट्यकला. १९०८—पुष्पगुच्छ; समुद्र; खेळगडी ( महाड ), ( मुंबई ); केरळकोकीळ. १९०९—सरस्वतीमंदीर ( मुंबई ); वंदेजिनवरम् ( बार्शी ) महाराष्ट्रप्रगति ( भिवंडी ); इतिहाससंग्रह; राष्ट्रोदय ( पुणें ); वीरशैव संजीवनी ( अमरावती ); भंडारीविजय ( मुंबई ); राष्ट्रबोध ( पुणें ); सारिका ( मुंबई ).

१९१०–चित्रमयजगत् ( पुणें ); उद्यान ( मुंबई ); धर्म ( वाई ); वैश्यमासिक. १९११–धर्मविचार ( कोल्हापुर ); शेतकी शेतकरी; आरोग्य (अमरेळी); मराठी-शिक्षक ( आतां प्राथमिक शिक्षक ); भारतवर्ष. १९१२–दैवज्ञ मासिक ( मुंबई ); श्रुतिबोध ( मुंबई )–हिंदी, मराठी, गुजराथी; लायब्ररी मिसलेनी ( बडोदें )–इंग्रजी, गुजराथी, मराठी; जैनवाग्विलास; लोकशिक्षण ( तळेगांव, पुणें ); ज्ञानसंग्रह; कादंबरी-कलाप; नाट्यकथावली; काव्येतिहाससंग्रह ( मुंबई ). १९१३–उपनिषद्-प्रकाश ( मुंबई ); ज्योतिर्विजय ( मुंबई ); मधुकर ( मुंबई ); समाजादर्श (वडाळें); ज्ञातांजन ( मुंबई ); महाराष्ट्र–साहित्यपत्रिका ( मुंबई येथें प्रथम वि. शा. विस्ताराला जोडून निघत असे; आतां स्वतंत्रपणें म. सा. परिषदेमार्फत गेलीं ८ वर्षे निघत आहे ); विश्वब्राह्मण ( पुणें ); कुटुंब-शिक्षणमाला ( पुणें ); नवयुग ( मुंबई ). १९१४–नवें मन्वंतर ( परिचें–पुणें ); प्रभात ( मुंबई ); मराठा (मुंबई); आयुर्वेद ( मुंबई ). १९१५–मोदक ( मुंबई ); सुधाकर ( मुंबई ); चंद्रिका ( मुंबई ); कन्याशिक्षक ( पुणें ); रामदास–रामदासी ( धुळें ); संकल्प ( मुंबई ); ज्योतिर्माला ( मुंबई ). १९१६–व्यायाम (बडोदें). १९१७–२० इतिहास-ऐतिहासिक; बालिकादर्श; मध्वसिद्धांत सुधाकर; समाजसेवक व सहकारी; अभ्यासी; स्वाध्याय; धर्मनिबंधमाला.

वरील यादीवरून पावसाळी वाढीप्रमाणें या काळांत मासिकें उदयास आल्याचें दिसतें. यांपैकीं बहुतेक सर्व अल्पायुषी निघालीं. सन १९१४ मध्यें युरोपांत महायुद्ध सुरू होऊन छपाईच्या भावांत वाढ झाल्यानें बऱ्याच मासिकांना आपला प्रपंच आटपावा लागला. याच कालांत सुरस, सरस व भारतगौरव ग्रंथमाला निघाल्यानें मासिकांच्या प्रगतीवर त्यांचा बराच परिणाम झाला.

वरील अल्पायुषी मासिकांपैकीं मकरंद व कादंबरी-कल्पद्रुम मासिकांनीं अनेक हिंदी व बंगाली कादंबऱ्यांचीं मराठींत भाषांतरें प्रसिद्ध केलीं. उद्यान, मधुकर, उषा, विहार, ज्ञानमित्र वगैरे मासिकें बरींच वर्षे चाललीं, पण प्रकाशनांतील अनियमितपणा, चांगल्या लेखांचा अभाव वगैरे कारणांमुळें तीं बंद पडलीं. नवयुग व महाराष्ट्रसाहित्य काजव्याप्रमाणें चकाकलीं व अस्तंगत झालीं. नवयुगानें सुरुवातीस मनोरंजनाशीं चांगलीच स्पर्धा केली, पण त्याच्या चालकाच्या अकालीं निधनामुळें तें मासिक मागें पडलें. या मासिकानें, महाराष्ट्रास सौंदर्यदृष्टि आहे, याची लोकांना प्रचीति आणून दिली. मित्रांच्या ‘मनोरंजन’वर पण अनेक गंडांतरें या

काळीं व नंतर आलीं. पण त्यांतून आजवर तें सुरक्षित रीतीनें पार पडलें आहे. अलीकडे त्यास अनियमिततेचा असाध्य रोग जडला आहे, ही खेदाची गोष्ट होय. मनोरंजनाची जुनी वाङ्मयसेवा व ग्रंथप्रकाशन टिकाऊ स्वरूपाचें आहे, हें निःसंशय.

सध्यां चालू असलेलें 'चित्रमयजगत्' या काळांतच निघालें. या मासिकांत आजवर अनेक स्फुट गोष्टी, कविता, वाङ्मयपर व संशोधनपर निबंध, ऐतिहासिक चर्चा, प्रवासवर्णनें, शास्त्रीय वाङ्मय, राजकारणविषयक व इतर लेख प्रसिद्ध झाले आहेत. त्याला सधन मालकाची आणि विद्वान् संपादकांची जोड व प्रसिद्ध लेखकांचें साहाय्य असूनसुद्धां त्याची सध्यां प्रगति खुंटलेली दिसते. नाट्याचार्य खाडिलकर यांचे महायुद्धावरील लेख, श्री. दा. वि. गोखले यांची स्वराज्याच्या लढ्यावरील लेखमाला, श्री. शि. म. परांजपे यांच्या गोष्टी, कादंबऱ्या व ऐतिहासिक लेख यांमुळें मागें हें मासिक सर्वतोमुखीं झालें होतें.

वरील यादींत तत्त्वज्ञानपर व धार्मिक अशा चर्चेस वाहिलेलीं १६ मासिकें आहेत. परंतु धर्मग्रंथांचीं व आध्यात्मिक ग्रंथांचीं भाषांतरें करणारीं श्रुतिबोधासारखीं मासिकें वगळल्यास या कालांत 'आचार्य,' 'धर्मजागृति', 'विद्यार्थी,' 'धर्म', 'स्वाध्याय' व 'तत्त्वज्ञानमंदिर' यांनींच मराठींतून अध्यात्म, नीति-शास्त्र, व ब्रह्मविद्या यांची चर्चा केलेली आढळते. या मासिकांची आर्थिक स्थितीहि खालावलेली होती. तत्त्वज्ञानमंदिरासारख्या उच्च विचारप्रणालीच्या मासिकास पुरते अडीचशेंहि वर्गणीदार मिळत नाहींत. परंतु अमळनेरच्या तत्त्वज्ञानमंदिराचें मुखपत्र म्हणून हें त्रैमासिक आपलें मार्गक्रमण करण्यास समर्थ आहे. महाराष्ट्र शाखेच्या थिऑसॉफिकल सोसायटीचें 'धर्मजागृति' मासिकहि आपल्या नांवाप्रमाणें गेलीं २१ वर्षे विशिष्ट धर्मजागृतिकार्य करीत आहे.

स्त्रिया आणि बालवर्ग यांच्याकरितां निघालेल्या मासिकांपैकीं स्त्रीजीवनविषयक चर्चा करणारीं जीं पांच मासिकें तींहि फार दिवस टिकलीं नाहींत. बालवर्गाकरितां 'आनंद,' 'बालोद्यान,' 'खेळगडी,' 'बालबोध,' हीं प्रमुख होत. 'बालबोध' मध्यंतरीं बंद झाला होता पण कै. गजाननराव वैद्यांनीं त्यांत नवचैतन्य घालून त्यास प्राणदान दिलें; पण तो पुनः बंद झाल्यावर पुण्यांत श्री. ताम्हणकर यांनीं त्यास पुनर्जन्म दिला आहे.

बालबोधानंतर निघूनहि कै. वासुदेवराव आपटे यांच्या 'आनंदा'नें बालबाचकांनीं मनें आजपावेतों आकृष्ट करून ठेविलीं आहेत. श्री. आपटे यांनीं

आनंदाची योग्य ती काळजी घेऊन 'आनंद' बालवाचकांची सेवा अव्याहतपणें करूं शकेल, अशी नमुनेदार व्यवस्था केली आहे. आनंदाचें पूर्वीचें बालबोधात्मक स्वरूप कायम ठेवून प्रौढ वाचकांकरितां प्रौढबोध-पुरवणी काढण्याचा जो उपक्रम वासुदेवरावांनीं आपल्या हयातींतच सुरू केला तो चालू आहे.

'भिषग्विलास,' 'आयुर्वेद,' 'व्यायाम' या मासिकांनीं आपआपल्या क्षेत्रांत लौकिक प्राप्त करून घेतला आहे, हें त्या मासिकांच्या चालकांना भूषणावह आहे.

## सन १९२१ ते १९३५

सन १९२१ पासून आजपर्यंतच्या काळांत खालील नांव घेण्यासारखीं मासिकें जन्मास आलीं; त्यांपैकीं कांहीं मासिकें आज चालू आहेत.

अध्यापन ( पुणें, मुंबई ), आल्हाद ( बडोदें ), कला ( गोवें ), कलादर्श ( उमरावती ), किर्लोस्कर, खेळगडी ( मुंबई ), गृहलक्ष्मी ( मुंबई ), ग्रामणी ( नागपूर ), जननी ( पुणें ), जनसेवा ( मुंबई ), दिनकर ( सावंतवाडी ), ध्रुव ( पुणें ), नवजीवन ( मुंबई ), नाटक ( नासिक ), निर्झर, पारिजात ( मुंबई ), पुरुषार्थ ( औंध ), प्राविण्य ( मुंबई ), बृहन्महाराष्ट्र, भगवद्गीता, भद्रायु ( पुणें ), भगिनी, भारतसेवक, मतिविकास ( पुणें ), मनोरमा, मनोहर, महाराष्ट्र-शारदा (मुंबई), महिला, मन्वंतर, मालवसाहित्य ( इंदुर ), मुलांचें मासिक (नागपूर), यशवंत (पुणें), रत्नाकर ( पुणें ), रत्नदीप ( सातारा ), लोकशिक्षण ( पुणें ), वसंत ( मुंबई ), वाङ्मय ( नासिक ), विद्यासेवक ( पुणें ), वागीश्वरी ( नागपूर ), विणकरसेवक, विश्ववाणी ( नागपूर ); विहंगम ( नागपूर ), शिक्षक, समाजस्वास्थ ( मुंबई ), सहविचार (द्वि. मा. बडोदें), संशोधक ( धुळें ), सह्याद्रि ( पुणें ), सुवर्ण (मुंबई), सृष्टिज्ञान ( पुणें ), स्त्री, ज्ञानमंदिर ( मुंबई ), सूर्यकांत ( पुणें ), संजीवनी (मुंबई), स्त्रियांची मैत्रिण इत्यादि.

नियतकालिकांच्या प्रगतीच्या दृष्टीनें हा कालखंड अत्यंत महत्त्वाचा आहे. आज अखिल महाराष्ट्रांत चालू असलेलीं अशीं नियतकालिकें ८० वर आहेत. गेल्या कालखंडांत ज्ञातिविषयक मासिकांची संख्या १३ होती; पण त्यांपैकीं कांहीं मासिकें उत्तेजनाच्या अभावीं बंद पडलीं; तरी नामदेव २३ वर्षें व प्रभुप्रभात, स्वकुळसाळीविजय, महाराष्ट्रसारस्वत, हीं तीन मासिकें प्रत्येकीं १३ वर्षांवर ज्ञातिसेवा करीत आहेत. संतप्रभा, सैतवाल जैन, माळीसेवक, विणकर-सेवक वगैरे मासिकें गेल्या एकदोन वर्षांपासून प्रसिद्ध होऊं लागलीं आहेत.

गेल्या कालखंडांत, धर्म-तत्त्वज्ञान वगैरेसंबंधीं चर्चा करणारीं ७ मासिकें होतीं. मागील कालखंडांतील तत्त्वज्ञानमंदिर, पुरुषार्थ, रामकृष्णनिकेतन, धर्म-जागृति, दिनकर, विश्वप्रेम, सद्भक्तिप्रकाश हीं मासिकें आपलें कार्य अविरतपणें करीत आहेत. किर्लोस्करांतील नवमतवादी लेखकांच्या लिखाणाचा प्रतिकार करण्याच्या दृष्टीनें पं. सातवळेकर हे आपल्या पुरुषार्थांतून नवमतविचारावर शरसंधान करीत आहेत. नव्या जुन्या विचारांचा हा झगडा पाहण्यासारखा आहे. पं. सातवळेकरांनीं पुरुषार्थाच्या जोडीनें 'भगवद्गीता' मासिकाच्या द्वारेंहि गीतासंदेश प्रसृत करण्याचें स्तुत्य कार्य चालविलें आहे.

शिक्षणविषयक जागृति गेल्या १० वर्षांत बरीच झाली आहे. त्या मानानें शिक्षणशास्त्राची चर्चाहि पूर्वीपेक्षां सध्यां जास्त प्रमाणांत होत आहे. अशा परिस्थितीस अनुसरून 'प्राथमिक शिक्षक,' 'नागरशिक्षक,' 'शिक्षक' आणि 'शिक्षकाचा कैवारी' वगैरे नियतकालिकें शैक्षणिक जागृतीचें कार्य करीत आहेत. गो. गो. अधिकाऱ्यांचें 'अध्यापन' पुण्यास सुमारें दीड दोन वर्षें चालून अखेर बंद पडेल, पण पुढें प्र. के. अत्रे यांनीं मुंबईस 'नवें अध्यापन' सुरु करून अध्यापनास पुनरुज्जीवित केलें आहे. या नव्या अध्यापनास जगविण्याचा प्रयत्न महाराष्ट्रांतील अध्यापकवर्गानें कसोशीनें केला पाहिजे.

केवळ मुलांच्याकरितां उपयोगी पडतील अशीं पूर्वीचीं 'वऱ्हाड-शाळापत्रक', 'शालापत्रक,' 'बालबोध मेवा', 'आनंद,' हीं चार प्रसिद्ध मासिकें तीस वर्षांहून अधिक काल बालमनोरंजन करीत आहेत. मुलांच्या मासिकांसंबंधीं बाल-वाङ्मयावरील लेखांत विवेचन येणार असल्यानें त्याची येथें पुनरुक्ति करीत नाहीं.

महिलावर्गाकरितांहि आज कांहीं मासिकें निघालीं आहेत. 'स्त्रियांची मैत्रीण' (पुणें), 'स्त्री' (किर्लोस्करवाडी) हीं दोनच मासिकें स्त्रियांच्या प्रश्नांचा विचार करणारीं होतीं. परंतु आतां मुंबईतील 'गृहलक्ष्मी' नव्या स्वरूपांत स्त्रियांच्या भेटीस जात असते. तसेंच माई वरेरकरांची 'महिला'हि आपल्या चित्तवेधक व सडेतोड लेखांनीं महाराष्ट्रीय महिलांमध्यें नवविचार प्रसृत करीत आहे. अधिकारी यांनीं पुणें येथें चालविलेलें 'मनोरमा' मासिक कांहीं दिवस उत्तम कार्य करीत होतें. त्याचप्रमाणें बेळगांवांत एका बाजूला राहून कु. गंगुबाई पाटील यांनीं ५-६ वर्षें-पर्यंत 'सरस्वती' ह्या स्त्रियांसाठीं व मुलींसाठीं चालविलेल्या मासिकाचा उल्लेख करावयास पाहिजे. 'संजीवनी' हें पाक्षिकहि केवळ स्त्रियांच्या प्रश्नांचा विचार करण्या-

करितां कोल्हटकर यांनीं मुंबईस काढलें आहे. मुंबईत 'भगिनी' व 'वाग्विलास' नांवांचीं मासिकेंहि नुकतींच सुरू झालीं आहेत.

औद्योगिक क्षेत्रांत पूर्वीप्रमाणें 'उद्यम' व 'धंदेशिक्षण' हीं नियतकालिकें प्रसिद्ध होत आहेत. मुंबईच्या महाराष्ट्र चेम्बर ऑफ कॉमर्स ह्या संस्थेचेंहि एक त्रैमासिक चालू सालीं प्रसिद्ध होऊं लागलें आहे. या मासिकांचा औद्योगिक माहिती महाराष्ट्रीय वाचकांत पसरविण्याचा उपक्रम स्तुत्य आहे; उद्योगधंद्यांत महाराष्ट्रीय जनता आतां जास्त जास्त लक्ष घालूं लागली आहे तेव्हां त्या प्रमाणांत औद्योगिक माहिती शक्य तितक्या जास्त प्रमाणांत पुरविली जाणें जरूर आहे.

शेतीच्या क्षेत्रांत 'शेतकी शेतकरी' हें मासिक पूर्वीप्रमाणें महाराष्ट्रांतील शेतकीसंबंधीं इतर उपयुक्त माहितीबरोबर सरकारी शेतकी खात्यातर्फे होणाऱ्या शेतकी संशोधनाची माहितीहि देत असतें. उमरावती येथें 'भोळा शेतकरी' नांवाचें मासिक निघूं लागलें आहे. शेतकीच्याइतकाच महत्त्वाचा प्रश्न आजकाल ग्रामोद्धारकार्याचा झाला आहे. या क्षेत्रांत ग्रामपंचायतींची प्रगति आणि स्थानिक स्वराज्यसंघाच्या कारभाराची सुधारणा हेहि महत्त्वाचे विषय जनतेपुढें आहेत. ग्रामपंचायतींच्या संबंधींची चर्चा 'ग्रामसेवक' व 'ग्रामणी' हीं दोन्हीं मासिकें गेलीं दोनतीन वर्षें करीत आहेत. स्थानिक-स्वराज्य-संस्था-त्रैमासिक हेंहि गेलीं कांहीं वर्षें स्थानिक स्वराज्याची साधकबाधक चर्चा करीत असतें.

आयुर्वेदीय संशोधन, आर्यवैद्यक ग्रंथांचीं मराठी भाषांतरें आणि जुन्या आयुर्वेदीय औषधांचा प्रचार करण्याच्या कामीं 'आयुर्वेद' व 'भिषग्विलास' हीं दोन मासिकें गेलीं दीड दोन वर्षें नमुनेदार कार्य करीत आहेत. हीं मासिकें प्रसिद्ध करण्याच्या कामीं अप्पाशास्त्री साठे ( मुंबई ) व वैद्यपंचानन गुणेशास्त्री ( अहमदगर ) यांचे परिश्रम आणि उत्साह वाखाणण्यासारखा आहे. मध्यंतरीं 'संजीव-प्रकाश' ( कोचरा, रत्नागिरी ) हें आयुर्वेदविषयक मासिक पांच सात वर्षें निघत होतें.

विशिष्ट उद्योगधंद्यांत पडलेल्या कार्यकर्त्यांनीं संघटन करून आपल्या धंद्याची माहिती प्रसृत करण्याच्या दृष्टीनें कांहीं धंद्यासंबंधींचीं मासिकें आतां निघूं लागलीं आहेत. ह्याचें स्पष्ट निदर्शन म्हणजे 'भद्रायु' ( पुणें ) व 'धनार्जन'. हीं मासिकें केवळ विमाव्यवसायांत पडलेल्या कार्यकर्त्यांच्या संघटनेकरितांच निघालीं आहेत. पण दुर्दैवानें भद्रायु अल्पायु ठरलेलें दिसतें.

संशोधनक्षेत्रांत पूर्वीच्या 'रामदास-रामदासी' व 'भा. इ. संशोधक मंडळ-त्रैमासिक' यांच्याबरोबर धुळ्याच्या राजवाडे मंडळानें 'संशोधक' त्रैमासिक सुरू केलें आहे.

सध्यांच्या सार्वत्रिक लोकशिक्षणाच्या प्रसाराबरोबर, आर्थिक सुस्थिति समाधानकारक न राहिल्यामुळें समाजांत ज्योतिषावर विश्वास ठेविण्याची वृत्ति बेसुमार वाढली आहे. अनेक ज्योतिर्विदांनीं जनतेच्या प्रस्तुत कमकुवत मानसिक परिस्थितीचा फायदा घेऊन 'ज्योतिर्विजय', 'भाग्यरमल', 'भविष्यचिंतामणी' हीं मासिकें सुरू केलीं आहेत. याशिवाय 'कुंडलीवर्णन', 'भविष्यदीप', 'भविष्य-भास्कर' हीं साप्ताहिकें निघत असतात तीं वेगळींच. पुष्कळ नियतकालिकां-तूनहि नियतकालिक भविष्यें येत असतात.

जनतेंतील सिनेमाविषयक जिज्ञासा वाढविण्याकरितां 'प्रेक्षक' (मुंबई), 'सिनेमा' (मुंबई), 'किरण' (पुणें), सिनेमा-सृष्टी' (कोल्हापूर) हीं चित्रपट-मासिकें आज महाराष्ट्रांत निघत आहेत.

ललितकला आणि वाङ्मय यांचा परामर्ष घेऊन विविध साहित्यसेवा करण्याच्या उद्देशानें पूर्वीं निघालेल्या मासिकांपैकीं 'रत्नाकर' या सर्वांगसुंदर मासिकाचा अस्त झाला, ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे. तसेंच 'यशवंत' या ललितकलाप्रधान मासिकाला लागलेलें ग्रहणहि अद्यापि सुटल्यासारखें दिसत नाहीं. आकर्षक चित्रें, चित्तवेधक कथा आणि वाङ्मयांतील श्रेष्ठ दर्जाचे असे लेख यांमुळें वरील दोन्ही मासिकांचा चांगलाच बोलवाला झाला होता. उणेंपुरें जेमतेम एक वर्ष आयुष्य लाभलेल्या सुंदर 'सूर्यकांत' मासिकाचा अपमृत्युहि अपेक्षितच होता. या मासिकांची जागा 'किर्लोस्कर', 'मनोहर' आणि नव्यानें उदयास आलेल्या 'सह्याद्रि', 'लोकशिक्षण', 'महाराष्ट्रशारदा' या मासिकांनीं भरून काढण्याचा इष्ट उपक्रम केला आहे, असेंच म्हणणें भाग पडतें.

गेल्या सालीं स्मृतिशेष झालेल्या मासिकांत ग्वाल्हेरचे र. वि. शिरढोणकर यांचें 'हितचिंतक' व हैद्राबाद (द.) येथें प्रसिद्ध होणारें जोशी-कोरटकर यांचें 'राजहंस' या मासिकांचा उल्लेख करावयास पाहिजे. या दोन्ही मासिकांनीं अनुक्रमें ३ व ४ वर्षें आपला संसार थाटला होता. ३७ लाखांवर मराठी भाषा बोलणाऱ्यांच्या निजामशाहींत एकाहि मासिकास आर्थिक स्वास्थ्य लाभत नाहीं ही गोष्ट आश्चर्य-कारक तशीच उद्वेगजनकहि आहे! त्याचप्रमाणें वर्ष दीड वर्ष कसेंबसें चालून तूर्त

विश्रांति घेत असलेल्या 'सत्यकथा' (मुंबई) व 'रम्यकथा' (पुणें) या मासिकांनीं सत्य व रम्य कथा सांगण्याचा चांगला क्रम सुरू केला होता. सत्यकथेच्या लेखकीं श्री. द. शं. कुलकर्णी यांनीं आतां आपल्या 'कथामंदिरा'ची उभारणी केली आहे.

बडोदें संस्थानानें मराठी साहित्यनिर्मितीच्या कार्यांत असामान्य यश संपादन केलें आहे. त्याचप्रमाणें नियतकालिकांच्या प्रसिद्धीच्या कामींहि बडोद्यानें महाराष्ट्रांत आपला लौकिक कायम राखला आहे. अखिल महाराष्ट्रांत आज एकमेव असें व्यायामविषयक मासिक 'व्यायाम' हें बडोद्याला गेलीं २० वर्षे अव्याहत प्रसिद्ध होत आहे. त्याचप्रमाणें सहविचारिणी सभेचें 'सहविचार' हें छोटें पण उच्च दर्जाचें वाङ्मयविषयक द्वैमासिकहि गेलीं १३ वर्षे साहित्यसेवा करीत आहे. यापूर्वी बडोद्यांत 'धनुष्य' ( १८८७ ), 'बालांकुर' ( १८९३ ), 'विद्याकल्पतरु' ( १८६८ ) व 'विविधकलाविस्तार' ( १८८५ ) हीं मासिकें कांहीं वर्षे प्रसिद्ध होत असत. 'धंदेशिक्षण', 'कलाशिक्षण' आणि 'रसिकविहार' हीं मासिकेंहि मध्यंतरीं बडोद्यांत निघत होतीं. 'अभिप्राय संग्राहक' या नांवाचें एक त्रैमासिक श्री. दंडवते यांनीं चालू सालांत सुरू केलें असून त्यांत मराठी ग्रंथांवरील नियतकालिकांतील अभिप्राय देण्यांत येतात.

प्रस्तुत लेखांत पांच लाख लोकवस्तीच्या गोवें प्रांतांतील नियतकालिकांच्या प्रगतीचें समालोचन करावयास पाहिजे. या पांच लाख लोकसंख्येपैकीं सुमारें निम्मी लोकसंख्या खिस्ती असल्यामुळें मराठीचें क्षेत्र निम्यानें आकुंचित झालें आहे. अशा विषम परिस्थितींतहि गोवें प्रांतांतील मराठी साहित्यिकांनीं मराठी नियतकालिकांच्या द्वारें मराठी भाषेची जपणूक केली आहे. 'देशसुधारणेच्छु' ( रायबंदर ), 'गोवामित्र' ( ओडली, १८८२ ), 'आर्यबंधु' ( म्हापसें, १८८५ ), 'गोमांतक' ( पणजी, १८९० ), 'न्यायचक्षु' ( पणजी, १८९० ), 'कालिकादर्शन' ( पणजी, १८९८ ), 'सुदर्शन' ( १९०० ), 'सत्संग' ( कुंभारजुवें, १८२४ शके ), 'पथ्यबोध' ( केरी-फोंडें, १९०४–८ ), 'चित्ताकर्षक' ( पणजी, १९०६ ), 'प्राचीप्रभा' ( फोंडें, १९०९–१४ ), 'हळदीकुंकू' ( फोंडें, १९१० ), 'गायकमित्र' ( १९१८ ), 'भारतोदय' ( १९२१ ) हीं मासिकें गोमांतकांतील आहेत. यांपैकीं श्री. दादासाहेब वैद्य यांच्या प्राचीप्रभेनें चांगला नांवलौकिक संपादन केला होता. आज गोमांतकांत चालू असलेल्या मासिकांत 'भारतमित्र' ( रिवण, गोवा ) हें ना. भा. नाईक यांच्या संपादकत्वाखालीं

गेलीं ८ वर्षें अनिष्ट परिस्थितींतहि नियमितपणें प्रसिद्ध होत आहे. तसेंच कटक यांचें ' सुबोध ' हि वाचनीय आहे. चालू वर्षापासून ' युगांतर ' नांवाचें द्वैमासिक वि. का. शिखरे हे नवीन गोंवें येथें काढीत असतात. त्याचप्रमाणें ' कला ' नांवाचें आकर्षक मासिकहि प्रसिद्ध होऊं लागलें आहे.

याच वेळीं व स्थळीं वऱ्हाड-मध्यप्रांत यामधील नियतकालिकांची थोडी माहिती देतां येण्याजोगी आहे. १८७४ सालीं वऱ्हाडांत नागपूर येथें 'ज्ञानसंग्रह' नांवाचें मासिक सुमारें २ वर्षें निघत होतें. त्यानंतर वऱ्हाडांत निघत असलेलीं मासिकें म्हणजे 'कारागीर' ( १८८० नागपूर ), 'काव्यकुसुमांजली' ( १८८९ नागपूर ), ' नीरजोल्हास ' ( १८९२ ). ' महाराष्ट्र—वाग्विलास ' ( १९०६—०८ उमरावती ), 'वऱ्हाड शालापत्रक'(उमरावती), 'शाळावृत्त' (१९०७ नागपूर), 'शेतकरी' (१८८३ उमरावती ), 'सरस्वतीप्रकाश' ( १९०२ उमरावती ), 'सुबोधमाला' ( १९१६ उमरावती ) हीं होत. अशीं मासिकें निघालीं असल्याची नोंद फक्त महाराष्ट्रवाङ्मय-सूचीवरून मिळते, कारण वरील मासिकांपैकीं वऱ्हाड—शालापत्रक मासिक मात्र चालू आहे. वऱ्हाडांतील दुसरें महत्त्वाचें मासिक नागपूरचें ' उद्यम ' हें होय. सध्यां चालू असलेल्या मासिकांत ' मुलांचें मासिक ', ' वागीश्वरी ', 'ग्रामणी', ' विश्ववाणी ', आणि ' विहंगम ' हीं मासिकें एकट्या वऱ्हाडालाच नव्हे तर सर्व महाराष्ट्रालाहि भूषणभूत होण्यासारखीं आहेत.

महाराष्ट्रांतील मासिकांनीं आतां नमुनेदार छपाई, लेखांची आकर्षक सजावट आणि दोन अगर तीन रंगी चित्तवेधक मुखपृष्ट देण्याकडे आपलें लक्ष वळविलें आहे. वाचकवर्ग जसा वाढत आहे तसें वाचतां येणाऱ्यांचें मन आकृष्ट करून त्यांना आपलें मासिक व्यावयास लावणें, या एका गोष्टीकडेच सध्यांचे मासिकांचे चालक लक्ष देत असतात. त्याचप्रमाणें लेखनप्रकारांतहि बराच फरक पडत चालला आहे. उत्तान, अनिर्बंध, आणि स्वेच्छाचारप्रधान प्रेमकथांच्या वातावरणांत आज अनेक लेखक स्वैर वावरत असल्यामुळें त्यांतील विषयांवरच लघुकथा आणि कादंबऱ्या यांचा संसार सुरू आहे. समाजांत ज्ञानाचा विस्तार करणें, समाजघटकांचीं शब्द-चित्रें लघुकथांतून रेखाटून त्यांच्याबद्दल जास्त जास्त माहिती करून देणें आणि आपल्या लेखनकलेच्या जोरावर समाजांत विचारक्रांति घडवून आणणें हें ध्येय लेखकांच्या व्यवहारसृष्टींत अद्यापि अवतरलेलें दिसत नाहीं. लेखकांना आपल्या असामान्य गुप्त लेखनशक्तीची योग्य ती जाणीव न झाल्यामुळें आजचें नियतकालिक-

वाङ्मय, म्हणजे इतरांच्या बऱ्यावाईट वाङ्मयाचें अंधानुकरण, कधीं रूपांतर तर कधीं त्याचेंच विडंबन अशा स्वरूपाचें भासत आहे. वाङ्मयसेवेला परिश्रम, विविध-साहित्य-समालोचन आणि उच्च ध्येयवाद अशा गुणांची जोड नसेल तर वाङ्मयाचा दर्जा वर लागणें कधींहि शक्य नाहीं. नियतकालिकांच्या मदतीनें वाङ्मयसृष्टींत पदार्पण करणाऱ्यांनीं नियतकालिकांतील वाङ्मय उत्कृष्ट प्रकारचें तयार करण्यासाठीं अहोरात्र प्रयत्न करावयास पाहिजेत. तसें झाल्यास आपल्या नियतकालिकांच्या चालकांच्या श्रमाचें आणि पैशाचें कांहीं सार्थक झालें असें म्हणतां येईल.

## ( २ ) वर्तमानपत्रें

आतां वर्तमानपत्रांच्या इतिहासाकडे वळूं. मराठींतील पहिलें वर्तमानपत्र म्हणजे 'दर्पण.' त्याचा पहिला अंक ता. ६-१-१८३२ रोजीं निघाला. त्याचा आकार डेमी आठपेजी असून त्यांत इंग्रजी व मराठी मजकूर येत असे. बाळशास्त्री जांभेकर हे त्याचे संपादक होते, असें व्याकरणकार दादोबा आपल्या आत्मचरित्रांत म्हणतात. दर्पणाच्या दुसऱ्या अंकापासून त्यांत वाचकांच्या शंका व त्यांचें निरसन प्रसिद्ध होऊं लागलें. त्याच्यावरून तत्कालीन परिस्थितीचा आपणांस बोध होतो. गोविंद विठ्ठल कुंटे ऊर्फ भाऊ महाजन हे या पत्राचे व्यवस्थापक होते. जांभेकर-शास्त्र्यांच्या मदतीनें त्यांनीं 'प्रभाकर' नांवाचें साप्ताहिक व 'त्रैमासिक ज्ञान-दर्शन' व 'उपदेशचंद्रिका' हीं मासिकें पुढें काढलीं. तत्कालीन व्यक्तींवर प्रभाकरांत निर्भीड टीका येई, तिला उत्तरें देण्याकरितां 'वर्तमानदीपिका' निघाली. तिच्याशीं टक्कर देण्यासाठीं 'धूमकेतु' उगवला. या शेवटच्या दोन पत्रांत कडाक्याचा वाद होऊन त्यांनीं लोकसमाजांत वर्तमानपत्रांची आवड निर्माण केली. दर्पणाबरोबर मुंबईत 'अखबार' नांवाचें पत्र निघत असे. पण त्याची माहिती आज अनुपलब्ध आहे.

'ज्ञानसिंधु' व 'चंद्रोदय' नांवाचीं दोन पत्रें याच सुमारास मुंबईस जन्मास आलीं. या सर्व पत्रांत देशी बातम्या, वाचकांचा पत्रव्यवहार, स्फुट लेख, सामाजिक व धार्मिक प्रश्नांची सुबोध चर्चा येत असे. त्या वेळची भाषा पाहून आज आपणांस हसूं येईल. कारण हल्लीं आपल्या भाषेस बरेंच प्रगल्भ स्वरूप प्राप्त झालें आहे. या सर्व पत्रांत प्रभाकर पत्र गाजलेलें दिसतें. त्यांतच लोकहितवादींचीं बहुतेक शतपत्रें प्रसिद्ध झालीं होतीं. या शतपत्रांचें पुस्तक आज फार दुर्मिळ झालें असून त्याचें पुनर्मुद्रण करण्याचे क्वचित् प्रयत्न चाललेले दिसतात.

## ज्ञानोदय व ज्ञानप्रकाश

गेल्या ९४ वर्षांपासून सतत चालू असलेलें 'ज्ञानोदय' पत्र सन १८४१ मध्यें निघालें. प्रथम तें दर पंधरवड्यास प्रसिद्ध होई. त्याची वर्गणी फारच अल्प म्हणजे दीड रुपया होती. हल्लींप्रमाणेंच इंग्रजी व मराठी भाषांतील मजकूर त्यांत येत असे व तत्कालीन पत्रांतील उतारे पण त्यांत प्रसिद्ध होत असत. यांपैकीं कांहीं उतारे 'रद्दींतील रत्नें' या सदराखालीं महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या कांहीं अंकांतून प्रसिद्ध झाले आहेत. ख्रिस्ती मिशनऱ्यांची माहिती, त्यांच्या हालचाली, प्रभु येशूचें गुणवर्णन, त्याप्रमाणेंच हिंदु समाजांतील चालीरीतींवरील निंदाप्रचुर लेख त्यांत प्रसिद्ध होत असत. १८७३ सालापासून तें साप्ताहिक झालें. शाहुराव कुकडे हे त्याच्या मराठी भागाचे आद्य संपादक होत. त्यांच्या मागून तुकारामजी नाथोजी, आनंदराव सांगळे, नारायण वामन टिळक, दि. शं. सावरकर वगैरे संपादक झाले. हल्लीं देवदत्त नारायण टिळक हे संपादक आहेत. ज्ञानोदयाच्या पूर्वींच्या व सध्यांच्या धोरणांत बराच फरक झालेला दिसतो.

ज्ञानप्रकाश हें मराठींतील आद्य दैनिक होय. तें प्रथम साप्ताहिक होतें, हें आज कोणास खरें वाटावयाचें नाहीं. त्याचा पहिला अंक १२-२-१८४९ रोजीं निघाला. "येकोपा होण्याचें, व परस्परांचे अभिप्राय कळविण्याचें, व कांहीं मजकूर सरकारास समजाविण्याचें, व कोणतेहि उद्योगास लोकांनीं एकत्र होण्याचें, व छापण्याचे अपकीर्तीचे भयानें लोकांनीं दुर्गुण टाकावयाचें कारण वर्तमानपत्र आहे... इत्यादि लाभ विचारपूर्वक लक्षांत आणून सर्व लोक, सावकार, सरदार, साहेब लोक व गृहस्थ लोक यांनीं हें खरेदी करून या कामास मदत दिली पाहिजे" अशी संपादकांची विनंति या अंकांत आली होती. पहिल्या पुस्तकाच्या दुसऱ्याच कागदांत (अंकांत) 'वर्तमानपत्रांचा उपयोग' या शीर्षकाखालीं एका विद्या-वृद्धेच्छूचें पत्र प्रसिद्ध झालें होतें. ता. १९ च्या कागदांत वर्तमानपत्रांना सरकारवर टीका करण्याचा अधिकार आहे, त्यांचे वर्तणुकीविषयीं जें संभवेल तें लिहिण्याचा वर्तमानपत्रकर्त्यांना अधिकार आहे, सरकारी नोकर हा लोकांचा चाकर आणि छापणार हा लोकांचे डोळे, असें मत प्रतिपादिलें आहे. ता. १६ एप्रिलच्या अंकांत संस्थानिकांवर टीका आली आहे. या वेळीं ज्ञानप्रकाशाचा आकार फुलस्केप चार पानें असून तो शिळा प्रेसवर छापला जाई. बाबा गोखले, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णु परशुराम रानडे, विष्णु मोरेश्वर भिडे, लोकहितवादी वगैरे मंडळी त्यांत प्रारंभीं

लिहीत असत. ता. १५।८।१९०४ रोजीं ज्ञानप्रकाशाचें रूपांतर दैनिकांत झालें. त्या वेळीं त्याची मालकी हरि नारायण गोखल्यांकडे होती. याच्यापूर्वी कांहीं दिवस ज्ञानप्रकाश आठवड्यांतून दोनदां निघूं लागला होता. दैनिक झाल्यावर हरि नारायण आपटे यांनीं त्याचीं संपादकीय सूत्रें आपल्या हातीं घेतलीं. वासुदेव गोविंद आपटे व सी. के. दामले हे त्यांचे या कामीं सहकारी होते. हरिभाऊ लिमये, शा. गो. काळे, भानु इत्यादि फर्ग्युसन कॉलेजांतील ना. गोखल्यांची सहकारी प्रोफेसर मंडळी पण ज्ञानप्रकाशांत मधून मधून लिहीत. या वर्तमानपत्राची सांपत्तिक स्थिति त्या वेळीं समाधानकारक नव्हती. त्यास येणारा तोटा भरून काढण्यासाठीं ना. गोखले चालकांस द्रव्यसाहाय्य करीत असत. पुढें भारतसेवक समाजाची स्थापना झाल्यानंतर श्री. न. आ. द्रवीड यांनीं समाजाचें मुखपत्र म्हणून ज्ञानप्रकाश चालविण्यास घेतला; तेव्हांपासून ज्ञानप्रकाशची व आर्यभूषणप्रेसची मालकी भारतसेवक समाजाकडे आहे. समाजाच्या हातीं पत्र आल्यानंतर गो. कृ. देवधर, अ. वि. पटवर्धन व कृ. ग. लिमये हे आजवर त्याचे संपादक झाले. रा. लिमये यांनीं इंग्रजी पत्रांच्या धर्तीवर ज्ञानप्रकाशांत अनेक नव्या पद्धतीचा मजकूर प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली असून त्यापैकीं काव्यशास्त्रविनोदाची पुरवणी फार लोकप्रिय झाली आहे. रा. लिमये यांच्या कारकीर्दींत ज्ञानप्रकाशचा खपहि पुष्कळ वाढला असून अखिलमहाराष्ट्रांतील ताज्या व विश्वसनीय बातम्या ज्ञानप्रकाशांतच प्रथम वाचावयास मिळतात. ज्ञानप्रकाशच्या वर उल्लेखिलेल्या उपक्रमांचें इतर मराठी दैनिकांनीं हळूहळू अनुकरण केलें आहे.

## इतर वृत्तपत्रें

ज्ञानप्रकाशानंतर महाराष्ट्रांत प्रसिद्ध झालेलें महत्त्वाचें वर्तमानपत्र म्हणजे मुंबईचा 'इंदुप्रकाश' ( १८६२ ) होय. तत्कालीन प्रसिद्ध सुधारक विष्णु परशुराम पंडित यांच्याच प्रयत्नानें 'इंदुप्रकाश' निघाला. या वृत्तपत्राच्या इंग्रजी स्तंभांत न्या. रानडेहि लिहीत. या वेळीं महाराष्ट्रांत सामाजिक नवमतांच्या व नवविचारांच्या प्रसिद्धीनें खळबळ उडवून देणारें पत्र म्हणून इंदुप्रकाश सर्वतोमुखीं झाला होता. पुढें योग्य चालकाच्या अभावीं पत्र व छापखाना बंद होण्याची वेळ आली तेव्हां न्या. रानड्यांच्या विचारानें बडोद्याच्या दा. सा. यंदे शेटजींनीं 'इंदुविजय' लिमिटेड कंपनी स्थापन करून, पाध्ये-यंदे-मणेरीकर या चिटाणिसांच्या साहाय्यानें 'इंदुप्रकाश' हें मराठी दैनिक व 'इंदु ऑफ बॉम्बे' हें इंग्रजी दैनिक अशीं दोन दैनिकें

सुरू केलीं. इंग्रजी दैनिक लवकरच बंद पडलें; पण 'इंदुप्रकाश' दैनिक मात्र बरेच दिवस यंदे शेटजींनीं चालू ठेविलें होतें. पुढें त्याची मालकी लो. टिळक यांनीं स्थापिलेल्या नॅशनल डेमोक्रॅट पब्लिशिंग कंपनीकडे व नंतर लोटवालाशेट यांच्याकडे गेली आणि कालांतरानें तें 'लोकमान्य' दैनिकांत सामील होऊन त्याच्याबरोबरच विराम पावलें.

इंदुप्रकाशानंतर एका वर्षानेंच विश्वनाथ नारायण मंडलिक यांनीं 'नेटिव्ह ओपीनियन' हें इंग्रजी-मराठी साप्ताहिक सुरू केलें. या पत्रांत इंग्रजीप्रमाणें मराठी लेखांचाहि समावेश होत असे. रा. सा. मंडलिक हे चतुरस्र लेखक होते. त्यांनीं इंग्रजी, मराठी व गुजराथी भाषेंत अनेक लेख लिहिले आहेत. १८६३ पासून १८७१ पर्यंतची नेटिव्ह ओपीनियनची जबाबदारी रा. स मंडलीक यांनीं आपल्यावर घेतली होती. 'भारदस्तपणा, संभावितपणा व पोक्तपणा' या तीन गुणांना साजेसा असा मजकूर 'नेटिव्ह ओपीनियन' मध्यें येत असे. 'गुजराथ मित्र' या दैनिक पत्रानें रावसाहेबांचा एक इंग्रजी लेख छापण्याचें नाकारल्यामुळें हें पत्र काढण्याची राव-साहेबांस इच्छा झाली, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

प्रार्थना-समाजाची 'सुबोधपत्रिका' यानंतर मुंबईस अवतीर्ण झाली व ती अद्याप चालू आहे. पत्रिकेचा पहिला अंक १८७४ च्या ४ मे ला बाहेर पडला. मराठीबरोबर पत्रिकेची गुजराथी आवृत्तीहि प्रथम कांहीं दिवस निघत होती, परंतु ती पुढें बंद झाली. १८८९ सालीं थीइस्टिक असोसिएशनकडे पत्रिकेची मालकी जाऊन, पालेकर हे तिची व्यवस्था पाहूं लागले. या वेळीं पत्रिका इंग्रजी व मराठी भाषेंत निघत असे. पुढें मोरोपंत बाळवेकर यांचा 'सुबोधप्रकाश' व सदाशिव पांडुरंग केळकर यांचें 'कामगार' हीं दोन पत्रें सुबोधपत्रिकेंत सामील करण्यांत आलीं. १८९७ मध्यें द्वा. गो. वैद्य यांनीं पत्रिकेचें संपादकत्व स्वीकारलें व गेल्या ३८ वर्षांपासून त्यांनीं तें कार्य व्यवस्थित व निरलसपणें चालविलें आहे.

सुबोधपत्रिकेच्या पूर्वी आणि नंतर पुण्या-मुंबईत अनेक वृत्तपत्रें उदयास आलीं व कांहीं दिवस चालून पुढें तीं बंद पडलीं. सन १८५२ मध्यें मुंबईस 'शुक्रोदय' साप्ताहिक निघालें, पण त्याचे अवघे तीन अंकच प्रसिद्ध झाले. यानंतर वर उल्ले-खिलेली वर्तमानदीपिका, विचारलहरी, नेटिव्ह ओपीनियन, वृत्तवैभव, मित्रोदय, लोककल्याणेच्छु, शुभसूचक, दीनबंधु, कल्पतरु, आनंदवृत्त, खानदेशवैभव, बेळगांव-समाचार, ज्ञानसागर, सत्यशोधक, ज्ञानचक्षु, शिवाजी, पुणें वैभव, किरण वगैरे पत्रें

निघालीं. या पत्रांपैकीं ज्ञानचक्षूंत तत्कालीन थोर व्यक्तींचीं विश्वसनीय चरित्रें प्रसिद्ध होत असत.

केसरी व सुधारक

यानंतर केसरीचा जन्म झाला. या पत्रानें महाराष्ट्रांतील वृत्तपत्रव्यवसायांत इष्ट क्रांति घडवून आणली. केसरीची जाहिरात प्रथम मुंबईच्या नेटिव्ह ओपीनियन पत्रांत प्रसिद्ध होऊन निबंधमालेच्या जून १८९० च्या अंकांत ती रंगीत कव्हरवर पुनः छापण्यांत आली. या जाहिरातीवर विष्णुशास्त्री चिपळूणकर, बा. गं. टिळक, वा. शि. आपटे, ग. कृ. गर्दे, आगरकर व नामजोशी यांच्या सह्या होत्या. "या पत्रांत एरवींच्या वर्तमानपत्रांप्रमाणें बातम्या, राजकीय प्रकरणें, व्यापारसंबंधीं माहिती वगैरे नेहमींचे विषय तर येतीलच, पण यांखेरीज लोकस्थितीवर निबंध, नवीन ग्रंथांवर टीका वगैरे विषयांचाहि यांत समावेश केला जाईल. तसेंच विलायतेंत ज्या राज्यप्रकरणांची वाटाघाट होते ती इकडील लोकांस समजणें अवश्य असल्यामुळें त्यांचाहि सारांशरूपानें यांत संग्रह करण्याचा बेत केला आहे. आजपर्यंत वरील तीन विषयांवर म्हणजे देशस्थिति, देशभाषेंतील ग्रंथ व विलायतेंतील राजकारण या विषयांच्या संबंधानें जसें यथास्थित उद्घाटन व्हावयास पाहिजे होतें तसें कोणत्याहि वर्तमानपत्रांतून झालें नाहीं, असें म्हणावयास हरकत नाहीं. तर ही मोठी उणीव नाहींशी करून टाकण्याचें आम्हीं मनांत आणलें आहे." पत्र काढण्याचा हेतु व त्यांत येणाऱ्या विषयांसंबंधीं असा खुलासा करून बादशाही अमलाच्या सुरुवातीपासून वाढलेल्या तोंडपुजेपणाबद्दल या जाहिरातींत तीव्र शब्दांत नापसंती व्यक्त करण्यांत आली होती व 'पत्रांतील लेख त्यास ठेविलेल्या नांवाप्रमाणेंच येतील' असें वाचकांस आश्वासन दिलें होतें. गेल्या चोपन्न वर्षांत सदर पत्राच्या चालकांनीं वरील धोरण व वचन कसें पाळलें आहे हें सुप्रसिद्धच आहे.

१९३१ सालीं केसरीनें आपला एकावन्नावा वाढदिवस मोठ्या थाटानें साजरा केला. त्या प्रसंगीं काढलेल्या खास अंकांत व 'केसरी–प्रबोध' या ग्रंथांत केसरीचा सविस्तर इतिहास प्रसिद्ध झाला असून आजवर प्रसिद्ध झालेल्या बहुतेक विषयांची उजळणीहि केली आहे. त्यामुळें या माहितीचा येथें विस्तार करीत नाहीं. केसरींत प्रसिद्ध झालेले लो. टिळकांचे राजकीय, सामाजिक व इतर लेख केसरीसंस्थेनें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केले आहेत. त्यापूर्वींचे लेख 'केसरींतील निवडक निबंध' या पुस्तकांत ग्रथित करण्यांत आले आहेत. शिवाय केळकर लेखसंग्रह, गद्यगुच्छ,

इतिहासविहार, गेलीं पांच वर्षे, केळकर वगैरे पुस्तकांत श्री. न. चिं. केळकर यांचे केसरींतील महत्त्वाचे सर्व लेख पुनर्मुद्रित झाले असून, ते बरेच लोकप्रिय झाले आहेत. या लेखांनीं मराठी वाङ्मयांत उत्तम भर घातली आहे, ही गोष्ट कोणासहि नाकबूल करतां यावयाची नाहीं. केसरीच्या संपादकांशिवाय इतर मंडळींनीं लिहिलेले लेख केसरीच्या फायलीवांचून इतरत्र पहावयास मिळत नसत. पण अलीकडे केसरीचे 'सारसंग्रह' (छोटें फाइल) प्रसिद्ध होऊं लागल्यामुळें मराठी भाषेच्या अभ्यासकांची मोठी सोय झाली आहे. केसरीचें हें उदाहरण अनुकरणीय नाहीं असें कोण म्हणेल?

सारसंग्रह निघण्यापूर्वी केसरींस प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयीन लेखांत वि. का. राजवाडे, चांदोरकर, आजगांवकर, भिंगारकर, दामले, निफाडकर वगैरे मंडळींचे ज्ञानेश्वर व ज्ञानदेवीसंबंधींचे निरनिराळे लेख, मराठी शुद्धलेखन, जुने व नवे कवि यांच्याविषयींचा वाद, नवनीताचें परीक्षण, पावगी व सावरकर यांचे मराठी भाषेच्या शुद्धीकरणासंबंधींचे लेख, शि. म. परांजपे यांचे मोरोपंती भगवद्गीता व भागवतावरील लेख, ना. ह. आपटे यांचा अर्वाचीन मराठी कादंबऱ्यावरील लेख, विशेष उल्लेखनीय आहेत.

'केसरी' अवतीर्ण झाला त्या सालीं (१८८१) 'अरण्यपंडीत' (पाक्षिक), 'बकुल,' 'जगदादर्श,' 'छावा,' 'दैवज्ञदीपिका' हीं वर्तमानपत्रें निघालीं होतीं. याच सुमारास यंदे शेटजींनीं प्रथम 'सृष्टिदर्पण' व नंतर 'शेतकऱ्यांचा कैवारी' अशीं दोन साप्ताहिकें सुरू केल्याचें कळतें. पुढें १८९५ सालीं श्रीमंत सयाजीराव महाराज याच्या निमंत्रणावरून यंदे शेटजी बडोद्यास गेले व तेथें त्यांनीं स्वतंत्र विचाराचें असें 'सयाजीविजय' साप्ताहिक काढलें. हें पत्र बडोद्यास एका काळीं फार लोकप्रिय झालें होतें. पण तें दैनिक इंदुप्रकाशाबरोबर बंद पडलें. यंदे शेटजींनींच काढलेलें याच नांवाचें गुजराथी पत्र अद्याप चालू आहे. 'सयाजीविजय' व 'इंदुप्रकाश' यांत दातार यांनीं केलेलीं रेनॉल्डसच्या अनेक कादंबऱ्यांचीं मराठी चटकदार भाषांतरें प्रसिद्ध होत असत. तीं पुस्तकरूपानें आज उपलब्ध आहेत.

## आगरकरांचा सुधारक

अखिल महाराष्ट्रास हलवून सोडणारें 'सुधारक' पत्र यानंतर निघालें. केसरीद्वारें आपलीं सामाजिक मतें जनतेसमोर मांडण्यास मज्जाव झाल्याबरोबर तीं

काढण्यासाठीं आगरकरांनीं ना. गोखले यांच्या सहकार्यानें ' सुधारक ' पत्र १८८८ च्या आक्टोबर १५ पासून सुरू केलें. तत्कालीन पद्धतीप्रमाणें सुधारकांत इंग्रजी व मराठी मजकूर देत असे. यांपैकीं इंग्रजी विभाग ना. गोखले संपादीत असत. १८९१ सालीं संमतिवयाच्या बिलावर महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांत मतभेदाचें रण माजलें, तेव्हां ' केसरी ' विरुद्ध ' सुधारक ' असा अटीतटीचा सामना झाला. ह्या वादांत आगरकरांच्या प्रखर लेखणीचें सत्यस्वरूप सुधारकांतून दृष्टीस पडलें. सुदैवानें केसरी-सुधारकांत आलेल्या आगरकरांच्या प्रमुख निबंधांचे कांहीं भाग सध्यां उपलब्ध आहेत; त्यांवरून आगरकरांच्या अल्पकालीन, परंतु अत्यंत तेजस्वी अशा संपादकीय कार्याची कोणासहि कल्पना येण्याजोगी आहे. आजकाल देशी वर्तमानपत्रांना महत्त्व प्राप्त झालें आहे, त्याचें बरेंच श्रेय आगरकरांच्या प्रभावी लेखनाला दिलें पाहिजे. पण दुर्दैवानें १८९५ सालीं आगरकर वारल्यामुळें सुधारकाचें प्रखर तेज त्यांच्या निधनाबरोबरच मावळलें. त्यानंतर प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन, सीतारामपंत देवधर व विनायक रामचंद्र जोशी यांनीं ' सुधारक ' कांहीं वर्षें चालविला असला तरी आगरकरांची प्रतिभा सुधारकांत पुढें केव्हांहि दिसली नाहीं. विनायक रामचंद्र जोशी यांनीं सुधारकाचें एकबार पुनरुज्जीवन करण्याचा पुढें कांहीं वर्षांनीं प्रयत्न केला होता; परंतु तो अयशस्वी ठरला.

सुधारकानंतरच्या पुढील वर्षांत ( १८८९ ) मुंबईत निघालेलें ' वार्ताहर ' पत्र बरेंच गाजलें. तें दर रविवारीं निघत असे. ' शेलक्या बातम्या, स्वदेशांतील ताजी बातमी व निवडक वर्तमानें, काळ्या-गोऱ्यांचे सामने अर्थात् जुलमाच्या गोष्टी (!), चटकदार निबंध, एखाद्या संस्थानिकाची माहिती वगैरे ' त्याचे चालक बाबाजी कृ. रघुनाथजी हे त्यांत देत असत. या काळांत वार्ताहरानें मुंबईस बराच लौकिक संपादन केला होता.

## करमणूक आणि काळ

पुढील सालीं निघालेलें महत्त्वाचें वर्तमानपत्र म्हणजे सुप्रसिद्ध कादंबरीकार हरि नारायण आपटे यांची ' करमणूक ' होय. या पत्राचा पहिला अंक आक्टोबर १८९० मध्यें प्रसिद्ध झाला व पुढें सतत २८ वर्षें मनोरंजनाबरोबर लोकशिक्षणाचेंहि कार्य करून हें पत्र विराम पावलें. 'केसरी-सुधारकादि पत्रें आपल्या कुशल लेखणीनेंहि जें काम निबंधांच्या द्वारें करणार तेंच काम हें पत्र मनाची करमणूक करून करणार ' असें हरिभाऊंनीं या पत्राचें धोरण ठरविलें होतें व तें त्यांनीं अखेरपर्यंत

पाळलें. 'पुढल्या माडीपासून चुलीपर्यंत व दिवाणखान्यांतील टेबलापासून फणी-करंड्याच्या पेटीपर्यंत कोणाच्या हातीं हें वर्तमानपत्र पडेल त्यानें तें खुशाल वाचावें' अशा लायकीची हरिभाऊंची 'करमणूक' होती. तींतून एकंदर १८ कादंबऱ्या हरिभाऊंनीं लिहिल्या. त्यांपैकीं ८ सामाजिक असून १० ऐतिहासिक आहेत. ह्या कादंबऱ्यांशिवाय शेंकडों मोठ्या व छोट्या गोष्टी, लहान लहान निबंध, चटकदार संक्षिप्त चरित्रें, निवडक उपयुक्त माहिती, कविता, चुटके, वर्तमानसार वगैरे किती तरी मजकूर त्यांनीं करमणुकींतून प्रसिद्ध केला. तो एकत्र करून छापल्यास किती तरी ग्रंथ होतील! करमणुकीनंतर तिचें अनुकरण करणारीं महाराष्ट्रांत सहस्रकर, तुतारीसारखीं अनेक पत्रें निघालीं, पण तिची लोकप्रियता कोणाच्याच वांट्यास आली नाहीं.

यापुढील उल्लेखनयोग्य पत्र म्हणजे प्रो. शि. म. परांजपे यांचा 'काळ' होय. केसरीनें आपल्या १५ वर्षांच्या अल्प अवधींत महाराष्ट्रांतील जनतेंत राष्ट्रीय विचाराची जी अभूतपूर्व जागृति केली, तिचा फायदा घेऊन प्रो. परांजपे यांनींहि आपल्या उपरोधपूर्ण लेखनानें आणि अतुलनीय वाक्पटुत्वानें महाराष्ट्रीयांच्या चित्तवृत्ति थरारून टाकल्या. त्यांचें संस्कृत भाषेवरील प्रभुत्व असामान्य होतें. तसेंच त्यांची विचारसरणी सरळ आणि प्रतिपक्षाला निरुत्तर करणारी अशी होती. त्यांच्या विद्वत्तेस अस्खलित वक्तृत्वाच्या गुणाची जोड मिळाल्यामुळें, अद्वितीय वक्ते या नात्यानें ते महाराष्ट्रांत सर्वश्रुत झाले होते. त्यांच्या वैयक्तिक कीर्तीमुळें 'काळा'चा अल्पावधींत फार मोठ्या प्रमाणांत प्रसार झाला.

१८९८ ते १९०८ या कालांत 'काळ' पत्रांत अनेक विषयांवर शिवरामपंतांचे अत्युत्तम लेख आले आहेत. 'काळ' पत्राच्या सुरुवातीला आलेला 'काळ' हा लेखहि अत्यंत वाचनीय असून तो मराठी भाषेंतील क्रमिक वाचन-पाठमालेंत समाविष्ट करण्यांत आला आहे. 'संपत्तीचा दुरुपयोग,' 'राजे, सरदार, दरबार, पदव्या इत्यादिकांचा पूर्वाश्रमींचा इतिहास,' 'राज्य कशानें मोडकळीस येतें?' 'राज्यापहार आणि न्याय,' 'तिबेट आणि नीतिशास्त्र,' तसेंच 'आर्यां-करितां गाणें,' 'एका सोमयज्ञाची हकीकत,' 'भोवरीचें फूल,' 'एका पूजेच्या गणपतीचें पत्र' वगैरे लेख उपरोधिक व विनोदगर्भ असल्यामुळें त्या लेखांनीं वाचकांना एका काळीं वेडावून सोडलें होतें. 'ईश्वरी करणी अगाध आहे,' 'आहे कीं नाहीं मी सर्व्हंट!' 'माझ्यावर राज्य आलें,' 'पोलंडची अधोगति,' 'रावणाच्या अपराधांचें दिग्दर्शन,' 'दिल्लीचें तख्त व भाऊसाहेबांचा वण,'

'कानपूरची विहीर,' 'टायरोल,' 'रावर्ट एलेट,' 'बुल्फोन,' 'गोविंदरावांची आपल्या मुलांस पत्रें,' 'पीकपाणी,' 'लोकमान्य व राजमान्य,' 'डेक्कन कॉलेजला पाहून सुचलेले विचार,' 'स्वित्झर्लंडची स्वतंत्रता,' 'एका सनईनें सुचविलेले विचार,' 'सह्याद्रीच्या तावडींत सांपडलेली कल्पना,' 'सांपडलेलें संपुष्ट,' 'डोळ्यांत फेंकावयाच्या धुळीचा कण,' 'मिशनरी बाबा आणि लुच्चेगिरीचा कावा,' 'अर्जुनाचा वेडेपणा,' 'एक कल्पित गोष्ट,' 'हिंदुस्थान आणि ट्रान्सवाल,' 'उत्सवाची भीति कशाला?' 'जुन्या इमारतीचें नव्या राजांनीं काय करावें?' वगैरे काळांतील अनेक लेखांचा उल्लेख करण्याजोगा आहे. याशिवाय याच वृत्तपत्रीय लेखनांत अवतरलेल्या व्याजोक्तिपूर्ण कथांनीं त्यांनीं मराठी वृत्तक्षेत्रांतच काय पण मराठी वाङ्मयांतहि एक अभिनव व स्वतंत्र लेखनसरणी निर्माण केली आहे.

## मुंबईचें पहिलें मराठी दैनिक

सन १८९४ च्या सुमारास प्रभाकर दैनिक मुंबईस सुरू झाल्याचा उल्लेख सांपडतो. त्याशिवाय त्या वेळच्या दैनिकांत ल. ना. जोशी यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या 'गुराखी' वृत्तपत्राचा उल्लेख करावयास पाहिजे. तसेंच केशव पुरुषोत्तम मेहेंदळे (१८७०–१९३५) यांच्या 'मुंबई-वैभव' या दैनिकानेंहि सुमारें १७-१८ वर्षें आपला दैनिक संसार सुव्यवस्थितपणें चालविला होता. दिडकीवालें दैनिक मुंबईत यशस्वी करून दाखविण्याचा मान त्या वेळच्या 'मुंबई-वैभव'च्या मेहेंदळे यांनीं फार वर्षांपूर्वीच हस्तगत केला होता, ही गोष्ट मुंबई-पुण्याच्या सध्यांच्या दिडकीवाल्या दैनिकांना आश्चर्यकारक वाटेल!

या कालांतील एकंदर वर्तमानपत्रांचा संसार चांगला चालू झाला होता. राष्ट्रीय विभूतींचे उत्सव साजरे करण्याचा उपक्रम नव्यानेंच महाराष्ट्रांत सुरू झाल्यानें राष्ट्रीय जागृतीचें साधन म्हणून वृत्तपत्र-संस्थेचा कल्पनातीत उपयोग झाला. तरीहि पक्षभेद आणि पक्षांतील तीव्र मतभेद वृत्तपत्रांच्या द्वारें पराकोटीस गेलेले क्वचित् स्थळीं दिसतातच. एकदां एकमेकांच्या उखाळ्यापाखळ्या काढण्याच्या भरांत लिहिलेल्या एका लेखावर "तुम्ही कोण" असा मथळा एका पक्षानें घातला होता; त्यावर उत्तर म्हणून विरुद्ध पक्षानें "आम्ही तुमचे बाप" अशाच मथळ्याखालीं तोडीसतोड दुसरा लेख लिहिला! हें वृत्तपत्रीय वाग्युद्ध पुष्कळदां अत्यंत जहाल भाषेंत व क्वचित् स्थळीं सदभिरुचीस न शोभणारें असेंहि चालत असे.

## सन १९०० ते १९१०

हिंदुस्थानांतील वृत्तपत्रीय प्रगतीच्या आणि राष्ट्रीय चळवळीच्या दृष्टीनें वर्तमानपत्रांच्या इतिहासांतील हा काल अत्यंत महत्त्वाचा असा समजला पाहिजे. यापूर्वीच्या दशकांत हिंदुस्थानांत राष्ट्रीय जागृतीचा उदय होऊन लोकांमध्यें तीव्र ज्ञानपिपासा वाढली व ती भागविण्यासाठीं अनेक वर्तमानपत्रें एकामागून एक जन्मास आलीं. या दहा वर्षांत वर्तमानपत्रांतील सर्वसाधारण लिखाणांत व मांडणींत हळुहळू फरक होत होता. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील राष्ट्रीय जागृतीची लाट सर्वत्र पसरल्यामुळें पुणें व मुंबई आणि खुद्द महाराष्ट्रांतील कांहीं जिल्ह्यांतील प्रमुख शहरें हींच केवळ वर्तमानपत्रांचीं केंद्रें न राहतां यापुढें वर्तमानपत्रें अखिल महाराष्ट्रांतील बहुतेक भागांत निघण्यास प्रारंभ झाला. एका अर्थानें ही प्रगति इष्टच होती.

१९०२ सालापासून, त्या वेळीं मागासलेला म्हणून समजल्या जाणाऱ्या खुद्द मध्यप्रांत-वऱ्हाडांतहि वर्तमानपत्रें सुरू होऊं लागलीं. १९०२ मध्यें 'वऱ्हाड-समाचार', 'देशसेवक', 'वैदर्भ' हीं वर्तमानपत्रें त्या प्रांतांत निघालीं. त्याचप्रमाणें महाराष्ट्रांतहि मागील कालखंडांत उल्लेखिलेल्या वर्तमानपत्रांशिवाय आणखी बरींच वर्तमानपत्रें निघालीं.

यानंतर १९०४ हें साल वृत्तपत्रांच्या इतिहासांत बरेंच महत्त्वाचें आहे. या वेळीं 'जगत्समाचार', व 'वडोदावत्सल' (वडोदें) अशीं दोन वृत्तपत्रें मागील वृत्तपत्रांशिवाय चालू होतीं. यापुढील पांच वर्षांत 'सरदेसाई-विजय' (सांवतवाडी १९०६), 'मुमुक्षु' (धुळें-पुणें-नाशिक १९०७), 'देशसेवक' (नागपूर), 'हितवाद' (नागपूर १९०७), 'प्रगति' (कोल्हापूर १९०८), 'विजयी मराठा' (कोल्हापूर १९०७ व पुढें पुणें), 'खानदेश-समाचार' (धुळें १९०८), 'कुलाबा' (वैजनाथ–कुलाबा १९०८), 'जगद्वृत्त' (मुंबई १९०८), 'वैद्यकपत्रिका' (पुणें १९०९), 'हिंदु-पंच' (ठाणें १९०९), अशीं कांहीं वृत्तपत्रें निघालीं. ठाणें येथील 'हिंदु पंच' आपल्या विनोदी चित्रांनीं आणि लेखांनीं यावेळीं बरेंच प्रसिद्ध झालें. परंतु या पत्रानें आपल्या विनोदी लेखांना व चित्रांना पुढाऱ्यांच्या टवाळखोरीचें जेव्हां स्वरूप दिलें तेव्हां तें वरच्या वर्गांत अप्रिय झालें व त्याच्यावर खटला होऊन छापखानाहि जप्त होण्यापर्यंत पाळी आली.

## राष्ट्रीय पक्षाचें पहिलें दैनिक 'राष्ट्रमत'

१९०४-६ या सालांत बंगालमध्यें व इतरत्र वंगभंगाची चळवळ जोरानें सुरू झाल्यानें राष्ट्रीय वर्तमानपत्रांची प्रगति झाली. या वेळीं 'केसरी', 'काळ' या वृत्तपत्रांनीं राष्ट्रीय चळवळीचें क्षेत्र अत्यंत व्यापक केलें. राष्ट्रीय चळवळीच्या दृष्टीनें या वृत्तपत्रांनीं केलेली कामगिरी सर्वमान्य अशी आहे. या काळचे 'काळ' पत्रांतील उद्बोधक लेख अद्यापिहि कित्येकांच्या स्मरणांत असतील. 'देशसेवक' वर्तमानपत्र हरिपंत पंडित यांनीं नागपुरांत राष्ट्रीय जागृतीचें साधन म्हणून उत्तम प्रकारें चालविलें होतें. पुढें देशसेवकाचीं सूत्रें कांहीं दिवस गोपाळराव ओगले (सध्यांच्या महाराष्ट्राचे संपादक) यांच्याकडे होतीं. नंतर 'संदेश' कर्ते अच्युतराव कोल्हटकर यांच्याकडे देशसेवकाचें संपादकत्व गेलें. त्यापुढें सरकारनें राष्ट्रीय वर्तमानपत्रांवर राजद्रोहाच्या आरोपाखालीं खटले करण्याची मोहिम सुरू केली. त्यांत प्रथम अच्युतराव कोल्हटकर व नंतर ओगले यांजवर खटले होऊन, १९१० च्या प्रेस ॲक्टामुळें देशसेवकाची देशसेवा अकालींच थांबली. १९०८ पर्यंत महाराष्ट्रामध्यें राष्ट्रीय मताचें स्वतंत्र असें दैनिक नव्हतें अशा दैनिकाची तर जरूरी राष्ट्रीय पक्षाला फार भासे. शेवटीं याकरित; लो. टिळक-प्रभृति राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांनीं राष्ट्रमत पब्लिशिंग कंपनी सामायिक भांडवलावर सुरू करून 'राष्ट्रमत' वृत्तपत्र मुंबई शहरांत चालू केलें. या दैनिकाचे पहिले संपादक पुण्याचे सुप्रसिद्ध (नंतरच्या 'राजकारणा'चे कर्ते) सितारामपंत दामले हे होते. नाशिक कटाच्या खटल्याची विस्तृत व सुसंगत हकीकत त्वरित आणवून ती तितक्याच त्वरेनें प्रसिद्ध करीत गेल्यामुळें राष्ट्रमत दैनिकानें अल्पकाळांत तत्कालिन दैनिकांमध्यें चांगलीच बढती मिळविली. महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांच्या हालचाली आणि त्यांच्या दौऱ्यांचे कार्यक्रम दैनिक 'राष्ट्रमतां'त प्रसिद्ध होत असत. त्यानंतर लवकरच 'राष्ट्रमता'वर खटला होऊन दामले यांना तुरुंगवास भोगावा लागला व 'राष्ट्रमता'चा अवतार समाप्त झाला. राष्ट्रीय पक्षाचें दैनिक म्हणून घेण्याचा मान जरी राष्ट्रमतानें पटकाविला असला तरी, चटकदार बातम्या, आकर्षक मथळे, उपरोधिक टीका, चित्तवेधक लेखन इत्यादि गुणांमुळें राष्ट्रमतापेक्षां त्यानंतर निघालेले 'संदेश' पत्रच फार गाजलें.

## खटल्यांचें सत्र

राष्ट्रीय वृत्तपत्रांच्या दृष्टीनें १९०५ नंतरचीं तीनचार वर्षे अत्यंत खळबळीचीं गेलीं. कारण १९०५ सालापासून राष्ट्रीय वर्तमानपत्रांवर सरकारनें करडी

नजर ठेवून त्यांच्यावर खटले भरण्यास सुरुवात केली होती. पुढें सन १९१० मध्यें तर वृत्तपत्रांवर नियंत्रण घालण्यासाठीं सरकारनें प्रेस ॲक्ट कायदेमंडळांत पास करून घेतला. त्या कायद्यान्वयें संपादकाप्रमाणें मुद्रकालाहि आक्षेपार्ह मजकुराबद्दल जबाबदार धरण्यांत येऊं लागलें. या कायद्याला अनेक मराठी वृत्तपत्रें बळी पडलीं; परंतु त्यामुळें मराठी वृत्तपत्रांची वाढ किंवा वजन कोणत्याहि प्रकारें कमी झालें नाहीं.

## 'संदेश' नें केलेली क्रांति

१९१४ च्या सुमारास युरोपांत महायुद्धाचा वणवा पेटला. त्यामुळें युद्धाच्या रम्य वार्ता ऐकणें, हें महाराष्ट्रांतील वाचकवर्गाला आपलें एक रोजचें कर्तव्यच होऊन बसलें. वाढलेली लोकजिज्ञासा आणि तत्पूर्त्यर्थ वाढत जाणारी वर्तमानपत्रांची संख्या ह्या दोन्ही गोष्टी वृत्तपत्रसंस्थेच्या प्रगतीला उपकारकच ठरल्या. या अनुकूल काळाचा हिंदी वृत्तपत्रांनीं भरपूर उपयोग करून घेतला. महायुद्धापूर्वी लो. टिळक यांची मुक्तता झाल्यामुळें राष्ट्रीय पक्षाच्या वृत्तपत्रांत पुन्हां नवचैतन्य खेळूं लागलें. लवकरच लोकमान्य व मिसेस ॲनी बेझंट यांनीं एकसमयावच्छेदेंकरून होमरूलची चळवळ हातीं घेतल्यामुळें वृत्तपत्रांची आणखी वाढ झाली. १९१४ हें साल जगाच्या एकंदर व्यवहाराच्या दृष्टीनें ज्याप्रमाणें क्रांतिकारक ठरलें त्याप्रमाणें हिंदी वृत्तपत्रांच्या इतिहासांतहि क्रांति करणारें असें झालें. याच सालांत 'वऱ्हाडचा केसरी' समजला जाणारा 'महाराष्ट्र' साप्ताहिक ओगले यांच्या संपादकत्वाखालीं अवतीर्ण झाला. 'महाराष्ट्रा'चा बोलबाला व प्रगति झपाट्यानें होत आली असून केसरीप्रमाणेंच हल्लीं तो आठवड्यांतून दोन वेळां प्रसिद्ध होतो. याच सालांत नांव घेण्यासारखीं नवीन वृत्तपत्रें म्हणजे मुंबईतील 'लोकसेवक,' वांईचे धर्ममार्तंड लेलेशास्त्री यांचें 'ज्ञानसाधन' व बापटशास्त्री यांचें 'आचार्य' पाक्षिक ( पुणें ) हीं होत. यापुढील सालांत लो. टिळकांच्या वऱ्हाडांतील स्वराज्याच्या दौऱ्यांचीं रसभरीत आणि चित्तवेधक वर्णनें छापून राष्ट्रीय पक्षाच्या कार्यक्रमाचा जोरदार भाषेंत पुरस्कार करणारें अच्युतराव कोल्हटकर यांचें खुसखुशीत व चटकदार 'संदेश' वर्तमानपत्र प्रसिद्ध होऊं लागलें.

'संदेश' काढण्यापूर्वी अच्युतराव कोल्हटकर यांनीं नागपूरच्या 'देशसेवकां'त ओजस्वी लेख लिहून त्या पत्राला अल्पावधींतच अपूर्व लोकप्रियता मिळवून दिली होती. त्यांचें वृत्तपत्रीय व सार्वजनिक आयुष्य अत्यंत खळबळीचें असें होतें. पहिल्या शिक्षासत्रांत त्यांना दीडवर्ष सक्तमजुरीची शिक्षा भोगावी

लागल्यामुळें त्यांचें तडफदार लेखन आणि देशभक्ति हीं जास्त प्रमाणांत लोकांपुढें आलीं. नागपुरांतील संकुचित कार्यक्षेत्र अपुरें वाटूनच कीं काय, त्यांनीं नागपूर सोडून मुंबईच्या विस्तीर्ण आणि आपल्या कार्यास योग्य अशा स्थानीं संदेशाचा संसार थाटला. प्रथम 'उषा,' व नंतर तुळजापूरकर-पटवर्धन यांच्या साहाय्यानें 'श्रुतिबोध' हें मासिक, वेदांचें भाषांतर प्रसिद्ध करण्यासाठीं त्यांनीं सुरू केलें. पाठोपाठ 'मेसेज' हें इंग्रजी व 'संदेश' हें मराठी दैनिक यांचीहि प्रतिष्ठापना केली. दुर्दैवानें 'मेसेज' चें आयुष्य अत्यल्प ठरलें पण 'संदेश' चा बोलबाला अल्पावधींतच कल्पनातीत झाला.

'संदेश' निघाल्यानंतर मराठी दैनिकांमध्यें एक नवीनच प्रथा सुरू झाली. 'संदेश'मधील नेहमींच्या ताज्या तारा "इकडे तिकडे चोहींकडे" या मथळ्याखालीं अत्यंत चटकदार व आकर्षक भाषेंत लिहिल्या जाऊं लागल्या. आंतरराष्ट्रीय प्रश्नहि अगदीं कमी शिकलेल्या लोकांना सहज समजतील अशा सुबोध भाषेंत देण्याचा त्यानें क्रम ठेवला. 'संदेश'मधील महायुद्धाच्या ताज्या ताज्या बातम्या वाचण्यासाठीं मुंबईतील प्रत्येक नाक्या-नाक्यावर वाचकांचे थवेच्या थवे दिसत असत. सौ. वत्सला वहिनींचीं पत्रें, बेट्या गुलाबच्या कानगोष्टी, किट्टी मामा गॅझेट इत्यादि सदराखालीं त्यांत चटकदार लेख येत. दोनतीन वर्षांत 'संदेश'चा खप कित्येक हजारांवर गेला, आणि महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यांतहि अच्युतरावांचा 'संदेश' पोहोचूं लागला. पण संदेशाचा हा वाढता लौकिक आणि त्याची आकर्षकता पुढें फार दिवस टिकूं शकली नाहीं. 'संदेश'नें राष्ट्रीय पक्षाच्या अव्वल पुढाऱ्यांवर आपलें टीकास्त्र जेव्हां सोडलें तेव्हां तात्काल 'संदेश' वर त्याचा विपरित परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. प्रतिस्पर्ध्यांवर हल्ला करतांना त्यानें शत्रूंची अगर मित्रांची यत्किंचितहि कदर केली नाहीं हें खरें असलें तरी त्यामुळेंच त्याची लोकप्रियता हळूहळू कमी होत गेली. अच्युतरावांचे 'संदेश'मधील निवडक लेख तीन भागांत श्री. अनंतराव गद्रे यांनीं नुकतेच प्रसिद्ध केले आहेत. यामुळें अच्युतरावांचें नांव मराठी वाङ्मयांत चिरकाल राहण्याची चांगली सोय झाली.

अच्युतराव कोल्हटकरांनीं आपल्या २६ वर्षांच्या वृत्तपत्रीय आयुष्यांत प्रामुख्यानें जरी 'संदेश'चें संपादकीय आसन भूषविलें तरी संदेशपूर्वी आणि नंतर त्यांचा संपादक व प्रमुख लेखक या नात्यानें सुमारें २५ पेक्षां जास्त वृत्तपत्रांशीं संबंध आला. या दोन तपांच्या काळांत अच्युतरावांनीं जी वृत्तपत्रीय कामगिरी केली आहे

तील कोठेंहि तोड सांपडणार नाहीं. दैनिक वृत्तपत्रांच्या सरसकट चटकदार बातम्या लिहिण्यापासून तों भारदस्त अग्रलेख सजविण्यापर्यंत ज्यांनीं अविश्रांत सर्वांगीण लेखनकार्य केलें अशा संपादकांची योग्यता असामान्य अशीच समजली पाहिजे.

अच्युतरावांच्या राजकीय लोकप्रियतेस थोडीशी ओहोटी लागतांच 'संदेश' वर नवून नवून संकटें येत गेलीं. पुष्कळ वेळां संदेशाचे उदयास्तहि झाले. तथापि 'संदेश'नें मराठी वृत्तपत्राच्या लेखनांत, आकर्षकतेंत आणि मजकुराच्या व जाहिरातींच्या मांडणींत नवीन आमूलाग्र इष्ट फरक घडवून आणले, हें खोटें नाहीं. अच्युतराव आपल्या वयाच्या अवघ्या ५२ व्या वर्षी निधन पावले. त्यांच्या शोचनीय मृत्यूमुळें मराठी वृत्तपत्रीय वाङ्मयाची मोठीच हानि झाली. मृत्यूपूर्वी कांहीं दिवस त्यांची 'संदेश'चा संसार पुन्हां थाटण्याची खटपट चालू होती. पण दुर्दैवानें ती तशीच अर्धवट राहिली.

## पुण्याचा लोकसंग्रह

१९२० पर्यंतच्या या कालखंडास 'संदेशाचें युग' असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. १९२० पूर्वी पुण्यास 'लोकसंग्रह' हें राष्ट्रीय पक्षाचें 'नवें' दैनिक, 'संदेश' नंतर प्रसिद्ध होऊं लागलें होतें. 'संदेश' वरील हल्ल्यांना तोंड देण्याकरितां पुण्यांतील राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं 'लोकसंग्रहा'चा चांगला उपयोग करून घेतला. परंतु पुण्याची कोंदट हवा या पत्रास मानवली नाहीं. तें १९२३ मध्यें बंद पडलें.

## इतर वृत्तपत्रांचें समालोचन

राष्ट्रीय जागृतीच्या व त्याचप्रमाणें राष्ट्रीय वृत्तपत्रांच्या वाढीच्या दृष्टीनें यापूर्वीचा १०-१५ वर्षांचा कालखंड अत्यंत महत्त्वाचा आहे. या सालांत वंगभंगाच्या चळवळीनंतर राष्ट्रीय जागृतीच्या कामीं हिंदी वृत्तपत्रांनीं कोणकोणती कामगिरी केली, त्याचें वर्णन मराठींतील प्रातिनिधिक स्वरूपाच्या कांहीं वृत्तपत्रांची हकीकत देऊन केलेलेंच आहे. एकंदरीनें या कालांत वृत्तपत्रांची विशेष प्रगति झाली. या काळांत वृत्तपत्रांचें कार्य जरी प्रामुख्यानें लोकांस राजकीय शिक्षण देण्याचें असें राहिलें तरी इतर शाखांतहि वृत्तपत्रांनीं कार्य केलें. याच कालांत युरोपांतील महायुद्धाचा वणवा पेटल्यामुळें लोकांमध्यें ताजी बातमी वाचण्याची सहजप्रवृत्ति बरीच वळावली. नवीन नवीन वृत्तपत्रांनीं लोकांमध्यें बलवत्तर वाचनाभिरुचि निर्माण केल्यामुळें ललित-वाङ्मयाच्या वृत्तपत्रांनाहि महत्त्व आलें. ना. ह. आपटे यांचा 'आल्हाद' (सातारा) व कोठारी-कुळकर्णी यांचा 'सहस्रकर' (मुंबई)

१९१५ मध्यें उदय पावला व त्यांत 'करमणुकी 'च्या धर्तीवर वाचकांचें सात्त्विक मनोरंजन करण्याचा प्रयत्न करण्यांत आला. पण हे प्रयत्न टिकाऊ ठरले नाहींत. 'हास्यविनोद' नांवाचें विनोदी साप्ताहिक याच वर्षी निघालें, पण त्यास 'हिंदुपंच' या साप्ताहिकाची सर आली नाहीं. 'ज्ञानसाधन' व 'जगद्वृत्त' या वृत्तपत्रांनींहि आपल्या कुवतीप्रमाणें लोकसेवा केली. १९१३–१४ सालापासून ब्राह्मणेतरपक्षाची चळवळ जोरानें सुरू झाल्यावर कित्येक वृत्तपत्रें त्या पक्षाचीं मुखपत्रें म्हणून निघालीं. त्यांत वा. रा. कोठारी यांनीं १९१७ मध्यें निघालेलें 'जागरूक' (पुणें), पाळेकर यांचें 'जागृति,' आणि श्रीपतराव शिंदे यांचें 'विजयी मराठा,' ह्या वृत्तपत्रांनीं ब्राह्मणेतर समाजांत बरेंच नांव कमावलें. कोठारी हे स्वराज्यपक्षाला मिळाल्यानंतर 'जागरूक' तीन चार वर्षांनीं निद्रिस्त झाला. 'जागृति' पत्र मात्र आज १७ वर्षे बडोद्यांत आपली कामगिरी यथाशक्ति पार पाडीत आहे. जागृतींतील निवडक लेख 'नव्या मनूंतील मराठा' या नांवानें प्रसिद्ध झाले आहेत.

श्रीमत् शंकराचार्यांच्या (डॉ. कुर्तकोटी) नेतृत्वाखालीं कांहीं वर्षे निघत असलेलें 'स्वधर्म' आणि गजाननराव वैद्य यांचें साडेचार वर्षेपर्यंत चाललेलें 'हिंदुमिशनरी' या पत्रांचा पण येथें उल्लेख करणें जरूर आहे. धार्मिक स्वरूपाचीं आणखी दोन वृत्तपत्रें म्हणजे आचार्यभक्त कै. विष्णुशास्त्री बापट यांचें 'आचार्य' पाक्षिक व ल. रा. पांगारकर यांचें 'मुमुक्षु' हीं होत. 'आचार्य' पाक्षिक १९१३ सालीं अस्तित्वांत आलें, तें ६।७ वर्षे चालून बंद पडलें. 'निःस्पृहस्य तृणं जगत्' हें आचार्यपाक्षिकाचें ध्येय बापटशास्त्री यांनीं यथाशब्द पाळलें होतें. 'मुमुक्षु' साप्ताहिक पांगारकर यांनीं प्रथम धुळें येथें व नंतर पुण्यास सुरू केलें. प्रथम 'मुमुक्षू'त राजकीय व धार्मिक विषय येत असत, पण पुढें धार्मिक विषयच देण्याचा पांगारकरांनीं सोयीचा परिपाट ठेवला. १९१७ सालीं त्यांनीं पुणें सोडल्यावर 'मुमुक्षु' साप्ताहिक कांहीं दिवस बंद झालें व पुढें तें मासिकांत रूपांतर पावलें. १९१९ सालीं वासुदेवराव आपटे यांनीं स्वतःच्या संपादकत्वाखालीं स्वतंत्र व पक्षभेदातीत असें 'विचारसाधन' नांवाचें साप्ताहिक काढलें. परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें आणि 'विचारसाधन' योग्य प्रकारें सांभाळील असा लेखक आपटे यांना न मिळाल्यामुळें त्यांनीं विचारसाधनाचें प्रकाशन थांबविलें. याच कालखंडांत सुधारकाचें कार्य पुढें चालविण्याकरितां के. सी. ठाकरे यांनीं 'प्रबोधन' पाक्षिक काढलें, पण तें लवकरच बंद पडलें. 'राजकारण' व 'राष्ट्रहितैषी' या नांवांचीं सुविचारपरिप्लुत व भारदस्त अशीं दोन साप्ताहिकें याच कालांत पुण्यांत

निघालीं. सी. के. दामले व रा. वि. फडतरे यांनीं १९१८ सालीं आपलें राष्ट्रीय पक्षाचें साप्ताहिक 'राजकारण' सुरू केलें. ह्या पत्रांत दामले हे एकटेच लिहीत. तसेंच एकच विषय परंतु तो ७।८ कॉलम एवढ्या विस्तृत जागेंत लिहिण्याचा त्यांनीं क्रम ठेविला होता. त्यामुळें 'राजकारण' पुढें पुढें कंटाळवाणें झालें व १९२२ मध्यें तें बंद पडलें. पांडुरंग नरसिंह पटवर्धन व वरील रा. वि. फडतरे यांनीं 'राष्ट्रहितैषी' साप्ताहिक १९१९ च्या एप्रिलमध्यें सुरू केलें. एका आठवड्यांतील संकलित वृत्त आणि 'मॉडर्न रिव्ह्यु' व 'इंडियन रिव्ह्यु' सारख्या इंग्लिश मासिकांतील वाङ्मयात्मक व ऐतिहासिक लेखांचा सारांश या साप्ताहिकांत येत असे. हें पत्र पण अवघ्या एका वर्षाच्या आंतच बंद झालें.

भा. व. भोपटकर यांचा 'भाला' व शिवरामपंत परांजपे यांचें 'स्वराज्य' या दोन साप्ताहिकांचा या ठिकाणीं प्रामुख्यानें उल्लेख करावयास पाहिजे. वर्णाश्रम व स्वराज्य यांना भाला पत्राचा पाठिंबा आहे. त्याचप्रमाणें हिंदुसंघटन आणि बलोपासना या मुख्य बाबींना योग्य तें महत्त्व देण्याचें भोपटकर यांचें संपादकीय धोरण आहे. महात्मा गांधींच्या अव्यवहार्य राजकारणावर व समाजकारणावर भाल्याप्रमाणें एका पत्रानेंहि आजवर निर्भीड टीका केली नाहीं. सध्यां भाला पाक्षिक स्वरूपांत निघत आहे. नवीन नवीन शब्द आपल्या टांकसाळींतून पाडण्याचा 'भाल्या'चा उपक्रम सर्वांना सुपरिचित झाला आहेच !

असहकारितेच्या चळवळीच्या सुरुवातीलाच 'काळ'कर्ते परांजपे यांनीं 'स्वराज्य' साप्ताहिक सुरू केलें. परंतु 'काळा'ची सर मात्र या पत्राला कधींच आली नाहीं. परांजपे यांचे कित्येक सर्वमान्य लेख स्वराज्यांतहि आले आहेत. त्यांपैकीं निवडक निबंधांचे दोन भाग प्रसिद्ध झाले आहेत. 'स्वराज्य' पत्र चालवीत असतांना मुळशी सत्याग्रहांत परांजपे यांना शिक्षा झाली, तेव्हां त्यांचे चिरंजीव कृष्णाजीपंत हे स्वतः स्वराज्य चालवीत होते. पुढें शंकरराव देव, वि. म. भुस्कुटे, हरोलीकर प्रभृतींनीं स्वराज्य पत्र कांहीं दिवस टिकविलें, परंतु 'निदान धर्मयुद्ध तरी करा' हा लेख सरकारनें आक्षेपार्ह ठरवून देव-हरोलीकर यांच्यावर खटला भरला त्या वेळेपासून 'स्वराज्य' बंद पडलें.

## सन १९२० ते १९३५

१९२० नंतरचीं गेलीं पंधरा वर्षे वृत्तपत्रांच्या इतिहासांत महत्त्वाचीं अशींच आहेत. लो. टिळकांच्या निधनानंतर महाराष्ट्रांतील व अखिल भरतखंडांतील सर्व

राष्ट्रीय चळवळीचीं सूत्रें महात्मा गांधींच्या हातांनीं हलूं लागलीं. गेल्या दोन दशकांतील चळवळीपेक्षांहि या सार्वत्रिक चळवळींत वृत्तपत्रांना सर्वांत जास्त प्रकारची कामगिरी बजावावी लागली आहे. हिंदी वृत्तपत्रांनीं या राष्ट्रीय चळवळीच्या कामीं आपलें शक्ति-बुद्धिसर्वस्व खर्च केलें आणि त्यामुळेंच त्यांचा दर्जा आणि मान पुष्कळ प्रमाणांत वाढला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

१९२१ मध्यें महाराष्ट्रांत जीं वर्तमानपत्रें चालू होतीं त्यांमध्यें प्रमुख अशीं वृत्तपत्रें मागील विभागांत विवेचिलीं आहेतच. या वर्षीं दिवंगत लोकमान्यांची स्मृति महाराष्ट्रांत कायम टिकविण्याकरितां महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पुढारी मंडळींनीं सामायिक भांडवलाच्या तत्त्वावर एक कंपनी स्थापन केली आणि तिच्या मार्फत १९२१ मध्यें वर्षप्रतिपदेपासून केसरीच्या आकाराचें 'लोकमान्य' दैनिक सुरू केलें. 'केसरीं'त लो. टिळकांच्या नेतृत्वाखालीं बरींच वर्षे काम करून महाराष्ट्रास चांगल्या परिचयाचे झालेले नाटयाचार्य कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर हे 'लोकमान्य' दैनिकास संपादक लाभल्यामुळें 'लोकमान्या'चा दर्जा आणि लौकिक लवकरच वाढला. १९२२ अखेर 'लोकमान्या'चा प्रसार अंदाजाबाहेर गेला, पण १९२३च्या सुरुवातीला या पत्राच्या धोरणाबाबत चालकांत बराचसा तंटाबखेडा होऊन खाडीलकर यांनीं 'लोकमान्या'चें संपादकत्व सोडलें व 'नव्याकाळा'ची प्राणप्रतिष्ठा केली. खाडिलकर यांनीं 'लोकमान्या'शीं असलेला आपला संबंध सोडल्यामुळें लोकमान्य दैनिकाच्या प्रगतीवर विपरीत परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. भास्कर विष्णू फडके यांच्या 'विहारी'चे कांहीं दिवस संपादक असलेले पेणचे रामभाऊ मंडलीक यांनीं १९२३ सालीं 'लोकमान्या'चीं संपादकीय सूत्रें आपल्या हातीं घेतलीं आणि सुमारें दोन वर्षेपर्यंत त्यांनीं 'लोकमान्य'द्वारें प्रतिसहकारपक्षाचा जोरानें पुरस्कार केला. पण 'लोकमान्या'ची एकदां विसकटलेली घडी पुन्हां कधींच नीट बसली नाहीं. कंपनीच्या आर्थिक व्यवस्थेंत अनेक फेरफार होऊन अखेर कंपनीला १९२५ मध्यें आपला कारभार आवरावा लागला. वृत्तपत्रासाठीं कंपनी स्थापन करून दैनिक सुरू करण्याचा महाराष्ट्रियांचा हा तिसरा प्रयत्न होय. तो पण 'राष्ट्रमत' व 'लोकसंग्रह'प्रमाणेंच अयशस्वी ठरला.

लोकमान्य दैनिक जरी १९२५ सालीं बंद पडलें तरी त्या दैनिकांत आत्मीयतेनें काम करणाऱ्या चांदोरकर, घाणेकर व द. ग. सावरकर यांनीं १२-११-१९२० रोजीं 'श्रीलोकमान्य' दैनिक सुरू केलें पण तें सुमारें २।३ वर्षेंच चाललें. गेल्या दोन

महिन्यांपासून द. ग. सावरकरांनीं लोकमान्य दैनिक प्रसिद्ध करण्यास पुनश्च सुरुवात केली आहे.

कृ. प्र. खाडिलकर यांनीं लोकमान्याचीं सूत्रें खालीं ठेवल्यानंतर 'नवा काळ' पत्र काढल्याचें वर सांगितलेंच आहे. या कामीं त्यांना यंदे शेटजी आणि इंदुप्रकाशचे माजी सहसंपादक न. र. फाटक यांची मोठी मदत झाली. गेलीं १३ वर्षें 'नवा काळ' पत्र मुंबईत चांगलें चाललें आहे. यांतील 'ग्रंथ व ग्रंथकार' हें सदर वाचनीय असतें.

मुंबईत राष्ट्रीय पक्षाच्या मताचा पुरस्कार करणारें एक पैसा किंमतीचें स्वस्त दैनिक म्हणजे 'प्रभात' होय. अच्युतराव कोल्हटकर यांनीं प्रभातमधून आपलें लेखन सुरु केल्यामुळें प्रभात थोड्याच वेळांत लोकप्रिय झाला. प्रभातनें नुकतींच आपलीं पांच वर्षें पुरीं करून आतां सहाव्या वर्षांत प्रवेश केला आहे.

ह्याच कालखंडांत पुण्याच्या दैनिक ज्ञानप्रकाशाची मुंबई आवृत्ति १–६–२९ पासून मुंबईत दररोज सायंकाळीं निघूं लागली. आजहि दैनिक ज्ञानप्रकाशची ही आवृत्ति मुंबईत दररोज दुपारीं निघत असते. महत्वाच्या सभांचे व प्रसंगांचे विस्तृत वृत्तांत अखिल महाराष्ट्रांत त्वरित प्रसिद्ध करण्यासाठीं ज्ञानप्रकाशनें पुणें व मुंबई येथील दोन्ही आवृत्तींच्या द्वारें यशस्वी प्रयत्न केले आहेत. ज्ञानप्रकाशच्या या अपूर्व यशाचें श्रेय सर्वस्वी ज्ञानप्रकाशचे आजचे संपादक कृष्णाजीपंत लिमये यांस आहे.

वरील दैनिकांशिवाय मोरमकर यांच्या श्रीलक्ष्मीनारायण प्रेसतर्फे 'विविधवृत्त' या प्रसिद्ध साप्ताहिकाचें भावंड म्हणून दैनिक 'लोकहित' नांवाचें "सायंदैनिक" ज्ञानप्रकाशच्या सायंदैनिक आवृत्तीप्रमाणें निघत असे, पण तें टिकलें नाहीं. या दैनिकाचे अवघे २–४ अंक निघून तें बंद झालें.

१९२९ च्या मार्च महिन्याच्या प्रारंभापासून मुंबईमध्यें वैद्य-ब्रदर्स यांनीं सुरू केलेल्या 'ताजी बातमी' या दिडकीवाल्या दैनिक वृत्तपत्राचा प्रस्तुत स्थळीं उल्लेख करावयास पाहिजे. मुंबईतील गिरणीकामगारांच्या संपांची आणि इतर ठिकाणची मजुरांना रुचेल अशी ताजी बातमी चटकदार स्वरूपांत आणि आकर्षक मथळ्यांनीं सजवून देण्याचा सुंदरराव वैद्य यांचा उपक्रम अनुभवानें यशस्वी ठरला आहे. संपादकीय लेख अगर स्फुटें यांना या ताज्या बातमींत मुळींच जागा देण्यांत येत नसते.

मुंबईच्या 'फ्री प्रेस ऑफ इंडिया, लिमिटेड' ह्या कंपनीचे चाळक चालक एस्. सदानंद यांनीं खुद्द मुंबईंत 'फ्री प्रेस जर्नल' हें इंग्रजी दैनिक गेलीं साडेपांच वर्षेंपर्यंत अत्यंत धडाडीनें चालविलें होतें. 'नवशक्ति' व 'नवभारत' हीं फ्री प्रेस जर्नलचीं लहान भावंडें होतीं व तीं अनुक्रमानें मराठी व गुजराथी भाषेंत निघत असत. हीं तीन्ही पत्रें सरकारी रोषास नुक्तींच बळी पडलीं आहेत.

१९३०–३१ च्या सुमारास मुंबईस एक दिडकीवालीं अशीं 'धुमधडाका', 'भगवा झेंडा', 'तिरंगी झेंडा', 'श्रीशिवाजी' वगैरे अनेक वृत्तपत्रें निघालीं. यांपैकीं कित्येक वृत्तपत्रांनीं गिरणीकामगारांची बाजू उचलून धरली होती.

## पुण्याचीं पैसावालीं दैनिकें

गेल्या १० वर्षांच्या अवधींत मुंबईप्रमाणें पुण्यानेंहि दैनिकें प्रसिद्ध करण्याच्या बाबतींत बरीच अघाडी मारली आहे. मुंबईचीं दैनिकें ज्याप्रमाणें नागपूर, वऱ्हाड, कोंकण वगैरे भागांत त्वरित जाऊं शकतात त्याप्रमाणें पुण्यांत प्रसिद्ध होणाऱ्या दैनिकांच्या प्रसाराला दक्षिण महाराष्ट्र, कोल्हापूर, मिरज, सांगली, सावंतवाडी वगैरे भागांत अद्यापि भरपूर वाव आहे. पुण्याचीं दैनिकें मुंबईच्या दैनिकांपेक्षां कर्नाटकांतील मराठी वाचकांना ताजी बातमी अधिक त्वरेनें पुरवितात. अमेरिकेंत वृत्तपत्रशास्त्राचें अध्ययन करून स्वदेशीं परत आल्यावर डॉ. ना. भि. परुळेकर यांनीं आपल्या व्यासंगास अनुरूप असें दैनिक 'सकाळ' पत्र सुरू केलें, तें गेल्या ४ वर्षांपासून चालू आहे. सकाळचें वैशिष्ट्य म्हणजे मुलाखती घेऊन त्या छापणें हें आहे. ग्रंथपरीक्षण, ललितकलाविलास, आरोग्यविषयक चर्चा, परराष्ट्रीय घडामोडी वगैरे सदरांखालीं त्यांत वाचनीय मजकूर येत असतो. परंतु त्याचा आकार लहान असल्यामुळें कोणताहि विषय अगर व्याख्यान त्यांत विस्तृत येत नाहीं. सकाळमधून निघून श्री. शि. ल. करंदीकर यांनीं 'त्रिकाळ' हें दिडकीवालें दैनिक सुरू केलें आहे. या छोट्या दैनिकांतील भाषा, मथळे, आणि मजकुराची मांडणी 'सकाळ'पेक्षां बरी असते. 'त्रिकाळ' पत्रास तोडीस तोड म्हणून सकाळकारांनींहि आपल्या संपादकवर्गांतील ना. तु. ठाकुर यांना संपादक बनवून त्यांच्या करवीं 'तेज' नांवाचें एक पैसावालें दैनिक गेल्या वर्षापासून सुरू केलें आहे. १९३० सालीं मुंबईंत साप्ताहिक स्वरूपांत कांहीं दिवस निघत असलेल्या 'तेजा'त जो एक प्रकारचा तेजस्वीपणा व तडफ होती ती मात्र या छोट्या तेजांत दिसत नाहीं. हीं पत्रें अमेरिकेंतील 'यलो प्रेस'चें अनुकरण करीत आहेत असें दिसतें.

पुण्यांतील 'शांतिदूत' या आणखी एका गेलीं पांच वर्षे चाललेल्या दिडकीवाल्या दैनिकाची नोंद पुण्यांतील वृत्तपत्रांच्या इतिहासांत अवश्य करावयास पाहिजे. रा. वा. स्वामी रामलिंग करमाळेकर यांनीं आपल्या ज्ञातिहितासाठीं 'वीरशैव केसरी' हें साप्ताहिक १९२९ च्या सुमारास पुणें येथें सुरू केलें. त्यानंतर १९३०-३१ मध्यें त्यांनीं 'शांतिदूत' हें दैनिक काढलें व तें सुमारें ५ वर्षेपर्यंत चालविलें होतें. शांतिदूत गेल्या वर्षअखेर बंद झालें. १९२५ मध्यें ज्ञानकोशकार डॉ. श्री. व्यं केतकर यांनीं आपल्या ज्ञानकोशमंडळांतील सहकाऱ्यांच्या साहाय्यानें 'पुणें समाचार' दैनिक सुरू केलें होतें. परंतु तें फार दिवस जगलें नाहीं.

## ब्राह्मणेतर वृत्तपत्रांचें जागृतिकार्य

गेल्या ८-१० वर्षांत महाराष्ट्रांत विशिष्ट ध्येयानें प्रेरित होऊन कित्येक वर्तमानपत्रें उदयास आलीं. परंतु त्यांचें आयुष्य मर्यादित ठरलें. ह्यांतील कांहीं वृत्तपत्रांचा नामनिर्देश करणें जरूर आहे. वृत्तपत्रांचें खरें कार्य म्हणजे समाजांतील विशिष्ट पक्षाचा पुरस्कार करून त्या पक्षाची बाजू लोकांपुढें वकिली बाण्यानें मांडावयाची ह असतें. आपल्या समाजाचा उत्कर्ष व सामाजिक आणि राजकीय आकांक्षा सिद्धीस नेण्यासाठीं कोणती उपाययोजना करावी याचें स्पष्ट चित्र त्या त्या पक्षाच्या वर्तमानपत्रांत यथार्थपणें प्रतिबिंबित झालें पाहिजे. तसें पाहिल्यास महाराष्ट्रांतील आजच्या व आतां स्मृतिशेष झालेल्या बहुतेक वर्तमानपत्रांनीं आपलें जीवितकार्य यथाशक्ति, यथाबुद्धि यशस्वी केलें आहे. आपल्या विशिष्ट ध्येयाचा पुरस्कार आणि प्रसिद्धी करतांना ह्या वृत्तपत्रांच्या संपादकांच्या लेखांतून जास्त कडकपणा अगर अभिनिवेश व्यक्त झाला असेल, अगर प्रतिपक्षाबद्दल एखाद्या वेळीं वाजवीपेक्षां जास्त अनुदार बुद्धि दाखविली गेली असेल; पण त्यांच्या लेखणीच्या मागें स्वपक्षाचें यथार्थ व स्वाभिमानपूर्वक प्रतिपादन ही एकच गोष्ट होती, हें त्याच्या पक्षाच्या प्रतिस्पर्ध्यांनाहि कबूल करावें लागेल.

गेल्या पंधरा वर्षांत ब्राह्मणेतर चळवळीचा बराच प्रसार झाला आहे. पुढारलेल्या वर्गाकडून मागासलेल्या लोकांच्या उन्नतीबाबत गेलीं कित्येक वर्षे अक्षम्य दुर्लक्ष झालें आहे. ज्या समाजावर राष्ट्राच्या उत्कर्षाची सर्वस्वीं नसली तरी बव्हंशीं मदार असावयाची त्या समाजाचें शिक्षण व उत्कर्ष यांच्या बाबतींत पुढारलेल्या समाजाकडून आणि राजसत्तेकडून फार दिवस हेळसांड झाली आहे. आजच्या सार्वत्रिक जागृतीच्या काळांत कोणताहि समाज निमूटपणें 'बाबावाक्यं प्रमाणं'

असें मानून पुढें जाणार नाहीं. ब्राह्मणेतर पक्षाच्या गेल्या एका तपांतील वृत्तपत्रांचा इतिहास पाहतां हीच गोष्ट ज्यास्त प्रामुख्यानें पुढें येते. ब्राह्मणादि पुढारलेल्या जातींकडून होणाऱ्या सामाजिक जुलमाचा निषेध करण्यासाठीं जुनें 'दीनमित्र' वृत्तपत्र निघत असे. आजहि श्री. पाटील हे तरवडीसारख्या आडबळणाच्या गांवीं साप्ताहिक 'दीनमित्र' कित्येक वर्षें बरीच झीज सोसून चालवीत आहेत. कोठारी यांचें 'जागरूक', शिंदे यांचा 'विजयी मराठा' व पाळेकर यांची 'जागृति' या पत्रांचा मागें उल्लेख आला आहेच. १९२१ सालीं भोसले यांनीं मागासलेल्या वर्गाच्या उन्नतीसाठीं सुरू केलेलें 'राष्ट्रवीर' साप्ताहिक आजहि आपलें कार्य करीत आहे. सरळ दिसणाऱ्या कित्येक गोष्टींना विकृत व विनोदी स्वरूप देऊन 'दीनमित्रा'प्रमाणें हें साप्ताहिकहि मागासलेल्या वर्गाच्या हिताचा अत्यंत जोरदार भाषेंत पुरस्कार करतें. 'गरिबांचा कैवारी' (कोल्हापूर), 'गरुड' (कोल्हापूर), 'तरुण मराठा' (कोल्हापूर), 'कैवारी' (मुंबई), व 'मजूर' (पुणें), ह्या वृत्तपत्रांची कामगिरी मागासलेल्या वर्गांत अभिनव जागृति करण्याच्या दृष्टीनें जरी कांहीं प्रसंगीं जहाल स्वरूपाची झाली असली तरी त्यांनीं लोकजागृतीचें महत्त्वाचें कार्य करण्यास बरेंच साहाय्य केलें आहे. 'मराठा नवजीवन' हेंहि एक नवीन साप्ताहिक कोल्हापुरांत नुकतेंच प्रसिद्ध होऊं लागलें आहे. यांपैकीं कांहीं पत्रांतून मध्यंतरीं किळसवाणे लेख येत असत, पण ब्राह्मण–ब्राह्मणेतरवादाची तीव्रता आतां नाहींशी झाली असल्यानें हा प्रकार थांबला आहे.

## महाराष्ट्रांतील जिल्हापत्रें

पुणें, मुंबई, नागपूर, कोल्हापुर, हीं मराठी वृत्तपत्रांचीं केंद्रें वगळून महाराष्ट्रांतील जिल्ह्यांच्या शहरांकडे नजर टाकल्यास तिकडेहि वृत्तपत्रसंस्था सुमारें सत्तर वर्षांपूर्वींच दृढमूल झालेली दिसते. सातारा, रत्नागिरी, बेळगांव, सोलापूर, जळगांव, धुळें ह्या ठिकाणीं पन्नास वर्षांहून अधिक काळ प्रसिद्ध होत असलेलीं वर्तमानपत्रें आहेत. परंतु, त्या वृत्तपत्रांचें जीवन कोर्टाच्या नोटिसा, सरकारी व निमसरकारी संस्थांच्या जाहिराती वगैरेवर कसेंबसें अवलंबून असल्यामुळें त्यांना वर्तमानपत्राचा चांगला कागद, छपाई आणि आकर्षक बाह्यांग करण्याकडे यत्किंचितहि लक्ष पुरवितां येत नाहीं. जिल्हा-वर्तमानपत्रें हीं आपल्या जिल्ह्याच्या आकांक्षा व उणीवा योग्य शब्दांत जनतेपुढें व अधिकाऱ्यापुढें मांडणारीं असावींत. आपल्या जिल्ह्यांतील सोयी-गैरसोयी, खेडेगांवांतील शेतकऱ्यांच्या तक्रारी, जमिनीची व पीक-

राज्याची हालहवाल वगैरे संबंधांतील जिल्ह्याची संपूर्ण हकीकत जिल्हापत्रांत यावयास पाहिजे याची आजच्या जिल्ह्याचीं मुखपत्रें म्हणविणाऱ्या बहुतेक सर्व पत्रांच्या संपादकांना जाणीव दिसत नाहीं. या बाबतींत गेल्या पंधरा वर्षांत निघालेल्या कांहीं जिल्ह्यांतील साप्ताहिकांनीं नवीन युगास अनुसरून नमुनेदार प्रगति केली आहे. रत्नागिरीचा 'बलवंत' आणि साताऱ्याचें 'ऐक्य' व 'समर्थ', उमरावतीचा 'उदय', सावंतवाडीचा 'वैनतेय', कुलाब्याचा 'कुलाबा-समाचार' हीं वृत्तपत्रें आपआपल्या जिल्ह्यांत चांगली कामगिरी बजावीत आहेत. जिल्ह्यांतील लहानमोठ्या गांवांची माहिती देण्याचें कार्य 'बलवंत' व 'समर्थ' ह्या दोन पत्रांनीं उत्तम प्रकारें चालविलें आहे. सोलापुरांतील लष्करी अंमलांतील गोळीबाराची हकीकत प्रसिद्ध केल्यामुळें 'कर्मयोगी' साप्ताहिक अधिकाऱ्यांच्या रोषास बळी पडलें आणि सदर पत्राचे संपादक श्री. रामभाऊ राजवाडे यांना लष्करी कायद्याखालीं सात वर्षांची शिक्षा झाली.

## उत्तर हिंदुस्थानांतील मराठी वृत्तपत्रें

उत्तर हिंदुस्थानांतील कांहीं जुन्या वृत्तपत्रांची माहिती वर आली आहेच. ग्वाल्हेर येथें निघणाऱ्या 'जयाजी प्रताप'मधील हिंदी लेखांबरोबर प्रसंगीं मराठी लेखहि येत असत. देवास ( मोटी पाती ) येथें निघणारें 'श्रीशिवाजी' साप्ताहिक अल्पकाळांतच बंद झालें. शिरढोणकर यांनीं आपल्या 'मराठी' या मासिकाबरोबर 'आषा' नांवाचें हिंदी साप्ताहिक काढलें आहे. पण यामुळें 'हितचिंतका'ची मात्र आबाळ होत आहे. डॉ. ओक यांचें 'मार्तंड' साप्ताहिक मात्र देवास ( धाकटी पाती ) येथें आजहि कसेंबसें प्रसिद्ध होत असतें.

हिंदी राजकारणाची ज्याप्रमाणें हिंदुस्थानांतील वृत्तपत्रें चर्चा करतात त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील संस्थानी राजकारणाची चर्चाहि हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व वृत्तपत्रें करतात. केवळ हिंदी संस्थानांच्याच राजकारणाची चर्चा करण्यासाठीं 'संस्थानी स्वराज्य' हें एकच साप्ताहिक अ. वि. पटवर्धन यांच्या संपादकत्वाखालीं दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेच्या विद्यमानें सध्यां निघत असतें. 'संस्थानी भारत' ह्या नियतकालिकाचे कांहीं अंक निघून त्यानें राम म्हटला.

## मुंबई-पुण्याच्या प्रमुख साप्ताहिकांचें समालोचन

जिल्ह्याच्या वर्तमानपत्रांच्या कामगिरीचा थोडासा उल्लेख केल्यानंतर पुण्या-मुंबईच्या कांहीं साप्ताहिकांचा उल्लेख करावयास पाहिजे. या साप्ताहिकांचें कार्य

अखिल महाराष्ट्रीय स्वरूपाचें असतें. विशिष्ट ध्येयानुसार त्यांचें प्रकाशन सुरु असून महाराष्ट्रांत आणि इतरत्र ज्या ज्या ठिकाणीं मराठी भाषा बोलली जाते, त्या त्या ठिकाणीं त्यांचा प्रसार आहे. मुंबईत केवळ मनोरंजन हा हेतु प्रधान ठेवून चाललेलीं साप्ताहिकें 'सहस्रकर' (१९२५), 'प्रफुल्लता' (१९१९), 'मौज' (१९२२), 'दौलत' (मुंबई) वगैरे होत. यांशिवाय मनोरंजक, विविध आणि चटकदार बातम्या आणि लहान लहान आकर्षक भाषेंत लिहिलेले ज्ञानवर्धक लेख व कांहीं उपयुक्त माहिती 'तुतारी' (मुंबई), 'विविधवृत्त' (मुंबई), 'विहार' (मुंबई), 'वसुंधरा' (मुंबई), 'दुनिया' (मुंबई), 'सत्यवादी' (कोल्हापूर), 'क्रांति' (मुंबई), 'चाबूक' (मुंबई) वगैरे वृत्तपत्रांत येत असते. हिंदुस्थानांतील कोनाकोपऱ्यांतील विशिष्ट मतप्रणालीची माहिती देणारीं साप्ताहिकें म्हणजे 'चाबुकस्वार', 'संदेश', 'रणगर्जना', 'नवी मौज', 'सावधान', 'प्रताप', 'तिरंदाज' वगैरे होत. परंतु हीं सर्व वर्तमानपत्रें आतां स्मृतिशेष झालीं आहेत. डॉ. सावरकर यांच्या 'श्रद्धानंदा'नें भाषाशुद्धि, हिंदुसभेच्या कार्याचा प्रचार व शुद्धिसंघटन यांवरच भर दिला होता. प्रेस ऑर्डिनन्समुळें बंद पडलेल्या नवरे यांच्या 'प्रताप' पत्रांत क्रांतिकारकांच्या खटल्याची हकीकत येत असे. 'कर्नाटक' प्रेसतर्फे शेजवलकर यांच्या संपादकत्वाखालीं निघणारें 'प्रगति' हें साप्ताहिक मुंबईत थोड्याच दिवसांत फार लोकप्रिय झालें होतें. सुशिक्षित वाचकवर्गास उपयुक्त अशी सामाजिक व राजकीय विषयांवरील भारदस्त चर्चा, मुंबईच्या व्यापारी परिस्थितीचें समालोचन आणि नवविचारप्रवर्तक लेख वगैरेमुळें 'प्रगती'चा प्रसार व लौकिक बराच वाढला होता. पण प्रेस-ॲक्टखालीं सरकारनें जामीनकी रक्कम मागितल्यामुळें चालकांनीं हें साप्ताहिक बंद ठेवलें. केवळ करमणुकीसाठींच कांहीं वर्षे 'करमणूक' निघत होती.

यानंतर गेल्या व चालू वर्षांत मुंबईस 'निर्भीड' व 'प्रवासी' ह्या दोन साप्ताहिकांनीं बरीच लोकप्रियता मिळविली आहे. मो. ग. रांगणेकर यांच्या 'वसुंधरा' साप्ताहिकानेंहि बऱ्याच वाचकांना झुलविलें आहे. 'विहार'च्या साप्ताहिक अंकांत विहार करून आणि 'विविधवृत्त' वाचून अलोट वाचकांना नवी 'मौज' वाटते; तर कित्येकांना 'निर्भीड' लेख वाचून 'प्रवासी'मधील बोलवेवड्याच्या शेंगा खाण्याचा मोह आवरत नाहीं. अशा रीतीनें मुंबईतील वृत्तपत्रांची 'दौलत' वाढत आहे !

गेल्या १५ वर्षांत वृत्तपत्रांत एक प्रकारचा रेखीवपणा आला असून विशिष्ट ध्येयपूर्तीसाठीं वृत्तपत्रांच्या चालकांचे परिश्रम एका विशिष्ट दिशेनें चाललेले आढळतात. राजकारणाच्या खालोखाल महाराष्ट्रांतील सर्व प्रमुख साप्ताहिकें वाङ्मयाचा परामर्ष घेणारीं आहेत. केसरी, ज्ञानप्रकाश, नवाकाळ, महाराष्ट्र, उदय, वैनतेय वगैरे वृत्तपत्रांनीं वाङ्मयचर्चेस विशेष प्राधान्य दिलें आहे. मराठींत प्रसिद्ध होणाऱ्या बहुतेक सर्व ग्रंथांचा आणि नियतकालिकांचा परामर्ष ह्या वृत्तपत्रांतून घेतला जातो. केवळ वाङ्मयाचा साकल्यानें विचार करणाऱ्या पत्राची उणीव मराठी वाङ्मयांत आज बरेच दिवस भासत होती. परंतु 'प्रतिभा' नांवाच्या मुंबईच्या पाक्षिकानें ही उणीव अंशतः भरून काढली आहे.

मराठी वाङ्मयचर्चेच्या खालोखाल शिक्षणप्रसाराचा प्रश्न येतो. मराठी भाषेंतील इतर विषयांचीं नियतकालिकें सोडून देतां, केवळ शिक्षणशास्त्राचा विचार करणारें एकहि वृत्तपत्र नाहीं हें निःसंशय. नाहीं म्हणावयाला उमरावतीच्या मॉंटिसरी संघामार्फत एक छोटेंसें 'शिक्षणपत्रिका' नांवाचें पाक्षिक विशेष गाजावाजा न करतां निघत असते.

महाराष्ट्रांतील प्राथमिक शिक्षकांच्या अडचणी आणि त्यांच्या तक्रारी यांना वाचा फोडण्यासाठीं 'शिक्षकाचा कैवारी' हें मासिक गेलीं २ वर्षे कऱ्हाडसारख्या आडवळणाच्या गांवीं प्रसिद्ध होत आहे. यापूर्वीचीं शैक्षणिक नियतकालिकें म्हणजे 'कॉलेज', 'सवाईकॉलेज' आणि 'हायस्कूल' हीं तीन साप्ताहिकें थोड्या वर्षांपूर्वी पुणें येथें निघत होतीं. परंतु वर्तमानपत्रांच्या लेखनांत जो एक प्रकारचा भारदस्तपणा असावयास पाहिजे तो त्यांत नसल्यामुळें वरील तीन्ही वृत्तपत्रें अल्पावधींतच नामशेष झालीं.

सध्यां मुंबई, पुणें, कलकत्ता, अहमदाबाद वगैरे भागांत गिरणीकामगारांची चळवळ बरीच जोरांत असते. कामगारांच्या हितसंबंधाचा विचार करणारीं अनेक वृत्तपत्रें गेल्या दहा वर्षांत जन्मास आलीं आणि बंद झालीं. गिरणीकामगार, 'लाल बावटा', 'धुमधडाका' वगैरे निरनिराळ्या कामगार-संघांमार्फत हीं वृत्तपत्रें प्रसिद्ध होत असत. ह्यामुळें कामगार-संघांच्या प्रभावाबरोबर हीं वृत्तपत्रें प्रभावी ठरत आणि ते संघ कमकुवत झाल्याबरोबर हीं वर्तमानपत्रेंहि आपोआप अल्पायु होत. पाश्चात्य कामगारवर्गाच्या चळवळींचा प्रभाव हीं वृत्तपत्रें चालविणाऱ्या लोकांवर विशेष असल्यामुळें हीं वर्तमानपत्रेंहि परदेशांतील कामगारांच्या चळवळीची माहिती

देतात. 'क्रांति' व 'नौबत' हीं वर्तमानपत्रें अशाच प्रकारें चाळविण्यांत येत होतीं. मिरत कटाच्या खटल्यांतील शिक्षा भोगून नुकतेच परत आलेले डांगे हे या पत्रांचे संपादक होते. जगांतील कामगारांच्या चळवळी, बोल्शेविझम, कम्युनिझम व सोशॅलिझम या चळवळींची माहिती 'क्रांति' या साप्ताहिकांत येत असे. 'चाबुक', 'युगांतर', 'विहार' व 'संदेश' हीं वर्तमानपत्रेंहि कामगार चळवळीची विस्तृत माहिती देत.

वाढत्या बेकारीबरोबर आणि देशांतील आर्थिक हलाखीबरोबर मनुष्यप्राण्यांत अल्पायासानें श्रीमान् होण्याची इच्छा उत्पन्न होते व त्यासाठीं तो फलज्योतिषाकडे वळतो. समाजांतील ह्या कमकुवतपणाचा फायदा घेण्यास दूरदर्शी भविष्यवादी आज वृत्तपत्रीय जगांत स्वैर संचार करतांना आढळतात. आज मुंबईत केवळ भविष्य-कथन करण्याकरितां 'भविष्य-दिनकर', 'भविष्यभास्कर', 'भविष्य' व 'भविष्यदीप' अशीं चार साप्ताहिकें निघूं लागलीं आहेत. यांशिवाय खुद्द पुणें येथें 'कुंडलीविज्ञान' व 'भविष्य-चिंतामणी' हीं दोन साप्ताहिकें सुरू झालीं आहेत. अशा रीतीनें पांचसहा भविष्यकथनपर साप्ताहिकें महाराष्ट्रियांना भविष्य कालांतील अज्ञात गोष्टींची माहिती करून देण्यासाठीं सतत खटपट करीत आहेत!

धार्मिक प्रवृत्तींना चालना देणाऱ्या साप्ताहिकांचा आतां विचार करूं. आज सनातनी आणि सुधारक हा पूर्वीपासूनचा मतभेद जास्तच तीव्र झाला आहे. मंदिरप्रवेश, सहभोजन आणि स्पर्शास्पर्श ह्या बाबींवर सनातनी-सुधारकांत रणें पडत आहेत. अशा वेळीं, वर्णाश्रम-स्वराज्यवादी सनातनी मंडळींनीं 'भारत-धर्म-समाचार' (मुंबई), 'धर्मवीर' (नागपूर), 'हंस' (सातारा) आणि 'विश्वोद्धार' (पुणें), हीं ३-४ साप्ताहिकें आपल्या प्राचीन-सनातन धर्माच्या पुरस्कारासाठीं गेलीं २-३ वर्षें चालविलीं आहेत. यांशिवाय, 'भाला' पत्र सनातनी मतांचा पुरस्कार करीत असतें तें निराळेंच.

आजच्या सुशिक्षित समाजांत वाङ्मय आणि ललितकला यांसंबंधीं विशेष आस्था दिसून येते. करमणुकीसाठीं आज सिनेमा आणि नाटकें यांचा प्रवात अतोनात वाढला आहे. नाटकांपेक्षां बोलपटांनींच सर्वस्वीं महाराष्ट्रीय रंगभूमी पादाक्रांत केली आहे. त्यामुळें निरनिराळ्या प्रमुख साप्ताहिकांत आणि दैनिकांत सिनेमा-समाचार आणि महाराष्ट्रीय रंगभूमी यांसंबंधींची चर्चा अलीकडे येऊं लागली

आहे. आज ' सिनेमा समाचार ' ( मुंबई ), ' किरण ' ( पुणें ), ' प्रेक्षक ' (मुंबई), ' सिनेमा ' ( मुंबई ) हीं चित्रपटविषयक साप्ताहिकें केवळ जनतेंत नवीन नवीन येणाऱ्या चित्रपटांची, आणि चित्रपट कंपन्यांची माहिती देण्याकरितां अवतरलीं आहेत. यांशिवाय बोलपटांच्यासंबंधीं सर्व नियतकालिकांतून स्वतंत्र लेखांच्या द्वारें चर्चा चालते ती वेगळीच !

स्त्रियांच्या प्रश्नांसंबंधीं चर्चा प्रायः सर्व नियतकालिकांतून विशेषतः साप्ताहिकांतून चालते. ज्ञानप्रकाशमधील ' स्त्रियांचे प्रश्न ' हा विभाग फारच लोकप्रिय झाला आहे. स्त्रियांच्या प्रश्नांचा विचार करणारें एकमेव ' हिंदमहिला ' हें साप्ताहिक १९२३ च्या सुमारास मुंबईत सौ. अवंतिकाबाई गोखले यांच्या संपादकत्वाखालीं २।३ वर्षें प्रसिद्ध होत होतें. त्यानंतर ' संजीवनी ' हें पाक्षिक स्त्रियांच्या प्रश्नांचीच चर्चा करण्यासाठीं गेलीं तीन वर्षें निघत आहे.

महाराष्ट्रांतील व हिंदुस्थानांतील बहुजन-समाज शेंकडा ९०चे वर शेतकीवर अवलंबून असतांहि शेतकीसंबंधीं माहिती देणाऱ्या एक दोन मासिकांशिवाय केवळ शेतकीविषयक अशीं दुसरीं नियतकालिकें निघत नाहींत! मात्र १९३४ सालीं पूर्वी ठाणें येथें ' गोरक्षण ' संस्थेमार्फत चालणारें ' गोरक्षण ' साप्ताहिक, गेलीं कांहीं वर्षें पुणें येथें नवाथे यांच्या संपादकत्वाखालीं निघत आहे. ह्यांत गोरक्षण, पशुसुधारणा आणि पशुशास्त्र यांची सांगोपांग चर्चा येते. यांशिवाय दैनिक ज्ञानप्रकाशमधील शेती व सहकार यांसंबंधीं येणारी चर्चा आणि माहिती शेतींत लक्ष घालणाऱ्या मंडळींना उपयुक्त अशीच असते. खेरीज केसरी व नवाकाळ वगैरे वृत्तपत्रांतून शेती-संबंधींची चर्चा वेळोवेळीं येत असते.

केवळ अर्थशास्त्र आणि व्यापार यांतील विषयांची पुण्यास चर्चा करणारें ' अर्थ ' नांवाचें साप्ताहिक सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय अर्थशास्त्रज्ञ प्रो. वामनराव काळे यांच्या संपादकत्वाखालीं पुण्यास प्रसिद्ध होत आहे, ही मोठ्या अभिमानाची गोष्ट आहे.

१९२० व १९३५ या काळांतील गोमंतकांतील मराठी वृत्तपत्रांचाहि उल्लेख करावयास पाहिजे. प्रभात हें साप्ताहिक पत्र १९१३ ते १९१७ पर्यंत चाललें होतें. त्यानंतर नवजीवन ( १९२० ), प्रगति ( १९२० ), गडगडाट ( १९२१ ), हिंदु (१९२४), प्रकाश ( १९१८), प्रदीप (१९२९), व भारत

( १९१३ ), या वृत्तपत्रांनीं बरेंच जागृतिकार्य केलें आहे. आज मात्र गोमंतकांत एकमेव असें भारत हेंच साप्ताहिक चालू आहे.

जेथें मराठी भाषा बोलली जाते त्या कोल्हापूर, सांगली, मिरज व बडोदें, या संस्थानांत बरींच मराठीं वृत्तपत्रें निघत आहेत. त्यांचा वर उल्लेख आलाच आहे. हैद्राबाद संस्थानांत १८६४ सालीं इंग्रजी व १८७८ सालीं ऊर्दु वर्तमानपत्रें जन्मास आलीं तरी १८९७ पर्यंत—निजामवैभवाच्या जन्मापर्यंत-कोणतेंहि मराठी वृत्तपत्र नव्हतें. १९०६—०८ पर्यंत भाग्येशविजय वर्तमानपत्र चालू होतें. त्यानंतर ज्याचा अभिमान-पुरस्सर उल्लेख करतां येईल, त्या एका वृत्तपत्राचा-निजामविजयाचा-उल्लेख करणें जरूर आहे. केवळ मराठी भाषा बोलणाऱ्या ३२ लाख हिंदी जनतेसाठीं हें एकच वृत्तपत्र पण तेंहि अत्यंत विषम परिस्थितींत चाललें आहे, त्याला पुरेसे वर्गणीदार मिळत नाहींत, ही लाजिरवाणी व दुःखाची गोष्ट आहे.

हिंदुस्थानांतील वृत्तपत्रांचें खरें महत्त्व त्यांनीं घडवून आणलेल्या अभूतपूर्व राष्ट्रीय जागृतींत आहे, ही गोष्ट सर्वांना पटली आहेच. हिंदुस्थानांतील वृत्तपत्रें देशांतील राजकारणाचाच प्रामुख्यानें विचार करतात, अशी तक्रार कित्येक पाश्चात्य पंडितहि करतांना आढळतात. पण हिंदी वृत्तपत्रांच्या पुढें सध्यांच्या विषम राजकीय परिस्थितींत राजकारणच प्रामुख्यानें वावरतें; कारण या एकाच प्रश्नाच्या चर्चेत इतर प्रश्न आपोआप सोडविले जातात. तथापि जिल्हा-वृत्तपत्रांतून गंभीर विषयांची, आंतरराष्ट्रीय राजकारणाची जी निष्फळ चर्चा आढळून येते, ती पाहतां एकजात सर्व वृत्तपत्रांना राजकारणानें खरेंच पछाडलेलें आहे, असें दिसून येतें. वास्तविक राजकारणाची चर्चा मोठ्या प्रांतिक वृत्तपत्रांकडेच ठेवून जिल्ह्यांतील वर्तमानपत्रांनीं आपल्या स्थानिक प्रश्नांची जास्त व विस्तृत चर्चा करावयास पाहिजे. ती न करतां हीं वृत्तपत्रें पुण्यामुंबईच्या साप्ताहिकांतील अग्रलेख अगर स्फुटें जेव्हां आत्मसात् करूं पाहतात, अगर तीं जशींच्या तशीं आपल्या पत्रांत उतरून घेतात, तेव्हां या अंध—परप्रत्ययनेयबुद्धीच्या संपादकांची तारीफ करावी कीं त्यांच्या संपादकीय अज्ञानाची कींव करावी, हेंच समजत नाहीं ! असो.

हिंदुस्थानची भावी स्वराज्यघटना आतां दृष्टिपथांत आल्यामुळें यापुढें राजकारणाची निर्भीड आणि विधायक स्वरूपाची चर्चा होणें जरूर आहे; अशा वेळीं देशांतील बहुजन-समाजाच्याच केवळ हिताच्या दृष्टीनें वृत्तपत्रांनीं राजकारणाचा

विचार करणें कर्तव्य ठरतें व तें चांगलें पार पाडण्यानेंच अखिल भारतांतील वृत्तपत्रांचें व तदनुषंगानें मराठी वृत्तपत्रांचें महत्त्व उत्तरोत्तर वाढत जाईल, यांत संशय नाहीं.

आपल्याकडे नियतकालिकांची प्रगति अद्याप किती तरी व्हावयाची आहे. विशिष्ट व्यवसाय, खेळ, वाङ्मयविषय इत्यादि एकाच गोष्टीला वाहिलेलें पत्र किंवा मासिक इकडे निघत नाहीं व चालतहि नाहीं. लोकांची उच्च प्रवृत्ति किंवा आवड बनविण्याच्या कामीं फारच थोड्या नियतकालिकांस यश आलेलें आहे. अपयशाचें बहुशीं कारण हातीं घेतलेल्या कार्याचें संपूर्ण ज्ञान, धंद्याला लागणारी चिकाटी व सहकार्याची तत्परता यांचा चालकांच्या ठिकाणीं असणारा अभाव होय. नियतकालिकें चालविणारांचा एखादा समर्थ संघ निघेल तर सरकारकडून किती तरी सवलती मिळवितां येतील. इंग्लंडांतील वृत्तपत्रांमार्फत एक प्रतिनिधि मागें शांततापरिषदेंत गेला होता. यावरून तिकडील राज्यकर्त्यांवर वृत्तपत्रांचें केवढ वजन असतें हें दिसून येईल. अद्याप विविध वाङ्मय नियतकालिकांच्या द्वारें निघूं शकत नाहीं. तेव्हां या उणिवा नियतकालिकांचा इतिहास पाहतांना प्रामुख्यानें नजरेस येतात.

---

१८

# उपसंहार

[ लेखकः--श्री. नरसिंह चिंतामण केळकर, बी.ए.,एल्‌एल्‌.बी. ]

प्रस्तुत ग्रंथाच्या सोळा विभागांत, अनेक तज्ज्ञ व विद्वान गृहस्थांनीं आधुनिक मराठी वाङ्मयाचें मार्मिक व सुंदर समालोचन केलें आहे. या वाङ्मयांतील एकेक खातें घेऊन त्यांत, १८७५-१९३५ या काळामध्यें निर्माण झालेले ग्रंथ व ग्रंथकार यांचा परामर्ष त्यांनीं कालानुक्रमानें, ज्याच्या त्याच्या योग्यतानुरूप, निःपक्षपातीपणानें घेतला आहे. हा परामर्ष घेतांना त्यांनीं त्या त्या खात्याच्या अनुरोधानें पण व्यक्तिनिरपेक्ष, म्हणजे सर्वसाधारण अशीं विधानें मधून मधून केलीं आहेत. त्यांत उपसंहारोपयोगी अशी सामग्री मला बरीच आढळली. तथापि या प्रसंगानें, आधुनिक मराठी वाङ्मया-संबंधानें मलाहि म्हणावेंसें वाटतें तें कांहीं थोडें लिहितों.

मराठी वाङ्मयाचा इतिहास सातआठशें वर्षांचा आहे. त्याचे दोन विषम भाग पडतात. पहिला भाग बारा तेराव्या शतकापासून थेट पेशवाई अखेरच्या कालापर्यंत; आणि दुसरा त्यानंतर आजपर्यंत सुमारें सवाशें वर्षांचा. पहिल्या सहाशें वर्षांतलें मराठी वाङ्मय मुख्यतः धार्मिक, पद्यात्मक, आणि जवळजवळ एकाच छापाचें होतें. पेशवाईनंतर इंग्रजी शिक्षणाला प्रारंभ झाल्यापासून हा छाप बदलूं लागला. त्यांतला धार्मिकपणा गेला. पद्याच्या मानानें गद्य पुष्कळच वाढलें व त्याला फार महत्त्व आलें. शिवाय या दुसऱ्या शंभर सवाशें वर्षांतच पांचसहा युगांतरें झालीं. त्यांचा क्रम सामान्यतः खालीलप्रमाणें सांगतां येईल.

